# श्रीदत्तात्रेय-ज्ञानकोश

卐

लेखक

डॉ. प्रल्हाद नरहर जोशी

卐



सुरेखा प्रकाशन- ग्रंथ प्रकाशक
२१ ला रिपोज बिल्डींग. गोखले सोसायटी लेन, परळ मुंबई १२

# मनोगत

या श्रीदत्तजयंतीच्या सुमुहूर्तावर 'श्रीदत्तात्रेय-ज्ञानकोश' या नावाचा हा एक संदर्भग्रंथ धार्मिक व सांस्कृतिक विषयांचे अभ्यासक व दत्तभक्त यांच्या हाती देताना मला अतिशय हर्ष होत आहे. प्रथमच दिलगीरपूर्वक निर्देश करावयास हवा की, या कोशाच्या प्रकाशनास अतिशय विलंब होत आहे. दत्तात्रेयकोशासंबंधीचे पहिले पत्रक प्रकाशकांनी २४-१२-१९६८ रोजी काढले त्या वेळी अंदाज असा की, दोनतीन वर्षांत या ग्रंथाची सिद्धता व्हावी परंतु नंतरच्या काळात संपूर्ण महाभारत व वाल्मीकि-रामायण यांच्या प्रकाशनात प्रकाशक गुंतून राहिले आणि त्यांच्या व्यावहारिक अडचणी वाढल्या. दत्त-कोशाची जमवाजमव होत असताना दुर्मिळ माहिती, छायाचित्रे, संदर्भ-ग्रंथ मिळविण्यातील अडचणीही अनुभवाने माझ्या लक्षात आल्या आणि ग्रंथाचा रूपविस्तार थोड्या वेगळ्या प्रकाराने केला तरच तो साधकांना व अभ्यासकांना उपयुक्त होईल असे वाटले या ग्रंथाचे नाव 'श्रीदत्तात्रेय-ज्ञानकोश' असे असले तरी केवळ मराठी वर्णानुक्रमे माहिती न देता ग्रंथात विषयवार विवेचन करून दत्तात्रेयासंबंधी सर्व काही नसले तरी पुष्कळसे व महत्त्वाचे द्यावे अशी कल्पना स्थिर होऊन या ग्रंथाची रूपरेषा तयार केली दरम्यान प्रकाशकांची अन्य जबाबदारी कमी होऊन त्यांनीही या कामी तातडीने लक्ष घालावयाचे ठरविले व या संदर्भग्रंथाच्या प्रकाशनास दत्तप्रभूंच्या कृपेनं मूर्त स्वरूप आले.

## पूर्वसुकृताचा धागा

'सांगे वडिलांची कीर्ति', असा मनुष्य कोण असतो हे रामदासांनी सांगितले असले तरी मी वडिलांची कीर्ती नुसतीच सांगत राहिलो आहे, असे मराठी वाचक निश्चितपणे म्हणणार नाहीत सार्थ श्रीतुकारामगाथा, सार्थ श्रीज्ञानदेवगाथा काही वर्षांपूर्वी मी संतप्रेमी वाचकांच्या हाती दिले त्या वेळी जी प्रेरणा माझ्या पाठीशी होती तीच नित्य स्फुरणदायी आहे संतचरित्रे, संतबोध, संतवाङ्मय यांनी सबंध आयुष्याला उजाळा मिळाला तो तीर्थरूपांच्या (मातृछपांकित नरहरशास्त्री खरशीकरांच्या) कृपेनेच ज्ञानेश्वरी, अनुभवामृत यांवरील त्यांची प्रवचने व भक्तिप्रेमात रंगलेली त्यांची कीर्तने ऐकलेले कितीतरी थोरे आज महाराष्ट्रात आहेत आमच्या संतप्रेमात आणखी एक बळकट धागा आहे त्याचाही निर्देश करायला हवा. आमची कुलदेवता औंधची यमाई असली तरी तिच्याच रूपात माहूरची श्रीरेणुका उपास्य दैवत बनली. माहूर येथील दत्तात्रेय व रेणुकामाता यांचे प्रख्यात उपासक श्रीविष्णु-दास हे तीर्थरूपांचे सख्खे मातुल व पारमार्थिक गुरू. दत्त, रेणुका व विष्णुदास यांच्या ओढीने तीर्थरूप चाळीसपन्नास वर्षे माहूरच्या परिसरात वावरले. त्यांनी आठव्या वर्षीच श्रीगुरुचरित्राचे पारायण केले. यानंतर अशी पारायणे अनेक झाली. सद्गुरुकृपेचा वर्षाव झाला व दत्तात्रेय आणि रेणुकामाता यांच्या कृपेचे अनुभव पदोपदी येत राहिले घरीच दत्तात्रेयाची एक सुबकशी अशी रुप्याची मूर्ती प्रभावळीसह आली आणि दत्तरेणुकांची उपासना अखंडपणे चालू झाली पूर्वसुकृताच्या या घरच्याच धाग्यातून दत्तकोशाची कल्पना स्फुरली व साकार झाली

## अशी जमवाजमव

मनात एकदा संकल्प उठला की, त्याचा पाठपुरावा कोणी अज्ञात शक्ती करीत असते, अथवा त्याच्या दैवी शक्तीतून संकल्प स्फुरतात असा अनुभव असल्याकारणाने, या ग्रंथाच्या सामग्रीच्या जमवा-

जमवीस फार वेळ लागला नाही. श्रीगुरुचरित्राच्या पोथ्या घरीच होत्या श्रीगुरुचरित्राचे संशोधक रामचंद्र कृष्ण कामत व त्यांचे बंधू हे तर तीर्थरूपांचे मित्रच होते त्यांनी दिलेली गुरुचरित्राची एक प्रत तीर्थरूपांनी जागोजाग खुणा करून, भर घालून संपादित केलेली जवळ होतीच योगीराज गुळवणी-महाराजांकडून वासुदेवानंदसरस्वतींचे सर्व ग्रंथ घरी प्रसाद म्हणून आले होते जनार्दन स्वामी, एकनाथ, दासोपंत, निरंजनरघुनाथ, माणिकप्रभू, पंतमहाराज इत्यादी दत्तोपासकांचे बहुतेक सर्व वाङ्मय घरीच असल्याने चांगल्या परिचयाचे होते माऊंट अबू, नृसिंहवाडी, अक्कलकोट, बेट केडगाव, बाळेकुंद्री, गाणगापूर, कारंजा, अशा अनेक दत्तस्थानांना भेटी दिल्या होत्याच ज्या स्थानांना भेट देणे शक्य झाले नाही, अशांची विश्वसनीय माहिती छायाचित्रांसह उपलब्ध करून घेतली वृत्तपत्रांत निवेदन देऊन शेकडो ठिकाणी पत्रव्यवहार करून, समक्ष भेटून या संदर्भग्रंथासाठी माहिती एकत्रित करण्यात बराच वेळ गेला चरित्रे, तात्त्विक ग्रंथ, स्फुट रचना, स्थलवर्णने, गुरुपरंपरा, कृपानुभव, छायाचित्रे, इत्यादी सामग्रीची जमवाजमव विपुल प्रमाणात झाली.

## असे उदार साहाय्य

दत्तकोशासाठी अत्यंत आपुलकीने सर्व प्रकारची मदत करणाऱ्यांची नामावली फार मोठी होईल परंतु काही महत्त्वाचे निर्देश येथे कर्तव्यबुद्धीने करावयास हवेत सर्वप्रथम उल्लेख करावयास हवा तो बेळगाव येथील अॅड्व्होकेट विश्वनाथ केशव कुलकर्णी, हुत्तरवाटकर यांचा कर्नाटकातील दत्तसंप्रदाय, दत्तक्षेत्रे, दत्तभक्त इत्यादींची माहिती त्यांनी मला आपुलकीने कळविली कुरवपूर व बाबा बुडण या स्थानांचा उतारवयात प्रवास करून छायाचित्रांसह सर्व प्रकारची माहिती त्यांनी मला दिली. ते स्वत एक थोर दत्तोपासक असून विरूपाक्षनागनाथ या एका दत्तभक्ताच्या परंपरेतील आहेत त्यांनी स्वत केलेली दत्तपर कवनेही मोठ्या विनयाने माझ्याकडे पाठविली. दत्तकोशाच्या उभारणीस त्यांची फार मोठी मदत झाली आहे. परंतु खेदाची गोष्ट अशी की, ते आज ही वाङ्मयपूजा पाहाण्यास हयात नाहीत काही वर्षांपूर्वी ते दत्तचरणी विलीन झाले दत्तात्रेयकोशाचे हे सर्वांगसुंदर रूप पाहून त्यांच्या आत्म्यास समाधान वाटेल असा विश्वास आहे.

बडोदा येथील श्री ग. गडकरी यांनी तर दत्तपर वाङ्मयाचा माझ्यावर मोठ्या तन्मयतेने वर्षाव केला स्तोत्रपर रचना, चरित्रे, स्थलवर्णने, छायाचित्रे इत्यादी सामग्री पाठवून त्यांनी दत्तकोशास प्रेमाने मदत केली आहे. बडोदे येथीलच कावडीबाबा मंदिराचे राजापूरकर व मँडी रोडवरील दत्त-मंदिराचे भा. श पट्टणकर यांनीही अनेक प्रकारचे साहाय्य केले आहे सुर्त हैद्राबाद येथे असलेले डॉ. श्री पुराणिक यांनी दत्तवाङ्मयाच्या शोधासाठी परदेशीही पत्रव्यवहार करून माहिती मागविली होती लंडन येथील इंडिया ऑफिसच्या लायब्ररीकडून आलेला सर्व प्रकारचा पत्रव्यवहार एके दिवशी पुराणिक यांनी माझ्या स्वाधीन केला दत्तवाङ्मयाची नोंद अथवा सूची करताना मला त्याचा फार उपयोग झाला. मुंबईत घाटकोपर येथे श्रीनरसिंहसरस्वती सेवामंडळाचे कार्य मोठ्या प्रमाणावर चालू आहे. या मंडळाचे श्र न मुरळे यांनी आपली सर्व प्रकाशने माझ्याकडे पाठवून माझ्या सामग्रीत महत्त्वाची भर घातली हिंगोलीचे रंगनाथ बगाळे यांनी स्वत चा 'श्रीदत्तप्रभादर्शन' हा अप्रकाशित काव्यग्रंथ मला पाहण्यासाठी दिला अमरावतीजवळील नांदगाव खंडेश्वरचे आण्णासाहेब अडसोड यांनी 'दत्त-विजय' नावाचा एक महानुभावीय हस्तलिखित ग्रंथ मला अवलोकनासाठी दिला माणिकनगर, नृसिंह-वाडी, औदुंबर, गोन्हापूर, कारंजा, बाळेकुंद्री, बडोदा, साखळी ( गोमंतक ), अक्कलकोट, गाणगापूर, माहूर इत्यादी दत्तक्षेत्रांच्या व्यवस्थापकांनी मला सर्व प्रकारची मदत केली आहे.

आणखी कित्येक दत्तस्थानांच्या कार्यकर्त्यांनी हस्ते, परहस्ते साह्य केले; त्याची नोंद येथे करणे विस्ताराचे काम होईल. रावाजी रामचंद्र भिसे, मुंबई; विष्णुपंत ज्ञानसागर, विटे; गो. द. छत्रे, विजापूर; अण्णासाहेब कुलकर्णी, इचलकरंजी; प्रभुदास-अप्पासाहेब देशपांडे, कृष्णापूर; वि. गो. नालू, आजगाव; रा. ब. खाडिलकर, नासिक; श. अ. टेंकशे, रत्नागिरी; भीमाशंकर देशपांडे, आळंद; सदानंद चेंदवणकर, मुंबई; स्वामी दत्तयोगेश्वर तीर्थ; हरिभाऊ ताडफळे, व. कै. वहीकर, पुणे; अशा काही प्रमुखांची नोंद येथे आभारपूर्वक करणे अगत्याचे आहे. स. कृ फडके, रा. चिं. ढेरे, हरिप्रसाद शिवप्रसाद जोशी, जयचयराम वाडियार इत्यादी आधुनिक ग्रंथकारांच्या दत्तपर वाङ्मयाचाही उपयोग मला झाला आहे.

## दत्तकोश : मर्यादा व स्वरूप

या दत्तात्रेयकोशाचे स्वरूप प्रामुख्याने महत्त्वाच्या विषयानुसार आहे, ते प्रारंभी दिलेल्या विस्तृत अशा अनुक्रमणिकेवरून स्पष्ट होण्यासारखे आहे. शेवटी दिलेली नामसूची व संदर्भग्रंथसूची यांनी या ग्रंथाच्या कोशरूपाचे कार्य साध्य होईल असे वाटते. दत्तकोशाच्या मर्यादेसंबंधी मात्र थोडे सांगावयास हवे. प्रथमच हे कबूल करावयास हवे की, जमा झालेल्या साहित्यापैकी एक चतुर्थांशही साहित्य आमच्या या कोशात समाविष्ट होऊ शकले नाही कागद, मुद्रणसाहित्य, ग्राहकांची शक्ती यांचा विचार करता व चालू काळाची विकट परिस्थिती लक्षात घेता ग्रंथाच्या पृष्ठसंख्येवरही बंधन घालावे लागले. महत्त्वाच्या विषयाचा परामर्श विस्तृतपणे घेतलेला आढळेल. काहींच्या नोंदी मात्र थोटकपणे कराव्या लागल्या आणि कित्येक नोंदी माहीत असूनही जागेच्या अभावी करणे अशक्य झाले. गावोगावचीं दत्तमंदिरे वा दत्तस्थाने आणि दोनतीन हजार वर्षांतील सर्व दत्तभक्तांचा निर्देश यांची आवश्यकता तर खरीच; परंतु ग्रंथविस्ताराच्या भीतीने या कामावर सहजच मर्यादा पडली.

विषयविवेचनाच्या अनुरोधाने मर्यादेच्या बाबतीत आणखी एक खुलासा करणे अगत्याचे आहे. दत्तपंथामध्ये सिद्धी, चमत्कार, पिशाचवर्तन, यत्रतत्र इत्यादींचा प्रभाव फार मोठा आहे. यांचे माहात्म्य मोठे असेलही परंतु मी या अंगाकडे कारणापुरतेच लक्ष दिले आहे दत्तप्रभूंची कृपा, त्यांचे प्रेम, त्यांची नित्य जवळीक, त्यांचा आशीर्वाद, त्यांचा साक्षात्कार यांत तृप्त होणाऱ्या अंगाचा मी विशेष प्रकारे ऊहापोह केलेला आढळेल. धन, पुत्र, यश, कीर्ती, आरोग्य या भौतिक गोष्टींची मागणी करणाऱ्या उपासकांपेक्षा केवळ दत्तप्रभूंच्या कृपेची आणि प्रेमभक्तीची आस करणारे अधिक श्रेष्ठ होत, यासंबंधात दुमत होईल असे वाटत नाही. याच धोरणाने मी विविध विषयांची चर्चा प्रसंगानुसार केलेली आढळेल. विविध विषयांचे विवेचन करताना वा रहस्य समजावून सांगताना शक्य तो मूळ विचाराला वा तत्त्वपरंपरेला धक्का न लागेल अशी काळजी घेतली आहे मात्र अगदी थोड्या व जरूर त्या ठिकाणी मी स्वतःचे मतही देण्याचा प्रयत्न केला आहे. वादग्रस्त मुद्दे शक्य तो टाळले आहेत.

दत्तप्रभूंच्या प्रेमभक्तीवर भर देऊन या ग्रंथाची रचना झालेली आहे; असे असले तरी दत्तात्रयाच्या प्रेरणेतून निर्माण झालेल्या धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक वा प्रसंगी राजकीय कार्याकडे दुर्लक्ष केलेले नाही. दत्तप्रभूंची प्रेमभक्ती मानवी कर्तव्याला प्रेरक ठरलेली दिसते. दत्तात्रेयांना स्वतः-साठी न मागता देशासाठी, समाजासाठी, दुर्बळासाठी मागणारे वा प्रार्थना करणारे अनेक दत्तभक्त आहेत. अशा काही आधुनिक काळातील दत्तभक्तांचा निर्देश येथे अस्थानी होणार नाही. प्रसिद्ध क्रांति-कारक वासुदेव बळवंत फडके हे थोर दत्तभक्त होते त्यांना आलेले अपयश वाया गेले असे कसे म्हणता येईल ? ख्रिस्ती मिशनऱ्यांना त्यांच्याच पद्धतीने तोंड देणारे विष्णुबावा ब्रह्मचारी दत्तकृपेने प्रभावित झाले होते. पुण्याचे ब्रह्मर्षी अण्णासाहेब पटवर्धन हे आळंदीच्या स्वामी नृसिंहसरस्वतींना गुरुस्थानी

मानीत. गेली वीसपचवीस वर्षे व्याकरणाचे अध्ययन-अध्यापन करीत असतानाही मो के. दामले याच्या शास्त्रीय मराठी व्याकरणाच्या टायटलपेजवर श्रीदत्तात्रेयाचा उल्लेख का हे अलीकडे ध्यानात आले. दामले थोर दत्तभक्त हरिहर महाराज उदासी याचे अनुग्रहीत होते दामले याच्या मुलाचे नाव दत्तात्रेय आणि मुलीचे नाव दत्ती असल्याचे दिसते. श्रीदत्तात्रेयाची प्रेरणा साधकास जशी योगी, सन्यासी, अवलिया याचे रूप देते, तशीच ती आपल्या भक्ताना व प्रेमिकाना लोककल्याणाची ऐहिक व भौतिक दृष्टीही देताना दिसते प्रस्तुतच्या ग्रथात या अगाचेही दर्शन वाचकाना विशेषत्वाने दिसेल.

दत्तात्रेयकोशाचे प्रामुख्याने दोन विभाग दिसतील पहिल्या दत्तविवेचन या विभागात दत्त-स्वरूप, दत्तइतिहास, दत्तचरित्र, सप्रदायविकास, दत्तोपासना, दत्तग्रथ, दत्ततत्त्वज्ञान, दत्तपथीयाचा आचारधर्म, प्रमुख दत्तभक्त, दत्तक्षेत्रे इत्यादी विषय आले असून दुसऱ्या *दत्तपदार्णव* या विभागात सस्कृत व मराठी भाषातील निवडक दत्तपर कविताचा सग्रह केला आहे भूपाळ्या, आरत्या, स्तोत्रे, पदे, अभग इत्यादी सामग्री दत्तभक्ताना नित्य उपयुक्त होईल असा विश्वास वाटतो

## ऋणनिर्देश व आभार

कोणत्याही मोठ्या वाङ्मयकार्यास मूर्त स्वरूप येते ते समर्थ अशा प्रकाशकामुळे सूर्त या क्षेत्रात असलेल्या कमालीच्या प्रतिकूल वातावरणात मुबईच्या सुरेखा प्रकाशनचे विद्याधर आवटी यानी या कामी नेटाने प्रयत्न केला विविध प्रकारच्या अडचणीना तोड देत देत त्यानी हे महत्त्वाचे कार्य तडीस नेले सपूर्ण महाभारत व वाल्मीकीचे रामायण मराठी वाचकाच्या हाती दिल्यानतर आवटी यानी दत्तकोशाच्या कार्यात आपले सर्व लक्ष दिले म्हणूनच या कार्याची पूर्तता होऊ शकली ग्रथ-प्रकाशनास विलब होत असल्याने त्याच्या अडचणी वाढत होत्या, तरी न डगमगता त्यानी चिकाटीने ही दत्तप्रभूची वाङ्मयपूजा सगुणसाकार केली. प्रकाशनाच्या विलबाच्या सदर्भात एक गमतीचा उल्लेख करावासा वाटतो ग्रथाची नुसती जाहिरात पाहूनच ग्रथ प्रसिद्ध झाला असे समजून 'मत्रशास्त्र' या पुस्तकात गो प्र भावे यानी सन १९७२ सालीच ग्रथातील एका उणिवेवर बोट ठेविले आहे! असो उशीर झाला तरी ग्रथाचे एकदर स्वरूप पाहून वाचकमित्र सतोपित होतील असे वाटते ग्रथाच्या या सुदर रूपाचे श्रेय मुद्रकाचे व चित्रकाराचे असते ज्ञानविलास प्रेसचे मधुकरराव जोशी व प्रकाश जोशी याचे साहाय्य सार्थ तुकारामगाथेप्रमाणेच याही वेळेस मोठ्या प्रमाणात झाले ग्रथाचा शेवटचा काही थोडा भाग इदिरा प्रेसच्या श्री जोशी बधू यानी छापला आहे. चित्रकार अनत सालकर यानी ग्रथाची सजावट केली आहे व्ही जोगी यानी चित्राचे व छायाचित्राचे ठसे करून मुद्रणही केले आहे श्री म श्री दीक्षित यानी ग्रथाशेवटची सूची तयार करून दिली अशा अनेक सहकारी मित्रानी अकृत्रिम लोभ मजवर अनेकदा केला असल्यानेच माझ्या हातून अशी वाङ्मयसेवा होत राहते. श्रीरेणुकामाता व श्रीदत्तप्रभू याची कृपा तर मजवर नित्य आहे त्या स्वानदाची चव चाखताना अवर्णनीय सुख वाटते, एवढेच येथे नमूद करतो

'रेणुका', लक्ष्मी पार्क
नवी पेठ, पुणे ३०

—प्र न. जोशी
श्रीदत्तजयती, शके १८९६

# प्रकाशकाचे निवेदन

सार्थ श्रीदासबोध, श्रीमन्महाभारताचे मराठी सुरस भाषांतर खंड १ ते १० हे दोनही ग्रंथ प्रसिद्ध झाल्यानंतर श्रीवाल्मिकिरामायणाचे मराठी भाषांतर व श्रीदत्तात्रेयज्ञानकोश हे दोन ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा संकल्प केला. श्रीवाल्मीकिरामायणाची वाटचाल नीट झाली; पण जाहिरात करूनही दत्तकोश अनेक कारणांनी मागे पडला. अनेक अडचणी आल्या तरी वाल्मीकिरामायणाचे भाषांतर प्रसिद्ध करू शकलो. पण पुढे प्रकाशनाच्या परिस्थितीत फार बदल झाला. कागद, मुद्रण, ठसे, बांधणी इत्यादींचा खर्च बेसुमार वाढून नाउमेद झाली. श्रीदत्तकोशाचे काम अर्धवट राहाते की काय ? अशी रुखरुखही मनास टोचत राहिली.

परंतु श्रीदत्तप्रभूंची कृपा व प्रेरणा स्वस्थ बसू देईना. व्यावसायिक अडचणींतूनच मार्ग काढणे प्राप्त होते. अनेक दत्तप्रेमियांनी अगोदर पैसे भरले होते. त्यांची विचारणा सुरू होती. पैसे परत घेण्यापेक्षा ग्रंथ हाती यावा ही त्यांच्या मनाची वृत्ती प्रेरक ठरली. ठराविक मुदतीत ज्यांनी पैसे भरले होते त्यांच्या हाती उशीरा का होईना, पण हा ग्रंथराज देऊन मी कृतार्थ होत आहे. या बाबतीत आगाऊ पैसे भरलेल्या ग्राहकांनी जे सहकार्य केले त्याबद्दल मी ऋणी आहे.

'श्रीदत्तात्रेय–ज्ञानकोशा'चे कर्ते डॉ. प्र. न. जोशी यांनी ग्रंथाच्या उभारणीत गेली पाचसहा वर्षे फारच मेहनत घेतली. आमच्या तीर्थरूपांच्या 'श्रीभारत बुक डेपो' साठी त्यांनी तयार केलेली 'सार्थ तुकारामगाथा' संतप्रेमियांसाठी उपलब्ध आहेच. आता दत्तभक्तांना त्यांची वाङ्मयपूजा आवडेल असा विश्वास वाटतो. ज्ञानविलास प्रेसचे श्री. मधुकरराव जोशी यांनी मुद्रणाचे कार्य अत्यंत सुबकतेने केले. चित्रांचे ठसे व्ही. जोशी यांनी केले आहेत. या त्रैमूर्ती जोशींना दत्तभक्तीची परंपरा आहे. डॉ. प्र. न. जोशी यांनी आपल्या मनोगतात पूर्वसुकृताचा धागा स्पष्ट केला आहे. श्री. मधुकरराव जोशी हे 'श्रीदत्तभार्गवसंवाद' कर्ते वा. भा. जोशी यांचे सुपुत्र होत आणि व्ही. जोशी यांचा संबंध घोमच्या नृसिंहस्थानाशी. या तिहेरी धाग्यांनी दत्तकोशास एवढे देखणे व डौलदार रूप आले आहे. इंदिरा प्रेसच्या श्री. जोरी बंधूंनीही मुद्रणास हातभार लावला आहे. कागदाचे व्यापारी रसिकलाल प्रदर्स यांनीही सहकार्य दिले आहे. या सर्व सुहृदांचा मी आभारी आहे.

'श्रीदत्तात्रेयज्ञानकोशा'ची पूर्णता होत असतानाच आणखी एका संकल्पाचा उच्चार येथे करीत आहे. डॉ. प्र. न. जोशी यांनीच 'श्रीविठ्ठलकोश' या आणखी एका संदर्भग्रंथाची तयारी करावी, अशी त्यांना विनंती आहे. ईश्वरी प्रेरणेनुसार जे होईल ते आम्ही रसिक वाचकांच्या हाती देऊच.

दि. २५।१२।१९७४ — विद्याधर आवटी

# अनुक्रमणिका

## विभाग पहिला—श्रीदत्तविवेचन

## विभाग दुसरा-श्रीदत्तपदार्णव

## छायाचित्रांबाबत ऋणनिर्देश

'श्रीदत्तात्रेयज्ञानकोशा'त छायाचित्रे तीन गटातून दिलेली आहेत. पहिल्या गटात आरभी श्रीदत्तमूर्तींचे विविध नमुने दिले आहेत. दुसऱ्या गटात श्रीदत्तावतारी पुरुप व श्रेष्ठ दत्तभक्त याची छायाचित्रे दिली आहेत. तिसऱ्या गटात अनेक दत्तस्थानाची चित्रे दिली आहेत या सर्व छायाचित्रापैकी अनेक चित्रे वा छायाचित्रे त्या त्या दत्तस्थानाकडून उपलब्ध झाली आहेत. काहीनी ठसे पुरविले. त्या सर्वांचा उल्लेख येथे करणे शक्य नसले तरी महत्त्वाच्या साहृचकर्त्यांचा ऋणनिर्देश आभारपूर्वक करणे अगत्याचे आहे.

वि. के. कुलकर्णी, हत्तरवाटकर, बेळगाव; अण्णा अक्कोळकर, बाळेकुद्री; गो. द. छत्रे, विजापूर; रा. रा. भिसे, मुबई; विष्णुपत ज्ञानसागर, विटे; दत्ता उमराणीकर, कोल्हापूर; सदानद चेंदवणकर मुबई; डॉ टिपणीस, साकुरी; ट्रिनिटी सोसायटी, अधेरी, मुबई; श्री सातव, वाघोली; भालेराव ब्रदर्स, लोणी भापकर; वा. वि. फडके, माधवनगर; ढेरे अडवली; श्री. ग. गडकरी, श्री. राजापूरकर, श्री. पट्टणकर, बडोदे; गुरुदास ज. लवदे, साखळी ( गोमतक ); अशा अनेक दत्तभक्तानी छायाचित्रे वा ठसे पाठवून साहृच केले आहे. छायाचित्राचे ठसे करून मुद्रण व्ही. जोशी पुणे, यानी केले आहे.

## महत्त्वाचा शुद्धिसंस्कार

(१) पृष्ठ १९२

उत्तर ७–मध्ये ' ज्याला अशी तत्परता आहे ' येथून पुढे ' तोच मुख्य साधक; त्यातून त्याला माझी भक्ती असेल तर तो सर्वमान्यच आहे ' असा मजकूर वाचावा व नतर उत्तर ८ हा क्रमाक घेऊन ' मी देह आहे, आत्मा नव्हे ' असा मजकूर वाचून ' असा निश्चय होणे याचे नाव सिद्धी ' वगैरे मुद्रित मजकूर सलगपणे घ्यावा अशी विनती आहे.

(२) छायाचित्राच्या खाली नावाचा मजकूर आहे. श्रीदत्त व श्रीजालवणकर आणि किनाराम अशी नावे त्या त्या ठिकाणी वाचावीत.

॥ श्री: ॥

॥ श्रीदत्त, दत्त जय श्रीगुरुदेव दत्त ॥



# मंगलाचरण

दयाळा श्रीदत्ता जय अवधुता पाव मजला, दयाळा श्रीदत्ता जय अवधुता पाव मजला, दयाळा श्रीदत्ता
दयाळा श्रीदत्ता जय अवधुता पाव मजला, दयाळा श्रीदत्ता जय अवधुता पाव मजला, दयाळा श्रीदत्ता
दयाळा श्रीदत्ता जय अवधुता पाव मजला, दयाळा श्रीदत्ता जय अवधुता पाव मजला, दयाळा श्रीदत्ता

मालाकमण्डलुरधः करपद्मयुग्मे ।
मध्यस्थपाणियुगुले डमरूत्रिशूले ॥
यस्यस्त ऊर्ध्वकरयोः शुभशंखचक्रे ।
वन्दे तमत्रिवरदं भुजषट्कयुक्तम् ॥

दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा, दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा, दिगंबरा दिगंबरा
दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा, दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा, दिगंबरा दिगंबरा
दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा, दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा, दिगंबरा दिगंबरा

काषायवस्त्रं [illegible]रदंडधा[illegible] [illegible]मंडल[illegible]करेण शंखम् ॥
चक्रंगदाभू[illegible] [illegible]पा[illegible] शरणं प्रपद्ये ॥

औदुंबरः कल्पवृक्षः संगमः कामधेनवः । चिंतामणिर्गुरोः पादौ दुर्लभं भुवनत्रये ॥
कृते जनार्दनो देवस्त्रेतायां रघुनंदनः । द्वापारे रामकृष्णौ च कलौ श्रीपादवल्लभः ॥
अनसूयात्रिसंभतो दत्तात्रेयो दिगंबरः । स्मर्तृगामी स्वभक्तानामुद्धर्ता भवसंकटात् ॥
गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः । गुरुः साक्षात्परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥
ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम् । द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम्॥
एकं नित्यं विमलमचलं सर्वधी साक्षिभूतम् । भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥

अनंत निर्गुण सर्वाठायी पूर्ण । न करी निर्वाण दासालागीं ॥ १ ॥
हांकेबरोबरी धांवोनि सत्वरी । भक्तांलागी तारी गुरुनाथ ॥ २ ॥
सुन्दर तें ध्यान वसे औदुंबरीं । व्याघ्रचर्मधारी शोभतसे ॥ ३ ॥
काषायअंबर दंड कमंडलु । डमरु त्रिशूल शंखचक्र ॥ ४ ॥
किरीट कुंडलें रुद्राक्षाच्या माळा । वैजयंतीमाळा हार गळे ॥ ५ ॥
सूर्यचंद्र नेत्र शेषफणी छत्र । पीतांबर वस्त्र परिधान ॥ ६ ॥
गुरुचरणीं सर्व तीर्थांची मिरासी । म्हणोनी जगासी उद्धारीती ॥ ७ ॥
जनार्दन म्हणे न लगे ब्रह्मज्ञान । गुरुचरणीं मन राहो सदा ॥ ८ ॥

तीन शिरें सहा हात । तया माझा दंडवत ॥ १ ॥
काखें झोळी पुढें श्वान । नित्य जान्हवीचें स्नान ॥ २ ॥
माथां शोभे जटाभार । अंगीं विभूति सुंदर ॥ ३ ॥
शंख चक्र गदा हातीं । पायीं खडावा गर्जती ॥ ४ ॥
तुका म्हणे दिगंबर । तया माझा नमस्कार ॥ ५ ॥

नमन माझें गुरुराया । महाराजा दत्तात्रेया ॥ १ ॥
तुझी अवधूत मूर्ति । माझ्या जीवाची विश्रांती ॥ २ ॥
जीवींचे सांकडें । कोण उगवील कोडें ? ॥ ३ ॥
अनसूयासुता । तुका म्हणे पाव आतां । ॥ ४ ॥

---


श्रीदत्तविवेचन

# १ ऐसे हे श्रीदत्तदैवत

## अवतारविशेष

अवतारही उदंड होती ।
सर्वेचि मागुती विलया जाती ।
तैसी नव्हे श्रीदत्तात्रेयमूर्ति ।
नाश कल्पान्ती असेना ॥
पूर्ण ब्रह्म मुसावलें ।
तें हें दत्तात्रेयरूप ओतिलें ॥
ज्याचे विलोकनमात्रें तरले ।
जीव अपार त्रिभुवनी ॥
( रामविजय : १३.२१–२२ )



श्रीदत्तात्रेयाच्या अवताराचे रहस्य श्रीधरस्वामींनी रामविजय नावाच्या ग्रंथात वरीलप्रमाणे मोठ्या मार्मिकपणे सांगितले आहे. भारतीयांना, विशेषत: महाराष्ट्रीयांना श्रीदत्त व त्याची उपासना याचा व्यास फार मोठा आहे. खेड्यांतून काय किंवा शहरातून काय, घरोघरी श्रीदत्तात्रेयाच्या उपासनेचा, पूजनाचा, भजनाचा कार्यक्रम गुरुवारी, शनिवारी नेहमी होत असताना दिसतो. 'तीन शिरें सहा हात । तया माझा दंडवत' अशा थाटात श्रीदत्तात्रेयाची अनेक सुबक व रंगीत चित्रे घरोघरी दिसतात. श्रीगुरुचरित्र, श्रीगुरुलीलामृत, श्रीदत्तप्रबोध, श्रीदत्तमाहात्म्य अशा सांप्रदायिक ग्रंथांची पारायणे आजही घरोघरी होत असताना दिसतात. श्रीगोरक्षनाथ, श्रीपादवल्लभ, श्रीनृसिंहसरस्वती, श्रीवासुदेवानंदसरस्वती, श्रीमाणिकप्रभू, श्रीस्वामी समर्थ अक्कलकोटकर, श्रीनारायण महाराज केडगावकर, श्रीधनमहाराज चाळेरुंद्रीकर, शिरडीचे साईनाथ महाराज इत्यादी दत्तावतारी पुरुषांची वा भक्तांची शिष्यपरंपरा आजही वाढताना दिसते. नृसिंहवाडी, औदुंबर, गाणगापूर,

माहूर, कारंजा इत्यादी दत्तक्षेत्रांतून आजही दत्तभक्तांची गर्दी वाढत आहे 'गुरुमहाराज गुरू। जयजय परब्रह्म सद्गुरू', 'दिगंबरा दिगंबरा। श्रीपादवल्लभ दिगंबरा,' 'दत्तात्रेय गुरू माझें आई। मजला ठाव द्यावा पायी,' 'श्रीगुरु देवदत्त' 'श्रीदत्त शरण मम,' 'जय जय दत्ता। जय गुरु दत्ता' अशा भजनांचा घोष या स्थानांतून व घराघरांतून होत असताना दिसतो दत्त अथवा अवधूत यांच्या आकस्मिकपणे येण्यावरून 'दत्त म्हणून उभे राहाणे' हा एक वाक्-संप्रदायही मराठी लोकमानसात रुजला आहे.

अशा या दत्तावताराचे अनेक महत्त्वाचे विशेष आहेत पहिला महत्त्वाचा विशेष असा की, दत्तावतार इतर अवतारांप्रमाणे दुष्टांचा नाश करून समाप्त होणारा नाही उपदेशाने जगाचा उद्धार करीत चिरंजीव राहाणारा हा अवतार असल्याचे सर्वत्र नमूद आहे तो अयोनिसंभव असल्याचेही सांगितले जाते दत्तावताराचा आणखी एक महत्त्वाचा विशेष असा की, या दैवतात ब्रह्मा, विष्णू व महेश या तीन प्रधान देवांचे व त्यांच्या परंपरांचे ऐक्य आहे सृष्टीची उभारणी, सृष्टीची जोपासना व सृष्टीची संहारणी यांच्यासाठी प्रसिद्ध असलेल्या या तीन देवांचे एकरूपत्व म्हणजे दत्तप्रभूंचा अवतार होय राम, कृष्ण इत्यादी अवतार क्षत्रियकुलात तर दत्तात्रेयांचा जन्म ब्रह्मकुलातील अत्री ऋषींच्या आश्रमातील सती अनसूयेंच्या पातिव्रत्याच्या प्रभावाने या अवतारास महत्त्व आल्याचे आपण पाहाणारच आहोत राम, कृष्ण, बुद्ध इत्यादी अवतार गृहस्थाश्रमी होते, तर दत्तात्रेय अवधूत अवस्थेत सर्वत्र संचार करून वैराग्याचा पुरस्कार करणारे म्हणून प्रसिद्ध आहेत आपल्या भक्तांच्या श्रद्धेनुसार दत्तात्रेयांनी अनेकांना विविध वेषांत आणि रूपांत दर्शने दिली आहेत अनेक दत्तभक्त आपल्या अलौकिक कर्तृत्वामुळे अवतारपदवीपर्यंतही पोचलेले दिसतात दत्तावतार प्रामुख्याने वर्णाश्रमपद्धतीची पुन स्थापना करणारा असला तरी, आणि त्याने मुख्यत ब्राह्मणधर्माचा पुरस्कार केला असला तरी इतर जातिजमातींना त्यांच्या उपासनेस प्रतिबंध नाही शबरसुत, किरात, मातंग, म्लेच्छ इत्यादींच्या कथा या दृष्टीने श्रीगुरुचरित्रात वाचण्यासारख्या आहेत

मलंग अथवा फकीराच्या वेषात श्रीदत्तात्रेय अनेकदा दर्शन देत असल्याच्या कथा प्रसृत आहेत. स्वामी समर्थ अक्कलकोटकर, शिरडीचे श्रीसाईबाबा, हुमणाबादचे श्रीमाणिकप्रभू इत्यादी दत्तावतारी पुरुषांच्या परंपरांत मुसलमान भक्तांचाही भरणा मोठाच दिसतो दत्त आणि दत्तपंथ यांचा नाथ, महानुभाव, वारकरी, रामदासी, देवी इत्यादी उपासनापंथांशीही संबंध मोठाच दिसतो औदुंबरतळी निवास, श्वान, धेनू यांचे सान्निध्य दत्तांच्या संदर्भात महत्त्वाचे आहे त्रिमुखी अथवा एकमुखी दत्तात्रेयांच्या मूर्तीप्रमाणेच दत्तपादुकांची पूजाअर्चा अनेक ठिकाणी होत असताना दिसते गुरुवार हा दत्तांचा वार म्हणून मानला जातो याच दिवशी दत्तात्रेयांच्या भजनपूजनाचे दृश्य दत्तस्थानात व दत्तभक्तांच्या घरी दिसते. मार्गशीर्ष पौर्णिमेस दत्तजयंती मोठ्या उत्साहाने साजरी होते दत्तात्रेयांचे विशिष्ट असे सोळा अवतारही मानण्यात येतात दत्तप्रभूंच्या उपासनेत योगमार्गाला महत्त्वाचे स्थान असून शाक्त व तांत्रिक यांनीही दत्तात्रेयांना आपले दैवत मानले आहे याच अनुरोधाने नग्न स्त्री मांडीवर घेऊन मद्यप्राशन करणारे दत्तात्रेय अनुयायांना भेटतात दत्तात्रेयांच्या अवताराचे असे अनेक विषय असले तरी दत्त दैवत अविनाशी आहे, भक्तावर अनुग्रह करण्यासाठी संचारी आहे, वर्णाश्रमधर्माची प्रस्थापना करणारे आहे, ब्रह्माविष्णुमहेश यांच्यात ऐक्य आहे, असे सारांशाने म्हणता येईल

दत्तात्रेयांच्या अवतारहेतूंचा स्पष्ट निर्देश करताना ब्रह्मपुराणात म्हटले आहे की,

भूयो भूयात्मनो विष्णोः प्रादुर्भावो महात्मनः ।
दत्तात्रेय इति ख्यातः क्षमया परया युतः ॥
तेन नष्टेषु वेदेषु प्रक्रियासु मखेषु च ।
चातुर्वर्ण्ये च संकीर्णे धर्मे शिथिलतां गते ॥
अतिवर्धति चाधर्मे सत्ये नष्टेऽनृते स्थिते ।
प्रजासु शीर्यमाणासु धर्मे चाकुलतां गते ॥
सयज्ञाः सक्रियाः वेदाः प्रत्यानीता हि तेन वै ।
चातुर्वर्ण्यमसंकीर्णं कृतं तेन महात्मना ॥
(२१३-१०६–११२)

याचा सारांश असा की, सर्व भूतमात्रांचा अंतरात्मा म्हणजे विष्णूचा दत्तात्रेय नावाचा अवतार होय. हा अवतार क्षमेने युक्त असून याने वेदांना प्रतिष्ठा प्राप्त करून दिली, यज्ञसंस्थेचे पुनरुज्जीवन केले, चातुर्वर्ण्यातील शिथिलता दूर केली, अधर्मांचा व असत्याचा नाश करून क्षीण होत चाललेल्या लोकांत सामर्थ्य निर्माण केले.

# दैवताची प्राचीनता

दत्तात्रेय हे दैवत किती प्राचीन आहे ? हा एक थोडया वादाचा प्रश्न होऊन बसला आहे. मध्ययुगीन काळात म्हणजे सुमारे चौदाव्या शतकात श्रीपादवल्लभ ही एक थोर दत्तावतारी विभूती होऊन गेली. त्यांचाच आणखी एक अवतार म्हणजे श्रीनृसिंहसरस्वती. या दोघांनी महाराष्ट्रात व कर्नाटकात दत्तोपासनेचा प्रसार फार मोठ्या प्रमाणावर केला हे सर्वश्रुत आहे. याही आधी तीन चार शतके दत्तभक्तांची परंपरा ऐतिहासिक दृष्टीनेही पाहाता येण्यासारखी आहे. अकराव्या बाराव्या शतकातील महानुभाव पंथाची परंपरा दत्तप्रणीत आहे. या पंथाचे दत्तात्रेय हे आदिगुरू होत. याही आधी कित्येक शतकात नाथपंथीयांनी श्रीदत्तांना आदिदैवत मानले आहे. गोरक्षनाथाना दत्तात्रेयांचा उपदेश असल्याचे प्रसिद्ध आहेच. मत्स्येन्द्रनाथ, गोरक्षनाथ इत्यादी नाथपंथीय योगी पुरुषांच्या लीला दत्तात्रेयाशी संबंधित आहेत. याच काळाच्या काही शतके आधी भारतीय उपासनापरंपरेत शाक्त व तांत्रिक यांची चलती झाली असावी. दत्तपंथात शिरलेले तांत्रिकांचे व शाक्तांचे आचारविचार लक्षात घेता त्याच सुमारास केव्हातरी कोणातरी सिद्ध पुरुषाचे दैवतीकरण होऊन दत्तात्रेयाना महत्त्व आले असावे असा रा. चिं. ढेरे याचा तर्क आहे. कोणातरी सिद्ध पुरुषाचे दैवतीकरण आणि ब्रह्मा, विष्णू व महेश या दैवी शक्तींचा अवतार या दोन कल्पनांतील हा भेद आहे. साम्प्रदायिकाना ढेरे यांचा निष्कर्ष पटेल असा नाही. दत्तात्रेयांच्या उपासनेचा विकास मध्ययुगीन काळात झाला असे फार तर म्हणता येईल. परंतु श्रीदत्त हे दैवत फार प्राचीन काळापासून अस्तित्वात आहेसे दिसते. ढेरे यानीच अनेक आधार देऊन दत्तात्रेयांची पौराणिक परंपरा दाखवून दिलेली आहे. शिवपुराण, शतरुद्रसंहिता, विष्णुधर्मोत्तर पुराण, विष्णुपुराण, वायुपुराण, ब्रह्मपुराण, ब्रह्मांडपुराण, कूर्मपुराण, मार्कंडेयपुराण अशा विविध पुराणांतून दत्तात्रेयांचे उल्लेख आलेले आहेत.

दत्तात्रेयांची चरित्रकथा आपण पुढे स्वतंत्रपणे पाहाणार आहोत. परंतु येथे हे ध्यानात घेणे अगत्याचे आहे की, दत्ताना पुराणकारांनीही महत्त्व दिलेले आहे. शांडिल्योपनिषद्, भिक्षुकोपनिषद्, अवधूतोपनिषद्, जाबालदर्शनोपनिषद्, दत्तात्रेयोपनिषद् इत्यादी नव्य उपनिषदातून दत्तात्रेयांची कार्यमहत्ता आलेली असली तरी ती मध्ययुगीन काळातली म्हणजे ढेरे यांच्या मताने इ. स. १००० च्या सुमाराची आहेत. परंतु महाभारतात दत्तात्रेयांचा उल्लेख असल्याचे ढेरे मान्य करतात. अत्रिपत्नी अनसूयेच्या पोटी भगवान विष्णूने अवतार घेतल्याचा उल्लेख महाभारतात आलेला आहे. दत्तात्रेयांनी सहस्रार्जुनास उपदेश केल्याचे उल्लेख वनपर्वात (११५-१२), शांतिपर्वात (४९-३६–३७), अनुशासन

पर्वात (१५२.५ व १५३.१२) आलेले असल्याचे ढेरेही सागतात. सहस्रार्जुनाचा काळ हा जमदग्नी परशुरामाच्या संदर्भात महत्त्वाचा आहे. परशुराम हा राम व कृष्ण याच्याही आधीचा म्हणजे सहावा अवतार होय. याही परशुरामास दत्तात्रेयांनी उपदेश केल्याचे आपण पुढे सविस्तर पाहाणार आहोत. परशुरामाच्या मातापित्यावर दहनसंस्कार माहूर येथे श्रीदत्तात्रेयांच्या पौरोहित्याखाली झाल्याची कथा सर्वत्र मिळते. दत्तात्रय या दैवताची प्राचीनता शोधण्यासाठी आणखी पुरावे शोधण्याची गरजच काय ? ऐलपुत्र आयू, अलर्क, प्रल्हाद, यदू, सहस्रार्जुन, भार्गवपरशुराम या दत्तशिष्याची नामावलीही दत्तात्रेयाची प्राचीनता सिद्ध करणारी आहे.

दुसरे असे की, दत्तात्रेयाची माता अनसूया व पिता अत्री ऋषी यांचेही उल्लेख फार प्राचीन काळापासून मिळतात. अत्री व अनसूया ही नावे कदाचित अनेकजणाची असली तरी दत्तात्रेयांच्या संदर्भात ती आली की त्याना फार मोठा अर्थ प्राप्त होतो. अत्री ऋषीचे उल्लेख ऋग्वेदातही आलेले आहेत. स्वायंभुवमन्वंतरात प्रजोत्पादनार्थ ब्रह्मदेवाने निर्माण केलेल्या दहा मानसपुत्रांपैकी हा एक असल्याची कथा वायुपुराणात आलेली आहे. शंकराच्या वराने हा पुनः वैवस्वत मन्वंतरात जन्मास आला. कर्दम प्रजापतीची कन्या अनसूया ही याची पत्नी. यास अनसूयेपासून दत्त, दुर्वास व सोम असे तीन पुत्र झाले असल्याचे बहुतेक पुराणकार वर्णन करतात. या अनसूयेचाही उल्लेख ऋग्वेदाच्या परिशिष्टात आहे. राम वनवासास चालला असताना अत्रीच्या आश्रमात आला होता. सीतेने हिचे दर्शन घेतले होते. सीता व अनसूया यांच्यातील मोठे रसभरीत व मार्गदर्शक संभाषण वाल्मीकीनी अयोध्याकांडाच्या ११७ ते ११९ अध्यायांत दिलेले आहे. अशा सर्व उल्लेखांचा विचार करता दत्तात्रेय दैवताची प्राचीनता वादातीत आहे. पुनः असे की, दत्ताशी निगडित असलेली त्रैमूर्तीची कल्पना तर आणखीही प्राचीन काळापर्यंत भिडणारी आहे.

## त्रिमूर्तिविचार

दत्तात्रेयांचे स्वरूप एकमुखी की त्रिमुखप्रधान हाही एक चर्चेचा विषय बनला आहे. ब्रह्मा, विष्णू व महेश या तीन देवांचा अवतार दत्तात्रेयांच्या रूपाने असल्याने त्यांना तीन तोंडे असल्याचे प्रसिद्धच आहे. दत्तात्रेय हे प्रामुख्याने एकमुखीच असून नतरच्या विकासात त्यांच्या त्रैमूर्तीचा प्रचार झाला हे खरे असले तरी आणि मूर्तीची कल्पनाही थोडी नंतरची असली तरी सत्व–रज–तम, उत्पत्ति–स्थिति–लय, जागृति–स्वप्न–सुषुप्ती; अशा तिहींच्या वर्णनाची परंपरा फार प्राचीन काळापासून आहे. वसू, रुद्र, आदित्य या तीन प्रकारांत वैदिक देवतांची विभागणी दिसते. स्वर्ग, पृथ्वी, पाताळ अशी विश्वाची रचनाही तीन विभागांत वाटलेली दिसते. यांना अनुलक्षून देवतांची वाटणी अनेक धर्मांत झालेली दिसून येते. 'त्रिस्रः एव देवताः इति नैरुक्ताः अग्निः पृथिवीस्थानः। वायुर्वा इन्द्रो वा अन्तरिक्षस्थानः। सूर्यो द्युस्थानः' अशी यास्काचार्यांनी केलेली वाटणी चिंतनीय आहे. वेदकालात अग्नी, वायू, सूर्य यांची निवासस्थाने अनुक्रमे पृथ्वी, अन्तरिक्ष व द्यु म्हणजे स्वर्ग अशी असल्याचे निर्देश सापडतात. यांतील अग्नीस तिहेरी गुणांचे वर्णन लागू पडते. त्याचे तीन जन्म, त्याचा तिहेरी प्रकाश, त्याची तीन शिरे, तीन जिभा, तीन शरीरे; असे अग्नीचे तिहेरी रूप सापडते. 'अग्नेत्री ते वाजिना त्री षधस्थो तिस्रस्ते जिव्हा।' असे वर्णन अग्नीचे मिळते. हाच अग्नी पुनः इंद्र, विष्णू व ब्रह्मा यांच्या रूपात आढळतो. 'त्वमग्न इन्द्रो वृषभः स तामासि। त्वं विष्णु रुरुगायो नमस्यः। त्वं ब्रह्मा रयिविद् ब्रह्मणस्पते। त्वं

विघर्तः सचसे पुरन्ध्या ॥' अशा वर्णनात अग्नी तीन देवांच्या रूपांत प्रकटलेला दिसतो. उपनिषदांतूनही ब्रह्मा, रुद्र, विष्णू या तीन देवांचा एकत्र उल्लेख येतो. मैत्रायणी संहितेत 'तिस्र एव देवताः । क्षित्यन्तरिक्षद्युस्थानाः अग्नि वायुः सूर्य इति '– देवता तीनच. एक पृथ्वीवर अग्नी, अंतरिक्षात वायू व द्युलोकात सूर्य– असा उल्लेख वरीलप्रमाणेच आहे. देवतास्वरूप वा परब्रह्मस्वरूप असणाऱ्या ॐकारातही तीन मात्रा वा वर्ण असल्याचे आपणांस माहीत आहेच. महाभारतासारख्या आर्षमहाकाव्यातून 'सृजेत ब्रह्ममूर्तिस्तु रक्षते पौरुषीतनुः । रौद्रीभावेन शमयेत् तिस्रोऽवस्था प्रजापतेः ॥' (वनपर्व २७२.४८) असा तीन देवांचा व त्यांच्या कार्यांचा उल्लेख सापडतो. पुढे अनुशासनपर्वात या तीन देवांचा व त्यांच्या कार्यांचा स्पष्टपणे निर्देश आहे.

पुराणकाळात मात्र ब्रह्मा, विष्णू व महेश यांची त्यांच्या कार्यासह चांगलीच जोपासना झालेली दिसते. हे तीन देव सारखेच प्रभावी व एकमेकांना मदत करणारे आहेत. ब्रह्माविष्णूसाठी महादेव विष प्राशन करतो व महादेव अथवा ब्रह्मदेव यांच्या वरामुळे मत्त झालेल्यांचा विष्णू नाश करताना दिसतो. वायुपुराणात या सहकार्यांचा उल्लेख करताना म्हटले आहे;

> परस्परेण वर्तन्ते धारयन्ति परस्परम् ।
> अन्योन्यमिथुना ह्येते ह्यन्योन्यमुपजीविनः ॥
> क्षणं वियोगो न ह्येषां न त्यजन्ति परस्परम् ।
> ईश्वरो हि परो देवो विष्णुस्तु महतः परः ॥
> ब्रह्मा तु रजसोद्रिक्तः सर्गो येह प्रवर्तते ॥

यांच्या नावांतही कधी अदलाबदल झालेली दिसते. वायुपुराणातच ब्रह्मदेवास कधी नारायण अथवा महेश्वर म्हटलेले दिसते. शिव व विष्णू एकमेकांची पूजा करून एकमेकांना आदर दर्शवितानाही दिसतात. शिव किंवा महादेव हा आर्येतर देव मानल्यास हे सामंजस्य विशेष प्रकारचे मानावे लागेल. पुढे सांस्कृतिक विकासाच्या काळात तर आर्येतर शिव कर्पूरगौर वर्णाचा बनला व आर्य विष्णू राम व कृष्ण यांच्या रूपांत घननीळ झाला! दत्तात्रेयांच्या त्रिमूर्तिविचाराचे रहस्य या एकीकरणात आहे.

पुराणकाळात स्थिर झालेली ही त्रिमूर्तीची कल्पना पुढे संस्कृत महाकाव्यांच्या परंपरेतही चांगलीच रुजलेली दिसते. कालिदासाने 'नमस्त्रिमूर्तये तुभ्यं प्राक्सृष्टेः केवलात्मने । गुणत्रयविभागाय पश्चाद्भेदमुपेयुषे ॥' अशा भाषेत त्रिमूर्तीला कुमारसंभवात वंदन केले आहे. पुढे याच काव्यात 'एकैव मूर्तिर्बिभिदे त्रिधा सा सामान्यमेषां प्रथमावरत्वम् । विष्णोर्हरस्तस्य हरिः कदाचिद्वेधास्तयोस्तावपि धातुराद्यौ' असा निर्देश आहे. असेच त्रिमूर्तीचे उल्लेख मल्लीनाथ, बाण इत्यादींनीही केले आहेत. शूद्रकानेही मृच्छकटिक नाटकाच्या सहाव्या अंकात हरी, ब्रह्मा व विष्णू या त्रयीला वंदन केले आहे. या त्रिमूर्तीत देवांचा क्रम ज्याच्या त्याच्या आवडीने आलेला दिसतो. 'आदौ ब्रह्मा मध्ये विष्णुरन्ते देवः सदाशिव' या नारद पुराणातील स्तोत्रात दत्तात्रेय विष्णुमध्य आहे. तर 'मालाकमंडलुरधःकरपद्मयुग्मे मध्ये' या प्रसिद्ध वचनात तो शिवमध्य असल्याचे आयुधांच्या क्रमावरून ध्यानात येते. अशा रीतीने अगदी प्राचीन वाङ्मयातही दत्तदैवतात प्रधान असलेली त्रिमूर्तिकल्पना स्पष्टपणे ध्यानात येते. इतकेच नव्हे तर वेदपूर्वकालीन अशा हडप्पा संस्कृतीतही शिवाची कल्पना त्रिमूर्तीचीच होती, असा नव्या संशोधनाचा निष्कर्ष आहे. योगासनस्थ असलेला हा शिव हत्ती, वाघ, गेंडा, म्हैसा व दोन हरणे यांच्या समवेत आहे. याचे त्रिमुखत्व आणि याचा पशुपरिवार दत्तात्रेयांच्या त्रिमुखांची आणि श्वान व धेनू यांची आठवण करून देणारा आहे. उत्पत्ती, स्थिती व लय या तीन शक्तींना एकातच पाहण्याची कल्पना अशा रीतीने वेदकाळाच्या पूर्वीपर्यंत भिडते. ग. ह.

खरे यानी आपल्या 'मूर्तिविज्ञान' या ग्रंथात अशा त्रिमुखी शिवाची चित्रेही दिलेली आहेत. जगन्मुख (कुलू), मेल्चेरी (उत्तर अर्काट जिल्हा), गोकाक, चितोडगड, काश्मीर, मथुरा, चारसद्दा (पेशावर) इत्यादी ठिकाणी झालेल्या उत्खननातून शिवाच्या त्रिमुख मूर्ती मिळलेल्या आहेत भारतात ठिकठिकाणी विखुरलेल्या या त्रिमूर्तींची शिल्पे आणि त्रिमूर्तींची असलेली प्रमुख मदिरे याचा विस्तृत आढावा हरिप्रसाद शिवप्रसाद जोशी यानी आपल्या 'ऑरिजिन अँड डेव्हलपमेंट ऑफ् दत्तात्रेय वर्शिप् इन इंडिया' या प्रबधात उत्तम रीतीने घेतलेला आहे 'त्रिमूर्ती इन स्कल्प्चर' या एका प्रकरणात त्यानी या विषयाचा ऊहापोह आधारासहित केलेला आहे.

# मूर्तिस्वरूप

भगवान श्रीदत्तात्रेयाच्या मूर्तिस्वरूपाचा विचार करताना प्रथमच हे ध्यानात येते की, दत्तात्रेयाची म्हणून तीन मुखाची मूर्ती प्राचीन काळात दिसून येत नाही. दत्त या दैवतात ब्रह्मा, विष्णू व महेश अशा तीन देवाचा वा तत्त्वाचा समावेश असला आणि आज 'तीन शिरे सहा हात' असेच रूप लोकमानसावर रुजलेले असले तरी प्राचीन काळात दत्ताच्या त्रिशिरमूर्तीचा फारसा आढळ होत नाही भारतीय इतिहासातील अगदी प्राचीन काळ म्हणजे सिंधू सस्कृतीचा. हडप्पा व मोहेंजदाडो येथे झालेल्या उत्खननात ज्या मूर्ती सापडल्या आहेत त्यावरून त्या काळी शिवाची व लिंगाची उपासना रूढ असावी असे दिसते. नवलाची बाब अशी की, येथील शिवाची मूर्ती त्रिमुखी आहे. ग. ह. खरे यानी आपल्या 'मूर्तिविज्ञान' या पुस्तकाच्या उपोद्घातात म्हटले आहे, 'हा एका चौरगावर आसन घालून, पायाचे तळवे एकमेकावर ठेवून जमिनीस चिकटलेल अशा तऱ्हेने बसला असून हात योग्याप्रमाणे गुडघ्यावर ठेवण्याच्या उद्देशाने जवळ आणले आहेत. तोडे व डोळे प्रत्येकी तीन आहेत. डोक्यावर मध्यभागी मुकुट असून दोन बाजूस दोन शिंगे आहेत प्रत्येक हातावर तीन मोठी व मध्ये प्रत्येकी चार अशी आठ मिळून अकरा ककणे आहेत. गळ्यात एकाखाली एक लोंबणारे असे तिकोनी हार आहेत. कमरेस बंध असून लिंग व वृषणही बहुधा दिसत आहेत म्हणजे मूर्ती नग्न आहे' या त्रिमूर्ती शिवाच्या परिवारात हत्ती, वाघ, गेंडा, म्हैसा, हरणे असा परिवार असल्याने हा शिव पशुपती दिसतो. त्रिमूर्तीची कल्पना आणि मूर्तिपूजेचा आरभ अशा रीतीने वेदपूर्वकाळातला असल्याच्या नोंदी सापडतात. वेदात मूर्तीचा वा मूर्तिपूजेचा उल्लेख अभावानेच आढळतो. हिंदू धर्माच्या विकासात मूर्तीचे, सगुणपूजेचे माहात्म्य वाढले, योगविद्येचा विकास झाला, आचारधर्माची वाढ झाली; या सर्व बाबी आर्येतर सस्कृतीने भारतीय हिंदू धर्मास दिल्या असा नवीन सशोधनाचा आशय आहे. वैदिक काळातील रुद्र हा आधीच्या आर्येतर शिवाचा अश असल्याचे मानतात. पुढे सगुणपूजेच्या वाढीबरोबर शिवाचे माहात्म्य वाढले. शिश्नपूजा, लिंग व योनीची पूजा याचा सबध पुढे तात्रिकात व शाक्तात वाढीस लागला आणि दत्तपथातही हा धागा बळकट झाला.

त्रिमूर्तीची कल्पना अशा रीतीने वेदपूर्वकाळातील असून ब्रह्मा, विष्णू व महेश याच्या रूपानी ती नतर साकार झाली. 'उत्तरकामिकागम', 'रूपावतार', 'रूपमंडन', 'शिल्परत्न' इत्यादी ग्रथातून त्रिमूर्तीची वर्णने मिळतात. यातील काही मूर्ती शिवप्रधान, काही विष्णुप्रधान, काही ब्रह्माप्रधान आढळतात जो देव मुख्य त्याला त्रिमूर्तीत मधले स्थान मिळत गेले, असे असले तरी प्राचीन काळात दत्तात्रेयाच्या म्हणून मूर्तीची फार वर्णने मिळत नाहीत बदामी येथील मूर्ती दत्ताची समजली जाते 'ती योगा-

सनी आहे. हिच्या वरच्या दोन हातांत चक्र व शंख या वस्तू आहेत आणि खालचे दोनही हात मांडी-वर एकावर एक उताणे, डावा खाली व उजवा वरती अशा तऱ्हेने हे ठेवलेले आहेत. मात्र उजव्या हाताची व्याख्यानमुद्रा आहे. बैठकीवर डावीकडून उजवीकडे अनुक्रमे गरुड, नंदी व हंस असे तीनही प्राणी आहेत' असे खरे यांनी म्हटले आहे. ही मूर्ती योगी शिवाची असावी असा ढेरे यांचा कयास आहे.

आज आपणांस सर्वत्र प्रामुख्याने त्रिमूर्ती दत्त आढळतो. परंतु महाभारत, पुराणे, अर्वाचीन उपनिषदे यांतील दत्त एकमुखीच आहे. महानु-भावपंथीयांत एकमुखी दत्ताची उपासना आहे. एकनाथांच्या काळातील महान् दत्तभक्त दासोपंत यांच्या दत्तमूर्तीचे ध्यान सहा हात व एकमुख असे आहे. अलीकडच्या काळातील निरंजन रघु-नाथ या थोर दत्तोपासकास साक्षात्कार झाला तो 'एकमुख षड्भुज' अशा दत्तात्रेयांचा. या दत्तसाक्षात्काराचा महत्त्वाचा अंश पुढे दिलेला आहे. परंतु 'षड्भुज मूर्तीचें ध्यान। साळंकृत प्रसन्नवदन। तेजस्वी देदीप्यमान। श्यामवर्ण सर्वांगीं ॥ रत्नभूषणें मंडित। वस्त्रें उत्तम शुचि-ष्मंत। मस्तकीं मुगुट शोभिवंत। विद्युल्लतेचिये-परी ॥ कर्णामाजी रत्नकुंडलें। भाळी चंदन परि-मळ। केशर-कस्तुरीचा मेळ। करोनिया लाविला॥' (१.७९–८१) अशा रेखीव व सुबक दत्तदर्शनाचे रूप एकमुखी आहे. त्यांचे शिष्य नारायण महा-राज जालवणकर यांनी देवास (सीनियर) येथे स्थापिलेली मूर्ती एकमुखीच आहे. निरंजन रघु-नाथांचे नातू विश्वनाथबोवा यांनी काशी येथे स्थापन केलेली दत्तमूर्ती एकमुखी आहे. अगदी अलीकडच्या काळात दत्तभक्तीचा प्रसार करणारे थोर अवतारी पुरुष श्रीवासुदेवानंदसरस्वती यांना एकमुखी दत्तमूर्तीचाच लोभ होता. एकमुखी दत्ताची चित्रे गुळवणीमहाराजांच्या संप्रदायातही लोकप्रिय आहेत. पुण्याच्या गंगानाथमहाराजांच्या मठातील, पंढरपूरच्या विप्रमठातील, नाशिक येथील भटजी महाराजांच्या मठामागील मंदिरा-तील, नेपाळमधील भटगाव येथील दत्तमूर्ती एकमुखीच आहेत.

परंतु वैचित्र्याचा व समन्वयाचा प्रभाव गुरु-चरित्राच्या काळापासून वाढत गेल्याने त्रिमूर्तीची कल्पना लोकमानसावर अधिक ठसलेली दिसते. 'त्रिगुणात्मक त्रैमूर्ती दत्त हा जाणा' या प्रसिद्ध *अशा एकनाथकृत आरतीने तीन मुखी दत्तात्रे-*यांच्या मूर्तीचे स्वरूप निश्चित केलेले दिसते. तुकारामबोवांचा एक अभंग तर दत्तमूर्तीची रूढ कल्पना उचलून धरणारा आहे.

तीन शिरें सहा हात। तया माझा दंडवत ॥१॥
काखे झोळी पुढें श्वान। नित्य जान्हवीचें स्नान ॥२॥
माथां शोभे जटाभार। अंगीं विभूती सुंदर ॥३॥
शंख चक्र गदा हाती। पायीं खडावा गर्जती ॥४॥
तुका म्हणे दिगंबर। तया माझा नमस्कार ॥५॥

तुकोबांच्या या सर्वप्रसिद्ध अभंगावरून दत्ताची तीन तोंडे, सहा हात, काखेत झोळी, पुढचे श्वान, माथ्यावरचा जटाभार, अंगावर विभूती, हातात शंखचक्रगदा, पायी खडावा व दिगंबररूप अशा ध्यानाचा प्रभाव आज महाराष्ट्रात तरी सर्वत्र आहे. श्रीगुरुचरित्राच्या प्रारंभी दत्तात्रेयांचे रूप खालीलप्रमाणे वर्णन केलेले आढळते.

बालार्कप्रभमिन्द्रनीलजटिलं भस्माङ्गरागोज्वलम्।
शान्तं नादविलीनचित्तपवनं शार्दूलचर्माम्बरम् ॥
ब्रह्मज्ञैः सनकादिभिः परिवृतं सिध्दैःसमाराधितम्।
दत्तात्रेयमुपास्महे हृदि मुदा ध्येयं सदा योगिभिः ॥

ब्रह्मा, विष्णू व महेश यांचा समावेश कर-णारी तीन मुखे, सहा हात, खालच्या दोन हातात माला व कमंडलू, मधल्या दोन हातात डमरू व त्रिशूळ, वरच्या दोन हातांत शंख आणि चक्र, अशा रूपाचे वर्णन आज सांप्रदायिकात मान्य असलेल्या खालील श्लोकात मोठ्या रेखीवपणे मिळते.

मालाकमंडलुरध: करपद्मयुग्मे,
मध्यस्थपाणियुगले डमरूत्रिशूले ।
यस्यस्त ऊर्ध्वकरयो: शुभशंखचक्रे,
वन्दे तमत्रिवरदं भुजषट्कयुक्तम् ।।

अलीकडच्या काळातील एक थोर दत्तभक्त श्रीरंगावधूतमहाराज यानीही याच धर्तीवर दत्तमूर्तीचे वर्णन केले आहे 'रङ्गहृदयम्' या त्यांच्या स्तोत्रसंग्रहात दत्ताचे वर्णन असे आढळते–

काषायवाससमजं कमलाक्षमेकं
मालाकमंडलुधरं रमणीयलीलम् ।
गोश्वानक्रीडनपरं निगमान्तकेलिं
देवत्रयात्मकमहं सततं नतोऽस्मि ।।

अशा प्रकारे अनेक स्तोत्रातून, पद्यखंडातून, श्लोकातून दत्तमूर्तिरूपाचे वर्णन विपुल प्रमाणात मिळते दत्तात्रेयाच्या भुजाची संख्या अग्निपुराणात दोन असून दत्तात्रेयकल्पात व शांडिल्योपनिषदात चार आहे महानुभावाचा दत्त हा एकमुखी व द्विभुज आहे. त्याच्या हातात माला, कमंडलू, डमरू, त्रिशूल, शंख, चक्र, क्वचित् योगदंड, कमळे अशी आयुधे दिसतात दत्तात्रेयकल्पाप्रमाणे दत्ताची अंगकांती शुभ्र आहे परंतु शांडिल्योपनिषद व गुरुचरित्राच्या प्रारंभीचा वर दिलेला श्लोक यात ती 'इंद्रनीलमण्याप्रमाणे' असल्याचे वर्णन आहे महानुभावाच्या 'सिंहाद्रीवर्णना'त 'तें श्रीमूर्त चापेगौर' असा उल्लेख आहे चंद्रागकांती, कर्पूरकांती अशीही वर्णने आढळतात एकनाथांना आपला दत्त 'पाहे तो सावळा दत्तराव' अशा रूपात दिसतो दत्तात्रेयाचा वेश दिगंबर अवधूताचा असतो हे प्रसिद्धच आहे 'भस्मोद्धूलितसर्वाङ्ग जटाजूटधरं विभुम्' असे वर्णन शांडिल्योपनिषदात आहे विष्णुधर्मोत्तरपुराणात तो 'वाल्मीकिरूप सकल दत्तात्रेयस्य कारयेत्' अशा स्वरूपाचा आहे जटामंडलानी न दिसणारे असे हे वाल्मीकिसदृश रूप दत्तात्रेयाचे असते असा भाव एका दत्तात्रेयस्तोत्रात 'भिक्षाटन गृहे ग्रामे पात्रं हेममयं करे' अशा उल्लेखात दत्तमूर्ती दिसते सुवर्णाच्या पात्रातून भिक्षाटण करणारा हा योगी दत्त आहे । दत्तमूर्ती, दत्तस्वरूप यांच्या वर्णनाचा आणखी बारकावा पाहाण्यासाठी काही निवडक श्लोक येथे देत आहोत

१ मन्दारमूले मणिमण्डपस्थितं
सुवर्णदानैकनिबद्धदीक्षम् ।
ध्यायेत्परीतं नवनाथसिद्धै–
र्दारिद्र्यदावानलकालमेघं ।।
–दत्तात्रेयकल्प

२ व्याख्यामुद्रा करसरसिजे दक्षिणे संदधानो
जानुन्यस्ता वरकरसरोजातवामोन्नता स ।
ध्यानाधारात्सुखपरवशादर्धमामीलिताक्षो
दत्तात्रेयो भसितधवल पातु न: कृत्तिवासा
–दत्तात्रेयकल्प

३ वामपादो धृत: क्षेपे दक्षिण: कूर्मपृष्ठग ।
दत्तात्रेयो द्विबाहु: स्याद्वामोत्सगे श्रिया सह।।
–श्रीतत्त्वनिधी

४ एकपीठसमारूढमेकदेहनिवासिनम् ।
षड्भुजं च चतुर्वक्त्रं सर्वलक्षणसंयुतम् ।
अक्षसूत्रं त्रिशूलं च गदा चैव तु दक्षिणे
कमण्डलु च खट्वाङ्ग,चक्र वामभुजे तथा ।।
–देवतामूर्तिप्रकरण

५ दत्तात्रेय शिव शान्तमिन्द्रनीलनिभ प्रभुम् ।
आत्ममायारतं देवमवधूतं दिगम्बरम् ।।
भस्मोद्धूलितसर्वाङ्गं जटाजूटधरं विभुम् ।
चतुर्बाहुमुदाराङ्गं प्रफुल्लकमलेक्षणम् ।।
–शांडिल्योपनिषद

६ जटाधरं पाण्डुरङ्ग शूलहस्तं कृपानिधिम् ।
सर्वरोगहरं देवं दत्तात्रेयमहं भजे ।।
आदौ ब्रह्मा मध्ये विष्णुरन्ते देव: सदाशिव ।
मूर्तित्रयस्वरूपाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ।।
शूलहस्तगदापाणे वनमालासुकन्धर ।
यज्ञसूत्रधर ब्रह्मन् दत्तात्रेय नमोऽस्तु ते ।।
दत्तात्रेयस्तोत्र-नारदपुराण

७ मुण्डनं कौपिनं भस्मयोगपद्मं च धारयन् ।
शैली शृंगी तथा मुद्रा दण्डपाशाजिनासनम्॥
कन्था टोपं च धारी च सिद्धो हि भ्रमते मही।
कर्णकुण्डलधारी च कण्ठमाला च पादुके ॥
अत्रिज देवदेवेश मातुलिंगधरः प्रभुः ।
सर्वसौभाग्ययुक्तश्च भक्तानामीप्सितप्रदः
— नारदकृत स्तोत्र, स्कंदपुराण

८ दिगम्बरं भस्मसुगन्धलेपनं
जटाजूटं दण्डकमण्डलुधरम्।
पद्मासनस्थं च शशिसूर्यनेत्रं
दत्तात्रेयं ध्यानमभीष्टसिद्धिदम् ॥
— स्कंदपुराण

अशा प्रकारे अनेक संस्कृत स्तोत्रांतून व पौराणिक श्लोकांतून दत्तात्रेयांच्या मूर्तीचे, स्वरूपाचे मोठे सूचक व रेखीव वर्णन मिळते. दत्तरूपाची वर्णने मराठी भाषेतही काही कमी नाहीत. ज्याला जशी दर्शने झाली तशी त्याने ती शब्दांकित केली. यांतली निवडक वर्णने पुढे पद्मार्णवात दिलेली असली तरी येथे विषयाच्या अनुरोधाने काही थोडी देणे अगत्याचे आहे.

१ सुंदर ते ध्यान वसे औदुंबरी । व्याघ्रचर्मधारी शोभतसे ॥ काषाय अंबर दंड कमंडलु। डमरु त्रिशूल शंखचक्र ॥ किरीट कुंडलें रुद्राक्षाच्या माळा । वैजयंती गळा हार रुळे । सूर्यचंद्र नेत्र शेषफणी छत्र । पीतांबर वस्त्र परिधान ॥
— जनार्दनस्वामी

२ दत्त वसे औदुंबरी ।
त्रिशूळ डमरु जटाधारी ॥ १ ॥
कामधेनु आणि श्वान ।
उभे शोभती समान ॥ २ ॥
गोदावरी नित्य वस्ती ।
अंगी चर्चिली विभूती ॥ ३ ॥
काखेमाजी शोभे झोळी ।
अर्धचंद्र वसे भाळी ॥ ४ ॥
एकाजनार्दनीं दत्त ।
रात्रंदिनीं आळवीत ॥ ५ ॥ —एकनाथ

३ दत्तात्रेय योगी पहा पहा दत्तराज योगी ॥ध्रु॥
नारायण नारायण गर्जत दत्तयाने आला हो ॥
पायी पादुका खडखड वाजती संगे श्वानमेळा ॥१॥
भगवी छटी मूर्ति सांवळी दंडकमंडलुधारी रे ॥
कामधेनुसवें आला भक्तांचा कैवारी रे ॥ २ ॥
विश्वपटीं चित्तंतू हाची सत्यज्ञानानंत रे ।
अन्य भावें ध्यावा दत्त टाकुनि अहंकार रे ॥३॥
— पंतमहाराज

४ बांधिला कोप मुरडुनी जटामुगुटीं ।
घातली दया वनमाला दिव्य कंठीं ॥
करधृत डमरूंतुनी उपजति ज्ञानकला ।
गुरुदत्तराज ऋषिकुळीं अवतरला ॥ १ ॥
मृगचर्म पांघरी शंखचक्र हातीं ।
श्रुति श्वानरूप होउनी पुढें पळती ।
भूधेनु कलिभयें चाटित चरणाला ॥ २ ॥
करि स्वजन उपाधि भस्मलेप अंगा ।
झोळींत भरी तज्जन्ममरण पिंगा ।
नारायणहृदयी रंग भरुनि गेला ॥ ३ ॥
— नारायण महाराज

# दिगंबर, अवधूत व नरहरी

वरील वर्णनावरून ध्यानात येईल की, दत्तात्रेयांचा वेष हा प्रामुख्याने यतीप्रमाणे वैराग्यसूचक आहे. माथ्यावर जटाभार, गळ्यात रुद्राक्षमाळा, अंगास भस्म, हातात दंड, कमंडलू, त्रिशूळ, डमरू, शंख, चक्र इत्यादी आयुधे, अंगावर मृगचर्म; अशा वेषात दत्तात्रेय वावरतात. कधी मलंगाच्या, फकिराच्या, पिशाच्याच्या, वा व्याघ्रसर्पादी प्राण्यांच्या वेषात फिरताना दत्तप्रभू भेटल्याच्या साक्षी अनेक दत्तभक्तांच्या आहेत. भक्तांनी कधी साजरे-गोजरे रूपही

स्वतःच्या ध्यानमूर्तीप्रमाणे वर्णन केलेले दिसून येते. दत्तप्रभूंना भरजरी वस्त्रे आणि सोन्यामोत्याचे अलंकार घालणारे भक्तही दिसतात. 'दत्तात्रेयसर्वस्व' या एका प्राचीन ग्रंथातील दत्तात्रेयाचे चित्र याच ग्रंथात दिलेले आहे. त्यावरून दत्तात्रेयाचे राजविलासी व ऐश्वर्यशाली रूप ध्यानात येईल.

दत्तप्रभू अवधूत वा दिगंबर असतात हे प्रसिद्धच आहे. दिगंबर म्हणजे दिशांचे वस्त्र पांघरणारा, जवळजवळ नग्नच. सहजस्थितीत वावरणारा. असे दिगंबरवेषात व वृत्तीत वावरणारे पुष्कळ अवलिये दत्तपंथात दिसतील. दत्त हेच अवधूत होत. अवधूत व दत्त यांच्यातील ऐक्य अनेकांनी प्रस्थापित केले आहे. अवधूत व अवधूतपंथ ही नावे जरी वेगळी असली तरी ती दत्तात्रेयाशीच संबंधित आहेत. अवधूत शब्दाभोवती जे सांप्रदायिक वलय आहे ते ध्यानात घेतल्यास दत्तस्वरूपाचे ज्ञान आणखी स्पष्ट होईल. 'अवधूतगीते'त व 'अवधूतोपनिषद्' मध्ये अवधूत शब्दाचा जो अर्थ आहे, त्याचा विचार आपण पुढे करणार आहोतच. येथे फक्त दत्तस्वरूपाच्या निर्णयासाठी थोडी चर्चा करू.

अवधूत हा संन्यस्त वृत्तीचा सिद्धपुरुष असतो. हा संन्यासी असला तरी त्याच्या उच्च अवस्थेत वर्ण, आश्रम, दंडकमंडलू इत्यादी बाह्य चिन्हांची आवश्यकता नसते. अवधूत दिगंबराप्रमाणेच देहाने व मनाने नग्न असतो. त्याचा आचारही विधिनिषेधापलीकडचा असतो. योगसाधना, तपस्या, सहजध्यान यांत अवधूत मग्न असतो. असे सिद्ध साधू व अवधूत योगी दत्तपंथात अनेक आहेत. दत्तात्रेय हेच एक श्रेष्ठ प्रकारचे अवधूत मानले गेले आहेत. अवधूत बाह्य वेषापेक्षा त्यांच्या संन्यस्त वृत्तीवरून ओळखला जातो. असा अवधूत म्हणजे जणु वेदपुरुष. 'अवधूत उपनिषद्'मध्ये अवधूत शब्दाचा अर्थ खालीलप्रमाणे आहे.

अ–या अक्षराचा अर्थ अक्षरत्व असा आहे. अवधूताला अक्षरब्रह्माचा साक्षात्कार झालेला असतो. अक्षरत्व म्हणजे कार्यस्थितीसुद्धा.

व–व अक्षर 'वरेण्यत्वा'साठी आले असून त्याचा अर्थ श्रेष्ठत्वाची, पूर्णत्वाची पराकाष्ठा होय.

धू–धू अक्षर म्हणजे सर्व प्रकारच्या बंधनांपासून मुक्त, धुतलेला असा असून कोणत्याही उपाधीत वा आवरणात तो वावरू शकत नाही.

त–त हे अक्षर 'तत्त्वमसि' या महावाक्याचे बोधक आहे. स्वरूपात अखंड भावनेने वावरणाऱ्या महापुरुषास अवधूत ही संज्ञा लावतात.

अशा या अवधूतअवस्थेत राहून दत्तप्रभू अविनाशी व संचारी रूपाने जगताचे कार्य करीत असतात. दत्त हेच स्वतः परमश्रेष्ठ अवधूत असून विश्वंभरावधूत, मायामुक्तावधूत, दिगंबर असे दत्तात्रेयांचे आणखी अवतारही सांगितले जातात. श्रीगुरू, अत्रिवरद, योगीराज, सिद्धराज, ज्ञानसागर, आदिगुरू इत्यादी दत्तात्रेयांची नावे त्यांच्या रूपाचा व कार्यांचा परिचय करून देणारी आहेत. नरहरी हे आणखी एक नाव दत्तात्रेयांना अनेकदा लावले जाते. नरहरी म्हणजे नृसिंह. हा विष्णूचा चौथा अवतार असून त्याचा दत्तात्रेयांशी जवळचा संबंध आहे. हिरण्यकशिपूच्या उदरविदरणामुळे भगवंताच्या बोटांचा दाह होत राहिला; तो थांबण्यासाठी त्याला औदुंबर वृक्षाचा व फळांचा आश्रय घ्यावा लागला. औदुंबराच्या फळांत भगवंतांनी बोटे खुपसून शीतलता प्राप्त केली. म्हणून दत्ताचा निवास औदुंबरतळी असल्याचे प्रसिद्ध आहे. द्वितीय दत्तावतार श्रीनृसिंहसरस्वती यांना नरहरीरूपानेच ओळखले जाते. अशा रीतीने दत्त व नरहरी एकरूप मानण्यात दत्तपंथातील सामरस्यही साधले जाते.

# दत्तात्रेयांचा संचार

दत्तात्रेयाचा अवतार जसा अविनाशी म्हणून प्रसिद्ध आहे, तसाच तो संचारीही आहे. आर्तांना, पीडितांना, दुःखितांना संरक्षण देत देत दत्तात्रेय सर्वत्र संचार करीत असतात. श्रीगुरूंच्या स्वरूपात उपदेश देतात. दिगंबरदास कामत यांच्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास दत्तावतार हा व्यक्तिरूपाने सर्वत्र वावरत असतो. अनंत जीवांचा तो उद्धार करतो. 'नाना अवतार होऊनिया गेले। दत्तत्व संचले जैसे तैसे ॥ अनंत कालाचा अनंत भावाचा। अनंत जीवांचा कनवाळू ॥' असा हा दत्तावतार असल्याचे श्रीगुलाबराव महाराजांनी आपल्या 'प्रियलीला-महोत्सव' ग्रंथात म्हटले आहे. श्रीरामकृष्णादी अवतार निजधामास गेले तरी श्रीगुरुदेवदत्ताचे कार्य दिव्य देहाने अविरतपणे चालू आहे आणि दत्तभक्तांचीही 'कलियुगात दत्त हाचि देव राहिला' अशीच श्रद्धा आहे. प्रापंचिक म्हणजे भौतिक व पारमार्थिक म्हणजे आत्मिक सुख देण्यासाठी या दैवताचा संचार सर्वत्र असतो. 'अनसूयागर्भरत्न भोग-मोक्षसुखप्रद' असे याचे स्वरूप असल्याने भोग व मोक्ष यांचे दान देत देत दत्तात्रेय अनेकांना कधी प्रकट रूपाने, कधी गुप्त रूपाने साह्य करतात. अशा या संचारी दत्त दैवताचा दिनक्रमच मुळी सर्व भारतभर भ्रमण करण्याचा आहे. श्रीदत्तात्रेयाच्या दैनिक भ्रमणातील स्थल व काल यांत मतभेद असला तरी त्रिभुवनात फेरी मारणारे दत्त जीवांचा उद्धार करीत करीत आपला दिनक्रम पूर्ण करतात. 'गंगास्नान तुंगापान। कृष्णातीरी अनुष्ठान। दक्षिणकाशी भिक्षास्थान। योगनिद्रा माहुरी जाण ॥' असे श्रीपतमहाराजांनी म्हटले आहे. माहुरगडावर निद्रास्थान, काशीच्या गंगेत स्नान, पंढरपुरास गोपीचंदन, कोल्हापुरात भिक्षा, पांचाळी भोजन, तुळजापुरात हस्तप्रक्षालन आणि मेरुशिखरावर समाधिस्थान; अशी व्यापक अवस्था दत्तात्रेयाची श्रीमाणिकप्रभू सांगतात. कधी दत्ताचे ध्यान गाणगापुरी असते, कुरूक्षेत्री आचमन असते, तर धोपेश्वरी विलेपन असते. दत्तात्रेय संध्या कऱ्हाडात करतात, तर भिक्षा कोल्हापुरात मागतात, पंढरीत सुगंधलेपन करतात, आणि सह्याद्रिशिखरावर माहुरगडी ते निद्रा घेतात, असे श्रीवासुदेवानंदसरस्वतींनी म्हटले आहे. दत्तप्रभूंच्या या संचारी वृत्तीच्या वर्णनात स्थलकालाचा फरक असला तरी त्यांच्या कृपाळू दृष्टीचे आवरण सर्वत्र कसे असते हे खालील पद्यखंडावरून ध्यानात येण्यासारखे आहे.

(१) 'सकळ सिद्ध-ऋषि-निर्जर। विधि-वाचस्पति-शचिवर। दत्तात्रेयदर्शना सादर। त्रिकाळ येती निजभावे ॥ 'अद्यापि' सह्याद्रि पर्वती। देवाचे भार उभे रहाती। सर्व ब्रह्मांडाची दैवते धावती। अवधूतमूर्ति पाहावया ॥ घेता दत्तात्रेयदर्शन। देवांसी चढे सामर्थ्य पूर्ण। मग ते इतरां होती प्रसन्न। वरदान द्यावयाते ॥ ज्यासी प्रयागी प्रातःस्नान। पांचाळेश्वरी अनुष्ठान। करवीरपुरात येऊन। भिक्षाटण माध्यान्ही ॥ अस्ता जाता वासरमणि। सह्याद्रीस जाय परतोनि। तो देवांचे भार कर जोडूनि। वाट पहाती अगोदर ॥ दृष्टी देखता दिगंबर। एकचि होय जयजयकार। असंख्य वाद्यांचे गजर ॥ 'अद्यापि' भक्त ऐकती ॥ दत्तात्रेयभक्त देखता दृष्टी। सकळ दैवते जी जी सृष्टी। ती ती घालिती पायी मिठी। पुढे ठाकती कर जोडोनि ॥ करिता दत्तात्रेयस्मरण। भूते प्रेते पळती उठोन। मग उपासकासी विघ्न। कवण करू शकेल ॥ असो, ऐसा स्वामी 'अवधूत।' जो अत्रीचा महापुण्य-पर्वत। तयास वंदोनि रघुनाथ। अत्रिदर्शन घेतसे ॥' (श्रीरामविजय. १३ २२-३०)

(२) दत्ता ब्रह्मचारी रे ब्रह्मचारी।
त्रिभुवनात तुझी फेरी ॥ ध्रु० ॥

शेषाचली आसन ।
माहुरगडात निद्रास्थान ॥ १ ॥
काशीत स्नान करी ।
चदन लावी पढरपुरी ॥ २ ॥
कोल्हापुरी फिरे झोळी ।
भोजन करीत पुरी पाचाळी ॥ ३ ॥
तुळजापुरी धुई हस्त ।
मेरुशिखरी समाधिस्थ ॥ ४ ॥
माणिक सद्गुरुनाथा ।
जगव्यापक अत्रीसुता ॥ ५ ॥
—श्रीमाणिकप्रभू

(३) अनसूयागर्भरत्न अवधूत दिगबर ।
त्रिमूर्ति जो अत्रिपुत्र महेश्वर ॥ १ ॥
कधी योगी कधी भोगी कधी नग्नपिशाचसा
काशीमधे स्नान करी करी ध्यान ते
गाणगापुरी ॥ २ ॥
कुरुक्षेत्री आचमन धोपेश्वरी विलेपन ।
सध्या करी कऱ्हाडात
भिक्षा कोल्हापुरात ॥ ३ ॥
भिक्षा सारापुरी सारी पढरीत सुगधि घे ।
असी फेरी नित्य करी सध्या
पश्चिम सागरी ॥ ४ ॥
वसे सह्याद्रिशिखरी निजे जो माहुरपुरी ।
स्मरता भेट दे दत्त तो चित्तगत
सर्वदा ॥ ५ ॥
— श्रीवासुदेवानदसरस्वती

# आयुधे व परिवार

वर दत्तमूर्तीच्या स्वरूपाचा विचार करताना त्रिमुखी तोच एकमुखी असल्याचे प्रतिपादन केले आहेच दत्तात्रेयाच्या आयुधाचाही आपण विचार केला आहे श्रीदत्तात्रेयाचे ध्यान समोर उभे राहाताच धेनू, श्वान, औदुबरवृक्ष इत्यादीचीही ओळख चटकन पटते धेनू हे पृथ्वीचे प्रतीक व चार श्वान ही चार वेदाची प्रतीके असल्याचे सागितले जाते. 'कामधेनू आणि श्वान' असे नाथानी एका अभगात म्हटल्याचे आपण पाहिले आहे दत्तात्रेयाच्या आयुधाचा व परिवाराचा अर्थही अनेकानी लावण्याचा प्रयत्न केला आहे सवध दत्तावतार हाच मुळी एक रूपकाचा आविष्कार असल्याची कल्पना कित्येकानी केली आहे, ते आपण पाहूच दत्तात्रेयाच्या हातात रुद्राक्षाची माळ आहे या रुद्राक्षाचे महत्त्व श्रीगुरुचरित्रात वर्णन केले आहे या माळेतील मण्याची सख्या बावन्न आहे बावन्न मणी म्हणजे बावन्न अक्षरे असून त्याना बीजमत्राचे सामर्थ्य असल्याचे सागितले जाते दत्ताच्या हातातील जलपूर्ण कमडलू म्हणजे ससारस्थितीला कारणीभूत होणाऱ्या कर्माचे प्रतीक सागितले जाते दत्तात्रेयाच्या हाती असलेले त्रिशूळ हे आयुध तर खरेच, परतु त्याची तीन टोके म्हणजे आचार, व्यवहार व प्रायश्चित्त याची अथवा धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थाची प्रतीके होत. दत्ताच्या हातातील डमरू वेदशास्त्रावरील प्रभुत्वाचा द्योतक असून दुसऱ्या हातातील सुदर्शनचक्र ज्ञानस्वरूप असून अज्ञानजनक भ्राती दूर करणारे आहे त्याच्या हातातील शख हा वेदातील विधी, नियमविधी व परिसख्याविधी या त्रिविध कर्मचोदनाचा प्रतीक असल्याचे सागितले जाते दत्त म्हणजे ज्याने आपल्या भक्ताना सर्वस्व दिले आहे असा

धेनू पृथ्वीचे प्रतीक असल्याचे वर सागितले आहेच चार कुत्री ही चार वेदाची प्रतीके मानतात परतु श वा जोशी यानी आपल्या 'मऱ्हाटी सस्कृती' या पुस्तकात याविषयी शका प्रकट केली आहे कुत्रे हे फार तर मल्हारीचे, खडोबाचे सोबती म्हणून प्रसिद्ध आहे आणि खडोबा हे अवैदिक दैवत वैदिकाना कुत्रा हा प्राणी अपवित्र वाटतो मग दत्तात्रेयाजवळ ही कुत्री आली कोठून व कशासाठी ? तुच्छ, अधार्मिक मानलेल्या प्राण्याच्या सग्रहावरून

दत्तात्रेयाचे सर्वसंग्राहकत्व मानावयाचे काय? ढेरे यांचा उलगडा करताना दत्ताच्या तांत्रिकांशी संबंधावर बोट ठेवतात. नाथजोगी भिक्षाटनास जातात तेव्हा त्यांच्याबरोबर गायींचे कळप असतात व या गायींच्या बरोबर कुत्री रक्षणा-साठी असतात या संदर्भात कुत्री दत्तात्रेयाच्या परिवारात सामील झाली असावीत असे त्यांना वाटते हरिप्रसाद शिवप्रसाद जोशी यांनीही आपल्या दत्तात्रेयावरील ग्रंथात दत्तपरिवारातील कुत्र्यांचा विचार केलेला आहे. रा बा जोशींना वाटते तितक्या प्रमाणात कुत्री वैदिकांना अप्रिय नाहीत हरिप्रसाद जोशी यांनी युधिष्ठिराच्या कुत्र्याचा उल्लेख केला आहे शांकरदिग्विजयात शंकराचार्यांना रस्त्यात भेटणाऱ्या एका चांडाला-बरोबर चार कुत्री असल्याचे वर्णन आले आहे. येथे अद्वैतबोधाचे दर्शन झाल्यानंतर भगवान शंकराने आपले चांडालरूप स्पष्ट केले व आपल्या बरोबरची चार कुत्री चार वेदांच्या मूळ रूपात प्रकट केली! अंधारात धन्यास मार्ग दाखवि-णाऱ्या विश्वासू कुत्र्यास धार्मिक परंपरेने जवळ केले असावे अज्ञानाच्या तमातून ज्ञानाचा मार्ग दाखविणाऱ्या चार वेदांची प्रतीके दत्तात्रेयाभोवती कुत्र्यांच्या रूपाने वावरतात, यातील रहस्य समजून घेण्यासारखे आहे इच्छा, वासना, आशा व तृष्णा यांच्या रूपातही कोणी या चार कुत्र्यांकडे पाहात असतो

## दत्तस्वरूपाची रूपके

दत्तात्रेय हा सगुणावतार असून त्याची विविध प्रकारची मनोहर वर्णने आपण वर पाहिली अनेक वेळा भक्तांच्या आवडीप्रमाणे दत्तात्रेयांनी रूपे धारण केलेली दिसतात बालावधूत, पिशाच, मलंग, व्याघ्र इत्यादी रूपांनी दत्तात्रेयांनी आपल्या शिष्यांना भेटी दिलेल्या आढळतात. दत्तात्रेयाच्या सगुण उपासनेचा थोडक्यात परि-चय आपण पुढे करून घेणार आहोतच येथे सगुणरूपाच्या पलीकडे जेव्हा विचारवंत वा तत्त्वज्ञ जातात, तेव्हा त्यांच्या निरीक्षणाचे स्वरूप समजावून घेऊ दत्तात्रेय अविनाशी, सर्वव्यापी, सर्वत्र संचारी, भक्तवत्सल, जगद्-गुरू इत्यादी विशेषणांचा व्यापक भूमिकेवरून विचार करताना दत्तात्रेयावर काहींनी मोठी सुरम्य रूपके बसविलेली दिसतात. स. कृ फडके यांनी म्हटले आहे, 'मृगनक्षत्राचे चार खूर तेच चतुर्वेद, रोहिणी तीच आदिमाया धेनू, मृग-नक्षत्रातील अग्नी (रुद्र), सोम आणि विष्णू हे त्रिशर म्हणजेच दत्ताचे त्रिशिर, अशी ही नक्षत्रे दत्तस्वरूपाचे प्रतीकच म्हणता येईल. चंद्रालाही कोठे कोठे विष्णू मानले आहे .... पौर्णिमेचा चंद्र म्हणजे विष्णू असे जर मानले तर शुद्ध चतुर्दशीचा वर्धिष्णू चंद्र म्हणजे ब्रह्मदेव व वद्य प्रतिपदेचा क्षयसूचक चंद्र हाच रुद्र, असे मानून पौर्णिमेने धारण केलेले रूप हे उत्पत्तिस्थिति-लय यांचे सूचक असेही रमणीय प्रतीक मानता येईल.'(श्रीदत्तदर्शन पृष्ठ ७).

महादेवशास्त्री जोशी यांनी दत्तजन्माचे वर्णन असेच नक्षत्रप्रतीकाने केलेले आहे ते म्हणतात, 'गगनांगण त्रैमूर्तींच्या जन्माचे समग्र आख्यान मांडलेले दिसत होते उत्तरेला सारथिपुत्रातला ब्रह्महृदयाचा तो ठळक तारा म्हणजे श्रीविष्णू त्याच्या पदकमलापासून निघालेली आणि कृत्तिकापुंजाच्या रेषेत ब्रह्महृदयाच्या दक्षिणेस असलेल्या अग्नीलाच जर रुद्र मानले तर त्याच्या जटेतून खाली कोसळणारी ती स्वर्धुनी म्हणजे आकाशगंगा तो जवळच रोहिणीनक्षत्राचा अधिपती म्हणून उल्लेखलेला ब्रह्मा असे हे ब्रह्मा-विष्णू-महेश आपापल्या स्थानी विराजत होते .. एक दिवस स्त्रीहट्टापुढे निरुपाय होऊन अनसूयेच्या सत्त्वरक्षणासाठी त्यांना अत्रीच्या आश्रमात जावे लागले पण झाला प्रकार उलट. या महासतीचे सामर्थ्य त्यांच्याहून आगळे ठरले

तिने त्यांना अर्भके बनविली आणि त्यांचा पाळणा लोंबविला. चार पायांचे लंबचौकोनी मृग नक्षत्र जर पाळण्याच्या जागी कल्पिले तर मधला इषु-त्रिकांड ही तीन गोजिरी बालके शेजारी शेजारी आत पहुडली आहेत, असे म्हणायला काय हर-कत आहे ? दुसऱ्या प्रकाराने बोलायचे तर जीव हा अविद्येच्या घोंगडीत गुरफटलेला आणि ईश्वर हा मायेची शाल पांघरलेला असतो. दत्तोपासनेत घनिष्ठ संबंधाने असलेली त्रिपुरसुंदरी ही एक मायाच आहे. मृगाच्या ठिकाणी जर तिची कल्पना केली तर, आतला इषुत्रिकांड म्हणजेच मायोपाधिक 'त्रिगुणात्मक त्रैमूर्ती' दत्तच म्हणावे लागेल. दत्ताच्या चित्रात नेहमी आढळणारी कुत्रीही तिथे आहेतच. एक लुब्धक मंडळाची श्वानाकृती आणि दुसरा प्रश्वा. मार्गशीर्ष पौर्णि-मेचा प्रदोष हा दत्तजन्माचा काळ आहे. त्या दिवशी सूर्यास्ताला दत्तजन्माचा गुलाल उधळत असता मृगाचा पाळणा आतल्या तीन बाळांसह पूर्वक्षितिजावर झुलू लागतो' (तीर्थरूप महाराष्ट्र भाग १ : पृष्ठ ४६-४७)

श्रीदत्तात्रेयांच्या अवतारावर असेच आणखी एक विचारप्रवर्तक रूपक 'संक्षिप्त श्रीगुरु-चरित्रा'च्या प्रास्ताविकात वि. द. रिसबूड यांनी बसविले आहे. त्यांच्या मताने दत्त आत्रेय अत्री-ऋषींनी दिलेला म्हणून दत्तात्रेय. अत्रींनी काय दिलं ? अत्री हा शब्द वेदात अग्निवाचक असून भृगू व अंगिरसाबरोबर अग्नीचा संशोधक म्हणून अत्रींचेही नाव येते. या अत्रींनी समाजास निर्बंधित व संशोधित अग्नी दिला. तोच त्याचा पुत्र दत्तात्रेय म्हणून नावारूपास आला. अंतरिक्ष, भूमी व पाताळ या तीन स्वरूपांनी अग्नी प्रकट होत असल्याने दत्तरूप अग्नी त्रिमुखी बनला. वैदिक वाङ्मयात अग्नीचे वाहन कुत्रा असल्याने दत्ताच्या परिवारात त्यांनाही स्थान मिळाले. ऋक्षकुल पर्वतावर घोर तप करणाऱ्या अत्रि-ऋषींची दाहकता आपण पुढे पाहणार आहोतच.

स. कृ. फडके यांनी आपल्या श्रीदत्तोपासना या ग्रंथात आरंभीच पृथ्वी ही क्षमाशील अनसूया मानून एक कल्पनारम्य रूपक सजविले आहे. अशा अनेक प्रकारच्या रूपकांत कल्पनावैभव दिसते, सर्वव्यापकपणाचा भाव दृढ होतो. दत्ता-त्रेयावर आणखी एक सुरेख रूपक एका थोर दत्तभक्ताने केले आहे. श्रेष्ठ दत्तोपासक श्रीरंग अवधूत महाराजांच्या एका दुर्मिळ अशा भाषणाचा वा प्रवचनाचा आलेख द. पा. नंदुरबारकर यांनी 'दत्त-उपासना' या एका लहानशा पुस्तिकेत दिलेला आहे सर्व रत्नभांडार संपल्यामुळे एका ज्ञानी व वृद्ध ब्राह्मणास भगवानांनी स्वतःसच देऊन टाकले. हा वृद्ध ब्राह्मण म्हणजे अत्री. त्याच्या एकनिष्ठ भक्तीला वश होऊन स्वतःचे दान देणारा तोच दत्तावतार.

या अत्रिऋषींच्या धर्मपत्नीचे नाव अनसूया. या उभयतांच्या तपश्चर्येचे फळ म्हणजे दत्तात्रेय होत. अकार, उकार व मकार म्हणजेच सत्, चित् व आनंद अथवा अस्ति, भाति, प्रिय ही त्याची तीन मुखे. पुराणातील ब्रह्मा, विष्णू व महेश हेच होत. शरीर हाच सह्याद्री पर्वत. त्याच्या मध्यवर्ती असलेले हृदय तोच माहुरगड; अपरोक्ष ज्ञान तो अत्री, एकलक्षणा प्रेमभक्ती तीच अनसूया. या दोहोंच्या समन्वयापासून उत्पन्न होणारे विज्ञान निर्गुण सक्रिय साक्षात्कार किंवा प्रत्यक्ष अनुभव तोच दत्त. दत्तात्रेयांचे हे आध्या-त्मिक रूप झाले. श्रीरंगअवधूत यांनी दत्तात्रेयांचे आधिदैविक रूपही स्पष्ट करून त्यांची तीन मुखे, त्यांतील ऐक्य, त्याची आयुधे इत्यादींची चर्चा केली आहे दत्तात्रेयाचे आधिभौतिक रूप वर्णन करताना त्यांनी एका भव्य रूपकाची योजना केलेली दिसते.

हिवाळा, उन्हाळा, पावसाळा हे तीन ऋतू, अथवा सकाळ, दुपार, सायंकाळ हे तीन काल-भेद ज्यात नाहीत असा सूर्य म्हणजे अत्री. अन-सूया ही कर्दमऋषींची मुलगी. कर्दम म्हणजे

चिखल. हा चिखल वाळून घट्ट झाल्यावर त्यापासून निर्माण झालेली पृथ्वी म्हणजे अनसूया., तिला कोणी जाळा, खणा, तिच्यावर कोणी थुंका, ती नित्य क्षमाशील. तिला असूया म्हणजे मत्सर या वैरभाव माहीत नाही. सूर्य-अत्री व पृथ्वी–अनसूया यांच्या संयोगाने निर्माण होणारे अन्न हाच कोणी दत्तात्रेय. अन्नामुळे सृष्टीची उत्पत्ती होते. म्हणून हा अन्नदत्त ब्रह्मदेव. अन्नामुळेच पोषण होते; म्हणून तो विष्णू व पुरेसे अन्न न मिळाल्यास तेच अन्न संहाररूपाने महेश होते. याच अन्नदत्ताची वा ब्रह्माची उपासना उपनिषदात आहे.

एवढे सांगून झाल्यावर श्रीरंग अवधूतांनी श्रीदत्ताला एका आदर्श शेतकऱ्याच्या रूपाने उभे केले आहे ! शेतकरी कधी विश्रांती घेतो काय ? दत्तही नेहमी उभाच. शेतीसाठी बैल पाहिजे, खतासाठी गोमूत्र व शेण पाहिजे, म्हणून शेतकरी दत्तात्रेयाजवळ नेहमी गोमाता आहे. या गायीचा म्हणजे गायत्रीचा विस्तार म्हणजे चार वेद होत. चोराविकांपासून संरक्षण व्हावे म्हणून दत्तांना चार भौतिक कुत्र्यांची आवश्यकता वाटते. या भौतिक दत्ताची आयुधेही अशीच आहेत. पाखरे उडविण्यासाठी डमरू. भयप्रसंगी मदतीला कोणास बोलावता यावे म्हणून नाद करणारा शंख, पशुपक्ष्यांना हाकारण्यासाठी आद्यचक्ररूपी गोफण. नांगराच्या प्रतीकासारखे त्रिशूळ. शेतातील मातीची ढेकळे फोडण्यासाठी कुदळीसारखी गदा. भर उन्हात काम करताना तृषा शमविण्यासाठी जलकमंडलू. पीक उचलण्यासाठी, भरण्यासाठी दत्तशेतकऱ्याच्या काखेत झोळी. ईश्वरीकृपेच्या बळावर पीक पदरात पाडून घेण्यासाठी म्हणजे काम करता करता प्रार्थना करण्यासाठी जपाची माळ. अशा या दत्तशेतकऱ्याने भौतिकाच्या प्राप्तीबरोबरच आध्यात्मिकतेची जोड केलेली दिसते. श्रीरंग-अवधूतांनी रंगविलेले हे शेतकऱ्याचे रूपक रमणीय व तत्त्वबोधकही वाटते.

## दत्तात्रेय तांत्रिक ?

दत्तात्रेय ही देवता शाक्तांची वा तांत्रिकांची असावी असा एक मुद्दा उपस्थित केला जातो. मार्कंडेय पुराणातील दत्तात्रेय ' दिव्याम्बरधरा ' आणि ' चारुपीननितम्बिनी ' अशा रमणीबरोबर मद्यपान करीत असताना दिसतात. म्हणूनच रा. चिं. ढेरे दत्तात्रेयांना मूलतः शाक्त तांत्रिक पंथातील मानतात. त्यांच्या मते ' दत्तात्रेय हा राजराजेश्वर विष्णूसारखा सालंकृत सुंदर नसून शिवासारखा जटाजूटधर स्वैच्छाचारी, अवधूत–दिगंबर जोगी आहे. मार्कंडेय पुराणातील दत्तात्रेय हा तर एखाद्या शाक्त सिद्धासारखा भासतो. तो 'योगस्थ' असल्यामुळे स्त्री आणि मद्य यांचा भोग घेऊनही निर्लेप आहे. शाक्तांच्या प्रसिद्ध पंचमकारांपैकी मद्य आणि मैथुन या दोन प्रभावी मकारांचे येथील अस्तित्व चिंतनीय आहे. ' ( श्रीनरसिंह सरस्वती : चरित्र आणि परंपरा, पृष्ठ २१ ) त्रिपुरारहस्य, परशुरामकल्पसूत्र इत्यादी ग्रंथ श्रीविद्येच्या वा शक्तीच्या उपासनेस आधारभूत असून त्याच्या व त्यांच्यावरील टीकांच्या अभ्यासावरून दत्तात्रेय हे त्रिपुरोपासनेचे मूल प्रवर्तक ठरतात असे ढेरे यांचे अनुमान आहे. त्यांनी शंकराचार्यांच्या ' त्रिपुरासुंदरी ' व ' सौंदर्यलहरी ' या स्तोत्रांवरून त्यांची शक्तीची उपासना सिद्ध केली आहे. दत्तात्रेयांशी संबंधित असणारी अनेक क्षेत्रे प्राचीन शक्तिपीठे असल्यानेही शाक्त, तांत्रिक व दत्तात्रेय यांचा संबंध स्पष्ट होण्यासारखा आहे.

दत्तात्रेयाच्या उपासनेत अशा प्रकारे शाक्त आणि तांत्रिक यांच्या परंपरांचा प्रभाव असला तरी दत्तात्रेय ही देवता केवळ शाक्तांची वा तांत्रिकांची आहे असे मात्र नव्हे. दत्तात्रेय प्रथम

तंत्रसाधनेत लोकप्रिय ठरले आणि नंतर पुराणांतून विष्णूचा अवतार म्हणून देवतास्वरूप पावले हा रा. चिं. ढेरे यांचा सिद्धान्त सहजासहजी मान्य होण्यासारखा नाही. शाक्त, नाथ, तांत्रिक इत्यादी संप्रदायांशी दत्तात्रेयाचा असलेला संबंध वर वर्णन केला आहेच. याच संदर्भात म. स. पारखे यांची 'श्रीविद्येचे आचार्यवर्य श्रीअवधूत दत्तात्रेय' नावाची एक पुस्तिका उल्लेख करण्यासारखी आहे. तंत्रसाहित्याच्या अभ्यासावरून त्यांनी या पुस्तिकेत श्रीदत्तात्रेयाच्या अवतारकार्याची मीमांसा केलेली आहे. महात्रिपुरसुंदरीच्या उपासनेचे उद्घाटन हा त्याच्या कार्याचा प्रधान हेतू असल्याचे पारखे सांगतात. त्रिपुरारहस्यातील दत्तात्रेयाचे वर्णन जटाजूटधारी, दिगंबर अशा स्वेच्छाचारी अवधूत स्वरूपाचे आहे. शाक्तांच्या मकारांचे लक्ष्यार्थ पारखे लावतात ते असे. विवस्त्र स्त्री हे अनादिशक्तीचे कृत्रिम बाह्य आवरण काढून टाकले असता 'व्यतीत होणाऱ्या मूळ स्वरूपाचे प्रतीक होय आणि बाह्य उपाधीपासून वाचविणारे व आपल्याच आनंदात गुंगून टाकणारे परब्रह्माचे ज्ञान ज्या योगमार्गाने मिळते त्याचे प्रतीक म्हणजे मद्याचा घट होय. अवधूतगीतेत स्त्रीसंग व मद्यपान यांचा निषेधच केलेला दिसतो. *अवधूतगीता, जीवन्मुक्तगीता, त्रिपुरा*रहस्य, गंधर्वतंत्र, पद्मपुराणांतर्गत पांडुरंगमाहात्म्य इत्यादींच्या साहाय्याने तंत्रविद्या व दत्तात्रेय यांचा संबंध पारखे स्पष्ट करताना दिसतात. वामाचारविरहित अशी तंत्रविद्या वा श्रीविद्या दत्तात्रेयांनी प्रवर्तित केली असे त्यांचे मत आहे. पद्मपुराणांतर्गत अशा पांडुरंगमाहात्म्यानुसार पंढरपूर क्षेत्रही भैरवी चक्राधिष्ठित आहे : म्हणून श्रीदत्तात्रेय 'चंदन लावी पंढरपुरीं.' पारखे यांच्या मताने महात्रिपुरसुंदरी अथवा आदिमाया हिच्या उपासनेची महती दत्तात्रेयांना वाढवावयाची होती. तंत्रोक्त श्रीविद्या ज्या परंपरेने भूतलावर प्रसृत झाली तीत श्रीदत्तात्रेयांना प्रमुख स्थान आहे.

शाक्त व तांत्रिक यांच्या परंपरांचा अभ्यास वाढेल तसतसे श्रीदत्तात्रेयांचे स्वरूप अधिक स्पष्ट होईल. श्रीदत्तात्रेय केवळ हे तांत्रिक सिद्ध पुरुष नसून ब्रह्मा, विष्णू व महेश यांच्या अवतारांचे एकत्रित असे एक रूप होते असेही म्हणता येईल. वैदिक आणि पौराणिक परंपरांतूनच दत्तात्रेयांच्या कार्याचा परिचय होण्यासारखा आहे. अलर्क, यदू, प्रल्हाद, सहस्रार्जुन, परशुराम इत्यादी दत्तात्रेयशिष्य पौराणिक असून श्रीपादवल्लभ व नृसिंहसरस्वती यांची परंपराही वैदिक मार्गास अनुसरून आहे. बौद्धांच्या वा नाथांच्या उत्तरकालीन अवनतीतून प्रकट झालेल्या वामाचाराचा संबंध दत्तात्रेयांच्या संदर्भात उत्तरकालीन असावा.



## एकमुखी आणि षड्भुज श्रीदत्तात्रेय



सोळाव्या शतकातील दासोपंतांनी स्वतःच्या हाताने
पासोडीवर काढलेले दत्तात्रेयांचे चित्र

## राजयोगी श्रीदत्तात्रेय

॥ ॐ नमो भगवते दत्तात्रेयाय ॥



सुमारे शंभर वर्षापूर्वीच्या दुर्मिळ अशा
'दत्तात्रेय सर्वस्व' या ग्रंथातील राजयोगी दत्त



त्रिमुखी श्रीदत्त



त्रिमुखी श्रीदत्त



श्रीदत्तमुर्ती, काशी



श्रीदत्तमुर्ती, माणगाव



यतीश्वरमूर्ती औदुंबर



श्रीभीक्षालिंगस्थान, कोल्हापूर



महाविष्णुस्वरुप दत्त
( पट्टणकर, वडोदे )



घामोरीकरांना दिलेल्या
स्वामीसमर्थांच्या चरणपादुका



धामोरीकरांना स्वामी
समर्थांनी दिलेली दत्तमूर्ती



अक्कलकोट स्वामीसमर्थ, वडोदे



केडगाव दत्तमूर्ती



धामोरीकर दत्तस्थान, वडोदा



त्रिमुखी श्रीदत्त



श्रीबालदत्त



त्रिगुणी श्रीदत्त



वासुदेव बळवंत फडके यांचे आराध्य दैवत



श्रीदत्तमूर्ती, संगमनेर



डभोई ( गुजरात ) श्रीदत्त



पालखीमधील श्रीमूर्ती नृसिंहवाडी



श्रीदत्तमूर्ती, डिग्रज



दत्तमूर्ती, देवास



श्रीदत्त व श्रीजातायणकर



बालवधूत श्रीदत्त



गोरक्षासह श्रीदत्त



एकमुखी दत्त, माकुरी



श्रीदत्तात्रेय, चोरवड



त्रिमुखी श्रीदत्त



श्रीदत्तमूर्ती, पारनेर



एकमुखी दत्तमूर्ती, अडवली



श्रीपादमंदिर, दत्तमूर्ती, कुंटेचौक, पुणे



त्रिमुखी श्रीदत्त



# २ श्रीदत्तात्रेय चरित्र-कथा

बालार्कप्रभमिन्द्रनील जटिल भस्माङ्गरागोज्ज्वलम्
शान्तं नादविलीनचित्तपवनं शार्दूलचर्माम्बरम् ॥
ब्रह्मज्ञैः सनकादिभिः परिवृतं सिद्धैः समाराधितम्
आत्रेयं समुपास्महे हृदि मुदा ध्येयं सदा योगिभिः ॥

हा अत्रिनंदन बालरवीप्रमाणे कांतिमान आहे. कृष्णवर्णाच्या जटेने युक्त असणाऱ्या याच्या अंगावर भस्माची उटी शोभते. हा शान्त असून अनाहत नादामध्ये मनोवायूचा लय झालेल्या याने व्याघ्रावर परिधान केलेले आहे. हा सनकादिकासारख्या ब्रह्मवेत्त्यांनी परिवेष्टित असतो, सिद्धमुनी याची उपासना करतात, योगी लोक मोठ्या संतोषाने यालाच आपल्या हृदयात स्थान देतात. अशा या अत्रिनंदन श्रीदत्तात्रेयाचे आम्ही मनापासून ध्यान करतो.



## अत्रिऋषींची पूर्वपीठिका

श्रीदत्तात्रेय या दैवताचे काही विशेष पाहून झाल्यानंतर आता त्यांच्या चरित्रकथेकडे वळावयाचे आहे. दत्तात्रेयाची परंपरा पुढे कसकशी वाढली हे आपण पाहूच; पण त्यांची पार्श्वभूमीही थेट वैदिक काळापर्यंत भिडणारी असल्याने तेथूनच विकसित झालेल्या त्यांच्या पीठिकेकडे प्रथम लक्ष देऊ.

दत्तात्रेयांचा पिता म्हणून अत्री ऋषीचा उल्लेख नेहमी येतो. या अत्री ऋषीचा उल्लेख ऋग्वेदातील पाचव्या मंडलात येतो. यातील ३७–४३ व ७६–७७ ही सूक्ते याच्याच नावावर आहेत. याच्या जन्मकथेसंबंधी हकीगत अशी मिळते. प्रजापतीने त्रिसंवत्सर नावाचे एक सत्र आरंभिले होते. या सत्रात वाग्देवी प्रकट झाली. तिला पाहून प्रजापती व वरुण यांचे मन चलित झाले.

त्या दोघांचे पतन पाहिलेले; वीर्य वायूने अग्नीत टाकले. या अग्निज्वालेपासून भृगू व निखाऱ्यापासून अंगिरा ऋषी जन्मास आले. या दोन सुंदर मुलांना पाहून वाग्देवीने प्रजापतीकडून आणखी एका मुलाची इच्छा केली. प्रजापतीच्या वीर्यापासून प्रतिसूर्य असा एक पुत्र निर्माण झाला; तो अत्री होय. अत्री हे एक श्रेष्ठ प्रकारचे कुल असावे. अत्री व अनसूया ही जोडीही अनेकदा वेदातून येते. आणखी एक कथा अशी की, स्वायंभुव मन्वंतरात ब्रह्मदेवाच्या नेत्रापासून वा मस्तकपासून झालेला पुत्र म्हणजे अत्री होय. ब्रह्मदेवाच्या दहा मानसपुत्रांपैकी याला एक मानतात. कर्दम प्रजापतीची अनसूया नावाची जी कन्या ती अत्रीची भार्या होय. अत्रीने चतुरात्र नावाचा एक याग सुरू केल्याचा पुरावा सापडतो. लोकशासित राज्याचा पुरस्कार केल्यावरून याला तुरुंगवास घडल्याचाही उल्लेख येतो. अग्नीत होरपळत असताना अश्वीनी याला सोडविले. सूर्यग्रहणासंबंधी याला प्रथम ज्ञान झाल्यामुळे ग्रस्त सूर्याला अत्री सोडवितो अशी समजूत दृढ झालेली दिसते.

याच्या कुळातले पुरुष कवी होते, लढवय्ये होते. यांनी केलेले पर्जन्यसूक्त ओजस्वी आहे. 'विसर्माणं कृणुहि वित्तमेषां । ये भुञ्जते अपृणन्तो न उक्थैः । अपव्रतान् प्रसवे वावृधाना । ब्रह्मद्विपः सूर्याद् याव यस्व ।।' (ऋग्वेद ५-४२-९)-'जे लोक स्तोत्रे म्हणण्याचा धंदा करून पोट भरतात, पण दानधर्म करून देवाना संतुष्ट करीत नाहीत, त्यांचे धन तू क्षणभरही टिकू देऊ नकोस. तसेच सन्मार्गापासून भ्रष्ट झालेले, भरपूर मुले असल्यामुळे माजलेले व धर्माचा द्वेष करणारे असे जे दुष्ट असतील त्यांना तू सूर्यप्रकाशातून अंधारात ढकलून दे.' अत्री हा सप्तर्षीपैकी एक म्हणून मोठा कर्मनिष्ठ व तेजस्वी असा गणला गेला आहे. याला अनसूयेपासून दत्त, दुर्वास, सोम व अर्यमा असे चार मुलगे व अमला ही मुलगी अशी अपत्ये झाली. दाशरथी राम वनवासात असताना याच्या आश्रमात आला असताना याने व अनसूयेने त्याचा चांगला आदरसत्कार केला. अत्रिसंहिता व अत्रिस्मृती असे दोन ग्रंथ याच्या नावावर असून योग, तप, कर्मविपाक, द्रव्यशुद्धी, प्रायश्चित्तविचार, असे अनेक विषय याने चर्चिले आहेत. वास्तुशास्त्रावरही याचा एक ग्रंथ असल्याचे सांगतात.

## सती अनसूया

स्वायंभुव व वैवस्वत मन्वंतरांतील अत्रिऋषींची ही पत्नी. कर्दमाला ही देवहूतीपासून झाल्याचे सांगतात. पौराणिक वाङ्मयात एक थोर पतिव्रता म्हणून अनसूयेचा उल्लेख येतो. न खाता तीनशे वर्षे तपश्चर्या करून हिने शंकराला प्रसन्न करून घेतले. एकदा दहा वर्षे सतत दुष्काळ पडल्यामुळे लोक त्रस्त झाले असताना हिने स्वतःच्या तपःसामर्थ्याने गंगा आणली व दुष्काळाचे निवारण केले. मांडव्यऋषी सुळावर असताना एका स्त्रीचा धक्का त्याला लागला. 'सूर्योदयापूर्वी तू विधवा होशील' असा शाप तिला मांडव्याने दिला. ही स्त्री अनसूयेची मैत्रीण होती. तिने सूर्यच उगवू द्यायचा नाही असे ठरविले. त्यामुळे जगाची उपासमार होऊ लागली. मग अनसूयेने आपल्या तपोबळावर सखीचा शाप दूर करून सूर्योदय होऊ दिला. हिच्या सतीत्वाबद्दल व सामर्थ्याबद्दल उमा, लक्ष्मी व सावित्री यांना मत्सर वाटू लागला. त्यांनी ब्रह्मा–विष्णू–महेशास हिचे सत्त्वहरण करण्यास पाठविले. परंतु हिच्या पातिव्रत्याच्या प्रभावापुढे त्यांनाच लहान मुले म्हणून तिच्या आश्रमात राहावे लागले. या तीन देवांच्या अंशानी अनसूयेस दत्त, दुर्वास व चंद्र असे तीन पुत्र झाले.

राम वनवासात असताना अत्रींच्या आश्रमात आला होता हे वर आलेच आहे. अत्रीच्या सूचनेवरून रामाने सीतेस अनसूयेच्या दर्शनास

पाठविले. अत्री ऋषींनी हिच्या तपोबळाचे वर्णन सीतेजवळ केले. सीतेने हिचे दर्शन घेतले तेव्हा हिची सर्व गात्रे शिथिल झाली होती. अंगावर सुरकत्या पडल्या होत्या, केस पांढरे झाले होते. वाऱ्याने हलणाऱ्या केळीप्रमाणे हिची अवस्था बनली होती. पतीबरोबर वनवासास निघालेली सीता पाहून अनसूयेला तिचा मोठा अभिमान वाटला. तिने सीतेची प्रशंसा केली. नेहमी ताजी राहणारी माला, वस्त्र, भूषण, उटी, अनुलेपन इत्यादी वस्तू समर्पण करून तिच्याशी प्रेमाच्या गोष्टी अनसूयेने केल्या. सतीत्वाचा व पतिव्रतेचा मनोज्ञ आदर्श अनसूयेच्या भाषणातून व्यक्त होतो. ती सीतेला म्हणाली,

'सीते, धर्माकडे तुझे लक्ष आहे हे सुदैवच होय, मानिनी, नगरात असो वा वनात असो, अनुकूल असो वा प्रतिकूल-असो, ज्या स्त्रियांना भर्ता प्रिय आहे, त्यांना महाफलदायक लोक प्राप्त होतात. पती दुःशील असो, स्वेच्छाचारी असो, निर्धन असो, सुस्वभावी स्त्रियांचे तेच मुख्य दैवत आहे. सीते, भर्त्यापेक्षा इष्ट बांधव मला दुसरे कोणीच नाहीत. भर्ताच इहलोकी व परलोकी इष्टप्राप्तीचे साधन असल्यामुळे सेवेस योग्य आहे. सीते, ही दिव्य-माला, वस्त्र, भूषणे, उटी, मोठे मूल्यवान अनुलेपन मी तुला देते. तुझ्या अवयवांना या सर्व गोष्टी शोभतील. या दिव्य उटीने जनककन्ये, विष्णूला शोभणाऱ्या लक्ष्मीप्रमाणे तू आपल्या भार्याला शोभशील. सीतेचा याप्रमाणे यथोचित सत्कार करून अनसूयेने तिला सतीच्या धर्माचा उपदेश करताना म्हटले–

नगरस्थो वनस्थो वा शुभो वा यदि वाऽशुभः ।
यासां स्त्रीणां प्रियो भर्ता तासां लोका महोदयः ।
(वा. रा. २-११७-२१)

नगरात राहणारा वा वनवासी, अनुकूल वा प्रतिकूल, कसाही असो, आपला पती ज्या स्त्रियांनी प्रिय मानला त्यांना प्रकाशित असे परलोक प्राप्त होतात.

यानंतर अनसूयेने सीतेच्या स्वयंवराची हकीकत मोठ्या प्रेमाने विचारली. सीतेनेही आपली जन्मकथा व स्वयंवरकथा मोकळ्या मनाने अनसूयेस सांगितली. या वृद्ध मातेने दिलेले अलंकार सीतेने परिधान केले. अनसूया मातेचा आशीर्वाद घेऊन सीता रामलक्ष्मणाबरोबर वनगमनास सिद्ध झाली.

# पुराणातील दत्तजन्म

वर वर्णन केलेल्या अत्री व अनसूया या दांपत्याच्या पोटी दत्तात्रेयाचा जन्म असून ब्रह्मा, विष्णू व महेश या तीन देवांचे अंश त्यांच्यात एकवटलेले आहेत. विष्णूच्या चोवीस अवतारापैकी हा एक मानतात. निरनिराळ्या पुराणांतून याच्या जन्मकथा निरनिराळ्या असल्या तरी हा अत्रिअनसूयेचा पुत्र व विष्णूचा अवतार यात मात्र एकवाक्यता आहे. वायुपुराण, ब्रह्मांड-पुराण, कूर्मपुराण, विष्णुपुराण, मार्कंडेयपुराण, धर्मोत्तरपुराण, पद्मपुराण अशा अनेक पुराण-ग्रंथांतून दत्तात्रेयांच्या ज्या विविध जन्मकथा व चरित्रकथा आल्या आहेत, त्यांची थोडक्यात ओळख करून घेऊ. भागवतपुराणातील कथा अशी आहे–अत्री ऋषी हा ब्रह्मज्ञानी पुरुषांत श्रेष्ठ होता. ब्रह्मदेवाने त्याला सृष्टी उत्पन्न करण्याची प्रेरणा दिली, तेव्हा तपश्चर्या करण्यासाठी तो आपल्या पत्नीसहवर्तमान ऋक्षपर्वतावर गेला. त्या पर्वतावरील अरण्यात पुष्पगुच्छांनी भरलेले अनेक पळसाचे व अशोकाचे वृक्ष असून त्यांतूनच निर्विन्ध्या नावाची नदी वाहात असल्यामुळे तिच्या उदकाचा नाद सर्वत्र घुमत होता. त्या अरण्यात सुखदुःखादी द्वंद्वांचा त्याग करून अत्री केवळ वायू भक्षण करीत व प्राणायामाच्या योगाने आपल्या मनाचा निग्रह करीत शंभर वर्षेपर्यंत एका पायावर उभा राहिला. ही कडक तपश्चर्या करीत असताना अत्री ऋषी, 'जो कोणी या जगाचा नियंता आहे, त्यालाच मी शरण

आलो आहे, तरी त्याने मला आपल्यासारखी संतती द्यावी' असे नित्य चिंतन करी. अत्रीची तपश्चर्या चालू असताना प्राणायामरूपी इंधनाने प्रदीप्त झालेला अग्नि त्याच्या मस्तकातून बाहेर त्रलोक्याला जाळू लागला. तेव्हा अप्सरा, ऋषी, गंधर्व, सिद्ध, विद्याधर व सर्प हे ज्याच्या कीर्तीचे वर्णन करीत असतात असे ब्रह्मा, विष्णू आणि महेश असे तीनही देव अत्री ऋषीच्या आश्रमात आले. नंदी, हंस व गरुड या वाहनांवर बसून आलेल्या व त्रिशूळ, कमंडलू व चक्र अशी आयुधे धारण करणाऱ्या या तीन देवांनी अत्रींना साष्टांग नमस्कार घातला. त्यांची मनोभावे पूजा केली. अत्री ऋषीने त्याना मनोभावे प्रार्थना करुन म्हटले, 'देवहो, जगाची उत्पत्ती, पालन व संहार अशी कामे करणारे ब्रह्मा, विष्णू व महेश तुम्ही आहात. तुमच्यापैकी ज्या एकालाच मी बोलविले होते तो कोण? मी येथे पुत्रप्राप्तीसाठी तप करीत आहे.' त्यावर त्या तीन देवांनी अत्रीस सांगितले, 'तू ज्या एका तत्त्वाचे ध्यान करीत आहेस त्याचेच आम्ही तिघेजण अंशभूत आहोत. ऋषे, तुझें कल्याण असो. आता तुला आमच्या अंशांपासून जगप्रस्यात असे तीन पुत्र होतील आणि ते तुझी कीर्ती जगभर पसरवतील.' त्यानंतर वरप्राप्तीप्रमाणे अत्री ऋषीला ब्रह्मदेवाच्या अंशापासून सोम, विष्णूच्या अंशापासून योगशास्त्रात निपुण असा दत्त व शंकराच्या अंशापासून दुर्वास असे तीन पुत्र झाले. ( भागवत : ४.१.१७-३२ )

ब्रह्मपुराणात थोडी निराळी कथा आहे. ब्रह्मा-विष्णु-महेश यांची पुत्रप्राप्तीसाठी अत्री ऋषी आराधना करीत होते. देव संतुष्ट झाल्यावर त्याने त्याना विनंती केली, 'आपण माझ्या घरी पुत्ररूपाने जन्म घ्यावा आणि एक गुणवती व रूपवती कन्या पण द्यावी.' देवांच्या आशीर्वादामुळे अत्रीस दत्तात्रेय, सोम व दुर्वास हे तीन पुत्र झाले. जी कन्या झाली तिचे नाव शुभात्रेयी. ( १४४.२-४ ) वायुपुराणात वा कूर्मपुराणात अनसूयेच्या सतीत्वाशी व पावित्र्याशी संबंध असलेली एक कथा आहे. प्रतिष्ठान नगरीत कौशिक नावाचा एक ब्राह्मण नित्य वेश्यागमनी असल्यामुळे त्यास आपल्या साध्वी पत्नीची बिलकुल चाड उरली नव्हती. काही काळानंतर त्याला रोग जडून त्याची गात्रे झडू लागली. वेश्येने त्याचा त्याग केल्यावर तो घरी राहू लागला. त्याच्या पत्नीने त्याची मनोभावे सेवा केली. एकदा हा रोगी पती आपल्या पत्नीस म्हणाला, 'मला त्या वेश्येवाचून राहावत नाही. तू मला तिच्याकडे घेऊन चल.' रात्रीच्या अंधारात कौशिकपत्नी आपल्या पतीला घेऊन वेश्येकडे निघाली.

वाटेत एक चमत्कार घडला. त्याच नगरात चुकीने चोर समजून सुळी दिलेला मांडव्य ऋषी सुळावर यातना भोगीत होता. या ऋषीला कौशिकाचा धक्का बसला. त्याबरोबर मांडव्याने कौशिकाला शाप दिला की, 'तू सूर्योदयापूर्वी मरण पावशील.' परंतु आपल्या पातिव्रत्याच्या प्रभावाने कौशिकपत्नीने सूर्योदयच थांबविला. त्यामुळे सबंध विश्वचक्रातच बिघाड झाला. सर्व देव धावरून गेले. विश्वाला वाचविण्यासाठी ब्रह्मदेवाने सती अनसूयेकडे मध्यस्थी करण्यासाठी विनंती केली. अनसूयेने कौशिकपत्नीला अभय देऊन सूर्योदय घडवून आणला. मांडव्याच्या शापामुळे मृत झालेला कौशिक पुन: जिवंत झाला. अनसूयेवर सर्व देव प्रसन्न झाले आणि त्यानी तिला आशीर्वाद दिला, 'तुझ्या पोटी तीन देव जन्म घेतील.' मार्कंडेय पुराणातही अशीच कथा आहे.

आणखी एक लोकप्रिय बनलेली कथा अशी की, एकदा नारदाने अनसूयेच्या सतीत्वाचा गौरव उमा, रमा, सावित्री यांच्याजवळ केला. या तिघीनी अनसूयेचे माहात्म्य ऐकून मत्सर उत्पन्न झाला. त्यांनी आपल्या पतींना म्हणजे

महेश, विष्णू व ब्रह्मदेव यांना अतिथिरूपांत अनसूयेचे सत्त्वहरण करण्यासाठी अत्रीच्या आश्रमात पाठविले. तीनही देव अत्रिआश्रमात आले. त्या वेळी अ‍त्री ऋषी आश्रमात नव्हते. अनसूयेने मनोभावे अतिथींचे स्वागत केले; आणि त्यांच्यासाठी भोजनाची सिद्धता केली. परंतु भोजनाच्या वेळी तीन देवांनी एक अट घातली; ते म्हणाले, 'तू विवस्त्र होऊन आम्हांस भोजन घालशील तर आम्ही तृप्त होऊ.' अनसूयेस गृहस्थधर्म पाळावयाचा होता. तिने पतीचे स्मरण करून होकार दिला व त्यांच्यावर आपल्या पतीच्या चरणांचे तीर्थ टाकले. त्या क्षणी ते तीनही देव बालकरूपांनी आश्रमात दिसू लागले. अनसूयामातेने विवस्त्र होऊन मातृत्वाच्या भूमिकेतून ममतेने त्यांना भरविले. जगताची निर्मिती, पालन, विनाश करणारे तीनही देव बालरूपांनी अत्रीच्या घरी अडकून पडले. इकडे उमा, रमा व सावित्री आपापल्या पतीची वाट पाहून दमल्या. पतिशोधार्थ त्या तिघीजणी अत्रीच्या आश्रमात आल्या. आपल्या सतीत्वाच्या प्रभावाने अनसूयेने आपल्या पतींना लहान बालके करून सोडले असल्याचे त्यांच्या ध्यानात आले. त्यांची दु:खित व दीन अवस्था पाहून अनसूयेने तीनही देवांना पूर्ववत रूप दिले. अनसूयेच्या सत्त्वसाक्षात्काराने संतुष्ट बनलेल्या देवांनी तिच्या इच्छेनुरूप तिच्या पोटी येण्याचे मान्य केले. योग्य वेळी अनसूयेला विष्णूच्या अंशाने दत्त, शिवाच्या अंशाने दुर्वास व ब्रह्मदेवाच्या अंशाने सोम (चंद्र) असे तीन पुत्र झाले.

विविध पुराणांतून आलेल्या कथांचा जो सारांश वर दिलेला आहे, त्यांपैकी शेवटच्या कथेचा अनुवाद सर्वत्र झालेला दिसतो. प्राकृत भाषेत दत्तात्रेयांच्या जन्मकथेवर जी अनेक आख्याने झाली, जन्मगीते झाली, पाळणे झाले, त्या सर्वांवर वरील कथेचाच मोठा प्रभाव दिसतो. नग्न होऊन भोजन वाढण्याची कल्पना भागवत वा मार्कंडेय पुराणांतून नाही. परंतु नंतरच्या काळात सांप्रदायिकांच्या प्राकृत ग्रंथांतून या कथेलाच महत्त्व मिळालेले दिसते. भविष्यपुराणात तर या विकृत मागणीनंतर आणखी विकृत आचारांचा निर्देश आहे. तीन देवांची ही विचित्र मागणी पाहून सती अनसूयेने त्यांना शाप दिला. या शापामुळे विष्णूचे चरण, महादेवाचे लिंग व ब्रह्मदेवाचे शिर यांची पूजा होत राहिली. नग्न होऊन भोजन वाढण्याचेही अर्थ लोकांनी बसविले. कोणी असे सांगितले की, अनसूयेचे सत्त्वहरण करण्यासाठी हे तीन देव आले होते, तेव्हा साध्वी व पतिव्रता अनसूयेचे सत्त्वहरण करण्याचा सर्वांत चांगला मार्ग म्हणजे तिला विवस्त्र होऊन वाढायला सांगणे. तीन देवांना सर्वांत प्रभावी असा हा मार्ग वाटला. लज्जा, मर्यादा या विकारांचा त्याग घडल्याशिवाय देव पोटी कसे येतील? असाही मुद्दा कोणी उपस्थित केला. कोणी 'देवचरित्र अगम्य? गहन। प्रत्यक्ष प्रमाण व अनुमान। संशय कुतर्क विकल्प त्यजून। करावें श्रवण आदरें॥' (गुरुलीलामृतकार वामनबोवा) असा अर्थ लाविला.

याप्रमाणे दत्तात्रेयांच्या जन्मकथेचा अर्थ अनेकांनी लावण्याचा प्रयत्न केला आहे. आध्यात्मिक अर्थाची एक मनोरम दिशा पाहाण्यासारखी आहे. ब्रह्मा, विष्णू व महेश हे तीन देव समर्थ खरे. सर्व ऐश्वर्यांचा भोग घेणारे. सृष्टीचा व्याप सांभाळणारे. परंतु मनात तिघेही कोठे तरी अस्वस्थ होते. कोणालाही समाधान नव्हते. सावित्री, रमा, उमा यांचा सहवासही अपुरा वाटावा इतकी बेचैनी. आईच्या प्रेमाचा, वात्सल्याचा अनुभव त्यांना नव्हता. त्यासाठी ते आसुसले होते. सती अनसूयेएवढी थोर पतिव्रता माता म्हणून लाभली तर? या एका प्रश्नाने ते अधीर बनले. वात्सल्याच्या सुखाचा अनुभव घेण्यासाठी ते वेडावले. याच कल्पनेच्या विस्तारा-

साठी पनवेलच्या स. कृ. फडके या थोर दत्तो-पासकाच्या चिरंजीवांनी, गो. स. फडके यांनी दत्तजन्मावर एक नाटक लिहिले. 'ब्रह्म कैसें वेडावलें । निर्गुण होते सगुण आलें ॥ घेऊनि वसुदेवें गोकुळि नेलें । यशोदेनें पाळलें ॥' या एक-नाथाच्या अभंगापासून प्रेरणा घेऊन त्यांनी सन १९५८ मध्ये दत्तजयंतीस 'दत्तावतार' नावाचे एक अभिनव नाटक प्रसिद्ध केले. वात्सल्याच्या अनुभूतीसाठी जन्म घेणे आणि मातेच्या दुधावर पुष्ट होऊन जगदोद्धार करणे याची श्रेष्ठ देवा-नाही भूक होती. ब्रह्मा-विष्णू महेश यासाठी बालक बनले; हे दूध पिऊन संतुष्ट झाले, अनसूयामाता पाजून संतुष्ट झाली.

# श्रीगुरुचरित्रात दत्तकथा

दत्तपंथीयांना प्रमाणभूत वाटणारा मराठी ग्रंथ म्हणजे 'श्रीगुरुचरित्र' होय. या आधीच्या महानुभावांच्या 'सह्याद्रिवर्णन,' 'दत्तात्रयबाळ-क्रीडा' इत्यादी ग्रंथांचा निर्देश पुढे सांप्रदायिक ग्रंथांचा विचार करताना आलेला आहे. आज दत्तपंथावर सर्वांत मोठा प्रभाव श्रीगुरुचरित्राचा असल्याने त्यातील चौथ्या अध्यायात आलेल्या दत्तकथेचा थोडक्यात परिचय करून घेऊ. प्रथमच सृष्टिउत्पत्तीपासून ग्रंथकर्त्याने अत्री ऋषीची पूर्वपीठिका सांगितली आहे. ब्रह्मदेवाने आपल्या मनस्तत्त्वापासून जे सात पुत्र निर्माण केले त्यांत अत्री एक प्रमुख होत. या 'अत्रिऋषीची भार्या । नाम तिचें 'अनसूया' । पतिव्रता शिरोमणिया । जगदंबा तेचि जाण ॥' (४.१२) या रूपवती व गुणवती पतिव्रतेचे कौतुकपूर्ण वर्णन श्रीगुरुचरित्र-कारांनी केले आहे. 'पतिसेवा करी भक्तीसी । मनोवाक्कायकर्मेंसी । अतिथिपूजा महाहर्षी । विमुख नव्हे कवणे काळीं ॥ तिचा आचार देखोनि । सूर्य भीतसे गगनी । उष्ण तिसी लागे म्हणोनि । मंद मंद तपतसे ॥ अग्नि झाला अति भीत । शीतळ असे वर्तत । वायु झाला भयचकित । मंद मंद वर्ततसे ॥ भूमि आपण भिऊनि देखा । नम्र जाहली तिचिया पादुका । शाप देईल म्हणोनि ऐका । समस्त आम्ही भीतसों ॥' (४.१७-२०)

अशा या अनसूयेचा मत्सर इंद्रादी देवाना वाटू लागला. कारण ही आपल्या पातिव्रत्याच्या प्रभावाने स्वर्गाचे ऐश्वर्य घेईल; आपले स्वर्गा-तले स्थान जाईल; अशी त्यांना भीती वाटली. यानंतर अनसूयेचे सत्त्व हरण करण्यासाठी इंद्रादी देवांच्या विनंतीवरून ब्रह्मा, विष्णू व महेश हे तीन देव भिक्षुकांची रूपे घेऊन अत्रीच्या आश्र-मापाशी आले. या वेळी अत्रिऋषी जपतपादी अनुष्ठानासाठी बाहेर गेले होते. 'आपण क्षुधेने व्याकुळ झालो आहोत, तरी त्वरित भोजन घालावे' अशी विनंती या भिक्षुकांनी केली. सती अनसूयेने या तीनही भिक्षुकांचे मनापासून स्वागत केले. नमन करून 'बैसकार करूनिया । क्षालन केले चरण त्यांचे ॥ अर्घ्य पाद्य देऊनि त्यांसी । गंधाक्षता पुष्पेंसीं । सवेंचि म्हणतसे हर्षी । आरोगण सारिजे ॥' (४.३१-३२) यावर हे तीन भिक्षुक म्हणाले, 'करोनि आलों आपण आंघोळी।' अनसूयेने त्वरित स्वयंपाकाची सिद्धता केली. त्यांना पाटावर बसविले. तिचे सत्त्व घेण्यासाठी आलेले हे तीन भिक्षुक तिला म्हणाले, 'देखोनि तुझें रूप सुंदरी । अभीष्ट मानसी आणिक वसे ॥ नग्न होऊनि आम्हांसी । अन्न वाढावे परियेसी ॥' (४.३६-३७)

अतिथींची ही विचित्र मागणी ऐकताच पति-व्रता अनसूया चिंतनात पडली. अतिथी विन्मुख जाता कामा नयेत. 'माझें मन असे निर्मळ । काय करील मन्मथ खळ । पतीचें असे जरी तप-फळ । तारील मज म्हणतसे ॥' (४.४०) अशी खात्री तिला असल्याने तिने त्यांची मागणी कबूल केली. 'पाकस्थानी जाऊनि आपण । चिंतन करी पतीचे चरण । वस्त्रें फेडूनि झाली नग्न । म्हणे अतिथी वाळें माझी ॥' (४२) नग्न

होऊन अनसूया वाढावयास येऊन पाहाते तो, खरोखरच ' तंव तेचि जाहली बाळका । ठायीं पुढें लोळती ।।' (४३) सती अनसूयेसही वात्सल्य दाटून आले. ' कडे घेऊनि बाळकांसी । स्तनपान देतसे हर्षी । एका सोडोनि एकासी । निवारण करी क्षुधेचें ।।' (४६) सर्व विश्वाचे स्वामी असे हे देव, पण ' त्यांची क्षुधा निवारण । पतिव्रता-स्तनपानमात्रे ।।' (४८) तीनही बालके पिऊन तृप्त झाल्यानंतर अनसूया मातेने त्याना पाळ-ण्यात घालून अंगाई गीते गायला सुरुवात केली. एवढ्यात अत्री ऋषी आश्रमात आले. त्यांना नमस्कार करून सर्व वृत्तान्त अनसूयेने सांगितला.

अनसूयेच्या पतिव्रत्याचा प्रभाव पाहून अत्रीही संतुष्ट झाले. त्यांनी तिला वर मागण्यास सांगि-तल्यावर ती म्हणाली, ' तिघे बाळक आमच्या घरी । रहावे-आमुच्या पुत्रापरी । हेचि मागणें निर्धारीं । त्रिमूर्ति असावें एकरूप ।। ' ( ६१ ) याप्रमाणे ही तीनही बालके आश्रमात राहिली. ' ब्रह्मामूर्ती ' चंद्र ' झाला । विष्णुमूर्ति ' दत्त ' केवळा । ईश्वरातें ' दुर्वास ' नाम ठेविले । तिघे पुत्र अनसूयेचे ।। ' यानंतर दुर्वास व चंद्र यानी निजस्थानास जाण्यासाठी मातेजवळ निरोप मागितला. ' तिसरा दत्त विष्णुमूर्ति । असेल तुम्हांते धरोनि चित्ती । त्रिमूर्ती निश्चित म्हणोनि सागती । हें मनी धरावें तुम्ही ।। त्रयमूर्ति तोचि जाण दत्त । ' सर्वं विष्णुमयं जगत् ।' राहील धरोनि तुमचें चित्त । श्रीविष्णुमूर्ति दत्तात्रेय ।।' (६८–६९) याप्रमाणे विष्णुस्वरूप दत्तात्रेय ' त्रयमूर्ति ऐक्य होऊन ' अत्रिऋषीच्या आश्रमात राहिला. यानंतर याच विष्णुरूप दत्तात्रेयाचे अवतार मागे कसे झाले व पुढे कसे झाले याचे निरूपण पुढील अध्यायात आले आहे. कलि-युगातील पहिला दत्तावतार म्हणजे श्रीपाद-वल्लभाचा असून त्यांचीही चरित्रकथा आपण विस्ताराने पुढे पाहाणार आहोत.

# दत्तप्रबोधात दत्तकथा

अनंतसुत कावडीबाबा यांच्या 'श्रीदत्तप्रबोध' या ग्रंथात दत्तात्रेयांची चरित्रकथा आणखी विस्ताराने आलेली आहे. पहिल्या पंधरा अध्या-यांत दत्तात्रेयांची जन्मकथा सविस्तर सागून पुढे अनसूया, यदु, सहस्रार्जुन, परशुराम, गोरक्षनाथ इत्यादींना दत्तांनी केलेल्या बोधाचे वर्णन कावडीबावांनी केले आहे. जनार्दनपंत, एकनाथ, दासोपंत, निंबराज इत्यादी भक्तांवर दत्तात्रेयांनी कृपा कशी केली याचेही निवेदन ग्रंथकर्त्याने रसाळपणे केले आहे. गुणरूपातीत असा जो अनंत परमात्मा त्याच्यापासून चतुरानन ब्रह्मा व त्यापासून अत्री ' तो योगेश्वर अत्रिमुनी । अनसूया नामें त्याची पत्नी । ते पतिव्रता लावण्यखाणी । सदाचरण सुशीला ।।' (२. ६३) या अनसूयेचे वर्णन अनंतसुतांनी मोठ्या आदराने व प्रेमाने केले आहे. ' कार्येषु मंत्री वचनेषु दासी ' अशी अनसूया कशी होती हे कवीने विस्ताराने सांगितले आहे. प्राचीन काळातील आर्य पाति-व्रत्याचा एक आदर्शच या अध्यायात उभा राहिलेला आहे. ' कांता असावी सुशीळ । धर्मा-नुकुल वृत्ती सुढाळ । मोटी नसेचि कदा मळ । अति निर्मळ गंगावत ती ।।' (२.१२८) अशा-सारख्या अनेक सुरस व अर्थवाही ओव्या कावडी-बाबा सहजपणे लिहून जातात. श्रीयाळचांगुणाची लोकप्रिय कथाही पतिव्रतेच्या माहात्म्यासाठी येथे आली आहे.

अशा पतिव्रतेच्या सहवासात अत्रीचा संसार सुरू होता. ' सिंहाद्रीतळी विराजित । आश्रम शोभत अत्रीचा ' अशा या सुरम्य आश्रमात एकदा नारदाने या सौख्याचा आनंद लुटला. त्यानंतर तो ब्रह्मभुवनात गेला. त्याने पृथ्वी-लोकाचे सविस्तर वर्णन केले. अत्रीच्या निर्लोभ व निर्विकार वृत्तीचे वर्णन करून न।
' तेवीच त्याची कांता । अनसूया

ती तुमची स्नुषा समर्था। तिची साम्यता नये कोण्हा ॥' (५७) नारदाचे हे गुणवर्णन ऐकताच सावित्रीच्या मनात मत्सर व क्रोध निर्माण झाला. नारदाने आणखी कळ लाविली. 'उमा लक्ष्मी तूही। दासी तीतें साजाल॥' (६४) मग काय विचारता? सावित्री 'क्रोधें कापतसे थरथरा। दात खावोनि करकरा। शाप उच्चारा करू पाहे।।' (६५) अशीच अवस्था कैलासात आणि वैकुंठात झाली. उमा, रमा व सावित्री मत्सराने बिथरून गेल्या. 'सकल मेल्या काय पतिव्रता। एक उरली अनसूयाचि आता?' असा प्रश्न लक्ष्मीने नारदास केला. 'कानामागोनि आली। तेचि केवी तिखट जाली' म्हणून लक्ष्मी कष्टी झाली. त्यानतर सावित्री, गौरी व लक्ष्मी या एकत्र भेटल्या असताना त्यानी अनसूयेचें सत्त्वहरण करण्याची योजना पक्की केली. स्त्रीहट्ट प्रमाण मानून ब्रह्मा, विष्णू व महेश यानी सत्त्वहरणाचा निश्चय केला. 'अत्रि नसता मदिरी। द्विजरूपें प्रगटोनि द्वारी। नग्न भिक्षेते अवसरी। अति सत्वर मागावी॥' (३.४५) हा त्याचा विचार ठरला.

त्यानंतर विप्रवेष धारण करून हे तीनही देव पृथ्वीवरील सह्याद्रितळी असलेल्या अत्रिऋषींच्या आश्रमात आले अत्री तपासाठी बाहेर गेले होते. जाताना त्यानी पत्नीस सागितले, 'माझे चरणोदकें करून। ठेवी कमडलू भरून। तुज सकट वोढवता दारुण। करी सिंचन कार्य होम॥' (४ ९६) अत्री घरी नाही असे पाहून हे तीन देव विप्रवेषात तिच्या दारी आले आणि म्हणाले, 'माते, आम्ही तिघे ब्राह्मण। अति क्षुधेनें पीडिलो जाण। नग्न भिक्षा घाली भोजन॥ उदार पूर्ण तू होसी॥' (४. १०१) हे ब्राह्मण असे विपरीत मागणे काय मागतात, असे अनसूयेच्या मनात आलें. बरें, याना तसेच विन्मुख करून पाठवावे तर तेंही योग्य नव्हते. मग तिने पतीच्या सागण्याप्रमाणे केले 'पतिचरणतीर्थें करून। अक्षयीपात्र भरित पूर्ण। तें आदरें करी घेऊन। करी सिंचन तिघांवरी॥ उदक सिंचिताचि तत्काळ। तिन्ही मूर्ति झाल्या बाळ। सुहास्य वदन कोमळ। करिती कोल्हाळ क्षुधेनें' (४. ११२–१३) या तीन बालकाना पाहून अनसूयेसही पान्हा फुटला. याची नग्नभिक्षेची आवड पुरविण्यासाठी ती नग्न झाली आणि 'अतृप्त ते तृप्तपर्यंत। आडवे घेवोनिया पाजित। क्षुधानळ करविला शात। मतोपभरित तिघेंहि' (४. ११६) त्या बाळाना मग तिने पायावर घेऊन न्हाऊमाखू घातले 'स्ववस्त्रें तेव्हा आग पुसी। वेगीं फुकिले कर्णासी' हा बारकावाही कावडीबावानी दिला आहे ही तीन बाळे कशी होती? 'एक असे तो श्यामसुंदर। एक गौरवर्ण तो सुकुमार। एक दिसे कर्पूरगौर। नाटकी प्रियकर दीसती॥' (४. १२०) अनसूयेने त्याना अंगाईगीत गाऊन झोपविले.

काही वेळाने अत्रिऋषी परत आश्रमात आले. त्याना सर्व वृत्तान्त समजला. 'बाळकाची पाहता मुखें। ऋषि आनवला परम सुखें। म्हणे धन्य ईश्वराची कौतुकें। अलौकिकें दावितो॥' (४ १६१) आपल्या पत्नीचे भाग्य वर्णन करून अत्री म्हणतात, 'गौर तो हा कमळासन। कर्पूरगौर ते उमारमण। श्यामागी तो नारायण। पृथक् त्रिगुण बाळ झाले॥ तुझे हेतु पुरवावया। त्रिमूर्तीस आली दया। बाळरूप धरोनिया। केली छाया कृपेची॥' (४ १६४-६५) नारदानीही अत्रिऋषींच्या आश्रमात येऊन मागील सर्व वृत्तान्त सागितला तिकडे उमा, रमा, सावित्री आपल्या पतीविना कष्टी झाल्या. नारदानेच त्याच्याकरता त्याच्या पतीचा शोध घेतला. त्यानी सिंहाचलावर येऊन आपल्या भ्रताराचे दर्शन घेतले अनसूयेची महती त्याना पटली. त्याना त्याचे पती परत मिळाले. या तीन देवानीही अनसूयेची स्तुती केली. तिला आशीर्वाद देऊन तीन देव निघाले तेव्हा 'अनसूयेचे अतरी।

किंचित् उठली खेद लहरी ॥' (७ ८१) कारण, तिला आता आश्रम परत रिकामा पाहावा लागणार अनसूयेची व्यथा देवानी जाणली आणि ते तिला म्हणाले, 'तुझें केले पयपान । ते अमृताहूनी गोड गहन । तेथें गुंतले आमुचे मन । पुढती सेवन करू ते ॥ यासाठी मी शंकर । तुझिये पोटी धरितो अवतार । दुर्वासनामें करी गजर । हा अभयवर घे माझा ॥' (७ ११९) याप्रमाणे ब्रह्मा व विष्णू यानीही तिला वर दिला

अनसूया पतिचरणावर निष्ठा ठेवून वागत असताना गर्भवती झाली तिचे तेज वाढू लागले योग्य समय येताच शंकरानी अनसूयेच्या पोटी जन्म घेतला त्या बाळाचे नाव दुर्वास ठेवण्यात आले त्यानतर अनसूयेच्या पोटी विष्णू व ब्रह्मदेव यानीही अवतार घेतले दत्त, चद्र अशी नावे त्याना मिळाली या तीनही बालकाच्या अतिशय मनोरम अशा लीला कावडीबावानी अकराव्या अध्यायात वर्णन केल्या आहेत त्याना योग्य प्रकारची शिकवणूक अनसूयामातेने दिली आणि मुले वयात येताच ती म्हणाली, 'तरी आता तीर्थमिषें करून । करा अनन्यासी पावन । जगतीच करावया उद्धरण । अवतार पूर्ण तुमचे ॥ ' ( ११ २३४ ) यानतर ही तीनही बालके तीर्थमार्गासाठी व जगाच्या उद्धारासाठी बाहेर पडतात त्याना मातेचा आशीर्वाद मिळतो एकमेकानीं एकमेकास कसे साभाळावे हे सागताना अनसूया म्हणते, 'दुर्वासा ' ज्येष्ठ तू साभाळी राजसा । अतिक्रमणी मानसा । दुःख सहसा न द्यावे ॥ तेवींची माय वदे दत्तासी । त्रिगुणातीता सुज्ञ होसी । साभाळी श्रेष्ठा ज्येष्ठपदासी । सुख दे चद्रासी बाळका ॥ सवेचि वदे त्या इदूते । सुकुमारा ऐके वचनाते । मावे सेवुनी राहे उभयाते । शिरीं या आज्ञेते वदिजे ॥' (१२ ५० ५२) यानतर या त्रिमूर्तीनी काशी, प्रयाग, गया, जगन्नाथ, रामेश्वर, गोकर्ण, शिवकाची, विष्णुकाची, पढरी, तुळजापूर, कोल्हापूर, महाबळेश्वर, माहुली, सप्तशृगी, त्र्यबकेश्वर, पुष्कर, इत्यादी सर्व तीर्थाच्या यात्रा करून त्रिमूर्ती परत अत्रिऋषीच्या आश्रमात आल्या या तेजोराशीना पाहून सर्वांनाच अतिशय आनद झाला

आपल्या या गोजिऱ्या मुलानी आता लग्न करावे, वशविस्तार करावा असे माता अनसूयेस आणि अत्रीस वाटू लागले परंतु दत्त व दुर्वास यानी विवाहास विरोध दर्शवून तत्त्वबोधाचा उपदेश मातेस केला स्नानादी कर्मे करून ही तीनही मुले ध्यानस्थ बसलेली असताना अत्री व अनसूया याना ब्रह्मा, विष्णू व महेश याची दर्शने झाली मातापित्यास आपल्या स्वरूपाचा बोध देता देता ' गृहस्थाश्रम दीजे चद्रासी । सतति पावेल वृद्धीसी ' अशी विनती दोघानी केली 'हे प्रत्यक्ष हरिहर । त्रिगुणात्मके धरिला अवतार । नासावया तिमिराध कार । जगोद्धार करावया॥' ( १६ १०७ ) याची खात्री अनसूयेस पटली. तिघेही नित्य भ्रमण करून लोकाचा पापताप दूर करण्याचे कार्य करू लागले दत्तात्रेयानी आपल्या मातेला केलेला तत्त्वबोध कावडीबावानी पुढील अध्यायात विवरून सागितला आहे यानतर यदू, सहस्रार्जुन, परशुराम इत्यादींना केलेला बोधही पुढे पस्तिसाव्या व छत्तिसाव्या अध्यायापर्यंत आला आहे मत्स्येन्द्र, गोरक्ष, भर्तृहरी, इत्यादी नाथपथीयाशी आलेला दत्तात्रेयाचा सबध प्रसिद्धच आहे कावडीबावानी या प्रकारे दत्तात्रेयाची चरित्रकथा साठएकसष्ट अध्यायात अति विस्ताराने परंतु रसाळपणे वर्णन केली आहे

## 'दत्तमाहात्म्या'त दत्तकथा

आधुनिक काळातील थोर दत्तावतारी श्रीवासुदेवानद सरस्वती यानीही आपल्या 'श्रीदत्तमाहात्म्य' या ग्रथात श्रीदत्तात्रेयाचे बोधचरित्र

झालेला वि. गो. नातू याचा 'श्रीदत्तचरित्रसार' हा एक ग्रथ. याचा परिचय पुढे आपण करून घेणार असलो तरी येथे दत्तचरित्रापुरता सक्षेपाने विचार करू. या ग्रथाच्या पहिल्या तीनचार अध्यायातील दत्तकथा इतर साप्रदायिक ग्रथाप्रमाणेच आहे. पहिल्या अध्यायात देवतानमन, सद्गुरुप्रार्थना इत्यादी विषय झाल्यानतर दुसऱ्या अध्यायात सृष्टीची उत्पत्ती, अत्रीची तपश्चर्या, दत्तदर्शन, अनसूयासत्वहरण, नैर्मृतिजन्म इत्यादी विषय आले आहेत. जन्ममरणाचा फेरा ज्याला नाही असे चैतन्यमय ब्रह्म सर्वव्यापी होते. मायेमुळे हे ब्रह्म कार्यरत होऊन ब्रह्माड तयार झाले. वटपत्रावर ते अहकाररूपाने नटले. क्षीरसागरात मुकुद शोभू लागला. या बालमुकुदापासून विधाता म्हणजे ब्रह्मदेव, सत्वापासून रजोगुण निर्माण झाला. विष्णुनाभिकमलपुत्राने वेदाची रचना केली. विधिललाटातून जो कोप प्रकटला तो रुद्र वा शिव होय. विधात्याला मरीची, अगिरस, अत्री, भृगू, पुलस्त्य इत्यादी मानसपुत्र झाले. त्यातीलच एक कर्दम असून त्याने स्वायभुवकन्या देवहूतीस वरले. 'त्याची कन्या अनसूया। ऋषि अत्रीची होत जाया ।। '

ही अनसूया परम उदार व मत्सरविरहित होती. अत्री ऋषीही ब्रह्मदेवतपपुतळा असल्यामुळे केवळ ऐहिक सुखावर त्याची दृष्टी नव्हती. 'सर्व जनासी सौख्य व्हावे । जीवा मोक्षसुख लाभावे । ज्ञानपटल नासावे । प्रवृत्तिमार्गी राहुनी ।। ऐहिक सुख मिळावे । परमतत्त्व जोडावे । उभय मार्ग साधावे । ऐसे पाहिजे मिळविले ।। ' (३.२१–२२) असा कार्यभाग साधणारा आपणास पुत्र व्हावा म्हणून अत्री ऋषी ऋक्षकुल पर्वतावर अनसूयेसहित तप करू लागले. अत्रीच्या या तपश्चर्येने देव सतुष्ट झाले, 'विश्वकार्यास कारण। सत्त्व रज तम त्रिगुण । ' असल्याने 'विष्णु विधि उमारमण । ऋषिसमोर ठाकले ।। ' (२.२९) अत्री ऋषींनी डोळे उघडून पाहिले, तो त्याना तीन देव दिसले. त्यानी त्या तीन देवाची प्रेमभराने स्तुती करताना म्हटले, 'अचित्य अनत अतर्क्य धन्य । अद्वितीय देवा तुम्ही ।। प्रेमवश तुमची गाठ । हरूनिया भक्तसकट । जगत्कारणा देवा नीट । दाविता वाट सत्यमया ।। सर्वत्र आपण दिसता । तुम्हावीण काहीच नसता । मोह होई आमुच्या चित्ता । तव मायेचे हे पटल ।। परतु जे स्मरती तुम्हा । त्यासी प्रसन्न ठेविता प्रेमा । अशा तुम्हा देण्या उपमा । शोधिता मला न सापडे ।। ' (३.३१–३४) यावर देवानी प्रसन्न होऊन सागितले, 'ज्यासी तू नित्य प्राथिसी । त्या जगत्कारणरूपासी । आम्ही असतो गुणभेदें ।। योग्य पुत्र द्यावा तुजसी । म्हणूनि आलो या ठायासी । जसा कुमर तू वाछिसी । तसेच आम्ही एकरूप ।। ' (२.३८–३९) एवढे म्हणून देव अतर्धान पावले व अत्रीच्या पुढे 'प्रसन्न चतुर्भज दत्त ठाकले.' आम्ही आपणच अशभूत होऊन तुमच्या पोटी येऊ असा आशीर्वाद त्यानी अत्री ऋषींना दिला.

अत्रि–अनसूया सतोषून परत आपल्या आश्रमात आले. त्याची खात्री झाली की, "देवाचा अवतार मूळ । चतुर्भुज दत्त प्रेमळ ।। भक्ताचा अक्षय साभाळ । करी त्यासी न वर्णवे ।। प्रभु नाना वेष घेती । त्याना भावे जे जे भजती । त्या त्या भक्ता सदा रक्षिती । श्रीगुरुदत्त प्रेमभरे ।। असता ते स्वरूपी मग्न । लोकास तारण्या लागून । नानापरी वेष घेऊन । शोधिती भक्तगणाला ।। त्या प्रभुसम प्रेमळ । कोणी कोठे नसे दयाळ । अनुभव जाणे भक्तमेळ । सर्वदाही सत्यपणे ।। " (२.४४–४७) अत्री ऋषी आपल्या भार्येसह आश्रमात परत आल्यानतर त्याचा ससार पुनः पहिल्याच रीतीने सुरू झाला. 'कोणी अतिथि अभ्यागत । तेथून विमुख न जात । ' अशा या संसाररत अनसूयेचा महिमा नारदानी लक्ष्मी, सावित्री व उमा याना सागितला. त्याना या गोष्टीचा फार राग आला. आपण एवढ्या अस-

ताना ही अनसूया कोण ? असा त्याना गर्व झाला त्यानी अनसूयेचे सत्त्व हरण करण्यासाठी आपापल्या पतीस प्रोत्साहित केले तीनही देव अतिथिवेषाने अत्रींच्या आश्रमात आले अनसूयेने त्याचे स्वागत केले कारण अत्री आश्रमात नव्हते या तीन देवानी तिला इच्छाभोजन मागितले 'तू असशी फार सुदर। वासना मनीं अनिवार। पहावे विवस्त्र शरीर। नग्न वाढी पोटभरी ॥' (२ ६६) अनसूया मनात चकित झाली पती घरात नसताना हे अतिथि आले, याना विन्मुख पाठविणे तर योग्य नव्हे पतिचरणावर दृढ भावना ठेवून तिने त्याची मागणी पूर्ण केली पतीचे तपोबल आपणास तारील अशी भावना मनात धरून ती नग्न झाली व अन्न घेऊन बाहेर आली, तो 'अतिथि तेथें न दिसती। तीन बाळें टाहो फोडिती। स्तनी त्याना धरिता सती। क्षीरही निघें हें नवल ॥' (३ ७४) पतिव्रतेचे स्तनपान करून तीनही देव सतुष्ट झाले

थोड्या वेळाने अत्री ऋषी आश्रमात आल्यावर त्याना सर्व वृत्तात समजला 'पौर्णिमा दुपार मार्गशीर्ष। परमात्मा सम निर्दोष। प्रकटे विश्वास सतोष। वसत फुलला हर्षाने ॥ घडती दैवी चमत्कार। सृष्टि प्रत्यक्ष सुदर। अत्रिआश्रमी समाचार। जिकडे तिकडे शुभचिन्हें ॥' (२ १-८१) अशा वातावरणात अत्रींऋषींनी देवाना विनविले, 'पाळणा रिता नसावा' कारण उमा, रमा, सावित्री आपल्या पतींना नेण्यासाठी आल्या होत्या त्यावर देवानी त्याना आशीर्वाद दिला 'चद्र ब्रह्मा चद्र मडळीं। हर दुर्वास तपोबळी। योगेश विष्णू तुम्हाजवळीं। त्रैमूर्ति दत्त राहील ॥' (२ ९४) असे म्हणून देव अतर्धान पावले या अतर्धान पावणाऱ्या दत्ताचे स्वरूप कसे होते ? 'तीन शिरे व सहा हात। बालसूर्यप्रभा दिसत। माला कमडलु असत। अधःहस्तीं तयाच्या ॥ त्रिशूळ डमरू मध्य करीं। शख चक्र वरच्या करी। सस्मित बाळ अधरावरी। मुकुट तेजस्वी मस्तकी ॥ अगरखा अगी हिरवा। जरीकाठी शोभे बरवा। ऋषिमुनी सिद्ध मेळावा। जटाधारी सगे असे ॥ चार वेद श्वान बाजूस। कामधेनूचा निकट वास। मनोहर दत्त भक्तास। स्वयप्रकाश मुद्रें दावी ॥' (२ ९६-९९)

'श्रीदत्तचरित्रसार' कर्त्यांनी पुढल्या अध्यायात कौशिक विप्राची कथा निवेदन केली आहे या प्रसगी सती अनसूयेचा प्रभाव पाहून देव सतुष्ट झाले त्यानी आशीर्वाद दिला अनसूयेने देव पुत्ररूपाने यावेत असा वर मागितला त्रिगुणात्मक देवाचे ध्यान करीत 'सगर्भ होई अनसूया। तेणे ती फार शोभली। अगी कान्ति दिव्य चढली ॥' (३ ४५-४६) याच अवस्थेत अत्रि अनसूयेस दर्शन देण्यासाठी 'त्रैमूर्ति ऐक्य होऊन। उभे पुढ्यात असतरी ॥' ब्रह्मा, विष्णू व महेश याच्या एकत्रीकरणातून अनिवरद दत्तात्रेयाचा जन्म झाला. 'मार्गशीर्ष उत्तम मास। प्रदोष काळी पौर्णिमेस। वृषभ लग्न तीच रास। बुधवारीं जन्म झाला।' (३ ५१) अत्री ऋषींच्या आश्रमात सनातन ब्रह्माचे रूप वाढू लागले त्याच्या अतर्क्य लीला सुरू झाल्या एकदा दत्त डोहात जाऊन खेळू लागले त्याचे मित्र व ऋषिगण त्याचे एक नवीन रूप पाहू लागले 'आपल्या माडीवर ते घेती। स्वमाया कातारूपाने ॥ मद्यमासही स्वीकारून। बहुत चालविले गायन। अमगळ रूप धरून। परीक्षा घेती दत्तगुरु ॥' (३ ७२-७३) यानतर प्रल्हादादिकाना दत्तानी दिलेल्या उपदेशाचे वर्णन दिले आहे आधुनिक दत्तावताराच्या चरित्रकथाही दत्तचरित्राच्या सदर्भात आल्या आहेत

## दत्तांचे सोळा अवतार

दत्तात्रयाचा आश्रम सिंहाचलावर असून ते स्वेच्छाविहारी व स्मर्तृगामी म्हणजे स्मरण करणाऱ्यास त्वरित भेटणारे आहेत माहूर,

पाचाळेश्वर, कोल्हापूर ही दत्तात्रेयाची विहार-स्थाने प्रसिद्ध आहेत अवतारकार्य पूर्ण करण्यासाठी दत्तात्रेयानी सोळा अवतार घेतल्याचा वृत्तान्त श्रीवासुदेवानद सरस्वतीनी आपल्या 'श्रीदत्तात्रेय षोडशावतार' या ग्रथात विस्ताराने प्रत्येक अवताराच्या जन्मतिथीसह दिलेला आहे. ब्रह्मदेवाचे मानसपुत्र अत्री पुत्रप्राप्तीसाठी पत्नीसह हिमालयात तपश्चर्या करीत होते त्याच्या तपश्चर्येने प्रसन्न होऊन प्रत्यक्ष भगवान कार्तिक शु १५ बुधवारी कृत्तिका नक्षत्र असताना प्रकट झाले त्याचे रूप स्फटिकासारखे होते दत्तात्रेयाचा हा अवतार योगिराज म्हणून प्रसिद्ध आहे पुढे अत्री ऋषीनी ऋक्षपर्वतावरील परमतीर्थावर शभर वर्षे तप केले त्याच्या मस्तकातून उग्र तेज बाहेर पडू लागले त्यामुळे सर्वत्र भीतीचे वातावरण पसरले ब्रह्मा-विष्णु-महेश असे तीनही देव अत्रीच्या पुढे येऊन उभे राहिले त्याना पाहून अत्रीने विचारले, 'मी एकाचेच चिंतन करीत होतो असे असता, तुम्ही तिघे येथे कोण व का आलात ?' त्यानतर तीन देव म्हणाले, 'ज्या एकाचे ध्यान तू करतोस तोच आम्हा तिघात आहे ' असे म्हणून ते गुप्त झाले आणि अत्रीच्या पुढे तप्तसुवर्णकातीप्रमाणे तेजस्वी, हसतमुख व षड्भुज असे रूप प्रकट झाले हा दिवस कार्तिक कृ प्रतिपदा, गुरुवारचा होता हा दत्तावतार अत्रिवरद म्हणून प्रसिद्ध आहे या अत्रिवरदाने अत्री ऋषीना वर मागण्यास सागितले अत्रीने 'तुमच्यासारखा पुत्र असावा' असा वर मागितला त्यावर 'मी तुम्हास वर दिलेला आहे ' म्हणून बालरूपातील आपले स्वरूप त्यानी प्रगट केले. ते दिगबर रूप मदनासारखे सुदर व नीलमण्याप्रमाणे तेजस्वी होते मुख पद्माप्रमाणे व हात चार होते हाच दत्तात्रेयाचा स्वयदत्त असा तिसरा अवतार कार्तिक कृ द्वितीया, शुक्रवार या दिवशी दत्ताचे हे रूप प्रकट झाले याला दत्तात्रेय असेच नाव आहे या मोहक पुत्राप्रमाणे आपणाला औरस पुत्र असावा अशी इच्छा मनात धारण करून अत्री ऋषी पुन तप करू लागले उग्र तपाने त्याच्या शरीरात कालाग्नी प्रकट झाल्यामुळे त्याचा दाह होत राहिला तेव्हा शमनार्थ भगवान अतिशय शीतल अशा रूपाने प्रकट झाले. मार्गशीर्ष शु १५ बुधवार या दिवशी अनसूयेच्या पोटी आलेला हा चौथा अवतार कालाग्निशमन या नावाने प्रसिद्ध आहे

याच वेळी रुद्राचा अश दुर्वास, ब्रह्मदेवाचा अश चद्र व विष्णूचा अश दत्त असे तीनही देव प्रकट झाले कालाग्निशमनाच्या दर्शनास देव, ऋषी, गधर्व इत्यादी जमा झाले होते त्या वेळी दत्तानी आपले बालरूप टाकून योगीजनास प्रिय असे प्रौढ रूप धारण केले त्याना गर्भवास नसला तरी भक्तकामनाप्रीत्यर्थ जो हा प्रौढ अवतार मार्गशीर्ष शु १५ गुरुवार रोजी त्यानी घेतला, तो योगिजनवल्लभ नावाने प्रसिद्ध असून हा दत्ताचा पाचवा अवतार म्हणून ओळखला जातो या अवताराने आपल्या नाना लीला लोकाना दाखविल्या योगिजनवल्लभ कधी ध्यानस्थ असत, कधी शिष्याना उपदेश करीत एकदा त्यानी आपल्या शिष्यवर्गाला अरण्यरूप प्रपचाचे दर्शन घडविले काम हा जबडा पसरलेला सिंह, क्रोध हा रागीट सर्प, मोह हा डोह, अशा रूपकावर लोकाची म्हणावी तशी श्रद्धा बसेना लोकही त्याना सोडीनात तेव्हा त्यानी एकदा गुप्त होण्यासाठी एका सरोवरात बुडी मारली काही शिष्य निराश होऊन निघून गेले पण काही निष्ठावत शिष्य वर्षानुवर्षे तसेच सरोवराकाठी राहिले आपल्या भक्ताच्या ज्ञानाची व भक्तीची कसोटी पाहाण्यासाठी श्रीदत्तात्रेय कोणत्या रूपात प्रकट झाले ? 'एक नग्न स्त्री घेऊन। श्रीदत्त तीरी येऊन। स्वयें नग्न होऊन। क्रीडा करूनि राहिला ॥ स्वाश्रया जो स्वविषया। नारी झाली ती आदिमाया। ता अकी बसोनिया। वाद्यें वाजवोनिया गातसे ॥ तीत करोनिया पान। शक्तीचे उच्छिष्ट घेई आपण।

तिला देई वीर चर्वण । बाळ पाहोनी पळाले ॥' या नग्नक्रीडेचे रहस्य उलगडण्याचा प्रयत्न अनेकानी केला आहे विवेक व श्रद्धा याची कसोटी पाहणारा दत्तात्रेयाचा हा सहावा अवतार पौष शु १५ बुधवार रोजी झाला असून तो लीलाविश्वंभर या नावानें प्रसिद्ध आहे

दत्तगुरु एकदा फिरत फिरत बद्रिकावनात गेले. तेथ त्यानी अनेक सिद्ध पाहिले त्यात काही नग्न, काही मौनी, काही ध्यानस्थ, काही कामक्रोधी असे होते त्याना सन्मार्गास लावावे म्हणून दत्तात्रेयानी कुमाररूप धारण केले योगमुद्रा धारण करून त सिद्धाच्या मेळाव्यात उभे राहिले त्याच्यातील संवाद असा होता

सिद्ध–तू कोण आहेस ?
दत्त–मी अप्रतीत रूप आहे
सिद्ध–तुझा आश्रय कोणता ?
दत्त–मी अनाथ आहे व निराश्रय आहे
सिद्ध–तुझा योग व क्रिया कोणती ?
दत्त–अक्रिय व चित्रयोग
सिद्ध–तुझा गुरु कोण ?
दत्त–गुरु नाही
सिद्ध–मुद्रा कोणती ?
दत्त–मायातीत निरंजनी
सिद्ध–पाहातोस काय ?
दत्त–सर्वत्र दिसते ते
सिद्ध–तुझे ध्येय काय ?
दत्त–ध्यानाच्या अभावाने जे समजायचे ते
सिद्ध–तुझा मार्ग कोणता ?
दत्त–ज्या मार्गाने सुख होईल तो

श्रीदत्तानी अशा उत्तराची व सिद्धीच्या चमत्कारानी त्या सिद्धाचा गर्व दूर केला श्री गुरूनी त्याना योगदीक्षा दिली माघ शु १५ गुरुवार रोजी झालेला हा सिद्धराज नावाचा दत्तात्रेयाचा सातवा अवतार सिद्धीला कामनेची जोड नसावी हे पटविण्यासाठी दत्तानी रूपातीत, गुणातीत, ज्ञानयोगयुक्त असे सहजस्थितीमधील रूप प्रकट केले फाल्गुन शु १० रविवारी प्रकट झालेला हा दत्ताचा आठवा अवतार ज्ञानसागर या नावाने ओळखला जातो आणखी एका प्रसगी सिद्धाना बोध देण्यासाठी चैत्र शु १५ मगळवार रोजी दत्तानी विश्वभराऽवधूत नावाचा नववा अवतार घेतला वैशाख शु १४ बुधवार रोजी दत्तात्रेय अब्राह्मण भिक्षुरूपाने प्रकट झाले त्याचे हे रूप सुवर्णाप्रमाणे कांति-मान व तारुण्यमदाने पूर्ण असे होते त्याच्या अगावर चदनमिश्रित भस्म होते एका हातात भिक्षापात्र व दुसऱ्या हातात दड होता बरोबर एक काळा कुत्रा होता अशा थाटात ते धौल-नामक ब्राह्मणाच्या घरी श्राद्ध असताना पानावर जाऊन एकदम बसले ब्राह्मणास क्रोध आला दोघाच्यात वादविवाद झाला ब्राह्मण रागावून दत्ताना म्हणाला, 'तू वेदाचा अधिकारी नाहीस, तुला वैदिक कसे म्हणावे ?' यावर दत्तानी आपल्या कुत्र्याकरवी चारी वेद म्हणून दाखविले ब्राह्मण चकित झाला व दत्तगुरूना शरण गेला हा भिक्षावेषधारी असा दत्तगुरूचा मायामुक्ता-वधूत नावाचा दहावा अवतार होय याच नावाचा आणखी एक अवतार ज्येष्ठ शु १३ शुक्रवार रोजी प्रकट झाला त्या वेळी त्याचे रूप सावळे व सुदर होते माडीवर एक सुदर स्त्री होती स्त्री-सह मद्य व मास याचे सेवन ते करू लागले, तेव्हा त्याच्या भोवतीचे ब्राह्मण त्याना सोडून गेले तेव्हा मायामुक्तावधूत नावाचा हा अकरावा अवतार स्वत शीच म्हणाला, 'ही स्त्री म्हणजे माया ती दुष्टसगापासून मुक्त करते योगाला अनुकूल व सुखदायक अशी ही आहे '

एकदा देवदानवाच्या घनघोर युद्धात देव पराभूत झाले बृहस्पतीच्या सागण्यावरून दोघे दत्तात्रेयाना शरण गेले त्या वेळी दत्तानी त्याना आषाढ शु १५ शनिवार या दिवशी वरील-प्रमाणेच दर्शन दिले 'नग्न युवती माडीवर ।

घेवोनिया वारवार । चुवन घेई धरोनि कर । प्रेमभर आणोनि ॥ ' परतु अशाही रूपात देवाची भक्ती त्याच्यावर जडली दत्तानी त्याना अभय देऊन युद्धासाठी पाठविले जभासुरादी दानव देवाचा पाठलाग करीत दत्ताश्रमात आले व त्यानी आदिगुरुच्या माडीवरची स्त्रीच पळवून नेली. त्यात त्याचा नाश झाला दत्तात्रेयाचा हा बारावा अवतार आदिगुरू या नावाने प्रसिद्ध आहे

श्रावण शु ८ सोमवार या दिवशी दत्तात्रेय एकवा काळचा आवळीच्या खाली सस्काहीन अशा वेषात प्रकट झाले हा दत्ताचा शिवरूप नावाचा तेरावा अवतार भाद्रपद शु १४ शुक्रवार या दिवशी कृष्ण आवळीच्या मुळाशीच दत्ताचा देवदेवावतार नावाचा चौदावा अवतार प्रकट झाला आश्विन शु १५ बुधवारी यदुराजास श्रीदत्त दिगबर भेटले व त्यानी आपल्या चोवीस गुरूपासून आपण काय काय घेतले याचा त्याला बोध केला दत्ताचा हा पधरावा अवतार दिगबर या नावाने प्रसिद्ध आहे कार्तिक शु १२ बुधवार रोजी इद्रनील मण्याप्रमाणे काती असलेले दत्तात्रेय भक्ताच्या समोर प्रकट झाले हा त्याचा श्यामकमललोचन नावाचा सोळावा अवतार होय दासोपताच्या उपासनापरपरेत या सोळा अवताराचे जन्मोत्सव पाळले जातात दासोपताना दत्ताचा सत्रावा सर्वज्ञावतार मानून त्याचाही जन्मोत्सव पाळण्याची रीत आहे प्रत्येक अवताराच्या जयतीकालानुसार अनुक्रमे १) नारळ २) कदलीफळ ३) इक्षू ४) पचामृत ५) मौक्तिक ६) अन्न ७) पुस्तक ८) मदिर ९) गाय १०) दध्योधन ११) मद्य १२) सुवर्ण १३) उदक १४) ताबूल १५) वस्त्र १६) रौप्य, अशी दाने करण्याचीही प्रथा आहे

## दत्तात्रेयांचे व्यक्तित्व

दत्तात्रेयाच्या चरित्रातील नाना प्रकारच्या कथा पाहिल्यानतर त्याच्या बहुविध व्यक्तित्वाचा प्रत्यय येतो भक्तजनासाठी नाना रूपानी व नाना गुणानी प्रकट होणारा हा अविनाशी दत्तप्रभू सचारी आहे, हे आपण पाहिलेच आहे योग, ज्ञान, सन्यास, भक्ती, वैराग्य याच्या आदर्शभूत आचरणाने मुक्ती व भक्ती याची प्राप्ती सर्वाना श्रीदत्तकृपेने मिळत असल्याचे अनुभव सर्वत्र आहेत पिशाच व अवधूत या रूपातही दत्तात्रेयाची दर्शने अनेकाना झाली आहेत दत्त योगी म्हणून अवधूतस्वरूपाला पतमहाराजानी ' गगनमठीचा योगी ' असे म्हटले आहे अवधूत व दत्तात्रेय याचे साप्रदायिकानी ऐक्य मानले आहे अवधूताची अवस्था ही दत्ताशी एकरूपच आहे खरे पहाता दत्तात्रेय 'अवधूतशिरोमणी 'च आहेत नाथमहाराजानी दत्ताना अवधूत असेच म्हटले आहे. 'तो अवधूत जाण दत्तात्रेया ' असे त्याचे वचन आहे दत्तावधूत हे विश्वगुरू, आदिगुरू म्हणूनही प्रसिद्ध आहेत समदर्शी, महायोगी, योगपती, महामुनी, महाविष्णू, महायोगीश्वर, लोकनाथशान्तात्मा-महाप्रभू इत्यादी नावानी दत्तात्रेयाच्या विविध कार्याचा गौरव केलेला आढळतो श्रीहर्षाने आपल्या नैषधीय चरित्रात दत्तात्रेयाचा उल्लेख 'अनघ ' म्हणून केला असून माघाने 'शिशुपालवधा'त दत्तास ' अविनाशी विग्रह ' व 'सिद्धदेहसपन्न ' असे सबोधून वर्णन केले आहे. गुरुपरपरा नष्ट झाल्यावर वैदिक धर्माचे रक्षण करण्यासाठी भगवान दत्तात्रेयानी अत्री व अनसूया याच्या पोटी जन्म घेतला, असे माघाचे सागणे आहे

महर्षी अत्री याचे पुत्र दान म्हणून जगास मिळाले, म्हणून दत्त आत्रेय दत्तात्रेय बनले 'अत्रेरपत्यमभिकाक्षत आह तुष्टो । दत्तो मयाऽहमिति यद् भगवान् स दत्त ॥'(२ ७,८) असे भागवतात म्हटले आहे भक्तराज प्रल्हाद, राजा आयू, यदुराजा याच्याप्रमाणेच दत्तानी सहस्रार्जुन,परशुराम, अलर्क इत्यादीना उपदेश देऊन कृतार्थ केले स्वत ईश्वरी अवतार असताना सुद्धा साधकजीवनास

आदर्श व्हावा म्हणून अत्री याच्या आदेशानुसार गौतमी वनात दत्तानी दीर्घ तपश्चर्या केली त्याच्या तपश्चर्येचे स्थल आत्मतीर्थ या नावाने प्रसिद्ध आहे ससारी जीवाचा ताप नाहीसा करण्यासाठीच प्रामुख्याने हा अवतार मानला जातो दु खे शेवटपर्यंत राहाणार म्हणून दत्ताचा अवतारही चिरजीव आहे त्याचे स्मरण करताच ते धावत येतात अलादन मुनीनी दत्तात्रेयाचे स्मरण केले व त्याच क्षणी ते त्याच्यासमोर प्रकट झाले पार्वतीचे ज्येष्ठ पुत्र श्रीकार्तिकेय स्वामी यानाही उपदेश दत्तात्रेयाकडून झाला, तो अवधूतगीता या नावाच्या ग्रथात मिळतो विष्णुदत्त, साध्यदेवगण, अलादन ऋषी, पिंगलनाग इत्यादी श्रेष्ठ पुरुषाना दत्तात्रेयाचा कृपाशीर्वाद प्राप्त झाला होता भगवान परशुराम याने दत्तात्रेयाकडून भगवती त्रिपुरसुदरीचे माहात्म्य श्रवण करून उपासनाविधी प्रचारात आणला श्रीदत्तानीच परशुरामास श्रीविद्येचे रहस्य समजावून सागितले सवर्त अवधूतासही हे रहस्य दत्तानीच समजावून दिले होते

'दत्तसहिता' या दत्तप्रणीत ग्रथाचे सार स्वत परशुरामाने सहा हजार सूत्रात काढले होते परशुरामाचे शिष्य सुमेधा (हरितायनऋषी) यानी याचा साराश 'त्रिपुरारहस्य' नावाच्या ग्रथाच्या ज्ञानखडात दिला आहे अवधूतगीता, जीवन्मुक्तगीता, त्रिपुरारहस्य, श्रीगुरुचरित्र, कायबोध, अद्भुतगीता विद्यागीता, दत्तात्रेययोगशास्त्र, दत्तप्रबोध, दत्तमाहात्म्य, दत्तात्रेयचद्रिका, दत्तात्रेयसर्वस्व, श्रीगुरुलीलामृत, योगगीता, दत्तगीता, गुरुगीता इत्यादी साप्रदायिक ग्रथातून दत्तात्रेयाचे कार्य व व्यक्तित्व याची पुष्कळ माहिती मिळते ज्ञानदीप्रबोध, दत्तात्रेयगोरक्षउपनिषद, दत्तगोरक्षकवच, दत्तगोरक्षगीता, अद्वैतश्रुतसार इत्यादी काही प्रसिद्ध व अप्रसिद्ध ग्रथातून दत्तात्रेयाचे माहात्म्य वर्णन केलेले आढळते स्वत च्या दिनचर्येच्या निमित्ताने दत्तात्रेयाचा सचार सर्व भारतभर असतो हे आपण पाहिले आहेच. सौराष्ट्रातील गिरनार पर्वत, राजस्थानमधील अबू, नर्मदातीरावरील अनसूयातीर्थ, गरुडेश्वर, नारेश्वर, म्हैसूरकडील कडूर जिल्ह्यातील 'चद्रदोणगिरी' (बाबा बुडण शाह कलदर याची गुहा), गोमतभात साखळी, त्रिवेंद्रमकडील शुचिन्द्रम्, बादा जिल्ह्यातील चित्रकूट जवळील अनसूया–आश्रम, बद्रीकेदार यात्रेमधील तुगनाथजवळील मडलचट्टी डोगराजवळील अत्रिअनसूया आश्रम, नेपाळमधील भटगाव अथवा भातपुर, आध्रमध्ये कुरुगड्डी, उत्तर प्रदेशात वाराणसी, अशी कित्येक दत्तक्षेत्रे भारतभर विखुरलेली आहेत गाणगापूर, नृसिहवाडी, औदुबर, कोल्हापूर, अक्कलकोट इत्यादी क्षेत्रे दत्तप्रेमी मराठी व कन्नड–तेलुगू लोकाना सारखीच वदनीय आहेत अशा क्षेत्रातून भगवान दत्तात्रेयाचे साक्षात्कार अजूनही होतात श्रीदत्तगुरूचे अवतारकार्य ब्रह्मपुराणात खालीलप्रमाणे सागितले आहे–

भूयो भूतात्मनो विष्णो प्रादुर्भावो महात्मन ।
 दत्तात्रेय इति ख्यात क्षमया परया युत ।।
तेन नष्टेषु वेदेषु प्रक्रियासु मखेषु च ।
 चातुर्वर्ण्ये च सङ्कीर्णे धर्मे शिथिलता गते ।।
अतिवर्धति चाधर्मे सत्ये नष्टेऽनृते स्थिते ।
 प्रजासु शीर्यमाणासु धर्मे चाकुलता गते ।।
सयज्ञा सक्रिया वेदा प्रत्यानीता हि तेन वै ।
 चातुर्वर्ण्यमसङ्कीर्णं कृत तेन महात्मना ।।

अर्थ–जो सर्व भूतमात्राचा अतरात्मा, अशा त्या विष्णूचा दत्तात्रेय नामक क्षमाप्रधान अवतार झाला वेद, कर्मकाड आणि यज्ञप्रक्रिया याचा लोप होऊ लागला असताना, धर्म शिथिल बनून अधर्म वाढला असताना आणि सत्य नष्ट होऊन असत्य स्थिर होत असताना, प्रजा ऱ्हास पावू लागल्या असता आणि धर्म व्याकुळ झाला असता त्याने वेदाना, कर्मकाडाला व यज्ञाना पुन प्रतिष्ठा मिळवून दिली आणि चातुर्वर्ण्याला सुसघटित स्वरूप दिले

(*) (*) (*)

# ३ दोन दत्तावतार

## इस्लामी सत्तेचा प्रारंभ



नरसिंह सरस्वती माझे आई ।। चरणमुळ सदा देई ।। भक्तिप्रेमाविणें कांही ।। न मागे तुज ।।ध्रु।। साधन प्रकार ।। सदा नामाचा गजर ।। अद्वय भजनी तत्पर ।। होऊनी ठेलों ।। १ ।। काय वानू। तूझा महिमा ।। सत्य ज्ञानानंत ब्रह्मा ।। हरुनी द्वैताचा काळीमा ।। नेले पर भुवना ।। २ ।। अभय वचन दिधलें ।। चरणकमली ठेविले ।। प्रेमामृत पाजीलें ।। केले निश्चिन्त ।। ३ ।। अेकानेक द्वंद्व-भाव ।। तुझे स्वरुपी झाले वाव ।। भजन भजक होऊनी देव ।। सहजीं खेळसी ।। ४ ।। कांही नाहीं अुरले वार्ता ।। सर्वी सर्व तूंचि दत्ता ।। तुजवीणें ठाव रीता ।। न दिसे कोठें ।। ५ ।।

— श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रीकर

कलियुगातील दोन प्रसिद्ध दत्तावतार म्हणजे श्रीपादवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती हे होत. श्रीपादवल्लभांचे अवतारकार्य चौदाव्या शतकाच्या पूर्वार्धातील असून त्याचाच पुढला अवतार श्रीनृसिंहसरस्वतींचा मानतात. त्यांचा काळ चौदाव्या शतकाची अखेर व पंधराव्या शतकाचा पूर्वार्ध असा येतो. या जोड अवतारांच्या कर्तृत्वाचा परिचय करून घेण्यापूर्वी तत्कालीन परिस्थितीची तोंडओळख करून घेणे अगत्याचे आहे.

या काळाकडे नजर टाकताना प्रथमच लक्षात येते की, या सुमारास एक नवीनच परकीय अशी राजवट महाराष्ट्रावर स्थिरावलेली दिसत होती. उत्तरेत वर्चस्व गाजविणाऱ्या इस्लामधर्मीयांची पहिली मोठी धाड महाराष्ट्रावर आली ती तेराव्या शतकाच्या अखेरीस. सन १२७१ मध्ये देवगिरीच्या गादीवर रामदेवराव यादव आला,

तेव्हा दिल्लीचे तक्त जलालुद्दीन खिलजी नावाच्या कडव्या पठाणाकडे होते. देवगिरीच्या ऐश्वर्यास भुलून जलालुद्दिनाचा पुतण्या अल्लाउद्दीन खिलजी याने सन १२९४ मध्ये देवगिरीवर स्वारी केली. रामदेवरावाची कसलीच तयारी नसल्याने परकीयांची सरशी झाली. रामदेवरावाचा मुलगा शंकरदेव याच्यावरही मलिक काफूरने स्वारी केली. शंकरदेव सन १३१२ च्या या लढाईत प्राणास मुकला. अल्लाउद्दिनाचा मुलगा मुबारक याने रामदेवरावाचा जावई हरपाळदेव याचा भयानक रीतीने शेवट करून देवगिरीचे राज्य कायमचे मुसलमानी राजवटीस जोडून घेतले. कन्नड, मराठी, तेलुगू व गुजराथी या चार भाषिकांच्या प्रांतावर असणारे देवगिरीचे राज्य चौदाव्या शतकाच्या प्रारंभापासूनच परकीय सत्तेखाली जखडले गेले. तेलगण, द्वारसमुद्र येथील राज्ये जिंकून मलिककाफूरने दक्षिण भारतातही आपली पायले पक्की केली.

इस्लामधर्मीयांचे हे आक्रमण केवळ राजकीय होते असेच नाही. त्यांच्या सत्तेखाली प्रचलित हिंदू धर्माचीही बरीच मोडतोड झाली. देवळे, मठ, लेणी यांचा नायनाट करून या मूर्तिभंजकांनी इस्लामची चिन्हे उभी करण्यास सुरुवात केली. प्रारंभीच्या काळात अनेक देशी राजांनी या परकी आक्रमणास तोंड देण्याचा प्रयत्न केला; पण संघटनेच्या अभावी त्यांना यश आले नाही. सर्व दख्खनवर इस्लामी प्रभाव पडला नाही हे खरे असले, तरी एक विजयानगर व दुसरे पुढे झालेले शिवरायांचे राज्य या दोन अपवादाखेरीज नाव घेण्यासारखी देशी सत्ताही दक्षिणेत नव्हती. जो काही लक्षात येण्याजोगा राजकीय प्रभाव होता, तो मुसलमानांचाच होय. खिलजीच्या नंतर तघलक घराण्यातील ग्यासुद्दीन दिल्लीचा अधिपती बनल्यावर सन १२२३ च्या सुमारास त्यांच्या मुलाने दक्षिणेतील वरंगळवर स्वारी केली. हाच मुलगा मुहंमद तघलक अथवा वेडा मुहंमद म्हणून प्रसिद्ध असून दौलताबादेस राजधानी करण्याचा त्याचा बेत याच सुमारास फसला. या सुमारास मुहंमदाने हमन गंगूस दक्षिणेचा कारभार पाहाण्यास सांगितले. हा दक्षिणचा सुभेदार झाफरखान नावाचा असून पूर्वी गंगू नावाच्या ब्राह्मणाचा गुलाम होता. मुहंमदाचा लहरी व जुलमी कारभार पाहून याने स्वतःस अल्लाउद्दीन बहामनी असे नाव घेऊन गुलबर्गा येथे स्वतंत्र राज्याची स्थापना केली. सन १३४७ साली गुलबर्गा येथे बहामनी अथवा ब्राह्मणी नावाने एक नवे मुसलमानी राज्य निर्माण झाले.

प्रस्थापित मताप्रमाणे कलियुगातील पहिला दत्तावतार सन १३२० ते १३५० च्या काळातला मानला तर बहामनी राज्याची उभारणी श्रीपादवल्लभांनी पाहिली होती हे स्पष्ट आहे. श्रीनृसिंहसरस्वतींचा काळ सन १३७८ ते १४५८ असा मान्य झाल्यास त्यांनीही बहामनी राज्याची चढती कमान अवलोकन केली असावी. पहिला मुहंमद हा फार क्रूर व रक्तपिपासू होता. निरपराधी हिंदूंची कत्तल, स्त्रियांवर अत्याचार, मंदिरांचा विध्वंस अशा प्रकारच्या कृत्यांना ऊत आला होता. विजयनगर व वरंगळ येथील हिंदू राजांशी नित्य कटकटी नेहमी असायच्या. तशात सन १३९६ च्या प्रसिद्ध दुर्गादेवीच्या दुष्काळामुळे लोकांचे फारच हाल झाले. गुलबर्ग्याहून बिदरला राजधानी आल्यावर सन १४२० मध्येही असाच एक मोठा दुष्काळ पडला. अशा प्रकारच्या अस्मानी व सुलतानी संकटात दक्षिणेकडील प्रांत सापडले होते.

या परकीय इस्लामी सत्तेचे परिणाम धार्मिक क्षेत्रातही उमटले. शेकडो मंदिरे व मूर्ती यांचा नाश झाला. धार्मिक कलाकृती विकृत झाल्या. समाजाचे पुढारीपण पत्करणारा ब्राह्मणवर्ग तेजोहीन बनला. परकीय सत्तेची सेवाचाकरी करण्यात त्यांना कमीपणा वाटत नसे. षट्कर्मांचा

लोप होऊन यजन-याजन, अध्ययन-अध्यापन, दान-प्रतिग्रह ही धर्मकृत्ये संपून हिंदुधर्माची अवनती होत गेली. क्षत्रिय राजे दुर्बळ, ब्राह्मण तेजोहीन व परकीय सत्ता जुलमी अशा पार्श्वभूमीवर श्रीपादवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती यांचे कार्य पाहावयाचे आहे. चातुर्वर्ण्यघटित अशा वैदिक धर्माचा पुनरुद्धार करण्याची फार मोठी कामगिरी या दोन दत्तावतारांनी केली आहे; आणि विशेष असा की, हिंदू व मुसलमान, ब्राह्मण व शूद्र, गृहस्थ व संन्यासी अशा सर्वांवरच या तपोनिष्ठांची विलक्षण छाप पडली. त्यांनी स्त्री-पुरुषांना आचारधर्माचा श्रेष्ठ व सोज्ज्वळ मार्ग दाखवून पडत्या काळात समाजास सावरून धरले. दत्तपंथात हिंदुधर्माबरोबरच इस्लामी धर्माचेही धागेदोरे दिसतात, त्याचा संदर्भ आता ध्यानात येईल. अक्कलकोटचे स्वामी समर्थ, हुमणाबादचे श्रीमाणिकप्रभू व शिरडीचे साईबाबा यांच्या अनुयायांतील मुसलमानांची संख्या व गुणवत्ता ध्यानात येण्यासारखीच आहे. अवलिया, पीर, फकीर यानाही हिंदुधर्मीयांनी नंतरच्या काळात मान दिलेला दिसतो. याच सुमारास भारतीय भक्तिसाधनेत व धर्मविचारांत इस्लामी सूफींचा शिरकाव झालेला दिसतो. रबिया, मन्सूर, गझाली, जलालुद्दीन रूमी, शेखसादी, हाफीझ इत्यादी सूफी साधूंचे आचरण एखाद्या योग्याप्रमाणेच होते. भारतीय सूफीत चिस्ती, कादरी, सुहरावर्दी व नक्षबंदी असे चार प्रकार असून ख्वाजा मोईनोद्दीन चिस्ती, सैय्यद महंमद, गौस कादरी, बहाओद्दीन झकारिया अशा काही सूफी साधूंनी प्रथम प्रचार केला.

या सूफींचा प्रचार धार्मिक क्षेत्रातच होता असे नव्हे; अनेकजण राजसत्तेचे हस्तकही होते. राजसत्तेचे पाठबळ असल्याने मंदिरे पाडणे, निरपराध हिंदूंची कत्तल करणे, मूर्ती नष्ट करणे, सक्तीने धर्मान्तर घडविणे इत्यादी कृत्यांत त्यांचा भाग नव्हताच असे म्हणता येणार नाही. अनेक दर्गे, मशिदी सूफींच्या धार्मिक व राजकीय चळवळींचे अड्डे बनले होते.

## श्रीपादवल्लभांचा अवतार

अशा या संघर्षाच्या पार्श्वभूमीवर श्रीपादवल्लभांचा अवतार झाला. श्रीगुरुचरित्राच्या पाचव्या व नवव्या अध्यायात दत्तांच्या या पहिल्या अवताराची हकीकत संक्षेपाने आली आहे. कलियुगातील पहिला दत्तावतार म्हणजे श्रीपादवल्लभ होत अशी सांप्रदायिकांची श्रद्धा आहे. 'तारावया साधु मानुष' व 'दुष्टनिग्रह करावया' परमेश्वर अवतार घेतो असे श्रीगुरुचरित्रही सांगते. 'द्वापर जाउनी जाहला कली। अज्ञान लोक ब्राह्मणकुळी। आचारहीन होऊनि प्रबळीं। वर्तती, महिमा कलियुगी॥ भक्तजनरक्षणार्थ। अवतरला श्रीगुरुनाथ॥' (५.७-८) हा श्रीगुरुनाथ म्हणजे श्रीपादवल्लभ होय. एक उत्तमवंशी ब्राह्मण पूर्वदेशात पीठापूर येथे नांदत असून त्याचे नाव आपळराज असे होते. हे पीठापूर आंध्र राज्यात गोदावरी जिल्ह्यात आहे. आपळराज हा आपस्तंब शाखेचा ब्राह्मण असून त्याची भार्या सुमता नावाची होती. ही मोठी पतिव्रता असून आल्या अतिथीची व अभ्यागताची ती मनोभावे पूजा करी.

अशा या ब्राह्मणाच्या घरी एकदा अमावस्येच्या दिवशी श्राद्ध असताना 'आला दत्त अतिथिवेषी' (५.१३) भर दुपारी ब्राह्मण दारी आल्याचे पाहून या पतिव्रतेने 'न जेविता ब्राह्मण घरी। दत्तात्रेया भिक्षा घाली।' (५.१४) त्यामुळे दत्तात्रेय तिच्यावर प्रसन्न झाले. त्यांनी तिला कोणताही वर मागण्यास सांगितले. दत्तात्रेयाना मनोभावे प्रार्थून ती म्हणाली, 'मज पुत्र झाले बहुत। नव्हती स्थिरजीवित। जे राहिले आता सजीवित। अक्षहीन पादहीन

झाला नाही कोणी। काय करावे मूर्ख प्राणी। असोनि नसती येणे गुणी। पुत्रावीण काय जन्म?॥ व्हावा पुत्र आम्हा ऐसा। ज्ञानवंत परमपुरुषा। जगद्वंद्य देवसदृशा। तुम्हासारिखा मज आता॥' (५ २६–२८)–देवा, दत्तात्रेया, मला अनेक पुत्र झाले, पण त्यातले फार थोडे जगले जे जगले ते आधळे व पागळे झाले अशा पुत्राना घेऊन काय करू? मला तुमच्यासारखाच एक ज्ञानी व जगद्वंद्य होईल असा पुत्र द्यावा–ब्राह्मणीच्या या बोलण्यावर वा मागणीवर खूप होऊन दत्तात्रेय म्हणाले, 'पुत्र होईल तुज तापसी। उद्धरील तुझ्या वशासी। ख्यातिवत कलियुगी ॥' (५.३०) इतके बोलून दत्त अदृश्य झाले सुमताने सर्व वृत्तान्त आपल्या पतीस सागितला पतीलाही याचा आनद झाला दत्तरूपी अतिथीस भिक्षा घातल्यानेच आपले पितर तृप्त झाल्याचे समाधान त्याला मिळाले

कालातराने विप्रस्त्री गरोदर झाली व योग्य वेळ आल्यानतर शुभदिवशी प्रसूत झाली सर्व ब्राह्मणानी या नवजात बालकाची पत्रिका तयार करून हा 'हा तपस्वी होईल बळी। दीक्षाकर्ता जगद्गुरु॥' असे भविष्य वर्तविले (५४४) त्रैमूर्तीनेच भक्तजन तारावया हा अवतार धारण केला असल्याने त्याचे नाव 'श्रीपाद' असे ठेवण्यात आले सातव्या वर्षी या बालकाचे मौजीबधन झाले मुज होताच चारी वेदाचे व मीमासा, तर्क इत्यादी शास्त्राचे अध्ययन त्याने पूर्ण केले आचार, व्यवहार, प्रायश्चित्त, वेदान्तभाष्य यावर त्याचे निरूपण चाले याला सोळावे वर्ष लागले तेव्हा त्याचा विवाह करावा असे घरात ठरते आहेसे पाहून तो म्हणाला, 'कराल विवाह मज तुम्ही। सागेन ऐका, विचारिलें आम्ही। वैराग्य स्त्री असे नेमी। काम्य आमुचे तेथें असे॥ते स्त्रियेवाचूनि आणीक नारी। समस्त जाणा मातेसरी। जरी आणाल ते सुदरी। वरू म्हणती तये वेळी॥' (५५३-५४) श्रीपादाचा विवाह वैराग्य नावाच्या 'स्त्री'शी नक्की ठरलेला होता! आपण आता तापसी, ब्रह्मचारी, श्रियावल्लभ असून तीर्थयात्रेस जाणार असे सागून श्रीपादानी परवानगी मागितली पुत्राचा निश्चय पाहून 'न म्हणावे पुत्र यासी। अवतारपुरुष तापसी। जैसे याचे वसे मानसी। तैसे करावे म्हणती मातापिता॥' (५५९)

श्रीपादानी आपल्या मातेचे सात्वन केले आपल्या करकमळानी तिचे अश्रू पुसले आणि म्हटले, 'अवो माते, न करी चिंता। जें जें वाछिसी ते देईन आता। दृढ करुनिया चित्ता। रहा सुखे नादत॥' (५६३) त्यावर मातोश्री कळवळून म्हणाली, 'वा रे तुज करिता आपण। दुख विसरलें अत करण। रक्षिसी आम्हा म्हातारपणी। दैन्यावेगळे करिसी म्हणोनि॥ पुत्र असती आपणा दोन। पाय पागुळ अक्षहीन। त्याते पोसावे आता कवणे। आमुते कोण रक्षील?' (५६४-६५)–श्रीपादा, तुझ्यावर आम्ही दोघे विसबून होतो घरात हे दोघे पुत्र आधळे-पागळे आहेत त्याना कोण पोसणार? आमचे रक्षण कोण करणार?–आईचे बोलणे होताच श्रीपादानी अमृतनयनानी आपल्या बधूकडे पाहिले, आणि काय नवल? 'पुत्र दोघे जाहले सगुण। आली दृष्टि चरणादिक॥' (५६६) श्रीपादाच्या दृष्टिस्पर्शाने दोघेजण अव्यग झाले आपल्या या बधूना जनक जननीची सेवा करायला सागून मातेचा निरोप घेऊन श्रीपादयती काशीयात्रेस निघाले बदरिकाश्रमादी तीर्थे करून ते दक्षिणेत गोकर्णमहाबळेश्वर येथे आले महाबळेश्वरास तीन वर्षे राहून ते श्रीशैलास गेले तेथें चार महिने राहून ते निवृत्तिसगमावर कृष्णेच्या काठी असणाऱ्या कुरवपूर नावाच्या क्षेत्रस्थानी आले

## 'श्रीपाद राहिले कुरवपुरीं'

समस्त तीर्थे श्रीपादयतीच्या चरणाशी असताना त्यानी तीर्थयात्रा केली ती लोकाना

अनुग्रह देण्यासाठी. कुरवपूर क्षेत्र, महाक्षेत्र म्हणून आधीच प्रसिद्ध होते. त्यांची ख्याती आधीच सर्वत्र पसरली होती. 'जे जन भजती भक्तीसी। सौख्य पावती अप्रयासी। लक्ष्मी कन्यापुत्रेसी। जें जे चिंतिले पावती॥' ( ८.११ ) या क्षेत्रात श्रीपादयतींचा मुक्काम असताना पुढील काळातील सूचना देणाऱ्या दोन महत्त्वाच्या घटना घडल्या, त्या अशा. याच गावात एक वेदशास्त्रसंपन्न असा ब्राह्मण गृहस्थ राहात होता. त्याच्या पत्नीचे नाव अंबिका. ती मोठी पतिसेविका असून आचरणाने सुशील होती. परंतु पूर्वकर्मानुसार एक मोठी उणीव होती. तिची संतती जगत नव्हती. या आपत्तीतून सुटावे म्हणून तिने पुष्कळ व्रते केली, यात्रा केल्या. पण फारसा उपयोग झाला नाही. एक मुलगा कसाबसा जगला, पण तो मंद बुद्धीचा निघाला. त्याला शिक्षण देता देता तो ब्राह्मण मरण पावला.

आपल्या अर्धवट पुत्रासह कशीतरी भिक्षा मागून अंबिका दिवस कठीत होती. पुत्र विवाहयोग्य झाला तरी त्याला कोण मुलगी देणार? जो तो त्याची थट्टा करी. त्यामुळे ती कष्टी माता आणखीनच दुःखी झाली. शेवटी या मायलेकरांनी गंगेच्या कुशीत कायमची विश्रांती घ्यायचे ठरविले. नदीच्या काठावर येतात तो त्यांना श्रीपादयती स्नान करताना दिसले. त्यांच्या चरणावर दोघानी मस्तके ठेविली. गंगेत आपले देह समर्पण करण्याची इच्छा सांगितली. आत्महत्येचा दोष न लागावा अशी विनंती केली. श्रीपादवल्लभानी तिची करुण कहाणी ऐकली. त्याना अतिशय वाईट वाटले. सत्पुत्राच्या प्राप्तीसाठी अनेक प्रकारचे कष्ट करणारी ही माता त्यांना निर्धाराची वाटली. त्यांनी तिला शनिप्रदोषाचे व्रत करण्यास सांगितले.

श्रीपादांनी तिला हे व्रत गवळ्यांनी करून श्रीकृष्णास कसे प्राप्त करून घेतले हेही सांगितले. अंबिकेला अतिशय आनंद झाला. तिचा मूढ पुत्र प्रज्ञावंत व्हावा अशी तिची इच्छा होतीच; परंतु आणखीही एक इच्छा तिच्या मनात होती. 'देवा, आता ऐसे करणे। पुढील जन्मी मनुष्यपणे। पूज्यमान पुत्र पावणे। जैसा तू पूज्य जगत्त्रयासी॥ वासना असे माझ्या मनी। पुत्र व्हावा ब्रह्मज्ञानी। बाळपणीच पाहे नयनी। पूज्यमान समस्तासी॥' (८.४९–५२) अंबिकेचा भाव जाणून श्रीपादयती म्हणाले, 'तुझे मनी असेल जरी। होईल पुत्र मजसरी। संशय साडूनि निर्धारी। शनिप्रदोपी पूजी शंभु॥' (८.१०४) असे म्हणून श्रीपादानी तिच्या मूढ मुलाच्या मस्तकावर हात ठेविला तेव्हा 'ज्ञान जाहले तत्काळेंसी। त्रिवेदी झाला शास्त्रज्ञ॥ वेदशास्त्रादि तर्कभाषा। म्हणता झाला अतिप्रकाशा॥' (८.१०५–०६) पुत्र ज्ञानी झाल्याचे पाहून अंबिकेला अतिशय हर्ष झाला. श्रीपादयतीच्या कृपेने हीच अंबिका पुढे लाड कारंजा येथे अंबाभवानी झाली व तिला एक पुत्र झाला, तोच दत्तात्रेयाचा दुसरा अवतार श्रीनृसिंहसरस्वती होय.

# रजकास वरप्रदान

कुरवपूर येथे श्रीपादवल्लभ असताना आणखी एक महत्त्वाची घटना घडली, ती अशी–येथील एक रजक म्हणजे परीट श्रीपादयतींचा शिष्य झाला होता. नदीत धुणे धुताधुता श्रीपादयती स्नानास आले की तो मनोभावे वंदन करीत असे. नित्य त्रिकाळ साष्टांग दंडवत घालून कायावाचामनेकरून तो त्यांचे पूजन करी. त्यांच्या मठाची झाडझूड करून तो सेवेत लीन झाला होता. एके दिवशी वसंत ऋतूत वैशाख महिन्यात एक म्लेंच्छ राजा आपल्या स्त्रियासहित जलक्रीडेसाठी नदीत उतरला. या राजाचे वैभव त्या रजकाने पाहिले. 'स्त्रियांसहित नावेत आपण। अळंकृत आभरण। क्रीडा करीत स्त्रियांसह आपण। गंगेमधून येतसे॥ सर्व दळ थडियें थडी। अमित हस्ती हस्ती घोडी। मिरवितातो रत्नें कोडी। अळंकृत सेवकजन॥

ऐसा गंगाप्रवाहात । राजा आला खेळत । नाना वाद्यें असे गर्जत । सवे येती थडियेंसी ॥' (९ १६–१८)

राजाचे हे वैभव त्याच्या शृंगारासहित पाहून तो रजक मनात कष्टी झाला आपण फुकट जन्मास आलो, असे ऐश्वर्य आपण कधीच पाहिले नव्हते 'पशुसमान देह आपुला' असे त्याच्या मनाने घतले खरे जिणे या राजाचे याने कोणत्या देवाची आराधना केली ? याने कोणाला गुरू केला, म्हणून याला असे ऐश्वर्य प्राप्त झाले ? या विचाराने कष्टी होऊन त्या रजकाने श्रीपादयतीना नमस्कार केला श्रीपादानी 'वळखली त्याची मनवासना,' आणि त्याला म्हटले, 'जन्मादारभ्य कष्टलासी । वाछा असे भोगावयासी । राज्यपद तमोवृत्ती ॥ निववावी इंद्रिय सकळ । नातरी नव्हे मन निर्मळ । वाधा करिती पुढं कवळ । जन्मान्तरी परियेसी ॥ तुष्टवावया इंद्रियासी । तुवा जन्मावे म्लेच्छवशी । आवडी जाहली तुझे मानसी । राज्य भोगी जाय त्वरित ॥' (९ २८–३०)

## श्रीपाद बैसले निजानंदी

श्रीपादयतीचा आशीर्वाद ऐकून रजकाचे मन सुखदु खाच्या भावनानी उचंबळून आले राजाचे ऐश्वर्य भोगायला मिळणार म्हणून आनंद, आणि श्रीगुरूचा विरह होणार म्हणून दु ख त्याच्या मनाची हीही चिंता जाणून श्रीगुरू म्हणाले, 'वेंदुरानगरी जन्म होसी । भेटी देऊ अतकाळासी । कारण असे आम्हा येणें ॥ भेटी होताचि आम्हासी । ज्ञान होईल तुझे मानसी । न करी चिंता हो, भरवसी । आम्हा येणें घडेल ॥ आणिक कार्याकारणेंसी । अवतार होऊ परियेसी । वेष धरोनि सन्यासी । नाम 'नृसिंहसरस्वती ॥' (९ ३३–३५) श्रीगुरूनी असे आश्वासन दिल्यानतर रजकाने त्याना वदन केले रजकाला वरप्रदान देऊन पुढे या आशीर्वादानुसार श्रीगुरू नृसिंहसरस्वती म्हणून अवतीर्ण झाले व तो रजक पुढे राज्य भोगण्यासाठी विदर येथील नृसिंहभक्त असा मुसलमान राजा बनला

वहामनी सुलतानापैकी वेदरचा दुसरा अल्लाउद्दीन (सन १४३५–५८) हा वादशहा फोड होऊन मरण पावल्याची नोंद असल्याने तोच पूर्वाश्रमीचा रजक असावा असा अभ्यासकाचा तर्क आहे कोणी अहमद पहिला हाही हा म्लेंछ राजा मानतात रजकाला वरदान दिल्यानतर श्रीपादयती कुरवपुरास 'कित्येक दिवसावरी' असले तरी नेमके किती दिवस होते याचा अदाज घेता येण्यासारखा नाही 'आश्विन वद्य द्वादशी । नक्षत्र मघा मृगराज राशी । श्रीपाद बैसले निजानंदसी । अदृश्य झाले गंगेत ॥' (९ ४८) एवढीच नोंद श्रीगुरुचरित्रकारानी केलेली आहे ढेरे यानी सन १३५० मध्ये श्रीपादवल्लभ समाधिस्थ झाल्याचे सांगितले आहे म्हणजे त्याचे आयुर्मान जेमतेम तीस वर्षाचे ठरते अप्रबुद्धाना हे मान्य नाही त्याना श्रीपादाचे आयुष्य जास्त असावे असे वाटते पण तेही कसलाच आधार देत नाहीत

## भक्तांवर पूर्ण कृपा

भक्तजनाना तारण्यासाठी व दुष्टाचा निग्रह करण्यासाठी श्रीपादाचा अवतार असल्याचे श्रीगुरुचरित्रकार म्हणतात त्यानी प्रत्यक्ष सन्यास घेतला नसला तरी ते अवधूतवृत्तीने वावरत असत त्याचा सचार दत्तरूपाने कुरवपुरास नित्य असता अशी साप्रदायिकाची श्रद्धा आहे 'लौकिकी दिसती अदृश्य आपण । कुरवपुरी असती जाण । श्रीपादराव निर्धारी जाण । त्रयमूर्तीचा अवतार ॥' (९ ४९) असे श्रीगुरुचरित्रात म्हटले आहे दत्तात्रेयाचा हा पहिला अवतार महाराष्ट्रापासून दूर अशा आंध्र प्रातात

झाला, हेही ध्यानात घेण्यासारखे आहे. सगुण भक्तीचा जन्म मागेच केव्हा तरी द्रविड देशात झाल्याचा निर्देश पुराणांतून आहे. दत्तपंथाचा धागा अशा रीतीने प्रारंभापासून कन्नड-तेलुगू परिवारात परिपुष्ट झाल्यासारखा दिसतो. या कुरवपुराचा महिमा श्रीगुरुचरित्राच्या दहाव्या अध्यायात संक्षेपाने आला असून ' श्रीपाद आहेत कुरवपुरासी ' याविषयी कोणी संशय घेऊ नये असे परोपरीने सांगण्यात आले आहे. ' त्रयमूर्तीचा अवतार । त्याचा कवणा कळे पार । निधान तीर्थ कुरवपुर । वास तेथें गुरुमूर्ति ॥ जें जें चिंतिलें भक्त जनीं । लाधती श्रीगुरुदर्शनीं । श्रीगुरु राहती जया स्थानीं । कामधेनु असे जाणा ॥ ' ( १०.८-९ ) असा महिमा श्रीपादवल्लभस्थानाचा असल्याचे सर्वांना मान्य आहे. याचे उदाहरण म्हणून याच अध्यायात वल्लभेश नावाच्या एका सुशील द्विज व्यापाऱ्याची कथा निवेदन केली आहे. व्यापारात झालेला सर्व फायदा घेऊन एकदा तो कुरवपुरास येण्यास निघाला. त्याच्या बरोबर काही चोरही त्या यात्रेत सामील झाले. त्या चोरांनी धनलोभाने त्या ब्राह्मणास मारले. त्याचे सर्व द्रव्य हरण केले त्या वेळी श्रीपादवल्लभ प्रकट झाले व त्यांनी आपल्या त्रिशूलाने चोरांचा नाश केला. एक शरण आला त्यास जीवदान दिले. आपल्या जवळच्या विभूतीने त्यांनी त्या ब्राह्मण वैश्यास जिवंत केले. श्रीपादवल्लभांची ही कृपा जाणून ब्राह्मणाने येऊन श्रीपादुकांची मनोभावे पूजाअर्चा केली. अशा अनेक भक्तांवर श्रीपादवल्लभ कृपा करतात. याच श्रीपादांना पुढे अवतार घ्यावयाचा असल्याने ते गुप्तरूपाने कुरवपुरास वावरतात. हेच श्रीपादवल्लभ पुढे श्रीनरसिंह-सरस्वती म्हणून विख्यात झाले, अशी श्रद्धा सर्व सांप्रदायिकांची आहे.

## कारंजनगरी नृसिंहजन्म

श्रीगुरुचरित्रातील आठव्या अध्यायातील विप्रस्त्री श्रीपादयतीच्या सांगण्यावरून शनि-प्रदोषाचे व्रत करीत राहिली. हीच पुढे ' कारंज नगर उत्तरदेशीं । वाजसनीय शाखेसी । विप्रकुळीं जन्मली ॥' ( ११.४) हिचे नाव अंबाभवानी असे असून त्याच गावातील कोणा माधव नावाच्या विप्राशी तिचा विवाह झाला. पूर्वावताराच्या संदर्भाने ती या शिवप्रेमी गृहस्थाच्या घरी प्रदोष-पूजा करी. कालांतराने ती गर्भवती झाली. ब्रह्म-ज्ञान बोलण्याचे डोहाळे तिला लागले. नवमासां-नंतर तिला पुत्र जाहला. ' जन्म होतांचि तो बाळक । ॐकार शब्द म्हणतसे अलौलिक । पाहून झाले तटस्थ लोक । अभिनव म्हणोनि तये वेळीं ॥ ' ( ११.१४ ) हा मुलगा अवतारी पुरुष होईल, सर्वांना गुरुस्थानी राहील, असे भविष्य वर्तविण्यात आले. ' याचा अनुग्रह होईल ज्यासी । तो वंद्य होईल विश्वासी । याचें वाक्य होईल परिस । चिंतामणि याचे चरण ॥ अष्ट सिद्धि याचे द्वारीं । वोळगत राहतील निरंतरीं । नव निधि याच्या घरीं । राहती ऐका द्विजोत्तमा ॥' ( ११.१७-१८ ) याला गृहिणीसुतांचा लाभ होणार नाही. हा त्रिभुवनात पूज्य होऊन याच्या दर्शनानेच पतित पुनीत होऊन जातील.

अशा भविष्यकथनामुळे मातापित्यांना आनंद झाला. याचे नाव ' शालग्रामदेव ' असे ठेविले असले तरी व्यावहारिक ' नरहरी ' अशा नावानेच सर्वजण त्यास ओळखू लागले. याच्या स्पर्शाने आईच्या स्तनांतून अमाप दूध स्रवत असे. कौतुकात बाळ वाढू लागले. पण वय वाढत चालले तरी ॐकाराखेरीज कोणताच शब्द त्याला बोलता येत नसे. हा मुलगा मुका निघणार की काय ? अशी शंका आली. सात वर्षांपर्यंत बाळाने दुसरा शब्दच कधी उच्चारला नाही. त्याच्या मुंजीचा बेत ठरला पण हा कुमार मंत्रोच्चार कसा करणार, म्हणून

सर्वांना काळजी होती. बाळाने नाना चमत्कार करून दाखविले. लोखंडाला हात लावताच त्याने बावन्नकशी सोने करून दाखविले. मुलाचे सामर्थ्य प्रत्ययास येऊन ' तू तारका शिरोमणि । कारणिक पुरुष कुळदीपक ।। तुझेनि सर्वस्व लाधलें । बोलतां आम्हीं नाही ऐकिले । अज्ञानमायेनें वेष्टिलें । मुके ऐसे म्हणो तुज ।। ' ( ११.५७-५८ ) अशी कबूली मातेने दिली.

## मातेस ब्रह्मज्ञान

या मुलाचा यथाविधी व्रतबंध करण्यात आला. गायत्री मनाची दीक्षा घेऊन कुमार मातेजवळ भिक्षेसाठी आला. या वेळी बाळाने ऋग्वेदातील मन्त्राचा स्पष्ट उच्चार केला, 'अग्निमीळे पुरोहितं' या मन्त्राचा उच्चार ऐकताच सर्वांना नवल वाटले. यजुर्वेद, सामवेद म्हणून बाळाने सगळ्या लोकांना चकित केले. हा कुमार अवतारी पुरुष असल्याची खात्री सर्वांना पटली. मातेला बाळाने एक भिक्षा मागितली, 'निर्धार राहिला माझिया चित्ता । निरोप द्यावा आम्हां त्वरिता । जाऊं तीर्थे आचरावया ।।' (११.८३) वेदाभ्यास करण्यासाठी सर्वत्र संचार करण्याचा बाळाचा मानस पाहून मातापित्यांस दुःख झाले. पुत्र रक्षक होईल, या आशेवर जगलेल्या मातेची निराशा झाली. आईचे दुःख ओळखून मुलाने तिला ब्रह्मज्ञान सांगितले. तिला आणखी चार पुत्र होतील असे आश्वासन दिले आणि पूर्वजन्माची स्मृती करून दिली. त्याबरोबर 'श्रीपादश्रीवल्लभ स्वरूपता । दिसतसे तो बाळक ।।' (११.९३) या श्रीपादरूपी नरहरीला ओळखून मातेने बालकाचे चरण धरले.

मातेची समजूत काढताना ते म्हणाले, 'ऐक माते ज्ञानवती । हा बोल करी वो गुप्ती । आम्ही संन्यासी असो यति । अलिप्त असों संसारी ।।' (११.९५) मातेने यावर चारी पुरुषार्थ क्रमाने या मुलाने आचरावेत म्हणून सांगून पाहिले. परंतु नरहरीने सांगितले, ' माते, देह हा क्षणभंगुर असल्याकारणाने तीन आश्रमांपर्यंत थांबता येत नाही. ' शेवटी दोन पुत्र होईपर्यंत घरी थांबण्याचे ठरले. एक वर्षानंतर अवाभवानीस दोन जुळे पुत्र झाले. त्यानंतर मात्र नरहरीने सर्वांचा निरोप घेतला. सातआठ वर्षांच्या या तेजस्वी बालकास निरोप देण्यासाठी अवघे कारंजनगर वेशीवर लोटले. हा नरहरी म्हणजे 'श्रीपादश्रीवल्लभदत्तात्रेय'च असल्याची खात्री जनकजननीस पटली. 'त्रयमूर्तींचा अवतार । झाला नरहरी नर । निजरूपें दिसे कर्पूरगौर । पाहतां न मिळे चरणासी ।। जया जया सद्गुरु । त्रयमूर्तींचा अवतारु । आमुचें पुण्य होतें थोरु । म्हणोनि देखिले तुमचे चरण ।। तूं तारक विश्वासी । आम्हां उद्धरिलें विशेषी । पुनर्दर्शन आम्हासी । द्यावे म्हणोनि विनवीती ।। ' (१२.६८-७०) मातापित्यांनी नरहरीस आलिंगन दिले.

## संन्यासदीक्षा व यात्रा

त्याचा निरोप घेऊन 'वरदमूर्ति श्रीगुरुराणा । निघाला जावया बदरीवना ' काशीक्षेत्रात विश्वेश्वराच्या चरणासी काही काळ नरहरी विसावला. त्या ठिकाणी त्यांनी अनुष्ठान केले. अष्टांगयोगाचा अभ्यास वाढवून तपश्चर्या केली. मणिकर्णिका तीर्थात त्रिकाल स्नान करणारा हा तेजस्वी बालक सर्वांचे चित्त वेधून घेई. त्यात 'कृष्ण सरस्वती ' नावाचा एक वृद्ध संन्यासी होता. तो केवळ ब्रह्मज्ञानी असून स्नेहभावाने सर्वांकडे पाही. त्याला या बालकाचा वेध लागला. हा समर्थ श्रीगुरु होऊन लोकोद्धाराचे कार्य करील अशी खात्री त्यांना होती. याने संन्यास आश्रम स्वीकारावा अशी त्याची इच्छा होती. 'लोकानुग्रहकारणें । तुम्ही आतां संन्यास घेणे । आम्हां समस्तां उद्धरणें । पूजा घेणें आम्हां करवी ।।' (१२.९१) या वृद्ध स्वामीची व इतरही

संन्याशाची ही विनती मान्य करून नरहरीने कृष्णसरस्वतींकडून संन्यासदीक्षा घेतली. श्रीरघुनाथास जसा वसिष्ठ, श्रीकृष्णास जसा सांदीपनी, तसा नरहरीस कृष्णसरस्वती गुरु झाला. या कृष्णसरस्वतीची गुरुपीठिकाही अत्यंत थोर प्रकारची होती. आदिपीठाचे शंकर हे पहिले गुरु. त्यानंतर विष्णू, त्यानंतर ब्रह्मदेव हे मूळपीठ असून पुढे वसिष्ठ, शक्ती, पराशर, व्यास, शुक, गौडपादाचार्य, गोविंदाचार्य, शंकराचार्य, विश्वरूपाचार्य, ज्ञानबोधीगिरिय, सिंहगिरिय, ईश्वरतीर्थ, नृसिंहतीर्थ, विद्यातीर्थ, शिवतीर्थ, ज्ञानतीर्थ, मल्लियानंद, देवतीर्थसरस्वती, सरस्वतीयादवेन्द्र आणि यादवेन्द्रसरस्वतीचे शिष्य कृष्णसरस्वती असून त्याचेकडून नरहरीने संन्यासदीक्षा स्वीकारली.

श्रीनृसिंहसरस्वती असे नवे नाव नरहरीने धारण केले. यानंतर नृसिंहसरस्वतीचे नाव सर्व काशीत विख्यात झाले. ' समस्त वेदांचा अर्थ । सांगता झाला श्रीगुरुनाथ । म्हणोनि वंदिती समस्त । तया काशीनगरांत ॥ ख्याती केली अतिगहनी । तया वाराणसीभुवनी । यति समस्त येवोनि । सेवा करिती श्रीगुरूची ॥' (१२ ११८–१९) यानंतर अनेक शिष्यासमवेत श्रीगुरू उत्तरेकडे बदरीवनाकडे निघाले. सुमेरूला सव्य प्रदक्षिणा घालून कलकत्त्याजवळच्या गंगासागरास ते आले. तेथून तटाकयात्रा करीत ते प्रयागला आले. या ठिकाणी श्रीगुरूंनी ' माधव ' नावाच्या विप्राला संन्यासदीक्षा देऊन त्याचे नाव माधवसरस्वती असे ठेविले. याच्यावर श्रीगुरूंचे अतिशय प्रेम होते. या ठिकाणीही श्रीगुरूंना अनेक शिष्य मिळाले. बाळकृष्णसरस्वती, कृष्णसरस्वती, उपेन्द्रसरस्वती, माधवसरस्वती, सदानंदसरस्वती, ज्ञानज्योतिसरस्वती, सिद्धसरस्वती असे प्रमुख शिष्य एकाहून एक श्रेष्ठ अशा स्वरूपात श्रीनृसिंहसरस्वतींना मिळाले.



## श्रीगुरूंची दक्षिणयात्रा

यानंतर श्रीगुरू नृसिंहसरस्वती सुमारे तीस वर्षांनी दक्षिणेत पुन: आपल्या जन्मगावी करंजनगरात आले. आईबाप, चार भाऊ, एक बहीण यांची भेट झाल्याने सर्वांनाच आनंद झाला. नगरवासियांनाही परम संतोष वाटला. ' घरोघरी श्रीगुरुसी । पाचारिती भिक्षेसी । जाहले रूप बहुवसी । घरोघरी पूजा घेती ॥' (१३ २५) हा वेषधारी यती म्हणजे श्रीविष्णूचाच अवतार असल्याची खात्री सर्वांना झाली. आई-बाप, भगिनी रत्नाई यांना श्रीगुरूंनी बोधाचा उपदेश दिला. बहिणीचा पूर्वकर्मदोष त्यांना जाणवला. या रत्नाईचा देह कुष्ठरोगाने पीडित होईल व श्रीगुरूंच्या भेटीने तिचा ताप दूर होईल असे तिचे भाकितही त्यांनी सांगितले. त्यानंतर श्रीगुरू त्र्यंबकेश्वरास आले. गोदावरीची तटाकयात्रा त्यांनी केली. मंजरिका नावाच्या गावी माधवारण्य नावाचे एक मुनी नृसिंहाचे उपासक होते. मानसपूजेत ध्यानाची जी मूर्ती ते पाहात होते, ती श्रीगुरूंचीच म्हणजे नृसिंहसरस्वतींचीच आहे हे ध्यानात येताच त्यांनी श्रीगुरूंना आपले सर्वस्व अर्पण केले. श्रीगुरूंनी त्याला आत्मबोध केला. तेथून ते बासर ब्रह्मेश्वर नावाच्या क्षेत्रास आले. येथे गोदावरीच्या पात्रात स्नान करीत असताना त्यांना एक करुण दृश्य दिसले. एक ब्राह्मण पोटदुखीच्या विकाराने ग्रस्त होऊन आत्महत्या करण्याच्या विचारात होता. श्रीगुरूंचे त्याच्याकडे लक्ष गेले व त्याला त्यांनी रोगमुक्तीचा उपाय सांगितला.

याच वेळी गंगास्नानास सायंदेव नावाचा एक ग्रामाधिकारी आला. त्याने श्रीगुरूंना मनोभावे वंदन केले. हा सायंदेव आपस्तंब शाखेचा कौंडिण्य गोत्री असून कडगंचीचा रहाणारा, पण उदरभरणार्थ यवनाची सेवा करणारा होता. त्याचा भाव पाहून श्रीगुरू त्याला म्हणाले, 'या ब्राह्मणास

पोटदुखीचा विकार आहे तू याला घरी घेऊन जा व पोटभर मिष्टान्न घाल त्याची व्यथा दूर होईल ' सायदेवाने श्रीगुरुनाही आमत्रण दिले श्रीगुरू सायदेवाच्या घरी आले त्याच्या पत्नीने, जाखाईने श्रीगुरूची मनोभावे षोडशोपचारे पूजा केली 'तुला अनेक पुत्र होतील तुझ्या घरात गुरुभक्ती वाढेल ' असा तिला आशीर्वाद मिळाला ब्राह्मणाचा पोटदुखीचा विकारही सपला

सायदेवावरही श्रीगुरूनी पूर्ण कृपा केली 'तुझ्या वशात भक्त जन्मास येतील ' असा त्यानी आशीर्वाद दिला सायदेवाने पुन प्रार्थना केली, 'श्रीगुरू, मी महाक्रूर अशा यवनाची चाकरी करतो आहे दरवर्षी तो अनेक ब्राह्मणाचा घात करतो याच कामासाठी त्याने मला बोलवले आहे माझाही घात होण्याचा सभव आहे ' त्यावर श्रीगुरूनी त्याला अभय दिले आणि चिंता न करण्याबद्दल सागितले सायदेव यवन राजापाशी गेला सायदेवाला पाहाताच यवन राजाच्या अगाचा दाह होऊन त्यास प्राणातिक वेदना होत राहिल्या या ब्राह्मणाचा शाप आपणास बाधला असे समजून त्याने सायदेवास गौरविले त्याला भूषणे व वस्त्रे देऊन त्याला परत पाठविले गगातीरावर येऊन श्रीगुरुना सायदेवाने झालेला सर्व प्रकार सागितला श्रीगुरूना सतोष वाटला त्यानतर दक्षिण यात्रेस जाण्यासाठी उत्सुक असलेले श्रीगुरु त्याला म्हणाले, ' कारण असे आम्हा जाणे । तीर्थे असती दक्षिणे । पुनरपि तुम्हा दर्शन देणे । सवत्सरी पचदशी ॥ आम्ही तुमचे गावासमीप । वास करू हे निश्चित । करून पुत्र इष्ट श्रात । मिळोनि भेटा तुम्ही आम्हा ॥ ' (१४४२ ४३) अशी सायदेवाची समजूत काढून श्रीगुरु आपल्या शिष्यासमवेत परळी वैजनाथ या महाक्षेत्रास आले

त्याचा महिमा वाढल्याने अनेक सकाम शिष्याचा मेळावा त्याच्याभोवती वाढला तेव्हा श्रीगुरूनी त्याना तीर्थयात्रा करण्याचा आदेश दिला तीर्थयात्रा झाल्यावर आपणास शैल्य पर्वतावर भेटावे असेही त्यानी शिष्याना सागितले वैजनाथ क्षेत्रात श्रीगुरु गुप्तरूपाने एक वर्षभर राहिले येथेच त्यानी एका गुरुद्रोही ब्राह्मणास गुरूची महती धौम्य ऋषीची कथा सागून स्पष्ट केली त्यानतर श्रीनृसिहसरस्वती मिरजेच्या अलीकडील कृष्णातटावरील भिलवडी नावाच्या गावी आले या गावी भुवनेश्वराचे प्रसिद्ध स्थान आहे. या देवीच्या मदिरात करवीरक्षेत्राचा एक मदबुद्धीचा विप्रकुमार धरणे धरून बसला होता देवी प्रसन्न होत नाही असे पाहून त्याने आपली जीभ कापून देवीच्या चरणी अर्पण केली त्याच रात्री त्याला दृष्टान्त झाला भिलवडीस औदुबराच्या वृक्षाखाली एका अवतारी तपस्व्यास भेटण्याची त्याला प्रेरणा झाली त्याने श्रीगुरूचे मनोभावे दर्शन घेतले त्याच्या मस्तकावर हात ठेऊन श्रीगुरूनी त्याला कृतार्थ केले चातुर्मास भिलवडीला घालवून श्रीगुरु कृष्णा–पचगगा नद्याच्या सगमावरील अमरापूर या गावी आले

## अमरापुरात एक तप

अमरापूर हे एक अनुपम्य तीर्थक्षेत्र असून श्रीगुरुचे वास्तव्य येथे बारा वर्षेपर्यंत राहिल्याने त्याचा महिमा आणखीनच वाढला शिवा, भद्रा, भोगावती, कुभी व सरस्वती या पचगगेस कृष्णा भेटावयास आल्याने या ठिकाणचे पावित्र्य अवर्णनीय आहे कृष्णेच्या पैलतीरावर अमरापूर (औरवाड) हे गाव असून प्रत्यक्ष कल्पतरू असणारा औदुबर वृक्षही येथे आहे येथील देव अमरेश्वर असून तेथेच चौसष्ट योगिनीचा निवास आहे शक्ती, शुक्ल, पापविनाशी, काम्य, सिद्धिवरद प्रयाग अशी आणखीही तीर्थे याच स्थानी आहेत

याच गावात एक वेदाभ्यासक ब्राह्मण राहात होता आपल्या घरच्या घेवड्याच्या वेलावरील शेंगावरच तो कसेतरी पोट भागवीत असे तो

दरिद्री असूनही निष्ठावान होता. एकदा श्रीगुरु त्याच्या घरी भिक्षेसाठी गेले आणि त्याचे दारिद्र्य दूर होण्याचा त्यांनी त्याला वर दिला. त्यांनी तो घेवड्याचा वेल काढून टाकला. त्या वेलाच्या मुळाशी ब्राह्मणाने खणून पाहिले तो त्याला द्रव्याचा हंडा सापडला. त्या ब्राह्मणाचे दैन्य अशा रीतीने दूर झाले. अशा प्रकारचे अनेक चमत्कार श्रीगुरुंनी या काळात केले. श्रीगुरु पैलतीरी अमरापुरास भिक्षेसाठी जात असत व अलीकडच्या तीरावर ध्यानचिंतन करून लोकांचा उद्धार करीत. त्यांच्या बारा वर्षांच्या निवासस्थानाचे नाव पुढे नृसिंहवाडी अथव नरसोबाची वाडी या नावानेच प्रसिद्ध झाले.

श्रीगुरु औदुंबरतळीच का निवास करतात? याही प्रश्नाचे उत्तर श्रीगुरुचरित्राच्या एकोणिसाव्या अध्यायात आलेले आहे. नृसिंह अवताराच्या वेळी हिरण्यकशिपूच्या उदरविदारणामुळे भगवंताच्या हातांची, नखांची आग होत राहिली; ती उंबराच्या फळात हात खुपसल्यावर शमली. म्हणून शीतल उपचारांचे प्रतीक म्हणून औदुंबराची ख्याती श्रीगुरुंच्या संदर्भात झाली. अमरेश्वराजवळच्या चौसष्ट योगिनी श्रीगुरुंची पूजा करण्यासाठी माध्यान्ह समयी येत. येथेच गंगानुजावर कृपा करून श्रीगुरुंनी त्याचेही दैन्य हरण केले. औदुंबर हा कल्पवृक्ष आहे; आपल्या मनोहर पादुकाही तेथेच आहेत, तुम्ही तेथेच वास करावा असे सांगून श्रीगुरु भीमातीरी असलेल्या गाणगापूर या गावी येऊन स्थिरावले.

# गाणगापुरात दोन तपे

श्रीगुरुंच्या मनात नद्यांच्या संगमाविषयी अपार प्रेम असावे. कृष्णा–पंचगंगांच्या संगमानंतर त्यांना भीमा-अमरजा संगमाने वेध लावला. श्रीगुरुंनी येथे जवळ जवळ तेवीस वर्षे वास्तव्य करून दीनदुःखितांचा उद्धार केला असल्याने गाणगापुरास दत्तपंथीयात फारच महत्त्वाचे स्थान मिळाले आहे. या स्थानाचे माहात्म्य श्रीगुरुचरित्रात वर्णन करताना म्हटले आहे, 'भीमा उत्तरवाहिनीसी। अमरजा संगम विशेषी। अश्वत्थवृक्ष परियेसी। महास्थान वरदभूमी ॥ अमरानदी तीर्थ थोर। संगम जाहला भीमातीर। प्रयागसमान असे क्षेत्र। अष्टतीर्थे असती तेथे ॥' (२२-११-१२) अशा या गाणगापुरात राहून श्रीगुरुंनी अनेक लीला प्रकट करून भक्तजनांचा उद्धार केला. या गावच्या एका ब्राह्मणाच्या वंध्या म्हशीचे दूध पिऊन श्रीगुरु संतुष्ट झाले. त्यांनी त्याचे दारिद्र्यही दूर केले. तेथील एका ब्रह्मराक्षसाचाही त्यांनी उद्धार केला. शेजारीच कुमशी नावाच्या गावात त्रिविक्रमभारती नावाचा एक तापसी राहात असे. त्याने गाणगापूर येथील श्रीगुरुंच्या चमत्काराची निंदा केली. दांभिक संन्यासी म्हणून त्यांची त्याने थट्टाही केली. त्यास जाणीव देण्यासाठी ते कुमशीस निघाले. त्रिविक्रमभारती नरसिंहाचे उपासक असून त्याच्याच मानसपूजेत व्यग्र होते. त्यांना नरसिंहाच्या ऐवजी एका दंडधारी पुरुषाचेच दर्शन होत राहिले. खरा प्रकार त्रिविक्रमाच्या ध्यानी आला व तो श्रीगुरुंना शरण गेला. अनेक प्रकारे त्याने श्रीगुरुंची स्तुती केली.

विदुरा नावाच्या नगरीत एक यवन राजा महाक्रूर व ब्रह्मद्वेषी होता. मंद व मतिहीन ब्राह्मण द्रव्याच्या लोभाने त्याच्यापुढे वेद म्हणून शास्त्रार्थ करीत. अशाच दोन अहंकारी ब्राह्मणांना श्रीगुरुंनी वेदाचा विस्तार सांगून व्यर्थ वाद न करण्याची सूचना केली. त्यांचा हटवाद संपत नाहीसे पाहून श्रीगुरुंनी एका मांगाला विप्रत्व देऊन त्याच्याकडून त्या दोन वादी पंडितांचा गर्व कमी केला. परंतु ब्राह्मणाचे दैन्य पाहून श्रीगुरुंना अतिशय वाईट वाटले. इस्लामी सत्तेच्या वरवंट्याखाली वर्णाश्रमाचा लोप होत आहे, कर्ममार्ग भ्रष्ट झाला आहे, हे पाहून त्यांनी तत्त्वज्ञानयुक्त आचारधर्माची पुनः

बांधणी केली. पापाचरणाचा विधी सांगून कर्मविपाकाचे शास्त्र त्यांनी उभे केले. माहूरच्या गोपीनाथपुत्राच्या पत्नीस श्रीगुरूंनी विस्ताराने पतिव्रतेचा धर्म समजावून सांगितला. भस्मधारण, रुद्राक्षधारण, नाना व्रते यांचा महिमा वर्णन करून श्रीगुरूंनी आचारहीन बनलेल्या समाजास एक बांधीव आचारधर्म समजावून दिला. या आचारधर्माचे विस्ताराने दर्शन आपण पुढे एका स्वतंत्र प्रकरणात घेणार आहोत. ब्राह्मणाचे आन्हिक कसे असावे, पूजाविधान कसे असावे, ब्राह्मणाने गायत्रीची उपासना कशी करावी, इत्यादींविषयी सांगोपांग विवेचन श्रीगुरूंच्या मुखातून झालेले दिसते. साठ वर्षांच्या एका वांझ वृद्धेस कन्या व पुत्र देऊन श्रीगुरूंनी आपले सामर्थ्य प्रकट केले. नरहरी नावाच्या एका कुष्ठी द्विजावर कृपा करून त्याच्या शुष्क काष्ठास पाने फुटण्याचा चमत्कारही याच सुमारास झाला.

पूर्वीच्या संकेताप्रमाणे वासर क्षेत्रीचा सायंदेव नावाचा एक शिष्य श्रीगुरूंना भेटण्यासाठी गाणगापुरास आला. सायंदेवाने श्रीगुरूंची मनोभावे सेवा केली. नाना प्रकारे त्याची परीक्षा पाहून श्रीगुरूंनी त्याला काशीचा महिमा, अनंतव्रतकथा सांगून त्याच्यावर पूर्ण कृपा केली. श्रीनृसिंहसरस्वतींनी अशा अनेक लोकांवर कृपा करून त्यांचा उद्धार केला. नदी नावाच्या एका द्विजाचे श्वेतकुष्ठ तर त्यांनी दूर केलेच, पण तो पुढे कवीश्वर या नावाने प्रसिद्धीस आला. हिप्परगीचा एक कल्लेश्वर भक्त नरहरी याच्यावर श्रीगुरूंनी कृपा करून त्याला कवित्वाची स्फूर्ती दिली. दिवाळीच्या दिवशी अनेकांच्या घरी एकाच वेळी भक्तांकडून पूजा घेऊन श्रीगुरूंनी आपले सर्वव्यापित्व सिद्ध केले. एका शूद्र जातीच्या भक्ताच्या शेतात शंभर पटींनी धान्य पिकवून श्रीगुरूंनी त्याचे दैन्य दूर केले. आपल्या शिष्यांना त्यांनी एकदा गाणगापूरचा महिमा विस्ताराने वर्णन करून सांगितला.

## यवन राजाकडून सन्मान

पूर्वीच्या वरदानानुसार एक रजक आता वैदुरी अथवा बिदर नगरीत म्लेच्छ जातीत जन्मास येऊन बादशहा झाला होता. पूर्वसंस्कारामुळे त्याच्या मनात हिंदूबद्दल द्वेष नव्हता. ब्राह्मणांचा तो सन्मान करी. विप्रांच्या देवालयांचा तो मान राखी. एक दिवशी या राजाच्या मांडीस एक फोड झाला. कोणत्याही उपायाने तो बरा होईना. त्याला फारच यातना सहन कराव्या लागत होत्या. सत्पुरुषाची सेवा केल्यास हा फोड बरा होईल अशी त्याची खात्री झाली. गाणगापुरास एक यती सत्पुरुष असल्याचे त्याला समजले. त्याने गाणगापुरास जाऊन श्रीगुरुंचे दर्शन घेतले. 'का रे रजका, कोठे असतोस? आमचा दास असूनही फार दिवसांनी भेटलास?' असे श्रीगुरूंनी म्हणताच म्लेच्छ राजास पूर्वजन्माचे स्मरण झाले. श्रीगुरूंना त्याने साष्टांग नमस्कार केला. श्रीगुरूंच्या कृपेने त्याचा फोड पूर्णपणे बरा झाला. राजाने खूप होऊन आपल्या नगरीस यावे अशी इच्छा प्रकट केली. त्यावर श्रीगुरू म्हणाले, 'तुझ्या नगरात नेहमी धेनुहत्या, जीवहिंसा, मद्यपान अशा गोष्टी घडतात. आम्ही तेथे कसे यावे? या गोष्टी घडणार नाहीत असे करावेस.' म्लेच्छ राजाने हे सर्व कबूल केले. यवन राजाने त्यांच्या पादुका हाती घेतल्या व तो त्यांना आपले सर्व ऐश्वर्य दाखवू लागला. श्रीगुरूंचे मन त्यात कोठून रमणार? संध्यादी कर्मे, अनुष्ठान चुकू नये म्हणून श्रीगुरू अदृश्य होऊन बेदुर नगरीहून पापविनाशी तीर्थावर आले. यवन राजा त्यांचा शोध घेत घेत त्या तीर्थावर येऊन पोचला. श्रीगुरूंनी आपल्या घरी यावे अशी त्याने विनती केली.

राजाने श्रीगुरूंना आपल्या घरी नेऊन त्यांची मनोभावे पूजा केली. एका म्लेच्छ राजा-

करून एवढा सन्मान घेणाऱ्या नृसिंहसरस्वतीचे माहात्म्य केवढे होते व त्यानी समकालीन प्रतिकूल परिस्थितीत केवढे सास्कृतिक कार्य केले याची कल्पना येण्यासारखी आहे 'सवे वाजत्र्याचे गजर । वदीजन वाखाणिती अपार। राजा आपण हर्षनिर्भर । घेऊनि जातो श्रीगुरुसी॥ नानापरी दिव्यवस्त्रे । द्रव्ये ओवाळी अमिते । टाकीतसे राजा तेथें । भिक्षुक तुष्टले बहुत देखा ॥' (५२ २३८-३९) पायघड्या अयरून राजाने श्रीगुरुना राजगृहात नेले महासिंहासनावर त्याची स्थापना केली, 'अत पुरीचे कुलस्त्रियासी । पुत्रपौत्र सहोदरासी । भेटविलें राजे परियेसी । साष्टागी नमस्कारिती ॥ '( ५२. २४४) हे दृश्य अलौकिक नाही काय ? राजाने श्रीगुरुना विनती केली, राज्य आपल्या कृपेने पुष्कळ दिवस केले आता चरणसेवा द्यावी त्यावर श्रीगुरु म्हणाले, 'आमुची भेटी श्रीपर्वती। तुझे पुत्र राज्य करिती । तुवा यावे भेटीसी । ' (५० २४९)

## 'श्रीगुरु बैसले निजानंदी'

इतके बोलून श्रीगुरुनी राजाचा निरोप घेतला व ते सिंहस्थाच्या निमित्ताने नाशिकत्र्यवकेश्वराच्या यात्रेस निघाले गौतमीत स्नान करून ते गाणगापुरास आले परतु या वेळी त्याच्या मनात भलतीच कालवाकालव होत होती 'प्रगट झाली बहु ख्याति । आता रहावे गौप्य आम्ही ॥'(५०. २५४ ) असा विचार शिष्याना बोलून दाखवून आणखी ते म्हणाले, 'यात्रारूपे श्रीपर्वतासी । निघालो आता परियेसी । प्रगट बोल ह्याचि स्वभावेसी । गौप्यरूपें राहू येथेंचि ॥ स्थान आमुचे गाणगापुर । येथूनि न वचो निर्धार । लौकिकमते अवधारा । बोल करितो श्रीशैलयात्रा ॥' (५० २५५-५६) निरवानिरव करण्याच्या भाषेत ते म्हणाले, 'प्रगट निघो यात्रेसी । वास निरतर गाणगाभुवनासी । भक्तजन तारावयासी । राहू आम्ही निरतर ॥ कठिण दिवस युगधर्म । म्लेच्छ राज्य क्रूरकर्म । प्रगट असता घडे अधर्म । समस्त म्लेच्छ येथे येती ॥ राजा आला म्हणोनि। ऐकिले जाती यवनी । सकळ येतील मनकामनी। म्हणोनि गौप्य राहो आता ॥ .. पुढे येतील दुर्दिन । कारण राज्य यवन । समस्त येतील करावया भजन । म्हणोनि गौप्य राहो आता ॥' ( ५० २५७-६१ ) याप्रमाणे निरोप घेऊन श्रीगुरु पर्वतयात्रेस म्हणजे श्रीशैल्यपर्वताला निघाले भक्तजनाच्या अत करणास फारच वेदना झाल्या त्यानी श्रीगुरूच्या चरणाची मनोभावे पुन पुन प्रार्थना केली 'तू भक्तजनाची कामधेनु । होतासी आमुचा निधानु । आम्हा बाळका सोडुन । जाता म्हणोनि विनविताती ॥ नित्य तुझे दर्शनी । दुरिते जाती पळोनि । जे जे आमुची कामना मनी । त्वरित पावे स्वामिया ॥ बाळकाते सोडूनि माता । केवि जाय अव्हेरिता । तूचि आमुचा मातापिता । नको अव्हेरू म्हणताति ॥' ( ५१ १०-१२ )

शोक करणाऱ्या शिष्याचे श्रीगुरुनी परोपरीने सात्वन केले आम्ही या गाणगापुरातच आहोत असे त्यानी पटवून दिले 'प्रात स्नान कृष्णातीरी । पचनदी सगम औदुबरी । अनुष्ठान करवे त्या क्षेत्री । माध्यान्ही येतो भीमातटी ॥ सगमी स्नान करोनि । पूजा घेऊ मठी निर्गुणी ॥ चिंता न करा अत करणी ॥ ' ( ५१ १६-१७ ) असे त्यानी समजाविले 'अश्वत्थ नव्हे कल्पवृक्ष । सगमी असे प्रत्यक्ष । जें जें तुमच्या मनी अपेक्ष । त्वरित साध्य पूजिता ॥ कल्पवृक्षात पूजोन । यावे आमुचे जेथ स्थान । पादुका ठेवितो निर्गुण । पूजा करावी मनोभावे ॥' (५१ २०-२१) असे सात्वन करून श्रीगुरु श्रीपर्वताकडे आले सागितल्याप्रमाणे सेवती, कमळ, कल्हार, मालती इत्यादी पुष्पाचे एक सुरेखसे आसन शिष्यानी कर्दळीपानावर तयार केले गगेच्या पात्रावर आसन ठेवून होताच

श्रीगुरूंनी शिष्यांना परत जाण्यास सांगितले आपल्या भक्ताचे सांत्वन करून ' उठले श्रीगुरु तेथूनि । पुष्पासनी बैसोनि । निरोप देती भक्तासी ॥ ' कन्यागतो ' बृहस्पतीसी । 'बहुधान्य' नाम संवत्सरेसी । सूर्य चाले ' उत्तर दिशे'सी । संक्रांति ' कुंभ ' परियेसा ॥ ' शिशिरऋतु ' माघ मासीं । ' असित ' पक्ष ' प्रतिपदे'सी । ' शुक्रवारी ' पुण्यदिवशी । श्रीगुरु बैसले निजानंदी ॥ ' ( ५१ ३५-३७ ) जाताना त्यानी ' गायनी करावे मार्से स्मरण । त्याचे घरी असे जाण । गायनी प्रीति बहु मज । ' ( ५१ ४० ) अशी सूचना दिली थोडयाच वेळाने त्याची प्रसादपुष्पेही शिष्यासाठी आली ती सायदेव, नंदी, नरहरी व सिद्ध या चार शिष्यानी वाटून घेतली

# श्रीगुरूंचे शिष्य

महाराष्ट्रात दत्तसंप्रदायाचा नजरेत भरणारा विकास झाला तो श्रीनृसिंहसरस्वतीच्या अवतार-कार्यानंतरच श्रीपादयती व श्रीनृसिंहसरस्वती यांची चरित्रे इतर अनेक विषयांसहित वर्णन करणाऱ्या ' श्रीगुरुचरित्रा'चा कर्ता सरस्वती गंगाधर हा श्रीगुरूंच्या सायदेव नावाच्या शिष्याच्या वंशातील पाचवा पुरुष होय श्रीगुरूंच्या नावलौकिकाबरोबरच त्यांचा शिष्य-परिवारही वाढीस लागला माधवसरस्वती नावाचा एक शिष्य त्यांना प्रयाग येथे मिळाला बाळसरस्वती, कृष्णसरस्वती, उपेन्द्रसरस्वती, सदानंदसरस्वती, ज्ञानज्योतिसरस्वती, सिद्ध-सरस्वती इत्यादी आणखी काही शिष्यांचा निर्देश मागे केलेला आहेच सिद्धसरस्वतीस श्रीगुरूंचा सहवास पुष्कळच असून तोच त्यांच्या निजानंदगमनापर्यंत सान्निध्यात होता यानेच श्रीगुरूंचे संस्कृत चरित्र तयार केले असावे व या संस्कृत चरित्राच्या आधाराने सिद्धनामधारक-संवादाच्या रूपाने पुढे सरस्वतीगंगाधराने विख्यात असा ' श्रीगुरुचरित्र ' नावाचा मराठी ग्रंथ लिहिला नामधारक म्हणजे स्वत सरस्वती गंगाधर व सिद्ध म्हणजे सिद्धसरस्वती असे मानावयास हरकत नाही

श्रीगुरूंच्या संन्यासी शिष्यांपैकी माधवसरस्वतीची शिष्यपरंपरा महाराष्ट्रात बरीच विकसित झालेली दिसते नृसिंहसरस्वती-माधवेन्द्र सरस्वती - अमृतानंद - गगनेन्द्र - माधवसरस्वती-विठ्ठल-सरस्वती, अंबिका-सरस्वती-अमृत या परंपरेतील अमृत हा प्रख्यात पदकार अमृतराय की काय, असा संशोधकांपुढे प्रश्न आहे. ' स्वरूपनिर्णय ' कार अमृत-कवी व ' अविनाश-संदेहहरण ' कार अमृतराय हे दोन एकच की काय ? कारण यांच्या गुरुपरंपरा वर सांगितल्या-प्रमाणे एकच आहेत अमृतानंदाचा ' योगराज-टिळक ' या नावाचा एक लघुग्रंथ दत्तात्रेयाचा ग्रंथ म्हणून प्रसिद्ध आहे ढेरे यांना हा अमृतानंद चंद्रात्मज कवीच्या गुरुपरंपरेतला वाटतो

श्रीगुरूंच्या सात संन्यासी शिष्यांखेरीज मंज-रिकेचा माधवारण्य व कुमसीचा त्रिविक्रम-भारती हे दोन संन्यासीही श्रीगुरूंचेच शिष्य होत सायदेव, नरहरी कवी, नंदीकवी, माय-देवाचा ज्येष्ठ पुत्र नागनाथ, वेदरचा यवन राजा, असे आणखी काही गृहस्थाश्रमी शिष्य श्रीगुरूंना लाभले असल्याचे आपण पाहिले आहेच श्रीगुरूंच्या निजानंदगमनानंतरही अनेकांना त्यांची प्रेरणा, कृपा झाल्याच्या कथा आहेत ' श्रीगुरुचरित्र ' व नृसिंहसरस्वती यांच्यापासून प्रेरणा व कृपा संपादून दत्तपरंपरेची वाढ महाराष्ट्रात व बाहेरही कशी झाली ते आपण पुढल्याच प्रकरणात पाहू

# श्रीनृसिंहसरस्वतींचे कार्य

श्रीगुरु नृसिंहसरस्वतींच्या कालासंबधाने मतभेद आहेत शके १३८० म्हणजे सन १४५८ हा सर्वमान्य असणारा त्यांचा निजानंदगमनकाल

कायम केला व श्रीगुरूंचे आयुर्मान ऐंशी वर्षाचे मानले तर त्यांचा जन्म अंदाजे शके १३०० म्हणजे सन १३७८ असा येतो. स्वामींचा काल व कार्य याविषयी चर्चा करताना अप्रबुद्ध यांनी नागपूरच्या महाराष्ट्राच्या दिवाळी अंकात (सन १९५१) एक लेख लिहून आपले याविषयी एक निराळे मत प्रकट केले आहे. त्यांनी अनेक प्रकारचे पुरावे दाखवून निजानंदगमनकाल शके १४४० हा निश्चित केला आहे. ढेरे यांना मात्र हा शक रूढ संकेतानुसार शके १३८० हाच योग्य वाटतो. श्रीनृसिंहसरस्वतींनी आपल्या दीर्घ आयुष्यात प्रतिकूल परिस्थितीत लोकरक्षणाचे व धर्मसंस्थापनाचे फार मोठे कार्य केले आहे. नृसिंहवाडी व गाणगापूर या जुन्या तीर्थांना नवा उजळा देऊन त्यांनी त्यांचे माहात्म्य वाढविले. लोकांना सन्मार्ग दाखविला. अनेकांच्या भौतिक व्याधी दूर केल्या. अनेकांना आत्मिक समाधान प्राप्त करून दिले. व्रते व वैकल्ये आणि कर्मकांड यांची पुनर्स्थापना करून त्यांनी सर्वसामान्य लोकांना शाश्वत सुखाचा मार्ग दाखविला. अंत्यज व शूद्रही त्यांच्या कृपादृष्टीतून सुटले नाहीत. म्लेच्छ राज्यांवरही त्यांच्या कर्तृत्वाचा व अधिकाराचा मोठाच प्रभाव होता. पडत्या काळात वर्णाश्रम-धर्माची विस्कळित झालेली अवस्था त्यांनी सावरून धरली. तत्त्वज्ञान व आचारधर्म यांचे नवे आदर्श स्वतःच्या आचरणाने व उपदेशाने सिद्ध केले.

श्रीनृसिंहसरस्वतींच्या चरित्राचे व कार्याचे समालोचन करण्यापूर्वीच ढेरे यांनी लिहिले आहे; 'तेराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत दत्तोपासनेचा जो पुराणप्रवाह वाहत आला होता, त्यात जीवन ओतण्याचे कार्य श्रीनरसिंहसरस्वतींनी केले. त्यांचे जीवनकार्य केवळ दत्तोपासनेच्या क्षेत्रातच नव्हे, तर समग्र महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनात दीपस्तंभासारखे मार्गदर्शक ठरले आहे. त्यांच्या जीवनकाळात जी संघर्षमय परिस्थिती निर्माण झाली होती त्या परिस्थितीच्या गर्भातूनच महापुरुषाच्या उदयाचा हुंकार ऐकू येत होता. त्या काळात एका आक्रमणशील संस्कृतीने हिंदू परंपरेचा ग्रास घेण्यासाठी महाराष्ट्रात सर्वत्र संचार चालविला होता. त्या संकटातून महाराष्ट्राला मुक्त करण्याचे महान् कार्य श्रीनरसिंहसरस्वतींनी केले.' (श्रीनरसिंह सरस्वती : चरित्र आणि परंपरा, पृष्ठ ७७)

सन १९५९ मध्ये अप्रबुद्धांनी एका वेगळ्याच दृष्टिकोणातून 'द्वितीय दत्तावतार नृसिंहसरस्वती; चरित्र, परंपरा, कार्य व गूढे' या नावाचा एक छोटासा ग्रंथ लिहिला. गो. प्र. भावे व अप्रबुद्ध यांचा दत्त, दत्तपंथ व नृसिंहसरस्वतींचे कार्य यांकडे पाहण्याचा एक स्वतंत्र दृष्टिकोण आहे. सत्पुरुषाच्या कार्याच्या राष्ट्रीय अंगाचे चिंतन अप्रबुद्ध करताना दिसतात. या विशिष्ट दृष्टीने त्यांनी श्रीगुरूंचे चरित्र तपासले आहे. श्रीगुरुचरित्रात आलेली व्रतवैकल्ये, कर्मकांडमीमांसा इत्यादींचे रहस्य सांगून झाल्यावर अप्रबुद्ध नृसिंहसरस्वतींच्या कार्याचे मूल्यमापन करताना लिहितात,

'धर्मस्थापना हेच मुख्य कार्य असल्यामुळे श्रीगुरूंनी कोणत्याही एका विशिष्ट देवाची भक्ती वाढविली नाही. ते स्वतः श्रीदत्तावतार होते अशी त्यांच्या भक्तांची श्रद्धा असल्यामुळे दत्तभक्तिप्रसार त्यांच्या भक्तगणात वाढला असता तर नवल नाही. पण त्यांचा स्वतःचा असा-कोणत्याही विशिष्ट देवाच्या भक्तीवर भर नव्हता. तप हाच त्यांचा व्यवसाय होता. म्हणून 'अवतार धरताच मानुषी। तयापरी रहाटावे' या न्यायाने ते स्वतः नृसिंहाची उपासना करीत. परंतु तिचा त्यांनी प्रसार केला नाही. त्यांचे घराणे शिवव्रती असल्याने साहजिकच शिवाचा व शिवव्रताचा उल्लेख त्यांच्या भाषणात जास्त आला आहे. तरी त्यामुळे गैरसमज होऊ नये अशी परा-

# ४ श्रीदत्तात्रेय-परंपरा

श्रीविष्णु अवतार प्रसग ।
विष्णुदत्त भाव अभग ।
आयु यदु अलर्क असग ।
एकवीर एकावली ॥
सहस्रार्जुन भार्गवराम ।
दाशरथि श्रीराजाराम ।
कृष्ण भगवत पुरुषोत्तम ।
नवयोगेश्वर नाथ नव ॥
श्रीवासुदेवानद सरस्वती ।
नर्मदातीरी देह त्यजती ।
भारती वैदिक धर्म महती ।
श्रीपादकीर्ति विलसतसे ॥
श्रीनरसिंह सरस्वती ।
पाचशे वर्षे काया फिरती ।
प्रज्ञापुरी काया ठेविती ।
तरीही अखड भक्ता कृपा ॥
श्रीमाणिक सद्गुरु दत्त ।
अनत लीला वृत्ति शात ।
सकलमते एक मार्गात ।
यति होऊन समाधि ॥
भूगोलभाग्य वेदधर्म ।
त्यासाठीच श्रीदत्तजन्म ।
एकच मार्ग आत्माराम ।
दत्तपथ प्रसिद्ध असे ॥

—वि गो नातूकृत 'श्रीदत्तचरित्रसार'
(७७ १०४–१०९)



## समन्वयाचे स्वरूप

दत्त दैवताचे रूप, दत्तजन्माच्या विविध कथा याचा परिचय करून घेतानाच आपल्या ध्यानात आले आहे की, या दैवताचे स्वरूप समिश्र आहे,

समन्वयाचे आहे, विविधतेत ऐक्य पाहाण्याचे आहे ब्रह्मा, विष्णू, महेश नाव किंवा सत्त्व, रज, तम नाव, त्रिविध प्रकृतिधर्मांचा व शक्तींचा सुरेख संगम दत्तात्रेयात दिसून येतो. दत्त स्मरण करणाऱ्यांना पावतो. दत्त भौतिक व आत्मिक सुखाची प्राप्ती करून देतो, दत्त प्रापंचिकांना व साधकानाही मार्गदर्शन करतो, दत्त कधी राज-योगी असतो, तर कधी मलंग वेषात, कधी भिक्षेकरी अवधूताच्या वेषात, तर कधी व्याघ्र-सर्पांच्या रूपात भेटतो दत्तात्रेयाच्या या विविधतेत भारतीय परंपरेतील बहुतेक सर्व उपासनापंथ सामावलेले दिसतात शैव व वैष्णव यांना सारख्याच प्रियतेने दत्तात्रेय जवळचे वाटतात नाथ, महानुभाव, गोसावी, अवधूत, सूफी, वार-करी, रामदासी, देवी इत्यादी अनेक धर्मपंथांना वा उपासनापंथांना दत्तात्रेय आपले वाटतात. दत्तात्रेयाच्या परंपरेत ब्राह्मण आहेत, अब्राह्मण आहेत, शूद्र आहेत, अत्यज आहेत, स्त्रिया आहेत, पुरुष आहेत इतकेच नव्हे तर रा. प्र. पारनेकर महाराजांच्या मताने 'कामरूप देशात (आसाम-मणिपूर इ० भागात) नागा वगैरे आपल्यापेक्षा कनिष्ठ जातींचे आणि आदिवासी समजले जाणारे लोक आहेत ते बंगालच्या गारुड, शाबर, कापालिक आदिपासून निराळ्या अशा एका दत्तपंथाचे मानिक आहेत' (परिचय पृष्ठ १८३) दीनदर्वेश, नूरीबाबा, 'सिद्धान्तबोध'कर्ता शाहमुनी इत्यादी मुस्लिम संतांचाही निर्देश करावयास हवा प्रमुख धर्मपंथात दत्तात्रेयाचे स्थान कोणते ते आपण पुढे स्वतंत्रपणे पाहाणार आहोतच

परंतु येथे संक्षेपाने विचार करावयाचा तर असे म्हणता येईल की, नाथसंप्रदायाची जोपासना दत्ताच्या बोधावर व उपासनेवर झालेली आहे अनेक नाथांचे गुरु दत्तात्रेय आहेत भगवान शंकराच्या सांगण्यावरून दत्तात्रेयांनी अनेक नाथांना उपदेश दिल्याचे दिसते बद्रिकाश्रमी मत्स्येन्द्रांना दत्तात्रेयांनी सर्व विद्या शिकविल्या नाथसंप्रदायांना ग्राह्य वेषही दत्तप्रणीत आहे. योगदीक्षा, कानफाडे हे नाव, शिंगी, शैली, त्या इत्यादींचे प्रमाण अग्निदत्ताने दिले असल्याचे प्रसिद्ध आहे. अत्री व दत्त आणि अग्नी यांचा संबंध आपण पाहिला आहे अग्नीचा आणखी एक पुत्र म्हणजे जालंदर असून दत्तात्रेयांनीच याला सर्व शास्त्रे शिकविली भर्तृहरी राजाला मंत्रोपदेश दत्ताचाच होता गोरक्षनाथांना गिरनार पर्वतावर दत्तात्रेयांनीच उपदेश केलेला आहे. रेवणसिद्धाला वाटण्यात दत्तदर्शन होऊन पुढे त्याला दत्ताचा अनुग्रहही झाला नागनाथ सिद्धाला सिद्धींची प्राप्ती दत्तात्रेयांनी करून दिलेली आढळते चर्पटनाथावरही दत्तात्रेयाची कृपा होती गोसावी, अवधूत इत्यादींचा आचार-विचार, तत्त्वज्ञान, ध्यानधारणेची पद्धत इत्यादी-वर दत्ततत्त्वज्ञानाची छाप मोठीच आहे

नाथपंथाइतकाच महानुभाव पंथही महारा-ष्ट्रात, पंजाबात प्रसिद्ध आहे श्रीचक्रधरप्रणीत या धर्मपंथात तर 'या मार्गासी आदिकारण श्रीदत्तात्रेय प्रभु की गा' एवढे मोठे स्थान दत्तांना आहे महानुभवांचा दत्त एकमुखी असून भृगुवृत श्रीदत्तात्रेयकवच त्यांच्या पठणात नित्य असते. त्यांचा दत्त निर्गुण, निराकार, परब्रह्मस्वरूपाचा आहे श्रीचक्रधरस्वामी हे दत्ताचे अवतार म्हणूनच मानले जातात श्रीचांगदेव चक्रपाणी, श्रीगोविंदप्रभू या चक्रधरांच्या गुरुपरंपरेतील महात्म्यांना दत्तात्रेयाचे दर्शन झालेले होते

सह्याद्रिवर्णन, दत्तात्रेयबाळक्रीडा, दत्तात्रेय-माहात्म्य, आत्मतीर्थप्रकाश इत्यादी ग्रंथातून महानुभावीय दत्ताचे दर्शन होण्यास।रखे आहे अप्रसिद्ध वाङ्मयही या संदर्भात महानुभावीय मठातून बरेच असावे माहूर येथील देवदेवेश्वर, पांचाळेश्वर येथील आत्मतीर्थ, चेलापूर, बद्रिका-श्रम, कोल्हापूर अशी प्रमुख दत्तस्थाने महानु-भावांना प्रिय वाटतात शहादे, जालना, नानोरी रिद्धपूर, पिंपळनाग, चोखड इत्यादी ठिकाणी

महानुभावीय दत्तपरंपरेतील दत्तमंदिरे आहेत. जवळा, लाख, डिग्रस, पुसद, खरसी, पारडी, गगनमाळ, कृष्णपुर,* मन्नोळ इत्यादी ठिकाणी विश्वनाथ बाळापुरकर यांनी दत्तस्वामींच्या प्रेरणेने बांधलेली देवळें साडी नावाने प्रसिद्ध आहेत. नांदगांव खडेश्वर, शिरपूर इत्यादी ठिकाणी नव्याने दत्तमंदिरे होताना दिसतात. अशाच प्रकारे वारकरी, रामदासी, देवी इत्यादी पंथाशीही दत्तात्रेयाचे संबंध समन्वयाच्या स्वरूपात दाखविता येतील.

वारकरी पंथास खाद देऊन त्याचे पुनरुज्जीवन करणाऱ्या एकनाथाची उपासना दत्ताची होती. दत्त-विठ्ठल, दत्त-राम, दत्त-देवी यांना एकरूपात पाहाणारे अनेक साधुसंत दिसतील. कोल्हापूर, मातापूर, तुळजापूर इत्यादी देवीस्थानात दत्तात्रेयाचे देऊळ दिसते. मातापूरच्या रेणुकेचे सहगमन दत्तात्रेयाच्या साक्षीने झाले. तिचा पुत्र परशुराम हा दत्तात्रेयाचा शिष्य. म्हणूनच चिपळूणजवळील परशुरामास सोबत दत्तात्रेय करताना दिसतात. 'दत्तप्रबोध' कर्ते अनंतसुत कावडीबाबा पांडुरंगाचे एकनिष्ठ भक्त होते. 'तीन शिरें सहा हात' हा दत्तावरील प्रसिद्ध अभंग वारकरी संप्रदायाचे मुकुटमणी संत तुकोबारायाचा आहे. 'दत्तात्रेय योगिया'-वरील ज्ञानदेवाचा अभंग प्रसिद्ध आहे. समर्थांना दत्तात्रेयांनी मलंगवेषाने दर्शन दिल्याचे प्रसिद्धच आहे. आनंदसंप्रदायातील श्रीधरस्वामी नाझरेकर व 'हरिवरदा'कार श्रीकृष्णदयार्णव आणि यांच्या गुरुपरंपरा दत्तात्रेयाशी संबंधित आहेत. तुकोबाच्या चैतन्यसंप्रदायातील राघव चैतन्यांनी दत्ताची उपासना केली होती. अर्वाचीन काळातील थोर दत्तोपासक भैरवअवधूत हे चैतन्यसंप्रदायातीलच होत. असे अनेक उपासनापंथ श्रीदत्तात्रेयाशी संबंधित आहेत. समन्वयाचे इतके सोज्वळ व सर्वसंग्राहक दर्शन इतर कोणत्या पंथात दिसणार?

# पौराणिक परंपरा

दत्तात्रेयाच्या पौराणिक शिष्यांचा उल्लेख मागे आला आहे. दत्तांनी त्यांना केलेल्या तत्त्वबोधाचे विस्तृत विवेचन पुढे एका स्वतंत्र प्रकरणात केले आहे. येथे फक्त दत्तपरंपरा ध्यानात येण्यासाठी दत्तशिष्यांची ओळख करून घेऊ. कार्तवीर्य सहस्रार्जुन हा यज्ञ, जप, दान, कर्म, विद्या, पराक्रम इत्यादी बाबतीत श्रेष्ठ होता. दत्तात्रेयाचा हा आवडता शिष्य. त्याने दत्तात्रेयाची सेवा दीर्घकाळपर्यंत केली. दत्तांनी त्याला सर्वज्ञता, इष्ट अतिथिलाभ, सर्वत्र गती, क्षय न पावणारा खजिना, अनेक रूपधारकता, कीर्तीने अधिक असलेल्याकडून रणांगणावर मरण, अनन्यभक्ती इत्यादी वर देऊन कृतार्थ केले. योगाभ्यास व ब्रह्मज्ञान यांचीही प्राप्ती याला दत्तात्रेयाकडूनच झाली. 'मदालसा गर्भरत्न' असा अलर्क हा दत्तात्रेयाचा आणखी एक प्रख्यात शिष्य. याची आई मदालसा ही ब्रह्मवादिनी व सर्वविद्यापारंगत अशी होती. संकटप्रसंगी याने माहुरगडावर जाऊन दत्तात्रेयाची उपासना केली. दत्तांनी प्रसन्न होऊन अलर्काला शक्तिदान देऊन आत्मबोधाचा उपदेश दिला. पुढे आपल्या पुत्रांना राज्यावर बसवून अलर्काने जन्मभर दत्ताची सेवा केली व ज्ञानोत्तर भक्तिसुखाचा अनुभव घेतला.

सोमवंशातील राजा आयू हा दत्तात्रेयाचाच शिष्य. आयू व त्याची राणी इंदुमती यांनी पुत्रप्राप्तीसाठी अनेक अनुष्ठाने केली. आयूने सह्याद्रीवर येऊन तपश्चर्या केली व दत्तात्रेयांना प्रसन्न करून घेतले. त्रिलोकाविषयी सर्वज्ञ, रणशूर, पितृदेवभक्त, सर्वगुणसंपन्न असा पुत्र आयूने मागितला. दत्तप्रसादे करून राणी इंदुमती गर्भवती झाली. प्रसूत झाल्यानंतर नवजात बालकास हुंडासुराने पळविले. दत्तात्रेयाच्या कृपेने हुंडासुरास हे बालक नष्ट करणे

जमले नाही उलट या मुलानेच पराक्रमाने हुडासुरास मारले पुत्रास राज्यावर बसवून आयू राजा राणीबरोबर सह्याद्रीवर येऊन दत्तचरणसेवेत रमून गेला श्रीकृष्णाच्या यादव वंशाचा मूळ पुरुष यदू हाही एक दत्तात्रेयाचा शिष्य होय ययाती व देवयानी याचा हा ज्येष्ठ पुत्र आपण वडील असूनही आपणास सार्वभौमपद न मिळाल्याने तो रानावनात जाऊन वैराग्य वृत्ती धारण करून तप करू लागला तेथेच त्याला ब्रह्मानंदात निमग्न झालेल्या श्रीदत्ताचे दर्शन झाले दत्तात्रेयानी त्याला आपल्या चोवीस गुरूकडून झालेला बोध विशद केला. अशा प्रकारे भक्तश्रेष्ठ प्रल्हाद, साध्यदेव, पिंगलनाग, विष्णुदत्त इत्यादी अनेक दत्तशिष्याची नावे सागता येतील श्रीपरशुराम अथवा भार्गव हाही एक दत्तात्रेयाचा थोर शिष्य म्हणून प्रसिद्ध आहे दत्तानी याला दिलेली ब्रह्मविद्या त्रिपुरारहस्य नावाच्या ग्रथात समाविष्ट असून त्यातील ज्ञानकाड दत्तभार्गवसवादरूपाने प्रसिद्ध आहे. या सर्व शिष्याबरोबरच अवधूतोपनिषद व जाबालदर्शनोपनिषद् यातील साकृति नावाचा एक ब्राह्मण शिष्यही दत्ताचा होता

## 'श्रीगुरुचरित्रा'ची परंपरा

चौदाव्यापधराव्या शतकात श्रीपादवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती या दोन दत्तावतारानी जे कार्य केले त्याचा परिचय आपण मागेच करून घेतला आहे आजच्या दत्तोपासनेचे बरेचसे स्वरूप 'श्रीगुरुचरित्र' व औदुबर, नृसिंहवाडी, गाणगापूर या दत्तस्थानातील परपरावर अवलबून आहे. या स्थानाच्या यात्रा, येथे पारायण, ध्यानधारणा, उपासना इत्यादीची जोपासना दत्तपरपरेत झालेली दिसून येते दत्तात्रेयानी अवधूतस्वरूपात अथवा मलग वेषात साक्षात् दर्शने देऊन जशी आपली परपरा निर्माण केलेली दिसते, तशीच ती श्रीपादवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती या अवताराना गुरुस्थानी मानूनही वाढलेली दिसते. श्रीपाद व श्रीनृसिंह हे दोन दत्तस्वरूपातच प्रकट झाल्याची श्रद्धा अनेक ठिकाणी आहे जनार्दनस्वामी, एकनाथ, दासोपत, निरजन रघुनाथ, नारायण महाराज जालवणकर, माणिकप्रभू, अक्कलकोटकर स्वामीमहाराज, वासुदेवानदसरस्वती इत्यादी अनेक श्रेष्ठ दत्तभक्ताना दत्तावताराचेच स्वरूप प्राप्त झाले आहे यातील अनेकाना साक्षात् दत्तात्रेयाचा साक्षात्कार झालेला आहे अनेक तर दत्तावतारीच आहेत अनेकाचा सबध दत्तावतारी श्रीनृसिंहसरस्वतीकडे पोचतो

श्रीपादवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती याच्या प्रेरणेने, प्रभावाने दत्तपरपरेचा विस्तार सर्वत्र झालेला दिसतो या दोन दत्तावतारानी दत्ताच्या उपासनेचे स्वरूप कोठेच स्पष्ट केले नसले तरी त्याच्या वास्तव्याने पुनीत झालेली स्थाने दत्तभक्ताना अतिशय प्रिय आहेत कारजा, औदुबर, नृसिंहवाडी, गाणगापूर इत्यादी स्थाने श्रीनृसिंहसरस्वतीच्या तेथील वास्तव्यामुळे प्रसिद्ध होऊन दत्तपरपरेचा विस्तार होण्यास त्याची मदत झाली या सर्व स्थानाचे सक्षेपाने दर्शन स्वतत्रपणे आपण घेणार असलो तरी दत्तपरपरेच्या विस्ताराच्या सदर्भात त्याचा येथे उल्लेख करणे अगत्याचे आहे

श्रीनृसिंहवाडी अथवा नरसोबाची वाडी येथे श्रीनृसिंहसरस्वतीचा निवास एक तपाच्यावर असल्यामुळे व मुळातच त्याला क्षेत्रस्थानाची पीठिका असल्यामुळे अनेक दत्तभक्ताच्या तपाचे व निवासाचे ते स्थान बनले आहे दत्तात्रेयाच्या परपरेतील अनेक सन्याशी येथे स्थिरावलेले दिसतात दत्तस्थानाबरोबरच या सत्पुरुषाच्या समाधिस्थानालाही वदन केले जाते श्रीनारायणस्वामी, श्रीगोपाळस्वामी, काशीकरस्वामी, सोला-

पुरात व पढरपुरात दत्तपादुका स्थापन केलेले श्रीमौनीस्वामी, श्रीटेंबेस्वामी, श्रीरामचद्रयोगी, श्रीब्रह्मानदयोगी, टेंबेस्वामींचे शिष्य श्रीनृसिंह-सरस्वती (दीक्षितस्वामी) इत्यादींची स्थानें दत्तपरपरेतील म्हणून आज प्रसिद्ध आहेत

येथे अनेक सिद्धाना व महात्म्याना दत्तात्रेयानी दर्शन दिले आहे गाणगापुरात तर श्रीनृसिंह-सरस्वती दोन तपाच्यावर वास्तव्य करुन लोकोद्धाराचे कार्य चालवीत होते कुमसी गावातील त्रिविक्रमभारती हिपरगी येथील नदिनामा व नरहरी, कडगची येथील सायदेव, नागनाथ, देवराव गगाधर व गुरुचरित्रकार सरस्वती गगाधर इत्यादींनी श्रीगुरुचरित्रातील नृसिंहपरपरा चालीस लावली आहे श्रीसच्चिदानद सरस्वती ऊर्फ इटगास्वामी याची समाधी येथून जवळच इटगापुरी येथे आहे प्रसिद्ध क्रातिकारक वासुदेव बळवत फडके याचे वास्तव्यही गाणगापुरास काही काळ होते कारजा हे नृसिंहसरस्वतीचे जन्मग्राम असून श्रीवासुदेवानदसरस्वती अण्णासाहेब पटवर्धन, श्रीब्रह्मानदस्वामी ऊर्फ लीलदत्त महाराज इत्यादींच्या प्रयत्नाने श्रीनृसिंह-सरस्वतीचे जन्मस्थानही पक्के करण्यात आले आहे श्रीनृसिंहसरस्वतींच्या प्रमुख शिष्याची माहिती मागच्या प्रकरणात आपण घेतली आहेच त्याचा एक माधवेद्र नावाचा शिष्य होता त्याचा एक शिष्य अमृतानद याचा 'योगराज-टिळक' नावाचा एक ग्रथ दत्तसप्रदायाचा मानला जातो

# निरंजन रघुनाथांची परंपरा

बालाघाटी वजरा नदीच्या काठी परळी-वैजनाथच्या पूर्वेस चार योजनावर असलेल्या कळव गावी निरजन रघुनाथाचा जन्म झाला याचे पूर्वाश्रमीचे नाव अवधूत परतु गुरू रघुनाथस्वामी यानी याना 'निरजन' असे नाव ठेवले ऐन वयातच विरक्ती उत्पन्न झाल्याने दत्तसाक्षात्कारासाठी गिरनारला गेले तेथे त्याना सगुणस्वरूपात दत्तदर्शन झाले ही गोष्ट शके १७३४ च्या भाद्रपद ११ स घडली नाशिक, जुन्नर, कळव, कोल्हापूरकडील बळवडे, मिरज इत्यादी ठिकाणी हिडून स्वामीनी दत्तभक्तीचा प्रसार केला व रामचद्र तात्या गोखले, गोविंदराव नाना पटवर्धन-शास्त्री इत्यादी शिष्य मिळविले. मिरजेचे श्रीमत गगाधरराव बाळासाहेब पटवर्धनही त्याचे शिष्य झाले याची ग्रथरचनाही विपुल असून याचे आत्मवृत्त रसाळ व साक्षात्कारी बनले आहे. याची उपासना एकमुखी दत्ताची असून याचे नातू विश्वनाथबोवा यानी काशी येथे श्रीदत्तात्रेयाची स्थापना केली मिरजेच्या किल्ल्यातही निरजन रघुनाथ यानी स्वहस्ते बसविलेली एकमुखी षड्भुजी दत्तमूर्ती सुरेख आहे

निरजन रघुनाथ याच्या दत्तभक्तीची परपरा सुरत, बडोदे, गिरनारप्रमाणेच उत्तरेस झाशीपर्यंत पोचलेली दिसते झाशीजवळच्या जालवण गावचे नारायणमहाराज यानाही असाच दत्तभक्तीचा नाद होता यानीही गिरनारवर दत्तसाक्षात्काराराठी धरणे धरल्यावर फकीररूपी दत्तात्रेयानी याना निरजनस्वामींच्या स्वाधीन केले निरजन रघुनाथाच्या शिष्यात नावाजलेले शिष्य म्हणजे हे नारायणमहाराज जालवणकरच होत गिरनार, द्वारका, रामेश्वर, काशी, जगन्नाथपुरी, ब्रह्मावर्त, ग्वाल्हेर, हरिद्वार, देवास इत्यादी ठिकाणी राहून नारायणमहाराजानी दत्तभक्तीचा प्रसार केला याचीही ग्रथसपदा बरीच आहे. याच्या शिष्यपरपरेत इदूरचे श्रीलक्ष्मणमहाराज हे एक प्रमुख सत्पुरुष होत याचा अनुग्रह देवासचे बलभीमबोवा साडेकर याना आहे बलभीमबोवाचे चरित्र नाशिकचे रा व साडिल्कर यानी लिहिले आहे याचीही शिष्यपरपरा मोठी होती नरसिंगगड येथे बोवाची समाधी आहे

त्याच्यानतर त्याचे चिरजीव श्रीदत्तमहाराज यानी सप्रदाय चालविला या परपरेचा धर्म भागवतधर्म, सप्रदाय दत्तात्रेय व मार्ग विहगम असे सागितले जाते

निरजन रघुनाथ व नारायणमहाराज जालवणकर याच्याच दत्तभक्तीचा धागा मुबईच्या जोगेश्वरीस सद्भक्तिमदिरात बळकट झालेला दिसतो येथील रामेश्वर मदिरातील रामपचायतनात दत्तात्रेयाचा समावेश आहे पुडलीकवरदायक विठ्ठल, श्रीगुरुदेवदत्त, श्रीमागिरीश, रामेश्वर-रसेश्वर, श्रीशातादुर्गा, आद्यसद्गुरु श्रीनारायणमहाराज, निरजन रघुनाथ, जनार्दनस्वामी, एकनाथमहाराज, वामनपडित इत्यादीना सारखाच मान असला तरी दत्तप्रभूचा प्रभाव या देवस्थानावर मोठाच आहे 'यावा आता कळवळा। अत्रिअनसूयेच्या बाळा। आताच येई अनतयाळा। महापुरुषा सर्वज्ञा॥' असा नामघोष भजनानतर येथे असतो. श्रीअत्री, श्रीदत्तपचायतन, श्रीगुरुदेवदत्त, श्रीनारायणमहाराज जालवणकर, रत्नागिरीवासी श्रीनारायणबाबा, श्रीराधाकृष्ण तोरणे, सद्गुरु श्रीशकर ऊर्फ श्रीबाबा, श्रीवामनपडित इत्यादीना या परपरेत महत्त्वाचे स्थान आहे 'दत्ता ! दिगवरा ! दिगवरा ! सद्भक्ति द्या करुनि त्वरा' असा जयघोप सद्भक्तिमदिरात असतो श्रीदत्तात्रेय व आद्यसद्गुरू नारायणमहाराज जालवणकर याच्या भेटीचे एक साप्रदायिक चित्रही या परिवारात प्रसिद्ध आहे श्रीरामचद्र शकर टाकी महाराज यानी सद्भक्तिमदिराच्या उपासनेस तात्त्विक बैठक प्राप्त करून दिली थोर दत्तभक्त एकनाथ याचे 'प्रतिष्ठानचरित्र' याच्याच प्रयत्नाने दत्तभक्ताच्या हाती आले आहे

## 'सकलमत' संप्रदाय

आधुनिक काळातले दत्तात्रेयाचे चतुर्थअवतार म्हणून ज्याचे नाव घेतले जाते त्या हुमणाबादेच्या श्रीमाणिकप्रभूचा दत्तसप्रदाय ऐश्वर्यशाली व राजयोगी म्हणून प्रसिद्ध आहे सोने, मोती, हिरे, भरजरी वस्त्रे, सगीतादी कला याचे मोठे विलोभनीय दर्शन या सप्रदायात होते श्रीचैतन्यदेव हे या सप्रदायाचे उपास्य दैवत दत्तात्रेयाचे स्वरूप येथे मधुमती नावाच्या शक्तिसहित कल्पिले आहे. हिंदू व मुसलमान, गरीब व श्रीमत सारख्याच योग्यतेने या पथात वावरतात. श्रीमाणिकप्रभू, श्रीमनोहर प्रभू व श्रीमार्तण्डमाणिकप्रभू या पुरुषानी दत्त व श्रीकृष्ण याच्यावरील सगीतास अनकूल अशा रागदारीतील अनेक पदे लोकप्रिय केली आहेत सकलमताचार्य चतुर्थ दत्तावतार श्रीमाणिकप्रभू याच्या सप्रदायास सकलमती नाव असण्याचे कारण असे की, यात सर्व सप्रदायाची एकनिष्ठता केली आहे इतर कोणत्याही सप्रदायास याचा विरोध नाही. जगातील सर्व धर्म व सप्रदाय त्याच्या त्याच्या अनुयायाना परमेश्वराची प्राप्ती करून देणारे आहेत असे हा सकलमत सप्रदाय मानतो

वर सागितल्याप्रमाणे चैतदेव ( आत्मदेव ) ही या सप्रदायाची उपास्य देवता असून तिला उपासकाच्या सौकर्यासाठी सर्वात्मा, परब्रह्म असे म्हणतात तिलाच आधिदैविक स्वरूपात जगद्गुरू श्रीदत्तात्रेयाचा चतुर्थ अवतार श्रीमाणिकप्रभू अशी सज्ञा प्राप्त झालेली आहे. याच देवतेला आधिभौतिक स्वरूपात गुलबर्ग्याजवळील कल्याण प्राती रामतीर्थ क्षेत्रानजीक लाडवती गावचे वतनदार कुलकर्णी मनोहर महाराज याचे चिरजीव या नावाने ओळखतात दत्तात्रेयाची आदिशक्ती मधुमती ही याच सप्रदायात महत्त्वाची मानली गेली आहे धारेश्वरी, जबुवादिनी, अरुणिका, मीनाक्षी ही याच मधुमतीची नावे होत साप्रदायिक उपासनेत मधुमतीसमवेत श्रीदत्तात्रेयाचे ध्यान केले जाते 'भक्तकामकल्पद्रुम गुरू सार्वभौम श्रीमद्राजाधिराज योगी महाराज त्रिभुवनानद अद्वैत अभेद निरजन निर्गुण निरालब

परिपूर्ण सदोदित सकलमतस्थापित सद्गुरु माणिकप्रभू महाराजकी जय' असा या संप्रदायाचा महामंत्र आहे.

सकलमतसंप्रदायाचे सिद्धान्तरहस्य समजण्यासाठी काही सूत्रे ध्यानात ठेवण्यासारखी आहेत- (१) आत्मस्वरूपलक्षणे–सत्, चित्, आनंद व प्रकाश तशीच तटस्थ–लक्षणे व्यापक, ईश्वर-प्रेरक ही नीटपणे समजून घ्यावीत. (२) मत-मतांतराविषयी द्वेष न मानता प्रेम बाळगावे. (३) नित्य वाराधिपतीचे भजन, पंचपदी, आरती, शेजारती, उपदेशरत्नमाला यांचा पाठ करावा. (४) सवडीप्रमाणे रोज नियमाने श्रीप्रभूंच्या गादीपुढे वा तसबिरीपुढे नामघोष करावा, व प्रेमाने नाचावे. (५) गुरुवारी आणि शनिवारी संध्याकाळी आरत्या व अष्टके म्हणून फुले वाहावी व श्रीप्रसाद सर्वांना वाटावा. (६) पूजेचे अनंत प्रकार असले तरी मानसपूजा, यथाभिलाषित ध्यानधारणा यांना प्रामुख्य असावे. (७) आत्म-विद्याभ्यास अगत्याने संपादन करावा. (८) दिवसभरात एकदा तरी अर्धा तास एकान्तात मानसिक आत्मचिंतन करावे. (९) आत्मा आकाशाप्रमाणे अस्पर्श आहे. पांचभौतिक विकार तत्संघातकृत विषय, इंद्रियव्यापार, मानसशक्ती यांचा कोणाच्याही आत्म्यावर आघात होत नाही हे निश्चयाने ठसवावे. (१०) कैलास, वैकुंठ, स्वर्ग, ब्रह्मलोकादी सर्व पांचभौतिक, आत्मप्रकाश-बिंबित मानसशक्तीने मीच बनविले आहेत, माझा आत्मा ह्या लोकाहूनही अनंतपट विभू, स्वयं-प्रकाशभूत आहे हे ओळखावे. या संप्रदायाच्या 'ज्ञानमार्तण्ड' नावाच्या ग्रंथात पृष्ठ २५५ ते ६२ पर्यंत या सिद्धान्तरहस्याचे विवेचन आहे.

माणिकनगर अथवा हुमणाबाद येथील श्रीमाणिकप्रभूंच्या या दत्तसंप्रदायाचे वा परंपरेचे एक वैशिष्टय म्हणजे, या पंथात सर्व धर्मांच्या, जातींच्या, पंथांच्या लोकांना प्रवेश आहे. कित्येक मुसलमानही या गादीस लवून वागणारे आहेत. दुसरे वैशिष्टय म्हणजे, ऐहिक वैभव व ऐश्वर्य यांचे भव्य दर्शन या परंपरेत होते. राजकीय दरबाराप्रमाणे माणिकप्रभूंच्या लोकदरबाराचा थाट असे. प्रभूंच्या डोकीस कधी भरजरी मंदील, अंगात उंची प्रतीचा अंगरखा, गळयात मोत्यांचे हार, कानात कर्णभूषणे, शिरपेच, तुरा पागोटयास खोवलेला, डोळयात सुरमा व तोंडात हुक्क्याची नळी, असा थाट असे. तर कधी अंगात कफनीही दिसे. शास्त्री लोकांच्या तत्त्वचर्चेप्रमाणेच गायन, वादन, नृत्य यांचेही कार्यक्रम या दरबारात होत असत. प्रभूंच्या द्वाराव हत्ती, घोडे, पालख्या, मेणे व राजेराजवडे झुलत असत. प्रभूंना संस्कृत, कन्नड, तेलुगू, उर्दू, फार्सी, मराठी इत्यादी भाषा येत असल्याने तितके भाषिक त्यांच्याकडे आकर्षित होत असत. द्रव्याची वा धनसंपत्तीची कधी कमतरताच नव्हती. 'कोठून द्रव्य येते । माहीत न होय कोणाते । गादीवर बसतां त्वरितें । मुष्टी भरभरूनी देताती ॥' असाच थाट नेहमी असे. प्रभूंच्या परिवारात बाजी भोसले, कदी किशन-राव, जयप्पा सोनार, आबाराव नायब, मॅडोज टेलर, तुकाराम धनगर, टर्रा हुसेनखा, नाना नाच्या असे विविध प्रकारचे लोक असत. राजेरजवाडे, अमीरउमराव, शेटसावकार, साधुसंत, बैरागी, गोसावी, ब्रह्मचारी, संन्याशी, शास्त्री, वैदिक, पुराणिक, हरिदास, गवई, आण्णाबुवामहाराज, कोल्हापूरचे कृष्णस्वामी (कुंभार गल्लीतले स्वामी) व यशवंतराव देव मामलेदार यांचा व प्रभूंचा निकटचा संबंध होता. अक्कलकोटचे स्वामी व माणिकनगरचे प्रभू यांचा एकान्तवास झालेला होता. प्रभूंच्या संस्थानात दत्तजयंतीचा सोहळा अप्रतिम असे. जगमाचा मेळा, मोहरम, महबूब सुभानीची ग्यारवी, असे आणखी काही उत्सव दत्तपंथीय अशा या सकलमत संप्रदायात होत असत. बापाचार्य, नारायण दीक्षित, चिमण्या ब्रह्मचारी, गोपाळबुवा, रामभाऊ लंगोटी, दयाळ-पंत दुबळगुंडी, शरण साधू, रामकृष्णपंत तह्सील-

दार, विठ्ठलराव तेरपल्ली, रावजीबुवा, चिंतामणबुवा, संतरामदादा गवंडी; अशा अनेक प्रकारचा शिष्यवृंद श्रीमाणिकप्रभूंभोवती जमा झाला होता.

# अक्कलकोटकरांचा परिवार

हुमणाबादच्या श्रीमाणिकप्रभूप्रमाणेच अक्कलकोटनिवासी स्वामी समर्थांनी आपल्या अद्‌भुत लीलांनी साऱ्या महाराष्ट्रात नाव मिळविले आहे. अक्कलकोटकर स्वामी हेही दत्तात्रेयाचे वा नृसिंहसरस्वतींचे अवतार मानले जातात. त्यांचाही शिष्यपरिवार मोठा व विस्तृत असून त्यांचे मठही भारतात अनेक ठिकाणी पसरलेले असल्याने दत्तभक्तीचा प्रसार आपोआपच होत राहिला आहे. स्वामी समर्थ अक्कलकोटकरांच्या लीलासमयीच काही मठ स्थापन झाले होते; तर काही नंतर त्यांचे शिष्य श्रीबाळप्पामहाराज व श्रीस्वामीसुत यांनी प्रयत्न करून स्थापन केले. श्रीक्षेत्र अक्कलकोट येथेच श्रीगुरुमंदिर ऊर्फ बाळप्पा महाराज मठ, वडाखालचा मठ, समाधीचा चोळप्पांचा मठ, गावाबाहेरचा राजेरायरायनचा मठ, जोशीबुवांचा मठ; अशी विविध स्थाने प्रसिद्ध आहेत. अक्कलकोट हे स्वामींचे लीलास्थान असल्याने दत्तभक्तांना त्याचे आकर्षण मोठेच आहे. पुण्यास ग्लोब टॉकीजजवळ स्वामींचा मठ असून त्यात त्यांची कमरेवर एक हात ठेवलेली उभी संगमरवरी मूर्ती आहे. समर्थांच्या प्रासादिक चर्मपादुकाही आहेत. सदाशिव पेठेत भटाच्या वाड्यातही स्वामींचे एक स्थान आहे. शिवाजीनगर येथील रोकडोबाच्या मंदिराजवळ गोविंदजी डागे यांच्या घरी स्वामींच्या चांदीच्या पादुका स्थापित झाल्या आहेत.

अक्कलकोटकर स्वामींच्या कार्याचा प्रसार मुंबईत आहे. गिरगावात श्रीस्वामीसुतांनी एक मठ कांदेवाडीत स्थापन केला. स्वामींचे प्रशिष्य श्रीतात महाराजांचे शिष्य सुरतेचे श्रीबाळकृष्ण महाराज यांनी दादरला पी. एल्. वैद्य रस्त्यावर एक स्थान निर्माण केले. श्रीकृष्णबुवा ठाकुरदास यांचे कुष्ठ स्वामीकृपेने नाहीसे झाले म्हणून त्यांनी श्रींच्या पादुका श्रीरामाच्या देवस्थानात छोट्या मंदिरात ठाकुरद्वारात स्थापन केल्या. महालक्ष्मीवर एका लहानशा मंदिरात विनायकराव वासुदेव यांनी पादुकांची स्थापना केली. कोल्हापूरजवळ सायवडे, अक्कलकोटजवळ मंदरगी, रत्नागिरी जिल्ह्यात शिवडाव, मराठवाड्यात जालना, विदर्भात मूर्तिजापूर, नागपूरकडे उमरेड इत्यादी ठिकाणी अक्कलकोटकरांच्या पादुकांची स्थाने आहेत. मंदरगी येथील पादुकांची स्थापना तर एका मुसलमान जामदाराने केलेली दिसून येते. बडोदे, सुरत, वेंगुर्ले कँप, येवले, हडावडे (सावंतवाडी), केज (मराठवाडा), देवलग्राम, राजुर, नगर, रत्नागिरीजवळ नासरे, विजापूर, ठाणे, वसई, चिपळूण, देहू, चर्चन, सावईवेरे (गोमंतक) इत्यादी ठिकाणी स्वामीसमर्थांच्या भक्तांनी श्रद्धास्थाने निर्माण केलेली दिसतात. वेंगुर्ले कँपमधील मठात समर्थांनी आनंदनाथ नावाच्या आपल्या एका शिष्यास स्वमुखातून काढून दिलेल्या अर्धा इंच लांबीच्या आत्मपादुका आहेत. देवलग्राम व राजूर येथे समर्थांनी अक्कलकोटला प्रकट होण्यापूर्वीच पादुका व मठ स्थापन केलेला आहे. गुजराथ व कारवार या प्रांतातही स्वामींचा अनुयायीवर्ग मोठा असल्याने तेथेही या दत्तावतारी समर्थांची स्थाने आहेत. श्रीबाळप्पा महाराजांनी समर्थांच्या चैतन्यपादुका घेऊन बंगाल, बिहार, ओरिसा, राजस्थान, मध्यप्रदेश इत्यादी प्रांतांत दौरा केलेला असल्याने तिकडेही दत्तभक्तीचा विस्तार झालेला दिसतो.

स्वामी समर्थ हे दत्तावतारी होते. त्यांच्या अद्‌भुत लीलांमुळे त्यांच्याभोवती शिष्य व

अनुयायी यांचाही परिवार मोठा होता. आजही निष्ठावंतांस श्रीसमर्थांचे दर्शन होत असते. स्वामी समर्थ अक्कलकोटकर यांच्या नावाचा व सामर्थ्याचा लौकिक साऱ्या भारतभर पसरलेला असल्याने नित्य त्यांच्या भेटीस कोणी ना कोणी असे. स्वामींच्या सचाराची हकीगतही श्रीवामनबुवांनी 'श्रीगुरुलीलामृतात' ग्रंथात नोंदवून ठेवलेली असल्याने महाराजांनी लोकोद्धाराचे कार्य भारतभर कसे केले याची माहिती मिळते.

त्यांच्या संगतीत अनेक साधू, वैरागी, मुमुक्षू, जपी, तपी, संसारी, ब्रह्मचारी, सिद्ध यांचा भरणा असे. आळंदीचे स्वामी योगीराज श्रीनरसिंहसरस्वती, यशवंत महाराज, श्रीसितारामहाराज, श्रीकृष्णसरस्वती महाराज, श्रीअवधूतस्वामी महाराजाचे गुरू, श्रीबाळकृष्ण महाराज, माटेबुवा, गवेस्वामी, वोटेस्वामी, विडकरमहाराज महर्षी अण्णासाहेब पटवर्धन, ब्रह्मचारी विष्णुबोवा गोखले, देव मामलेदार, ब्रह्मनिष्ठ वामनबुवा इत्यादी अनेक श्रेष्ठ साधकांनी स्वामी समर्थांच्या दत्तावतारत्वाची ग्वाही दिलेली आहे. सुप्रसिद्ध क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांच्या अपयशाची सूचना स्वामींनी त्यांना दिली होती.

बडोद्याचे अलवणीबुवा हे स्वामींचे चाहते होते. 'श्रीदत्तअवधूत श्रीनृसिंहसरस्वती अक्कलकोटमें बैठे हैं' अशी त्यांची निष्ठा होती. सातारा जिल्ह्यातील एकनाथबुवा तादुलवाडीकरांना स्वामींनी भजनाच्या ऐन रंगात पंढरपूरच्या विठ्ठलाच्या रूपात दर्शन दिले. सोलापूर भागातले आबाजीबुवा सडवळकर हेही आपली विद्वत्ता विसरून स्वामीचरणी लीन झाले होते. पुण्याचे रामानंद बिडकर, बाबा सहस्त्रबुद्धे, गुलहोसूर येथील कैवल्याश्रमी स्वामी तथा वोटे महाराज, ब्राह्मणखेड येथील नारायणभट, अक्कलकोटचेच शेपाचार्य अग्निहोत्री, ग्वाल्हेरचे महाराज जयाजीराव शिंदे, इंदूरचे श्रीतुकोजीराव होळकर, नगर जिल्ह्यातील वांबोरीचे वामनबुवा ब्रह्मचारी वैद्य इत्यादींना स्वामी समर्थांच्या सहवासाचा व कृपेचा लाभ झाला होता. बाळप्पा, चोळप्पा, कादेवाडी मठाचे संस्थापक हरिभाऊ तथा स्वामीसुत, बडोद्याचे रामशास्त्री डोंगरे अशा अनेक भक्तांनी स्वामींची परंपरा समृद्ध केली.



स्वामी समर्थांनी दत्तभक्तांना किती आकर्षित करून घेतले आहे याचा प्रत्यय आजही अक्कलकोटास प्रत्यही येणाऱ्या भक्तांच्या व सेवकांच्या संख्येवरून दिसून येईल. समर्थांचे शिष्य बाळप्पा यांनी ही परंपरा उत्तम रीतीने चालविली. बाळप्पाचे शिष्य गंगाधर महाराज यांनी त्या परंपरेचा विस्तार केला. गंगाधर महाराज तथा दयानंद सरस्वतींचे शिष्य श्रीगजाननमहाराज हे आज संप्रदायाचा प्रसार अधिकाराने करीत आहेत.

# श्रीवासुदेवानंदाचे कार्य

दत्तात्रेयाच्या उपासनेला शास्त्रशुद्ध स्वरूप देऊन दत्तपरंपरा आधुनिक काळात स्थिर केली ती श्रीवासुदेवानंदसरस्वती तथा टेंबेस्वामी यांनी. आचरणशुद्धता, सोवळेओवळे, कर्मठपणा यांच्याबरोबरच अंतरंगातील भक्तीही त्यांच्या परंपरेत दिसते. नरसोबाच्या वाडीस राहून यांनी दत्तोपासना केली. येथेच त्यांना दत्तात्रेयाचा साक्षात्कार झाला. प्रत्यक्ष दत्तगुरूंनीच त्यांना अवधूताच्या रूपात कृष्णातीरी मंत्रोपदेश दिला. ध्यानधारणा, पूजाअर्चा, शास्त्रचिंतन आणि सतत भ्रमंती, हा वासुदेवानंदांच्या आयुष्याचा इत्यर्थ आहे. वासुदेवानन्दसरस्वतींनी दत्तभक्तीच्या प्रसारासाठी व परंपरेच्या विस्तारासाठी सर्व भारतभर प्रवास केला. वर्णाश्रमधर्म, ईश्वरभक्ती, दत्तप्रेम याचा प्रसार करीत करीत त्यांनी भारताच्या सर्व दिशांना चातुर्मास करून लोकांना सन्मार्गास लावले. उज्जयनी, ब्रह्मावर्त, हरिद्वार,

हिमालय, पेटलाद, तिलकवाडा, द्वारका, चिखलदा, महत्पूर, नरसी, बढवाई, तंजावर, मुक्त्याला, पवनी, हावनूर, कुरुगड्डी, चिखलदा, गरुडेश्वर अशा ठिकाणी चातुर्मासात त्यांचे वास्तव्य असे. या मुक्कामांत त्यांनी दत्तोपासनेचा आदर्श तर लोकांपुढे ठेविलाच, पण संस्कृत व मराठी भाषात अत्यंत समृद्ध असे दत्तपर वाङ्‌मय स्वामींनी निर्माण केले.

स्वामी महाराजांनी आपल्या भारतभरच्या प्रवासात अनेकांना दत्तभक्तीकडे वळविले. अनेकांना उपासनेचा मार्ग दाखविला. याच स्वामींच्या शिष्यवर्गात नरसिंहसरस्वती दीक्षित-स्वामी, योगानंद सरस्वती ऊर्फ गांडा महाराज, गोविंदमहाराज पंडित यांची नावे प्रामुख्याने येतात. नारेश्वरचे प्रख्यात साक्षात्कारी सत्पुरुष श्रीरंगावधूत हेही वासुदेवानंदसरस्वतींचेच शिष्य होत. विनायक रामचंद्र पेंडसे ऊर्फ श्रीपूर्णानंद-स्वामी हेही श्रीवासुदेवानंदांचेच शिष्य असून ते नित्य अवधूत स्थितीत असत. याच पूर्णानंदांनी रत्नागिरीस विनायक वासुदेव साठे यांच्या घरी श्रीवासुदेवानंदांच्या पादुका स्थापन करून दत्तस्थान सुरू केले. साठे यांनाही स्वप्नात वासुदेवानंदांचा जप मिळाला होता. साठे यांनी दत्तात्रेयांवर विपुल अशी पद्यरचना करून उपासनेतील खाणाखुणाही विशद केल्या आहेत. स्वामी महाराजांचे बंधू श्रीसीताराम महाराज हेही उच्च कोटीतील सत्पुरुष असून त्यांची समाधी उमरावतीनजीक बडनेरा येथे आहे.

श्रीवासुदेवानंदांना साक्षात् दत्तात्रेयांचा साक्षात्कार झालेला असला तरी त्यांनी उज्ज-यिनीच्या नारायणानंद सरस्वती यांच्याकडून संन्यासदीक्षा घेतली होती. मौजेची गोष्ट अशी की, हे नारायणानंद सरस्वती कारंजा येथील दत्तावतारी श्रीनृसिंहसरस्वतींच्या वंशातील असून समर्थसंप्रदायातील होते. यांची समाधी चाफळ येथे आहे. आपल्या गुरूंचा संप्रदाय लक्षात घेऊन स्वामी महाराज दासनवमीचा उत्सव करीत असत. वासुदेवानंदांचे गुरू नारायणानंद, त्यांचे गुरू अनिरुद्धानंद व त्यांचे गुरू अच्युतानंदसर-स्वती अशी ही परंपरा आहे. दत्तप्रभूंच्या आज्ञे-वरून स्वामीमहाराज वर्णाश्रमधर्माचे रक्षण व दत्ताच्या भक्तीचा प्रसार करीत करीत सन्मार्गाचे शिक्षण लोकांना देत. आधुनिक काळात इतका जबर दत्तभक्तीचा प्रसारक वासुदेवानंदांखेरीज दुसरा नाही. यांचीच परंपरा आधुनिक काळात योगीराज गुळवणी महाराजांनी विस्तारित केलेली आपणास माहित आहेच.

## श्रीपंतांचा अवधूत पंथ

बेळगावजवळील बाळेकुंद्री येथील श्रीपंत-महाराज हे आणखी एक थोर दत्तभक्त असून यांचीही परंपरा अतिशय मोठी व समृद्ध अशी आहे. श्रीपंतमहाराज हे तर स्वतः साक्षात्कारी संत होतेच; परंतु त्यांचे विपुल असे मराठी व कन्नड भाषांतील वाङ्‌मय आजही दत्तभक्तांना अंतरंगाची गोडी चाखवून देण्यास समर्थ आहे. बेळगावकडील मलप्रभा नदीच्या काठी असलेल्या पार्श्ववाड या गावच्या श्रीबालमुकुंद ऊर्फ बालावधूत यांचा अनुग्रह श्रीपंतांना होता. श्रीदत्तात्रेयांनी श्रीरामचैतन्यावर अथवा रामा-वधूतावर कृपा केली, व रामावधूतांनी बाळप्पास अनुग्रह देऊन त्यांना 'बालावधूत' अथवा बाल-मुकुंद अशी संज्ञा दिली. या बालावधूतांचे ख्यातनाम शिष्य म्हणजे श्रीपंतमहाराज बाळे-कुंद्रीकर होत.दत्तावधूत–रामावधूत–बालावधूत-श्रीदत्तात्रेय (पंतमहाराज) अशी ही परंपरा असून दत्तप्रभूंच्या सगुण प्रेमात रंगलेली आहे. दत्तात्रेयांच्या परंपरेस कोणी श्रीगुरुदेव संप्रदाय म्हणतात, कोणी आनंद संप्रदाय म्हणतात, कोणी अवधूत संप्रदाय म्हणतात. परंतु अशी नावे भिन्न असली तरी श्रीदत्त हे दैवत सर्वांचे एकच आहे आणि अंतरंगातला अनुभव एकच आहे.

दत्तात्रेय व अवधूत हे एकच आहेत अशी साक्ष अनेकांची असली तरी कित्येकांना त्यांच्यांत फरक करावासा वाटतो. परंतु एकनाथांनी स्पष्टपणे म्हटले आहे की, 'तो अवधूत जाण दत्तात्रेय' दत्त व अवधूत हे एकच अशी पंतांचीही अनुभूती व श्रद्धा होती.

आपल्या या अवधूतपरंपरेचा मोठ्या आणिवेने श्रीपंत उल्लेख करतात. 'अनादिसिद्ध श्रुतिसंमत संप्रदाय मला' (श्रीदत्तप्रेमलहरी : पद २७२५) असे त्यांनी म्हटले आहे. आपल्या अवधूत पंथाच्या गुह्य ज्ञानाचे वर्णन 'आत्म-ज्योति' नावाच्या लेखात करताना ते म्हणतात, 'दुजाभाव दवडून अति गुप्तपणे श्रीदत्तात्रेय स्वामींनी रामचंद्र अवधूत यास ज्या गुह्य गोष्टी सांगितल्या त्याच रामावधूताने एकांती बसून दुजे दृष्टीस न पडेल अशा गुह्य मार्गाने श्रीबाला-वधूतास उपदेशिल्या. श्रीसद्‌गुरू बालमुकुंदांनी जंबुनगरी निर्जन गुहेत दोन दत्तास निजबोध सांगितला.' आणखी एक महत्त्वाची व ऐक्य-बोधाची बाब अशी की, श्रीदत्तात्रेय,श्रीपादवल्लभ, श्रीनृसिंहसरस्वती व श्रीबालावधूत हे चारही अवतार एकाच दत्ताचे होत असे पंतांनी पुनः पुनः सांगितले आहे. 'जो पारक्षपुरी उद्‌भवला, जो अत्रिअनसूयेच्या पोटी आला, जो श्रीपादवल्लभ झाला, जो नृसिंहसरस्वतीरूपाने गाणगाभुवनीं खेळला तोच अवधूत होय' (१४०१) असे त्यांनी निर्धाराने म्हटले आहे. 'अत्रिअनसुयेच्या पोटीं आला बालावधूत' (२५४७), 'बालावधूता नरसिंहस्वामी' (१८२) अशा शेकडो वचनांतून हा ऐक्यभाव स्पष्ट होण्यासारखा आहे.

श्रीपंतांच्या परंपरेचे एकमेव सूत्र आहे प्रेम-भक्ती. अवधूत हा त्यांच्या मते 'गगनमठीचा योगी' असल्याने त्याची गादी फक्त भक्तांच्या हृदयातच. अद्वैतभक्तीचा अनुभव प्रेमाच्या मार्गाने चाखावयास लावणारी श्रीपंतांची शेकडो पदे उपलब्ध आहेत. प्रेमभक्तीवर आधारलेल्या श्रीपंतांच्या अवधूतपंथाची लक्षणे थोडक्यात अशी आहेत. १) विधिनिषेध त्याग २) विषयवैराग्य ३) कर्म–उपासना–योग–निराकरण ४) संचित-आगामी–प्रारब्ध–शून्यकरण ५) सूक्ष्माभिमान-त्याग, मिथ्याभिमान–खंडण, अंतरबाह्यबंधनमोक्ष ६) ऐक्यबोध व समरसभाव ७) बंधुप्रेम व अखंड शांती ८) अद्वैतभक्ती व कैवल्यमुक्ती ९) सहजानुभव, प्रगट युक्ती १०) सहजसमाधि-रति, सद्‌गुरुचरणप्रीती ११) निरंकुश स्थिती, सदा निश्चिती. पंतांच्या अवधूत पंथात अहंतेस मान नाही, समभाव संभावित आहे. श्रेष्ठ–किंचित्‌भाव लेशही मान्य नाही. श्रीपंतांनी आपल्या अवधूतमार्गाचे माहात्म्य अनेक ठिकाणी वर्णन केले आहे. 'बहुत मजेचा, नित्य शांतीचा दाता, सहजानंदाचा सागर, दत्तप्रेमाचा निजठाव, वेदशास्त्राचा निजभावार्थ, जन्ममृत्यूचा अंतक, द्वैतभावाचा घातक' असा हा अवधूत पंथ आहे.

अवधूत मार्गाचे वैशिष्ट्य सांगताना आणखी एका ठिकाणी श्रीपंत म्हणतात, 'वेदान्तमार्गात शरीरप्रकृती चांगली असणे जरूर आहे. कारण तेथे साधन करणे, साध्य साधणे असते; आरोग्य चांगले ठेवावे, सात्विक आहार असावा, बेताने व नेमाने वागावे, बोलावे व चालावे, इच्छा वाईट ठेवू नयेत, शमदमादि साधनसंपन्नता असावी, अधिकारी शिष्य असावा, वगैरे बंधने पाळणे वेदान्तमार्गात जरूर असते. कारण वेदान्त-मार्गात काही बद्ध, काही मुक्त, काही मुमुक्षू अशी दृष्टी असते. अवधूतमार्ग वेदान्तमार्गापेक्षा श्रेष्ठ होय. तेथे बंध नाही व मुक्तीचीही किंमत नाही. कल्पनाप्रवृत्तीने बंध झाला तोही खोटा व कल्पनानिवृत्तीने मोक्ष झाला तोही खोटा.... अवधूतमार्गी आता, या क्षणी मरण्यास टेपले-ल्यालाही अधिकार आहे. स्त्री, शूद्र सर्वच अधिकारी. अवधूत-गुरुमार्ग शुद्ध प्रेमभक्तीचा, शुद्ध शांती–प्रीतीचा, मुक्तीवरील भक्तीचा, वेदान्तज्ञानाचा नव्हे. या मार्गी गुरुवचनच सर्व

वेदान्त, गुरुराद्दांटीच सिद्धान्त, गुरुवचनच श्रेष्ठ ' असे असूनही श्रीपंतांना श्रुतींबद्दल अत्यंत आदर होता. श्रीपंतमहाराजांचे के. रा. दिवेकर यानी जे अत्यंत साक्षेपी व साधार असे बोधचरित्र लिहिले आहे, त्यात त्रेचाळिसाव्या प्रकरणात पंतांच्या अवधूत-संप्रदायाची अतिशय उद्‌बोधक अशी ओळख करून दिलेली आहे.

बाळेकुंद्री, दड्डी, बेळगाव, बडोदे, अकोळ, कोचरी, नेरली, शेट्टीहाळी, गोकाक, धारवाड, हुबळी, बेडकिहाळ, कोल्हापूर, कुरुंदवाड, मुंबई, पुणे इत्यादी ठिकाणी श्रीपंतांच्या अवधूत परंपरेतील संप्रदाय विस्तृतपणे पसरलेला आहे. बेळगाव, पार्श्वंवाड, देसनूर, कडेंगुद्दी, दड्डी, करुंदवाड, चिकालगुड इत्यादी गावी पंतांचे वास्तव्य असल्याने तेथेही परंपरेचा वारसा दिसतो. श्रीपंतांचे व त्यांच्या बंधूचे भक्त आज महाराष्ट्रात सर्वत्र विखुरलेले असून श्रीपंतांनी दाखविलेल्या भक्तिप्रेमात दंग आहेत. गोविंदरावजी, गोपाळरावजी, शंकररावजी, वामनराव, नृसिंहराव हे पंतबंधूही या परंपरेतील अधिकारी म्हणून नावारूपास आले. पंतमहाराजांचे एक कर्तबगार शिष्य मोरेश्वर केशव दातार ऊर्फ अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांनी पंतांच्या परंपरेचा खानदेशकडे विशेष प्रकारे विस्तार केला. श्रीपंतांच्या या अवधूत परंपरेचा व त्यांच्या भक्तिरसपूर्ण पदांचा लोभ आज शेकडो, हजारो लोकांना वाटत आहे. दत्तजयंती, गुरुपौर्णिमा, श्रीपंतजन्मोत्सव, पंत व बंधूंच्या पुण्यतिथी, अशा प्रसंगी हजारो पंतप्रेमी महाराष्ट्र व कर्नाटक प्रांतांतून आजही जमा होतात; आणि अवधूत पंथाचे हे ' कापडी ' भक्तिप्रेमात दंग होतात.

# आणखी काही धागे

दत्तात्रेयांची परंपरा विकसित करणाऱ्या काही महत्त्वाच्या केन्द्रस्थानांचा वा व्यक्तींचा उल्लेख वर केला आहेच. आता काही किरकोळ धागेदोरे जे दत्तांशी संबंधित असतील, त्यांची संक्षेपाने ओळख करून घेऊ. महाराष्ट्रातील प्राचीन मराठी वाङ्मय हे प्रामुख्याने नाथसंप्रदायाशी निगडीत असल्याने व नाथांशी दत्तात्रेयाचा जवळचा संबंध असल्याने तत्त्वज्ञान व आचारपद्धती बऱ्याच अंशांनी एकसारखीच दिसते. *आदिनाथ-मत्स्येन्द्रनाथ-गोरखनाथ-गहिनीनाथ*-निवृत्तिनाथ-ज्ञाननाथ (ज्ञानेश्वर)-सत्यामलनाथ-गैबीनाथ-गुप्तनाथ-उद्‌बोधनाथ-केसरीनाथ-शिवदिननाथ-नरहरी या परंपरेतील अनेकांची स्फुट रचना या दृष्टीने पाहाण्यासारखी आहे. केसरीनाथांच्या मल्हारीनाथाची परंपरा राक्षिन येथे वाढली व दुसरा शिष्य शिवदिननाथ याची परंपरा पैठण येथे विकसित झाली.

शिवदिननाथांचा शिष्य नरहरीनाथ व याचा शिष्य महीपतिनाथ. इंदूर, ग्वाल्हेरकडे महीपतिनाथांनी आपला संप्रदाय वाढविला. या महीपतिनाथांचा दत्तनाथ उज्जयिनीकरांशी संबंध होता. निरंजन-विष्णू-हंसकमलासन-अत्री-दत्तगोपाळ-वेडा नागनाथ-निवजराज-नरहरी गिरधारीजनार्दन-एकनाथ-दत्तभाऊ-केशवबुवा-अंतोबादादा-दत्तनाथ अशी उज्जयिनीकर दत्तनाथांची परंपरा आहे. नाथसंप्रदायातील एक गोमंतकातील कवी पूर्णप्रकाशनंदनाथ अथवा नायकस्वामी असे आहे. आनंदसंप्रदायाशीही दत्ताचा संबंध आहे. श्रीधर व कृष्णदयार्णव हे आनंदसंप्रदायी असून दोघांच्या परंपरा दत्तात्रेयाशी निगडित आहेत. दत्तात्रेय-सदानंद-रामानंद-अमलानंद-गंभीरानंद-ब्रह्मानंद-सहजानंद-पूर्णानंद-ब्रह्मानंद व श्रीधर अशी ही परंपरा श्रीधराची आहे. श्रीधराचे ' श्रीदत्तात्रेयमाहात्म्य ' व कृष्णदयार्णवाचे शिष्य उत्तमश्लोक याचे ' दत्तजननोत्साहवर्णन ' या दोन प्रकरणाचा येथे उल्लेख करणे अगत्याचे आहे. प्रख्यात दत्तोपासक दासोपंत हेही आनंदसंप्रदायी असल्याचे सांगतात.

(दासोपंतांची पासोडी : चरित्र आणि वाङ्मय, पृष्ठ १६)

श्रीसाधुमहाराज कंधारकर यांचीही परंपरा दत्तात्रेयप्रणीत आहे. परभणी जिल्ह्यातील या परंपरेस दत्तात्रेयाचे साक्षात् वरदान आहे. संताचार्य महाराज, श्रीसंत बापूमहाराज, (ब्र. भू. जनार्दनस्वामी), विरसणी, श्रीसंत केशवमहाराज ऊर्फ अण्णा महाराज (ब्र. भू. युगानंदस्वामी), विरसणी, श्रीसंत रामकृष्ण ऊर्फ बाळा महाराज (ब्र. भू. पुरुषोत्तमानंद स्वामी) विरसणी; अशी ही परंपरा असून श्रीबाळामहाराज यांचे विस्तृत असे ओवीबद्ध चरित्र 'श्रीबाळलीलामृत' या नावाने प्रसिद्ध झाले आहे. बाळामहाराजांचे शिष्य औंढा नागनाथचे रंगनाथराव बंगाळे यांनी हे चरित्र लिहिले आहे. साधुमहाराजांच्या आणखी एका परंपरेत भास्करमहाराज, रुक्मांगद महाराज, यशवंत महाराज, हनुमंत महाराज, धुंडिराज महाराज इत्यादी सत्पुरुष असून यांचीही चरित्रे 'श्रीदत्तप्रभादर्शन' या नावाने रंगनाथ बंगाळे यांनी लिहिली असून ती अजून अप्रसिद्ध आहेत. साधुमहाराजाचेही ओवीबद्ध चरित्र दास मारुतीनी लिहिलेले सोळा अध्यायांचे प्रसिद्ध आहे.

नाथपरंपरेच्या विकासाची माहिती जसजशी अधिक प्रमाणात उजेडात येईल, त्या प्रमाणात दत्तपरंपरेचाही उलगडा होईल. काही नावांचा येथे उल्लेख करीत आहे. विदर्भाकडील देवनाथ या प्रसिद्ध कवीची परंपरा आदिनारायणविधीअत्रिनाथ-दत्तात्रेय–जनार्दन–एकनाथ–नित्यानंदकृष्णनाथ–विसोबानंद – मुऱ्हारनाथ– रंगनाथ–गोपाळनाथ–गोविंदनाथ–देवनाथ –दयाळनाथ–जयकृष्णनाथ – रामकृष्णनाथ अशी आहे. देवनाथानी 'अरुपानंदी अद्वय श्रीगुरुदत्तचि अवतरला', 'सच्चिद्घन आनंद आनंदी दत्तात्रयमूर्ती' अशी काही पदे दत्तावर लिहिलेली आहेत. याच परंपरेतील गोपाळनाथ यांना दत्तात्रेयाचे दर्शन झाले होते. या गोपाळनाथांची समाधी सातान्याजवळ त्रिपुटी येथे असून यांच्याच परंपरेतील पांडुरंगबोवा दगडे यांचा उपदेश माहूर येथील देवीचे व दत्ताचे प्रसिद्ध उपासक श्रीविष्णुदास यांना होता. या विष्णुदासाना संन्यासदीक्षा देणारी परंपरा उमरखेड येथील चिन्मायानंदांची आहे. यांचाच उपदेश येहळेगावच्या तुकाराममहाराजांना होता आणि या तुकाईचा उपदेश ब्रह्मचैतन्य श्रीगोंदवलेकर महाराजांना होता. अशा रीतीने कृष्ण, राम, विठ्ठल, दत्त यांचे मोठे मजेदार मिश्रण दिसते. नुकतेच समाधिस्थ झालेले स्वरुपानंद नाथसंप्रदायी असल्याचे प्रसिद्धच आहे. अशा रीतीने ज्ञानेश्वर, एकनाथ, जनीजनार्दन, दासोपंत, रंगनाथस्वामी, कृष्णदयार्णव, रमावल्लभदास, निरंजनमाधव, सोहिरोबा, पूर्णदास ऊर्फ बाबा उसपकर, शिवरामस्वामी, शिवदिनकेसरी, शहामुनी, अनंतसुत विठ्ठल, भैरव अवधूत ज्ञानसागर, शिवकल्याण अशा अनेक सद्भक्तांची परंपरा या नाही त्या कारणाने दत्तात्रेयाशी भिडते.

दत्तपरंपरा महाराष्ट्रात परिपुष्ट करणाऱ्या आणखी काही आधुनिक सत्पुरुषांची नावे सहज ध्यानात येणारी आहेत. आळदीचे स्वामी श्रीनरसिंह सरस्वती हे साक्षात् दत्ताचे अवतार असल्याची सांप्रदायिकांची श्रद्धा आहे. नृसिंहवाडी–गाणगापूरच्या नृसिंहसरस्वतीचाच हा आधुनिक अवतार होय. 'श्रीस्वात्मसौख्य', 'अंतरानुभव' इत्यादी त्यांच्या सांप्रदायिक ग्रंथांचा परिचय आपण पुढे करून घेऊ. अण्णासाहेब पटवर्धन, नारायणबोवा रुद्र, यशवंत महाराज देव मामलेदार, श्रीराधाकृष्णस्वामी रहिमतपूरकर, श्रीविष्णुदास महाराज, रहिमतपूर, श्रीपादस्वामी पुणे, सच्चिदाश्रमस्वामी, लोणार तात्यासाहेब रायरीकर, नारायणानंद सरस्वती स्वामी इत्यादींचा परिवार या स्वामींच्या

वेदान्त, गुरुराह्याटीचे सिद्धान्त, गुरुवचनच श्रेष्ठ' असे असूनही श्रीपंतांना श्रुतींबद्दल अत्यंत आदर होता. श्रीपंतमहाराजांचे के. रा. दिवेकर यांनी जे अत्यंत साक्षेपी व साधार असे बोधचरित्र लिहिले आहे, त्यात त्रेचाळिसाव्या प्रकरणात पंतांच्या अवधूत-संप्रदायाची अतिशय उद्‌बोधक अशी ओळख करून दिलेली आहे.

बाळेकुंद्री, दड्डी, बेळगाव, बडोदे, अकोळ, कोचरी, नेरली, शेट्टीहाळी, गोकाक, धारवाड, हुबळी, वेडकिहाळ, कोल्हापूर, कुरुंदवाड, मुंबई, पुणे इत्यादी ठिकाणी श्रीपंतांच्या अवधूत परंपरेतील संप्रदाय विस्तृतपणे पसरलेला आहे. बेळगाव, पाश्वंवाड, देसनूर, कडेगुद्दी, दड्डी, कुरुंदवाड, चिकालगुड इत्यादी गावी पंतांचे वास्तव्य असल्याने तेथेही परंपरेचा वारसा दिसतो. श्रीपंतांचे व त्यांच्या बंधूंचे भक्त आज महाराष्ट्रात सर्वत्र विखुरलेले असून श्रीपतांनी दाखविलेल्या भक्तिप्रेमात दंग आहेत. गोविंदरावजी, गोपाळरावजी, शंकररावजी, वामनराव, नृसिहराव हे पंतबंधूही या परंपरेतील अधिकारी म्हणून नावारूपास आले. पंतमहाराजाचे एक कर्तबगार शिष्य मोरेश्वर केशव दातार ऊर्फ अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांनी पंतांच्या परंपरेचा खानदेशकडे विशेष प्रकारे विस्तार केला. श्रीपंतांच्या या अवधूत परंपरेचा व त्यांच्या भक्तिरसपूर्ण पदांचा लोभ आज शेकडो, हजारो लोकांना वाटत आहे. दत्तजयंती, गुरुपौणिमा, श्रीपंतजन्मोत्सव, पंत व बंधूंच्या पुण्यतिथी, अशा प्रसंगी हजारो पंतप्रेमी महाराष्ट्र व कर्नाटक प्रांतातून आजही जमा होतात; आणि अवधूत पंथाचे हे 'कापडी' भक्तिप्रेमात दंग होतात.

## आणखी काही धागे

दत्तात्रेयांची परंपरा विकसित करणाऱ्या काही महत्त्वाच्या केन्द्रस्थानांचा व व्यक्तींचा उल्लेख वर केला आहेच. आता काही किरकोळ धागेदोरे जे दत्तांशी संबंधित असतील, त्यांची संक्षेपाने ओळख करून घेऊ. महाराष्ट्रातील प्राचीन मराठी वाङ्मय हे प्रामुख्याने नाथसंप्रदायाशी निगडीत असल्याने व नाथांशी दत्तात्रेयाचा जवळचा संबंध असल्याने तत्त्वज्ञान व आचारपद्धती बऱ्याच अंशांनी एकसारखीच दिसते. आदिनाथ-मत्स्येन्द्रनाथ-गोरखनाथ- गहिनीनाथ–निवृत्तिनाथ–ज्ञाननाथ (ज्ञानेश्वर)–सत्यामलनाथ–गैबीनाथ–गुप्तनाथ–उद्‌बोधनाथ–केसरीनाथ–शिवदिननाथ–नरहरी या परंपरेतील अनेकांची स्फुट रचना या दृष्टीने पाहाण्यासारखी आहे. केसरीनाथाच्या मल्हारीनाथाची परंपरा राशिन येथे वाढली व दुसरा शिष्य शिवदिननाथ यांची परंपरा पैठण येथे विकसित झाली.

शिवदिननाथाचा शिष्य नरहरीनाथ व याचा शिष्य महीपतिनाथ. इंदूर, ग्वाल्हेरकडे महीपतिनाथांनी आपला संप्रदाय वाढविला. या महीपतिनाथांचा दत्तनाथ उज्जयिनीकरांशी संबंध होता. निरंजन–विष्णू–हंसकमलासन–अत्री–दत्तगोपाळ–वेडा नागनाथ–निवजराज–नरहरी गिरधारीजनार्दन- एकनाथ–दत्तभाऊ–केशवबुवा-अंतोबादादा–दत्तनाथ अशी उज्जयिनीकर दत्तनाथांची परंपरा आहे. नाथसंप्रदायातील एक गोमतकातील कवी पूर्णप्रकाशनंदनाथ अथवा नायकस्वामी असे आहे. आनंदसंप्रदायाशीही दत्ताचा संबंध आहे. श्रीधर व कृष्णदयार्णव हे आनंदसंप्रदायी असून दोघांच्या परंपरा दत्तात्रेयांशी निगडित आहेत. दत्तात्रेय–सदानंद–रामानंद-अमलानंद–गंभीरानंद–ब्रह्मानंद-सहजानंद–पूर्णानंद–ब्रह्मानंद व श्रीधर अशी ही परंपरा श्रीधराची आहे. श्रीधराचे 'श्रीदत्तात्रेयमाहात्म्य' व कृष्णदयार्णवाचे शिष्य उत्तमश्लोक याचे 'दत्तजननोत्साहवर्णन' या दोन प्रकरणांचा येथे उल्लेख करणे अगत्याचे आहे. प्रख्यात दत्तोपासक दासोपंत हेही आनंदसंप्रदायी असल्याचे सांगतात.

(दासोपंतांची पासोडी : चरित्र आणि वाङ्मय, पृष्ठ १६)

श्रीसाधुमहाराज कंधारकर यांचीही परंपरा दत्तात्रेयप्रणीत आहे. परभणी जिल्ह्यातील या परंपरेस दत्तात्रेयांचे साक्षात् वरदान आहे. संताचार्य महाराज, श्रीसंत बापूमहाराज, (ब्र. भू. जनार्दनस्वामी), विरसणी, श्रीसंत केशव-महाराज ऊर्फ अण्णा महाराज (ब्र. भू. युगानंद-स्वामी), विरसणी, श्रीसंत रामकृष्ण ऊर्फ बाळा महाराज (ब्र. भू. पुरुषोत्तमानंद स्वामी) विरसणी; अशी ही परंपरा असून श्रीबाळा-महाराज यांचे विस्तृत असे ओवीबद्ध चरित्र 'श्रीबाळलीलामृत' या नावाने प्रसिद्ध झाले आहे. बाळामहाराजाचे शिष्य औंढचा नागनाथचे रंगनाथराव वंगाळे यांनी हे चरित्र लिहिले आहे. साधुमहाराजांच्या आणखी एका परंपरेत भास्कर-महाराज, रुक्मांगद महाराज, यशवंत महाराज, हनुमंत महाराज, धुंडिराज महाराज इत्यादी सत्पुरुष असून यांचीही चरित्रे 'श्रीदत्तप्रभा-दर्शन' या नावाने रंगनाथ वंगाळे यांनी लिहिली असून ती अजून अप्रसिद्ध आहेत. साधुमहारा-जांचेही ओवीबद्ध चरित्र दास मारुतीनी लिहिलेले सोळा अध्यायांचे प्रसिद्ध आहे.

नाथपरंपरेच्या विकासाची माहिती जसजशी अधिक प्रमाणात उजेडात येईल, त्या प्रमाणात दत्तपरंपरेचाही उलगडा होईल. काही नावांचा येथे उल्लेख करीत आहे. विदर्भाकडील देवनाथ या प्रसिद्ध कवीची परंपरा आदिनारायणविधी-अग्निनाथ-दत्तात्रेय-जनार्दन-एकनाथ-नित्यानंद-कृष्णनाथ-विसोबानंद – मुन्हारनाथ– रंगनाथ– गोपाळनाथ–गोविंदनाथ–देवनाथ –दयाळनाथ– जयकृष्णनाथ – रामकृष्णनाथ अशी आहे. देवनाथांनी 'अरुपानंदीं अद्वय श्रीगुरुदत्तचि अवतरला', 'सच्चिद्घन आनंद आनंदी दत्ता-त्रयमूर्ती' अशी काही पदे दत्तावर लिहिलेली आहेत. याच परंपरेतील गोपाळनाथ यांना दत्ता-त्रेयाचे दर्शन झाले होते. या गोपाळनाथांची समाधी सातान्याजवळ त्रिपुटी येथे असून यांच्याच परंपरेतील पांडुरंगबोवा दगडे यांचा उपदेश माहूर येथील देवीचे व दत्ताचे प्रसिद्ध उपासक श्रीविष्णुदास यांना होता. या विष्णु-दासांना संन्यासदीक्षा देणारी परंपरा उमरखेड येथील चिन्मयानंदांची आहे. यांचाच उपदेश येहळेगावच्या तुकाराममहाराजांना होता आणि या तुकाईचा उपदेश ब्रह्मचैतन्य श्रीगोंदवलेकर महाराजांना होता. अशा रीतीने कृष्ण, राम, विठ्ठल, दत्त यांचे मोठे मजेदार मिश्रण दिसते. नुकतेच समाधिस्थ झालेले स्वरूपानंद नाथ-संप्रदायी असल्याचे प्रसिद्धच आहे. अशा रीतीने ज्ञानेश्वर, एकनाथ, जनीजनार्दन, दासोपंत, रंगनाथस्वामी, कृष्णदयार्णव, रमा-वल्लभदास, निरंजनमाधव, सोहिरोबा, पूर्णदास ऊर्फ बावा उसपकर, शिवरामस्वामी, शिवदिन-केसरी, शहामुनी, अनंतसुत विठ्ठल, भैरव अवधूत ज्ञानसागर, शिवकल्याण अशा अनेक सद्भक्तांची परंपरा या नाही त्या कारणाने दत्तात्रेयांशी भिडते.

दत्तपरंपरा महाराष्ट्रात परिपुष्ट करणाऱ्या आणखी काही आधुनिक सत्पुरुषांची नावे सहज ध्यानात येणारी आहेत. आळंदीचे स्वामी श्रीनरसिंह सरस्वती हे साक्षात् दत्ताचे अवतार असल्याची सांप्रदायिकांची श्रद्धा आहे. नृसिंह-वाडी–गाणगापूरच्या नृसिंहसरस्वतींचाच हा आधुनिक अवतार होय. 'श्रीस्वात्मसौख्य', 'अंतरानुभव' इत्यादी त्यांच्या सांप्रदायिक ग्रंथांचा परिचय आपण पुढे करून घेऊ. अण्णा-साहेब पटवर्धन, नारायणबोवा रुद्र, यशवंत-महाराज देव मामलेदार, श्रीराधाकृष्णस्वामी रहिमतपूरकर, श्रीविष्णुदास महाराज, रहिमतपूर, श्रीपादस्वामी पुणे, सच्चिदाश्रमस्वामी, लोणार तात्यासाहेब रायरीकर, नारायणानंद सरस्वती स्वामी इत्यादींचा परिवार या स्वामींच्या

संदर्भात महत्त्वाचा आहे. रत्नागिरी जिल्ह्यातील चिचखेरी येथील दत्तोपासक श्रीगजानन महाराज बोरकर हे श्रीपद्मनाभस्वामी महाराज यांच्या परंपरेतील असून यांचाच संप्रदाय श्रीअवधूत स्वामी (मोरेश्वर वासुदेव लिमये) यांनी मुंबईस चालविला आहे. गोमंतकात साखळी, माशेल, सांवई ही दत्तात्रेयाची त्रिस्थळी असून माशेल येथील दुर्गादत्त मंदिराच्या कामतबंधूंची दत्त-संप्रदायासंबंधीची कामगिरी प्रसिद्ध आहे. शिर्डीचे साईबाबा, साकुरी येथील श्रीउपासनी महाराज व सती गोदामाता, बेट केडगावचे नारायण-महाराज ही आणखी तीन उपासना-केंद्रे दत्त-परंपरेचा विस्तार करणारीच आहेत. पुण्यास कर्वे रोडवरील वासुदेवाश्रमात योगी गुळवणी महाराजांचा परिवार आता श्री. दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर याच्या मार्गदर्शनाने वाढत आहे.

## गुजराथकडील दत्तपंथ

गुजराथसौराष्ट्रामध्येही दत्तपरंपरेचा धागा परिपुष्ट झालेला दिसतो. गिरनार हे दत्तात्रेयांचे प्रसिद्ध स्थान याच भागात असून निरंजन रघुनाथ, नारायण महाराज जालवणकर इत्यादींना या स्थानाची ओढ होती हे आपण मागे पाहिलेच आहे. अलीकडील काळात इकडे स्वामी समर्थ अक्कलकोटकर व नारेश्वरचे श्रीरंगावधूत याच्या प्रेरणेने दत्तपरंपरेचा वारसा समृद्ध होत राहिलेला दिसतो. दत्तपंथीयांना पूज्य असणारे दोन ग्रंथ-श्रीगुरुलीलामृत व श्रीदत्तप्रबोध यांचा बडोद्याशी संबंध आहे. श्रीवामनबुवा वैद्य याची परंपरा काळवीट स्वामींची असून सासवडकर, कविभूषण, नंदुरबारकर, पट्टणकर इत्यादी मंडळींनी ती चालविली आहे. वामन-बुवाची समाधीही बडोद्यास आहे. दत्तप्रबोधकार अनंतसुत ऊर्फ कावडीबोवा यांचीही परंपरा राजापूरकर मंडळी उत्तम रीतीने चालवीत आहेत. अवधूत अवस्थेत राहाणारे कुबेरेश्वरचे महाराज, सच्चिदानंद (सिनोरेचे) स्वामी, ब्रह्मचारीबुवा (लंगडेस्वामी) अशी आणखी काही नावे या दत्तपरंपरेत सांगता येतील. बडोदे येथील 'नृसिंहसरस्वती गुरुमंदिर' ही दत्तोपासकांचे एक केंद्र आहे. फळणीकरांचे दत्तभक्तमंडळ दत्त-परंपरेच्या प्रसाराचे कार्य करीत असते. नारे-श्वरच्या पांडुरंगमहाराजांनी-श्रीरंग अवधूतांनी आधुनिक काळात गुजराथमध्ये दत्तभक्तीचा प्रसार फार मोठ्या प्रमाणावर केला. गरुडेश्वरी वासुदेवानंदस्वामींनी जे दत्तभक्तिबीज पेरले त्याचा विकास श्रीरंग अवधूतांनी केला. गुज-राथी भाषेत त्यांची दत्तभक्तीपर अशी अनेक कवने प्रसिद्ध आहेत. दत्तबावनी, गुरुलीलामृत इत्यादी पुस्तकांनी या दत्तभक्तिप्रसाराला चांगलाच हातभार लावला. सरखेज, नवापूर, राजपिपला, ओच्छण, अशा अनेक ठिकाणी दत्त-भक्तीचा विस्तार होत आहे. श्रीरंग अवधूताच्या भक्तीचा धागा पकडूनच हरिप्रसाद शिवप्रसाद जोशी यांनी दत्तात्रेयांवरील आपला इंग्रजी प्रबंध लिहून डॉक्टरेटची पदवी संपादन केली आहे. या ग्रंथाचे नाव आहे, 'ऑरिजिन अँड डेव्हलपमेंट ऑफ दत्तात्रेय वर्शिप इन इंडिया.'

## कर्नाटकातील दत्तपंथ

दत्तात्रेयांचे अवतारकार्य सर्वगामी असल्यामुळे दक्षिणेकडील प्रांतात व भाषांतही दत्तभक्तीचा प्रसार झालेला दिसतो. श्रीपादवल्लभांची पीठापूर, कुरवपूर ही स्थाने याच भागात असून श्रीगुरुचरित्रकार सरस्वतीगंगाधराची मातृभाषा कन्नड होती, हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे. बिदर, गाणगापूर, श्रीशैल, गोकर्ण महाबळेश्वर, कडगंची, विजापूर अशा काही स्थानांचा दत्त-भक्तीशी निकटचा संबंध आहे. कन्नड भाषिकांच्या परंपरेत अनेक दत्तभक्त झालेले दिसतात. वासु-देवानंदांचे काही चातुर्मास तंजावर, मुक्त्याला, कल्गट्टी, हावनूर इत्यादी दक्षिण भारतामधील

गावीही झालेले आहेत. दक्षिणेकडील, विशेषत. कर्नाटकातील दत्तभक्तीची परपरा थोड्या विस्ताराने आपण पाहू बेळगाव येथील एक थोर दत्तोपासक कै. विश्वनाथ केशव कुलकर्णी, हत्तरवाटकर यानी माझ्याकडे यासबधी एक विस्तृत टिपण पाठविले आहे, त्याच्याच आधारे पुढील मजकूर मी लिहीत आहे स्वत कुलकर्णी हे श्रीविरूपाक्षबुवा नागनाथस्वामी महाराजाच्या परपरेतील असल्यामुळे त्याच्या दत्तभक्तीस एक प्रकारचे साप्रदायिक अधिष्ठान आहे

अगडी (धारवाड जिल्हा) येथील श्रीनारायण भगवान स्वामी, कारवारचे पद्नाभतीर्थ स्वामी, काखडीचे महीपतिदास योगी, हुबळीचे सिद्धारूढस्वामी, साधोघाटचे श्रीसिद्धेश्वरमहाराज, मुरगोडचे श्रीचिदवरदीक्षित, थामुळगावचे राजाराम महाराज, गुलेहोसूरचे श्रीकैवल्याश्रम बोठेस्वामी महाराज, दत्तावतारी वैराग्यमूर्ती श्रीकृष्णेन्द्रगुरू, केडगावचे नारायण महाराज, नुकतेच समाधिस्थ झालेले श्रीधरस्वामी इत्यादी अनेक सत्पुरुष कर्नाटकातील असून त्यानी दत्तभक्तीचा प्रसार केलेला दिसतो विद्यमान अवतारी पुरुष श्रीसत्यसाईबाबा हे आध्र प्रदेशातील अनतपूर जिल्ह्यातील पुट्टपरती या गावचे असून शिर्डीच्या साईबाबाचा दुसरा अवतार म्हणून त्याची प्रसिद्धी आहे.

श्रीनरसिंहसरस्वतीच्या शिष्यापैकी साखरे सायदेव व श्रीगुरुचरित्रकार सरस्वतीगगाधर हे कर्नाटकातील कडगचीचेच. कर्नाटकातील सिद्धनाळ येथे साप्रदायिक ग्रथ 'गुरुचरित्र' सिद्ध झाला त्रिविक्रमभारती, नदी, नरहरी हेही शिष्य याच भागातील होत वर वर्णन केलेल्या श्रीपतमहाराज बाळेकुद्रीकरानीही कन्नड भाषेत विपुल काव्यरचना केली आहे. 'दत्तात्रेयकल्प'-सारखे सस्कृत ग्रथ याच भागात तयार झालेले दिसतात गाणगापूर चद्रद्रोण (बाबाबुडन) येथील श्रीदत्तपीठ, विजापूर येथील नृसिंहसरस्वती दत्तमदिर, अशी अनेक स्थाने कर्नाटकातील म्हणून सागता येतील. बोरगाव, चिकोडी, कुन्नूर, सदलगा, बाळेकुद्री, शहापूर, अर्जुनवाड, शेडबाळ, निपाणी, रायबाग, तोरगल, मादगुड, येडकीहाळ, बेनाडी, कोडणी, हुपीहोळी, चंदूर, श्रीपादवाडी, यमकनमरडी, हुबळी, देवी होसूर, गदग, हानगल, धारवाड, कुंदगोळ, नरेंलगल, अमलझरी अशा अनेक ठिकाणी दत्तात्रेयाची मंदिरे वा स्थाने आहेत. शिरसी, हित्तलकरगद्दे, शिराळी, दाडेली, गोकर्ण, मुधोळ, तेरदाल, जमखिडी बादामी, अशी आणखी काही गावे या प्रान्तात दत्तासाठी उल्लेखनीय आहेत. नृसिंहाशी दत्ताचे एकरूपत्व मानल्यास नृसिंहाचीही पुष्कळ मदिरे कर्नाटकात दिसतात.

कर्नाटकातील दत्तभक्तीचा वारसा पाहाताना म्हैसूरच्या महाराजानी लिहिलेल्या दत्तात्रेयावरील इग्रजी ग्रथाची आठवण होणे स्वाभाविक आहे. अवधूतगीता व जीवन्मुक्तगीता या दोन दत्तप्रणीत गीतावर भाष्य करण्याच्या निमित्ताने श्रीजयचामराजेन्द्र वाडियार बहादुर यानी 'दत्तात्रेय. दि वे ॲण्ड दि गोल' या नावाचा एक उत्तम ग्रथ लिहिला असून त्याला सर्वपल्ली राधाकृष्णन् याची प्रस्तावना आहे दत्तात्रेयासबधी प्रास्ताविक विचार पहिल्या दोन प्रकरणात केल्यानतर महाराजानी जीवन्मुक्तगीता व अवधूतगीता यावर मर्मदर्शी भाष्य केले आहे आणि शेवटच्या प्रकरणात 'ए क्रिटिकल एस्टिमेट ऑफ् दि फिलॉसफी ऑफ् दत्तात्रेय' या नावाने दत्तात्रेयाच्या तत्त्वज्ञानासबधी व कार्यासबधी विस्तृत विवेचन केले आहे ग्रथाच्या शेवटी विस्तृत अशी सदर्भसूची व ग्रथसूची दिलेली असल्याने तत्त्वजिज्ञासू दत्तभक्ताना या ग्रथाचा उपयोग होण्यासारखा आहे

## दत्तपंथी तेलुगू धारा

ज्या दत्तपथाचा लक्षात येईल एवढा विस्तार

महाराष्ट्रात झाला त्याचे अर्वाचीन काळातील मूळ पीठापूर, कुरवपूर या आध्र प्रातातील स्थानात असल्याचे आपण पाहिलेच श्रीपाद-वल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती याना कन्नड व तेलुगू भाषिकाचाही अनुयायीवर्ग लाभला होता डॉ टी एम पी महादेवन् गौरवग्रथात मद्रास विद्यापीठातील तेलुगू विभागाचे प्रमुख एन वेकटराव यानी 'तेलुगू साहित्यातील दत्त-साप्रदायिक ग्रथ' या नावाचा जो लेख लिहिला आहे त्याचा परिचय रा चि ढेरे यानी म सा पत्रिकेच्या १४६-१४७ व्या अकात करून दिलेला आहे आज महाराष्ट्रात असलेले मातापूर वा माहूर हे क्षेत्र पूर्वी हैद्राबाद संस्थानात वा विशाल तेलंगणात मोडत असे आध्रच्या अदिलाबाद जिल्ह्यात मातापूर येत असे या माहूरच्या दत्तमदिराच्या प्रमुखास 'दत्तात्रेययोगी' असे नाव असून या योग्याचा भाविकाशी सबध असे सन १५५० च्या सुमारास दत्तात्रेययोगीने दासगोसावी नावाच्या आपल्या शिष्यास दत्त-साप्रदायाचे तत्त्वज्ञान मराठीतून शिकविले दास गोसाव्याने ते 'वेदान्तव्यवहारसारसग्रह' नावाच्या ग्रथात ग्रथित केले त्याने यातील तत्त्वज्ञान गोपालभट्ट व सर्ववेद या आपल्या तेलुगू शिष्या-नाही शिकविले या दोन शिष्यानी या ग्रथाचा तेलुगू अनुवादही केला

याप्रमाणे दत्तात्रेययोगी व त्याचा शिष्य दास-गोसावी हे तेलुगू भाषेतील दत्तोपासनेचे आदिगुरू ठरतात ढेरे याच्या मते हा दासगोसावी म्हणजे मराठीतील प्रसिद्ध दत्तोपासक दासोपत होत दासोपत या सुमारास माहूरगडावर होते असा पुरावा त्याच्या चरित्रात मिळतो दासोपताचे मूळस्थान विदरकडील नारायणपेठचे, त्याच्या बारा वर्षांचे तपाचे स्थान माहूरगड हा सदर्भ लक्षात घेता दासोपत -हेच दास गोसावी होत असे दिसते प्रा राव याच्या मताने या दत्ता-त्रेयीचा आणखी एक शिष्य म्हणजे परमानंदतीर्थ होय. या परमानदतीर्थांनी शतके, द्विपदकाव्ये, यक्षगान व वचन या चार प्रकाराची वाङ्मय-सपदा निर्माण केली त्याचे 'दत्तात्रेय शतकमु' हे दत्तस्तुतिपर काव्य या दृष्टीने महत्त्वाचे आहे 'अनुभवदर्पणमु' व 'शिवज्ञानमजरी' ही अद्वैतज्ञानाची काव्ये परमानद-तीर्थांनी दत्त-गुरूनाचा समर्पण केली आहेत याचे काही गद्य ग्रथही आहेत त्याचा 'विवेकचितामणि' हा वेदान्तपर ग्रथ तेलुगूतून निजवगुणशिवयोगीनी कन्नड भाषेत आणला व या कन्नड ग्रथाचा अनुवाद एकनाथकालीन लिंगायत सत शातलिंग-स्वामी यानी मराठीत आणला परमानदतीर्थांच्या तेलुगू शिष्यानीही ग्रथरचना केलेली दिसते नाथाच्या तेलुगू शिष्यशाखेचीही नोद प्रा राव यानी केलेली आहे दत्तात्रेय–जनार्दन–एको जनार्दन – नरहरिमहेश – नागोजीराम – कोनेरु गुरु–महादेवगुरु–परशुरामपन्तुल लिंगमूर्ती, गुरु-मूर्ती दत्तात्रेययोगीची तेलुगू परपरा खालील प्रमाणे आहे



# ५ श्रीदत्तात्रेय-उपासना

कांता कांचन राज्य वैभव नको,
कैवल्यही राहु द्या ।
होऊ द्या अपदा शरीर अथवा
काळासि हीराउ द्या ।।
पाहूं द्या रुप येक वेळ नयनी,
ही माझि आराधना ।
स्वामी दत्त दयाघना ! अवधुता !
श्रीअत्रिच्या नंदना ।।

— श्री विष्णुदास माहुरकर



## उपासना : स्वरुप व प्रकार

दत्तात्रेयाच्या अवतारहेतूस धरुनच त्याच्या उपासनापद्धतीचा विकास झालेला दिसतो. भुक्ती आणि मुक्ती देणाऱ्या या दैवताची उपासना भक्तांनी कोणत्या पद्धतीने केली, कोणत्या पद्धतीने करावी, यासंबंधी थोडा विचार करावयाचा आहे. त्यासाठी प्रथम उपासनास्वरुप पाहाणे अगत्याचे आहे. उपासना हा शब्द उप + आस् = बसणे, जवळ जाणे, प्रवेश करणे या अर्थाने रुढ आहे. इष्ट देवतेच्या जवळ जाणे, तिच्याशी एकरुपता साधणे, या ऐक्यातला आनंद भोगणे, हे उपासकाचे ध्येय असते. जीवाने अनन्य होऊन, लीन होऊन, सर्वसत्तात्मक प्रभूशी अनन्य असणे हे उपासनेचे महत्त्वाचे अंग आहे. आपल्या आराध्य दैवताची शास्त्रशुद्ध पद्धतीने ऐक्यभावाच्या अनुभवासाठी केलेली भक्ती म्हणजे उपासना असे थोडक्यात म्हणता येईल.

ऐहिक जीवनातील सर्व प्रकारची सुखे प्राप्त झाली तरी मानवी मनास एक प्रकारची हुरहूर नेहमी असते. त्याच्या मनाची ही हुरहूर, ही अस्वस्थता म्हणजेच त्याच्या मानवजन्माची

सार्थकता मानण्यात आली आहे. लोह, चुनखडी, अभ्रक, गंधक, चर्बी, रक्त, अशाचा एक गोळा म्हणजे काही मनुष्य नव्हे. पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश यांचा नुसता संघात म्हणजे मनुष्य नव्हे. 'न हि मानुषात् श्रेष्ठतरं हि किंचित्' असे महाभारतात का म्हटले आहे ? मानवी जन्माची, मानवी देहाची एवढी तरफदारी का केली जाते ? मलमूत्राचा वा अस्थिमासाचा गोळा म्हणून मानवी देहाची विटंबना विशिष्ट हेतूने साधुसंत करीत असले, तरी याच देहाने अमरत्वाची अनुभूती घ्यायची असते हा मानवी देह आहे म्हणून आत्म्यास स्थिरावण्यास तरी जागा आहे, नाही तर समर्थांनी म्हटल्याप्रमाणे देह नसता तर आत्मा ठायी ठायी विरून गेला असता ! म्हणूनच वेदांतून व उपनिषदांतून या मानवी देहाचा गौरव अनेकदा केलेला दिसतो.

'इयं ते यज्ञा तनूः स' (यजु)-हा तुझा देह परमात्म्यास मिळण्याचे साधन आहे, असे म्हटले जाते. सारा मानवी देह हा एक परमेश्वराच्या निवासस्थानाप्रमाणे आहे सर्व प्रमुख देवता मानवी देहात वावरतात. उपासनेच्या आरंभी त्यांची आठवण ठेवणे, त्यांना जागृत करणे, हा एक विधी न्यासमुद्रांच्या साहाय्याने करायचा असतो, हे आपण पुढे आचारधर्मांच्या प्रकरणात पाहाणार आहोतच. म्हणूनच यजुर्वेदात मानवी देहास ऋषिभूमी व अथर्ववेदात देवपुरी असे म्हटले आहे. वेदांत व उपनिषदांतून मानवी देवास ब्रह्मपुरी म्हणून गौरविले आहे. याच दैवी नौकेवर आरूढ होऊन आपणांस मुक्काम गाठायचा असतो. देहाचे फाजील लाड न करता, त्याच्या आधीन न होता, त्याच्या साहाय्याने भजन, पूजन, नामस्मरण, ध्यानधारणा इत्यादींच्या साहाय्याने परतत्त्वाशी जवळीक साधणे, त्याच्यात एकरूप होणे, त्याच्याशी सुसंवादित्व राखणे, हा उद्देश मानवी जीवनाचा असून उपासनेचे मुख्य उद्दिष्टही हेच आहे.

या उद्देशाला अनुसरून उपासनेचे रूप निश्चित होत असते. जीवाने शिवाशी एकरूप होणे, आत्म्याने परमात्म्याशी मिळून जाणे; यासाठी विविध प्रकारची साधना करणे, प्रसंगी सर्वस्व अर्पण करण्याची तयारी असणे; केवळ ईश्वराच्या अनुभूतीसाठी, साक्षात्कारासाठी सर्वस्वाचा त्याग करून अखंड एकाग्र होणे, हे उपासनेचे एक प्रधान रूप आहे. केवळ मुक्तीच्या हेतूने केलेली ही उपासना निष्काम उपासना म्हणून प्रसिद्ध आहे आणि विशिष्ट लौकिक हेतू मनात धरून केलेली उपासना सकाम म्हणून गणली गेली आहे. धनदौलत, आरोग्य, संतती, सत्ता, वैभव, कन्यापुत्र इत्यादींच्या लाभासाठी उपासनेत विविध प्रकार सांगितले आहेत. त्या त्या लौकिक लाभासाठी ते ते संकल्प आपण नित्याच्या पूजेत वा व्रताचरणातही पाहातो. श्रीदत्तात्रेयाच्या उपासनेत निष्काम व सकाम उपासना करणारे असून बहुतेक प्रापंचिकांचा कल सकाम उपासनेकडेच असतो. दत्तदैवत हे त्वरित पावणारे, स्मरण करताच कृपावंत होणारे, इच्छिली वस्तू देणारे असल्याने त्याच्याभोवती सकाम भक्तांचाच भरणा मोठा दिसतो. कोणी धन मागतो, कोणी पैसा मागतो, कोणी राज्य मागतो, कोणी व्याधिनिवारण इच्छितो, कोणी मनासारखी संतती मागतो, आणि ज्याच्या त्याच्या मनोधारणेप्रमाणे, श्रद्धेप्रमाणे दत्तात्रेय त्याची मनकामना पूर्णही करतात.

उपासनेचा आणखीही एक प्रकार संभवतो. यक्ष, गंधर्व, राक्षस, भूतपिशाच इत्यादिकांना वश करून, हीन मार्गाने ताब्यात ठेवून जारणमारण, अंगारेधुपारे, ताईत, गंडेदोरे, इत्यादींच्या साहाय्याने या क्षुद्र दैवतांना वश करण्याचाही प्रचार आहे. अर्थात् उपासनेच्या या आसुरी प्रकारास श्रेष्ठ प्रकारच्या उपासनेत कोठून स्थान असणार ? तरी काही शाक्त व तांत्रिक यांच्या मर्यादा अनेक ठिकाणी सुटलेल्या दिसतात. वाममार्गी व

अघोरी उपासना दत्तसंप्रदायात नाहीच असे नाही. स्वतः दत्तात्रेयच नग्नस्त्री व मद्यपान यांच्यांत गुरफटलेले अनेकदा दिसतात. दत्तात्रेयांच्या या विकृत रूपाचा रूपकार्थ कोणीही कितीही समजावून सांगितला, तरी जसा भक्त तसा त्याचा देव, हाच सिद्धान्त शेवटी या बाबतीत खरा ठरतो. दुसऱ्याचे अहित करावे, दुसऱ्याचे धन हरण करावे, अप्राप्य स्त्रीस वश करावे; यासाठीही अनेक प्रकारचे उपासनामंत्र सिद्ध झालेले दिसतात. अर्थात् या उपासनाप्रकारांकडे खरा साधक व तत्त्वजिज्ञासू ढुंकूनही पाहात नाही. धनदौलत वा ऐहिक सुखासाठी उपासना करणारा कामिक उपासक व दत्तस्वरूपाचा साक्षात्कार होण्यासाठी तळमळणारा साधक यांच्या दृष्टिकोणांतूनच आपणांस दत्तोपासनेचे अंतरंग पाहावयाचे आहे. धन, पुत्र, सत्ता, आरोग्य मागणारे असंख्य उपासक आपल्या परिचयाचे आहेत आणि 'दत्तगुरो, तुझे फक्त प्रेम दे, तुझ्या कृपेची पाखर असू दे, तुझ्या संगतीत वावरू दे' म्हणणारे एखादे पंत वाळेकुंद्रीकर, एखादे विष्णुदास माहूरकर, एखादे निरंजन रघुनाथ, एखादे जालवणकर महाराजही आपणास माहीत आहेत. या दोनही भूमिकांवरून केली जाणारी दत्तात्रेयांची उपासना आपण थोडी निरखून पाहू.

## निर्गुण–निराकार

श्रेष्ठ साधक वा मुमुक्षू यांना अनेकदा निर्गुण-निराकाराचा ध्यास असतो. रानावनांत जाऊन, गिरिकंदरांत राहून, ध्यानधारणा करून, अव्यक्त तत्त्वाचे चिंतन करणारे मुमुक्षू साधक निर्गुण–निराकाराच्या उपासनेत दंग होतात. दत्तपरंपरेत असे कित्येक साधक असल्याचे आपण पाहाणार आहोत. यांचा सर्व भर योगधारणेवर असतो. वेद-उपनिषदे यांतून याच निर्गुण तत्त्वाची उपासना सांगितलेली दिसते. हठयोग, तारकयोग, लययोग, राजयोग इत्यादींची साधना करून निर्गुण–निराकाराचे ध्यान कसे साधले जाते, यमनियमांचे प्रकार कोणते, प्राणायाम कसा साधावा, षट्चक्रांचा भेद कसा होतो, कुंडलिनी कशी जागृत होते, सहस्रारातील अमृतबिंदूंच्या प्राशनाने कोणते सौख्य मिळते, या मार्गात प्रवास होत असताना नाद, बिंदू, प्रकाश यांचे दर्शन कसे होते, इत्यादींचा सविस्तर खुलासा पुढे तत्त्वज्ञान व आचारधर्म यावरील प्रकरणांत केलेला आहेच.

स्वतः दत्तात्रेयांनीच ही योगविद्या निर्गुण-निराकाराच्या उपासनेसाठी सांगितलेली आहे. नाथपंथीयांची उपासना याच निर्गुणतत्त्वावर आधारलेली आहे. स्वतः दत्तात्रेय हे अवधूत, दिगंबर, गगनमठीचे योगी असल्याची वर्णने सर्वत्र मिळतात. दत्तगुरूंचे रूप 'नित्यं शुद्धं निराभासं, निराकारं, निरंजनम्' असल्याचे श्रीगुरुगीता सांगते. हा श्रीगुरू 'चैतन्यं, शाश्वतं, शान्तं, व्योमातीतं, निरंजनं, नादबिंदुकलातीतम्' असल्याची साक्ष श्रीगुरुगीतेत आहे. हा दत्तगुरू कसा आहे ? तर 'अखण्ड मण्डलाकारं, व्याप्तं, येन चराचरम्' त्याने चराचर व्यापिले आहे, खंडित न होणाऱ्या वलयाकार मंडलात तो भरून राहिला आहे. तो गुणातीत आहे, रूपवर्जित आहे, अशीच श्रद्धा या निर्गुणनिराकाराचे ध्यान करणारांची असते.

परमात्म्याचे वा परब्रह्माचे हे अव्यक्त रूप फार तर प्रणवाच्या वा ॐकाराच्या दर्शनाने कल्पूनही निराकाराची, अव्यक्ताची, गुणातीताची उपासना चालते. प्राचीन यज्ञयागांत व मंत्रतंत्रांत या ॐकारास प्राधान्य असे. अ, ऊ, म या तीन अक्षरांत दत्तात्रेयांच्या तीन मुखाचे रूप साधकांना जाणवते. ॐ हे ब्रह्मस्वरूपाचे चिन्ह असल्यामुळे केवळ याचाच जप निश्चित चित्ताने एकान्तात राहून करणारे अनेक साधक आहेत. कठोपनिषदात म्हटले आहे 'सर्वे वेदा यत्पदमामनन्ति । तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति ॥ यदिच्छन्तो ब्रह्म-

चर्यं चरन्ति । तत्त पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत्' (१.२)–सर्व वेद ज्या पदाची घोषणा करतात, सर्व तपे ज्याबद्दल बोलतात, ब्रह्मचारी ज्याची इच्छा करतात, ते पद संक्षेपाने ॐ हेच आहे; म्हणूनच पातंजलयोगात 'तस्य वाचकः प्रणवः' म्हणून ॐकारास ब्रह्मप्राप्तीचे साधन मानले आहे. वेदांचा आरंभ व वेदाचे पर्यवसान ॐकारातच असल्याने त्यास अव्यक्त उपासनेत महत्त्वाचे स्थान मिळाले आहे. याच पद्धतीस अनुसरून सगुणोपासनेच्या वाढीनंतरही इस्लामच्या भारतीय सत्तेनंतर पुनः निर्गुणाची उपासना प्रभावी ठरली. स्वामी राघवानंद, रामानंद यांच्या उपासनापद्धतीत उपनिषदातील निर्गुण-निराकारत्वाची बीजे सापडतात. कबीर व त्याचा पंथ निर्गुणाचा उपासक म्हणून प्रसिद्ध आहे. कबीराचा राम जसा दशरथसुत नाही, तसा तो तुकोबांनाही निराळाच वाटतो. 'दशरथसुत हा कालचा । अनादी कालचा आत्माराम' अशी या निर्गुणोपासकांची धारणा असते.

# गायत्रीसाधना

अव्यक्ताची, निर्गुणाची, निराकाराची उपासना कितीही श्रेष्ठ असली तरी ती फार थोड्यांना साधते. म्हणून तिच्या साधनेस गायत्रीची जोड मिळालेली दिसते. दत्तसंप्रदायाच्या श्रीगुरुचरित्रादी साधनग्रंथात गायत्रीच्या उपासनेस नित्याच्या कर्मकांडातही महत्त्व दिलेले आहे. सविता म्हणजे सूर्य ही मुख्य देवता असलेल्या या मंत्राचे अनुष्ठान या उपासनाप्रकारात येते. संध्योपासनेत या मंत्राचा जप करायचा असतो. 'ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गोदेवस्य धीमहि । धियो यो नः प्रचोदयात् ॥' (ऋग्वेदः ३.६२–१०) सर्व चराचरास प्रेरणा देणारा जो सविता देव त्याचे सर्वांना प्रिय व अवर्णनीय असे श्रेष्ठ तेज आहे; त्याचे ध्यान कर्तव्यबुद्धीने आम्ही करतो. तो सविता भगवान् आमच्या बुद्धीला व ध्यानभक्तीला उत्तम प्रेरणा देवो.' पापांचा परिहार, देहमनाची शुद्धी व तेजाची प्राप्ती यांसाठी हा जप करायचा असतो. जपापूर्वी 'आपो ज्योतीरसोऽमृतम् ब्रह्म भूर्भुवः स्वरोम्' या मंत्राचे पठन व ॐकार व 'भूर्भुवस्वः' या व्याहृती याचा उच्चार करायचा असतो.

ही गायत्री वर देणारी व ब्रह्मस्वरूपिणी आहे. गय–प्राण, त्रै–वाचविणे; यावरून प्राण वाचविणारी, रक्षण करणारी ती गायत्री असे मानले जाते. त्रिपदा म्हणजे तीन चरणांची गायत्री ही वेदाचे मुख असून हिच्याच साहाय्याने ब्रह्मत्वाची प्राप्ती होते. या अमृतमंत्राने तेजोभास्कराची आराधना केली जाते. सर्व चराचर विश्वाचा आधार सूर्य आहे. मानवाच्या मानसिक क्रियांची प्रेरणाही सूर्य आहे. योगदर्शनात तर सूर्य हे आत्म्याचे प्रतीक मानले आहे. म्हणून गायत्रीच्या साधनेने प्राण, मन, बुद्धी व आत्मा यांची जोपासना होते. गायत्री व प्राण यांचे तादात्म्य वैदिक वाङ्मयात अनेक ठिकाणी दिसते. कित्येकदा गायत्रीला सावित्री असेही म्हटलेले आढळते.

(या) गायत्री मंत्राची अक्षरे चोवीस असल्याने चोवीस लक्षांचे गायत्रीपुरश्चरण अनेक साधक करतात. जप, होम, तर्पण, मार्जन व ब्राह्मण-भोजन अशा पांच अंगांच्या विधीला पुरश्चरण म्हणतात. या विधीस जागा कोणती असावी, संकल्प कसा असावा, आसन कसे असावे, जपमाळेचे मणी किती असावेत, कामनेप्रमाणे हवनद्रव्ये कोणती असावीत, इत्यादींचे मार्गदर्शन धर्मशास्त्रात मिळण्यासारखे आहे. या गायत्रीच्या जपामुळे परब्रह्माची प्राप्ती होते. म्हणूनच भीष्मपितामहांपासून रवीन्द्रनाथ ठाकुरांपर्यंत सर्वांना गायत्रीच्या मंत्राने प्रभावित केलेले दिसते. देवीभागवतापासून श्रीगुरुचरित्रापर्यंतच्या सर्व प्रमुख ग्रंथांनी गायत्रीच्या उपासनेचा महिमा वर्णन केला आहे. विश्वामित्रांनी रामचंद्रासही गायत्रीचा

उपदेश दिला होता आणि भगवान श्रीकृष्णही गायत्रीचा जप करीत असत !

गायत्री मंत्रातील प्रत्येक अक्षराचे रहस्य अनेकांनी समजावून सांगण्याचा प्रयत्न केला आहे. 'ओमित्याक्षरं ब्रह्म' हे तर वर सांगितल्याप्रमाणे प्रसिद्धच आहे. 'ओमित्येवं ध्यायथ आत्मानम्' (२.२.६) ओम्च्या द्वारा परमात्म्याचे ध्यान करा, असे मण्डुकोपनिषदात म्हटले आहे. अ म्हणजे विराट अग्नी, विश्व; उ म्हणजे हिरण्यगर्भ,वायू, तेज, चित्; म् म्हणजे ईश, प्राज्ञ, आदित्य, आनन्द; असे अर्थ सांगण्यात येतात. गायत्रीमंत्रापूर्वी भूः, भुवः व स्वः या तीन व्याहृती असून प्रत्येकाचा अर्थही स्पष्ट केला जातो. भूः म्हणजे प्राणाधार, स्वयंभू, सत्; भुवः म्हणजे दुःखमुक्त करणारा, चित्त, अपान; आणि स्वः म्हणजे सुखदाता, कल्याणकर्ता, व्यान, ब्रह्म. या तीन व्याहृतींचा, एकत्र अर्थ असा की, हे रक्षक, प्राणाधार, दुःखनाशक, सुखदाता, सत्-चित्-आनंद भगवान् !

गायत्रीमंत्राच्या पहिल्या पदात म्हणजे चरणात सवितुः, वरेण्यम्, भर्गः व देवस्य असे चार शब्द असून प्रत्येकाचा अर्थ सांगण्यासारखा आहे. सविता म्हणजे अग्नी, तेज, प्राण, विद्युत्, सूर्य आहे. जन्म देणारा, प्राण राखणारा, सर्वांचे रक्षण करणारा म्हणजे सविता. सर्वांचा स्वामी म्हणजे सविता. वरेण्यम् म्हणजे सेवा करण्यास, वर्णन करण्यास योग्य. भर्ग म्हणजे शुद्ध, अनेकविध ऐश्वर्य, पाप नष्ट करून आनन्द देणारा असा अर्थ सापडतो. भर्ग प्रकाशवाचक व ज्ञानरूप आहे. देवस्य मधील देव म्हणजे प्रकाशदायी,आनंददायी,आल्हादकारक धीमहि म्हणजे ध्यान करणे, चिंतन करणे; अशा प्रकारे सर्व शब्दांचा वा अक्षरांचा अर्थ लावता येण्यासारखा आहे. 'धियो यो नः प्रचोदयात्' म्हणजे आमची बुद्धी, आमची कृती, तुझ्याकडून प्रेरित होवो. अशा या प्रख्यात गायत्रीच्या मंत्राने अनेक दत्तभक्तांनी निर्गुणनिराकाराची उपासना केलेली दिसते.

# मंत्र, तंत्र, यंत्र

दत्तात्रेयांच्या निर्गुणनिराकार उपासनेकडून सगुणाकडे वळण्यापूर्वी आणखी एका उपासनाप्रकाराचा उल्लेख येथे करावयास हवा. मंत्र,तंत्र, यंत्र इत्यादींनाही दत्तोपासनेत प्राधान्य मिळालेले दिसते. इष्टसाधक व अनिष्टनिवारक असा वर्णसमूह म्हणजे मंत्र. गुह्य अथवा गुप्त गोष्ट साधण्यासाठीही मंत्राचा उपयोग होत राहिला. 'मंत्र'मधील मकार म्हणजे मनन, त्रकार म्हणजे त्राण म्हणजे संरक्षण असाही मंत्राचा अर्थ सांगितला जातो. 'मंत्रः मननात्' जो मनन केला जातो, ज्याच्यापासून यज्ञ, देव आणि आत्मा यांचे ज्ञान होते तो मंत्र, अशीही मंत्राची व्याख्या केली जाते. मंत्र हे साक्षात्कारी सिद्ध पुरुषांनी, ऋषिमुनींनी सांगितलेले असल्यामुळे त्यांच्यांत विलक्षण सामर्थ्य असते.

मंत्राच्या उच्चारातही सामर्थ्य असून त्याच्या स्वरलहरींनी निर्माण होणाऱ्या कंपनांत एक प्रकारची शक्ती असते. इष्टदेवतेच्या आराधनेसाठी बहुतेक सर्व विधी समंत्रक असतात. दीर्घायुष्य, स्वर्गप्राप्ती, पुत्र, धन, पशुलाभ, शत्रुनाश, रोगनाश, अपमृत्युनिवारण इत्यादींच्या प्राप्तीसाठी इष्टदेवतांचे मंत्र असतात. वेदमंत्र, तंत्रमंत्र, शाबरमंत्र, यांप्रमाणेच बीजमंत्र, मूलमंत्र, मालामंत्र, अशा मंत्रांच्या जाती सांगितल्या आहेत. अं, यं, रं, लं, ऱ्हाम्, ऱ्हीम्, ऱ्हूम् इत्यादी एकवर्णात्मक बीजमंत्र दत्तोपासनेतही आहेत. गं—गणपती, ऱ्हीं-माया, श्री-लक्ष्मी, क्लीं-काली असे काही देवतांचे बीजमंत्र आहेत. मंत्राची शक्ती त्याच्या बीजात असते. बीजे उच्चारताना जे विशिष्ट प्रकारे स्पंदन होते त्यामुळे विशिष्ट ध्वनिलहरी निर्माण होऊन शरीरातील विशिष्ट केंद्रे व चक्रे जागृत होतात. दत्तात्रेयांची उपासना शाक्त व तांत्रिकांत या बीजमंत्रानेही केली जाते. दत्तमंत्रांचे वर्णन पुढे पृष्ठ १६० वर केलेले आहे.

याच मनाच्या साह्याने आत्मविद्येचा वा तत्त्वज्ञानाचा विस्तार होतो, तेव्हा तन्त्रशास्त्र जन्मास येते तन्त्राला आगम असे दुसरे नाव असून वेदाधिकार ज्याना नाही अशाच्यासाठी तन्त्राची निर्मिती झाली असल्याचे सागितले जाते कुलार्णवात तर कलियुगात तन्त्रमार्ग आचरावा असे सागितले आहे *आगम, यामल, तन्त्र* असे तन्त्राचे तीन प्रकार असून नाना प्रकारच्या हेतूसाठी नाना प्रकारची तन्त्रे निर्माण झालेली दिसतात शैवागम, रुद्रागम, भैरवागम असे आगमतन्त्राचेही विभाग आहेत शैव, शाक्त, गाणपत्य, सौर, वैष्णव, अशा विविध पथीय तान्त्रिक देवताही आहेत. गुरु, मन्त्र व देवता ही तन्त्रसाधनेची मूलतत्त्वे असून तन्त्रशास्त्राचे विशिष्ट आचारही आहेत गुरूचे ध्यान, मानसपूजा, बीजमन्त्राचा जप, स्नानविधी, नित्यार्चन, विजया (भाग) ग्रहण, भूतशुद्धी, न्यास, अगन्यास, करन्यास, मातृकान्यास, ऋषिन्यास, व्यापकन्यास असा काहीसा जटिल आचारही तन्त्रमार्गात आहे

या मन्त्रतन्त्रातूनच विविध यन्त्राची निर्मिती झाली साधकाच्या समोर सोने, चादी, अथवा तावे वापरून त्याच्या पत्र्यावर इष्टदेवतेचे यन्त्र काढलेले असते बिंदू व त्रिकोण याच्या साह्याने यन्त्र तयार होते बिंदू म्हणजे सर्व विश्वाचे आदिकारण या बिंदूतूनच चक्र निर्माण होते. यानतर त्रिकोण, अष्टकोण, दशकोण अशी चक्रे तयार होतात या चक्राकित यन्त्राची पूजा शाक्तात व तान्त्रिकात मोठ्या प्रमाणात होते दत्तात्रेयाच्या उपासनेतही अशी यन्त्रे उपलब्ध आहेत श्रीदत्तयोगेश्वरदेवतीर्थांनी एक 'श्रीदत्तात्रेय महासिद्ध यन्त्र' तयार केले आहे द्रां हे बीजाक्षर मध्यबिंदू मानून कमलपाकळ्यानी व वर्तुळानी या यन्त्राची सिद्धता झाली आहे या यन्त्राच्या दर्शनाने भाग्योदय होतो, वाईट ग्रहाचे परिणाम होत नाहीत, घरातील पीडा दूर होते, शरीरव्याधी नष्ट होतात, यश, कीर्ती, लक्ष्मी याची प्राप्ती होते, अशी यन्त्रकर्त्याची धारणा आहे. 'दत्तात्रेय हरे कृष्ण उन्मत्तानन्ददायक। दिगम्बर मुने बाल पिशाच ज्ञानसागर' (दत्तात्रेयोपनिषद्) 'दत्तात्रेय शिव शात इद्रनीलनिभ प्रभुम्। आत्ममायारत देव अवधूत दिगम्बरम् ॥' (शाण्डिल्योपनिषद्), 'दत्तात्रेयो महायोगी भगवान् भूतभावन ॥' (जाबालदर्शनोपनिषद्) इत्यादी ध्यानश्लोकही त्यानी या श्रीदत्तात्रेय महासिद्धयन्त्राचे दिलेले आहेत यान्त्रिकाची यन्त्रपूजा, व तिचा आविष्कार अत्यत जटिल आहे, शाक्ताच्या पचमकाराचाही त्यात शिरकाव असल्याने, दत्ताच्या उपासनेचे हे अग रहस्यम असल्याने व त्यातील धोके स्पष्ट असल्याने त्याचा केवळ निर्देश करणेच इष्ट वाटले. जिज्ञासू असतील त्यानी ब्रह्मीभूत श्रीयोगेश्वरानदतीर्थ याचा 'मन्त्रशास्त्र' हा ग्रथ पाहावा

## श्रीगुरुपादुका

श्रीदत्तात्रेयाच्या उपासनेत अनेक ठिकाणी पादुकापूजनास महत्त्व आहे श्रीदत्तात्रेय हे गुरुस्वरूपात सर्वत्र आढळल्यामुळे त्याच्या चरणपूजेचा महिमा वाढलेला दिसतो. या पथातील गुरुतत्त्वाचे मर्म आपण पुढे तत्त्वज्ञानावरील प्रकरणात सविस्तर पाहाणार आहोतच. दत्तात्रेयानी चोवीस गुरु करून प्रत्येकापासून एकएक गुण घेतला असला तरी स्वत दत्तात्रेय सर्वांना बोध देणारे गुरुच आहेत दत्तात्रेयाचे हे गुरुरूप वा गुरुतत्त्व जाणल्याखेरीज सर्व जपतपादी साधने, तीर्थयात्रा व्यर्थ होत. 'सर्वपापविशुद्धात्मा, श्रीगुरो पादसेवनात्।' श्रीगुरुचरणाच्या सेवेतून सर्व पापापासून अत करण शुद्ध होऊन जाते. गुरुचरणावरील पाणी मस्तकावर घेतले तर सर्व तीर्थात स्नान केल्याचे फळ मिळते गुरुचरणतीर्थ पापरूपी चिखलाला सुकविणारे पापहारक असून ज्ञानरूपी तेजाला उज्ज्वल करणारे आहे. श्रीगुरुपादोदकाने ज्ञान आणि

वैराग्य यांची प्राप्ती होते. श्रीगुरूच्या चरणांचे तीर्थ घ्यावे, असा श्रीगुरुगीतेतील भावार्थ आहे.

'जान्हवी चरणोदकम्' (१६) असे श्रीगुरुगीता म्हणते. 'गुरोः पादोदकं यत्तु, गयाऽसौ सोऽक्षयो वटः' (१७) श्रीगुरूंचे चरणतीर्थ म्हणजे प्रत्यक्ष प्रयागतीर्थच होय. गयेचा चिरंतन वटवृक्ष म्हणजे श्रीगुरूच. देवांना दुर्लभ अशा ह्या गुरुचरणांचा लाभ भक्तांना सहजासहजी होतो. 'गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः। गुरुरेव परब्रह्म, तस्मै श्रीगुरवे नमः' (३२) हा श्रीगुरुगीतेतील श्लोक गुरूचा थोर महिमा सांगून जातो. 'त्वं पिता त्वं च मे माता, त्वं बंधुस्त्वं च देवता।' अशी भावना श्रीगुरूसंबंधी असते. श्रीगुरूंचे चरणकमल सुख-दु:ख, शीतोष्ण, मानापमान इत्यादी द्वंद्वांपासून होणारा त्रास दूर करणारे आहेत. म्हणून दत्त-पंथीयांत श्रीगुरु व त्यांच्या चरणपादुका याना फार महत्त्व आहे. 'पूजामूलं गुरोः पदम्' (७६) पूजेचे मूल स्थान गुरुचरण आहेत.

या श्रीगुरूंचे ध्यान कसे करावे हेही श्रीगुरु-गीतेत सांगितले आहे. गुरुस्मरण, गुरुस्तवन, गुरूस नमन व गुरूचे मनन मिळून गुरुध्यान पूर्ण होते. गुरुगीतेत ९१ ते ९३ श्लोकातून श्रीगुरुरूपाचे अतिशय मनोहर असे वर्णन आले आहे. 'हृदंबुजे कर्णिकमध्यसंस्थे। सिंहासने संस्थितदिव्यमूर्तिम्॥ ध्यायेद् गुरुं चंद्रकलाप्रकाशं। चित्पुस्तकाभीष्टवरं दधानम्॥' (९१) हृदयरूपी कमळाच्या देठाच्या मध्यभागी, हृदयसिंहासनावर विराजमान झालेली दिव्य मूर्ती चांदण्याप्रमाणे आल्हादकारक असलेली, ज्ञानग्रंथ हाती धरलेली व अभीष्ट वर देणारी, अशी श्रीगुरुमूर्ती ध्यानात आणावी. पांढरे वस्त्र नेसलेली, श्वेत चंदनाची उटी लावलेली, पांढरी पुष्पे धारण केलेली, पांढऱ्या मोत्यांच्या अलंकारांनी नटलेली, आनंदाने परिपूर्ण, दोन डोळे असलेली, जिच्या मांडीवर दिव्य आदिशक्ती स्थानापन्न झाली आहे, मंद स्मित असलेली, कृपेचा साठा असलेली ही गुरु-मूर्तीच साधकाने ध्यानात स्थिर करावी. गुरूशी बोलावे कसे, गुरूशी वागावे कसे, खरा गुरु कोण, 'गुरु' शब्दाचा अर्थ काय, गुरुप्रसादाचे महत्त्व काय, गुरुध्यानाचे फल काय; अशा अनेक प्रश्नांची गुरुगीतेने दिलेली उत्तरे दत्तभक्तांना चिंतनीय वाटतात.

दत्तसांप्रदायिकांत गुरूपेक्षा गुरुचरणांनाच महत्त्वाचे स्थान आहे. इस्लामी सत्तेत प्रतिकूल परिस्थिती निर्माण झाल्यानंतर मूर्तीऐवजी पादुकापूजनाचा विधी सुरू झाला असे सांगितले जाते. पण श्रीगुरूच्या वा इष्टदेवतेच्या पादुका पूजण्याचा प्रकार फार पूर्वीपासूनचा आहे. श्रीराम वनवासात असताना भरताने त्याच्या पादुकाच सिंहासनावर ठेवून आदरभाव दर्शविला होता. दत्तावतारी सत्पुरुषाचे वर्णन 'पूज्यपादाः' या शब्दानेच केले जाते. अतिशय प्रिय व्यक्ती-विषयी थोर आदर दाखविणे म्हणजे त्याच्या पायावर डोके ठेवणे. यातले आणखी एक रहस्य असे की, श्रेष्ठ सत्पुरुषाची सारी दैवी शक्ती त्याच्या चरणात एकवटलेली असते. त्याच्या चरणस्पर्शाने कंपनद्वारा ती शक्ती भक्तात संचारत असल्याचा अनुभव अनेकाना आला आहे. म्हणूनच अनेक दत्तस्थानांत दत्तमूर्तीपेक्षा दत्तपादुकांना स्थान मिळालेले दिसते गिरनारच्या शिखरावर श्रीदत्तात्रेयांच्या पादुकाच आहेत. गाणगापूर येथे श्रीनृसिंहसरस्वतींनी निर्गुण पादुकाच मागे ठेविल्याची कथा आहे. नृसिंह-वाडीलाही दत्तपादुकांचीच उपासना रूढ आहे. देवगिरीवर जनार्दनस्वामींच्या समाधिस्थानी पादुकाच आहेत. नर्मदेच्या तीरावर रंगावधूतांच्या नारेश्वरला पादुकामाहात्म्यच आहे. विष्णूचा जसा शाळिग्राम, तशा दत्तउपासनेत दत्ताच्या पादुका महत्त्वाच्या आहेत. म्हणूनच 'मी ठेवितो मस्तक ज्या ठिकाणी।' तेथें तुझे सद्‌गुरु पाय दोन्ही। असे म्हटले जाते.

या दत्तपादुकांची पूजा सगुण व निर्गुण स्वरुपात केली जाते. सगुणपूजेचा विधी आपणां सर्वांना माहीत आहे. श्रीदत्तात्रेयांच्या पादुकांचा तंत्रशास्त्रीय विधी न्यायरत्न विनोद यांनी 'माऊली' मासिकाच्या जून १९६२ च्या अंकात स्पष्ट केला आहे. तंत्रशास्त्रीय ध्यान व मंत्र-साधना याचे वर्णन दत्तपादुकांच्या संदर्भात करताना ते म्हणतात, 'ऋं ऋं टम् मूर्धस्थाने' या मंत्राचा उच्चार करून करगळीजवळच्या 'अनामिका' या बोटाने डोक्याच्या मध्यभागी स्पर्श करावा. असे सात वेळा करावे. 'ऋं ऋं टम्।' या मंत्राने मूर्धस्पर्श झाल्यानंतर 'सातवे माझे नमन। सहस्रदळी स्फटिक वर्ण। परात्पर परिपूर्ण। श्रीगुरुपीठ।' ही ओळ सात वेळा म्हणावी नंतर एक नीराजन लावावे. ती नीराजनज्योती आपल्या दोन भुवयात आहे अशी कल्पना करावी. हळूहळू भुवया, कपाळ व आपण स्वतः नाहीसे होतो व नुसती ज्योती मात्र भासू लागते. ही ज्योती ब्रह्मरंध्रात म्हणजे डोक्याच्या मध्यभागी स्थिरावते. नंतर त्या ज्योतीचेच दोन भाग होऊन प्रथम चंद्रबिंब तयार होते, नंतर शेजारी सूर्यबिंब होते.– ही दोनही बिंबे म्हणजे श्रीगुरुचरण होत. डावा चरण म्हणजे चंद्रबिंब, उजवा चरण म्हणजे सूर्यबिंब, ब्रह्मरंध्रातले शुभ्रकमल त्या पादुकांच्या मध्यस्थली कल्पिणे. म्हणजे दोन पावले एक झाल्याची साक्ष होय. खरोखर ती तीन असतात; पण तत्त्वतः ती एक आहेत. हेच श्रीदत्तात्रेयाचे त्रिविध स्वरूप किंवा त्रिमूर्ती होय.

'हे त्रिपाद म्हणजे ऊर्ध्व ब्रह्मा, विष्णू, महेश याचे अद्वैत. श्रीदत्तात्रेयाच्या मुखत्रयध्यानापेक्षा, पादत्रयाचे ध्यान अधिक प्रसाददायक व विमोचक आहे स्त्री, पुरुष व पुत्र हे अद्वैत असेच आहे. ही एकता सख्येतल्या एका आकड्याची नव्हे. ही एकता खरे एकजिनसी अद्वैत होय. सर्व द्वैतांचा, सर्व संख्यांचा निरास करणारी ही एकता आहे. या त्रिमूर्तीचे भाव ठेवून (सूर्य, चंद्र व शुभ्रकमल यांचा पार्श्वभाग करून) खालील मंत्रांचा ३३३ वेळा जप करणे.

हा प्रयोग रात्री १० ते १२ रोज केव्हाही करावा. गुरुवारी रात्री ११-४५ ते १२-१५ करावा. य ड गु लो वा नी क ष ओ प ट् हा मंत्र ३३३ वेळ म्हणावा. हे एक महाविधान आहे. ४९ दिवस, ६ महिने, सव्वा वर्ष, साडेतीन वर्षे व ७ वर्षे हे विधान करावयाचे असते. ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणे साक्षात्काराचे फल फार उशिरा मिळते. निदान ४९ दिवसांचे एक विधान प्रत्येकाने अवश्य करावे.'

# सगुणाचा लोभ

प्रखर वैराग्य, इंद्रियदमन, देहदंड, योगधारणा इत्यादींच्या साह्याने साधकास मोक्षप्राप्ती होईलही. परंतु या मार्गात प्रखर वैराग्यशील साधकालाही धोके आहेत. मग सामान्य प्रापंचिक उपासकाची काय कथा? अशा मार्गाने अव्यक्ताची उपासना करणाऱ्यांना क्लेश होतात, त्यांच्या वाट्यास दुःखच येण्याचा संभव असतो, असा भगवद्गीतेचाही अभिप्राय आहे (१२·५) योगसम्राट ज्ञानेश्वरांनीही आपला स्पष्ट अभिप्राय देताना म्हटले आहे, 'म्हणोनि योगाचियां वाटा। जे निगाले गा सुभटा। तयां दुःखाचाचि वांटा। भागा आला॥' (ज्ञानेश्वरी : १२·६९) म्हणूनच मोठमोठे साधक व संतपुरुषही सगुण भक्तीवरच आलेले दिसतात. सर्व कर्मे परमेश्वराला अर्पण करावीत, अनन्य होऊन त्याचे स्मरण–चिंतन करावे, त्याच्या सगुणरूपात रमावे, त्याची षोडशोपचारे पूजा करावी, त्याला नटवावे, सजवावे, त्याचे मनसोक्त गुणगान करावे, त्याच्या ठिकाणी आपली बुद्धी स्थिर करावी, सर्व वृत्ती त्याला अर्पण कराव्यात, सर्व कर्मे त्याला अर्पण करावीत आणि आपण द्वेषरहित, अनन्य व निरपेक्ष होऊन

राहावे, ही सगुणोपासनेची भूमिका आहे ' इंद्रियें न कोंडीं । भोगाते न तोडीं ।' असाच ज्ञानेश्वराचा उपदेश आहे

दत्तपंथीयातही या सगुणोपासनेस फारच महत्वाचे स्थान आहे त्याचा दत्त अविनाशी, निराकार, निर्गुण, निरंजन असला तरी अशा दत्ताचे हे देखील वर्णनच होते की दत्त खरे पाहाता अवधूत, दिगंबर, पण त्यालाही नट-वावा, सजवावा, असे श्रेष्ठ साधकाला व भक्तालाही वाटतेच ना ! 'श्रीदत्तात्रेयसर्वस्व' या एका जुन्या पुस्तकात आलेल्या एका चित्रात तर दत्तात्रेय सालंकृत आहे दत्ताच्या रूपाची, वर्णनाची, वेषाची जी अनेक पदे आपण पाहिली व जी पुढे दिली आहेत ती सर्व सगुण रूपावरच आधारलेली आहेत 'मुगुट, कुंडल, माधवेन्द्रा, त्रिपुंड्रगधा, भालचंद्रा, रुण्डब्रह्माण्डखण्डमाला-अलंकृता, योगमुक्ता ' या विष्णुदासकृत वर्णनातून दत्तात्रेयाचे सगुणरूपच उभे राहात नाही काय ? 'डमरू कमंडलु त्रिशूळमाळा । शंखचक्र, पीतांबर पिवळा । जटा मुकुट व्याघ्रांबर शाला । श्रीचंदन विभुती ॥ ' या रूपात दत्त किती शोभून दिसतो ! खरे, देवाचे सगुणरूप कमी प्रतीचे तरी कसे म्हणावे ? कारण ते आबालवृद्धाना ध्यान-सुलभ आहे अव्यक्तापेक्षा व्यक्ताला, निराकारा-पेक्षा साकाराला, निर्गुणापेक्षा सगुणाला कमी मानण्याचे काहीच कारण नाही खरे म्हणजे निर्गुण–सगुण हा वादच व्यर्थ आहे 'सगुण निर्गुण एकु गोविंदु रे ' हा ज्ञानेश्वराचा निष्कर्ष महत्वाचा आहे वास्तविक पाहाता अव्यक्तापेक्षा व्यक्ताला, निराकारापेक्षा साकारालाच महत्त्व हवे सोन्याच्या लगडीपेक्षा तेवढ्याच भाराच्या व कसाच्या अलंकारास किंमत अधिक कारण सोने तितकेच, पण आणखी वर घडणावळ !

# दत्तपूजाविधी

दत्तात्रेयमूर्ती अथवा दत्तपादुका याच्या सगुण-



पूजेचा विधी आपल्या नेहमीच्या नित्यकर्मातील पूजेप्रमाणे असतो श्रीवासुदेवानंदसरस्वतींनी 'श्रीसत्यदत्तपूजाकथा ' नावाचे प्रकरण लिहून सत्यदत्ताच्या पूजेचा विधी सविस्तर वर्णन करून सत्यदत्ताच्या कथाही दिलेल्या आहेत स्वामी श्रीदत्तयोगेश्वरतीर्थ यानी भक्ताच्या व साध-काच्या सोयीसाठी 'श्रीदत्तात्रेयपूजाविधी' नावाचे एक पुस्तकच तयार केले आहे 'कलीमाजी दत्तोपासना । सद्य फलदायक जाणा । आधि-व्याधि पीडित जना । सुखदायक तात्काळ ॥' अशी धारणा असल्याने या सगुणपूजेस दत्तपंथीयात महत्त्व आहे श्रीदत्तयोगेश्वरतीर्थस्वामींनी प्रथम श्रीमत् शंकराचार्य श्रीभारतीकृष्णतीर्थविरचित 'श्रीगुरुपादुकास्तव ' स्तोत्र सार्थ दिलेले आहे त्यानंतर श्रीदत्तस्मरणासाठी निवडक श्लोक दिले आहेत पूजाविधीसाठी ऋग्वेद व शुक्ल यजुर्वेद यातील पुरुषसूक्ताचे दोन पाठ देऊन त्याचा अर्थही स्पष्ट केला आहे त्यानंतर इष्टदेवतेची शास्त्रोक्त विधीने पूजा करण्याची माहिती देताना, पंचोप-चारपूजा, दशोपचार, षोडशोपचारपूजा इत्यादींचे स्पष्टीकरण त्यानी दिलेले आहे गंध, पुष्प, धूप, दीप व नैवेद्य हे पंच उपचार, अर्घ्य, पाद्य, आचमन, मधुपर्क, आचमन, गंध, पुष्प, धूप, दीप व नैवेद्य, हे दहा उपचार 'प्रपंचतंत्रा'तले दिले आहेत 'तंत्रसार' व 'आचारचिंतामणी'मधील षोडषोपचारही त्यानी दिले आहेत आसन, स्वागत, पाद्य, अर्घ्य, आचमनीय, मधुपर्क, पुन आचमनीय, स्नान, वस्त्र, आभरण, गंध, पुष्प, धूप दीप, नैवेद्य व वंदन हे सोळा उपचार 'आचारचिंतामणी ' मधील आहेत पूजाविधी-साठी शंख, घंटा, पंचपात्र, आचमनी (पळी), अर्घ्यपात्र, जलकलश, आसन, दीपपात्र, धूपपात्र, हळद कुंकू गुलाल इ , चंदन, गोघृत, साखर, यज्ञोपवीत, तांदूळ (श्रीविष्णूच्या पूजेच्या वेळी पांढरे तीळ), वस्त्र, सुवर्णपान, गोदुग्ध, गोदधी, मिठाई, पुष्पमाला, तुलसी, दूर्वा, बिल्वपत्र अशा

अनेक इष्ट वस्तूंची नोंद करून पंचामृत, पंचगव्य, पंचपल्लव, पंचधान्य, पंचरत्न यांत काय काय येते हेही सांगितले आहे.

त्यानंतर मुख्यतः पूजाविधीची यथासांग माहिती देण्यात आली आहे. संकल्प, ध्यान, स्नान, गंधपुष्पादीचे समर्पण, नैवेद्य, प्रदक्षिणा, क्षमा-प्रार्थना, नमस्कार इत्यादींची समग्रक अशी सविस्तर माहिती त्यांनी दत्तोपासकांना उपयुक्त होईल अशी दिली आहे. शेवटी आरती, मंत्र-पुष्पांजली आणि विविध स्तोत्रे देऊन दत्तपूजा-विधीची पूर्णता केली आहे. श्रीगुरुदत्तात्रेयस्तवन, श्रीगुरुकरुणाष्टक, श्रीशंकराचार्यकृत गुर्वष्टक, श्रीदत्तात्रेयसहस्रनामावली, नारायणसूक्त, शांति-सूक्त, क्षमापनस्तोत्र, चरणामृतग्रहणमंत्र, नैवेद्य-ग्रहणमंत्र, संकीर्तनमाला इत्यादी सामग्री देऊन स्वामींनी दत्तभक्तांच्या हाती सगुणपूजाविधीची एक चांगली सोय करून दिलेली आहे.

इष्टदेवता, मूर्तिस्वरूप, सगुणपूजा इत्यादींची माहिती पाहिजे असल्यास महादेवशास्त्री जोशी यांचे 'पूजाविधान' हे पुस्तक जिज्ञासूंनी पाहावे. काहीशा नवीन दृष्टिकोणातून गो. प्र. भावे यांनी 'देवपूजाविधि व विज्ञान' या नावाचे एक पुस्तक लिहिले आहे, त्याचाही सगुणपूजकास उपयोग होण्यासारखा आहे. पूजा का, कोठे व कशी करावी, देवघर कसे असावे, पूजेची उपकरणी कशी असावीत, देवपूजेमागील दृष्टी कोणती असावी, पंचायतनपूजा म्हणजे काय, मानसपूजा म्हणजे काय, इत्यादी प्रश्नांची चर्चा भावे यांनी विस्ताराने केली आहे. न्यास व मुद्राविधी, पूजेतील षोडषोपचार, पूजासाहित्य, जपगणना, पूजामंत्रांतील वैज्ञानिक भावार्थ इत्यादींचा परिचय त्यांनी जिज्ञासूंच्या मनास पटेल या प्रमाणात दिला आहे. त्यांच्या प्रत्येक विज्ञान-स्पष्टीकरणाने समाधान होईल असे नाही; पण एक नवी दृष्टी येण्याइतपत त्यांचा प्रयत्न आहे.

## पारायणविधी

दत्तभक्तांच्या उपासनाविधीत सांप्रदायिक ग्रंथांच्या पारायणाला विशेष महत्त्व असल्याने त्यासंबंधीही थोडा विचार करणे अगत्याचे आहे. 'श्रीगुरुचरित्रा' सारख्या ग्रंथात हा पारायणविधी शेवटच्या अवतरणिकेच्या अध्यायातच सांगितला आहे. 'अंतःकरण असतां पवित्र । सदाकाळ वाचावें गुरुचरित्र ।।' (५२.८४) असे असले तरी सप्ताह करण्याची पद्धतही येथे निवेदन केली आहे. चांगला दिवस पाहावा, स्नानसंध्या करावी, पारायण करण्याची जागा रांगोळी वगैरेंनी सुशोभित करावी, देशकाळाचा संकल्प करावा, पुस्तकरूपी श्रीगुरूंचे पूजन करून ब्राह्मणाचीही पूजा करावी, शक्य तो मौन धरावे, कामादिक व्यवहार बंद असावेत, दिवे शोभादायक असावेत, देवब्राह्मणांना वंदन करून पूर्वेकडे वा उत्तरेस मुख करून वाचण्यास आरंभ करावा.

पहिल्या दिवशी नऊ अध्याय वाचावेत. दुसऱ्या दिवशी एकोणीस, तिसऱ्या दिवशी एकोणतीस, चौथ्या दिवशी पस्तीस, पाचव्या दिवशी अडतीस, सहाव्या दिवशी त्रेचाळीस व सातव्या दिवशी बावन्नपर्यंत अध्याय वाचावेत, असे श्रीगुरुचरित्र सांगते. श्रीवासुदेवानंदसरस्वतींच्या मतानुसार पारायणविधी ७।१८।२८।३४।३७।४३।५१ असा आहे. पारायण चालू असताना रात्री भूमीवर झोपावे. सप्ताह पूर्ण होताच ब्राह्मणसुवासिनीस भोजन व दक्षिणा देऊन संतुष्ट करावे. या प्रकारे अनुष्ठान केल्यास श्रीगुरूंचे दर्शन होईल.

कामतसंपादित श्रीगुरुचरित्रात जी अतिशय उपयुक्त अशी परिशिष्टे दिली आहेत, ती उपास-कांना नित्य उपयोगी होण्यासारखी आहेत. पारायण करण्यापूर्वी मुमुक्षूने वा साधकाने करावयाचा संकल्पही तेथे दिलेला आहे. स्त्रियांनी गुरुचरित्र वाचू नये असा श्रीवासुदेवानंदसर-स्वतींचा निष्कर्ष आहे. गुरुचरित्राच्या सप्ताहात

साधकास सामर्थ्य कशामुळे येते, यासंबंधीचा रामचंद्र विनायक कुलकर्णी ऊर्फ आनंदघनराम याचा लेख अतिशय मार्मिक आहे. रामचंद्र कृष्ण कामत याचा एक लेख 'सोवळ्या–ओवळ्याचे निर्बंध कुठल्या देवाला लागतात ?' हा चालू काळातही मननीय आहे. श्रीगुरुचरित्र तीन दिवसात, एक दिवसातही वाचण्याचा परिपाठ आहे.

काही विशिष्ट हेतूसाठी विशिष्ट अध्याय नित्य वाचणारे लोक आहेत. आरोग्यासाठी तेरावा अध्याय, पारमार्थिक गुरुकृपेसाठी दुसरा अध्याय, सद्गुरुप्राप्तीची तळमळ व्यक्त होण्यासाठी पहिला अध्याय, सततीची आरोग्यावावतची काळजी निवारण होण्यासाठी विसावा व एकविसावा अध्याय, पुत्रप्राप्तीसाठी एकोणचाळिसावा अध्याय, आकस्मिक अरिष्टनिवारणार्थ चौदावा अध्याय; अशी त्या त्या अध्यायाची खास वैशिष्टये आहेत. ज्याना सवड नसेल ते रोज अवतरणिका तरी वाचतात. 'दत्त दत्त', 'श्रीदत्त जय दत्त', 'श्रीगुरुदेव दत्त' अशा नामस्मरणातही साधक व प्रापचिक रगून गेलेले असतात. श्रीगुरुचरित्राप्रमाणेच, श्रीदत्तप्रबोध, श्रीदत्तमाहात्म्य, श्रीगुरुलीलामृत अशा काही साप्रदायिक ग्रंथाची पारायणे भाविक नित्य करीत असतात. या पारायणाबरोबरच भूपाळ्या, प्रार्थना, अष्टके, स्तोत्रे, स्तवने, आरत्या इत्यादी स्फुट सामग्रीनेही दत्तप्रभूना आळवणाराची संख्या कमी नाही.

## ही संगीतसेवा

दत्तपथीयाच्या उपासनेस उपयुक्त असणाऱ्या स्फुट सामग्रीकडे वळण्यापूर्वी उपासनेच्या आणखी एका अगाचा उल्लेख करणे अगत्याचे वाटते. दत्तसप्रदायात संगीतकलेस महत्त्वाचे स्थान आहे. माणिकनगरच्या दत्तपरपरेत रागदारीतील सगीताने उपासना चाले. नाद हा प्रत्यक्ष ब्रह्मच मानून त्याचीच उपासना म्हणजे परमेश्वरपूजा मानली आहे. श्रीगुरू नृसिंहसरस्वतीनी निजानंदगमनसमयी सागितले आहे की, 'आणिक सांगेन एक खूण । गायनी करावे माझे स्मरण । त्याचे घरी मी असें जाण । गायनी प्रीती बहु मज ॥ नित्य जें जन गायन करिती । त्यावरी माझी अति प्रीति । त्यांचे घरी अखडिती । आपण असे अवधारा ॥' (श्रीगुरुचरित्र : ५१·४०-४१) श्रीगुरूनी सांगितलेल्या या खुणेचा धागाच सप्रदायात परिपुष्ट झालेला दिसतो. दत्तप्रेमीयांना सगीताची आराधना प्रिय आहे. सगीताच्या माध्यमातून त्याना नादब्रह्माच्या द्वारे साक्षात्कार होतो. 'नादोपासनया देवा ब्रह्मविष्णुमहेश्वरा.। भवन्त्युपासिता नूनं यस्मादेते तदात्मकाः'–नादाची उपासना केली असता ब्रह्मा, विष्णू व महेश याची उपासना आपोआप होते; कारण ते देव नादमय आहेत 'नाद' मधील न हा प्राण व द हा अग्नी असून याच्या संयोगाने नाद उत्पन्न होतो. गीत, वाद्य, नृत्य यानी या नादब्रह्माची उपासना होत असते. समर्थानीही 'धन्य ती गायनी कळा' म्हणून सगीताची महती गाइली आहे. श्रीगुरुचरित्राच्या सहाव्या अध्यायात शकराला प्रसन्न करण्यासाठी लंकानाथ रावणाने सगीताने आराधना केली असल्याचे सागितले आहे. यातले मर्म पथीयाना चागलेच अवगत आहे.

## अशी मानसपूजा

दत्ताच्या उपासनेची सर्वोत्तम पद्धत कोणती ? या प्रश्नाचे उत्तर सोपे नाही. साधक, मुमुक्षु, प्रापचिक जो कोणी जो हेतू मनात धरून दत्ताची उपासना करील त्याप्रमाणे त्याच्या पद्धतीत फरक पडेल दत्ताचे निर्गुणनिराकार रूप कल्पून त्याची आराधना करणे सर्वांनाच जमते असे नाही. ध्यानधारणा, तपश्चर्या, तीर्थयात्रा, अनुष्ठान, उपासतापास अशाही गोष्टी

सर्वांच्याच आटोक्यात असतात असे नाही. मंत्र, तंत्र व यंत्र याच्या जटिल स्वरूपात व प्रसंगी विपरीत परिणामाकडे फारच थोडे वळतील. सगुणोपासना तशी सोपी असली तरी तिच्यामधील उपचार व कर्मकांड आटोपशीर कसे होणार ? आज मानवी जीवनात सतत धावपळ आहे, जीवनात कलह वाढत आहे, सत्ता, संपत्ती, अधिकार, दर्जा यासाठी संघर्ष चालू आहे. मानसिक ताणाव सतत वाढत आहेत. जीवन अतिशय संमिश्र व गुंतागुंतीचे बनत आहे. परमार्थ, अध्यात्म, आत्मज्ञान, धार्मिक उपचार इत्यादींची नवी नवी रूपे आजही उदयास येत आहेत. अशा पार्श्वभूमीवर दत्तात्रेयाची उपासना अधिक शुद्ध, अधिक फलदायी, अधिक व्यापक कशी होईल ?

या प्रश्नाचे उत्तर शोधताना दत्तसाक्षात्कारी संतपुरुष जे होऊन गेले, त्यांच्या स्फुट रचना पाहणे अगत्याचे आहे. मनाला शाश्वतची शांती, चित्ताची उदात्तता, भक्तीचे प्रेमसुख यानाच महत्त्व असेल तर एकनाथ, निरंजन-रघुनाथ, नारायणमहाराज जालवणकर, पंत-महाराज बाळेकुंद्रीकर, विष्णुदास माहुरकर यांच्याच वाङ्मयाच्या चिंतनाकडे वळावयास हवे. एक तर हे चिंतन वा ही मानसपूजा कोणासही केव्हाही करता येण्यासारखी आहे. सोवळ्या-ओवळ्याचे बंधन या मानसिक पूजेस नाही. मंत्र, तंत्र, यंत्र असा पसारा नाही. शरीरकष्ट नाहीत. चालू धावपळीच्या युगात नसत्या फंदात वा तंत्रात सापडण्यापेक्षा शुद्ध प्रेमाने दत्तात्रेयाना मनापासून हाक मारावी, नित्य व्यवसाय चालू असतानाही दत्तात्रेय हृदयात असून तेच सर्व कामे घडवून आणतात अशी श्रद्धा असावी. नित्य नामस्मरण, दत्तचिंतन यानीच चित्त शुद्ध, उदात्त व प्रीतिरसाने भरून येईल. एकनाथा-सारख्या अनुभवी दत्तोपासकाची 'श्रीदत्तमानस-पूजा' या दृष्टीने पाहण्यासारखी आहे. त्याच्या दत्ताचे आवाहन विसर्जनाविरहित आहे. त्यांचा स्वामी दत्तराज ओतप्रोत भरला आहे. त्यांच्या हृदयात त्याचे आसन आहे. आसन, पाद्य, आच-मन, गंध, धूप, दीप, आरती इत्यादींचा थाट या मानसपूजेत नसला तरी दत्ताचे सगुणरूप उभे करण्याचे सामर्थ्य त्यात आहे. 'दत्त सबाह्य अंतरी। दत्तात्रय चराचरी।' असा विशाल अनुभव त्याचा असला तरी सगुणावर त्याचे चित्त लोभावलेले दिसते.

## 'सगुणमूर्ति मनोहर'

दत्तोपासनेच्या या मानसिक अंगात साक्षा-त्कारी साधुपुरुषांना प्रथम दत्तमूर्तीचा वेध लागतो. दत्तस्वरूप, त्याचे ध्यान, त्याचा संचार याचेच चिंतन ते सतत करीत असतात. 'हाती कमंडलु दंड। दत्तमूर्ति ती अखंड ।।' अशा मूर्तीचे ध्यान आपल्या मनास लागावे अशी प्रार्थना एकनाथ करताना दिसतात. 'दत्तरूपी लागतां वृष्टी। दत्तरूप अवघी सृष्टी' अशी त्याच्या मनाची अवस्था आहे. 'सगुणमूर्ति मनोहर। स्वामी माझा दिगंबर' कसा भासतो हे सांगताना श्रीपंत बाळेकुंद्रीकरानी म्हटले आहे; 'कंठी रुद्रा-क्षाची माळ। हाती शोभतो त्रिशूळ ।। भगवी छटा अंगावरी। सदा यती दंडधारी ।। पायी पादुका सुंदर। शंखचक्र गदाधर। भस्मोद्धूलित शरीर ।।' असे आणखी एकदा त्यांनी दत्तरूपाचे वर्णन केले आहे. 'सावळें गोंडस रूप सुकुमार। दाऊनी समोर प्रेम देई।' अशी त्याची इच्छा आहे. 'मुकुटाकार जटा मस्तकी विराजे। स्फटिक हार राजे कंठमाजी ।। कपाळी त्रिपुंड्र भस्म-उधळण। तिलक कुंकुमवर्ण मध्यदेशी ।। विभूति-मंडीत गात्र मनोहर। स्वामी दिगंबर वाळा माझा ।। ब्रह्मवीणा हाती शोभतसे दंड। उभा हा अखंड भक्तकाजा ।।' असे पंतकृत वर्णन कोणास भुलवणार नाही ?

'दंडकमंडलू शोभताती करी। साजे अंगावरी भस्मउटी। दिव्य चरणकमळी पादुका शोभती। वेद सर्व असती श्वानरूपे ॥ गळा रुद्राक्षमाळ भगवे अंबर। वृक्ष औदुंबर कामधेनू ॥' अशा रूपाचा वेध श्रीपतांना सततचा होता 'माथा शोभे जटाभार। रुळे दाढी नाभीवर ॥ भस्मोद्धूलित सुशरीर। दिगंबर त्रैमूर्ति ॥ पायी पादुका शोभती। शंख चक्र गदा हाती ॥ दंडकमंडलुधारी यती। संगे श्वानमेळा हो ॥ सच्चिदानंद दयाघन। भक्तोद्धार गुरु भगवान ॥' अशा दत्तमूर्तीचे स्तवन, पूजन, चिंतन श्रीपतांना नेहमी असे या अत्रिनंदनाची सगुण मूर्ती त्यांना कशी दिसे? 'कांपायावर दंडकमंडलू। पायी पादुका सुरवदना ॥ सुरभी श्वानसंघ सर्व घेऊनि। धावे त्वरित भक्तवदना ॥' अशा दत्तमूर्तीचा लोभ त्यांच्या मनास नेहमी असे श्रीपतांनी अशी शेकडो पदे दत्तमूर्तीच्या वर्णनाची लिहिलेली आहेत माहूर येथील श्रेष्ठ देवी व दत्त यांचे उपासक श्रीविष्णुदास यांनीही अशीच वेधक वर्णने दत्ताची केलेली आहेत गिरनारवर तपस्या करीत असताना निरंजन अवधूतांना दत्ताचा साक्षात्कार झाला, त्या वेळी त्यांनी केलेली दत्तवर्णने अशीच प्रत्ययकारी आहेत

## 'मी बाळ तूं जननी'

दत्तमूर्तीचा, दत्तरूपाचा असा वेध लागणे हेच उपासनेचे सर्वांत महत्त्वाचे अंग आहे दत्त ही आपली माता, हाच पिता, हाच गुरू अशा नात्यांनी हे दत्तभक्त दत्ताला आळवतात मातेला प्रसन्न करण्यासाठी षोडशोपचाराची पूजा? तिला प्राप्त करून घेण्यासाठी हठयोगादी साधने? मन्त्रतन्त्रयन्त्रादी खटपटी? ही दत्तमायच आपल्या लेकरासाठी कष्टी होते, तीच भेटण्यासाठी उत्सुक असते, तीच साधने करते, असाही भाव श्रेष्ठ साधकाच्या उपासनेत असतो हा दत्त ब्रह्मस्वरूपात एकाकी होता त्यालाच करमेना, म्हणून तो जीवरूपाने व्यक्त झाला प्रेमभोगासाठी निराकार दत्त साकार झाला निर्गुण सगुणावर आला दत्त हा प्रेमाचा अवतार असल्याची साक्ष श्रीपतादिकांनी दिलेली आहे 'प्रेमाची घडली। गुरुमूर्ति। प्रेमाची घडली' असा त्यांचा अनुभव आहे. हा दत्त म्हणजे त्यांच्या मते 'प्रेमळ माय निजभक्तांची। कष्टते निशिदिनी फार।' म्हणूनच ते प्रेमपिशी होऊन त्याच्याशी खेळतात 'दत्त माझी माता दत्त माझा पिता। बहिणी बंधु चुलता दत्त माझा।' अशी अनुभूती एकनाथांची आहे पंतांनीही दत्तास मायबाप म्हणून अनेकदा आळविले आहे 'माउली निजभक्तांची। सद्गुरु माउली निजभक्तांची। स्यानंदभरें गरोदर झाली। व्याली पिलें प्रेमाची ॥' असे मोठ्या कौतुकाने दत्तमाऊलीचे वर्णन ते करतात 'प्रेमळ माता सद्गुरु माझी। प्रेमस्तन पाजिते निशिदिनी। मजला राखिते' असा त्यांना विश्वास आहे 'मी बाळ तूं जननी। सद्गुरु मी बाळ तूं जननी ॥ कुरवाळुनी घेई पदरीं। लावी प्रेमस्तनी ॥' अशी त्यांची प्रेमाची हाक आहे एकनाथांनी या दत्तमायेचा एक अनुभव मोठ्या बहारदार पद्धतीने सांगितला आहे ते म्हणतात, 'दत्त माझी माय। आम्हां अनाथांची गाय ॥ प्रेमपान्हा पाजी वेगी। गुरुमाउली आम्हांलागी ॥ आम्हां प्रीतीची साउली। श्रीदत्तराज माउली ॥' अशी दत्तमाय असताना आम्हांला काय उणे? असे या थोर संतांना वाटते

## 'वेगे येई दिगंबरा'

ही दत्तमाय सतत समोर असावी, तिच्या कृपेची पाखर राहावी, तिच्या प्रेमपान्ह्याचा आस्वाद मिळावा, म्हणून हे थोर दत्तभक्त तळमळत असतात दत्ताला कळवळून हाक मारणं हाच त्यांच्या उपासनेचा मुख्य गाभा असतो

यातील काहीजणानी योगसाधना केलेली असते, ध्यानधारणा केलेली असते पण शेवटी हे सत स्थिरावले ते दत्तमायच्या सगुण प्रेमावर या प्रेमाच्या आस्वादासाठी, भक्तीच्या स्वानुभवासाठी ते कासावीस होतात, तळमळतात 'धावे पावे दत्तराजा । महाराजा गुरुराया । अनाथासी साभाळावे । ब्रीद आपुल साभाळावे ॥ तुजविण सोडविता । नाही नाता दुसरा ॥' असे तळमळीचे उद्गार एकनाथ काढतात हीच तळमळ दासोपताना होती निरजनमाधवाना होती 'धाव धाव रे करुणाकरा । का श्रमविसी मज लेकुरा ॥ हे पूर्णब्रह्म परात्परा । दिगबर स्वामिया ॥ तू आमुचे शिरी असून । दासासि व्हावा इतुका शीण ?' असे ते दत्तगुरुना विचारतात 'हे पतीतपावन दिगबरा । हे अवधूतरूपा सर्वेश्वरा ॥ दत्तात्रेया पूर्णावतारा । परब्रह्मा येई का ॥ कृष्णरूपा सर्वेश्वरा । हे नयिदेवाचिये अवतारा ॥ हे भवभयतापसहारा । करुणाकरा दे भेटी ॥ हे शखचक्रकमडलुधरा । हे त्रिशूळडमरुमालाकरा । षड्भुज ऐश्वर्यधरा । कृपा करा धावे का ॥' अशी त्याची प्रार्थना आहे एवढी चित्ताची व्याकुळता झाल्याखेरीज प्रेमसुखाचा आस्वाद घेता येणार नाही

श्रीपतही सद्गुरुसाठी, दत्तासाठी असेच व्याकुळ झालेले दिसतात 'सद्गुरु माते धाव गे । मज भेट देई गे ॥' अशी त्याची दत्ताला हाक आहे 'दर्शनासी का गा लाविला उशीर । धरवेना धीर आता काही ॥ पतीत म्हणून न येसी दयाळा ? । नाम का कृपाळा पतितोद्धार? ॥ माता कोपे तरी पित्याकडे जावे । बाळा नाही ठावे अन्य कोणी ॥ तूचि माझी माता तूचि माझा पिता । तूचि निवारीता जाऊ कोठे ?' अशी त्यानी निर्वाणीची करुणा भाकली आहे आणखी एका पदात दत्ताला आळविताना ते असेच म्हणतात, 'का रुसवा मजवरी । दत्ता, दे दर्शन झडकरी ॥ तान्हे बाळ टाकुनी माता । जाय देशातरी ॥ तैसी पर्वत यात्रा मीसे । गेलासी नरहरी ॥ पक्षहीन मी पक्षीच केवळ । वाचू कैशापरी ? ॥' एकदा तर ते कळवळून म्हणाले, 'दयाळा, दे दर्शन मज । लावू नको आता वेळ ॥ मूढमति दीन अनाथ पामर । गुरुमाये, तुझा हा बाळ । भक्तिप्रेमरस पाजुनी दत्ता । पुरवी दर्शनआळ ॥' माहूरच्या विष्णुदासानी अशाच करुणेने दत्तास हाक मारलेली दिसते

वेगे येई दिगबरा । जीव होतसे घाबरा ॥ १ ॥<br>
भवसागरी वाहतो । वाट तुझी मी पाहतो ॥ २ ॥<br>
पाणी चालले घशात । धाव दयाळा अशात ॥३॥<br>
कठी दाटलासे प्राण । नको पाहू निर्वाण ॥ ४ ॥<br>
परिहरी या वेदना । अगा अत्रीच्या नदना ॥ ५॥<br>
आता चाललो की बुडी । तातडीने घालीं उडी॥६॥<br>
देह गेलिया शेवटी । आशा राहील शेवटी ॥ ७ ॥<br>
आधी काढूनिया काठी । मग शिरी हाणी काठी॥८॥<br>
काही उरल्या अन्याय। मग त्याचा करणे न्याय॥९॥<br>
दीन झालो मी लाचार। फार कासया विचार॥१०॥<br>
नाही अवकाशाची वेळा । किती सागू वेळोवेळा ॥११॥<br>
विष्णुदासावर लोकरी । कृपावता कृपा करी ॥ १२ ॥

## मीलनसुखाचा आनंद

आणि एवढ्या तीव्रतेने, तळमळीने श्रीदत्तास हाक मारल्यानतर तो भेटल्यावर काय आनद वर्णावा ? खरे म्हणजे या स्वानदाची तुलनाच होणार नाही कोठे या सर्व साधुसताना दत्तात्रेयाची झालेली दर्शने त्यानी शब्दाकित केली आहेत 'लावण्य मनोहर प्रेमाचा पुतळा । देखिलासे डोळा दत्तराय ॥ चरणी घातली मिठी प्रेम दुणावे पोटी । पाहता हारपली दृष्टी दुजेपणा ॥ मन माझे वेधले परिपूर्ण भरले । एकाजनार्दनी साठविले हृदयी दत्त ॥' अशा या मीलनसुखाचे वर्णन तरी आणखी किती करावे ? या दत्तमाऊलीची कृपा वर्णन करताना एकनाथानीच

म्हटले आहे, ' माझी दत्त ती माउली । प्रेमपान्हा पान्हावली ॥ कुर्वाळुनि लावी स्तनीं । नोहे निष्ठुर क्रोध नाही मनीं ॥ भक्तांसी न विसंबे । सदा वाट पाहे विवें ॥ एकाजनार्दनीं निश्चित । दत्तनामें पावन पतित ॥ '

श्रीपंतांना तर या मीलनसुखाचा आनंद पदोपदी झालेला दिसतो. ' तव कृपें मी धन्य झालों । भयभ्रांति तुटली । परमपदी परब्रह्ममूर्ती । आंगें भेटली ॥ ' असा स्वानुभव त्यांच्या कित्येक पदातून दिसतो. एका पदात ते म्हणतात, ' देखियला गुरु दत्तराज मी । धन्य झालों आज ॥ चराचरा ठायीं हरपला नाही । प्रत्यक्ष भमतां सहज ॥ अरे मी धन्य झालों आज ॥ ' अशी त्यांच्या मनाची परिपूर्ण अवस्था आहे. अशा या सहजसाध्य दत्तासाठी कष्टदायक व विपरीत साधने करण्याची काय जरूरी ? एकदा पंतांनी म्हटले आहे, ' अवधूत देखियला । प्रेमाचा अमल मला चढला ॥ ' आणखी एका पदात ते म्हणतात, ' धन्य मी झालों दत्तपदीं । भेटला मजला ज्ञाननिधी ॥ दिधली शांति अभयवचनें । मज नसे दुःख कधीं ॥ निजबोधाग्नि होता प्रदीप्त । आटला भवधारधि ॥ ' एका पदात रंगून ते म्हणतात, ' धन्य धन्य हा जन्म माझा झाला । दत्तराज गुरु भेटला ॥ ' दत्तभेटीने ' ब्रह्मानंदी लागली मीज ' असा अनुभव त्यांना येतो. या थोर अनुभवामुळे ' ब्रह्मानंदें डुलतों सदा । रमतों नित्य ब्रह्मभुवनीं ॥ ' अशी अवस्था बनून जाते. ' अंतर्बाह्य प्रेमसागर । दत्त उचंबळला ' अशी प्रचीती त्यांना अनेकदा आली आहे.

माहूरच्या विष्णुदासांना तर दत्तभेटीचा साक्षात्कार अनेकदा झालेला दिसतो. ' तो अनाथनाथ दत्त माहुरांत पाहिला ' या ओळीची आवृत्ती असलेले एक स्वानंदपूर्ण अष्टक त्याचे आहे. एकदा दत्तभेट झाली असताना त्यांनी दत्ताचे स्वागत कसे केले असेल ? त्यांच्याच शब्दांत ऐकण्यासारखे आहे. ' अगा अत्रीच्या नंदना । अतां बैसावें भोजना ॥ पीठ स्वस्तीक मांडिलें । ताटीं पक्वान्न वाढिले ॥ रंग मालिका रांगोळी । गंध धूप दीपावली ॥ प्रेमामृताचें भोजन । हस्तोदक आचमन ॥ विष्णुदास सुदक्षिणा । तुळसीपत्र प्रदक्षिणा ॥ ' दत्तात्रेयाच्या या भोजनसुखाचा अनुभव घेणारे थोर सत्पुरुष किती भाग्यवान म्हणावेत ? तंत्रमंत्रांनी वा मंत्रपूजनाने हे सुख मिळेल का ? साक्षात्कार म्हणतात तो हाच. गुरुदेव रानडे यासच ' सायलेंट एंजॉयमेंट ऑफ् गॉड ' म्हणतात. परमात्म्याचे, परब्रह्माचे, दत्तप्रभूचे हे मूक आस्वादन भक्तांना अतिशय गोड लागते. प्रत्यक्ष, तात्कालिक, इंद्रियातीत, अनुभवजन्य अशी ही ईश्वराची अनुभूती यावी म्हणूनच सर्व साधकांची तळमळ असते. ससीमाचा असीमाशी, जीवाचा शिवाशी, आत्म्याचा परमात्म्याशी हा जो मानसिक संबंध येतो त्यासच अनुभूतिशास्त्र, साक्षात्कार, गूढवाद अशी नावे आहेत. ईश्वरी साक्षात्कारात स्तब्धपणे ईश्वरात रममाण वा लीन व्हायचे असते. या अनुभवात अतिशय आनंद असतो.

## मुक्तिललना नको

या साक्षात्काराच्या अथवा मीलनाच्या आनंदाची चटक एवढी असते की, त्यापुढे मग मोक्ष, मुक्ती, ब्रह्मरूपत्व इत्यादींची आस उरत नाही. इतकेच नव्हे तर प्रत्यक्ष मीलनात, सामरस्यात, ऐक्यात जो आनंद वाटतो, तोच वाट पाहाण्यात, रागावण्यात, प्रार्थना करण्यात वाटू लागतो. म्हणजे नवलाची बाब अशी पाहा की, ज्या मुक्तीच्या, मोक्षाच्या सुखासाठी हा सारा अट्टाहास, ते सुख भक्ताला विरहाच्या, अलगपणाच्या भूमिकेवरच अनुभवायला मिळते. अद्वैताचे ज्ञान प्रेमभोगासाठी द्वैतावर राहाण्यात सुखावते. म्हणूनच मुक्तीची, मोक्षाची पर्वा न करता साधूसंत नेहमी ' मी भक्त तूं देव ' या

द्वैती भूमिकेवर राहून अद्वैताचा सुखसोहळा भोगीत राहातात ऐहिक भोग, भौतिक ऐश्वर्य, स्वर्गप्राप्ती, मोक्षसुख यापेक्षा प्रभुस्मरणातील सुख त्याना मोलाचे वाटते एकदम मुक्त झाल्यावर मग कोण कोणाचे स्मरण करणार ? कोण कोणाचे रूप वर्णन करणार ? कोण कोणावर रागावणार ? कोण कोणाची समजूत काढणार ? म्हणून भक्ताला अद्वैतावरील द्वैताची, ज्ञानावरील भक्तीची गोडी अधिक प्रिय असते या ठिकाणी परमात्माच आत्मरूपाला येऊन, शिवच जीवाच्या अवस्थेला येऊन, गुरूच शिष्याच्या अवस्थेला येऊन दोघेही प्रेमसुखाचा आस्वाद घेतात "परब्रह्मचि विश्व झालें। प्रेमार्थ दोन भासले ।।" अथवा 'देवभक्त हा आपणची होऊनी । खेळे आनंदभुवनी ।। ' अशी खरी वस्तुस्थिती असते

परमात्म्याच्या भेटीची परमअवस्था म्हणजे साक्षात्काराची या मीलनातील आनद अद्वितीय असतो हे वर आलेच आहे 'जिकडे तिकडे प्रेमझरा', 'जिकडे तिकडे ब्रह्मानद', 'दत्त स्वानदसागरी क्रीडता । उसळती मित्रप्रेमलाट रे ।।' असा अनुभव श्रीपतानी व्यक्त केला आहे त्याच्या पदावलीस 'श्रीदत्तप्रेमलहरी' असेच नाव आहे आणि या प्रेमलहरी नामस्मरणात, भजनात, प्रार्थना करण्यात उमटतात 'सद्गुरु अतरी प्रगट होता उठले प्रेमलहरी', 'सहज समाधि दत्तभजनी । चित्सिंधुलहरी ', 'बुडलो स्वरूप-सागरी । उठती प्रेमानदलहरी ' असा अनुभव पत सतत व्यक्त करताना दिसतात आणि या प्रेमसुखासाठी, प्रेमानदलहरीसाठी ते म्हणत राहातात, "ब्रह्मज्ञान न लगे मज । देई मला भक्तिबीज ।। ऋद्धिसिद्धी नको मान । प्रमावीणें शुष्क भजन ।। समाधीची आस नाही । भाव दृढ तुझे पायी ।।' या भक्तिसुखापुढे पताना ब्रह्मज्ञान नको, की समाधी नको आणखी एका ठिकाणी ते म्हणतात,'भजनप्रेम देई बालावधूता । ज्ञानसमाधि कल्पित सर्व । न लगे योगचिता ।। जीवन्मुक्ति विदेहस्थिती । जीवस्वप्नवार्ता । चरणसुखामृत पाजुनि नित्य । घेई पदरी दत्ता ।।' दत्ताच्या चरणाचा आसरा पुरे, मग ज्ञानसमाधी नको, की योगचिंता नको रूपकाचा आश्रय करून एकदा ते म्हणतात, 'मुक्तिललना सारूनी मागें । पडलो गुरूपायी ।। ब्रह्मानद दूर सारूनी । बुडालो प्रेमडोही ।।' या प्रेमडोहातील सुखाच्या पोटी सत्पुरुष मुक्तिललनेचा मोह सोडतात

## ' देई प्रेम देवा '

दत्तोपासनेच्या उपासनेचा धागा हा असा आहे दत्त हा सर्व काही देणारा खराच त्याला काहीही मागा तो कल्पतरूप्रमाणे फलदायी आहे त्याच्याजवळ नित्य कामधेनू आहे. परतु ही कामधेनू कोणासाठी पान्हवते ? हा कल्पतरू कोणासाठी फुलतो ? तर जो केवळ या दत्ताचे प्रेमच मागतो,सगत मागतो,त्याच्यासाठीच दत्तमाय अत्यत कृपाळू होते जो धन मागतो, पुत्र मागतो, राज्य मागतो, यश मागतो, आरोग्य मागतो, त्याला ती ती वस्तू दत्तात्रेय देतीलही परतु जो कळकळून दत्तमाय म्हणून हाक मारील, दत्तप्रेमासाठी झुरेल, खगेल,तळमळ करीत राहील त्याच्यासाठी दत्तात्रेय आधी धावून येतील निष्काम उपासनेतील ही अद्वैतमाधुरी अवर्णनीय आहे ब्रह्मस्वरूपात या दत्ताला तरी एकटेपाला करमते काय ? म्हणूनच तर तो जीव होतो, शिष्य होतो, भक्त होतो, आणि मग देव व भक्त अशा दोघाचा क्रीडाविलास एकत्वाच्या भूमिकेवर सुरू होतो मध्येच मुक्ती मिळाली, मोक्ष लाभला तर मग साराच रग वाया जातो म्हणून या रगविलासात खड पाडणारी मुक्ती दत्तभक्ताना नको असते दत्तप्रभूला मागावे तरी काय ? याही प्रश्नाचे खरे उत्तर देताना श्रीपतानी म्हटले आहे, 'देई प्रेम देवा !'

# ६ सांप्रदायिक ग्रंथ

## श्रीगुरुचरित्र



दत्तसंप्रदायातील श्रीगुरुचरित्राचे स्थान अनन्यसाधारण असले तरी या थोर ग्रंथाआधी नाथ व महानुभाव पंथांच्या अनुयायांनी दत्तविषयक ग्रंथांत मोलाची भर घातलेली आहे. दत्तगोरक्षसंवाद, सह्याद्रि-वर्णन (रवळो व्यास), सह्याद्रिमाहात्म्य, श्रीदत्तविजय ( अप्रसिद्ध, कृष्णदास ) श्रीदत्तात्रय बाळक्रीडा ( संतराज ) या ग्रंथांना त्या त्या पंथात मान्यता मिळालेली आहे. शके १४८० च्या सुमारास सरस्वती गंगाधरांनी लिहिलेला 'गुरुचरित्र' हा ग्रंथ महाराष्ट्रात विशेष लोकप्रिय असून सांप्रदायिकांनी त्याला वेदाची मान्यता दिलेली आहे. भागवत अथवा वारकरी सांप्रदायिकांनी ज्ञानेश्वरी, नाथभागवत, तुकोबांची गाथा हे ग्रंथ जसे प्रिय, रामदासी पंथीयांना जसा दासबोध प्रिय, तसा दत्तभक्तांना गुरुचरित्र हा ग्रंथ पारायणासाठी, उपासनेसाठी अतिशय प्रिय आहे. योग आणि मंत्रशास्त्र यांचे प्रवर्तक दत्तात्रेय असल्याने आणि श्रीनरसिंहसरस्वती हे दत्तावतारच असल्याने त्यांचे लीलाचरित्र वर्णन करणारा गुरुचरित्र ग्रंथ महाराष्ट्रात लोकप्रिय व्हावा यात नवल नाही.

श्रीगुरुचरित्रात दत्तात्रेय, श्रीपादवल्लभ व श्रीनरसिंहसरस्वती यांच्या तर चरित्रकथा रसाळपणे आल्या आहेतच; पण श्रीगुरूंच्या चरित्राच्या निमित्ताने त्यांचे अनेक लीलांचे कथात्मक निरूपण अतिशय सुबोध, प्रसादपूर्ण व रसाळ भाषेत आलेले आहे. सांप्रदायिकाचा आचारधर्म जसा

या ग्रंथात विवरून सांगितला आहे, तसा तत्त्वज्ञानाचा बोधही यात श्रेष्ठ भूमिकेवरून आलेला आहे. म्हणूनच नित्य नियम अथवा सप्ताह या पद्धतीने गुरुचरित्राचे वाचन घरोघरी आजही मोठ्या श्रद्धेने होत असते. ' अंत:करण असता पवित्र । सदाकाळ वाचावें गुरुचरित्र ' असा निर्देश गुरुचरित्रातच असून पारायणाचा विधी कोणत्या पद्धतीने करावा यासंबंधीही खुलासा या ग्रंथाच्या शेवटच्या अध्यायात केलेला आहे.

श्रीगुरुचरित्र हा ग्रंथ शके १४८० च्या सुमारास म्हणजे श्रीनरसिंहसरस्वती ' निजानंदीं बैसले ' च्या घटनेस शभर वर्षे झाली, तेव्हाच्या काळात लिहिला गेला. गुरुचरित्राच्या ५१ व्या अध्यायात ' कन्यागती बृहस्पति । बहुधान्य संवत्सरी ख्याती । सूर्य चाले उत्तरागती । संक्रांती कुंभ परियेसा ॥ शिशिर ऋतु माघमासी । असितपक्ष प्रतिपदेसी ॥ शुक्रवारीं पुण्यदिवशी । श्रीगुरु बैसले निजानंदीं ॥' असा निर्देश आहे. या ओव्यांतील सर्व योग शके १३८० या वर्षी येत असल्याने श्रीगुरुंच्या निर्याणाचे हेच वर्ष मानण्याकडे अभ्यासकांचा कल आहे. त्याचा पूर्वावतार हा आणखी ७०–८० वर्षे मागचा धरल्यास श्रीपादवल्लभाच्या कार्याच्या समयाचा अंदाज येईल. स्थूल मानाने असे म्हणता येईल, की शकाच्या चौदाव्या शतकात श्रीपादवल्लभ व श्रीनरसिंहसरस्वती या दत्तावतारी सत्पुरुषांचे कार्य प्रकट झाले.

गुरुचरित्रकार सरस्वती गंगाधर यानी आपली स्वत ची म्हणून जी थोडक्यात हकीकत दिली आहे, ती जमेस धरता गुरुचरित्राचा काळ श्रीनरसिंह सरस्वतीच्या नंतर शभर वर्षांनी पक्का करण्यास हरकत नसावी. सरस्वती गंगाधरांनी आपली माहिती देताना म्हटले आहे, ' आपस्तंब शाखेसी । गोत्र कौंडिण्य महाऋषि । ' साखरें नाम ख्यातीसी । सायंदेवापासाव ॥' ( १.४१ ) यावरून ग्रंथकाराचे उपनाव साखरे असून ते आपस्तंब शाखेचे कौंडिण्यगोत्री ब्राह्मण होते. श्रीनरसिंहसरस्वतीचे एक शिष्य सायंदेव असून त्यांचे पुत्र नागनाथ. नागनाथाचे पुत्र देवराव व देवरावाचे पुत्र गंगाधर असून या गंगाधराचे पुत्र गुरुचरित्रकार सरस्वतीगंगाधर होत. श्रीनरसिंहसरस्वतीचे एक शिष्य सिद्ध त्याच्या सेवेतच असत. त्यानीच हे गुरुचरित्र आपल्या नामधारक नावाच्या शिष्यास सांगितले अशी कल्पना करून त्याच चरित्राचा विस्तृत अनुवाद सरस्वती गंगाधरानी केला.

ज्या काळात श्रीगुरुचरित्र ग्रंथाच्या नायकाचा म्हणजे श्रीपादवल्लभ व श्रीनरसिंहसरस्वती यांचा अवतार झाला, त्या काळाचाही थोडा निर्देश येथे करावयास हवा. मराठी भाषेत नाव घेण्यासारखा व परंपरा निर्माण करणारा एक थोर ग्रंथ 'ज्ञानेश्वरी' या नावाचा शके १२१२ मध्ये नेवासे येथे तयार झाला. परमार्थविचार आबालवृद्धांना सरळ व सुगम भाषेत प्रथमच सर्वसामान्य लोकाना त्यांच्या भाषेत उपलब्ध झाला. त्यानंतर थोड्याच अवधीत उत्तर हिंदुस्थानातून एका नव्या परधर्मीयांचा अंमल महाराष्ट्रात सुरू झाला. देवविषयक कल्पना, आचारविचार, तत्त्वज्ञान, संस्कृती, राजकारण, समाजधारण इत्यादी बाबतीत बऱ्याच अंशांनी वेगळ्या परंपरेचा संबंध महाराष्ट्राशी आला. खिलजी घराण्याने देवगिरीचे राज्य संपुष्टात आणून महाराष्ट्रात इस्लामी सत्ता दृढ केली. गुलबर्गा येथे बहामनीशाहीचे राज्य स्थापन झाले. हिंदू ब्राह्मणाच्या पुण्याईशी जरी या राज्याचा संबंध असला तरी ते मुसलमानी राज्य होते. पंधराव्या शतकाच्या अखेरीस या राज्याची पाच शकले होऊन अहमदनगरची निजामशाही, विजापूरची आदिलशाही, वऱ्हाडची इमादशाही, बेदरची बेरीदशाही आणि गोवळकोंड्याची कुतुबशाही, अशी पाच नवी इस्लामी राज्ये निर्माण होऊन पुढे निजामशाही व आदिलशाही या दोन

मुसलमानी राज्याच्या स्वामित्वाखाली महाराष्ट्रास काही काळ तरी नादावे लागले मुसलमानी राजवट कधी जुलमी बनली तर कधी समजस राहिली हिंदूच्या मदिराचे, मूर्तींचे विध्वसन झाले बाटवाबाटवीचे प्रकारही फार झाले परतु पुढे राज्यकर्त्यांची क्रूर दृष्टी निवळून हिंदू व मुसलमान यांची अनेक बाबतीत दिलजमाई झाली आचार-विचाराची देवघेव झाली सूफी साधूच्या आचाराचा व शिकवणुकीचाही थोडाफार परिणाम होऊन सलोख्यास मदत झाली कान्होपात्रा, दामाजीपत, एकनाथाचे पणजे भानुदास, मृत्युजय अथवा मुतोजी ब्रह्मणी इत्यादी सत्पुरुषाच्या या काळातील चरित्रकथा या नव्या राजवटीचे दर्शन घडविणाऱ्या आहेत एकनाथाचे गुरु जनार्दनस्वामी हे तर देवगिरीवर इस्लामी सत्तेत अधिकारी असून मोठे दत्तभक्त म्हणून प्रसिद्धीस आले होते दत्तपथावरील मुसलमानी प्रभावही लक्षात राहाण्यासारखा आहे

ज्ञानेश्वरीनतर सुमारे २५० वर्षानतर तयार झालेल्या गुरुचरित्रात या बदललेल्या परिस्थितीची दखल घेतली गेलेली आहे गुरुचरित्राच्या पन्नासाव्या अध्यायात 'सार्वभौमस्फोटकशमना'-च्या निमित्ताने एका म्लेच्छ राजाचीच कथा सागितली आहे 'कठिण दिवस युगधर्म। म्लेच्छ राज्य क्रूरकर्म। प्रगट असता घडे अधर्म। समस्त म्लेच्छ येथे येती।' (५२ २५८), 'पुढे येतील दुर्दिन। कारण राज्य यवन।' असाही निर्देश याच अध्यायात आहे अशा प्रसगी धर्माधर्मात फारशी कटुता तर न वाढावी आणि हिंदू धर्माचे व समाजाचे तर परधर्मीयापासून सरक्षण व्हावे, या उदात्त व थोर हेतूने श्रीपादवल्लभ व श्रीनरसिंहसरस्वती यानी जे धर्मरक्षणाचे कार्य केले त्याचेच दर्शन श्रीगुरुचरित्रात आहे आचारभ्रष्ट समाजास गुरुचरित्रकारानी एक नवा आचार निर्माण करून दिला सर्वसामान्य लोकासाठी नाना प्रकारची व्रते व वैकल्ये सिद्ध केली ब्रह्मा-विष्णू व महेश याच्या एकीकरणातून एका जुन्याच सप्रदायाचा त्यानी पुरस्कार केला आणि या पडत्या काळात समाजाचे रक्षण केले

रामचद्र कृष्ण कामत यानी परिश्रमपूर्वक सशोधित केलेल्या श्रीगुरुचरित्राचे सायदेव प्रतीमधील गुरुगीतेच्या अध्यायासहित एकूण बावन अध्याय असून ओवीसख्या ७४८९ पर्यंत आहे अनसूयेच्या पोटी 'विष्णुमूर्ती दत्तात्रेय' यानी अवतार घेतल्याची कथा चौथ्या अध्यायात आलेली असून पाच ते दहा अध्यायात दत्तावतारी श्रीपादवल्लभ याच्या चरित्राचे वर्णन आले आहे 'पीठापूर पूर्वदेशी। होता ब्राह्मण उत्तमवशी। आपस्तब शाखेसी। नाम आपळ राजा जाण॥ तयाची भार्या सुमता। असे आचार पतिव्रता। अतिथि आणि अभ्यागता। पूजा करी भक्तिभावे' अशा या थोर दपतीच्या पोटी दत्ताने श्रीपादवल्लभाच्या रूपात अवतार घेतला श्रीपादवल्लभाच्या अवतारकथा पुढे चारपाच अध्यायात आलेल्या आहेत त्यानी आपल्या अध व पगू बधूना डोळे व पाय देऊन सुस्वरूप केले, वेदविद्यासपन्न केले 'न म्हणावे पुन यासी। हा अवतार पुरुष तापसी॥' अशी खात्री आईबापाची झाली काशी, बद्रीनारायण, गोकर्ण अशा तीर्थयात्रा करून श्रीपादवल्लभ कुरवपुरास (कुरगड्डीस) आले या ठिकाणी त्यानी एका विधवेस तिच्या मुलाचे मूढत्व कमी व्हावे म्हणून शनिप्रदोषाचे व्रत करण्यास सागितले आणि पुढील जन्मी ब्रह्मज्ञानी पुत्र आपणास व्हावा अशी तिची इच्छा सफल होण्याचा त्यानी तिला आशीर्वाद दिला याच ठिकाणी श्रीपादवल्लभानी एका रजकाला राज्यप्राप्तीचा आशीर्वाद पुढील जन्मासाठी दिला आणखी अशाच काही लीला करून श्रीपादवल्लभ आश्विन वद्य १२ स समाधिस्थ झाले

याच श्रीपादवल्लभाचा पुढला अवतार म्हणजे श्रीनरसिंहसरस्वतीचा असून ११ ते ५१ अध्या-

यांत सरस्वतीगंगाधरांनी त्यांच्याच लीलांचे मोठ्या श्रद्धेने गायन केले आहे. श्रीपादवल्लभानी ज्या अंबिका नावाच्या स्त्रीला शनिप्रदोषाचे व्रत करावयास सांगितले होते, तीच पुढल्या जन्मी विदर्भात लाडकारंजा या नगरात जन्म घेऊन अंबाभवानी या नावाने उदयास आली. येथील माधव नावाच्या एका शिवभक्ताशी तिचा विवाह झाला. याच दांपत्याच्या पोटी नरसिंह सरस्वतीचा अवतार झाला. 'जन्मतांच तो बालक। ॐकार शब्द म्हणतसे ऐक॥' असे भविष्य वर्तविले गेले असले तरी प्रणवाच्या उच्चारा-खेरीज या बालकाने दुसरा शब्दच मुखावाटे मुंज होईपर्यंत काढला नाही. गायत्रीच्या उपदेशानंतर मात्र त्याने वेदमंत्र म्हणून दाखवून सर्वांना चकित केले. आईला आणखी दोन मुले झाल्यानंतर नरसिंह ऊर्फ नरहरी काशीस गेला. तेथे त्याने अनुष्ठान केले. कृष्णसरस्वती नावाच्या एका सामर्थ्यशाली संन्याशाकडून दीक्षा घेतली आणि नरहरी नरसिंहसरस्वती या नावाने प्रसिद्ध झाला. या नरसिंहसरस्वतीच्या चरित्रकथा विस्ताराने गुरुचरित्रात आलेल्या आहेत. आपल्या अद्‌भुतरम्य लीलांनी त्यानी अनेकांचा उद्धार केला.ब्राह्मणाचे दारिद्र्य दूर करणे, शिरोळच्या ब्रह्मराक्षसास सद्‌गती देणे, ब्रह्मसंमंधाला गती देणे, वांझ स्त्रीला पुत्र देणे, म्हातार्‍या व वांझ म्हशीला दूध देणे, मृत-पतिकेचा पती जिवंत करणे, रोगी लोकाना आरोग्य देणे, हृदयशूळ, गंडमाळ, अपस्मार इत्यादी रोग दूर करणे, दरिद्री माणसाकडून सहस्रभोजन करविणे, अशा अनेक चमत्कारिक लीलांचे वर्णन गुरुचरित्रात आलेले आहे. शनि-प्रदोष, सोमवार, अनंत इत्यादींच्या व्रतकथा या ग्रंथात सविस्तर वर्णन केल्या आहेत. गोकर्ण, भस्म, रुद्राक्ष, काशी, श्रीशैल इत्यादींचे माहात्म्य कथेच्या संदर्भात चटकदार रीतीने गुरुचरित्रात आलेले आहे. पतिव्रतेचा धर्म, विधवेचा आचार, ब्राह्मणाचे नित्याचे आन्हिक असे आणखीही अनेक महत्त्वाच्या व सांप्रदायिकांना उपयुक्त अशा विषयाचे निरूपण या ग्रंथात आहे.

गुरुचरित्राचे कर्ते सरस्वतीगंगाधर याची मातृभाषा मराठी नसली तरी त्यांच्या ओव्यां-वरून मराठी भाषेचा त्यांना चांगला परिचय होता असे वाटते. 'तावन्मात्र माझी मति। नेणें काव्यव्युत्पत्ति॥ जैसे श्रीगुरु निरोपिती। तेणेंपरी सांगतसे।' (१.५१) अशी त्यांची नम्र भूमिका असली तरी 'पूर्वापार आमुचे वंशी। गुरु प्रसन्न अहर्निशी। निरोप देती मातें परियेसी। चरित्र आपुलें विस्तारी॥'(१.५२)असा आत्मविश्वासही त्यांना आहे. 'श्रीगुरुवाक्य मज कामधेनू। मनी नाहीं अनुमानू। श्रेयवृद्धि पावविणार आपणू। श्रीनृसिंहसरस्वती॥ त्रैमूर्तीचा अवतार। झाला नृसिंहसरस्वती नर। कवण जाणे याचा पार। चरित्र कवणें वर्णिवें। चरित्र ऐसें श्रीगुरुचें। वर्णाविया शक्ति कैंची वाचें। आज्ञा असे श्रीगुरुची म्हणोनि वाचें बोलतसे॥' (१.५४–५६). अशा श्रद्धेने गुरुचरित्राचे लेखन झाले आहे. 'न कळे ग्रंथप्रकार। नेणें शास्त्राचा विचार। भाषा न ये महाराष्ट्र।' अशी स्वतःची अवस्था कवीने नम्रतेने वर्णन केली असली तरी गुरुचरित्रातले अनेक कथाप्रसंग वर्णनशैलीच्या व परिणाम-कारकतेच्या दृष्टीने अप्रतीम वठले आहेत.

'गजानना गिरिजाकुमरा। जयजय लंबोदरा। एकदंत शूर्पकर्णा॥ हालविसी कर्णयुगुलें। तेयुनि जो का वारा उसळे। त्याचेनि कसें विघ्न पळे। विघ्नांतक म्हणती तुज॥ तुझे शोभे आनन। जैसें तप्त कांचन। किंवा उदित प्रभारमण। तैसें तेज फाकतसें॥'अशी अनेक गोचर व प्रत्ययकारी वर्णनें गुरुचरित्रात आढळतील. 'आतां वंदू ब्रह्मकुमारी। जिचें नाम वागीश्वरी। पुस्तक वीणा जिचे करीं। हंसवाहिनी असे देखा॥ ऐक माझी विनंति। द्यावी आता अवलीला मति। विस्तार करावया गुरुचरित्री। मतिप्रकाश करी मज॥ जय जय वो जगन्माते। तूंचि विश्ववाग्देवते। वेदशास्त्रें तुझी

लिहिते । नादविशी येणे परी ॥ म्हणूनि नमिले तुझे चरण । व्हावे स्वामिणी प्रसन्न । द्यावे माते विद्यादान । ग्रंथी रिघू करी आता ' असे सरस्वतीचे नमन मनास संतोष देणारे नाही काय ?

आणि ब्रह्मा विष्णू महेशाची अशीच रेखीव व सुबक शब्दचित्रे गुरुचरित्रकारानी काढलेली आहेत 'चतुर्मुखे असती ज्यासी । कर्ता जो का सृष्टीसी । वेद झाले ज्याचे मुखेसी । त्याचे चरणी नमन माझे ॥' या एकाच ओवीत ब्रह्मदेवाचे रूप व कार्य उभे राहिले आहे 'आता वदू हृषीकेशी जो नायक विश्वासी । लक्ष्मीसहित अहर्निशी । क्षीरसागरी असे जाणा ॥ चतुर्बाहु नरहरी । शख, चक्र, गदा करी । पद्महस्त मुरारी । पद्नाभ परियेसा ॥ पीतांबर असे कासेला । वैजयती माळा गळा । शरणागता अभीष्ट सकळा । देता होय कृपाळू ॥' असे विष्णूचे वर्णन अतिशय सुरेख आहे 'आता नमू शिवासी । धरिली गगा मस्तकेसी । पचवक्त्र दशभुजेसी । अर्धांगी असे जगन्माता ॥ पचवदने असती ज्यासी । सहारी जो या सृष्टीसी । म्हणोनि बोलती स्मशानवासी । त्याचे चरणी नमन माझे ॥ व्याघ्रांबर पांघरुण । सर्वांगी असे सर्पवेष्टन । ऐसा शभु उमारमण । त्याचे चरणी नमन माझे ॥' या ओव्यातून भगवान शिवशंकराची मूर्ती आपल्या डोळ्यासमोर उभी राहत नाही काय ? आणि पुढे चौथ्या अध्यायात हेच तीन देव सती अनसूयेचे सत्व हरण करण्यासाठी आले तेव्हा या मातेपाशी त्याना बाळरूप पत्करावे लागले या वात्सल्यपूर्ण प्रसगाचे वर्णन करताना गुरुचरित्रकार लिहितात, 'बालके देखोनि अनसूया । भयचकित होऊनिया । पुनरपि वस्त्रे नेसूनिया । आली तया बाळकापाशी ॥ रोदन करिताति तिन्ही बाळे । अनसूया राहवी वेळोवेळे । क्षुधार्त झाली केवळे । म्हणोनि कडे घेतले ॥ कडे घेवोनि बाळकासी । स्तनपान देतसे हर्षी । एका सोडोनि एकासी । निवारण करी क्षुधेचे ॥ पाहे पा नवल काय घडले । त्रयमूर्तीचे बाळक झाले । स्तनपानमात्रे क्षुधा गेली । तपफळ ऐसे पतिव्रतेचे ॥ ज्याचे उदरी चवदा भुवन । सप्त समुद्र वडवाग्न । त्याची क्षुधा निवारण । पतिव्रता स्तनपानमात्रे ॥'

सुरस कथाभाग, आचारधर्माचे सरक्षण, रसाळ वर्णनशैली आणि धार्मिक वृत्तीची जोपासना इत्यादी गुणामुळे गुरुचरित्राचे महत्त्व साप्रदायिकात फार मोठे आहे योग व मत्रशास्त्र या दृष्टीनीही या ग्रंथाची योग्यता मोठी असल्याने याची पारायणे घरोघरी नित्य होत असतात अनेकाना आपापल्या कार्यात श्रीगुरुचरित्राच्या पारायणाने स्फूर्ती दिलेली दिसेल विष्णुबोवा ब्रह्मचारी, वासुदेव बळवत फडके, मोरो केशव दामले इत्यादी अर्वाचीन काळातील श्रेष्ठ पुरुषाचे कर्तृत्व वेगवेगळ्या क्षेत्री असले तरी त्याना श्रीदत्तकृपा व गुरुचरित्र याचे पाठबळ असल्याचे ध्यानी येईल भक्तिप्रेमाच्या अनुभूतीसाठी साधकाना गुरुचरित्र उपयोगी येतेच, पण ऐहिक लाभासाठीही गुरुचरित्राचे वाचन वा पारायण फलदायी ठरल्याचा अनुभव अनेक भाविकाना येत असतो गुरुचरित्रकारानी पहिल्याच अध्यायात ग्रथाचा महिमा वर्णन करताना म्हटले आहे, 'ज्यास पुत्रपौत्री चाड । त्यासी हे कथा असे गोड । लक्ष्मी वसे अखड । तया भुवनी परियेसा ॥ ऐशी कथा जयाचे घरी । वाचिती नित्य मनोहरी । श्रियायुक्त निरतरी । नादती कलत्रपुत्रयुक्त ॥ रोगराई तया भुवनी । नव्हती गुरुकृपेकरोनि । नि सदेह सात दिनी । ऐकता बधन तुटे जाणा ॥ ऐसी पुण्यपावन कथा । सागेन विस्तारता । सायासाविण होय साध्यता । सद्य फल असे देखा ॥ निधान लाधे अप्रयासी । तरी का वष्टिजे सायासी । विश्वास माझिया बोलासी । ऐका श्रोते एकचित्ते ॥' अशा भाषेत 'गुरुचरित्र-कामधेनू' ची महती स्वत ग्रथकारानेच सागितलेली आहे

गुरुचरित्राच्या वाचनाने, स्मरणाने, मननाने

ब्रह्मज्ञान होतेच, परतु भौतिक व्याधीही दूर होऊन इच्छित वस्तूची प्राप्ती होते धन, सपत्ती पुत्र, यश कीर्ती, रोगनिवारण इत्यादींच्या प्राप्तीसाठीही गुरुचरित्राची शेकडो, हजारो पारायणे आजवर महाराष्ट्रात झालेली आहेत पुन तिसऱ्या अध्यायातही ग्रथकाराने म्हटले आहे, ' भुक्ति मुक्ति परमार्थ । ज ज वाछी मनी आर्त । त्वरित होय साध्यत । गुरुचरित्र ऐकता ॥ धनार्थ्यासी अक्षय धन । पुत्रपौत्रादि गोधने । कथा ऐकता होय जाणे । ज्ञानसिद्धि तात्काळी ॥ जे भक्तीने सप्तक एक । पठती ऐकती मनुष्य लोक । काम्य होय तात्कालिक । निपुत्रिका पुत्र होती ॥ ग्रहरोगादिपीडन । नव्हती व्याधि कधी जाण । जरी मनुष्या असे बधन । त्वरित सुटे ऐकता ॥ ज्ञानवत शतायुषी । ऐकता होय भरवसी । ब्रह्महत्यादि पाप नाशी । एकचित्त ऐकता ॥'

गुरुचरित्राचे पारायण कसे व किती दिवसात करावे यासबधीही काही मार्गदर्शन याच ग्रथात आहे ' सप्ताह वाचावयाची पद्धती । तुज सागो यथास्थिति । शुचिर्भूत होवोनि शास्त्ररीती । सप्ताह करिता बहु पुण्य ॥ दिनशुद्धि बरवी पाहून । आवश्यक स्नानसध्या करून । पुस्तक वाचावयाचे स्थान । रगवल्यादि शोभा करावी ॥ देशकालादि सकल्प करून । पुस्तकरूपी श्रीगुरुचे पूजन । यथोपचारे करून । ब्राह्मणासही पूजावे ॥ प्रथम दिवसापासोन । बसावया असावे एक स्थान । अतत्त्वार्थ आपणी धरावे मौन । कामादि नियम राखावे ॥ दीप असावे शोभायमान । देववाहाण मडित वदून । पूर्वोत्तर मुख करून । वाचनी आरभ करावा ॥ नवसख्या अध्याय प्रथम दिनी । एकविंशतीपर्यंत द्वितीय दिनी । एकोनत्रिंश तृतीय दिनी । चतुर्थ दिवशी पसतीस पै । अडतीसपर्यंत पाचवे दिनी । बेचाळीस वरी सहावे दिनी । सप्तमी वावन्न वाचोनि । अवतरणिका वाचावी ॥'

ग्रथात ही सप्ताहपद्धती सागितली असली तरी प्रसिद्ध दत्तावतारी सत्पुरुष वासुदेवानद सरस्वती याच्या परपरेत व अन्यत्रही ७।१८।२८।३४।३७ ४३।५१ असे अध्याय सात दिवसात वाचण्याची पद्धत आहे अशा प्रकारचे पारायण करीत असताना व केल्यानतर सागता करताना काय काय करावे यासबधीचे मार्गदर्शन याच शेवटच्या अध्यायात आहे ' नित्य पाठ होता पूर्ण । करावे उत्तराग पूजन । श्रीगुरुते नमस्कारून । उपाहार काही करावा ॥ या प्रकारे करावे सप्त दिन । रात्री करावे भूमीशयन । साराश शास्त्राधारेकरून। शुचिर्भूत असावे ॥ एव होता सप्त दिन । ब्राह्मण-सुवासिनी-भोजन । यथाशक्त्या दक्षिणा देऊन । सर्व सतुष्ट करावे ॥' अशा प्रकारे सागतापूर्वक झालेल्या गुरुचरित्रपारायणाचे फल वर्णन करताना म्हटले आहे, ' ऐसे सप्ताह अनुष्ठान । करिता होय श्रीगुरुदर्शन । भूतप्रेतादि बाधा निरसन । होवोनि, सौख्य होतसे ।' गुरुचरित्राच्या पारायणाचा विशिष्ट हेतू ध्यानात घेऊन वेगवेगळे सकल्पही सागितले जातात मुमुक्षूने स्वत च्या साधनेसाठी, देशवीराने सार्वजनिक कल्याणाकरता व राष्ट्रहिताकरता, दुसऱ्यासाठी, सर्वसाधारण लोकासाठी पारायण करताना वेगवेगळे सकल्प दिसतात 'अस्मिन् भारतवर्षीय जनाना क्षेमस्थैर्य, ऐश्वर्याभिवृद्ध्यर्थं, धर्मअविरुद्ध-स्वातत्र्यप्राप्त्यर्थं, स्वातत्र्यमध्ये पु सकल शत्रुविनाशनार्थं, तत् शत्रुसहारक तेजोबलवीर्यप्राप्त्यर्थं, सकलभय-निरसनार्थं, अभयसिद्ध्यर्थ च श्रीदत्तात्रेयदेवता-प्रीत्यर्थ श्रीगुरुचरित्रसप्ताहपारायणाख्य कर्म करिष्ये ' असा सकल्प देव व समाज याच्या अभिवृद्धीसाठी सागितला आहे

अशा रीतीने गुरुचरित्राच्या पारायणाचे स्वरूप असून त्याची विशेष प्रकारची पद्धती आहे ज्याना सपूर्ण गुरुचरित्र वाचण्याची सवड नसेल त्यानी विशिष्ट हेतूनुसार विशिष्ट अध्यायाची २८, ५६ किंवा १०८ पारायणे करण्याचा प्रघात आहे आरोग्यासाठी तेरावा अध्याय, पारमार्थिक कृपेसाठी दुसरा अध्याय, सद्गुरुच्या प्राप्तीसाठी

पहिल्या अध्यायातील अभग छदातील ओव्या, सततीच्या आरोग्यासाठी वीस व एकवीस अध्याय, पुनप्राप्तीसाठी एकोणचाळिसावा अध्याय, आकस्मिक आलेल्या अरिष्टनिवारणार्थं चौदावा अध्याय वाचण्याची रीत आहे

गुरुचरित्र ग्रथातील कित्येक ओव्याला मत्राचे सामर्थ्य आहे, किंबहुना हा ग्रथच मुळी एक प्रभावी मत्र आहे, अशी श्रद्धा असल्यामुळे व त्यात सागितलेल्या कडक अशा आचारधर्मामुळे गुरुचरित्र वाचण्याचीही बधने वर सागितल्या-प्रमाणे अनेक आहेत गुरुचरित्र सोवळयाने वाचावे लागते त्याचे पारायण करताना काही पथ्ये पाळावी लागतात 'अनिष्टनिवृत्ती व इष्टप्राप्ती' करून घेण्यासाठी मत्रप्रभावाचाच उपयोग करण्याची रीत आहे अशा वेळी गुरुचरित्राच्या पारायणाने इष्ट हेतू साध्य करताना एक प्रश्न उपस्थित होतो गुरुचरित्र कोणी वाचावे? स्त्रियानी ते वाचावे की नाही? या प्रश्नाचे उत्तर या सप्रदायातील अधिकारी एक सत्पुरुष वासुदेवानद सरस्वती महाराजानी 'स्त्रीशिक्षा' या पुस्तकात दिले आहे, ते असे 'पतिव्रताधर्म काशीखडी व गुरुचरित्रात सागितला आहे, तो ब्राह्मणद्वारा ऐकावा वाचता आले तरी स्त्रियानी गुरुचरित्र वाचू नये विवाहानतर भर्त्याबरोबर वेदमत्राने वैदिक कर्मं करण्यास व यज्ञाग स्वकीय मत्र म्हणण्यास स्त्रियाना अधिकार येतो त्या-शिवाय वेदमत्र ऐकण्याचा सुद्धा अधिकार नाही वेदमत्र पुरुषाचे ऐकून म्हटले तरी आर्य-द्रव्य चोरीचा दोष येतो' आजच्या समतेच्या काळात स्वामी महाराजाचे हे मत कितपत मान्य होईल याची शकाच आहे शिवाय वेदमत्र-निर्मिती-च्या कामात काही स्त्रियाची मदत झाली अस-ल्यास व काही पडिता स्त्रियानी वैदिक चर्चेत भाग घेतला असल्याचे खरे असल्यास स्त्रियानी गुरुचरित्र वाचू नये या मताचा भावार्थ तपासावयास हवा मासिक शरीरधर्मामुळे काही अपवित्रता स्त्रीस येत असल्यामुळे तर असा निर्बंध आलेला नसेल ना? गुरुचरित्र हा एक सबध मत्रच असल्यामुळे मत्राच्या अनुष्ठानासबधीचे सर्व नियम त्याला लागू आहेत त्यात अनेक ठिकाणी मधून मधून वेदाक्षरे आली आहेत, म्हणून तो स्त्रीशूद्रानी वाचण्यास प्रतिबध आहे जर त्या अक्षरा-खाली खुणा करून ठेवून त्याचा उच्चार न करता फक्त त्यावर दृष्टी टाकून वाचावयाचे म्हटले तर स्त्रीशूद्रानीही वाचण्यास हरकत नाही, व अशा रीतीने वाचणाऱ्या काही स्त्रिया माझ्या पाहण्यातही आल्या आहेत, अशी माहिती कामतसपादित गुरुचरित्राच्या आवृत्तीस पुरस्कार लिहिताना अप्रबद्ध यानी दिलेली आहे

श्रीगुरुचरित्राचे महत्व व्यक्तीच्या व समा-जाच्या दृष्टीने काय आहे हे सागताना वरील लेखातच अप्रबुद्ध (विष्णु केशव पाळेकर) यानी म्हटले आहे,

साराश, भक्तिमार्गातील अथवा नाम-स्मरणाच्या मार्गातील स्वकर्मच्युती हा जो शास्त्रोक्त दोष, तो नाहीसा करून जनतेला स्वकर्माच्या ठिकाणी अभियुक्त करून भक्ति-प्रवण करण्याकरिता आणि लोकाच्या ठिकाणी त्याग व निर्भयता उत्पन्न करण्याकरिता श्री-गुरुचरित्राचा अवतार आहे श्रीगुरूनी ब्राह्मणास असे शिकविले की, ब्राह्मणाचे सारे जीवनच यज्ञमय करण्याकरिता श्रीगुरुचरित्राचा अवतार आहे श्रीगुरूनी ब्राह्मणास असे शिकविले की, ब्राह्मणाचे सारे जीवनच यज्ञमय आहे अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह, सत्य वद, धर्मं चर, मातृदेवो भव, पितृदेवो भव इ साधारण धर्म तर ब्राह्मणानी पाळलेच पाहिजेत, परतु ह्या सर्वाच्या योगाने शुद्ध ठेवलेल्या शरीरास शास्त्रप्रतिपादित विधिनिषेधाच्या मर्यादानी दिव्य बनवून 'ब्राह्मणो लोकपालक' असे

म्हणवून घेतले पाहिजे ब्राह्मणाचे कर्म कमी अधिक प्रमाणाने त्याला व सर्व विश्वाला उपयोगी पडते व त्यानेच त्याचे तिन्ही पुरुषार्थ आणि मोक्ष त्याला मिळतात ते टाकून मोक्षाकरिता योगादी दुसरे स्वतंत्र उपाय करणारा ब्राह्मण हा स्वार्थी अल्पधारिष्टाचा आणि 'स्तेन एव स' असा आहे म्हणूनच ब्राह्मणाला कोणतीही गोष्ट, मग ती श्रद्धापूर्वक पितराचे स्मरण करण्याची असो, भक्तिपूर्वक देवतार्चन करण्याची असो, आसना-शयनादी अथवा खानपानादी क्षुल्लक गोष्टीपासून तो स्त्रीसुखासारख्या अत्युत्तम मानल्या जाणाऱ्या शारीरिक उपभोगाची गोष्ट असो, सर्व काही त्याला एका शास्त्राच्या तत्र्याने करावे लागते आपल्या इच्छेप्रमाणे आवडलेले एखादे फूल एखाद्या देवमूर्तीवर ठेवण्यासारख्या क्षुल्लक बाबतीतही तो स्वतःच्या लहरीप्रमाणे वागू शकत नाही हे ध्येय ब्राह्मणापुढे ठेवून सर्वसामान्य जनतेस त्यानी असा संदेश दिला की, 'ज्यासी नाही मृत्यूचे भय। त्यासी यवन असे तो काय। श्रीगुरुकृपा ज्यासी होय। यमाचें मुख्य भय नाही॥' मृत्यूची भीतीच एकदा ज्यानी टाकून दिली ते त्रैलोक्यविजयी होऊन साम्राज्यसंपन्न झाले ह्यात काही नवल नाही. श्रीगुरुंची तर आज्ञा अशी होती की, 'जरी आम्हापाशी राहसी। तरी त्वा न वंदिजे म्लेच्छासी॥' म्लेच्छापुढे नमन करणे म्हणजे साक्षात् मृत्यू हे त्यानी शिकविले आणि ब्राह्मणाच्या ठिकाणी सामर्थ्य असेल तर यवन राजाही त्याला डोक्यावर घेऊन मिरवितो अशी प्रतीती दिली. साधुसंतानी उत्पन्न केलेला हा विश्वासच पुढे शिवाजी तानाजीच्या रूपाने प्रकट झाला आणि अटकेपासून रामेश्वरपर्यंत व द्वारकेपासून जगन्नाथपर्यंत विस्तार पावला'

'श्रीशंकराचार्यांच्या सौंदर्यलहरीप्रमाणेच श्रीगुरूचरित्र हा एक अद्भुत ग्रंथ आहे. तिच्या प्रत्येक श्लोकाचे विधिपूर्वक अनुष्ठान केले तर एक लहान सिद्धी मिळते. काव्यदृष्टीनेही ती अतिशय उत्तम आहे हे निर्विवाद आहे. अर्थदृष्टीने पाहता योग, तंत्र आणि वेन्दात या तिहींचेही रहस्य तिच्यात साठविले आहे. त्याप्रमाणेच अनिष्टनिवृत्ती व इष्टप्राप्ती ह्यांस श्रीगुरुचरित्राचे विधिपूर्वक वाचन उपयोगी पडते. यवनाक्रांत झालेल्या काळात यावनी भाषेचा एकही शब्द नसलेला शुद्ध मराठी असा हाच एक ग्रंथ तयार झाला.काव्य या दृष्टीने त्याची योग्यता कोणत्या प्रकारची आहे ते त्यातील अनेक वर्णनावरून आणि विशेषतः काही करुण प्रसंगांवरून नीट लक्षात येते. ते प्रसंग वाचीत असता व्यवहारात प्रत्यक्ष अनुभवताना जे उद्गार आपल्या कानी येतात, तेच हुबेहूब वाचनात आल्यामुळे कसाही वाचक गहिवरून क्षणभर थांबल्याशिवाय राहात नाही. करुण रसाच्या बाबतीत महाराष्ट्रीय मनुष्याच्या हृदयाच्या भावनांची प्रचीती इतक्या सहजोद्गाराने देण्याची हातोटी सरस्वती गंगाधराइतकी दुसऱ्या महाराष्ट्रीय कवीत क्वचित् असेल. भक्तिरस हा ह्या ग्रंथाचा आत्माच आहे आणि अर्थदृष्ट्या पाहिले तर सूत्ररूपाने त्यात सर्व काही आहे असे वाटू लागते. धर्म म्हणजे काय; असले मोठमोठे गहन विषयही 'आपले वक्षपृष्ठेंसी। धर्माधर्म उपजवी' अशा थोड्याशा शब्दात साधारणपणे कवी सहज लीलेने सांगून टाकतो. श्रीगुरुचरित्र कोरडा वेदान्त सांगत नाही, निष्क्रीय भक्तिमार्ग शिकवीत नाही, अथवा मनुष्यजातीला तुच्छ लेखून कोणत्याही आभासमय ध्येयाच्या मागे लागत नाही. ज्ञानपूर्वक भक्तियुक्त असे स्वकर्माचरणच शिकविते. वेदप्रतिपादित मार्गाप्रमाणे ऐहिक जीवनाचा यथाशास्त्र उपभोग घेऊन मुक्ती मिळविली पाहिजे, असे त्याचे एकदर धोरण आहे.'

## श्रीदत्तप्रबोध

'श्री गु रु च रि त्रा' च्या खालोखाल दत्त-सांप्रदायिकात 'श्रीदत्तप्रबोध' या ग्रथाचे माहात्म्य आहे बडोदा येथील परम भागवत अनतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबाबा यानी हा ग्रथ बडोदे येथे शके १७८२ मध्ये चैत्र शु प्रतिप्रदेस पूर्ण केला. नगर जिल्ह्यातील पारनेर तालुक्यातील पिंपळगावचे हे वतनदार कुलकर्णी होत त्याच्या मातुश्रीचे नाव राधिका व वडिलाचे नाव अनत आपल्या मातापित्याची सेवा विठ्ठलबोवानी पुडलीकाप्रमाणे केली कावडीमध्ये घालून त्यानी आपल्या आईवडिलाना काशीयात्रेस नेले, म्हणून त्याना कावडीबोवा असे नाव पडले विष्णुपदास आल्यावर त्याच्या मातुश्रीचे निधन झाले विरक्त अनतरावानी सन्यासदीक्षा घेतली अनत-बोवाचेही वाराणशीस निर्याण झाले पुढे रिकाम्या झालेल्या कावडीमध्ये विठ्ठलबोवानी विठ्ठलरखु-माईच्या मूर्ती घालून तीर्थयात्रा चालू ठेविली दत्तप्रभूचे स्मरण करीत करीत विठ्ठलबोवा गालव क्षेत्रात आले या सदर्भात श्रीदत्तप्रबोधात म्हटले आहे,

'तो अनत सद्गुरुपिता । राधिकानामें माझी माता । त्यानीच विठ्ठलनाम ठेविले सुता । दयाळू समर्था काय वाणु ? ।। जो जगद्गुरु स्वामी दत्त । तोचि रूपें तरल श्रीअनत । उभा विठेवरी विठ्ठल विराजित । सद्गुरु समर्थ सदय हा ।। महाक्षेत्र गाल्वस्थानी । दत्तजयतीची पर्वणी । विप्ररूपें बोधिले येवोनी । साह्य कीर्तनी झाला तो ।।'

नम्रत्व घेताना विठ्ठलबोवानी म्हटले आहे, 'नाही मजसी ज्ञानमती । दृष्टी नाही ग्रथ अर्थी । कोण कैसिया समती । मेळ उगती न जाणे । नाही केला वेदाभ्यास । नाही पढलो शास्त्रास । नाही पाहिलें पुराणास । नाही शब्दास ओळखिलें ।। प्राकृतातेही नोव्हे जाणता । नाही ऐकल्या प्राज्ञवार्ता । परी सद्गुरु अनत



बोलविता । त्याची सत्ता कळेना (१ ४६-४८)' अशा नम्र वृत्तीने सर्व ग्रथ भारावून गेला आहे वडील अनतबोवा हेच विठ्ठलबोवाचे सद्गुरू आदिनाथ- ब्रह्मदेव- अत्रिनाथ- दत्तात्रेय-जनार्दन-एकनाथ-नरहरी- निवराज- जयराम- शिवराम-नारायण-अनत-विठ्ठल, अशी ही गुरुपरपरा असून या परपरेत पढरीचा विठ्ठल व दत्तात्रेय याचे मोठे मनोहर मीलन दिसून येते 'दत्त दयाळ उदार । निजकृपें करी जगदोद्धार । उभा पुडलिका समोर । दिगवर समपदी ।। चद्रभागा दक्षिणवाहिनी । पढरीक्षेत्री पुडलिक मुनी । अविनाश तया सन्निधानी । तिलक रेखोनी अद्यापी ।। तो परमात्मा जगद्गुरू । दत्त अविनाश दिगवरू । जनार्दनपतासी अभयकरू । हे दातारू निजकृपें ।।' (६१ ९८-१००) अशा अनेक ओव्या-तून दत्त व विठ्ठल याचे ऐक्य प्रतीत होते या दत्तविठ्ठलाची थोरवी वर्णन करताना अनत-सुत विठ्ठलबोवानी म्हटले आहे 'या भक्ति-प्रेमासाठी । नाना रूपें धरी जगजेठी । भक्तासि तारी हा सकटी । कृपा पोटी दीनाची ।। जे अनन्यशरण लडिवाळ । त्याचे न पाहेचि याति कूळ । हा शुची अथवा चाडाळ । नुपजे मळ अतरी ।। ऐसा कृपाळ रुक्मिणीरमण । भाविक प्रेमळ त्याचे प्राण । त्याचे न मोडी कदा वचन । होवोनि आधीन राहतो ।। त्या बळीचा पाहोनि भावप्रेम । वचनी गुतला सर्वोत्तम । वामनमूर्ती त्रिविक्रम । होवोनि धाम रक्षितो ।। अद्यापि बळीचे द्वारी । उभा दड घेवोनि करी । तोचि पुडलि-काचे पारी । भीमातीरी पाहिला ।।' (६१ ८१-८५)

श्रीदत्तप्रबोधाचे अध्याय एकसष्ट असून एकूण ओवीसख्या १४,२३६ इतकी आहे पहिल्या पस्तीस अध्यायात श्रीदत्तात्रेयाची अवतारकथा व चरित्रलीला याचे वर्णन आहे छत्तीस ते पन्नास अध्यायापर्यंत मत्स्येंद्र-गोरक्षनाथ इत्यादी नाथसिद्धाच्या कथाचे वर्णन असून शेवटच्या

'दहा-अकरा अध्यायांत जनार्दनस्वामी, एकनाथ, निंबराज, इत्यादी श्रेष्ठ सत्पुरुषांच्या कथा आलेल्या आहेत. पहिल्या अध्यायात गणेश, सरस्वती, गुरु, मातापिता, संतजन व श्रोते यांना विस्ताराने वदन आहे अनसूयेचे महत्त्व, अत्रि-आश्रमी नारदमुनींचे आगमन, रमा, उमा व सावित्रीच्या मनातील क्रोध, ब्रह्मा, विष्णू व महेश्वर याचे सिंहाचली आगमन, अनसूयेच्या पातिव्रत्य-प्रभावामुळे या देवांची किशोरावस्था, दुर्वासपुत्राचा जन्म, अवधूताच्या जन्मप्रसंगी सुरवरांचे आगमन, बालकाचे नामजातक, त्याच्या बालक्रीडा, श्रीदत्तानी अनसूयेस केलेला बोध, यदु, सहस्रार्जुन, परशुराम इत्यादींच्या कथा, पिंड-ब्रह्मांडाचे ऐक्य, अवधूतानी केलेले तत्त्व-निरूपण, गिरिनारपर्वतावरील दत्तप्रभूंचे भ्रमण, गोरक्षनाथ, मत्स्येंद्रनाथ, भर्तृहरी इत्यादींच्या कथा, श्रीदत्तगोरक्षसंवाद, जनार्दनपंत व एकनाथ यांना झालेले दत्तदर्शन, श्रीखंड्याने केलेली नाथसेवा, दासोपंतांची चरित्रकथा, निंबराजांचे चरित्र; असे अनेक विषय श्रीदत्तप्रबोध या ग्रंथात कावडीबोवांनी अत्यंत रसाळपणे वर्णन केले आहेत. विठ्ठलबोवांची भाषा अगदी साधी, सरळ, रसपूर्ण व प्रासादिक आहे. मातापिता, गुरुपरंपरा, सतसज्जन, दत्तात्रेय व विठ्ठल यांच्यावरील नितान्त श्रद्धा जागजागी प्रकट झाली आहे

'ॐ नमोजी गजवदना। मंगलाधीशा मंगल-कारणा। अमंगलादि विघ्नहरणा। दयाघना हेरंबा। जयजयाजी वक्रतुंडा। कुबुद्धिछेदका प्रचंडा। सिद्धिदायका अखंडा। दीर्घशुंडा नमो तुज॥ जय फरश अकुंशधारणा। जय सिंदूरासुरसंहारणा। भक्तवत्सला भयहरणा। दीनतारणा गजमुखा॥ जयजयाजी लंबोदरा। गणाधिपति तू सुंदरा। सकलाधिष्ठा उदारा। गुणगंभीरा एकदंता॥ नमो तूतें जी विनायका। भालचंद्रा सुखदायका। प्रीती करिसी गुणगायका। अष्टनायका समवेत॥ जयजयाजी चिंतामणी। पावसी भक्ताच्या कामनीं। हेतु पुरवीसी त्या मनी। सकळ भ्रामणी चुकवीसी॥ जय जयाजी मोरया। तुजविण ग्रंथा न येची रया। काय करील चतुर या। तुझा वर या पाहिजे'॥ (१:१-७) इत्यादी ओव्यांपासून सुरू झालेली गणेशवंदना मोठी रेखीव व श्रद्धा-युक्त आहे. 'शुंडामंडित भव्य वदन। तया शोभती शूर्पकर्ण। एकदंत शुभ्रवर्ण। नेत्र सान चमकती॥ भोंवया आणि भाळ। शोभा देती विशाळ। द्वयभागीं गंडस्थळ। केश कुरळ सलंब॥ भाळी शोभे अवुधर। चर्चित मृगमद केशर। वरी सतेज थोर। मुकुट सुंदर लखलखीत॥ तयावरी दिव्य मणी। मण्यावरी शोभे फणी। कर्णी कुंडलें पाहुनी। होय तरणी सलज्ज॥ मुक्ता घोपाची झल्लाळी। शोभते दोन्ही कुंतली। कोटी सूर्यप्रभा फांकली। ऐसी नव्हाळी रूपाची॥' (१:३९-४३) या ओव्यांतील गणेशरूप दृष्टीसमोर उभे राहील असेच आहे.

शारदादेवीचेही असेच मनोहर व गोचर वर्णन करताना विठ्ठलबोवा म्हणतात, 'निरखोनी पाहतां डोळेभरी। ठाण दिसे हंसावरी। ब्रह्म-विणा शोभला करी। शुभ्रांबरीं मिरवत॥ सुहास्य वदन अतिसुदर। मुक्तालेणी अतिनागर। कुंद-पुष्पी शुभ्र हार। शुभ्र चीर तेजाळ॥ शुभ्र कंचुकी कुचमंडळी। मृगदळ रेखिला दिव्य भाळी। कर-कंकणे मुद्रिकावळी। दशांगुळी विराजे॥ कंठी साजरें कंठाभरण। कर्णी डोलती कर्णभूषण। अंगी मुक्तावळी सघन। सुवर्णसुमन नग नाना॥ चंद्रहारजडित पदक। हृदयीं शोभतें अलौकिक। वाजुबंद वाक्या देख। अतिसुरेख रत्नचुडे॥ सिंहकटिबंद साजिरा। जाळीपेटचा रुळे करा। शोभा तेणें पातली चिरा। मुक्ताकिनारा रत्नावळी॥ पदी रुळ तोडे पैंजण। अंगुळीया शोभती भूषण। झणत्कारती रुणझुण। आरक्त वर्ण पदतळें॥ साजिरें मातेचें मुखकमळ। नाकीं सुपानी मुक्ता फळ। बोलतां दंतांचा झळाळ। कंठ मंजूळ गायनी।' (१:७६-८३)

श्रीदत्तात्रेय या पांडुरंग हे तर अनंतसुत कावडीबोवांचे परम दैवत. त्याची अनेक मनोहर व प्रत्ययकारी रूपवर्णने श्रीदत्तप्रबोध ग्रंथात आलेली आहेत. 'ॐ नमोजी श्रीदत्ता । अविनाशरूपा समर्था । निर्विकारा मायातीता । दुःखहर्ता जगदात्मा ॥ नमो तूतें गा दिगंबरा । त्रिगुणात्मका दयासागरा । चिद्घना तू सर्वेश्वरा । सदय उदारा महामूर्ती ।। जयजयाजी महासिद्धा । विमल रूपा आनंदकंदा । चिद्विलासिया परमानंदा । भेदाभेदातीत तू ।। जय महामुनी योगिराया । षड्गुणसंपन्ना गुणालया । आनंदकंदा अभया । तुझिया पाया प्रणम्य ।। (२:१-४) या ओव्यातील नम्रता श्रीदत्ताच्या व्यापकत्वाबरोबरच प्रकट झालेली दिसते. ' जयजयाजी अवधूता । तूचि माझी मातापिता । तूचि समर्थ माझा दाता । बंधु चुलता सखा तू ।। तूच आप्त आणि स्वजन । तूचि माझें ऐश्वर्य निधान । तूचि माझें मदाकल्याण। पाळिता पूर्ण तूचि माझा ।। तूचि माझें कुळदैवत । परंपरेसी गुरुनाथ । मी बाळ तुझा अंकित । करी सनाथा अनाथा ।। मम अंतःकरणीचें गुज । तूं जाणसी महाराज । दीनजनाचें करणे काज । हे तो सहज तुम्हाते ।। ' (२.११-१४) यांसारख्या ओव्यातील अनन्यता, सद्भाव व फाफुळती खऱ्या भक्तिप्रेमाची निदर्शक मानावी लागेल.

नारदाने ब्रह्मा, विष्णू व महेश यांची भेट घेऊन सती अनसूयेच्या पातिव्रत्याची वाखाणणी केली. या तीनही देवाचे असेच मोठे मनोहर व गोचर वर्णन विठ्ठलबोवानी केले आहे. रमारमण विष्णूचे रेखाचित्र शब्दबद्ध करताना कवीने म्हटले आहे, 'श्याम चतुर्भुज मूर्ती । विशाल नेत्र कमळाकृती । भ्रकुटी सुनीळा विराजती । वक्रगती साजिऱ्या ।। भाळी मृगमद रेखिला । कवरीभार आकर्पिला । मस्तकी मुगुट तेजागळा । दीप्ति कुंडलां अनुपम ।। कोटी सूर्याचे उमाळे । त्याहूनि त्याचे तेज आगळें । कर्णद्वयीं झल्लाळे । वरी कुंतलें नीलालक ।। कटी शोभती मुक्ताहार । पदक मणिमय सुंदर । एका वेळी अतिनागर । जडित प्रकार वैडूर्य ॥ कौस्तुभ आणि वैजयंती । आपादलंबिनी शोभती । हृदयावरी विराजती । वत्सलांछन भृगुलत्ता ।। बाहुस्थानी भूषणें । भुजबंद पेट्या विलक्षणे । विरुदें शोभती करकंकणे । मुद्रिकालेणे कराग्री ।। करी शंख चक्र आणि गदा । धरी अरिमर्दनाच्या भेदा । पद्मकमळ त्या मुकुंदा । दासपदा रक्षावया ।। हृदय विशाल यज्ञपवीत । उदरतळी नाभी शोभत । जया कमळी जन्मत । विरंचीसुत हरीचा ।। ' (३.११०-१७)

श्रीकावडीबोवांचे निरीक्षण व निसर्गाचे वर्णन अनुभवास आणावयाचे असल्यास सिंहाद्रीवरील रमणीय वृक्षांचे व लतांचे वर्णन पाहा. 'शाल तमाल नारळी । जांब जांबूळ पोफळी । अंजीर उत्तोतीया जायफळी । केळी कर्दळीकंवख ।। निंबारे निंबनिंबोळिया । चांपे बकुळी खिरणिया । देवदार कृष्णागर मलिया । जाईजुई मोगरे ।। हिरडे बाहाळे रातांजन । आवळी ब्याहाडे अंजन । फणस पांगारे कांचन । वन सघन तोरणे ।। सिरस हिंगण धावडा । रुई मांदार केवडा । केतकी करंजी मेवडा । ताडमाड खर्जुरा ।। बाभळी यकान सेवरी । चिंच शमी आंबे वदरी । अश्वत्थ भेदले अंबरी । वट सविस्तरी वाढले ।।' (४.५१-५५) अशा विविध वृक्षानी व लतानी समृद्ध असणाऱ्या तपोवनात प्राणिजीवन कोणत्या प्रकारचे होते ? ग्रंथकारानी सांगितले आहे, ' साळुंघा शुक मयोरे । चकवे लाल तीतरे । भारद्वाज तास नकुळ फिरे । मांकडें वानरें रीस पै ।। घारी कावळे कोळसा । गृध्र ससाना डोवसा । कर्कोट पाडव सारसा । कोकिळा सुरसा बोलती ।। वक वदके हंस । कुकडी जळी करी वास । चक्रवीचे डोल समुतरे विशेष । पारवे सुरस घुमघुमती ।। चिमण्या टिटवी नीळकंठ । मयूर कुकडे परीट । नियुक पिंगळे कलकलाट । रजनी धीट

वाघुळा घुगु ।। पतग पाकोळ्या भ्रमर । शार्दूल कुकुट थोर । सायाळ विल्लविला अनिवार । मैना सुदर बोलती ।।' ( ४ ६५-६९ )

कथानकाच्या प्रसगास अनुसरून कावडी-बोवाची भाषा ओघवती, अर्थवती व प्रसादपूर्ण बनलेली दिसते पतिचरणाचे तीर्थ सती अनसूयाने तीन देवावर टाकताच ते तिन्ही देव बाळे झाले मग अनसूयाने त्या बाळाना न्हाऊमाखू घातले. स्वत च्या वस्त्राने त्याचे अग पुसले 'वेगी फुकिले कर्णीसी । स्नेहे भरोनि तालुकेसि ।' मातेने त्याना पाळण्यात निजविले पालखदोर हातात धरून सती अनसूया त्याना अगाई गीत गाऊ लागली

'गौरागा तू चतुर्मुखा । सृष्टिकर्ता श्रमसी देखा। निज निज बाळा घेई सुखा । हालवी पालखा जो जो म्हणे ।। श्यामागा तू चतुर्भुजा । अवतार घेवोनी पाळिसी प्रजा । शिणलासी निज गा अधोक्षजा । भक्तकाजा जो जो रे ।। स्मशानवासी दिगबरा । भस्मधूलित कर्पूरगौरा । निज गा बापा भूतसहारा । पचवक्त्रा जो जो रे ।। पद्मोद्भवा चतुरानना । वेदस्थापका ब्राह्मणा । सत्यलोकवासी सगुणा । कमलासना जो जो रे ।। कमललोचन कमलावरा । नवमेघरगा जगदातरा । शेषशयना गदाधरा । निज गा उदारा घे जो जो।। गगाधरा गौरिप्रिया । पन्नगभूषणा करुणालया । पशुपते तू कठनीलया । हर भवभया जो जो रे ।। नीज रजोगुणा पाकशासना । झोप घे तामसा मदन-दहना । डोळा लागो या सत्त्वगुणा । मधुसूदना जो जो रे ।।' ( ४ १२२-२८ )

बाल दत्ताच्या क्रीडा, त्याचा विद्याभ्यास, त्याचा उपनयनसस्कार इत्यादींचे वर्णन कावडी-बोवानी तन्मयतेने केले आहे 'ब्राह्मणभोजन सागोपाग । करोनि साधिला उत्तम प्रसग । आहेर देवोनी सवेग । तोषविले साग सर्वांसी ।।देवोनिया लुगडी लेणी । मानें सोयरे बोळवोनी । इतर कामिका पेटवणी । लाविले देवोनी सतोषें ।। ' (११ - ११३-१४) याप्रमाणे मुजीच्या विधीचा व्यावहारिक उपचारही त्यानी वर्णन केला आहे वटूला केला गेलेला उपदेशही मनोरजक व उद्बोधक असा आहे. 'नित्य असावे व्रतस्थ । वेदाचरणी असावे रत । दडकमडलु सयुक्त । सदा एकान्त निरामय ।। चित्ती असावे उदास । न धरावी विषयलोभी आस । सत्सगी रगावे मानस । भोग विलास त्यजावे ।। न करावे कदा दुर्भाषण । न द्यावा कवणाशी शीण । समदृष्टी समसमान । भूते सपूर्ण पाहावी ।। पादरक्षा ताबूल शय्या । अभ्यग वर्ज ब्रम्हचर्या । मातृवत लेखाव्या स्त्रिया । तपसी काया झिजवावी ।। नीचाची छाया पतन । रजस्वलाशब्ददर्शन । सत्कार सेवा मिष्टान्न । अग्राह्य जाण ये ठायी ।। त्रिकाळ स्नान सध्या करावी । शाती दृढ हृदयी असावी । इद्रिये अव-कर्मी रोधावी । वृत्ति शिरवावी ज्ञानगर्भी ।। ' (११ १२३-१२८)

यानतर बाराव्या तेराव्या अध्यायात दत्तात्रे-याच्या यात्रेचे वर्णन आले असून पुढील काही अध्यायात दत्तात्रेयानी अनसूयेस श्रेष्ठ प्रकारचा बोध केलेला दिसून येतो पचमहाभूतापासून सर्व सृष्टीच्या उत्पत्तीचा वृत्तात येथे आलेला आहे. 'आकारमात्री ब्रह्मदेव । उकारमात्री विष्णु स्वयमेव । मकारमात्रा तोचि शिव । गुणलाघव ऐक त्याचे ।। ब्रह्मयाचा असे रजोगुण । विष्णु सत्त्वगुणी प्रमाण । शिव तमोगुणी जाण । याहोनि भिन्न मूळ तत्त्व ।।' (२१ ६१-६२) अशा निर्गुणा-त्मक सृष्टीचे सविस्तर वर्णन केल्यानतर पचवीस तत्त्वाचे निरूपण बाविसाव्या अध्यायात आलेले आहे पुत्राचे हे तत्त्वनिरूपण ऐकून अनसूयामाता सतोषून उद्गारली 'आध्यात्मिक हा दिव्य रस । नेमिला व्हावया मज निर्दोष । तो प्रेमपात्री लावोनि सुखास । पाजुनी दु खास निवटिसी ।। दु ख निपटूनि सुख द्यावे । जन्ममरणापासोनि सोडवावे । अविनाशपदी मिळवावे । इच्छिले जीवे तुझिया ।। सदय उदार तू ब्रह्मचारी । कळवळा बहु तव मानसी । दीने करावी आपणाऐसी ।

सकळ जगतासी उद्धरावे ।। तू निरालंब निर्विकार। निष्कलंक निरहंकार । तू चिद्घन वस्तु सर्वेश्वर। निर्विकल्प निराधार निरंजन ।। तो तू गा साकार होसी । त्रिगुणात्मक अवतार दाविसी । हा जगदोद्धार करावयासी । प्रगट होसी पुनत्वे ।। त्या तूते गा वोळखिले । ज्ञानरहणीवरोनि जाणितले। कर्तृत्वशक्तीसे पाहिले। बोधी पावले आनंद मन।। तुजलागी पुन म्हणता । लाज उद्भवे माझिया चित्ता । तू भवतारक होसी दाता । निमित्त योग्यता मज देसी।।' (२२ १२०-२६) मातेच्या मुखातून निघालेली ही स्तुती ऐकून दत्तात्रेयानी बोधकर्तृत्वाचे सारे श्रेय आपल्या मातेसच देताना म्हटले, 'तव अवधूत म्हणे माउली । ऐसी काय बोलसी बोली । अद्भुत तव कृपेची नव्हाळी । देही प्रज्वाळिली ज्ञानज्योति ।। तुझिया कृपाबळे करून । मज प्राप्त जाले सर्व ज्ञान । ते तू बाळमुखें करून। करिसी श्रवण प्रीतीने ।।'(२२ १२७-१२८) यानंतर यदू, सहस्रार्जुन, परशुराम इत्यादींच्या कथासंदर्भात तत्त्वबोध करून षट्चक्राचे भेद, अजपेचे योग इत्यादी विषयाचे निरूपण आले आहे

पुढे छत्तीस ते पन्नास अध्यायापर्यंत मत्स्येन्द्रनाथ, गोरखनाथ, कानिफनाथ, भर्तृहरी इत्यादींच्या योगलीलाचे वर्णन व दत्तगोरक्षाच्या संवादाचे निरूपण असे विषय आले आहेत 'गिरिनाळपर्वतावर घडलेल्या या विचित्र लीलाचा व बोधकथाचा संग्रह ग्रंथकाराने ओघवती वाणीने केलेला आहे गिरिनारपर्वतावर योगीजनाच्या वेढ्यात दत्त अवधूत बसून नाना प्रकारचे तत्त्वनिरूपण करीत असल्याचे मोठे अद्भुत मनोहर दृश्य येथे दिसते 'जाले चमत्कार नयनी । अवलोकिले सर्व सिद्धानी । गेले अभिमान दग्ध होवोनी । गोरक्ष लोटागणी पै आला ।। काया जाली रोमांचित । अष्टभावे हृदय दाटत । पाझर प्रेमाचे फुटत । ते न सावरत काही केल्या ।। न धरत चालिले स्फुंदन । धरिले न सोडी चरण । मुखे वारवार म्हणे मी दीन । अपराधी पूर्ण तुमचा ।। तारी अथवा मारी । मी अनाथ पडलो तुमचे द्वारी । मज तारिता निर्धारी । ब्रह्मांडोदरी दुजा नसे ।। दीन शरणागताचा त्राता । स्वामी तूचि गा श्रीदत्ता । तूचि होसी भयवारिता । अभयदाता तूचि आम्हा ।। ' (४९ १५-१९) अशी अवस्था गोरक्षनाथासहित सर्व सिद्धाची झालेली होती मत्स्येंद्रनाथानी दत्तात्रेयाची स्तुती करताना म्हटले, 'तू सदय उदार संपन्न । अंगी वात्सल्य परिपूर्ण । उदार कृपाळू सर्वज्ञ । अनाथा पावन तू होसी। । श्रीस्वामी दत्तराया । तुझी सर्वाभूती सम दया । ऐसे असोनि गुणालया । भाविसी वाया का ऐसे । तू सकळाचा होसी नियंता । सत्वगुणें तूचि पाळिता । तमोगुणें तूचि हर्ता । सर्व सत्ता तुझीच की ।। सर्वात्मकी तुझा निवास । राहोनि हालविसी सूत्रास । खेळ वाढविला विशेष । मायाजाळास पसरोनी ।। चैतन्यपणें चेतवित । कर्मरूपे खेळ होत । त्या लीलेचा साक्षीभूत । तू समर्थ वेगळाची ।। ' (४९ २८-३२)

दत्त आणि गोरक्ष याच्या संवादातून अवधूत संप्रदायाचे सार आकारास आलेले दिसते हीनदीन, अपराधी वृत्तीने गोरक्षनाथ दत्तात्रेयाना शरण गेले व म्हणाले, 'अवधूता तू विश्वमाउली । क्षुधित वत्स प्रेमे न्याहाळी । तीपरी त्यातें ये वेळी । पुरवी आळी निजकृपे ।।' (४९-६३) इतके म्हणून 'तव नेत्रोदके करोन । गोरक्षें क्षाळिले दत्तचरण । भक्तिभावे जडले मन । मिलींद होवोनि राहिला ।। जाणोनि अविनाशे अंतर । कळवळले तेव्हा कृपासागर । मस्तकी ओपोनि अभयकर । हृदयी सत्वर आलिंगिला ।। बा रे श्रमलासी म्हणोन । स्वकरे कुरवाळिले वदन । साडी भीती जालासि पावन । देही अभिमान न धरावा ।। धरावी संतसाधूची संगती । विवेक विवरावा सदा चित्ती । अवनती पडो न द्यावी वृत्ती । स्वरूपस्थिती जागावे ।। विषयभोगी असावा त्याग । संगी त्यागिजे क्रोध माग । आत्म-

विचारणी करावा लाग । उन्मनीसग योगिया ।। कामनेपासोनि विरक्त । असावे सच्चिद्घनी अनुरक्त । मायिकापासोनि विभक्त । भजनी सक्त असावे ।। निंदा द्वेष वितर्क । नसावा कुसगसपर्क । भूआकाशा अलिप्त अर्क । ऐसेचि देख विचरावे ।। न पडावे कधी कवणे सोसी । लोभ मोहाते नासी । गुतू नये आशापाशी । फार हावसी पेटू नये ।। भार कवणासी न घालावा । कठोर शब्द न बोलावा । न कोण्हात शीण घावा । उपकार न ठेवावा कोणाचा ।। विरोध करावा न कवणासी । हा विचार पाहिजे मानसी । दते चाविता जिव्हेसी । ऐसियासी दड कवी ? ।। आत्मवत् पाहावी सर्व भूते । क्षमा, दया वरी शातीत । मग रिपुत्व उरे कैंचे तेथें । येती समते सम सर्व ।। न धरिजे लौकिक चाड । न घालावी कवणासी आड । भावार्थियाची कीजे जोड । वचने गोड बोलावी।। सद्गुरुचरणी असावी निष्ठा । प्रणाम करावे श्रेष्ठा । देही न धरावी गरिष्ठा । सोसावे कष्टा स्वदेही ।। पराते सेवोनि सुख द्यावे । शरणागतासि तारावे । शम दम अगी जिरवावे । उपकार करावे जालिया ।। परदोष नाणिजे वाणी । निंदा द्वेष नाणिजे मनी । कुष्ट न लाविजे कवणालागुनी । सत्कारकारणी फुगू नये ।। न मिरवावे थोरपण । मीतूपणाचे नाही कारण । व्हावे लहानाहोनि लहान । करावे वदन सर्वा भूती ।। अगी न धरावा ताठा । घालोनि न बैसावे गेठा। भाजवू नये व्यर्थ चव्हाटा । मार्ग खोटा न धरावा ।। अगी नसावा आळस । ऐक ठायी न कीजे वास । देवतीर्थक्षेत्री उल्लास । गमनी त्रास नसावा । सदा सत्सगे करोनी । इद्रियें नेमावी सत्कारणी । एकाग्रता धरावी ध्यानी । विकल्प मनी नाणावा ।। स्वहिती असावे सादर । न कीजे कवणाचा अनादर । प्राप्त काळ साहावे निरतर । भरावें उदर भिक्षाटणी।। ' (४९ ६४ ८३)

यानतर एकावनाव्या अध्यायापासून जनार्दन स्वामी, एकनाथ अशा अलीकडच्या काळातील सत्पुरुषाच्या कथाना प्रारभ झालेला आहे एकनाथाची गुरुसेवा, परचक्राच्या वेळेचे युद्धवदन, हिशोबातील चारकावा, एकनाथाना दत्तदर्शन, यात्रेची सफलता, एकनाथाचा गृहस्थाश्रम, श्रीखड्याची नाथसेवा, नाथाचे आळदीस आगमन, मनकर्णिकेच्या घाटावर एकादशस्कधाची टीका, श्रीपादलीलाकथन, चाग्या राण्याची कथा, दासोपताचे चरित्र, निंबराजकथा असे अनेक विषय सतकथाच्या स्वरूपात आलेले आहेत दत्तप्रबोधकार कावडीबावा पाडुरगभक्त असल्याने त्यानी या सतकथा मोठ्या प्रेमाने गाइल्या आहेत जनार्दनपताास कोणत्या दत्तरूपाची आवड होती हे सागताना ग्रथकार म्हणतात 'निगुणात्मक दिगबर । अजानबाहु षड्कर । निवदन विचित्र भव्य तो ।। त्रिशूळ डमरू विराजित । दड कमडलु शोभिवत । शख चक्र लखलखीत । तो मध्यस्थ घननीळ ।। स्फटिक रुद्राक्ष मुक्तामाला । कासे कौपीन वरी पिंवळा । अगी जडली दिव्य मेखळा । मुगुट मौळा सतेज तो ।। कर्णी कुडले डोल देती । बाहुभूषणे मिरवती । पदके हृदयी टाळ देती । प्रकाशविती भास्करा ।। मस्तकीहूनी कुरळ सुटले । तेजघनी येउनि पावले । जटाजूटार्थ वळिले । भस्में शोभिले भव्य रूप ।। तोडर शोभला चरणी । पदागुली विराजे भूषणी । पदी पादुका जडितमणी । धराकर्णी शोभत ।। भिक्षेस्तव सवे झोळीपात्र । द्वय कामधेनू पवित्र । उपवीत आणि कटिसूत्र । मुद्रिका स्वतत्र कराग्री ।।' (५१ १०० – १०६) अशी दत्तरूपाची अतीव सुदर व मनोहर वर्णने दत्तप्रबोध ग्रथात पदोपदी सापडतील

कावडीबोवाना सतसाधुबद्दल अपार प्रीती वाटत असल्याने सतस्तुतीचा प्रसग आल्यावर त्याचे अत करण भरून येताना दिसते कोणत्याही धर्मपथात गुरुपरपरेला अतिशय महत्त्व असल्याने गुरुमाहात्म्य अनेकदा वर्णन केले जाते दत्तप्रबोध

ग्रंथातही गुरुमहिमा अनेकदा वर्णन केलेला आहे एकनाथांनी गुरूची म्हणजे जनार्दनस्वामींची सेवा किती तन्मयतेने केली याचे वर्णन करताना कावडी-बोवांनी लिहिले आहे- 'प्रभातकाळी उठोन। करावे सदनी समार्जन। उष्णोदक सिद्ध करोन। ठेवी आणोन प्रक्षाळणी।। शौचस्थळ पाटव्य करीत। रंगमाळावरी घाल्ति। सुवासिक द्रव्यें तेथें ठेवित। उदकपूरित पात्र ठेवी ।। हस्त-पाद-मुख प्रक्षाळ-नासी। आसन मृत्तिका दे उदकासी। वस्तु दंत-धावनासी। लागे तैशी देतसे ।। करें करोनि पाद क्षाळी। वस्त्रें पुसोनी वंदी भाळीं। स्नान करोनि उतावेळी। सारी गंगाळी उष्णोदक ।। होताचि सद्‌गुरूचें स्नान। त्वरें मांडी सध्यापात्र आसन। उत्तरी वस्त्रा वेगी पिळोन। निर्मळ पुसोन अंग काढी ।। पादुका पदी लेववीत। वस्त्र धारणेसी करी देत। पूजाद्रव्य सिद्ध करीत। उपकरण शोभिवत अर्चनी ।। होता सध्यावंदन तर्पण। आराध्य पुढें ठेवी मांडोन। सद्‌गुरु करिता पूजन। साहित्य आणोन दे पुढें।। धूप दीप होता अर्पित। नैवेद्य घेवोनि त्वरें येत। जोंवरी तेथें अर्चन होत। तोंवरी तिष्ठत बद्धांजुळी ।। पूजा ध्यान पठण। हे होताचि परिपूर्ण। पूर्ववत ठेवी सर्व आवरोन। पादुका पुसोन पुढें ठेवी ।। पादुका जंव स्वामी लेती। तंव पाकशाळे प्रवेश निगुती। पाट मांडोनि सत्वर गती। पात्र प्रीती विस्तारी ।। अन्नें समर्पिता भोजन। करू बैसती त्वरें करोन। आपण मक्षिका करी निवारण। उदकपान देतसे ।। तृप्त होता भोजनरुची। त्वरा करी उष्णोदकाची। मुख कर प्रक्षाळण होता त्याची। आचमनाची सिद्धता ।। आचमनें होता पवित्र। मुखशुध्दचर्थ अर्पी तुळसीपत्र। वेगीं काढी उच्छिष्टपात्र। भूमि सर्वत्र सुद्ध करी ।। शत पाउलें जंव होत। तंव तांबूल आणोनि समर्पित। पीकपात्र पुढें ठेवीत। सद्‌गुरुनाथ पाहती ।। कृपे द्रवोनि आज्ञा देती। जाय प्रसाद सेवी निगुती। येरें नमोनि पदाप्रती। त्वरित गती पै गेला ।। परम प्रीती करोन। शेष प्रसाद केला सेवन। परी लक्ष वेधलें सवेंलागोन। त्वरें सन्निधान पावला ।। शयनार्थ शय्या सिद्ध केली। वरी सद्‌गुरुमूर्ति पहुडली। चरणसेवा आरंभिली। भाळीं वंदिली चरणतळें ।। निद्रा लागता नयनी। आपण बैसे विद्यापठणी। लिपिका सिध्दचर्थ लेखनी। लक्ष लावोनी बैसत ।। परी सर्वदा सन्निधान। साचोल दृष्टी ओळखोन। आज्ञान्वयें कार्यकारण। सावधान करी सेवा ।। निद्रा सरता उदक। आणोनि ठेवी सम्यक। वदन करावया तिलक। तांबूल आवश्यक त्यावरी ।। सगावस्त्रें आणोनि देत। कचेरी जाता मवे वागत। मुत्सद्दीसवे लिहीत। परी चित्त आणीकडे ।। सभेमाजी सद्‌गुरूसी। मागता तांबूल दे वेगेंसी। समीप ठेवी पीकपात्रासी। लागल्या आश्रासी पुरवीत ।। होताचि सभा विसर्जन। सद्‌गुरु उठता साडोनि आसन। पादुका पुढें ठेवी पुसोन। करी वदन क्षणक्षणा ।। देवदर्शनालागीं जाती। आपण वाचे त्या सगती। कथाकीर्तन पुराणें होती। जाणें निगुती तत्कामें। भलकामी सद्‌गुरु बैसता। आपण सन्मुख राहे तिष्ठता। रामापुढें वातसुता। शोभा पाहता तैशीच ।। एवं होता अस्तमान। सद्‌गुरु आश्रमी करिती गमन। तंव शौचकूपी पात्र ठेवून। पादुका सरसावोन उभाची ।। सभा-वस्त्रें उतरिता। त्वरें घेवोनि होय ठेविता। पद क्षाळणी उष्णोदक देता। पद क्षाळिता आपणचि ।। आपण करोनिया स्नान। उदक दे स्नानालागोन। वस्त्र करावया परिधान। पादुकाधारण करवीत ।। सध्यावंदनादि पात्रें। पूजासाहित्य स्वतंत्रें। अर्चन सारिता पवित्रें। मांडिली पानें प्रसादा ।। पूजा-पात्र आवरोन। सद्‌गुरुसन्निध उभा राहोन। भोजनी करवी उदकपान। चंचल मन होऊं नेदी ।। भोजन सरता तात्काळ। करमुख प्रक्षाळनी उष्ण जळ। वस्त्र दे पुसावया करमुखकमळ। तुळसीदळ अर्पित ।। सवेंचि तांबूल अर्पित। प्रसादालागी आपण जात। सत्वर आटपोनि काजें येत। सिद्ध करीत शय्येतें ।। सद्‌गुरु निवात स्थानीं

जाती । ध्यानी निमग्न तेथें होती । आपण रक्षी द्वाराप्रती । आठवी चित्ती सद्‌गुरुपदा ॥ होतांचि ध्यान विसर्जन । बाहेर येता करी नमन । आश्रमा येती परतोन । करिती शयन मचकी ॥ चरण-सेवेसी एकनाथ । सप्रेम भावे विनटत । निद्रा लागतां निश्चित । पाना ठेवीत उदक उशा ॥ जिकडे स्वामीचे चरण । आपण निजे त्या सन्निधान । निद्रा करी सावधान । हाकारी जोडून कर उभा ॥' (५१ : २०५-२४०) एकनाथानी केलेल्या गुरुसेवेचे हे वर्णन वाचताना ज्ञानेश्वरानी 'आचार्योपासनम्' वर केलेले भाष्य ध्यानात येते. एकनाथाना एका सद्‌गुरुनाथा-शिवाय दुसरे काही सुचेनाच. 'सेवें पडों नेदी अतराय । झिजवी दिनरात्र स्वकाय । सोडोनि कोठें कधी न जाय । न विसंबे पाय श्रीगुरुचे ॥ आसनी शयनी भोजनी । काया मन प्राण गुरु-चरणी । वाचा रंगली सदृढ भजनी । सावध साधनी या पंथें ॥ जागृती स्वप्न सुषुप्तीत । अवधाचि भजे सद्‌गुरुनाथ । विषयपदार्थी विरक्त । सर्व अवलोकित गुरुरूप ॥ गुरु माता गुरु पिता । गुरु पितृव्य भ्राता । गुरु गणगोत आप्तता । देव-देवता गुरु माझा ॥ गुरु सोयरा सज्जन । गुरु गणगोत संपत्ति धन । गुरु माझें यश कल्याण । गुरु प्राण स्वामी माझा ॥ सर्व माझे गुरुराय । तारक मातें सद्‌गुरुपाय । मज पाळिता तोचि होय । सर्व उपाय जाणता ॥' (५३ : २२-२७)

एकनाथांनी केलेली गुरुसेवा सफल झाली. जनार्दनस्वामीच्या कृपेने नाथांना मलंगवेशात दत्तदर्शन झाले. या दत्ताचे रूप कसे होते? 'फवरी सुले टोप शिरीं । गळयां कफनी लुंगी परी । सयली कटोरा शोभे करी । कक्षेभीनरी झोळी फुंचा ॥ खादें फावडी करी टेका । अंगी गोदडी पदी पादुका । वस्तावंद नेटका । डोळ उदक्षा गुनी मर्वे ॥ नेत्र आरक्त विशाळ । कृष्ण श्वेत अंगी कुरळ । कांती अवाढव्य विशाळ । वर्ण तेजाळ उग्र तो ॥' (५३ : ३८-४०). यानंतर नाथांना सद्‌गुरूंनी उपदेश केला. नाथांनी तपश्चर्या केली. ध्यानधारणेचा अभ्यास वाढवला. या ध्यानप्रसंगी झालेला चमत्कारही कावडीबोवांनी वर्णन केला आहे. 'एकनाथ ध्यानी निमग्न । देखोनि धावे महाफण । स्वशरिराचें नाथा वेष्टन । फड पसरोन छाया शिरी । नाथ सावधान होतां । उरग होय तेथोनि जाता । परी ते न कळे एकनाथा । दिवस लोटतां बहु गेले ॥ तंव दुग्ध घेवोनि प्रभात-काळी । एके दिनी कृषी पावला जवळी । तंव नाथ वेष्टिले व्याळी । येरें आरोळी मारिली । संकट देखोनी अद्‌भुत। कृषी करिता जाला आकांत। महाशब्दातें करीत ॥ फण न हालत कांही केल्या । ध्यानाचें होतां विसर्जन । उरग गेला तेथोन । एकनाथ जाले सावधान । कृषिये नमन पैं केलें ॥' (५३ : २७८-२८२)

यानंतर कावडीबोवांनी एकनाथांच्या चरित्रा-तील अनेक कथांचे सरसतेने वर्णन केले आहे. प्रपंच आणि परमार्थ यांचे रहस्य एकनाथांनी कसे जाणले याचे मोठे मनोहर दर्शन ग्रंथकाराने घडविले आहे. एकनाथाची वृत्ती पुढे पंढरपुरात विठ्ठलचरणी रंगली. स्वतः कावडीबोवा पांडु-रंगाचे भक्त. दत्त व विठ्ठल यांत अभेद मानणारे. एकनाथांचा सत्संग व पांडुरंगाचे प्रेम पाहून ग्रंथकार भुलून न जाते तरच आश्चर्य. जेवढी दत्ताबद्दल त्यांना प्रीती तेवढीच पंढरीच्या विठ्ठला-बद्दल भक्ती. 'तें भूवैकुंठ पंढरपूर । असे साधु-संतांचें माहेर । शरणागताचा सोयरा सर्वेश्वर। उभा विटेवरी समचरणीं ॥ कर ठेवोनिया कटीं । आल्या गेल्या देतो भेटी । सदा सर्वदा कृपादृष्टीं । पाहे जगजेठी भक्तांतें ॥ वामबाही भीमकन्यका । सह शोभती अष्टनायका । सन्मुख गरुड मारुती देखा । लक्षीनि पादुका तिष्ठती ॥ तो महाद्वाराचा मंडप विस्तीर्ण । भजनानंदी साधुसज्जन । मध्यद्वार उल्लंघोन । राउळें संपूर्ण त्यामाजी ॥ मध्य मंडपा-माझारी । जयविजय शोभती द्वारीं । समीप मंडपांतरी । दिव्य साजरी रंगशिळा । सन्निध

असे दक्षिणद्वार । होती भजनाचे गजर । मंडपी दर्शनासि दाटी फार । सावळा समोर उभा तो ॥ मध्यस्थ अल्प गाभारा । तेथे दाटणीचा उबारा । पैल जाता पैस खरा । पै आडवी सुंदरा लाट ते ॥ तीते जाता ओलांडून । भव्य शोभे सिंहासन । विटेवरी जगन्मोहन । होय आलिंगन सर्वांते ॥धन्य तोचि भाग्यवंत । वारी पंढरीची साधित । त्याचे पदी व्हावे नत । जेणे पंढरीनाथ पाहिला ॥ सन्मुख वाहे भीमरथी । दक्षिणवाहिनी तटे शोभती । माजी पुंडलीक मुनी वसती । संत गर्जती नामघोषे ॥ चंद्रभाग वाळवंटी । चहूकडे यात्रेची दाटी । एकमेका होती भेटी । चरणी मिठी घाल्ती ॥ दिंड्या पताका चहूकडे । साधुसंत गर्जती पवाडे । भजनी प्रेमा सर्वा जडे । वाडेंकोडें नाचती ॥ प्रदक्षिणेलागी जाता । आनंद उपजे क्षेत्र पाहता । अन्य वासना नुपजे चित्ता । निर्विकल्पता प्राप्त होय ॥ पुष्पावतीचे पैलतीरी । कालाप्रसाद गोपाळपुरी । गोपाळाचे भारी । खेळे हरी ठाव तो ॥ उभे केले गोवृंद । खडकी उमटले पद । तेथें सारिजे प्रसाद । आवडी गोविंद वाट पाहे ॥' (५४ १९-३३)

दत्तसांप्रदायिकाच्या परंपरेत 'दत्तप्रबोध' हा एक ग्रंथ असा आहे की, त्यात संतमाहात्म्य व दत्तविठ्ठलऐक्य याचे मनोज्ञ दर्शन घडते 'दत्त दयाळ उदार । निजकृपे करी जगदोद्धार । उभा पुंडलिकासमोर । दिगंबर समपदी ॥ चंद्रभागा दक्षिणवाहिनी । पंढरीक्षेत्री पुंडलीक मुनी । अविनाश तया सन्निधानी । तिलक रेखोनी अद्यापी ॥ तो परमात्मा जगद्गुरु । दत्त अविनाश दिगंबरु । जनार्दन पतासी अभयकरु । हे दातारू निजकृपें ॥'(६१ ९८-१००) अशी निष्ठा सर्वत्र ग्रंथात प्रत्ययास येते जे प्रेम पांडुरंगाविषयी तेच दत्ताविषयी आहे दत्त-पांडुरंग नावे भिन्न, पण तत्त्व एकच असा बोध या ग्रंथाचा आहे दत्त व दत्तकथा याचे स्तुतिगानही अनेक ठिकाणी आले आहे 'ही दत्तकथा परम गोड । ऐकिली ऐकावया चाड । उपजली पुरवी आवड । घेऊ सुरवाड तेथीची ॥ जेंवी वर्षता घनधारा । आनंद उपजे चातकमयूरा । तृप्त होतसे तेणे धरा । सकलांतरा संतोष ॥ तेंवी दत्त वोळला दयाघन । तव मुखे वृष्टी गोड कथन । भाविक प्रेमळ मुमुक्षुजन । चातक पूर्ण मयूर हे ॥ श्रवणानंदें नाचती । संतसाधु उल्हासती । श्रवणी रसा साठविती । सर्वांगी होती तृप्त येणे ॥ श्रवणे तृप्त करी क्षुधित । सेविलेचि सेवावे वाटत । अवीट हे गोड कथामृत । स्वीकारू निश्चित तव मुखे ॥ व्यासोक्ति हें पुराण । शुकमुखे गोड गहन । द्वितीय अनुभव अमृतफळा जाण । गोड पूर्ण शुकमुखें ॥ तेवी अनेक ग्रंथी दत्तकथा । त्या दत्तप्रबोधी होसी वोगरिता । तव मुखे ती श्रवण करिता । गोडी समस्ता आगळी ॥ धेनू असे भरल्या रसी । परी ते द्रवे मोहें वत्सासी । मग तो प्राप्त सकळासी । तुष्टिपुष्टीसी कारण ॥ कासेसी वत्स न लागता । येर स्पर्शनी मारी लाता । सायासे रस काढिता । नोव्हे निपजता चोरी ते ॥ वत्साचेचि लागता झटे । मग धेनूसी पान्हा फुटे । रस अधिकाचे सुटे । भरती पोटे येराची ॥ तैसी हे दत्तमाऊली । तुज अनन्यासीच पान्हावली । तव मुखे आम्हा दुभली । अद्भुत नव्हाळी रसाची ॥ (५१ ३६-४६)' अशी मनोधारणा ग्रंथात पदोपदी दिसून येते

दत्तभक्ताना तृप्ती देणारा हा दत्तप्रबोध ग्रंथ भक्तिरसाने परिपुष्ट झाला आहे ग्रंथाची फलश्रुती सागताना म्हटले आहे, 'ग्रंथ निरोपणी आधार । नाना समताचे विचार । अवधूतकृपेचे उद्‌गार । वदविता निर्धार दत्तची ॥ दत्त सदय दाता जाण । करावया मनोरथ पूर्ण । ग्रंथरूपे प्रगट आपण । सदा सुप्रसन्न भाविका ॥ ज्यासी दत्तभक्तीची आवडी । त्यासीच या ग्रंथी उपजे गोडी । तोचि जोडील येथीची जोडी । येर कवाडी काय जाणे ? ॥ ज्या दत्तमूर्तीचे ध्यान । दत्त-उपासना ज्या लागोन । तेचि या ग्रंथी घालिती

मन ॥ ग्रंथ संग्रहोन वाचती नेमें ॥ जैसा लोभी जपे धनासी । तैसें जपावें या ग्रंथासी । प्रेमें सांठवीजे मानसी । आणि भाविकासी बोधिजे ॥ होय अज्ञानाचें निरसन । सकृपे दत्त देईल ज्ञान । याचें औदुंबरी पठण । शुचिष्मंत पूर्ण असोनि ॥ करावया जगदोद्धार । ग्रंथरूपे प्रकटला दिगंबर । श्रवणपठणीं जो सादर । तया कृपाकर पावेल ॥' (६१:२२३-२९)

या संपूर्ण ग्रंथाचा कर्ता वदविता दत्तप्रभूच असल्याची खात्री ग्रंथकारास आहे. 'श्रीमद्दत्तकृपेकरोन । एकसष्ट अध्याय जाले निरोपण । रहस्य जाणती संत सज्ञान । वदविता पूर्ण दत्त येथें ॥ सदय उदार हा अविनाश । जाणें अनन्याचें मानस । निष्ठा देखोनि विशेष । पुरवी आस तयाची ॥ येथें संशय न धरिजे चित्ता । अनुभवयुक्त असती कथा । प्रेमभावें अनुसरतां । पुरवी मनोरथां दासाच्या ॥....श्रीमद्दत्तकृपा-प्रसादें करोन । बोबडया शब्दें जालें निरोपण । तुम्ही संतसाधु दयाघन । गोड करून घेईजे ॥' (६१:२८१-९२) श्रीगुरू दत्तात्रेयांच्या कृपेने जे वरदान जनार्दनस्वामीच्या प्रार्थनेमुळे एकनाथास लाभले तेंच मानवजातीस उपकारक ठरले. त्या वरदानाचा सारांश असा, 'दत्त कृपेचा सागर । मस्तकी ठेवी अभयकर । प्रसन्न होवोनी देतसे वर । तें सादर परिसावें ॥ भक्ति ज्ञान वैराग्य पाहीं । मूर्तीमंत नांदो याचे देहीं । निष्ठाभाव प्रेमप्रवाहीं । सर्वदाही राहो हा ॥ शांती क्षमा दया विरक्ती । वाढो घडो सत्संगति । अद्वय अभेद सर्वाभूतीं । राहो स्थिति समसाम्य ॥ विकार विकृति न बाधो यासी । रस उपजेल वाचेसी । प्रसन्न होईल हृषीकेशी । मनोरथासी पुरवील ॥' (५३:६३-६६) दत्त-माउलीकडून एकनाथांना मिळालेले कृपेचे हे वरदान दत्तप्रबोध ग्रंथाच्या रूपाने सर्व भक्तांना सुलभ व सोपे झाले आहे.

# श्रीगुरुलीलामृत

(श्रीमद्दत्तावतारी अक्कलकोट स्वामीमहाराजांचे चरित्र: ब्रह्मनिष्ठ वामनरावजी वैद्यकृत)

ब्रह्मनिष्ठ कै. वामन रावजी वैद्य यांनी शके १८२३ मध्ये लिहिलेले 'श्रीगुरुलीलामृत' दत्त-भक्ताच्या परिवारात अतिशय प्रसिद्ध आहे. ग्रंथाचे एकूण पंचावन अध्याय असून ओव्यांची संख्या ९७५७ आहे. श्रीगुरुचरित्राप्रमाणेच याही ग्रंथाची पारायणे महाराष्ट्रात अनेक ठिकाणी होतात. पोथीमध्ये सप्ताह-पारायणाचे अध्यायांनुसार वाचन कसे करावे आणि सप्ताहपारायणविधी कशा प्रकारचा असावा यासंबंधी मार्गदर्शन आहे. या पंचावन अध्यायांतील 'ज्ञानामृतपान' केल्यानंतर मुमुक्षुजनांना परमार्थसुख तर मिळेलच, परंतु इतर भौतिक लाभही होतील अशी ग्रंथाची फलश्रुती आहे. 'ही पंचावन अध्यायमयी रत्नमालिका । मुमुक्षुकंठीं विलसो देखा । तेणें पावती परमार्थसुखा । सत्य सत्य त्रिवाचा ॥' (५५.४२८) असे निर्धाराचे वचन आहे. या ग्रंथाच्या पारायणाचा भौतिक लाभ सांगताना ग्रंथकाराने म्हटले आहे, 'या ग्रंथाचें करितां सप्ताह पारायण । जन्मांतरीचे दोष होती निरसन । ब्रह्महत्या गोहत्यादि पापें संपूर्ण । पठण-मात्रें दग्ध होतीं ॥ भूतप्रेत-समंधबाधा । नाना रोगादि आपदा । बाधूं न शकती लेशही कदा । या ग्रंथपठणेंकरूनि ॥ धनार्थीयांसि धन पुत्रार्थीयांसि पुत्ररत्न । अनेक कामना होती पूर्ण । ग्रंथ-पठणें निश्चित ॥ शतावर्तनें करी जो नर । तयासि होय आत्मसाक्षात्कार । अंतीं कैवल्यपद साचार । पावे तो नर निश्चयें' ॥ (५५:४२९–३२) रोज एक अध्याय तरी वाचावा असा ग्रंथकर्त्याचा आदेश आहे.

शके १८२३ मध्ये ब्रह्मनिष्ठ वामनबोवांचे निर्याण झाल्यानंतर त्यांच्याच आज्ञेनुसार 'एकनाथ

सम्प्रदायी किंकर । नामें विनायक सदाशिव लिमगावकर ' याने ग्रंथाचा उपसहार लिहिला, मुद्रणसेवाही केली श्रीगुरुलीलामृत ग्रंथात प्रामुख्याने दत्तावतारी अक्कलकोट स्वामींचे चरित्र असले तरी प्रारंभीच्या काही अध्यायात दत्त-चरित्राचे निरूपण आलेले आहे मगलाचरण, गणेश-सरस्वती, कुलदेवी, देवगण, महर्षी, योगी, सत, सद्गुरू इत्यादींना नेहमीप्रमाणे प्रथमाध्यायात वदन आहे त्यानतर वामनबोवानी स्वत सबधी माहिती दिलेली आहे दुसऱ्या अध्यायात आदिनारायणापासून गुरुपीठिका सांगितली असून श्रीदत्तात्रेयाच्या जन्मकथेचा वृत्तान्त निवेदन केला आहे तिसऱ्या अध्यायात परमेश्वराचे बावीस अवतार, चतुर्दश लोक, चौऱ्याशीलक्ष योनिविवरण, मानवपशुपक्ष्यादिकाचे आयुप्रमाण, चतुर्युगाची उत्पत्ती इत्यादींचे वर्णन आले असून चौथ्यात ' हिमालयी श्रीस्वामिराज दत्त। सचरता चीन देशींची स्त्रीपुरुषें चेष्टायुक्त । निंदूनि यतिराया काम्यक्रीडेयुक्त । होता चमत्कार दाविला '॥ पाचव्या अध्यायात जयत्या, एकादशी-पौर्णिमा-निर्णय, पर्वनिर्णय, द्वादशादित्य, अष्टवसू, जगदवावतार, सप्तर्षी इत्यादींची माहिती आलेली आहे सहाव्यात लावणीबुवाचे आख्यान, सातव्यात हिमालय गुहेत तपस्व्यास ज्ञानामृतकथन व आठव्यात हरिद्वारच्या दोन मल्लाची कथा, असे विषय आले आहेत पुढे सोळाव्या अध्यायापर्यंत स्वामीमहाराज अक्कलकोटी निवास करीपर्यंतच्या लीला आल्या आहेत भुऱ्यावुवाना दत्तदर्शन, वामनबोवाना गुरुलीलामृत ग्रंथलेखनास प्रेरणा, स्वामींचे गिरिनारपर्वती वास्तव्य, पागळच्या गणेशपुरी सतास अव्यगत्याचे दान, रामदास, सेवादास, कृष्णदास याना दत्तदर्शन, पचज्ञानेंद्रियाचे विषय, राजुरमठीचा वृत्तान्त इत्यादी कथाभाग येथपर्यंत वर्णन केलेला आहे

यानतर स्वामीमहाराजाच्या अक्कलकोट-निवासाचा भाग सुरू झाला आहे लालभारतीस ज्ञानोपदेश, दाजी पिराजी भोसल्यास मुंबईस दर्शन, नागनळी दुधनीचा वृत्तान्त, गौडगावी मृत वृषभास जीवदान, लोहारगावच्या बापू कुलकरण्याची कठछिद्रव्यथानिर्मूलन, मगळवेढ्यातील कापशीकराच्या आटलेल्या धेनूप्रत दुग्धदोहन, शूद्र स्त्री जनाबाईचे वृत्त, बाबाजी भटजीचे घरी कूप-चमत्कार, एका क्षत्रियास साधुत्वाची प्राप्ती, मृत श्वानास सजीवन, चद्रभागेच्या महापुरावरून यतिनाथाचे चालत जाणे, मोहोळ गावच्या गृहस्थपुत्रास प्राणदान, पिंडब्रह्मांडविवरण, सोलापुरी सुदरावमदिराचे वृत्तकथन, सिद्धेश्वरतटी लघुशका, दुसऱ्या दिवशी भरपूर पर्जन्यवृष्टी, मुकुद मौनीबुवाचे आख्यान, यवन रिसालदार चौल द्विजवृत्त इत्यादी कथा वामनबोवानी रसाळपणाने वर्णन केल्या आहेत विसाव्या अध्यायात अक्कलकोट-भूपतीची वशावली व तेथील तीर्थमाहात्म्य हे विषय आले आहेत यानतर गुरुमहत्त्व, माणिक प्रभूचे चरित्र, चिदवर दीक्षिताचे आख्यान, वेदान्तविज्ञानाचे निरूपण, प्रारब्ध प्रयत्न-विवरण, भुडी गोसाची गिरी पुरी भारती याची गर्वनिवृत्ती, आळंदीचे स्वामी नृसिंह सरस्वती याचे चरित्र, देव मामलेदार, बाबा घोलप, विष्णुबुवा ब्रह्मचारी, काळबुवा इत्यादींच्या चरित्रकथा, सय्यद यवन, इचलकरंजीकर ब्राह्मण श्रीपादभट, काशीकर बहिरेशास्त्री, पैठणकर नथुराव विदुर, हैद्राबादचे शकरराय राजे, गोविंदभट जोशी, तैलगद्विज आणि माधवाचार्य, जमनाबाई महाराणी, सुंदरी वानरी, विठ्ठल तिगुंळे आणि ठाकुरदासबुवा, त्रिविक्रम यती, रामाचार्य, लालासाहेब, मुंबईकर भाऊ रसूल भक्त, महारुद्रराव देशपांडे, श्रीमद्-त्तावधूत निरजन, गणपतराव हुकिरे, तेरढोकीचा वाळाप्पा ब्राह्मण, मुंबईकर हरिभाऊ भक्त, बळवत भेंडे, गुरुसिद्धप्पा, नदराम सुदरजी,

आप्पासाहेब हसबनीस, मोरोपंत बापट, गोविंदपंत कुळकरणी, लक्ष्मण कोळी, मारवाडी भक्त, नर्मदातीरीचे ब्रह्मानंद साधू, हैद्राबादकर विठ्ठल जमादार, केसेगावकर अप्पा पाटील, कोल्हापूरच्या राजपत्नी काशीबाई, बडोद्याच्या किल्लेदार पत्नी बावई, अबदुलपूरचे देशपांडे जहागिरदार, तात्यासाहेब सांगलीकर, दादासाहेब विंचुरकर, वामन राजाराम घोलप पुणेकर, कल्याणपुरचे मोरेश्वर हरी नागर चोळाप्पा, मल्लिकार्जुन जंगम कीर्तनकार, पांडुरंग सोनार, जुन्नरची शूद्र स्त्री सकूबाई, लखतरची गंगाबाई, मळदुर्ग तालुकदार बैरामजी, तान्ही गणिका, मालोजी भूप, विठ्ठलराव टिकोजी, बसाप्पा तेली; अशा विविध क्षेत्रातील स्त्री-पुरुषांना स्वामी महाराजाचा जो अनुभव आला त्याच्या अद्भुत कथा ग्रंथकाराने वर्णन केल्या आहेत.

दत्तावतारी स्वामींनी या सर्व अद्भुत लीला जगताच्या कल्याणासाठी केल्या असा ग्रंथकर्त्याचा विश्वास आहे. स्वामी म्हणजे 'चालता बोलता सुखदाता देव' असल्याने त्यांचे चरित्रगान व त्यांच्या समाधीचे दर्शन दत्तभक्तांना अतिशय प्रिय आहे. श्रीगुरुलीलामृतकारांनी म्हटले आहे, 'समाधीचें दर्शन पूजन अर्चन। प्रेमे करिती जे सेवन। त्या सर्वांचे मनोरथ सिद्ध होऊन। होती पावन नि.सशयें॥ स्वामी समर्थांच्या समाधीसमोर। जे पुराण कीर्तन गाती सुखकर। प्रदक्षिणा स्तोत्रें नमस्कार। सप्ताह पारायण करिती विध्युक्त जे॥ समाधीवर दत्तचरणांवरीं। पुरुषसूक्त रुद्राभिषेक प्रेमभरी। लघुरुद्र महारुद्रादि वेदमंत्री। करिती ते सर्व भोगिती सुख इहपर॥ दत्तात्रेय-चरणारविंदा संनिध। वेदघोष वेदपारायण भक्तियुक्त शुद्ध। करिती तयांचे मनोरथ सिद्ध। अवश्य होती निश्चयात्मक॥ त्या समाधिस्थानाच्या सेवनेंकरून। भूत प्रेत पिशाच्चादि होती सर्व बाधा प्रशमन। कुष्टरोग महारोगादि व्याधि संपूर्ण। होती निरसन सत्य सत्य॥ विद्यार्थीयांसि विद्याप्राप्ति। धनार्थीयांसि धनलाभ निश्चिती। पुत्रार्थीयांसि पुत्रफले लाधती। दत्तचरणपादुका सेवनानें॥' (५५:२५४-५९)

वामनबुवांवर स्वामी समर्थांची पूर्ण कृपादृष्टी असल्यामुळेच त्यांना या ग्रंथाची सिद्धता करता आली. श्रीदत्तात्रेयांचा अनुग्रहही या वैद्य घराण्यास होता. 'आमचा प्रियभक्त तिसरा पुत्र। गुरुसंप्रदाय-प्रवर्तक अहोरात्र। ज्ञानविज्ञानसंपन्न नित्य पवित्र। केवल विरक्त होईल॥ सद्धर्मी निरत सदाचारी। सत्यप्रिय मधुर निर्मळ वैखरी। दास आमचा जनहितकारी। निर्विकारी निःस्पृह॥ तो आमचे गुणानुवादलीला। ग्रथित करील जगद्धिताला। नि.संशय ह्या आशीर्वचनाला। सत्य सत्य जाणावें॥' (११:१३३–३५) असा आशीर्वाद अनसूयानंदनाने रावजी वैद्यांना दिलेला होता. या आशीर्वादानुसार या ग्रंथाचे लेखन झाले आहे. यात अनेक चमत्कारिक लीला वर्णन केलेल्या असल्या तरी त्यांत असत्याचा अंशही नाही असे ग्रंथकार म्हणतात. 'हें नाहीं नाही स्वकपोलकल्पित। वेदशास्त्रपुराणार्थ रहस्य मथित। हृदयस्थ परमात्मा दत्तावधूत। त्यांचे तेचि वदविती सर्व॥ तच्चरणदास मी ब्रह्मनिष्ठ वामन। नाही नोहे किंचित् देखील कारण। सर्वांतर्यामी नियंते व्यापक पूर्ण। दत्तात्रेय स्वामी वदविती स्वलीला॥ त्यांचें कृपावरदान होऊनि फलित। ह्या श्रेष्ठ ग्रंथ गुरुलीलामृत। पंचावन अध्यायपर्यंत होऊनि ग्रथित। संपूर्ण येथे जाहला॥' (५५:२७४–७६) अशी कृतज्ञतेची भाषा वामन बोवानी वापरलेली आहे. 'लीलामृतश्रवणें निर्वंध। पिशाच्चभूतादि संबंध। नष्ट होती अनेक बंध। दुरित निरोध ग्रंथपठणें॥ जैसा करतलामलक। अनुभव स्पष्ट सम्यक्। तैशीं प्राप्त सौख्यें अनेक। एकनिष्ठें अवलोका॥' (१४:१३५–३६) एवढा आत्मविश्वास दत्तकृपा व स्वामी समर्थांचा अनुग्रह यांमुळे ग्रंथकारास

वाटतो. 'गुरुलीलामृता नित्य वारंवार। श्रवणद्वारें व्हावा संचार। तेणेंचि अंतर्यामी आत्मा गुरुवर। ओळखिला जाईल सत्यत्वें॥ तरीच नरजन्माचें सार्थक। होईल निःशंक निश्चयात्मक। म्हणून लीलामृत भवतारक। मोक्षदायक प्राशावें॥' (१५:२–३) असे ग्रंथमाहात्म्य वारंवार सांगितले गेले आहे.

'श्रीगुरुलीलामृत'कर्ते ब्रह्मनिष्ठ वामनबोवांची भाषा साधी, सोपी, अर्थवाहक व प्रासादिक अशी आहे. कधी तिने रूपकादी अलंकारांचा साजशृंगार केलेला दिसतो. नेहमीच्या प्रथेस अनुसरून ग्रंथारंभी श्रीगणपतीचे स्तवन रूपकाच्या आश्रयाने करताना ते लिहितात, 'शांत मस्तकीं गंडस्थल। मद स्रवे अद्वैत ब्रह्मज्ञान निर्मल। प्रसन्न वदन सर्व काल। विराजे सुफलित भक्तजनासि॥ चिद्रत्नाचे अलंकार विपुल। चंद्रांकित प्रकाशमान् भाल। ज्ञानमोदकें उदर विशाल। भरलेलें नित्यतृप्तीनें॥ 'सूक्ष्मात्सूक्ष्मतरं महत्।' अव्ययाधिष्ठान सदोदित। यास्तव 'मूषकवाहन' नाम साजत। गणाधीशा आपणांसी॥ पूर्वोत्तम मीमांसा दोन्ही। विराजती भूषणें द्वयकर्णीं। चतुर्विध पुरुषार्थ चारी पाणी। वेदवाणी सुशोभती॥ एकत्वाचा पूर्ण एकदंत। विवेक परशु दिव्य झळकत। परमानंदयुक्त शुंडा झेलित। स्वात्मसुखें डुल्लत सर्वदा॥ कंठीं उपनिषदार्थ प्रकाश। साजे निज स्मरणाचा अंकुश। चरणीं सद्धर्म नुपूर गर्जतां नाश। पाखंडमताचा होतसे॥ स्वच्छंदें करितां तांडव नृत्य। आम्नाय अखंड वक्ते आहां सत्य। ज्ञानविज्ञान ऋद्धिसिद्धि नित्य। तिष्ठती गणराजासमीप त्या॥ गजानन हेरंब लंबोदरा। विघ्नांतका सर्व विद्यासागरा। ग्रंथ सिद्धीस नेऊनि दातारा। पूर्ण करा सविस्तर॥' (१:४–११)

गणाधीशाच्या या गोचर वर्णनानंतर सरस्वतीचे स्तवन करताना आपल्या कुवतीविषयी नम्रत्वाने ते म्हणतात,'कामधेनूसि आदरें तृण। रत्नाकरापुढें कांच अर्पणें जाण। कुबेरासि कपर्दिका समर्पण। ज्या प्रकारें करावी॥ सूर्यापुढें लाविले दीप। अमृतासि दिधलें तक्र स्वल्प। चिंतामणीसमीप शिंप। ठेविली जैशी दरिद्रें॥ तैशी माझी मंदवाणी। स्वरस्वती जगदंबे आपल्या स्तवनीं। विशारदे वाग्विलासिनी। विधिहरिहरादि तुज वंदिती॥' (१:२०–२२) आपले मर्यादित सामर्थ्य वर्णन करताना कवीने पारंपारिक दृष्टान्त घेतले असले तरी त्यांनी वर्णनशैलीस शोभा आणलेली आहे. अक्कलकोटचे स्वामी समर्थ यांचा तर त्यांना साक्षात् अनुग्रह होता. या सद्गुरुंना वंदन करताना त्यांच्या गुरुभक्तीस बहर आलेला दिसतो. ते लिहितात, 'श्रीदत्तात्रेय गुरु समर्थ स्वामी। व्यापक असंग सर्वांतर्यामीं। जगद्धितार्थ वसले अक्कलकोटग्रामीं। तत्पादपद्मां नमिलें अनन्य॥ गलिताहंकृति होऊनि लीन। श्रीगुरुलीलामृत वर्णन। ग्रंथसिध्यर्थ दयाळा आपलें स्तवन। करितों त्रिभुवनपालका॥ गुरुलीला वर्णनार्थ महाराजा। निजाज्ञा झाली या चरणरजा। मंदमति मी हृधा ग्रंथरूपी कार्यध्वजा। उभारण्यास नव्हे समर्थ॥ तथापि आज्ञा मानूनि सर्वथा शिरीं। मस्तक ठेविलें निजचरणांवरी। सत्यप्रतिज्ञ प्रणतभक्तकैवारी। सिद्धीस नेणार आपणचि॥ अंतर्यामी हृदयीं प्रगटून। वदवितां अन्य नसे समर्थावीण। साक्षी चेता केवळ निर्गुण। प्रज्ञान आनंद ब्रह्मस्वरूप॥ लोह लागतां परिसासी। तें सुवर्ण होय शीघ्र वेगेंसी। परंतु आपणासम लोहासी। परिसाचेनि करवेना॥'(१:४०–४५)

मराठी ग्रंथकार प्राचीन परंपरेत काव्यरचना करताना स्वतःविषयी फारसा विस्ताराने उल्लेख करीत नाहीत. परंतु वामनबोवांनी मात्र स्वत:ची माहिती पहिल्याच अध्यायात दिलेली आहे. स्वत:च्या कुळाचे वर्णन करताना वामनबोवा लिहितात, 'दक्षिणेत महाराष्ट्र देशीं। अहमदनगरनिवासी। नगरकर वैद्य म्हणती जयासी।

धारण्य गोत्री यजुर्वेदी ब्राह्मण ॥' (१७६) या घराण्यातील कोणी त्र्यंबक नावाचा एक सत्पुरुष वाल्मीक तथा वामोरी नावाच्या गावी स्थिरावले या त्र्यंबक वैद्याचे पुत्र विठ्ठल ज्योतिर्वेद्य होते विठ्ठलाचे पुत्र रावजी भट्ट या थोर कुळात त्र्यंबकेश्वर गिरिजाकांत प्रमुख दैवत असून श्रीसप्तशृंगनिवासिनी जगदंबा प्रणवरूपिणी आदिमाया कुलस्वामिनी होती रावजीभट्टाचे चिरंजीव ग्रंथकार वामनबोवा होत श्रोत्यांना वंदन करून झाल्यावर आपल्या ग्रंथाचे नाव, त्याचा विषय इत्यादिविषयी सांगताना ते म्हणतात, 'ऐसे सर्वनाचे आज्ञानुसार। ग्रंथ आरंभिला गुरुलीलामृत सागर। सत्संकल्पसिद्धिप्रदातार। पूर्ण करील त्याचा तो॥' श्रीगुरुलीलामृत। ' ग्रंथाचे नाम ठेविले प्रख्यात। गुरुशिष्य-संवादरूप अद्भुत। श्रुतिशास्त्रसंमत असे हा॥ कर्म उपासना वैराग्य भक्ति ज्ञान। राजयोग हटयोगादि साधन। अनेक विषयप्रतिपादन। अत्रिनंदन करविता॥' (१ ११९-२१) साधनचतुष्टय, अनुबंधचतुष्टय निरोपून झाल्यावर कवीने संस्कृतच्या संदर्भात मराठी भाषेची महती वर्णन करताना एकामागून एक असे सरस दृष्टान्त दिले आहेत कवीने म्हटले आहे—

'ग्रंथभाषा प्राकृत म्हणून। कटाळतील विद्वज्जन। तथापि एकचि अर्थानुसंधान। संस्कृतप्राकृती जाणावे। दोन्ही चरणी एक गति। एक क्रिया आहे दोन्ही हाती। एक शब्दनाद द्वय श्रवणाप्रति। द्वय अधरपुटी एक शब्द निघे॥ एक दृष्टी दोन्ही नयनी। एक अर्थ भाषा दोन्ही। लौकिक वैदिक उभयवचनी। उदक पाणी अर्थ एक जैसा॥ वाकडा दिसे कृष्ण श्वेत ऊस। परी गोडी असे सर्वांगी सुरस। शर्करेचे वृंदावन सकळास। कडू न लागे कदापि॥ समुद्री भरले जरी क्षारोदक। ते उष्णकाली मेघमंडली सस्कारपूर्वक। असूनि पर्जन्यकाली सुखकारक। मधुर रुचिकर होऊनि वर्षे॥ समुद्री भरले क्षारोदक। परी त्यातून रत्ने मौक्तिके अमोलिक। निघती कैशी सुंदर देख। तैशी प्राकृती शब्दार्थरत्ने मुक्तादि॥ मधुमक्षिका मुखातील गंध। मृगनाभीतील घेती कस्तुरी सुगंध। देवादिकांसि प्रिय असे शुद्ध। तैसे प्राकृत रसिकांसि॥ काकविष्ठेचे होती पिंपळ। परंतु पूजिती प्रेमें सर्वकाळ। तैसे प्राकृत संस्कृत निवळ। शब्दार्थ, फळ एकचि आहे॥ ईश्वरे संस्कृत निर्माण केले। आणि प्राकृत चोरानी आणिले। ऐसे बोलणेंच अप्रशस्त ते भले। समदर्शी न मानिती कदा॥' (१ १६९-७७)

दुसऱ्या अध्यायात वामनबोवांनी दत्तजन्माची कथा संक्षेपाने पण यथासांग वर्णन केली आहे ब्रह्मा, विष्णू व महेश या अतिथींची इच्छा जाणून महासती अनसूयेने पतीचे ध्यान केले आणि 'निज दैवत तीर्थ करून। अतिथींवरी केले सिंचन। तंव ते तात्काळ बाळे तीन। गोजिरवाणी जाहली॥ विगतवसन होऊनी सती। घेतली बालके अंकावरती। स्त्रो स्तनी दुग्धधारा सुटती। मग ते पाजिती लेकरा॥ वारंवार आलिंगन। करी पुत्रमुखचुंबन। देव म्हणे नयाचे वरप्रदान। सफल झाले आम्हाते॥' (२ १२४-२६) अनसूयात्मज दत्तात्रेयाचे मग सर्व देवांनी, ऋषींनी व मुनींनी कौतुक केले 'सुरवरादिकांच्या स्त्रिया। आल्या वंदनार्थ अनसूया। ऋषिपत्न्यादिक दत्तात्रेया। ओवाळिती सप्रेमे॥ गोदावरी यमुना सरस्वती। तुंगा कृष्णा भागिरथी। नर्मदा सिंधु सकल अपांपती। स्नान घालिती दत्तात्रेया॥ तापी मही कावेरी भीमा। प्रवरा गोमती भामा। सुगंधित उष्ण जले गुरुपोत्तमा। स्नान घालिती आनंदे॥ वेदवेत्ते सकल विद्वज्जन। पंडित आचार्य ब्रह्मवादिन। मुक्त मुमुक्षु विषयी येऊन। घालिती लोटांगण शरणत्वे॥ - मंगल वाद्यें वाजती। वंदीजन सद्यश गाती। ब्रह्मांडांतर्बाह्यवर्ती। परमानंद व्यापिला॥ गुरुदत्त नामाचा गजर। स्तुति करिती सुरासुर नर। नमस्कार जयजय-

कार। विश्वाकार भरलासे ॥ धन्य धन्य पतिव्रता निरुपमा । त्रैलोक्य धावले ऋषिआश्रमा । पुष्पें वर्षती अपूर्व महिमा । निगमागम गर्जती ॥' (२ १९९-२०७)

'श्रीगुरुलीलामृत' ग्रथात मुख्यत्वेकरून दत्तावतारी स्वामी समर्थ अक्कलकोटनिवासी याच्या लीलाचे वर्णन असल्याने सबध विसाव्या अध्यायात अक्कलकोट या स्थानाचे माहात्म्य निवेदन केले आहे श्रीगुरुसमर्थ स्वामीच्या निवासाने या गावास पुण्यभूमीचे महत्त्व प्राप्त झाले या क्षेत्राचे माहात्म्य वर्णन करताना वामनबोवानी म्हटले आहे, 'अक्कलकोट पचक्रोशात । प्रत्यक्ष पूर्णब्रह्म सनातन सचरत । लीलाविहारी श्रीभगवत । यतिवेषधारी नादतसे ॥' 'अक्कलकोट' शब्दाचा अर्थ आता । परिसा श्रोते सज्जन तत्त्वता । यथामति शब्दाची सार्थकता । बोलू सर्वांसि कळावया ॥ 'अक्कल' शब्दार्थ करा श्रवण । बुद्धि मति प्रज्ञा उपदेश इच्छा ज्ञान । मर्यादा सत्कार समति विचार स्मरण । अभिप्राय अत-करणादिक ॥ मनीषा प्रेक्षा धी धिषणा । चित् सवित् प्रतिपत् ज्ञप्ति चेतना । उपलब्धि इद्रियाने समजणे जाणा । अनेकार्थ अक्कलेचे ॥ आता 'कोट' शब्दार्थ ऐका ते ॥ ज्याच्या सभोवती तटबदी केली असते । सर्व बाजूनी सरक्षणार्थ वेष्टिले असते । द्वारे ठेवूनि लहान मोठी ॥ कोश गड दुर्ग किल्ला आवरण । प्रकार आणि कुपण । मृत्काष्ठ दगड वटकादिकें करून । असलेले सरक्षण ग्रामादिकासी ॥' (२० ६१-६६) अशा प्रकारे अक्कलकोटाचा भौतिक व पारमार्थिक अर्थ सागून ग्रथकाराने तेथील अनेक तीर्थक्षेत्राचीही माहिती दिलेली आहे 'दत्तात्रेय स्वामी स्वयप्रकाश । त्याचा अक्कलकोटी होताचि प्रवेश । समस्तासी मुख्य अर्थ आरोग्य यश । लाधलें सहज सुफलित ॥' (१३२) अशा शब्दात ग्रथकाराने अक्कलकोटचे माहात्म्य सागितले आहे

# श्रीगुरुलीलामृत

( श्रीअक्कलकोट स्वामीचे चरित्र—श्रीआनद भारती महाराजकृत )

दत्त साप्रदायिकात आणखी एका 'श्रीगुरुलीलामृता'ची पारायणे केली जातात साष्टीचे श्रीआनद भारती (समाधिकाल शके १८२३) यानी अक्कलकोटनिवासी स्वामी समर्थांचे चरित्र एकवीस अध्यायात सक्षेपाने वर्णन केले आहे 'हरिभक्त प्रश्नकर्ता । आनदभारती निवेदिता' अशी या ग्रथाची भूमिका असून ग्रथात प्रामुख्याने अक्कलकोटनिवासी स्वामी समर्थांचे चरित्र वर्णन केले आहे हा ग्रथ गोपाल शर्मा तथा हरिभक्त नावाच्या सत्पुरुषाने आनद भारतीच्या प्रेरणेने आणि आशीर्वादाने लिहिला उमा महादेव अशी नावे ग्रथकर्त्याच्या मातापित्याची होत कोकणातील केळशी नावाच्या गावातील विद्वासाच्या वशात गोपालशर्माचा जन्म झाला याचे सद्गुरुनाथ आनदभारती होत 'अनुग्रही सद्गुरुमूर्ती । स्वामी माझा आनदभारती । नमस्कार असो तयाप्रती । वारवार साष्टाग ॥' (२१ १४५) असा त्याने आपल्या सद्गुरुबद्दल उल्लेखही केलेला आहे. हरिभक्त प्रश्नकर्ता व आनदभारती उत्तरदाता, अशी ग्रथाची भूमिका असल्याने ग्रथ-कर्तृत्वाचा मान आनदभारतीकडेही जातो

या ग्रथास प्रारभ शके १८१७ मध्ये झाला, आणि 'परी नमनाध्याय पहिला । होवोनि काय तो एकला । षड् वर्षे काल गेला । ग्रथ राहिला तैसाची ॥' सहा वर्षांचा काळ लोटला 'मग अठराशें तेवीस साली । श्रावण मासारभकाली । ग्रथ पुन लाविला चाली । मोह अवघा निरसोनी ॥' परतु पुढे पधरा अध्याय लिहून होताच सद्गुरु आनदभारती समाधिस्थ झाले 'परि मम सुदुर्दैवे । मर्थ्यंच का न विघ्न यावे । चपापष्ठीस

सद्गुरुरावे । देह नश्वर त्यागिला ॥ काय त्याच्या मना आले । सद्गुरु आम्हा सोडोनि गेले । परी साक्षात्कारे भरले । असती जगतामाझारी ॥ ' (२१ १११-१२) त्यानतर पुन. शके १८२४ मध्ये आपाढ महिन्यात लेखन चालू झाले. 'इतक्यात सद्गुरु दयाघन । झाले मन्मनी अवतीर्ण । पूर्ण करोनि समाधान । ग्रथ पुढती चालविला ॥ मग तया काय उशीर । आपाढ मासीच गुरुवार । कृष्ण एकादशीच सुदर । पूर्ण केला शुभदिनी । ' (२१ ११५-१६)

एकवीस अध्यायात सद्गुरूच्या लीला वर्णन केलेल्या असल्याचा स्वानदवर्णन करताना ग्रथकार म्हणतो, ' अध्याय झाले एकवीस । सद्गुरुलीला वर्णिल्या सरस । की पारिजातक पुष्पेच वहुवस । घेवोत सुवास भक्तजन ॥ की एकवीस कौस्तुभमणि । माला वनविली ओवोनि । आत्माराम सकळजनी । त्यासी अर्पिली सद्भावे ॥ की एकवीस मोदक । मगलकर्ता विनायक । चिन्मय विभूती सम्यक । त्यासी अर्पिलें भक्तीने ॥ की पक्वान्नें एकवीस । प्रपच क्षुधा लागली ज्यास । तया श्रवण भोजनी सरस । तच्छमनार्थ वाढियली ॥ की एकवीस सुधाघट । मायामृती प्यावे घटघट । ऐसें हे गुरुलीलामृत । पावन करो सर्वासी ॥ ' (२१:११७-२१)

या 'गुरुलीलामृत' ग्रथातही परपरेनुसार प्रथमाध्यायी गजानन, प्रकृतिपुरुष, सतसज्जन, सद्गुरु, मातापिता इत्यादीना वदन आहे दुसऱ्या अध्यायात आनदभारतीच्या प्रेरणेने दत्तजन्माचे आख्यान आले आहे तिसऱ्या अध्यायात श्रीपादवल्लभाख्यान व चौथ्यात प्रदोषव्रतमहिमा हे विषय आले आहेत. पाचव्यात व सहाव्यात श्रीनृसिहसरस्वतीचे चरित्र सागून सातव्यात ग्रथकाराने वसाप्पाचे आख्यान रगविले आहे. यानतर दत्तावतारी अक्कलकोटनिवासी स्वामी समर्थाच्या लीला भक्तिभावाने वर्णन केल्या आहेत. भजनीबोवा, विष्णुबोवा ब्रह्मचारी, वैश्य राघण्णा, किमयावर स्वामी, अलकापुरीचे नृसिंह यती, मुमुक्षू यवन, जाधव भक्त, चिदवर दीक्षित, बाळाप्पा, स्वामीसुत इत्यादींच्या कथाच्या सदर्भात स्वामी समर्थाच्या गुणलीलाचे वर्णन या ग्रथात भक्तिभावाने आलेले आहे अशा रीतीने या सक्षिप्त ग्रथात स्वामी समर्थाच्या लीला आलेल्या आहेत 'सद्गुरु दीनाची माउली । तिणेचि माझी हौस पुरविली । ग्रथमाला पूर्ण झाली । ती म्या अर्पिली सद्भक्ता ॥ करावया दीनोद्धार । झाला श्रीदत्तावतार । त्रिमूर्ती विधि हरिहर । एकरूपे अवतरल्या ॥ द्वितीय अवतार महीवरती । श्रीदत्तराज योगी घेती । श्रीपाद श्रीवल्लभयती । नाम साजे तयासी ॥ तृतीय अवतार करजग्रामी । नृसिंहसरस्वती स्वामी । भ्रमण करोनि अनेक धामी । दीन भक्ता उद्धरिले ॥ मग काही कालापर्यंत । कर्दळीवनी राहिले गुप्त । लक्षोनिया उत्तरपथ । जाते झाले कालातरे ॥ स्थल देखोनि एकान्त । काही काल समाधिस्थ । राहोनि भ्रमण करीत । अक्कलकोटामाझारी ॥ अनुग्रही सद्गुरुमूर्ती । स्वामी माझा आनद भारती । नमस्कार असो तयाप्रती । वारवार साष्टाग ॥ ' ( २१:१४३-४९ ) अशी दत्तावताराची परपराही येथे स्पष्ट झालेली दिसते

या ग्रथाच्या पठणाची फलश्रुतीही इतर साम्प्रदायिक ग्रथाप्रमाणेच आहे स्वामी समर्थाच्या प्रेरणेने या लीला वर्णन केल्या आहेत, अशी खात्री ग्रथकारानेच दिलेली आहे 'करते करविते स्वामी समर्थ । त्याणीच वदविला हा ग्रंथ । तो तव हस्ते लिखित । त्यानीच केला जाण पा ॥ सद्गुरुलीला श्रवण पठण । जे जे करतील भाविक जन । त्याची तळमळ निरसून । सुखे तरतील भवाब्धी ॥ आधिव्याधि होतील हरण । इहलोकी सौख्य पूर्ण । भोगोनि आत्मसाधनी जाण । होईल गती गुरुकृपे ॥ ग्रथपठण प्रतिदिवशी । करिता सद्गुरु स्वयें त्यासी । साक्षात्कार दाऊनि मानसी ।

शांती बीज रोपिती ॥ करितां ग्रंथ पारायण । त्यावरी संकट कैसेंही दारुण । आलें तरी तें निश्चयें करून । होईल निरसन तात्काल ॥ गुरुलीलामृत ग्रंथ । नित्य पूजोनि पठण करित । त्याचा सखा सद्गुरुनाथ । क्षण न विसंबे तयासी ॥' (२१:९६-१०१)

## श्रीदत्तमाहात्म्य

श्री. प. प. वासुदेवानंद सरस्वती, टेंबेस्वामी महाराज यांनी शके १८२३ मध्येच लिहिलेला 'श्रीदत्तमाहात्म्य' हा आणखी एक प्रासादिक ग्रंथ दत्त-सांप्रदायिकांना मोलाचा वाटतो. हा ग्रंथ तयार होण्यापूर्वी 'दत्तपुराण' नावाचा एक संस्कृत ग्रंथ स्वामी महाराजांनी लिहिला होता. ३५०० श्लोकांच्या या संस्कृत भाषेतील ग्रंथाची ज्ञान, उपासना, कर्मयोग अशी तीन कांडे आहेत. परंतु हा 'ग्रंथ प्राकृत जन नेणती' म्हणून उपासनाकांडात्मक भाग त्यांनी 'श्रीदत्तमाहात्म्य' या मराठी ग्रंथात वर्णन केला. या ग्रंथाचे ५१ अध्याय असून ओवीसंख्या ५५१३ पर्यंत आहे. दीपक व त्याचे गुरू यांच्या संवादरूपाने असणाऱ्या या ग्रंथात मुख्यतः कार्तवीर्य, अर्जुन, अलर्क, आयू, यदू इत्यादींची चरित्रे, नवविधा भक्तीचे महत्त्व, योगमार्ग, उपासना इत्यादी विषय प्रामुख्याने आले आहेत. दत्तात्रेयांच्या चोवीस गुरूंचेही विस्ताराने वर्णन 'श्रीदत्तमाहात्म्य' या ग्रंथात आहे. या ग्रंथाच्या रचनेचा हेतू सांगताना स्वामी महाराज म्हणतात, 'जगदुद्धारार्थ परमेश्वर । अत्रीच्या घरी धरी अवतार । त्याच्या चरिताचा विस्तार । वर्णिला सुंदर पुराणी ॥ तत्सार दत्तपुराण । औट सहस्र निरूपण । तें अपरिचित गीर्वाण भाषण । प्राकृत जन नेणती ॥ म्हणोनि हा ग्रंथारंभ । ह्या योगें उमजेल स्वयंप्रभ । भक्तवत्सल पद्मनाभ । चित्तक्षोभहर्ता जो ॥ श्रीदत्तपुराणाचे तीन भाग । ज्ञानोपासना



कर्मयोग । त्यांतील उपासनाकांड भाग । ईश्वरानुराग दावी जो ॥ जेथें कार्तवीर्याचें आख्यान । अलर्काचें विज्ञान । आयुयदूचें उद्धरण । हेचि वर्णन मुख्यत्वें ॥' (१:७-११)

नवविधा भक्ती, अनसूयेचे पातिव्रत्य व तिला मिळालेले वरदान, दीपक व वेदधर्म याचा संवाद, श्रीदत्तस्वरूप व दत्तलीला यांविषयी दीपकाची जिज्ञासा, ज्ञानी पुत्र व त्याचा अज्ञानी पिता यांची कथा, कौशिकपत्नी सतीची कथा, अनसूयेस देवांनी दिलेले वरदान, मांडव्य ऋषी व यमधर्म यांचा संवाद, दत्तजन्म, दत्तप्रभूंच्या बाललीला, कार्तवीर्यार्जुनकथा, सूर्यव्रत व अनंतव्रत, कार्तवीर्याचे वैराग्य, गर्गमुनीकृत दत्तमाहात्म्य, अर्जुनाचे श्रीदत्ताश्रमी गमन, अर्जुनाची परीक्षा व त्यावर दत्तकृपा, त्याचे वैराग्य, श्रीदत्तकृत उपदेश, इंद्रबृहस्पतिसंवाद, शिल्पशास्त्रज्ञ व कामशास्त्रज्ञ यांच्या कथा, मंत्रशास्त्र, विष्णुदत्ताची कथा, कर्मविपाकशास्त्रासंबंधी हरिशर्मा विप्राची कथा, तंत्रशास्त्र, गर्भवासादी दु:खांचे वर्णन, ब्रह्मनिष्ठ पुत्रास विष्णुदत्तांनी केलेला उपदेश, महावाक्यार्थविचार, अष्टांगयोग, जीवन्मुक्ताचा व्यवहार, गाधि राजा व ऋचीक ऋषी याचे चरित्र, जमदग्नी व विश्वामित्र यांची उत्पत्ती, परशुरामजन्म, परशुरामकृत रेणुकावध व पुनर्जीवन, अर्जुनाकडून जमदग्नीच्या कामधेनूचे अपहरण, रामार्जुनयुद्ध, अर्जुनाचा पराभव, परशुरामाची तीर्थयात्रा, जमदग्नीचा नाश, रेणुकेचा शोक, क्षत्रियहननाची रामप्रतिज्ञा, परशुरामाचे श्रीदत्ताश्रमात आगमन, श्रीदत्त-रेणुकासंवाद, रामावर दत्तकृपा, रेणुकामातेचे सहगमन, रेणुकामातेचे पुनर्दर्शन, रामकृत क्षत्रियसंहार, श्रीदत्ताज्ञेने रामाचा चिपळूण येथे गुप्तपणे निवास, श्रीरेणुकामातेची महती, अलर्काचे विस्तृत चरित्र, दत्त व अलर्क याचा संवाद, कर्मयोग, अष्टांगयोग, अष्टमहासिद्धी, ध्यान व समाधी, नादाभ्यास, प्रणवोपासना इत्यादींचा अलर्कास उपदेश,

आयुराजाचे चरित्र, यदूचे विस्तृत चरित्र, चोवीस गुरूंचे वर्णन, अशा काही मुख्य विषयाचे विवेचन 'श्रीदत्तमाहात्म्य' या ग्रंथात असल्यामुळे दत्तभक्ताना तो अतिशय प्रिय वाटतो

स्वामी महाराजाच्या या रसाळ व तत्त्वपूर्ण ग्रंथाची भाषा अतिशय सोपी व प्रासादिक आहे. आबालवृद्धाना व स्त्रियाना दत्तस्वरूप-वर्णन सहज समजेल व बोध सहज मनात ठसेल अशी या ग्रंथातील ओव्याची रचना आहे नवमास पूर्ण लोटल्यानतर दत्तात्रेयाचा जन्म झाल्याचा प्रसग वर्णन करताना ग्रंथकार लिहितात, 'मार्गशीर्ष पौर्णिमेसी। बुधवारी प्रदोष समयासी। मृगनक्षत्री शुभ दिवशी। अनसूयेसी पुत्र झाले ॥ तव अत्रिऋषी येऊन। पाहीन म्हणे पुत्रवदन। तो अकस्मात् त्रिमूर्ती पाहून। विस्मित मन जाहला ॥ माला कमडलु अध करी। डमरू त्रिशूल मध्यकरी। शखचक्र ऊर्ध्वकरी धरी। भक्तकैवारी त्रिमूर्त्यात्मक ॥ काषाय वस्त्र परिधान। विभूतीचे लेपन। मस्तकी जटा मडन। वात्सल्यरसायन धाम जें ॥' (३ ३८-४१) हे दत्तप्रभूचे सूचक व रेखीव वर्णन मनोल्हादक आहे अनसूयेचे स्तनपान करून त्रिमूर्तीला आलेली तृप्ती वर्णन केल्यानतर दत्तप्रभूचा नामकरण समारभ झाला आहे 'पाळणा बाधूनी स्वच्छदें। बाळा निजवूनी गातसे' असे सागून अनसूया माता जो पाळणा म्हणते तो पाहण्यासारखा आहे

जो जो जो जो रे परात्परा।
भजकाच्या माहेरा ॥धृ०॥
सह्याद्रीवरि जो। अत्रिसुत।
अनसूयाजठरात। प्रगटुनि विख्यात।
हो दत्त। तारिल जो निजभक्त।
जय जगदुद्धारा। उदारा।
भक्ताच्या माहेरा ॥ जो जो जो जो रे॥
प्रल्हादा देवी। विज्ञान।
येता अर्जुन शरण।
सिद्धी देऊन। उद्धरून। स्वपदी देशी स्थान।
अलर्क यदुतारा। योगिवरा।
भक्ताच्या माहेरा ॥ जो जो जो जो रे ॥

दत्तप्रभूचा जन्म, त्याचे बालपण, त्याच्या बाललीला याचे मोठे हृद्य चित्रण स्वामी महाराजानी केले आहे 'यज्ञयाग जयाला। अद्यापि न देती तृप्तीला। सतीस्तनपाने तयाला। ढेंकर आला तृप्तीचा ॥' (३ ७३) या एका ओळीत अनसूयामातेची महती वर्णन केली आहे दत्तप्रभूच्या बाललीलाचे वर्णन मोठे बहारदार आहे 'बोलोनि बोबडे बोल। मुग्ध चेष्टा करी केवळ। मुक्या करी जो वाचाळ। त्याचा खेळ काय हा ॥ जो वागवी पागुळा। तो अडखळे वेळोवेळा। विश्वाधार तो अनसूयेच्या गळा। मिठी घाले लवलाहे ॥ ज्या ज्या बाललीला सकळ। दावी मातेसी करून खेळ। जमवूनी मुनीचे बाळ। स्वयें खेळे त्यासवे ॥ अनसूया बोलावी भोजनार्थ। नये गुतूनी क्रीडार्थ। माता धरावया येत। धुडुधुडु धावत जातसे ॥ माता पाठी लागता। योग्या अगम्य तो न ये हाता। तिची देखोनी श्रातता। तिच्या हाती येई स्वयें॥ ब्रह्मांडें ज्याचे उदरी। त्याला धरी कमरेवरी। म्हणूनि बैसविता मदिरी। मृत्तिका शरीरी माखी दत्त ॥ दाखवूनि नाना लीला। हर्ष देई मातापितराला। भक्तवशता दावी जगताला। जे एकला असग ॥' (३ ८३-८९) या व्यापक अशा योगीश्वराचे वर्णन करताना स्वामी महाराज लिहितात, 'ज्याचे नित्य गगास्नान। माहुरी करी शयन। सह्याद्रीवरी आसन। करी ध्यान गाणगापुरी ॥ कुरुक्षेत्री आचमन। धोपेश्वरी जाऊन। करी जें भस्मधारण। सध्यावदन कऱ्हाडी ॥ कोल्हापुरी भिक्षाटन। पाचाळेश्वरी जाऊन। नित्य करी भोजन। विचित्राचरण तयाचे ॥ पढरपुरी जाऊन। नित्य सुगध लेवून। पश्चिम सागरी येऊन। करी अर्घ्यदान सायकाळी ॥ जो जो करील स्मरण। त्या त्या देई दर्शन।

व्यापिले जेणे त्रिभुवन । असो नमन तच्चरणा ॥ ज्याची लीला ऐकोन । तृप्त होती कान मन । त्याला कोण का नमन । न करील जनमान्य जो ॥ जो मायाध्यक्ष होऊन । करी जग उत्पन्न । त्याचे करी पालन । जो स्वयें उदासीन निगर्व ॥ ब्रह्मरूपें उत्पादक । विष्णुरूपें पालक । रुद्ररूपें संहारक । करी एक तो सर्व ॥ तो भक्तीचा भुकेला । भक्ताधीन राहिला । अंतर न देता भक्ताला । खेळ मला करी तो ॥'( ४:८३-९१ )

अशी दत्तप्रभूची अनेक मनोहर वर्णने श्रीदत्त-माहात्म्य ग्रंथात आढळतील 'कोटी कंदर्प गाळूनी । मूर्ती ओतिली वाटे मनी । मंद हास्य दिसे वदनी । पाहता मनी हर्ष होय ॥ आजानुबाहू सुरेख । पहाता डोळा होय सुख । दृष्टी चिकटे सविवेक । सेवा चोख रूपामृत । प्रफुल्ल कमलवदन । वाटे घ्यावे चुंबन । शरीर परम शोभन । वाटे आलिंगन दृढ घ्यावे ॥ दिसे दिगंबर मूर्ती । परम गोजिरी आकृती । तेयोनि न फिरे मागें वृत्ती । जेवी गती योगियाची ॥' (६ १६-१९) हे सुरेख वर्णन नमुनेदार आहे माहुरास परशुरामाने 'तुलसी उदुंबराश्वत्थ । पलाश बिल्व शमी वट । याही आश्रम घनदाट । फल-पुष्पलतावेष्टित जो ॥' आश्रम पाहिला त्यातील अवधूत कसा होता ? 'तेज पुंज मूर्तिमंत । वाटे साक्षात् अग्नी की ' असा हा अवधूत 'जटाजूट विराजमान । आजानुबाहु कमल-नयन । प्रफुल्ल कमळसे दिसे वदन । वाटे सदन ते लक्ष्मीचे ॥ ज्याच्या गळा शंखापरी । छाती दिसे कपाटासरी । भोवऱ्याप्रमाणे नाभीवरी । भक्तकैवारी श्रीदत्त जो ' ॥ (२३ ४-५) चोविसाव्या अध्यायातील जमदग्नी व रेणुका माता याचे वर्णन असेच गोचर आहे 'पद्मासन घालून । अंगी भस्म चर्चून । जटाजूट बांधून । वसे समाधान जमदग्नि ॥ कंठी रुद्राक्ष शोभती । गोमुखी धरूनी हाती । दृष्टी करूनी वरती । एकाग्र चित्ती ध्यान करी ॥ रुद्राक्ष कुंडले कानी । रुद्राक्ष भूषणे लेवूनी । वल्कलावर नेसूनी । अजिन पाघरूनी बैसला ॥ वामभागी रेणुका माता । सर्वाभरणभूषिता । दिव्य कांती लावण्य-सरिता । सौभाग्यभूषिता विराजे ॥ सुटे सुगंध अंगाचा । तेथें जमाव झाला भ्रमराचा ॥ पुन दिसे तेजाचा । अंधाकाराचा नाश करी जो ॥ नखें दिसती अर्धचंद्रापरी । दंत झळकती हिऱ्यापरी । तिच्या लावण्याची सरी । कोण करी जगांत ? ॥ ' (२४ १५-२०)

'श्रीदत्त-माहात्म्य' या ग्रंथात अनेक ठिकाणी प्रसंगानुरूप दत्तस्तुती वा दत्तप्रार्थना अतिशय रसाळपणे आलेल्या आहेत आयुराजाने केलेली एक दत्तस्तुती पाहा, 'तपश्चर्यादिके करून । जो न होई प्रसन्न । तो भगवान अत्रिनंदन । मज प्रसन्न जाहला ॥ जो स्वभक्ताचा कैवारी । तो फळ दे माझें करी । त्याच्या वचनावरी । विश्वास धरी मी खास ॥ भगवद्भक्ता कैचे दैन्य । हेचि सर्वांसी मान्य । मी भक्त अनन्य । का वदान्य मज उपेक्षी ॥ मन्मति पालटली । की मला भूल पडली । की काय चूक झाली । न उमजली ती मला ॥ जो नानारूपधर । ज्याच्या माहात्म्याचा पार । नेणती सुर-योगीश्वर । मी पामर काय जाणे ॥ सहास्यान्वित मुख । ज्याचे पाहता हो हरिख । तोचि देईल सुख । सर्व दुःख वारूनी ॥ ज्याचा ब्रह्मादिका पार । न कळे त्याला नमस्कार । असो तो सर्वेश्वर । दुःख दूर करो माझें ॥ जो ब्रह्मचि केवळ । तयाचे वंदू पदकमळ । तो करो प्रतिपाळ । दोष सकळ वारूनी ॥ देवा विश्वेश्वरा दत्ता । सांभाळी आपुल्या भक्ता । तुझ्याविना बा आता । ह्या आर्ता कोण पाळी ? ॥ तू सत्कुल विद्याधन । न पाहसी तप आचरण । धरिता भावें चरण । शरण होसी निश्चित ॥ जे भले भले असती । ते पदोपदी चुकती । मी तरी मंदमती । चुकलो किती वेळ मेणे ॥ आता भक्तवत्सला । पदरी घेई मला । आर्त होऊनी तुला । प्रार्थी, मला

अभय दे ॥ तू देव अनंत । माझा काय पाहसी अंत । मी करिता आकांत । होऊनी आर्त ये वेळी ॥ ही मति खचली आता । पुत्र आत्मा नष्ट होता । आर्तांवरी दृष्टी आता । करी दत्ता दयाब्धे ॥ अभय दे मज आता । सर्वापराध जाता । क्षमा करी बा दत्ता । दुजा त्राता कोण मला ? ' (४२ ९४-१०८)

यदु व अवधूत यांच्या भेटीनंतर अवधूताने चोवीस गुरूपासून कोणत्या तत्त्वज्ञानाचा बोध घेतला याचे मोठे तपशिलवार वर्णन श्रीवासुदेवानंद सरस्वतींनी या ग्रंथात केले आहे चोवीस गुरूपासून प्राप्त झालेल्या ज्ञानाचा बोध झाला तर ? ग्रंथकर्त्यांनी अवधूताच्या मुखातून वदविले आहे, 'ज्याचे मनन करिता । ब्रह्म उपजे तत्त्वता । निदिध्यासन करिता । साक्षात्कारता होईल । येथें परमात्मा उघड । अन्यत्र अवघड । येथें प्रज्ञानाचें बिन्हाड । असे दृढ जाण तू ॥' (४६ ७७ ७९) या चोवीस गुरूंचा थोडक्यात निर्देश करताना अवधूताने सांगितले आहे, 'अनुक्रमें करून । मागतो तत्त्वज्ञान । पहिला गुरु पृथ्वी जाण । दुसरा पवन तो गुरु ॥ हे व्योम तिसरा गुरु । चौथा उदक गुरु । पाचवा जाण अग्नि गुरु । सहावा गुरु चंद्रमा ॥ सूर्य काळात्मा सातवा गुरु । कपोत आठवा गुरु । नववा अजगर गुरु । दहावा गुरु समुद्र ॥ तो होय अकरावा गुरु पतंग । बारावा गुरु भृंग । तेरावा गुरु मातंग । मधु हा गुरु चौदावा ॥ मृग मम गुरु पंधरावा । मत्स्य गुरु सोळावा । पिंगळा वेश्या गुरु सत्रावा । गुरु अठरावा कुरर ॥ जो तीव्र मानापमान चिंता । तत्परिहारार्थ करिता । बालक गुरु तत्त्वता । हा धाता एकुणिसावा ॥ कंकण कुमारीचे विसावा गुरु । एकविसावा सर्प गुरु । बाविसावा गुरु । शरकार जाण तू ॥ गुरु मम तेविसावा । पेशस्कार जाणावा । कोळी गुरु चोविसावा । ज्ञानार्णवा पैं यापासुनी ॥' (४६ ८७-९४) यानंतर प्रत्येकापासून आपणास कोणता बोध प्राप्त झाला याचे विस्ताराने वर्णन पुढील चार अध्यायापर्यंत आलेले आहे

असा हा 'श्रीदत्त-माहात्म्य' ग्रंथराज दत्त-कथा, दत्तभक्तकथा, तत्त्वबोध इत्यादींनी समृद्ध असल्याने सांप्रदायिकांत त्याला महत्त्वाचे स्थान मिळाले आहे 'तो हा परमात्मा श्रुतिगेय । नरसिंह सरस्वती दत्तात्रेय । परब्रह्म सच्चिदानंद-मय । निरामय अद्वितीय तो ॥ तोचि रची हा ग्रंथ । निमित्तमात्र वासुदेव येथ । श्रवणे पठणे करवील स्वार्थ । हा यथार्थ भाविकाचा ॥' (१ ५-६) या भूमिकेवरून या ग्रंथाची रचना झालेली असल्यामुळे त्यामधील विवेचनास तपस्येच्या पुण्याईचा व दिव्यत्वाचा स्पर्श झालेला दिसतो ग्रंथाचा समारोप करताना हाच भावार्थ व्यक्त करताना स्वामी महाराजांनी म्हटले आहे, 'विविध धर्मान्वित । ज्ञान-भक्ति-रसभरित । असे हे श्रीदत्तचरित । मूर्तिमंत ब्रह्म की ॥ ब्रह्म ते अरूप असून । कोणा नये दिसून । करिता उपनिषदांचे श्रवण । मनन ध्याने मग कळे ॥ मंदा विशेषें-करून । नुमजे औपनिषदज्ञान । त्याकरिता हे लेखन । करवी अत्रिनंदन दयाळू ॥' (५१ १०४-१०६)

भगवान अत्रिनंदनाकडूनच हे प्रासादिक लेखन झालेले असल्याने त्याची प्रार्थना ग्रंथकर्त्यांने पुढीलप्रमाणे ग्रंथाच्या शेवटी केलेली आहे : 'श्रीविष्णो जगत्पालका । जय विघ्ने जगत्कारका । जय शंभो जगत्तारका । चित्तहारका तुज नमो ॥ तू आर्य संरक्षक । तूचि अनार्य शिक्षक । तूचि हे ग्रंथकौतुक । करविसी लोक तारावया ॥ परात्पर परंज्योती । तूची परब्रह्ममूर्ती । कोण जाणे तुझी गती । स्वयंज्योती तू श्रीदत्त ॥ विहार तुझा स्वभक्तहृदयात । तू भक्ताधीन सतत । मी मागतो पसरून हात । हया ग्रंथी सतत सान्निध्य ठेवी ॥ तून मदनुग्राहक । तूचि वक्ता श्रोता पृच्छक । तूचि चालक भासक । होसी ग्रंथग्राहक निर्मत्सर ॥ वधी पद्मिनी

चोलावी भ्रमरा । कधी चंपक फिरवी माघारा । धरूनि ह्या विचारा । एवढा पुरा केला लेख ॥ ' (५१:१०७-११२) याप्रमाणे हा ओवीबद्ध ग्रंथ शके १८२३ मध्ये सिप्रा नदीकाठी उज्जैन येथे चातुर्मासात लिहिला गेला. ज्ञान, भक्ती, वैराग्य, साक्षात्कार यांची मूर्तिमंत उतारपेठ म्हणजे श्रीवासुदेवानंद-सरस्वतींचा हा 'श्रीदत्तमाहात्म्य' ग्रंथ होय.

## श्रीपंतगुरुचरित्र

दत्तभक्तांना पारायणासाठी उपयोगी होणारा आणखी एक चरित्रग्रंथ म्हणजे वामन नरहर कामतकृत 'श्रीपंतगुरुचरित्र' हा होय. या ग्रंथात बेळगावजवळील बाळेकुंद्री येथील प्रख्यात दत्तावतारी सत्पुरुष श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रीकर (शके १७७७-१८२७) यांच्या चरित्रलीलांचे मधुर स्वरात पण ओवीवृत्तात केलेले गायन झाले आहे. शके १८४० मध्ये 'श्रीक्षेत्र कर्दळीपुरीं। श्रीपंत गुरुसंनिध साचारी । श्रीनृसिंह देव आशीर्वादें निर्धारीं । ग्रंथ कळसा पावला ॥ ' (५४:७९) असा निर्देश स्वतः ग्रंथकर्त्यानेच केला आहे. या ग्रंथाचे ५४ अध्याय असून ओवी-संख्या सुमारे ६००० पर्यंत आहे. वामन नरहर कामत हे श्रीपंतमहाराजांचे एक निष्ठावंत शिष्य होते. शके १८२१ मध्ये त्यांना पंतांचा अनुग्रह झाला. फारसे शिक्षण झाले नसताना त्यांनी या ग्रंथाच्या लेखनास श्रीपंतांच्या स्वप्नोपदेशावरुन प्रारंभ केला. श्रीपंतबधू व शिष्यमंडळी यांच्याकडून माहिती जमवून त्यांनी या ग्रंथाची रचना केली. या ग्रंथात प्रामुख्याने श्रीपंतमहाराजांच्या लीला वर्णन केलेल्या असल्यामुळे बाळेकुंद्रीच्या या दत्तभक्तिशाखेतील असंख्य भक्तांना हा ग्रंथ पारायणास उपयोगी पडतो.

नेहमीप्रमाणे मंगलाचरण, गुरु व संतजन यांना वंदन झाल्यावर ग्रंथकाराने श्रीपंतगुरुंच्या अवतार-कथनास प्रारंभ केला आहे. श्रीपंतांच्या बाललीला, बालावधूत व श्रीपंत यांची भेट, बालावधूतांचा श्रीपंतांना दिव्य बोध, संप्रदाय-पीठावर श्रीपंतांची नेमणूक, श्रीपंतांचा विवाह, गृहस्थाश्रम, नवविधा भक्तिविवेचन, नाम-महिमा-विवरण, घटस्थापना, नवरात्र व विजया-दशमी यांच्या वास्तविक अर्थाचें निरूपण, मंत्र-महिमा, संतू गुरव, राणोजी पाटील, रंगोपंत कुलकर्णी, कृष्णा घोरपडे, व्यंकटराव घाणेकर, कल्लप्पा, मंगेशराव गुंजीकर, गोविंदराव मुतालिक, नारायणराव संपगावकर, भीमराव पाटील, दादा सावंत, श्रीपाद यार्दी, वसवंत ऊर्फ पुरप्पा कुलकर्णी इत्यादी सद्भक्तांच्या चरित्रकथा, श्रीपंतमहाराजांचा उपदेश इत्यादी विविध विषयांनी हे श्रीपंतगुरुचरित्र समृद्ध बनून राहिले आहे. ग्रंथकर्त्याचे शिक्षण बेताचे असूनही त्याची भाषा प्रौढ, रसाळ व प्रसंगी काव्यमय बनली आहे. आपल्या सद्गुरूंचे वर्णन करताना भारावून जाऊन ग्रंथकार म्हणतो, 'तूंचि शांतीचा सागर। भक्तिवैराग्याचें भांडार। भक्तजनाचें माहेर। दीन दयाळ असशी तूं ॥ माउलीहूनि तू मायाळ। चंद्राहूनि तूं शीतळ । गंगेहूनि तू निर्मळ । अवतार प्रेमाचा ॥ तुज द्यावया उपमा । न दिसे आन पुरुषोत्तमा। तुझी तुजचि साजे उपमा। आनंदघना जगद्गुरू ॥....तू जी स्फूर्ति देशील जाण । तैंचि एथें होतसे लेखन । मज शुद्धा-शुद्ध न कळे पूर्ण । सर्वही करी तुझें तू ॥ ' (१:६९-७४)

या पंतगुरुचरित्रात श्रीपंतांच्या चरित्रातील प्रमुख लीला वर्णन केल्यानंतर ग्रंथाच्या शेवटी ग्रंथकाराने पारायणविधीचीही कल्पना दिलेली आहे. आपणांस चरित्रलेखनाची प्रेरणा कशी मिळाली हे सांगताना ग्रंथकार म्हणतो, 'जो शरणागता वज्रपंजर । निजदासांचा सहाकार । सगुणरूपें जगदुद्धार । प्रकट झाले श्रीपंत ॥ ना भी ना भी म्हणोन । न सांवरत धांवे करुणाघन ।

दिव्यविभूति स्वकरें करोन। सर्वांगासी लाविती॥ मुखी घालोनि किंचित। अभयकर मस्तकीं ठेवित। म्हणती आतां ऊठ त्वरित। व्याधी समस्त हरियली॥ माझें चरित्रलेखन। करीं तूं आजिपासोन। तुज न बाधे आन विघ्न। मी निजांगें रक्षितसें॥ माझी ज्ञानकला शारदा-सुंदरी। बैसोनि तुझे जिव्हाग्रीं। ग्रंथ वदेल पवित्र परी। कलियुगीं तारक जड-मूढां॥' (५३: ९६–१००) आपण अज्ञानी, मूढ व मंदमती असूनही हा ग्रंथ गुरुकृपेने तयार झाला, याचे श्रेय सद्गुरूंनाच अर्पण करताना ग्रंथकर्त्यानें म्हटले आहे, 'माझें निमित्त करोन। शारदा वर्णी तुझे गुण। तुझी चित्कला आपण। लिहितसे स्वइच्छें॥ येथें सूत्र-बाहुली वामन। जाणा श्रोते संतजन। सत्य सत्य सांगतों खूण। श्रीगुरूंची कृपा हे॥ .... श्रीगुरुकृपा सर्व करीत। परी माझा स्वभाव जड अत्यंत। प्रमाद होती बहुत। संतजनीं क्षमा कीजे॥ जैसा शुद्ध गंगेचा ओघ। पडे पृथ्वीवर सुरंग। परी मृत्तिकागुण संग। तैसा रंग होय त्याचा॥ तेवी श्रीपंतगुरु सर्व करीत। परी मी अविवेकी मूढ अत्यंत। प्रमाद घडले असती बहुत। देह स्वभावें माझिया॥' (५३:१०३–१०८)

## श्रीदत्तचरित्रसार

श्रीदत्तभक्तांना आवडेल असा आणखी एक ओवीबद्ध ग्रंथ आजगाव-सावंतवाडीचे श्रीदत्त-दास वि. गो. नातू यांनी शके १८८९ मध्ये 'श्रीदत्तचरित्रसार' या नावाने प्रकाशित केला आहे. या ग्रंथाचे ७७ अध्याय असून ओवीसंख्या ७७२१ पर्यंत आहे. ग्रंथातील विषय इतर सांप्रदायिक ग्रंथांप्रमाणेच आहेत. सृष्टि-उत्पत्ती, अत्रि-तपश्चर्या, दत्तदर्शन, अनसूयासत्त्व, श्रीदत्त-जन्म, प्रल्हादास दत्तदर्शन, श्रीदत्तांचे गुरु, वामनावतार, वेदशर्मा ब्राह्मणकथा, आयुराजा-चरित्र, नहुषकथा, यदूस दत्तदर्शन, अलर्कास दत्तबोध, ध्रुवकथा, सहस्रार्जुनकथा, परशुराम-चरित्र, रेणुकाकथा, दत्तभार्गवसंवाद, राम व कृष्ण यांची चरित्रे, यदूस दत्तदर्शन, मत्स्येन्द्र-नाथ–गोरक्षनाथ– जालंदरनाथ– कानीफनाथ– गोपीचंद इत्यादींच्या कथा, श्रीपादवल्लभ व नृसिंहसरस्वती इत्यादींची चरित्रे, वामन पंडित, श्रीसमर्थ रामदास, एकनाथ, दासोपंत, चिदंबर दीक्षित, अक्कलकोटनिवासी स्वामी समर्थ, माणिक प्रभू, आळंदीचे स्वामी नृसिंहसरस्वती, देव मामलेदार, रामानंद बीडकर इत्यादी अनेक दत्तावतारांच्या व दत्तभक्तांच्या कथा या आधुनिक काळातील ग्रंथात श्रीदत्तदास विष्णू गोपाळ नातू यांनी वर्णन केल्या आहेत. शेवटी ७७ व्या अध्यायात ग्रंथकाराने श्रीसत्यदत्तव्रताची महती वर्णन केली आहे.

पारंपारिक पद्धतीप्रमाणे ग्रंथारंभी श्री. नातू यांनी गणेशादी देवतांना वंदन करून सद्गुरूंची प्रार्थना केली आहे. विधी, हरी, हर यांच्या रूपात असलेल्या दत्तस्वरूपाला वंदन करताना ग्रंथकार म्हणतात, 'सत्त्व रज तम त्रिगुण। दत्तचंद्र दुर्वास बनून। दत्तनगर काया धरून। रक्षितां भक्तां प्रेमानें॥ तुमच्या हातीं सर्व सत्ता। उत्पत्ति पालन संहारता। भिन्न भिन्न रूपें दावितां। मागणें कल्याण करावें॥ दत्तचरित्र-सार ग्रंथ। परम पवित्र अमृतार्थ। अक्षरें असावीं यथार्थ। तव कृपेनें दयाळा॥ तुम्हांस नसे भेद कांहीं। तुम्ही सर्व एकचि पाहीं॥ नट नाना वेष घेई। परी ती व्यक्ति एकचि॥ संरक्षावें साधुजन। दुष्टां वळवून वा मर्दून। करावया लोककल्याण। अवतरून येतासां॥ किती करावी तव स्तुती। नाहीं कळत मजप्रती। ग्रंथ-साहयाची ही विनंती। लडिवाळपणे करीतसें॥' (१:२५–३०) अत्री ऋषींच्या आश्रमातील दत्तप्रभूंचे रेखीव व सुबक दर्शन पहा. 'तीन शिरें व सहा हात। भाल सूर्यप्रभा दिसत। माला कमंडलु

असत। अधः हस्ती तयांच्या ॥ त्रिशूल डमरू मध्य करी। शंख चक्र वरच्या करी। सस्मित वाळ अधातरी। मुकुट तेजस्वी मस्तकी। अंगरखा अंगी हिरवा। जरीकाठी शोभे बरवा। ऋषि मुनी सिद्ध मेळावा। जटाधारी संगे असे ॥ चार वेद श्वान वाजूस। कामधेनूचा निकट वास। मनोहर दत्तभक्तांस। स्वयप्रकाश मुद्रे दावी ॥' (२.९६-९९)

अत्रिआश्रमात जन्मास आलेला हा दत्तप्रभू अतिशय दयाळू व भक्तवत्सल असल्याचे वर्णन ग्रंथात आले आहे 'असा हा दत्त गुरु प्रेमळ। भाव पाही सदा निर्मळ। पामरही तरे तत्काळ। अखंड प्रेम दत्त करी ॥ दत्त देव फार दयाळ। त्याचा अनुभव प्रेमळ ॥ .... एकमेव गुरुदेव दत्त। त्यांसी आवडे प्रेमळ भक्त। त्याचे रक्षण दत्त करीत। इहपरलोकी निर्धारे ॥ प्रसन्न होई दत्त दयाळ। श्रीगुरु दत्त फार प्रेमळ। भक्ता-भिमानी भक्तवत्सल। नसे कोणीही दुसरा ॥' (३:८०-९०) चौथ्या अध्यायातील नारदकृत दत्तस्तोत्रांचा सरळ व सुलभ अनुवाद मोठा प्रासादिक आहे. सातव्या अध्यायातील प्रारंभी आलेला दत्तमहिमा साम्प्रदायिकाना आवडेल असाच आहे. 'श्रीदत्तचरित्रसार' या ग्रंथाचा शेवट करताना ग्रंथकर्त्यांनी म्हटले आहे, 'श्रीदत्त-प्रेरणा असत। त्यामुळे ग्रंथलेखन होत। सर्वां प्रेमें पाळिती दत्त। त्यांना नमस्कार असो ॥ श्रीसत्यदत्तव्रत कथापान। करून सुख समाधान। सद्भावना मनी ठेवून। ग्रंथ आदरे लक्षावा। विधायक इच्छा पुरती। पुण्यपापें जन्माची गती। तशीच होतसे फलप्राप्ती। परंतु तारक दत्त गुरू ॥ श्रीनृसिंह यति दत्तावतारी। म्हणती अमृतघट स्वीकारी। श्रीदत्तचरित्रसार करी। त्यांनीच लिहविला हा ग्रंथ ॥ वय अठ्ठावन्न वर्षांत। त्रैमूर्ती भगवान श्रीदत्त। स्वप्नी कृपा ग्रंथ दावीत। हा श्रीदत्तचरित्रसार ॥' (७७:५४-५८)

# महानुभावीय दत्तग्रंथ

श्रीदत्तसंप्रदायातील काही प्रमुख ग्रंथांचा आता-पर्यंत परिचय करून घेतला. हे ग्रंथ प्रामुख्याने सरस्वतीगंगाधराच्या गुरुचरित्राच्या परंपरेतील होते श्रीश्रीपादवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती यानी जो संप्रदाय महाराष्ट्रात प्रवर्तित केला त्याच्या आधाराने वरील ग्रंथांची निर्मिती झाली संस्कृत पुराणातील दत्तस्तुती वा दत्तस्तोत्रे यांचे पठण महाराष्ट्रात घरोघरी होत असले आणि विविध आरत्या व अष्टके यांचा निनाद आजही सर्वत्र होत असला तरी पारायणासाठी, अनुष्ठाना-साठी जे ग्रंथ वाचले जातात त्यांचा स्थूल मानाने आपण परिचय करून घेतला. आता आणखी काही दत्तग्रंथांची संक्षेपाने ओळख करून घेऊ. वारकरी पंथाचे प्रवर्तन ज्ञानेश्वर-नामदेवांनी ज्या काळात केले त्याही आधी सुमारे शभर वर्षे श्रीचक्रधर नावाच्या एका थोर महात्म्याने महानु-भाव पंथाची स्थापना केली. या पंथाचे आदिकारण, मूळ प्रवर्तक श्रीदत्तच असल्याने पंथीयानी दत्त-वर्णनात्मक ग्रंथ तयार केल्याचे दिसून येते

या दृष्टीने पाहता रवळोवासकृत सह्याद्रि-वर्णन हा मराठी भाषेतील पहिला दत्तविषयक ग्रंथ मानावा लागेल. दत्तप्रभूच्या लीला ज्या सह्याद्रीच्या आश्रयाने झाल्या, त्या स्थानास प्रमाण मानून रवळोवासानी श्रीदत्तात्रेयाचे माहात्म्य गाइलेले आहे. या छोटयाशा ग्रंथात ५१७ ओव्या असून त्यातील सुमारे १८८ ओव्यात दत्तप्रभूचे चरित्र आले आहे. महानु-भावाच्या पंचकृष्णातील प्रथम अवतार श्रीदत्त होत. श्रीचक्रपाणी, श्रीगोविंदप्रभू, श्रीचक्रधर हे महानुभावी परंपरेप्रमाणे श्रीदत्तात्रेयाचेच अवतार होत. 'या मार्गासि श्रीदत्तात्रेयप्रभु आदिकारण' (सिद्धांतसूत्रपाठ, विचार १८५) असे खुद्द पंथप्रवर्तक श्रीचक्रधरानीच म्हटले आहे. महानुभावाचा हा दत्त एकमुखी असून तो देवता-

वताराऐवजी परमेश्वरावतार आहे ब्रह्मा, विष्णु व महेश या तीन देवतानी अवतार घेतला असे महानुभाव मानीत नाहीत, तर प्रत्यक्ष परब्रह्म परमेश्वरानच अवतार धारण केला अशी त्यांची श्रद्धा आहे 'सह्याद्रिवर्णना'त म्हटले आहे, 'जो चैतन्या विसावा। सकळ देवताचे परदैव। तो अवतरला जीवाचेया कणवा ऋपीवर्शी॥ जो परब्रह्मचपकाचा कळा की दिव्य प्रमेचा पुतळा। ना तो सर्वसूखाचा एकवळा जीवदयेसी' (२१-२२) हा दत्त मागितलेले तर देतोच, पण अनार्जित सुद्धा देतो 'तो हा पैं करुणाकरू जीवा दानदाता उदारू। अनार्जित दे चमतिकारु म्हणौनि दत्त बोल्जि॥' (१४८) महानुभावाचा हा दत्त अवधूत वा सन्यासी असल्यामुळे वर्णधर्मातीत आहे

महानुभावाच्या श्रीदत्ताची अनेक पूज्य स्थाने असून सह्याद्रीवरील माहूर, पचाळेश्वर इत्यादी प्रमुख होत माहूर अथवा मातापूरजवळील पर्वत सह्याद्री म्हणूनच ओळखला जातो दत्तमातेचे गाव माहूर अथवा मातापूर असून सर्वतीर्थ, एकवीरा रेणुकेचे स्थान इत्यादीच्या वर्णनाबरोबर रवळोवासानी २१ ते १८१ ओव्यापर्यंत प्रामुख्याने श्रीदत्तात्रेयाचे वर्णन केले आहे २१ ते १२६ पर्यंत श्रीदत्तमूर्तीचे वर्णन, १२७–१३१ दत्तकृत अलर्कास उपदेश, १३२ ते १३६ सहस्रार्जुनास उपदेश, १३७-१८१ परशुरामावर अनुग्रह, असा एकूण भाग दत्तात्रेयासंबधात आलेला आहे पाठच्या उरलेल्या भागात श्रीचक्रधरचरित्र वर्णन केले आहे शके १२७५ च्या सुमारास लिहिल्या गेलेल्या या ग्रथात श्रीगण-पतीनमन, श्रीदत्तात्रेयनमन, मगलाचरण, श्रीकृष्णनमन, श्रीसहस्रार्जुननमन, श्रीमूर्तिवर्णन, दत्तात्रेय व अलर्कास उपदेश, सहस्रार्जुनास वरप्रदान दत्ता व्याप्ति, श्रीदत्तात्रेयमहिमा, सह्याद्रिवर्णन, परशुरामास दत्तदर्शन इत्यादी महत्त्वाचा भाग दत्तात्रेयासबधीच यात आला आहे दत्तात्रेयाचा महिमा वर्णन करताना कवीने म्हटले आहे

> तैसा परमेश्वरू नव्हे अचिला
> तो सकळ वैभवी आथिला
> जेणे मनुष्यवेष स्वीकारिला
> जीवा अच्यूत देव ॥ १४७ ॥
> तो हा पैं करुणाकरु
> जीवा दानदाता उदारू
> अनार्जित दे चमतिकारू
> म्हणौनि दत्त बोलिजे ॥ १४८ ॥
> तो श्रीदत्तस्वामी साधावा
> ऐसी जाणिव कैंची जीवा
> जयाचा निरूपिता प्रभाव
> वेद नेति म्हणे ॥ १४९ ॥
> तो दानव देवतादानी
> सदा स्तवीजे सुरगणी
> तो क्रीडा करी ए मेदनी
> श्रीदत्तरावो ॥ १५० ॥

रवळोवासाच्या काव्यप्रतिभेचे खरे दर्शन श्रीदत्तप्रभूच्या मूर्तीच्या वर्णनात होते ग्रथाचे नाव 'सैह्याद्रि-वर्णन', 'सैह्याद्री-माहात्म्य', 'सह्याद्रि-वर्णन', 'सैह्याद्रि-वर्णन' अशा विविध प्रकारानी येते रसोत्कटता, अलकार-विपुलता, कल्पनाविलास व वर्णनचातुर्य या दृष्टीनीही हा ग्रथ महत्त्वाचा आहे. श्रीदत्त-प्रभूच्या मूर्तीचे वर्णन पाहा कसे काव्यमय व रेखीव आहे

> जो चैतन्या विसावा
> सकळ देवताचे परदैव
> तो अवतरा जीवाचिया कणवा
> ऋपीवशी ॥ २१ ॥
> जो चैतन्यघनवाचा लावण दीवा
> अत्रीवश-आनद-मुळेवा
> कि स्वयप्रकाश अगट लागवा
> जीवोद्धारणाचा ॥ २२ ॥

किं अनसयागर्भगगनीं तापनाशकु :
उदेला आनंदमृगांकु ।
त्रिभुवन धवळीता एकु :
तृप्त जीवचकोरां ॥ २९ ॥
ते श्रीमूर्ति चांपेगोर :
कवण वर्णवे सुंदर
जिएचें नांवचि उदार :
ते सगुण वोलों कैसी ॥ २८ ॥
जन्हीं संध्यारागाचे सदा :
काले दिजेति जांबूनदा
तन्हीं ते आंगकातिसीं कदा :
उपमूं न ए ॥ ३१ ॥
कनकगीरीचा गाभा सोलुनि :
वरि सूर्यप्रभा संचरौनि
वोप सारिजैल घोंटाळुनि :
तन्हीं उपमा नव्हे ॥ ३२ ॥
घेउनि पद्मरागाचें तत्त्व :
काढुनि सोनेचांपेयाचे सत्व
कनक केतकीचीया दृती एकत्व :
किजैल जन्हीं ॥ ३३ ॥
पाणि करूनि वीजुची खोटी :
परतौनि संध्याराग एकवटी
पूर्णचंद्र वळपैल उटी :
तन्हीं सरि न पवे ॥ ३५ ॥
तया आति कळातुटी :
अस्ता जाए सेवटी
चकोरां उपवासू पाठीं :
होए अंधकारू ॥ ३६ ॥
म्हणौनि दत्ताचिए चंद्रांगकांती :
उपमा नाही श्रीजगतीं
जीवचकोरां नित्यतृप्ती :
मोहांधकारा ठावो नाहीं ॥ ३७ ॥

अमरावती जिल्ह्यातील नांदगाव खंडेश्वर येथील डॉ. अण्णासाहेब अडसोड यांच्या कृपेने कृष्णदासविरचित एक मोठा हस्तलिखित ग्रंथ 'श्रीदत्तविजय' या नावाचा पाहाण्यात आला. या ग्रंथाचे चौतीस अध्याय असून ओवीसंख्या ५७३६ पर्यंत आहे. ऋषिमत, पाराशरनंदन, चंद्रोदर, मार्कंडेयपुराण, सिद्धयामळ, सह्याद्रिखंड, मार्तंडपुराण, पद्मपुराण, विष्णुपुराण, लिंगपुराण इत्यादी विविध प्रकारची सामग्री तपासून कृष्णदासाने हा ग्रंथ लिहिलेला दिसतो. बद्रिकाश्रमवर्णन, अनसूयाख्यान, सुमतिआख्यान, सोम–दुर्वासाख्यान, श्रीदत्ताख्यान, अगस्ति-आख्यान, वारसे–मुंजवर्णन, जयविजयआख्यान, देवल–आख्यान, रेणुका-आख्यान, सहस्रार्जुनवध, मदालसाख्यान, अलर्काख्यान, आत्मतीर्थमाहात्म्य, गोरखबोध, अनसूयावरप्रदान इत्यादी अनेक विषय या अप्रकाशित ग्रंथात आले आहेत. सती अनसूयेचे पातिव्रत्य आणि दत्ताच्या बाललीला यांचे मोठें मनोहर वर्णन कृष्णदासाने केले आहे. पाळणा हालवीत अनसूया गात राहाते,

सृजन करीता श्रमलासी ।
सुखें नीद्रा कीजे जे परयेसी ॥
कवण सृष्ट कवण मीनीज मानसीं ।
न धरावें ऐसी संकामना ॥
हा मृगजळवत पसारा ।
सर्व मीथ्या जाण अवधारा ॥
जो जो जो जो रे जगदीश्वरा ।
सुखें साइत्रीवर नीद्रा कीजे ॥
तुंवा वेद सृजीले सृष्टीसी ।
हा गर्व न धरी नीजमानसीं ।
त्यजोनि धंदा वृथापदीसी ।
अघुना सुखरासी नीद्रा कीजे ॥
म्हणोनि पाळणा घालोनीया ।
सुखेंचि हालवी आनसुया ॥
जो जो जो जो बाळा तान्हीया ।
सुखें सावया नीद्रा कीजे ॥
रजतमरहीत तु मुरारी ।
मी सप्तसार म्हणोनी गर्व न करी ॥

प्रतिपाळक हे भ्रांत आंतरीं ।
तुवा मुरारी न वागवी की ॥
नीज प्रकृती आधीन होउनी ।
सुखें विचरत होतासी निजभुवनीं ॥
तें नित्यत्व नव्हे हे सत्य मानी ।
जो जो म्हणोनी हालवीतसे ॥
(४:१००-०५)

महानुभव पंथ व तत्त्वज्ञान यांचे एक अभ्यासक डॉ. वि. भि. कोलते यांनी महानुभावांच्या दत्तावताराचे वर्णन करताना वर सांगितल्याप्रमाणे महानुभावीय दत्त हा देवतावतार नव्हे, परमेश्वरावतार असल्याचे आग्रहाने सांगितले आहे. 'महानुभाव दत्ताला तीन देवांचा अवतार मानीत नाहीत. पौराणिक कल्पनेप्रमाणे अनसूयेच्या पोटी दत्त म्हणून 'विष्णूने' अवतार घेतला, ही गोष्टसुद्धा महानुभावांना मान्य नाही . . . तो ब्रह्मा, विष्णू, महेशाचा अवतार असल्याचे महानुभावांनी कुठेही म्हटले नाही' ( सह्याद्रिवर्णन : प्रस्तावना, पृष्ठ ४८) डॉ. कोलते यांचे हे विधान मान्य होण्यासारखे नाही. दत्तविजय या ग्रंथात, तो महानुभावीय असूनही अनसूयाख्यानप्रसंगी ब्रह्मा, विष्णू, महेश या तीन देवांच्या अवतारांचेच सविस्तर वर्णन केले आहे. पुढे वर्णन केलेल्या 'दत्तात्रयबाळक्रीडा' या महानुभावीय ग्रंथातही असाच तीन देवतांच्या अवतारांचे वर्णन दत्तजन्माच्या निमित्ताने आलेले आपण पाहाणार आहोतच. 'श्रीदत्तविजय' ग्रंथ अनेक पुराणांच्या आधाराने तयार झालेला असल्याने हिंदू परंपरेचा प्रभाव याही ग्रंथावर फार मोठा आहे. ग्रंथाचा समारोप करताना मराठी भाषेचा गुणगौरव करताना कवीने म्हटले आहे; 'जे गुणग्राहीक असती विशेष । तयासी होईल परम हर्ष । एरासी वाटेल मत्सर द्वेष । निंदिती बहुवसें आइकों पां ॥ असो हे ग्रंथ यश दंड । प्राकृतें भाषा रस गोड । देशी भाषा वळले लाड । ते रुचिकर कोडें कोण भक्षावे ॥ किंवा देवल वचन गिरिचें । प्राकृतेंरूप जांबुवंदाचें । देशभाषा आळंकार कुशरीचे । ते श्रवणीं साच विराजविले ॥ की सह्याद्रखंड कापिस मी म्हणे । विछोर्ण करोनी निर्मीळें वसन । ते स्वामिए करोनी प्रावर्ण । विशेषें भूषण कां मी वर्णु ये ॥' (३४:११९-२२)

महानुभावीय संप्रदायात दत्त-माहात्म्य सांगणारा व दत्तलीला वर्णन करणारा आणखी एक ग्रंथ उपलब्ध आहे. कोणा शारंगधर नावाच्या कवीने सिधयामळ प्रबंधाच्या आधारे आसितदेवलांच्या संवादरूपाने सह्याद्रिवर्णन दत्तचरित्राच्या रूपाने केलेले आहे. या ग्रंथाचे नाव 'दत्तात्रयबाळक्रीडा' असे असून एकूण दहा अध्यायांत ९२४ ओव्या आहेत. 'महदाचार्यें पटप्रतिष्ठित । भालोद पुरीचे महंत । गोविंदराज नामे विख्यात । गुणी गुणवंत सकळांत ॥ तयांच्या आज्ञेवरून । झोपेकुली ज्याचें जनन । गणू पुत्र तोताराम जाण । ग्रंथशोधन तेणें केलें ॥ तरी नेणून दीर्घलघुता । ठेवावें अर्थावरी चित्ता । करावी सद्गुणग्राहकता । हेचि समस्ता विनवणी' अशी नोंद शेवटी ग्रंथशोधकाने केलेली आहे. ग्रंथ लहान असला तरी भाषा, वर्णनशैली आणि रसाळपणा इत्यादी दृष्टींनी मोठ्या योग्यतेचा आहे. प्रारंभी श्रीगुरू दत्तात्रेयांचे नमनच मनास संतोष देणारे आहे. कवी लिहितो, 'जयजय अगाधा निराकारा । जयजय बुधानंदा अपारा । जयजय कृपेचिया सागरा । आनंदभरा दातारा । निरंजन निर्मळ सदोदित । निराकार निराधार निर्धूत । सच्चिदानंद अच्युत । गुणातीत निरामय ॥ तो कृपेचा सागरू । सर्व कर्ता परमेश्वरू । आत्माराम निरंतरू । सुखसागरु सर्वदा ॥' ( १:१-३ ) या पहिल्या अध्यायात शारंगधर कवीने त्रेता युगातील दत्तावताराचे आख्यान वर्णन केले आहे. नैमिषारण्यातील बद्रिकाश्रमात ब्रह्मयाला अत्री नावाचा मुलगा होता. या

बद्रिकाश्रमाचे वर्णन मोठे आल्हाददायक आहे. कवी लिहितो,

'ते नैमिष्यारण्य दुर्घट । बद्री मिरविती वनी दाट । फळें पुष्पें चोखट । सेविती अवीट ऋषी ते ॥ लवती भार लवती हेलावे । गौरवर्ण फळें सुहावे । एके पीतवर्ण महाभव्य । शोभती वैभवे अतिमान्य ॥ कृष्णवर्ण एक निखळ । शोभती जैसे जांभूळ फळ । घड लावती अति सरळ । ऐसे सकळ बद्री जाती ॥ एक पीतवर्ण शोभती । ते पक्वाम्रफळेंची दिसती । भूमीवरी गळोनि पडती । असंख्याति संख्या नाही ॥ एक शुभ्र वर्ण निखळ फळ । जैसा गगनी चंद्र सुढाळ । की मलयागिरी चंदन प्रवळ । काश्मीर कोळ फाकती एका ॥ कित्येकाची हिरवी कांती । अति सुकुमार फळें लोंवती । मदवाते शाखा डुल्लती । फळें पडती भूमिवरी ॥' ( १ २५-३० ) अशा पद्धतीने वनवर्णनाचा विस्तार आहे अशा या बद्रिकावनात श्रीदत्तात्रेयाचा जन्म अत्री व अनसूया यांच्या आश्रमात झाला 'त्या जीवाचे उद्धरण । व्हावया मीच कारण ॥ म्हणोनि निर्गुणत्व सोडोन । स्वये सगुण जाहला ॥ जीवाचे हरोनि अज्ञान । चहू ज्ञानाचा बोध करून । उद्धरू ऐसी इच्छा जाण । धरोनि आपण अवतरला ॥ जेवी सुख द्यावया प्राणा । लागे वर्षावे घना । तेवी हरावया अज्ञाना । होवोनि सगुण अवतरला ॥' (१ ६७-६९) असा अवतारहेतूही स्पष्ट केला आहे अशा या बद्रिकाश्रमात अनिभार्या अनसूया 'सुपुष्पीत असता मंदिरी । शुक्लपक्ष मार्गेश्वरी । चतुर्दशी शुक्रवारी । रोहिणी नक्षत्री प्रगटला ॥ अरुणोदय समयासी । अनसूयेच्या करतळासी ॥ अवतरला दत्तऋषी । प्रभा गृहप्रदेशी फाकली ॥' (१ ७६-७७)

या बालमूर्ती दत्ताचे वर्णनही अतिशय हृद्य असे आहे व्यापकत्वाचे सगुण रूप वर्णन करताना कवीने म्हटले आहे, 'ती पहावया बाळमूर्ति । तटस्थ जाली नेत्रपाती । अनसूया म्हणे पुरली आर्ती । धन्य जगती मी एक ॥ स्वरूप देखोनी हर्षले मन । प्रकाशरूप पाहून खुण । ऋष्यादि नेणत या कारण । नकळे जाण हीन दैवे ॥ विवला प्रभातीचा सूर्य । तैसा दिसे अनसूयातनय । ऋषी म्हणती जयजय । चरणद्वय वंदिती ॥ चरणी विवले तारागण । नखप्रकाश भरले गगन । रजता जिंकिती दशन । विशाद कवण भूषणाची ॥ जानू दिसती मीनाकृती । नेत्र विशाल कृपादृष्टी । नाभिरश्री सामावती । त्रैलोक्यपक्ति जयाच्या ॥ ऐसा पुत्र देखोनि मनी । हर्ष ओसंडे चंद्रवदनी । म्हणे सूर्य स्वर्गादि भुवनी । हा तेजदानी फाकली प्रभा ॥' (१ ८६-९१)

अशा प्रकारे बद्रिकाश्रमातील दत्तजन्माची कथा पहिल्या अध्यायात आलेली आहे पुढील अध्यायात दत्तावताराची पौराणिक कथा सांगण्याच्या निमित्ताने नारदकलहाची हकीगत आली आहे सावित्री, लक्ष्मी, पार्वती यांच्या सांगण्यावरून तीन देव अनसूयेचे सत्व हरण करण्यासाठी बद्रिकाश्रमी आल्याची कथा तिसऱ्या अध्यायात आहे याच अध्यायात पाषाणाच्या गाराचे पक्वान्न अनसूयेने करून वाढल्याची कथा आहे 'तू पतिव्रता शिरोमणी । तरी नग्न होवूनि वाढी आम्हा' असा तीन देवाचा आग्रह झाला परंतु अनसूयेच्या पातिव्रत्याच्या प्रभावाने, सेंगऋषीच्या आशीर्वादाने 'श्रीकर ठेविता कौतुकी । बाळें जाहली नेटकी ॥' या बाळाना अनसूयामातेने चांगले न्हाऊमाखू घातले, पाळण्यात घालून झोपविले अत्री ऋषींना ही सर्व हकीगत समजल्यावर त्यानाही आनंद झाला या उभयतानी या बाळाचे कौतुक केले 'बाळपणी एवढी करणी । पुढें उद्धरशील जीवालागुनी । भक्तजनासि प्रतिपाळुनी । दुष्टालागोनि दंडिसी' (३ ९१) अशी प्रार्थना करून त्यानी या देवाचे मनोभाव पूजन केले 'आसन घालोनि ते अवसरु । वरी सुमन पासोळा सुदरू । उपविष्ट

केला दातारू । जो सर्वेश्वर त्रैलोकीचा ॥ केले करे चरणक्षालन । अत्री अनसूयेने आपण । वरी पूजाद्रव्य आणून । देवार्चन करिताती ॥ भाळी कस्तुरीचा टिळा । सर्वांगी हरिचंदन चर्चिला । मणी जवादी मिरविला । शिरी बांधिला चुडा केसी ॥ श्रीमुकुटी पुष्पमाला । वाहियेल्या सुपरिमळा । बाहोटे वाहिली करकमळा । तेणे भुजदंडा शोभती ॥ करी पुष्पाचा स्तवक । गळा सेवती माळा सुवक । अनर्घ्य रत्नमाळा अनेक । वाहिल्या कौतुके देवासी ॥ कटी रत्नजडित कडदोरा । लेवविले आरक्त पीतांवरा । खोल नाभीचा भोवरा । शोभला शरीरा देवाच्या ॥' ( ९३–९८ ) ही दत्तप्रभूंची पूजा विलोभनीय नाही असे कोण म्हणेल ?

यानंतर चौथ्या अध्यायात दत्तप्रभूच्या उपनयन समारंभाचे वर्णन आहे आपले पती परत मिळावेत म्हणून लक्ष्मी, पार्वती व सावित्री यांची मागणी याच अध्यायात आहे संगराण्याने तीनही देवाना त्याच्या त्याच्या नायकाच्या स्वाधीन केले, ' तिन्ही देव दिधले दान । दत्त म्हणती या कारण । अत्रीतनय म्हणून । दत्तात्रय म्हणे विरंची मग ॥ तिन्ही देव जाहले एक । म्हणती हा ब्रह्म अलौकिक । हाचि सकळांचा नायक । देखिला देख नयनाही ॥ '(४ ८१-८२) याही अध्यायात दत्तात्रेयाच्या पूजेचे सुरेख वर्णन आहे पाचव्या अध्यायात सह्याद्रिकथा असून माहूर येथील देवदेवेश्वर लिंगाच्या निर्मितीचे आख्यान आले आहे येथे दत्ताच्या आगमनाचा वृत्तान्त आहे सहाव्या अध्यायात यदू राजास दिलेल्या ज्ञानबोधाचे वर्णन आले आहे यदूने या अवधूताचे स्वागत व पूजन कसे केले ? 'फोडोनिया रत्नभांडार । यदूने आणिले अपार । अनर्घ्य रत्नांचे अलंकार । नाना प्रकार शोभत ॥ आणिल्या वस्त्रांचिया राशी । घडियावरी घडी विशेषी । नाना सुगंध समरसी । करोनि उटण्यासी आणिले ॥ तेणे आपोळी सारोनी । सिंहासनी आरुढवोनी । माणिकरंग पाटोळा सुमनी । कडदोरा अर्पित रत्नजडित ॥ भाळी केशराचा टिळा । ऊर्ध्व पुंड्र यदूने रेखिला । सर्वांगी चंदन चर्चिला । रत्नकंठी गळा शोभत ॥ मुकुटी सुवर्ण कलापे । जटा बांधीत राव साटोपे ॥ पुष्पाचिया माळा अमूप । शोभती निकोप श्रीकंठी । पुष्प कळियांचे हार । अगाध शोभती सविकार । पुष्पगुच्छ अरुवार । गळा अपार शोभती ॥ दशांगुळी मुद्रिका चांग । कर्णी कुंडलांचा दिव्य रंग । रत्न विशेषी उत्तमांग । यदू सवेग अर्पित ॥ ' (६ १६-२२)

सातव्या अध्यायात मदालसा, पद्मनाभपी आणि अश्वलायन सारख्यांना असा विषय आलेला आहे आठव्या अध्यायात दत्तप्रभूंच्या कोल्हापूर, पांचाळक्षेत्र, आत्मतीर्थ, काशी, प्रयाग, इत्यादी स्थानातील आगमनाचा वृत्तान्त आहे नवव्या अध्यायात सहस्रार्जुन, परशुराम, रेणुकादेवी इत्यादींचा कथाभाग आला आहे दहाव्या अध्यायात अलर्क राजाची कथा, शंकराचार्यांना बोध, भीमगिरीच्या शेख फरिदावर अनुग्रह, गोरक्षास बोध, अनसूयामातेस दर्शन इत्यादी हकीगत आलेली आहे. या मातेने पाहिलेल्या दत्तमूर्तीचे मोठे अवीट वर्णन कवीने केले आहे. 'आरक्तवर्ण चरणकमळ । मध्यें सामुद्रिकाची झळाळ । ऊर्ध्वरेषा अति निर्मळ । गुल्फें तेजाळ सुधाकर ॥ ध्वजवज्रांकुश गहन । दुसरे सढळ कमळ जाण । अंगुष्ठीं सूर्यबिंब प्रकाशमान । अंगुळिया शोभत नक्षत्रे ॥ चहुयुगी दिधला थारा । ऐसा हा अनुपमेय अवधारा । ब्रह्मादीक्याही सुरवरा । जाला सोयरा विसावा ॥ पोटरिया निर्मळ अवधारा । गुढघे शोभती गंभीरा । जंघा इंद्रनीळ सुंदरा । शोभती शरीरा देव पै ॥ कटप्रदेशी घनदाट । आरक्तवर्ण पाटोळा श्रेष्ठ । दिसे ब्रह्मचर्याचीच पेठ । सोग रुळत हृदयावरी ॥ सखोल दिसे नाभीकमळ । अनर्घ्य रत्नें शोभे वक्ष स्थळ । निर्गुणाचे सगुण निर्मळ । रूप सोज्वळ

दिसतसे ॥ त्रिभुवन सामावले जेथें । ती दोंद उल्हासें मिरवीत । ब्रह्मविद्येचें स्थान साक्षात । आनंदभरित दत्तात्रय ॥ प्रसन्नवदन सदा सर्वदा । मुखीचा विडा देतसे मोदा । कपोल सोज्वल अवीट सदा । आजानबाहू मर्यादा श्रीकरांची ॥ सर्वसाक्षी नेत्रकमळ । आनंदभरित सर्व काळ । शृंगारयुक्त महातेजाळ । निमिष कल्लोळ सिंधूसम ॥ शारंग धनुष्याचिये परी । भिवया दिसती नेत्रांवरी । देखोनि देवांगना कुसरी । सपरिवारीं ओवाळिती ॥ कंठीं वनमाळा मनोहर । मुकुटीं हेमकलाप सुंदर । शिरीं शोभे अलंकार । तेणें गंभीर रूप दिसे ॥ भाळप्रदेशीं कुंकुमचंद्र । नानालंकारें कर्ण पवित्र । कुंडलप्रभे दत्तवक्त्र । झळके साचार सूर्यासम ॥ कंठीं झळके चौसरी । भाळी मिरवे कस्तुरी । मेखलेचि विशेष थोरी । शोभे करीं दंडकमंडलू ॥ श्रीचरणीं चैतन्य वाहणा । अति सुरेख दोन्ही जाणा । मुकुटीं अनर्घ्यरत्न गहना । कुंडल कानीं शोभती ॥ रातोत्पलाची रंगछटा । मध्यें मारीतसे बरवंटा । शोभा आणिली श्रीमुकुटा । देखतां चित्ता आकर्षी ॥ नानापरीचे सूर्यकिरण । मुकुटीं जाहलें भूषण । तेणें शोभे अत्रिनंदन । कृपाघन दत्तात्रय ॥' (१०:६४-७९)

अशा या दत्तप्रभूंनी केलेल्या अनेक लीलांचे वा क्रीडांचे मोठे सुरेख चित्रण दत्तमूर्तीच्या वर्णनासह या छोट्या ग्रंथात आहे. 'ऐसा दत्तात्रय अवधूत । सह्याद्रिसी क्रीडा करित । चरणचालीं अवघा पर्वत । केला पुनीत प्रभुराये ॥' (१०:१००) अशा भाषेत कवीने माहूरच्या सह्याद्रीचे महत्त्व सांगितले आहे. ग्रंथाची समाप्ती करताना कवीने म्हटले आहे, 'ग्रंथ नाम सह्याद्रि आख्यान । जे ऐकती भावें करून । तयांसी नाहीं पुनर्जन्म । होय क्षालन महादोषां ॥ निपुत्रिका पुत्र होती । निर्धन पावे धनसंपत्ति । पांगुळासी पदप्राप्ती । मुके होती वाचाळ ॥ हे बालक्रीडारूप अमृत । जे प्राशिती सादर चित्त । ते होती परम पुनीत । भाग्यवंत चरित्रतेजे ॥' (१०:१०५-१०७) शेवटी अत्रिनंदनाची केलेली प्रार्थना येथे देण्यासारखी आहे. कवी शारंगधर म्हणतो, 'जय जय जी अत्रिनंदना । जय जय जी दोषभंजना । त्रितापबंधछेदना । करुणाघना तुज नमो ॥ जय जय जी लावण्यरूपा । जय जय जी आनंददीपा । जय जय जी मायबापा । करावी कृपा स्वामियां । जय जय जी अमोघदर्शना । चातकालागीं कृपाघना । वर्षोनि दर्शन देई लोचना । हीच प्रार्थना देवराया ॥ जय जय जी आनंददाता । जय जय जी श्रीअनंता । अमृत वर्षोनिया मृता । होसी जीवविता तूं एक ॥ जय जय जी अत्रिकुमरा । जय जय जी अघसंहारा । सह्याद्रीचिया नृपवरा । दत्त दिगंबरा तुज नमो ॥' (१०:११२-११६)

## काही स्फुट ग्रंथ

नित्य पठणास वा पारायणास उपयोगी पडणाऱ्या दत्तग्रंथांचा थोडक्यात परिचय करून दिल्यानंतर आता दत्तभक्तांना प्रिय असणाऱ्या काही किरकोळ ग्रंथांचा या प्रकरणाचा येथे उल्लेख करावयाचा आहे. गोरक्षनाथाना दत्तात्रेयांचा बोध असल्यामुळे नाथसंप्रदायाचे महत्त्वाचे ग्रंथ दत्तभक्तांच्या वाचनात असतात. शके १७४१ मध्ये धुंडीसुत नरहरि मालूने तयार केलेला **नवनाथ भक्तिसार** हा ग्रंथ नवनाथांच्या लीला वर्णन करणारा असून त्यात दत्तात्रेयांचे दर्शन मधून मधून आहे. शके १८३४ मधील आदिनाथ भैरवाचा **नाथलीलामृत** हा ग्रंथही नाथ व दत्त–सांप्रदायिकांना प्रिय आहे. **गोरक्ष-अमर–संवाद, गोरक्षगीता, गहिनीप्रताप,** सत्यामलनाथांचा **सिद्धान्तरहस्य, सिद्धान्तसार, ज्ञानप्रदीप, ज्ञानदीपबोध** असे काही ग्रंथ सांप्रदायिकांना पूज्य वाटतात. श्रीपादवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती यांच्यानंतर झालेल्या अनेक

सत्पुरुषांची कित्येक लहान मोठी प्रकरणे, आख्याने, शेकडो पदे असे मोठे विपुल दत्तवाङ्मय उपलब्ध आहे. जनार्दनस्वामी, एकनाथ, दासोपंत इत्यादींचे दत्तवाङ्मय मराठीत आजही वाचले जाते. **दत्तनाममहिमा, दत्तमानसपूजा, दत्तजन्म** अशी एकनाथाची काही प्रकरणे हृद्य आहेत.

दत्तभक्तीने आर्त झालेली दासोपंतांची शेकडो पदे उपलब्ध आहेत. स्वतःला 'दत्ताच्या पदकमळांतील भ्रमर' म्हणवून घेणारा मुक्तेश्वर हा एक थोर दत्तोपासक होता. दत्तात्रेयांचा एक अवतार लीलाविश्वंभर नावाचा होता, त्याची उपासना मुक्तेश्वर करीत. अलीकडच्या काळातील निरंजन रघुनाथांचीही अनेक पदे दत्तभक्तीने मधुर बनली आहेत. थोर दत्तभक्त नारायण महाराज जालवणकर यांच्या **सप्तसागर** ग्रंथाची ओवीसंख्या १७६७२ पर्यंत असून बोधसागर, कैवल्यसागर, ज्ञानसागर, विज्ञानसागर, आनंदसागर, शांतिसागर, हे त्याचे विभाग सांप्रदायिकांना प्रिय वाटतात. हुमणाबादेजवळच्या माणिकनगरच्या 'सकलमत' संप्रदायाचे प्रवर्तक श्रीमाणिक प्रभू यांचेही दत्तपर वाङ्मय विपुल असून त्यांच्या पदांची माधुरी अवर्णनीय आहे.

वासुदेवानंद सरस्वतींचा उल्लेख मागे आला आहेच. संस्कृत **गुरुसंहिता, दत्तपुराण, सप्तशती गुरुचरित्र, श्रीदत्तलीलामृताब्धिसार** आणि अनेक संस्कृत–मराठी स्तोत्रे यांचे पठण-पारायण सांप्रदायिक करीत असतात. बेळगावकडील पंतमहाराज बाळेकुंद्रीकर यांच्या **दत्तप्रेमलहरींच्या** अनेक भागांतून बालावधूत दत्ताचे उत्कट प्रेम व्यक्त झाले आहे. माहूर येथील विष्णुकवींच्या कवितेत दत्तावरील पदे, अष्टके, आरत्या, जन्म, पाळणे इत्यादींना महत्त्वाचे स्थान आहे. **अवधूतगीता** व **गुरुगीता** या दोन ग्रंथांचे चिंतनमनन आजही होत असून दत्तसंप्रदायाचे तत्त्वज्ञान या ग्रंथांनी सिद्ध केले आहे. वा. भा. जोशीकृत **दत्तमार्गसंवाद**, पनवेलच्या फडके यांचा **दत्तभक्तिरहस्य** ग्रंथ, अमृतानंदकृत **योगराजटिळक** असे आणखी काही ग्रंथ दत्तपंथीयांच्या वाचनात नित्य असतात. हरिहर महाराज उदासी यांच्या कवितेत दत्तात्रेय व प्रामुख्याने अनसूयामाता यांची अती रेखीव व सुबक वर्णने येतात. गुजराथमधील नारेश्वरचे रंगावधूत यांचे गुजराथी व मराठी भाषेतील ग्रंथही सांप्रदायिकात प्रसिद्ध आहेत. **श्रीगुरुलीलामृत, अवधूती आनंद, दत्तबावनी, श्रीदत्तपंचपदी, दत्तउपासना** इत्यादी गुजराथी ग्रंथ व **रंगहृदयम्, श्रीवासुदेवनामसुधा, दत्तनामसंकीर्तनम्, दत्तनामस्मरणम्, दत्तरक्षास्तोत्रम्, श्रीवासुदेवसप्तशती**, अशी काही संस्कृत प्रकरणे रंगावधूतांची आहेत. **श्रीवासुदेव सप्तशती रंगतरंग** इत्यादी मराठी ग्रंथांतून रंगावधूतांचे दत्तप्रेम व्यक्त झाले आहे.

यांखेरीज स्तोत्रे, अष्टके, आरत्या, पाळणे, धावे अशा स्फुट पदांचे वा कवनांचे अनेक लहानमोठे संग्रह दत्तभक्तांना उपलब्ध आहेत. **श्रीदत्तस्तवराज, श्रीदत्तस्तवनामृत, श्रीदत्तगीतांजली, श्रीदत्तपदगुच्छ, दत्ताची पदे, दत्तप्रेमसर्वस्व** अशी आणखी किती तरी पुस्तके दत्तभक्तांना उपयोगी पडतात. रत्नागिरीचे विनायक वासुदेव साठे यांची **श्रीदत्तपद्यसंग्रह** व **श्रीदत्तभजनगाथा** ही दोन पुस्तके दत्तप्रेमीयांना मोलाची वाटतील. दत्तप्रेमीयांना मराठी भाषेतील पदे जशी आवडतात तशी त्यांना संस्कृत स्तोत्रावरही फार आस्था आहे. दलादन ऋषिकृत दत्तलहरी, नारदविरचित दत्तात्रेयस्तोत्र, दत्तवेदपादस्तुती, श्रीदत्तात्रेयभक्तिनिरूपणस्तोत्र, श्रीदत्तात्रेयवज्रकवच इत्यादी अनेक स्तोत्रांचे पठण दत्तभक्त करीत असतात. यांतील प्रमुखांचा संग्रह या ग्रंथाच्या उत्तरार्धात केलेला आहे.

दत्तपंथीयांना पारायणासाठी व नित्यपठणासाठी जे ग्रंथ प्रचलित आहेत त्यांचा ओझरता परिचय करून घेतल्यानंतर आता दत्त व दत्तपंथ यांच्या ऐतिहासिक व तात्त्विक पार्श्वभूमीची चिकित्सा करणाऱ्या काही ग्रंथांची थोडक्यात ओळख करून घेऊ. पहिला उल्लेखनीय प्रयत्न म्हणजे हरिप्रसाद शिवप्रसाद जोशी यांचा इंग्रजी भाषेतील ऑरिजिन अँड डेव्हलपमेंट ऑफ् दत्तात्रेय वर्शिप इन इंडिया हा बडोद्याच्या सयाजीराव विद्यापीठाने प्रसिद्ध केलेला प्रबंध होय. या संशोधनात्मक प्रबंधात दत्त व दत्तपंथ यांच्या भारतातील उगमाचा व विस्ताराचा श्री. जोशी यांनी विस्तृत आढावा घेतलेला आहे. ऋग्वेद, उपनिषदे, आर्ष महाकाव्ये, पुराणे, पंचमहाकाव्ये, शिल्प आणि शिलालेखादी सामग्री यांच्या माध्यमातून दत्तकल्पना, त्रिमूर्तिकल्पना यांचा विकास कसा झाला, यासंबंधी सूक्ष्मतेने शोध ग्रंथकाराने घेतलेला आहे. दत्तपंथाच्या विकासकाळात श्रीपादवल्लभ, श्रीनृसिंहसरस्वती, जनार्दन स्वामी, एकनाथ स्वामी, दासोपंत, भैरव अवधूत ज्ञानसागर, निरंजन रघुनाथ, नारायण महाराज जालवणकर, दत्तनाथ उज्जनीकर, माणिक प्रभू, अक्कलकोटकर स्वामी, वासुदेवानंद सरस्वती, गांडा महाराज, पंत महाराज बाळेकुंद्रीकर, साईबाबा, नूरी महाराज, अष्टयाचे श्रीदत्त महाराज, नारायण महाराज केडगावकर, रंग अवधूत महाराज अशा अनेक दत्तावतारी सत्पुरुषांच्या व दत्तभक्तांच्या चरित्रांचा व कार्याचा परिचय श्री. जोशी यांनी मार्मिक रीतीने करून दिलेला आहे. दत्तपंथीयांची प्रतीके, प्रसिद्ध दत्तक्षेत्रे, इतर पंथांशी संबंध असे काही नवे विषयही या ग्रंथात चर्चेसाठी आले आहेत. प्रबंधाच्या प्रारंभी दत्तपर वाङ्मयाची विस्तृत सूची असून शेवटी एका परिशिष्टात अड्यार, बडोदा, मुंबई, कलकत्ता, मद्रास, म्हैसूर, पुणे, तंजावर, अलवार इत्यादी ठिकाणच्या दत्तविषयक हस्तलिखित प्रकरणांची वा ग्रंथांची एक महत्त्वाची नोंदही अभ्यासकांना उपयुक्त होईल अशी आहे.

दत्तपंथावरील संशोधनात्मक अशा या इंग्रजी ग्रंथानंतर पनवेल येथील थोर दत्तभक्त सदाशिव कृष्ण फडके यांच्या दत्तात्रेयासंबंधीच्या ग्रंथांचा उल्लेख करणे अगत्याचे होईल. श्रीदत्तोपासना, श्रीदत्तमुक्तामाला, श्रीदत्तपंचामृत, श्रीदत्तचिंतन अशा काही ग्रंथांतून फडके यांनी दत्तात्रेय व दत्तपंथ यांसंबंधी मोठ्या भाविकतेने आणि श्रद्धाळू वृत्तीने लेखन केले आहे. श्रीदत्ताची प्राथमिक आराधना, श्रीगुरुदत्तजन्म, अवधूताचे चोवीस गुरु, विभूति आणि मूर्तिमाहात्म्य आणि अवतारमीमांसा असे काही विषय विस्ताराने श्रीदत्तोपासना या ग्रंथात आले आहेत. तर श्रीदत्तमुक्तामाला या ग्रंथात त्रिमूर्तितत्त्व, ज्ञानाचे रहस्य श्रीदत्तगुरूंचे अवतार, श्रीदत्तगुरूंचे चरित्र, श्रीदत्तोपदेश, श्रीदत्तविभूति, श्रीगुरुचरित्र, माणिकप्रभूंचे चरित्र, अक्कलकोट स्वामींचे चरित्र, श्रीदत्तभक्त गोरखनाथ, दत्तभक्त जनार्दनस्वामी, दत्तभक्त एकनाथ, दासोपंत, नारायण महाराज जालवणकर, श्रीवासुदेवानंद सरस्वती, श्रीभैरव अवधूत ज्ञानसागर, श्रीविष्णुकवी माहुरकर, श्रीनारायणमहाराज केडगावकर, श्रीदत्तसंप्रदाय असे विषय सविस्तर चर्चिले गेले आहेत. श्रीदत्तपंचामृत नावाच्या ग्रंथात फडके यांनी दत्तभक्तासाठी नित्य पठणीय अशा स्तोत्रांचा व अष्टकांचा संग्रह केलेला आहे. श्रीदत्तपूजन, श्रीदत्तपठण, अशासारख्या लहान प्रकरणांतून श्रीदत्तलहरी, दत्तात्रेय वज्रकवच, श्रीदत्तचरित्रामृत, श्रीदत्तमाहात्म्य, गुरुचरित्रअवतरणिका, श्रीदत्त भजनाचे अभंग अशी उपयुक्त सामग्री आलेली आहे. श्रीजाबालदर्शनोपनिषद् अवधूतोपनिषद्, दत्तात्रेयोपनिषद्, अवधूतगीता, बावनश्लोकी गुरुचरित्र इत्यादी विविध प्रकारची प्रकरणे दत्तभक्तांना उपयुक्त वाटतील अशी या ग्रंथात

आलेली आहेत. **श्रीदत्तचिंतन** या तात्त्विक व नावाप्रमाणे तत्त्वचिंतक ग्रंथात फडके यांनी दत्तोपासनेचे अंतरंग पुनः न्याहळून पाहिले आहे. उपास्य-उपासक-उपासना या एका विस्तृत प्रकरणात लेखकाने दत्तभक्तीचे तात्त्विक विवेचन केले आहे. दत्तभक्तांची चरित्रे देताना फडके यांनी वाचकांना श्रीनिरंजन रघुनाथ, श्रीपंत-महाराज बाळेकुंद्रीकर अशा भक्तांची ओळख करून दिल्यानंतर दत्तप्रेमिकांना नित्य उपयोगी पडतील अशी काही भजने, अभंग व पदे यांच्या रूपात दिलेली आहेत. शेवटी उपसंहारात पुनः दत्तविषयक तात्त्विक मननचिंतन आले आहे. फडके यांचे ग्रंथ श्रद्धाळू वृत्तीने लिहिले गेले असले तरी माहिती आणि चिंतन या दृष्टींनी दत्तभक्तांना ते खात्रीने उपयुक्त होतील असे आहेत.

दत्त सांप्रदायिकांना मोलाचा व मार्गदर्शक वाटेल असा आणखी एक महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे रा. चिं. ढेरे यांचा **श्रीनरसिंह सरस्वती : चरित्र आणि परंपरा : दत्तसंप्रदायाचा इतिहास** हा होय. दत्तसंप्रदायाची ऐतिहासिक चिकित्सा करून ढेरे यांनी या संप्रदायाचा उदय व विस्तार या पुस्तकात सुलासेवार कथन केला आहे. दत्तावताराचे रहस्य, दत्तोपासना: उदय व विकास, श्रीनरसिंह सरस्वती: जीवन व कार्य, दत्तोपासक साधुसंत, दत्तसंप्रदाय अशा काही प्रकरणांतून ग्रंथकाराने दत्तोपासनेचे व संप्रदायाचे स्वरूप स्पष्ट करण्याचा प्रयत्न चिकित्सक बुद्धीने केलेला आहे.

यानंतर आता आणखी एका दृष्टीने सांप्रदायिक ग्रंथांचा निर्देश करावयाचा आहे. नृसिंहवाडी, औदुंबर, माहूर, गाणगापूर, माणिकनगर इत्यादी दत्तपंथीयांच्या केंद्रांतून वारंवार दत्तभक्तीचे वाङ्मय प्रसिद्ध होत असते. रत्नागिरीच्या ब्रह्मीभूत वि. वा. साठे यांचा उल्लेख मागे आलाच आहे. **श्रीदत्तसेवा, श्रीदत्तोपासनासोपान, उपासनामार्गातील खाणाखुणा** (भाग ६), **बालदत्तलीला** असे काही महत्त्वाचे ग्रंथ या केंद्रातून प्रसिद्ध झाले आहेत. माणिकनगरच्या सकलमतसंप्रदायाची **ज्ञानमार्तण्ड, उपासनामार्तण्ड, पद्ममाला** अशी काही पुस्तके पंथीयांना मार्गदर्शन करणारी आहेत. पुण्याच्या श्रीवासुदेवाश्रमामार्फतही बरेच सांप्रदायिक वाङ्मय प्रसिद्ध होत असते. वासुदेवानंद सरस्वतींच्या अनेक खंडात्मक ग्रंथांबरोबर **योगभक्तिदर्शन**सारखा विशेष अंकही उल्लेखनीय आहे.



# ७ विविध संप्रदाय

## नाथ संप्रदायात दत्तात्रेय



मागे दत्तस्वरूप, दत्तचरित्र, दत्तपरंपरा इत्यादी प्रकरणातून दत्तसंप्रदायाच्या विकासाची दिशा आपणास समजली. आता येथे मध्ययुगीन काळात दत्तात्रेयाच्या प्रेरणेपासून जे विविध धर्मपंथ वा उपासनासंप्रदाय उदित झाले व शतकानुशतके सांस्कृतिक कार्य करून राहिले, त्याच्या संदर्भात दत्तात्रेयांची ओळख करून घ्यावयाची आहे. ब्रह्मा, विष्णू व महेश याचे ऐक्य धारण करणाऱ्या दत्तप्रभूंचा स्पर्श सर्वगामी असल्याकारणाने भारताच्या धार्मिक व सांस्कृतिक जीवनात दत्तप्रभूंना व दत्तभक्ताना महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे. नाथ, महानुभाव, वारकरी, इत्यादी प्रमुख धर्मपंथांचा दत्तात्रेयांशी संबंध आहे. सर्व पंथांना आदिस्थानी असणाऱ्या नाथपंथाचाच विचार प्रथम करू.

नाथसंप्रदाय एक प्रमुख असा योगप्रधान शैव संप्रदाय असून आदिनाथ शिव हेच याचे उपास्य दैवत आहे. योगमार्गाने शिवावस्था, सिद्धावस्था, अवधूतावस्था प्राप्त करून घेणे हे या पंथाचे ध्येय असून योगसंप्रदाय, सिद्धसंप्रदाय, अवधूत संप्रदाय अशीही याला नावे आहेत. गोरक्षनाथ अथवा गोरखनाथ या एका सामर्थ्यवान पुरुषाने या संप्रदायाची वाढ केली असून याची गुरुपरंपरा आदिनाथ-मत्स्येंद्रनाथ-गोरक्षनाथ अशी आहे. याचे गुरू मत्स्येन्द्रनाथ हे कदलीवनात योगिनी कौल नावाच्या स्त्री-प्रधान तांत्रिक पंथात गुरफटले होते. त्यांना या हीन

व पतित अशा साधनमार्गातून बाहेर काढून, गोरक्षनाथांनी फार मोलाचे कार्य केले आहे. तांत्रिक साधकांच्या विकृत व विपरीत आचारांतून जनसामान्यास मुक्त करण्याचे श्रेय श्रीगुरू गोरक्षनाथास द्यावयास हवे. मत्स्येन्द्रनाथ, गोरखनाथ इत्यादी नाथांची लीलास्थाने दत्तभक्तांना नेहमीच प्रिय वाटतात. कदली वन, गिरनार, हिमालयाचा पायथा, अशी अनेक स्थाने दत्तप्रेमीयांना पवित्र वाटतात. प्रयाग, अयोध्या, त्र्यंबकेश्वर, द्वारका, हरद्वार, बद्रीनाथ, केदारनाथ, वृंदावन, पुष्कर, रामेश्वर, नेपाळमधील पशुपतिनाथ, काश्मीरमधील अमरनाथ, हिंगलाज इत्यादी पवित्र क्षेत्रांनाही नाथपंथीयांत यात्रेजत्रेच्या निमित्ताने महत्त्व येते. उत्तर प्रदेशातील गोरखपूर, नगर जिल्ह्यातील वृद्धेश्वराचा डोंगर, त्र्यंबकेश्वर अशा काही क्षेत्रांत नाथपंथीयांचे मेळावे भरतात.

नाथ संप्रदायाचे सिद्धान्त सांगणारे, त्यांच्या साधनेचे स्वरूप वर्णन करणारे अनेक ग्रंथ आजकाल उपलब्ध झाले आहेत. गोरखनाथांचा **सिद्धसिद्धान्तपद्धती** हा ग्रंथ या पंथीयांना प्रमुख वाटतो. गोरक्षपद्धती, हठयोगप्रदीपिका, सिद्धसिद्धान्तसंग्रह आणि गोरक्षसिद्धान्तसंग्रह यांसारख्या अनेक ग्रंथांना या पंथात मोलाचे स्थान आहे. दहाव्या-अकराव्या शतकात प्रभावीपणे कार्य करणाऱ्या गोरखनाथांना डॉ. हजारीप्रसाद द्विवेदी यांनी श्रीशंकराचार्यांइतके महत्त्व दिले आहे. अमनस्कयोग, अमरौघशासनम्, अवधूतगीता, गोरक्षकल्प, गोरक्षकौमुदी, गोरक्षगीता, गोरक्षचिकित्सा, गोरक्षपद्धती, गोरक्षशतक, गोरक्षसंहिता, चतुरशीत्यासन, ज्ञानशतक, ज्ञानामृतयोग, नाडीज्ञानप्रदीपिका, योगचिन्तामणी, योगमार्तंड, योगसिद्धासनपद्धती, विवेकमार्तंड अशी अनेक लहानमोठी पुस्तके गोरक्षनाथांच्या नावावर मिळतात. महार्थमंजिरी हा ग्रंथ कोणत्या गोरक्षनाथांचा ? हा प्रश्न विद्वानांपुढे असला तरी त्यावरील नाथपंथीय प्रभाव स्पष्ट आहे.

महाराष्ट्रातील ज्ञानेश्वरांची आदिनाथ-मत्स्येन्द्रनाथ-गोरक्षनाथ-गहिनीनाथ-निवृत्तिनाथ-ज्ञाननाथ ही परंपरा प्रसिद्धच आहे. हीच परंपरा पुढे ज्ञाननाथ-सत्यामलनाथ-गैबीनाथ-गुप्तनाथ-उद्बोधनाथ-केसरीनाथ-शिवदिननाथपर्यंत विकसित झाली. **सिद्धान्तरहस्य** तथा **ललितप्रबंध** या नावाचा एक ग्रंथ सत्यामलनाथांचा उपलब्ध आहे. मराठीतील नाथवाङ्मयात **नवनाथभक्तिसार** व **नाथलीलामृत** हे दोन ग्रंथ नाथ व दत्त यांच्या उपासकांना सारखेच प्रिय आहेत. **गोरक्षकिमयागार** या ग्रंथाच्या आधाराने शके १७४१ मध्ये धुंडीसुत मालू नरहरीने एक चमत्कारप्रधान असा ग्रंथ 'नवनाथभक्तिसार' या नावाचा लिहिला. त्यानंतर शके १८३४ मध्ये आदिनाथ भैरवाने 'नाथलीलामृत' नावाचा ग्रंथ लिहिला. हे दोनही ग्रंथ महाराष्ट्रात अतिशय लोकप्रिय आहेत.

महाराष्ट्राप्रमाणेच इतर भारतीय प्रांतातही नाथपंथीय योगी पुरुषांचा प्रभाव आहे. मच्छिंदर, गोरख, जालंधर, कानिफ, चरपटी, नागेश, भरत, रेवण, गहिनी हे नवनारायणांचे अवतार नवनाथ म्हणून प्रसिद्ध आहेत. ओंकारनाथ, शैलनाथ, संतोकनाथ, अकलकंथुनाथ, गजबली गजकांतनाथ, उदयनाथ, मत्स्येन्द्रनाथ, गोरखनाथ, पूरणभरत अशाही नवनाथांची नावे सांगितली जातात. सत्यनाथी, धर्मनाथी, रामपंथी, नाटेश्वरी, कन्हड, कपिलानी, वैरागपंथी, माननाथी, आईपंथी, पागलपंथी, ध्वजपंथी, गंगानाथी असे काही शाखाभेदही नाथपंथाचे उत्तर काळात झालेले दिसतात. या शाखांतून वा पंथाच्या विस्तारातून अनेक सिद्ध व अनेक योगी यांची नामावली दिसते. चौरंगीनाथ, चामरीनाथ, तंतिपा, हालिपा, केदारिपा, धोंगपा, दारिपा, विरूपा, कपाली, कमारी, कान्ह, नकखल, मेखल, उन्मन, जालंधर, टोगी, सरहपा,

मीनपा, गोरखपा, चोरंगीपा, नागार्जुन, चर्पटी, भर्तृहरी, गगनपा, सारंग, भैरव इत्यादी चौऱ्याऐंशी नाथ अथवा सहजयानी सिद्ध प्रसिद्ध असून त्यांच्या अनेक चमत्कारिक लीला भारत-भर लोकमानसात रूढ होऊन बसल्या आहेत.

अलीकडे दिसणाऱ्या कानफाटी योग्यांची परंपरा धर्मनाथापासूनची असली तरी नाथपंथी योगीचा वेष त्यांच्यावरूनही समजण्यासारखा आहे. कर्णकुंडले, धंधारी नावाचे चक्र, रुद्राक्षमाळा, किंगरी नावाचे सारंगीसारखे एक वाद्य, मेखला, जानवे, शृंगी अथवा शिंग, कंथा अथवा गोधडी-सारखे वस्त्र, दंडा, खापरी, अधारी; ही सांप्रदायिक वेषाची बाह्य लक्षणे दत्तसांप्रदायिकांना नवीन नाहीत. दत्तात्रेयाचे दर्शन अनेकदा याच योगी वा सिद्ध महात्म्यांच्या वेषातच अनेकांना झालेले आहे. काली, अंबा, जगदंबा, दुर्गा अशी शक्तीची रूपे आणि भैरव, कालभैरव, एकलिंग अशी शिवाची रूपे नाथपंथीयांना प्रिय झाली. शक्तियुक्त शिव हेच या संप्रदायाचे आराध्य दैवत आहे. शिवशक्तीचे ऐक्य, योगमार्ग, कुंड-लिनीप्रभाव, गुरुमहिमा, प्राकृत भाषांचा स्वीकार, जातिनिरपेक्ष दृष्टी, अशी देणगी भारतीय साधनापरंपरेत याच नाथपंथाने दिलेली आहे.

चंद्र आणि चंद्रिकेप्रमाणेच शिव आणि शक्ती यांच्यात अभेद असतो. दोन टिपऱ्यांचा एकच नाद, दोन फुलांचा एकच सुगंध, दोन ज्योतींचा एकच प्रकाश, दोन ओठांतील एकच शब्द, दोन डोळ्यांतील एकच दृष्टी, त्याच-प्रमाणे विश्वाच्या पसाऱ्यात शिवशक्ती एक-त्वाने नटल्याचे मोठे मनोल्हादक व तत्त्वदर्शी वर्णन ज्ञानेश्वरांनी अनुभवामृताच्या पहिल्याच अध्यायात केले आहे. जे ब्रह्मांडात आहे ते ते सर्व पिंडात म्हणजे शरीरात आहे, असाही या पंथाचा एक सिद्धान्त आहे. पिंडब्रह्मांडाच्या अंतर्यामी असलेल्या शिवाशी समरस होण्यासाठी हठयोगाची साधना नाथपंथात महत्त्वाची मानली आहे. मानवी शरीरातील कुंडलिनीरूपाची सुप्त शक्ती मस्तकामधील सहस्रधारचक्रातील शिवाशी समरस करून घेणे हे या हठयोगाचे ध्येय आहे.

शिवाशी शक्ती समरस झाली की योग्यांना परमानंद होतो. याच्या प्राप्तीसाठी नाथपंथात योगाभ्यासाला फार महत्त्व आहे. यमनियमादी आठ अंगे, नाना आसने, नाना मुद्रा अशा यौगिक प्रक्रियांनाही या नाथपंथीय साधनक्रमात ओघानेच स्थान मिळत गेले. कठोर ब्रह्मचर्य, वाक्संयम, शरीरशुद्धी, मानसिक शुद्धी, ज्ञाननिष्ठा, बाह्या-डंबराविषयी अनादर, मद्य व मांस यांचा निषेध, मुंडन, उपवास, तीर्थयात्रा, गुरुभक्ती असा आचारधर्म पुढे अनेक पंथीयांना महत्त्वाचा वाटला. या मार्गातील गुरुमाहात्म्य तर आदर्श रूपाचे मानले जाते. दत्तपंथातील गुरुमहिमा या नाथपंथातील गुरुमहिम्याशी मिळताजुळता आहे. 'गुरुस्तु सन्मार्गशील' गुरू हा सन्मार्ग दाख-विणारा आहे असा गोरक्षनाथांचा एक महत्त्वाचा सिद्धान्त आहे. नाथपंथीयांची सिद्धावस्था कशी असते? हठयोगप्रदीपिकेत म्हटले आहे.

> सर्वावस्थाविनिर्मुक्तः सर्वचिन्ताविवर्जितः ।
> मृतवत् तिष्ठते योगी स मुक्तो नात्र संशयः ।।
> खाद्यते न च कालेन बाध्यते न च कर्मणा ।
> साध्यते न च केनापि योगी युक्तः समाधिना ।।
> न विजानाति शीतोष्णं न दुःखं न सुखं तथा ।
> न मानं नापमानं च योगी युक्तः समाधिना ।।

सर्व अवस्थांनी व सर्व चिंतांनी रहित असा हा योगी मृताप्रमाणे राहतो. तो मुक्त असतो यात संशय नाही. समाधीने युक्त असलेल्या योग्याला काल भक्षण करीत नाही, कर्म त्याला बाधीत नाही, कोणी त्याला अंकित करून घेऊ शकत नाही. शीत व उष्ण, सुख व दुःख, मान व अपमान या द्वंद्वांच्या पलीकडे तो असतो. अशा द्वंद्वातीत महात्म्यांची सुरेख वर्णने ज्ञानेश्वरादी संतांनी केलेली आढळतात.

नाथपंथीयांतील गोरखनाथांना उपदेश दत्तात्रेयांकडून झाल्याची कथा सांगितली जाते. आज ज्याला गिरनार पर्वत म्हणून नाव आहे, त्याला पुराणातरी पुण्यनगरी, वैजयंत, उर्जयन्त अशी नावे असून रैवतक पर्वत म्हणूनही या स्थानाचा उल्लेख केला जातो. याच ठिकाणी भगवान दत्तात्रेय व गोरक्षनाथ यांच्या गाठीभेटी होत होत्या. सिद्धीचे सामर्थ्य दाखवून येथेच श्रीदत्तात्रेयांनी गोरखनाथाशी ज्ञानचर्चा केली. त्यांच्यावर अनुग्रह केला. कमंडलुतीर्थावर या विख्यात गुरुशिष्याची बोधचर्चा चाले. परपरागत कथा अशी आहे की, दहाव्या शतकात नाथाचार्य श्रीगोरक्षनाथ सोमनाथ महादेवाच्या दर्शनास जात असताना वाटेत गिरनार पर्वतावर थांबले. या पुण्यकारक व निसर्गसौदर्याने नटलेल्या भूमीने त्याना आकर्षित केले. या पर्वताची देवता भगवती अंबा. त्यांनी तिचेही स्तवनपूजन केले. पर्वतशिखरावरील दत्तपादुकांचे दर्शन घेतल्यावर श्रीगोरखनाथांना समजले की, जवळच एका गुहेत भगवान दत्तात्रेयाचा निवास असतो. गोरखनाथांनी त्या गुहेचा शोध घेतला. गुहेत त्यांना एक दिगंबर, भस्मचर्चित, जटाजूटधारी व उन्मत्त वृत्तीत रमलेली अशी एक व्यक्ती दिसली. हेच ते दत्तावधूत की काय ? अशी त्याना शंका आली. दुपारची भिक्षेची वेळ झालेली असल्याकारणाने गोरखनाथांनी आपली झोळी खांद्यावरून उतरविली, तो ती एकाएकी आकाशात उडून गेली व पंचपक्वान्ने घेऊन परत आली. गोरक्षनाथांनी समोरच्या पिशाचवत् व्यक्तीस विचारले,

'माझ्याबरोबर आपण काही घेणार का ?'

'मी सध्या गाईचे दूधच प्राशन करीत असतो'

'आपणांस गोदुग्ध कोण आणून देतो ?'

'दूध कोणी आणून देत नाही. किंवा माझा कमंडलूही दूध आणायला जात नाही. जरूर पडली की या कमंडलूत नेहमीच दूध असते.'

गोरक्षनाथांनी पाहिले, तो कमंडलूत ताजे दूध भरपूर होते. या पिशाच-व्यक्तीची आणखी तपासणी करावी या बुद्धीने गोरक्षनाथांनी तिला विचारले, 'आज मलाही गोदुग्धाची भिक्षा मिळणार वाटते.' त्यावर त्या व्यक्तीने उत्तर दिले, 'नाही महाराज, जे काही आहे ते आपलेच आहे. आपण घ्या ना. मला आनंद वाटेल त्यात.' गोरक्षनाथांनी हसून कमंडलू हातात घेतला आणि आपल्या कटोऱ्यात ते दूध ओतू लागले. नवल असे की, भरलेल्या कमंडलूतील दुधाची धार चांगली पडत होती, पण कटोऱ्यात मात्र दुधाचा थेंबही नव्हता ! सद्‌गुरु अनंत हस्तांनी, मुखांनी द्यायला तयार होते, पण शिष्याची तयारी नव्हती. गोरखनाथांच्या सिद्धीपेक्षा उन्मत्त व्यक्तीची सिद्धी प्रभावी ठरली. त्यानंतर उन्मत्त व्यक्ती व गोरखनाथ यांनी सिद्धीच्या बळावर अनेक प्रकारच्या क्रीडा केल्या. उन्मत्त व्यक्ती म्हणजे साक्षात् दत्तप्रभू असल्याची खात्री गोरक्षनाथांची झाली. गोरक्षनाथांनी नम्र होऊन दत्तप्रभूंचे पाय धरले. त्यांचे शिष्यत्व पत्करून त्यांना नाना प्रश्न विचारले. या प्रश्नांच्या उत्तरांतून योग, सिद्धी, आत्मज्ञान, अवधूतावस्था इत्यादींची चर्चा प्रकट झाली. ज्ञानदीपबोध, अमनस्कयोग इत्यादी योगशास्त्रीय ग्रंथांतून या तत्त्वबोधचर्चेचा भाग आजही साधकांना पाहायास मिळतो.

श्रीगोरक्षनाथांनी योगमार्गासंबंधी प्रश्न विचारावेत आणि श्रीगुरू दत्तात्रेयांनी त्यांची उत्तरे द्यावीत, अशा भूमिकेवरून 'ज्ञानदीपबोध' या ग्रंथाची निर्मिती झाली आहे. या महत्त्वाच्या ग्रंथाचा प्रारंभ असा आहे,

स्वामी कि तुम्हें ब्रह्मा कि ब्रह्मचारी ।<br>
कि तुम्हें बांभण पुस्तक कि डंडधारी ॥<br>
कि तुम्हें जोगी कि जोगजुगता ।<br>
कौण प्रसादें रमौ छछंदमुक्ता ॥ १ ॥

गोरक्षनाथ विचारतात, 'स्वामी, आपण साक्षात् ब्रह्मदेव आहात की ब्रह्मचारी आहात? आपण कोणी योगी आहात की, युंजानयोगी आहात? आपणांस अनुग्रह कोणाचा आहे? आपण जीवन्मुक्तासारखे स्वच्छंदतापूर्वक लीलावश होऊन सर्वत्र संचार कसा करू शकता?' यावर श्रीदत्तगुरू उत्तर देतात,

अवधू न अम्हें ब्रह्मा न ब्रह्मचारी ।
न अम्हें बांभण पुस्तक न डंडधारी ॥
न अम्हें जोगी न जोगजुगता ।
आप प्रसादें रमें छछंदमुक्ता ॥ २ ॥

'अवधूत, गोरक्षनाथा, मी ब्रह्मदेव नाही की ब्रह्मचारीही नाही; मी कोणी विद्वान ब्राह्मण नाही की कोणी दंडी संन्यासी अथवा योगी नाही. मी माझ्यावर झालेल्या स्वतःच्याच कृपेने जीवन्मुक्ताप्रमाणे स्वच्छंदपणे आनंदपूर्वक संचार करीत असतो.'

यापुढे श्रीगुरू दत्तात्रेयांनी गोरक्षनाथांच्या अनेक प्रश्नांची उत्तरे देऊन योगमार्गाचा बोध स्पष्ट केला आहे. त्याचा सारांश असा— 'गोरक्षनाथा, मी कधी गुप्तपणे संचार करतो, तर कधी प्रकट रूपाने वावरतो. परमावस्थेत कामविकार नसतो. वायूही नसतो; शक्तिशाली वैष्णवी मायासुद्धा नसते. ना आकार, ना निराकार, ना सूक्ष्म, ना स्थूल अशी ही अवस्था असते. ती म्हणजे पाणीही नाही की, जलबिंदूही नाही. ना आरसा, ना प्रतिबिंब, ना दत्त की ना गोरख. तेथे वस्तू नाही की तिचा आभास नाही. जे आहे ते परमतत्त्वच आहे! गोरक्षनाथा, माझी माता क्षमा, माझा पिता सत्य, आणि गुरू ज्ञान. अलक्ष्य हेच माझे स्थान. ब्रह्म सूक्ष्म आहे. तत्त्वातीत आहे. गुरू म्हणजे ज्ञान, ते अपार आहे. परमेश्वर गुरू व आत्मा हा शिष्य आहे. स्वभावतःच निर्विकल्प स्थिती प्राप्त झाली असता, सहज शून्य अवस्था आली असता अनेक सिद्धींचे मीलन घडून येते. ब्रह्मकमल ऊर्ध्वमुख उमलले की तेथे मनाहून पलीकडची अशी उन्मनी कला प्राप्त होते. ध्यानाची परिपक्व अवस्था म्हणजे उन्मनी या अवस्थेत मन पूर्णपणे निवृत्त होते.

'गोरक्षनाथा, परमार्थाच्या साधनमार्गावरील यात्रेकरूंना येणारा क्रोध म्हणजे कंटकच होय, क्रोधाच्या तावडीत जाणे म्हणजे प्रत्यक्ष संसारसागरात बुडून जाणे होय. कर्मांनी बांधलेली व्यक्ती बद्ध होय. अवधूता, माया मिथ्या असून ब्रह्मच सत्य आहे. शब्द खरा व त्यापासून उत्पन्न होणारा पिंड खोटा. ज्या स्थितीमध्ये चित्त ब्रह्मात राहाते, ब्रह्माकार होऊन जाते ती स्थिती म्हणजे ध्यान होय. जी सगळ्यांचे पोषण करते ती शक्ती. जो सर्वांचे पोषण करतो तो शिव. जीव म्हणजे पृथ्वी, पाताल व आकाश. यांचा स्वामी, म्हणजे जगन्नाथ परमात्मा. जीवात्मा व परमात्मा यांच्यातील अभेद हे ज्ञान; अशा रीतीने आत्मपरिचय हेच ज्ञानाचे खरे रूप होय. मी सदैव सहज समरस आहे; याच अवस्थेला निर्वाणपद म्हणतात. दत्ततत्त्वाचा एकदा परिचय झाला की आणखी काही सांगावे असे उरत नाही—'

मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ, इत्यादी नाथांना अशा प्रकारे दत्तप्रभूंचा उपदेश आहे. या दत्त व नाथसंबंधाची वर्णने मराठीतील नवनाथभक्तिसार व नाथलीलामृत या ग्रंथांतूनही पुष्कळ मिळतात. कवी, हरी, अंतरिक्ष, प्रबुद्ध, पिप्पलान, आविर्होत्र, द्रुमिल, चमस, करभाजन हे नवनारायण अनुक्रमे मत्स्येन्द्र, गोरक्ष, जालिंदर, कानीफ, चर्पटी, नागेश, भरतनाथ, रेवण आणि गहिनी यांच्या रूपांनी अवतरल्याची कथा आहे. वाल्मीकी-तुळशीदास, शुक-कबीर, व्यास-जयदेव, उद्धव-नामदेव, जांबुवंत-नरहरी, बलराम-पुंडलिक, विष्णू (कृष्ण)—ज्ञानदेव, पंचानन शिव-निवृत्तिनाथ, चतुरानन ब्रह्मा-सोपान, योगमाया-मुक्ताई, हनुमंत-रामदास, कुब्जा-जनी; अशी अवतार-परंपराही नवनाथभक्तिसारात सांगितली आहे.

दुसऱ्याच अध्यायात दत्तप्रभूच्या व मत्स्येन्द्रनाथाच्या भेटीचे वर्णन आले आहे मत्स्येन्द्रनाथाचे रूप कसे होते ? 'सहज चालती विपिनवाटी । तो मच्छिंद्र देखिला यानी दृष्टी । वाळतनू पाठपोटी । अस्थित्वचा उरल्या पै ॥ जटा पिंगट नख जळमट । कटकाकारी पादागुष्ठ । कार्पासमय झाली दृष्ट । त्वचा लिपटली अस्थीसी ॥ सर्वांग शिरा दळटळाट । दिसती अवनी नामपाठ । ध्वनि मात्र शब्द उठे । चलनवलन नयनाचे ॥' (२ ९-११) मत्स्येन्द्रानी दत्तास विचारल्यानतर आनंदित होऊन अनसूयाकुमाराने उत्तर दिले, 'दत्त ऐसे म्हणती मज, जो व्याघ्रपदी ऋषिजनन । अत्रि ऐसे तया नाम । तयाचा सुत मी दासोत्तम । महीलागी आराधलो ॥' (२ २४) दत्तप्रभूची ओळख पटताच मत्स्येन्द्रनाथास अतिशय आनद झाला 'जैसी सासुऱ्या बाळा असता । अवचट दृष्टी पडे माता । हुबरडोनि धावोनि येता । श्रीवे मिठी घालितसे ॥ किंवा अवचट वत्सा भेटती गाय । मग प्रेम लोटी चित्त सदैव । तैसेपरी मच्छिंद्र मोहे । पदावरी लोटला तो ॥' (२ २७-२८) या दत्तप्रभूचा मग उपदेश मत्स्येन्द्रनाथास, गोरक्षनाथास झाला सर्व प्रकारच्या विद्या व सिद्धी याची प्राप्ती या नाथप्रमुखाना झाली इतकेच नव्हे तर 'नाथ ऐसे देऊनि नाम । शिंगी सैली देऊनि भूषण । ऐसे परिकरोनि प्रमाण । अत्रिनदन पै गेला ॥' (२ ५५)

त्यानतर बाराव्या अध्यायात जालदरनाथ व दत्तात्रेय याच्या भेटीचे वर्णन आले आहे दत्तात्रेय आणि जालदर यानी नाना प्रकारचे चमत्कार करीत गिरिकुहरातून निवास केला 'मग सवे घेऊन जालिंदरासी । नित्य गमन करी महीसी । स्नान करूनी भागीरथीसी । विश्वेश्वरासी नमिताती ॥ तेथून भोजन पाचाळेश्वरी । भिक्षा मागावी कोल्हापुरी । निद्रा जयाची मातापुरी । माहूरगड म्हणवितसे ॥ असो ऐसे द्वादश वरुषात । नाना अस्त्रासहो घेत । प्रवीण करी बाळा समर्थ । विद्या भाडार भरूनिया' (१२ ४१-४३) पस्तिसाव्या अध्यायात रेवणसिद्ध व दत्तात्रेय याची भेट झालेली आहे 'दत्तें केले शहाणपण । किंचित कळा त्या दाखवून' असे रेवणाबद्दल म्हटले आहे मत्स्येन्द्रनाथाबरोबर दत्तप्रभू रेवणनाथाची तपस्या जाणून आले 'तो येताच देखिला रेवणनाथ । कृश शरीर काष्ठवत । अस्थिमय प्राण व्यक्त । वाट पाहे दत्ताची ॥ अतिक्लेशी कठी प्राण । पाहून श्रमला अत्रिनदन । प्रेमे कवळिला सदयपणे । माय जैसी बाळकाते ॥ की वत्सालागी जैसी गाय । हुबरडा फोडी अति मोहे । तेवी अत्रिनदने प्रेमहृदयें । प्रियभावे आलिंगिला ॥ तेणेही चरणी ठेवून माथा । होय प्रेमाश्रु ढाळिता । म्हणे आजि भेटली माझी माता । निढळवाणी वत्साते ॥' (३५ १३१-३४) यानतर गिरनार पर्वतावर जाऊन दत्तप्रभूनी रेवणनाथास ज्ञान दिले पुढे सदतिसाव्या अध्यायात नागनाथ व दत्तप्रभू याच्या भेटीचे वर्णन आले आहे अडतिसाव्यात चर्पटनाथाना श्रीदत्तप्रभूचा उपदेश आहे

अशा प्रकारे अनेक ग्रथातून दत्तप्रभू व नाथ याच्या सबधाचे वा लीलाचे वर्णन आले आहे 'गोरख दत्त गुष्टि', 'गोरख दत्तात्रेय सवाद,' दत्त गोरक्षसवादरूपी ' अविनाश गीता ' अशा कित्येक लहानसहान ग्रथातून वा प्रकरणातून नाथदत्ताचे सबध स्पष्ट झाले आहेत गुरुतत्त्वाचा परामर्श घेणारी ' अवधूतगीता ' स्वामीकार्तिकसवादात्मक असली तरी ती गोरक्ष व दत्त याच्या सवादाची असावी असाही काहींचा तर्क आहे गिरनार व नेपाळ येथे दत्तपरपरेचा प्रसार करण्याचे सारे श्रेय या नाथपथीयानाच देणे युक्त ठरणार आहे दत्त-साप्रदायिक व नाथसाप्रदायिक याच्या तत्त्वज्ञानात,आचार-विचारात विलक्षण साम्य आहे वेषभूषेत व जीवनपद्धतीतही एक प्रकारचे साम्य दृष्टीस पडते दत्त-

भक्ताना प्रिय वाटतील अशी गोरखनाथाची दोन पदे येथे देतो

१) गुरुजी मे तो एक निरजन ध्यावू ॥ धृ० ॥
दु ख न जानू दरद ना जानू
ना कोइ वेद बुलावू ।
सतगुरु वेद मिले अविनाशी
वाहिको नाडि बतावू ॥ १ ॥
गगा न जावू जमुना न जावू
न कोई तीरथ न्हावू ।
आडुसट तीरथ हैं घटभीतर
वाहिमें मनमल न्हावू ॥ २ ॥
फूली ना तोडू फत्तर ना फोडू
ना कोई झाड सतावू ।
बनवनकी मैं लकडी ना तोडू
ना कोई देवल जावू ॥ ३ ॥
कहे मछिंदर गोरख बोले
ज्योतमे ज्योत मिलावू ।
सतगुरुजीके शरण गयेसे
आवागमन मिटावू ॥ ४ ॥

२) सुमिरन बिन गोता खावोगे ॥ धृ० ॥
ये ससार कागजकी पुतली ।
बुदलगे गलजावो गे ॥ १ ॥
ये ससार ओसका पानी ।
धूप लगे ढल जावोगे ॥ २ ॥
ये ससार बागरका काटा ।
आग लगे जल जावो गे ॥ ३ ॥
ये ससार हाटका मेला ।
साज पडे बिछड जावो गे ॥ ४ ॥
सुरत हमारी चढी गगनमो ।
अनुहत ढोल बजावो गे ॥ ५ ॥
कहे मछिंद गोरख बोले ।
ज्योतमे ज्योत मिलावो गे ॥ ६ ॥

नाथपथी जोगी या योगी आणि दत्तपथी योगी याना अवधूत म्हणण्यात येते 'सर्वान् प्रकृतिविकारान् अवधुनोतीत्यवधूत ' जो प्रकृतीच्या सर्व विकाराना धुवून टाकतो तो अवधूत अशी व्याख्या सिद्धसिद्धान्तपद्धतीत केली आहे. ( ६ १ ). अवधूत म्हणजे जात, गोत इत्यादी उपाधींच्या मर्यादा फेकून देणारा पुरुष. हा बधनातीत असतो. महापातकी व पतित याच्याखेरीज सर्वांकडून तो अन्नग्रहण करतो व अजगरवृत्तीने वागून आत्मचिंतनात रमतो. ब्रह्मनिर्वाणतन्त्रात अवधूताचे चार प्रकार वर्णन केले आहेत. १) कोणत्याही वर्णातील व आश्रमातील ब्रह्मोपासक ब्रह्मावधूत २) विधिपूर्वक सन्यास घेतलेला व कमीत कमी वस्त्रे वापरणारा, अगाला माती फासणारा, मौन पाळून धुनी लावणारा शैवावधूत ३) केस लाब वाढविलेला, गळ्यात अस्थी अथवा रुद्राक्षाची माळ व हातात काष्ठदड, परशू व डमरू ही आयुधे धारण करणारा वीरावधूत आणि ४) कौल सप्रदायाची दीक्षा घेऊन गृहस्थाश्रमातही राहणारा कुलावधूत हे अवधूतपथी लोक सदैव आत्मलीन असतात हठयोगादी साधने वा तत्रमार्ग याच्या साह्याने अवधूत अनायासाने क्लेशादी पापाना दूर करतात दत्तात्रेय व साकृती याच्या सवादातून 'अवधूतोपनिषद्' तयार झाले आहे यात परमार्थसिद्धीने धन्य झालेला साकृती म्हणतो, 'परमानदपूर्णोऽह ससरामि किमिच्छया । अनुतिष्ठन्तु कर्माणि परलोकयियासव । सर्व लोकात्मक कस्मादनुतिष्ठामि किं कथम् ॥'—मी परमानदाने परिपूर्ण आहे मला ससाराची गरज काय ? परलोकाला जाण्याची इच्छा करणाऱ्यानी कर्मांचे अनुष्ठान करावे मी सर्व लोकात्मक झालो आहे मला कर्माचरणाची जरूरी काय ?

'अवधूत-गीता' हा एक नाथ व दत्तपथीयाना प्रमाणभूत वाटावा असा ग्रथ आहे यात अवधूताची लक्षणे सागताना म्हटले आहे

आशापाशविनिर्मुक्त आदिमध्यान्तनिर्मल ।
आनंदे वर्तते नित्यमकार तस्य लक्षणम् ॥

वासना वर्जिता येन वक्तव्यं च निरामयम् ।
वर्तमानेषु वर्तेत वकारं तस्य लक्षणम् ।
धूलिधूसरगात्राणि धूतचित्तो निरामयः ।
धारणाध्याननिर्मुक्तो धूतकारस्तस्य लक्षणम् ॥
तत्त्वचिन्ता धृता येन चिन्ताचेष्टाविवर्जितः ।
तमोहंकारनिर्मुक्तस्तकारस्तस्य लक्षणम् ॥
(अवधूत गीता ८:६-९)

गोरक्षनाथप्रणीत 'सिद्धसिद्धान्तपद्धति' या ग्रंथातही अवधूतावस्थेची लक्षणे विस्ताराने सांगताना म्हटले आहे,

यः सर्वान् प्रकृतिविकारान् अवधुनोतीत्यवधूतः। दैहिक-प्रपचादिषु विषयेषु संगतं मनः प्रतिगृह्य, तेभ्य. प्रत्याहृत्य स्वधाममहिम्नि परिलीनचेताः
प्रपचशून्य आदिमध्यान्तभेदवर्जितः ॥
क्लेशपाशतरङ्गाणां कृन्तनेन विमुण्डनम् ।
सर्वावस्थाविनिर्मुक्त. सोऽवधूतोऽभिधीयते ॥
निजसमरविभूतिर्यो योगी स्वाङ्गे विभूषितः ।
आधारे यस्य वारुढ सोऽवधूतोऽभिधीयते ॥
लोकमध्ये स्थिरासीनः समस्तकलनोज्झितः ।
कौपीनं खर्परोऽदैन्यं सोऽवधूतोऽभिधीयते ॥
शं सुखं खं परं ब्रह्म शंखं सघट्टनाद्भवत् ।
सिद्धान्तं धारितं येन सोऽवधूतोऽभिधीयते ॥
पादुका परसंवित्तिर्मृगत्वच् महाहतम् ।
वेला यस्य परा संवित्सोऽवधूतोऽभिधीयते ॥
चित्प्रकाश-परानन्दौ यस्य वै कुण्डलद्वयम् ।
जपमालाक्षविश्रान्तिः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
यस्य धैर्यमयो दण्ड. पराकाशं च खर्परम् ।
योगपट्ट निजा शक्तिः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
भेदाभेदौ स्वय भिक्षां पट्रसास्वादने रतः ।
जारणा तन्मयीभावः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
अचिन्त्ये निजदिग्देशे स्वान्तर यस्तु गच्छति।
एकदेशान्तरीयो यः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
स्वपिंडममरं कर्तुमनन्तामरी च यः ।
स्वयमेव पिबेदेता सोऽवधूतोऽभिधीयते ॥
अचिन्त्यं वज्रवद्गाढा वासनामलसङ्कुला ।
सा वज्री भक्षिता येन सोऽवधूतोऽभिधीयते ॥
आवर्तयति यः सम्यक् स्वस्वमध्ये स्वयं सदा ।
समत्वेन जगद् वेत्ति सोऽवधूतोऽभिधीयते ॥
स्वात्मानमगवच्छेद्य : स्वात्मन्येवावतिष्ठते ।
अनुत्थानमयः सम्यक् सोऽवधूतोऽभिधीयते ॥
अनुत्याधारसम्पन्नः परविश्रान्तिपारगः ।
धृतिचिन्मययत्तत्त्वज्ञः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
अव्यक्तं व्यक्तमाधत्ते व्यक्तं सर्वं प्रसात्यलम् ।
सत्यं स्वान्तरे सन् यः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
अवभासात्मको भासः स्वप्रकाशे सुसंस्थितः ।
लीलया रमते लोके सोऽवधूतोऽभिधीयते ॥
क्वचिद्भोगी क्वचित्यागी क्वचिन्नग्नःपिशाचवत्।
क्वचिद्राजा क्वचाचारी सोऽवधूतोऽभिधीयते ॥
(सिद्धसिद्धान्तपद्धतिः ६.१:३–२०)

दत्तपरंपरा आणि नाथपरंपरा यांचे असे हे नाते अवधूताच्या संदर्भातही महत्त्वाचे आहे. गोरक्षनाथांचा नाथपंथ व त्याला गुरुस्थानी असणारा दत्तपंथ यांनी समकालीन धार्मिक व पारमार्थिक जीवनाचे शुद्धीकरण करण्याचा प्रयत्न केला. तांत्रिक योगिनींच्या जाळ्यातून गोरक्षनाथांनी आपल्या गुरूची मुक्तता केल्याचे प्रसिद्धच आहे. तांत्रिकांच्या वाममार्गीय आचारां-पासून समाजास मुक्त करणाऱ्या गोरक्षनाथास म्हणूनच ज्ञानेश्वरांनी 'विषयविध्वंसैकवीर' म्हणून गौरविले आहे. दत्तपरंपरेतील अवधूत वा दत्त काही प्रसंगी मद्य व तरुणी यांच्या संदर्भात दिसत असला, तरी अशा दर्शनाचे उद्दिष्ट तपासून पाहाता येते. प्रखर वैराग्य आणि शुद्ध आचरण यांनाच नाथ व दत्त यांच्या परंपरात मोठेच स्थान आहे. दोनही पंथीयांना प्रमाणभूत वाटणाऱ्या 'अवधूत-गीते'त स्त्रीचे वास्तविक रूप वर्णन करताना म्हटले आहे,

न जानामि कथं तेन निर्मिता मृगलोचना ।
विश्वासघातकी विद्धि स्वर्गमोक्षसुखार्गलाम् ॥

मूत्रशोणित दुर्गन्धे ह्यमेध्यद्वारक्षूपिते ।
चर्मकुण्डे ये रमन्ति ते लिप्यन्ते न संशयः ॥
कौटिल्यदम्भसंयुक्ता सत्यशौचविवर्जिता ।
केनापि निर्मिता नारी बन्धनं सर्वदेहिनाम् ॥
त्रैलोक्य जननी धात्री सा भगी नरको ध्रुवम् ।
तस्यां जातो रतस्तत्र हा हा संसारस्थितिः ॥
जानामि नरकं नारीं ध्रुवं जानामि बन्धनम् ।
यस्यां जातो रतस्तत्र पुनस्तत्रैव धावति ॥
भगादिकुचपर्यन्तं संविद्धि नरकार्णवम् ।
ये रमन्ति पुनस्तत्र तरन्ति नरकं कथम् ।
विष्ठादिनरकं घोरं भगं च परिनिर्मितम् ।
किमु पश्यसि रे चित्त कथं तत्रैव धावसि ॥
भगेन चर्मकुण्डेन दुर्गन्धेन व्रणेन च ।
खंडितं हि जगत्सर्वं सदेवासुरमानुषम् ॥
देहार्णवे महाघोरे पूरितं चैव शोणितम् ।
केनापि निर्मिता नारी भगं चैव ह्यधोमुखम् ॥
अन्तरे नरकं विद्धि कौटिल्य बाह्यमंडितम् ॥
ललितामिह पश्यन्ति महामंत्र विरोधिनीम् ॥
अज्ञात्वा जीवितं लब्धं भव स्तत्रैव देहिनाम् ।
अहो जातो रतस्तत्र अहो भव विडम्बना ॥
तत्र मुग्धा रमन्ते च सदेवासुरमानवाः ।
ते यान्ति नरकं घोरं सत्यमेव न संशयः ॥
अग्निकुंडसमा नारी घृतकुंभसमो नरः ।
संसर्गेण विलीयेत तस्मात्तां परिवर्जयेत् ॥
गौडी माध्वी तथा पैष्टी विज्ञेया त्रिविधा सुरा ।
चतुर्थी स्त्री सुरा ज्ञेया यदेदं मोहितं जगत् ॥
मद्यपानं महापापं नारीसंगस्तथैव च ।
तस्माद्द्वयं परित्यज्य तत्त्वनिष्ठो भवेन्मुनिः ॥
(अवधूतगीता ८:१२–२६)

स्त्री व स्त्रीदेह यांच्या दोनही पंथांतील निंदेचे मर्म ध्यानात घेण्यासारखे आहे. दत्तप्रणीत नाथ-पंथातील अनेक नाथ समकालीन वाममार्गीत व व्यभिचारादी कर्मात उपासनेचा एक मुख्य भाग म्हणून पडत असताना, मनुष्य स्वभावतःच चंचल व विषयी असताना, त्याचे चित्त वैराग्य व ध्यान यांकडे वळवावयाचे झाल्यास उपाय कोणता ? अतिरिक्त स्त्री–निंदा हा एक उपाय त्या काळी तरी विचारवंतांनी मानलेला दिसतो. कारण मनुष्याचा देह नाना प्रकारच्या धातूंनी बनलेला असून रक्त, मांस, चरबी, हाडे, मज्जा, चामडे, विविध नाड्या यांनी तो बांधलेला आहे. मनाची एकाग्रता संपली की धातूंचा नाश होतो आणि बुद्धी विगलित होते, अशी या वैराग्याची महती सांगणाऱ्या साधकांची मनोधारणा आहे (अवधूतगीताः ८-२०)



## महानुभाव संप्रदायात दत्तात्रेय

मागल्या प्रकरणात सांप्रदायिक ग्रंथांची ओळख करुन घेताना आपण महानुभाव संप्रदायाचा उल्लेख केला आहे. ज्ञानेश्वरांच्या आधी सुमारे शंभर वर्षे प्रवर्तित झालेल्या या पंथाचे प्रवर्तक श्रीचक्रधरस्वामी होत. यांचे आदिगुरू श्रीदत्ता-त्रेय प्रभू होत. 'या मार्गासि श्रीदत्तात्रेय प्रभु आदिकारण' ( सूत्रपाठ–विचार २८५ ) असे वचन प्रसिद्ध आहे. श्रीदत्तप्रभू–चांगदेव राऊळ ( चक्रपाणी ) – गुंडम राऊळ (श्रीगोविंदप्रभू) –श्रीचक्रधर अशी ही दत्तपरंपराच आहे. फलटणजवळील जनकनायक नावाच्या कऱ्हाडे ब्राह्मणास चाकणजवळील चक्रपाणी नावाच्या देवतेच्या कृपेने आणि चांगदेव नावाच्या देवतेच्या आशीर्वादाने पुत्र झाला. तो श्रीचांग-देव राऊळ ऊर्फ चक्रपाणी होय. संसारातून विरक्त झाल्यावर चांगदेव राऊळ श्रीक्षेत्र माहूर येथे यात्रेच्या निमित्ताने आले. तेथील 'मेरुवाळा' तलावात स्नान करून दत्तप्रभूंच्या शयनस्थाना-कडे जात असताना त्यांना एका जाळीत व्याघ्र-रूपाने दत्तदर्शन झाले. श्रीदत्तप्रभूंनी त्यांना आशीर्वाद दिला. दत्तप्रभूंपासून चांगदेवांनी उभय शक्तींचा स्वीकार केला. यात्रेकरूंबरोबर हिंडत असताना चांगदेव राऊळ ऊर्फ चक्रपाणी रिद्धपूर येथे आले. येथे गुंडम राऊळ ऊर्फ

श्रीगोविंद प्रभू यांनी शक्तीचा स्वीकार केला. गोमतीच्या तीराजवळील द्वारावतीस पुन: गोविंदप्रभूंना चांगदेवांपासून शक्तीचा लाभ झाला. या गोविंदप्रभूकडून श्रीचक्रधरांना शक्तीची प्राप्ती झाली. दत्तप्रभूची प्रेरणा असलेला हा महानुभाव संप्रदाय श्रीचक्रधरानी वाढविला. त्याला सघटित स्वरूप, आचारधर्म, तत्त्वज्ञान इत्यादींची प्राप्ती करून दिली.

श्रीचक्रधराना दत्तप्रभूंच्या स्थानाविषयी फार ममत्व वाटे. पांचाळेश्वर हे दत्तप्रभूंचे गुंफास्थान म्हणून त्यांना प्रिय वाटे. ज्ञानोपाध्याना उपदेश करताना श्रीचक्रधरानी म्हटले आहे, 'तुमचिया गावापासि आत्मतीर्थ असे की: होती: तुम्ही तेथ जा: तेथ जाइजे हो: ते आणिका स्थावरासारिखे नव्हे: तेथ श्रीदत्तात्रेयप्रभूची प्रतिष्ठा हो: गोधु: पाचाळेश्वरा गेला होतासि: पूसीले: हे ते स्थानी होते: तेथ जाइजे हो:' (लीळाचरित्र भाग २ पृ. २५) अशा रीतीने श्रीचक्रधरप्रभू आपल्या शिष्यांना दत्तस्थानाकडे वळवीत. चक्रधरोक्त सूत्रपाठातही दत्तात्रेयांच्या माहात्म्याविषयी चार सूत्रे आहेत. आपल्या अनुयायांना बोध करण्याच्या निमित्ताने श्रीचक्रधर दत्तप्रभूंच्या लीला सांगत. महानुभावाच्या इतर ग्रंथांतूनही दत्तात्रेयाचे मननीय उल्लेख येतात. भास्करभट्ट बोरीकराच्या उद्धवगीतेत (सन १३०८) दत्तात्रेयांना नमन करताना म्हटले आहे, 'सैहाचळाचियें चुळुकें: जयाचें प्रभामंडळ फांके। तो श्रीदत्तु ल्लल्लाट-पुळकें: नमस्कारीतु असे' कृष्णदास ऊर्फ कवी डिंभ याने आत्मतीर्थमाहात्म्यात म्हटले आहे, 'सैह्याद्रिशिखरे रम्यं अनसूयात्रिनंदनः। तं वंदे परमानंदं दत्तात्रेयं जगद्गुरुम्' केशव व्यास नावाच्या ग्रंथकाराने आपल्या मूर्तिप्रकाश या ग्रंथात म्हटले आहे, 'जय निरुपमा नीभ्रांता: जय नीराभिमानिया नीरुता: जय निसंगा नीत्यमुक्ताः श्रीदत्तात्रेया' कवीश्वर व्यासाने आपल्या शिशुपालवध या काव्यात नमन करताना म्हटले आहे, 'मायासूत्राची करूनि दोरी: जो ब्रह्मादिकाते खेळवी अनेक परी: तो अळर्क त्रिताप हरी: तया नमन श्रीदत्तात्रेया'. 'श्रीकृष्ण बाळक्रीडा' वर्णन करताना कवी एल्हनने म्हटलें आहे, 'ओं नमो यादवेन्द्रा दीनानाथा। दर्शनमोघा ना श्रीदत्ता' रवळोबासकृत 'सह्याद्रिवर्णन' आणि शारंगधरकृत 'दत्तात्रेय बाळक्रीडा' या ग्रंथांचा परिचय दत्तात्रेयांच्या संदर्भात आपण मागे करून घेतला आहेच. महानुभाव कवी डिंभ मुनी कृष्णदास याने रचलेल्या 'आत्मतीर्थप्रकाश' या ग्रंथात दत्तप्रभूंच्या निवासस्थानाने पवित्र झालेल्या पांचाळेश्वराच्या स्थानाची महती वर्णन केलेली आहे.

कृष्णदास महानुभाव यांनी संपादित केलेल्या 'आत्मतीर्थप्रकाश' या, ६९६ ओव्यांच्या प्रकरणात कवी डिंभ मुनी कृष्णदासाने 'सिद्धान्त शिरोमणी श्रीदत्तेशु: अेथ कथानायकु' कल्पून दत्तचरित्रातील काही कथाभाग वर्णन केला आहे. सन १६५९ च्या सुमारास तयार झालेल्या या लहानशा ग्रंथात कवीने सिधयामळ या संस्कृत ग्रंथातील सह्याद्रिखंडातील कथा मराठीत आणली. त्रेतायुगात दक्षिणेकडच्या पांचाळ देशाच्या राजाला चार पराक्रमी मुले होती. याच पांचाळ नगरीत देवशर्मा नावाच्या श्रोत्रिय ब्राह्मणाच्या आत्मोत्तम नावाच्या मुलास दत्तदर्शन झाले. त्याच्याबरोबर राजा व त्याचे पुत्र यांनाही झाले. याच वेळी महाराष्ट्रात राक्षसभुवन नगरीत कुंभनिकुंभ हे शंकरास प्रसन्न करून वेदमार्गाचा नाश करीत राहिले. त्यानी आत्मोत्तमाचा आश्रमही नष्ट केला. शिष्यमंडळी पांचाळ राजाकडे गेली. पांचाळ राजाने कुंभनिकुंभावर राक्षसभुवन येथे चाल केली. शंभर वर्षे युद्ध झाले आणि कुंभनिकुंभांचा नाश झाला. परंतु या ब्रह्मराक्षसांच्या पापातून मुक्त होण्यासाठी राजाने दत्ताची प्रार्थना केली.

दत्तात्रेय प्रकट झाले. त्यांनी राजाला विशिष्ट ठिकाणी बाण मारण्यास सांगितले. त्या ठिकाणी प्रकट झालेले तीर्थ म्हणजेच आत्मतीर्थ होय. या 'आत्मतीर्थप्रकाश' नावाच्या लहानशा ग्रंथात दत्तमहिम्याच्या खुणा अनेक ठिकाणी दिसतात.

ग्रंथाच्या निर्मितीचा वृत्तान्त देताना कवी म्हणतो, 'भीष्माचार्य म्हणितले मुनी कृष्णदासा। महाराष्ट्र प्रबंधी, तुझी वाणी सुरसा। तरी आत्मतीर्थ माहात्म्य प्रकाशा। ग्रंथ ना तूं करी॥ सिद्धयामळ ग्रंथनाम। तेथ सह्याद्रि खंडे आत्मतीर्थ माहात्म्य। तेयां, संस्कृताचे महाराष्ट्र उत्तम। करावें तुवां॥ तेयां भीष्माचार्यांचेनि निर्देशें। श्रीगुरु मदंकाचेनि ज्ञान-प्रकाशें। श्रीदत्तात्रेय वर्णावियां हरुषें। स्फारली मती॥(२: १५-१७) या ग्रंथात दत्तप्रभूंच्या प्रकाशाला महत्त्वाचे स्थान आहे. 'जो अत्री अनसूयेचा कुमरू। अविनाश मूर्ति जयाची सुंदरू। तो चहुंयुगीं क्रीडे निरंतरू। नाना वेषीं॥ तो श्रीदत्तात्रेय अमोघ दर्शनीं। क्रीडा करी जिए स्थानीं। तिये महातीर्थें बोलिजेति सुरगणीं। महेशादिकीं'॥ (२: २२-२३).

दत्तप्रभूंचे असे अनेक भावपूर्ण उल्लेख 'आत्मतीर्थप्रकाशा'त आहेत. 'श्रीदत्ताधिष्ठित मातापुर। आत्मतीर्थ आणि पांचाळेश्वर। इत्यादिकी अनुवर्ते निरंतर। अधिष्ठान भगवंताचें' (२.२५) 'जें श्रीदत्तांचें क्रीडास्थान। आत्मतीर्थ म्हणजे महातीर्थ गहन। येथ जो करी पूजार्चन स्नान दान। तो कधी शोकातें न पवे'॥(३.७९), 'देवशर्म्मा नावे भक्त होता झाला। श्रीदत्तात्रे यांचा'॥ (४.९५) 'ऐसा श्रीदत्तात्रेय प्रभु प्रसन्न जाला। रायां थोर आनंदु वर्त्तीनिला' (५.१८९), 'स्पर्श जाला श्रीदत्ताचा चरणकमळीं। स्वानंदें डोले महीतळीं' (५-१९१), 'श्रीदत्तात्रेय प्रभुचे वरद। ते यांसी असे प्रसिद्ध' (५-२३) तंव राओ म्हणे माझें भाग्य थोर॥ जें तुमचां काजीं वेचे शरीर। श्रीदत्तात्रेय-प्रभुचां वरं। करेंण साचुं' (५.२३९) अशा अनेक ओळींतून दत्तमहिमा प्रकट झाला आहे. नवव्या अध्यायातील दत्तमूर्तीचे वर्णन अतिशय मनोहर आहे. पुढल्या ब्रह्महत्यानिरास नावाच्या अध्यायात दत्तप्रभूंच्या चरणांस स्पर्शून पांचाळ राजा म्हणतो, 'श्रीदत्ता निरंजना! या विज्ञानेश्वरा। माझीया नंदनां। देयांची जगज्जीवना! श्रीचरणसेवा॥ हा होईलु तुमचा किंकरू। तेणें फिटैल आमुचा भवसंसारू। तिअें वेळी देवें केला अंगिकारू। विज्ञानेश्वराचां॥ राजें आत्मालय दक्षिणे पांचालेश्वर। लिंग स्थापौनि केला सुंदर। तेथें ग्राम वसविला मनोहर। पांचालेश्वर नामें'॥ (११३-१५) 'आत्मतीर्थप्रकाश' काव्याचा समारोप करताना कवीने केलेली दत्तस्तुती मननीय आहे.

जय शुद्ध बुद्धा परीपुर्णा।
जय निःप्रपंचा जगत्कारणा।
जय अमूर्ता मूर्तिवंत सगुणा।
श्रीदत्ता तुज नमो॥
जय परमानंदा पवित्रा।
जय गुणार्णवा शाश्वत परत्रा।
जय नित्यमुक्ता जी पंचवक्त्रा।
श्रीदत्ता तुज नमो॥
जय परावर-उभयदृश्य सूक्ष्मा।
जय सर्वंगमना गगनोपमा।
जय देशकालं सहायका सर्वोपमा।
श्रीदत्ता तुज नमो॥
जय गुणिधर्मा शोधक वेधका।
जय ज्ञानविज्ञाने द्रावका।
जय सर्वकळा प्रकाशका।
श्रीदत्ता तुज नमो॥
जय सर्ववंद्या सर्वात्मका।
जय जगदोद्धारा स्वयंप्रकाद
जय आर्तदानीं जगज्जनका।
श्रीदत्ता तुज नमो॥

जय अनसूयात्रिनंदना ।
जय ऋषीकुळा जिवोद्धरणा ।
जय अलर्का तापहरणा ।
श्रीदत्ता तुज नमन ॥
जय गोरक्ष बोधका दयार्णवा ।
जय शंकर वरदायका मयार्णवा ।
जय ऋषि ऋचिका देशी वारू व्हा ।
श्रीदत्ता तुज नमन ।
जय यदुराजया वचनदाना ।
जय कार्तवीर्या भुजादाना ।
जय जमदग्नी भाजाकारण दहना ।
श्रीदत्ता तुज नमन ।
जय वारानसी स्नानुमरदा ।
जय बद्रिकाश्रमी ज्ञानप्रददा ।
जय जंबुकारण्य पौरी भिक्षाप्रदा ।
श्रीदत्ता तुज नमन ॥
जय आत्मालयी भोजन नियमा ।
जय देवदेवेश्वरी निद्रोत्तमा ।
जय वनदेवा क्रीडसी पुरुषोत्तमा ।
श्रीदत्ता तुज नमन ॥

(१२६७८-८०)

रवळोवासकृत 'सह्याद्रि-वर्णनाचा' परिचय आपण मागे करून घेतला आहेच महानुभवाच्या अनेक पूज्य स्थानापैकी माहूर येथील सह्याद्रि असून ते दत्तात्रेयाचे शयनस्थान, क्रीडास्थान म्हणून विख्यात आहे 'जीवा जननी श्रीदत्तमाता: तीएचा हेतु क्रिडा करिता। निक्षेपिला जेथ तत्त्वता : ते मातापूर बोलिजे ॥' (१६७) या उल्लेखानुसार श्रीदत्तात्रेय प्रभू हीच माता असल्याने तिचे निवासस्थान म्हणजे मातापूर अथवा माहूर होय सह्याद्रिवर्णनात प्रारंभीच्या सुमारे १८० ओव्यातून दत्तात्रयाचे वर्णन आले असून अलर्क, सहस्रार्जुन व परशुराम इत्यादींवरील दत्तप्रभूचा अनुग्रहही यात वर्णन केला आहे. दत्तमूर्तीचे वर्णन करताना कवीच्या कवित्वास बहर आलेला दिसतो

जें विश्वाचें सार
चैतन्य कामवलें अरूवार
ते कैवल्यमूर्ति सकुमार :
कैसी सांगो ॥ ३८॥
पाता दृष्टी खूपे आंगी .
मनरूपौनि न नीगे वेगी .
ते सुदर्य नाही जगी .
श्रीदत्ताचेनि पाडें ॥३९॥
कवणि हवाव आगकाती :
निहाळिता अनघापती
समाधिसूख आलें व्यक्ती .
जीवा आनंद करावेया ॥४०॥
संध्यारागी चुंभळिली :
वरी सेंदुरें घोळिली
तन्ही चरणतळापसि पावली ·
रातोत्पळें ॥४१॥
रंगाळ कुंकूमाचा ठसा :
भरिला मानकुलरसा
तन्ही श्रीचरणेंसी सरिसा :
करू न ए ॥४२॥
तिए चरणरंगचोळें :
रातले शक्तिचक्र मैळें
तेथे उपमेसि वरदळें .
तिए काइ होती ॥४३॥
चरणतळें मौवाळें कैसी ·
दृष्टि खूपैल म्हणौनि मानसीं
योगिए चींतीति अहर्निशीं :
थोरे प्रएत्नें ॥४४॥
हृदएकमळाचा सेजारी :
चीत्ताचा अरूवारी
प्रतिष्ठुनि तया आसनावरी .
चरण सेवितांति ॥४५॥
तया रज एक खूपे
तमाचे नाव भारी रूपे
म्हणौनि दुसरयाचेनि वासिपे :
झणें जाए ॥४६॥

दत्तमूर्तीच्या अशा रेखीव व सुबक वर्णनानंतर रवळोवास अलर्क, सहस्रार्जुन, परशुराम यांना दत्तदर्शन व दत्तोपदेश हा कथाभाग वर्णन करतात. परशुरामास दत्तदर्शन कसे झाले याचे वर्णन करताना कवीने सह्याद्रीचेही अतिशय काव्यमय वर्णन केले आहे.

मातेपितयाचें दुःख नटत :
खांदी अस्थीची कावडि वाहात
थोर दाही दीशा लंघीत :
परशुरामु तो ॥
तवं तो देखिला पर्वतु :
जो कुळाचळांमाजि विख्यातु
तेथ असे क्रिडतु : अत्रिनंदनु ॥
जो मेरूसि जाला आधारू :
तो कैसा सांगों गिरिवरू
जेथ परिवारेंसहीत परमेश्वरू ।
राज्य करी ।।
तयाचेया उत्तमपणाची थोरी ।
पांतां कैळास वैकुंठ न पवे सरी
जेथ परापरेशा नीरंतरीं :
जालें अवस्थान ॥
काइ सांगों तेथिचीं झाडें ।
तिएं पाहुनि सुरतरू बापुडे
तया फळभोगु जोडे :
श्रीदत्तदर्शनें ॥
कल्पतरूसी स्पर्धा करीत ।
तैसे दीसती गगनचुंबीत
ते द्वीजकुळी सेविजत :
साए म्हणौनि ॥
मयुरांचीया केका ।
पट्पदांचे झंकारू आइका
पंचमाळापु सुकसारिका :
कोकिळांचे ।।
जेथ सरोवरीं बहुवस ।
चक्रवाक राजहंस
तयांचे कळरव सुरस :
काई सांगों ॥
ऐसे पंचमाळापीं नीरंतर :
गाजताए अंबर
ते जैसे स्तुति करिते द्विजवर;
श्रीदत्तात्रेयाची ॥
रूपींचीया प्राणकुटिका :
वेदशास्त्रांचे नीर्धोक
नीरूपीती एकमेकां ।
उपनीपदार्थु ॥
एक रीगौनि कपाटीं : आसनमुद्रा घालुनि हटीं
पवनाकुंचनें उकलीत गाठी :
कुंडलनीएची ॥
तीए सह्याचळीं आइका :
असे सकल सीधींचा नाएकु
तयाचा आश्रो धरूनि साधकु :
साधनी रीगाले ॥
तेथिचीया परमाणुची थोरी ।
ब्रह्मादिकां न बोलवे कव्हणे परी
कृपाकटाक्ष झळके जयावरि :
श्रीदत्तात्रेयाचा ॥
कैसे ते पै विचीत्र :
नेणिजे देवतासुत्र
तेथिचें स्थाविर जंगम पवित्र :
तीर्थां तीर्थ जालें ॥
सकळ स्नेहाचा निधि दातारू :
म्हणोनिचि माता म्हणितले ईश्वरू
एरी प्राकृतेचा निर्धारू :
पृथ्वी रेणु जैसा ॥
सकळ जीवांतें ईश्वरू जनीता :
म्हणौनि तोचि वोलिजे मातापीता
तयांचा ठावो नांदता :
ते माहेर जीवांचें ॥
जीवां जननी ठावो नादता :
ते माहेर जीवांचें ॥

जीवा जननी श्रीदत्तमाता
तीएचा हेतु क्रिडा करिता
निक्षेपिला जेथ तत्वता
ते मातापुर बोलिजे ॥
तेथिचे जडचेतन
तयाचे कवण जाणे महिमान
जे आत्मरमणा क्रिडास्थान
जाले देखा ॥
म्हणौनि सकळ तीर्थांपसि अधिकू
जेथिचा परमाणु एकु
जो वदनमात्रे फेडी दोखू
तीर्थ कोळे फळे ॥
आता विशेष काइ सांगे
जो वधू जाला दत्तयोगे ।
तो सेविलेया अनुरागें
परलाभु जोडे ॥
ऐसा रामें देखौनि पर्वतु
धन्य धन्य म्हणे हा तीर्थभुतु
एथिचे सूखिए तापरहितु
जडचेतन ॥
एयाचेया दैवाची थोरी
ब्रह्मादिक न पवती सरी
हे स्थावर जगम ससारी
महाभाग्याचे ॥
तेव्हेळी सह्याद्र पर्वती कैसी
अनुसयागर्भरत्नेंसी
भेटि रेणुकानदनेंसी
जाली देखा ॥
खन्यवादिया गिवसीता निधान।
का क्षुतीपासा पीडलेया अमृतपान
तैसे परशुरामा जाले दर्शन ।
श्रीदत्तात्रेयाचें॥
का दैन्यग्रस्ता परीसु ।
लाधलेया होए उल्लासु
या सीधलेया सीधरसु ।
साधय जैसा ॥
तैसा देखिलेया अनधापती ।
रामा हरूष जाला चीत्ती ।
तया सुखा उपमा न दीसती ।
देयावया ॥
तो दृष्टिपाते आनदविला ।
वाचामृतें विनविला
राम कृत्यकृत्य केला
आचारीत्व स्वीकरूनि ॥
तयाचेन चरणसबधें देखा
सर्वतीर्थं वद्य जाले ब्रह्मादिका
तो सर्वज्ञ आत्मधर्म जाला का
ते महत जाणती ॥
जयाचीया प्रतिष्ठा चाग
एकविरा पातली भोग
जेणे विज्ञानेस्वर लीग ।
प्रतीष्ठिले ॥
जयाचेनि चरणस्पर्शे ।
पार्थिवा आत्मतीर्थ ऐसे
पवित्र नाव पावले असे
तीही लोकी ॥
तो भीक्षुवेषा नटवी
जीवा नाना अधिकार घडवी
जया आपणपें दाखवी
ते अमोघ दृष्टि ॥
ऐसेया श्रीदत्ता सुवेषा
मार्गादिकारणा विशेषा
प्रवृत्ति जाली परेशा
उभए शक्तिदानाची ॥
मग नटला तो परमेस्वरू
कवण रुसिवेष जगद्गुरू
तो सार्गन मगळावसरू
हीराविका म्हणे ॥ (१५१–१८३)

महानुभावाच्या पथात अशा प्रकारे दत्तप्रभूंना अनन्यसाधारण स्थान असल्याने हा पथ दत्त प्रणीतच मानला जातो त्याचा दत्त हा एकमुखी व द्विभुज असून तो विष्णूचा वा त्रैमूर्तीचा

अवतार नसून परब्रह्माचा अवतार आहे अशी महानुभावांची श्रद्धा आहे. महानुभावांच्या ग्रंथांत जरी पुराणपद्धतीने तीन देवांच्या अवतारांचे कथन असले तरी प्रामुख्याने भर परब्रह्माच्या अथवा परमेश्वराच्या अवतारावर असल्याचे आपण पाहिले आहेच. महानुभावांच्या दत्तात्रेयांचा अवतार चारी युगांत आहे. दत्तात्रेयांची वाणी अमृतवर्षिणी असून त्यांचे दर्शन अमोघ आहे. दत्तात्रेयांचा अवतार नेहमी अदृश्यपणे वावरत असतो. त्यांना निरंतर पारधीचा छंद आहे. ते नेहमी नाना वेष धारण करीत अधिकारी जीवांना दर्शन देत असतात.

"महानुभावांचे हे दत्तात्रेयप्रभू म्हणजे एरवी प्रसिद्ध असलेला "तीन शिरे सहा हात" धारण करणारा दत्तात्रेय नव्हे. पौराणिक कल्पनेप्रमाणे तीन शिरांचा आणि सहा भुजांचा दत्तात्रेय हा ब्रह्मा-विष्णु-महेशांचा अवतार होय. महानुभावांच्या मते ब्रह्मा-विष्णू आणि महेश या तिन्ही सामान्य देवता आहेत. त्या देवतांचा एकरूप अवतार असलेला आधुनिक दत्त हा महानुभावांना वंद्य ठरणे शक्य नाही. तीन शिरे सहा हात असलेल्या दत्ताची *कल्पना पूर्णपणे आधुनिक आहे.* मुळात मात्र त्याची मूर्ती एकमुखी व चतुर्भुज असल्याचे दिसून येते. भागवतात 'अत्रेः पत्न्यनसूया त्रीन् जज्ञे सुयशसः सुतान्। दत्तं दुर्वाससं सोममात्मेशं ब्रह्मसंभवान्' (स्कंद ४ अ १–३२) तसेच 'सोमोऽभूद् ब्रह्मणोंऽशेन दत्तो विष्णोस्तु योगवित्' (भाग. स्कं ४ अ. १-३२) असे दत्तजन्माविषयी उल्लेख आहेत. त्यावरून तो केवळ विष्णूचाच अंशावतार असल्याचे दिसते (ब्रह्मा-विष्णु–महेशाचा नव्हे) आणि तो एकमुखी असावा असे म्हणता येते. शाण्डिल्योपनिषदातील-'भस्मोद्धूलितसर्वांग जटाजूटधरं विभुम्। चतुर्बाहुमुदारागं प्रफुल्ल कमलेक्षणम्' या श्लोकावरून तर तो चार भुजांचा (व एकाच मुखाचा) असल्याचे स्पष्ट होते. (विचारसमीक्षा. पा. २४) तथापि भागवतातील उल्लेखात दत्त हा विष्णूचा अंशावतार असल्याचे जे म्हटले आहे, तेही महानुभावांना मान्य नाही. त्यांच्या मते दत्त हा देवतावतार नाही, ईश्वरावतार आहे, आणि म्हणूनच महानुभावांना तो पूज्य आहे.

"श्रीदत्तात्रेयप्रभूंचा अवतार त्रेतायुगात झालेला असला तरी तो 'चतुर्युगी अवतार' असल्याचे श्रीचक्रधर स्वामींनी म्हटले आहे. (श्रीदत्तात्रेयप्रभूचा अवतार : वि. २८२) याचा अर्थ असा की, त्रेतायुगानंतरच्याही सर्व युगांत दत्तात्रेयाचा अवतार विद्यमान आहेच. अर्थात आजही तो विद्यमान आहे; आणि महासंहारापर्यंत तो तसाच राहणार. त्यांचा अवतार हा इतर ईश्वरावतारांपेक्षा विलक्षण आहे. ते नेहमी अदृश्यत्वाने वावरत असतात; म्हणून सहसा त्यांचे कुणाला दर्शनच होत नाही. पण दर्शन झाले तर ते कधी वाया जात नाही. एका दृष्टीने दर्शन म्हणजे बोधच. श्रीदत्तात्रेयप्रभूपासून ज्यांना बोध झालेला आहे त्यांचा बोध चरित होऊन ते प्राप्तीला पोचलेच म्हणून समजावे. कारण दत्तात्रेयप्रभू ज्याला बोध देतात *त्याला आपल्यावरोबर अदृश्य करून त्याचे शब्द*-ज्ञान चरित व्हायला साहाय्य करतात व त्याला सदेहीच अपरोक्ष देतात. अर्थात, त्यांच्या कोणत्याच ज्ञानियाला पुनः संबंधी जन्मविष्याचे कारण पडत नाही. अपरोक्ष ज्ञान झाल्यानंतर सामान्यज्ञान व त्यानंतर विशेष ज्ञान देऊन सेवटी प्राप्तीही करून देतात. अर्थात उभयदृश्यावतारापासून-श्रीमुखे बोध व्हावा अशी जोड ज्याने जोडली असेल त्यालाच त्यांचे दर्शन होते. तसेच प्रेमाचे साधन ज्याने जोडले असेल त्यालाही त्यांचे दर्शन होते. सारांश, भक्ताला तर नाहीच, पण त्याच्यापासून बोध झालेल्या ज्ञानियाला देखील ते दुसऱ्या अवताराजवळ निरोवीत नाहीत.

"ज्याने ज्ञानाधिकार किंवा प्रेमाधिकार जोडलेला नसेल त्याला जर श्रीदत्तात्रेयप्रभूंचे

झाले तर तेही वाया जात नाही अशा पुरुषाना ते ज्ञानाधिकार घडवून दर्शन देतात पण इतर कारणामुळे ज्याना ज्ञान होणे शक्य नाही अशाना त्याचे दर्शन झाले तर ? तर, अशा पुरुषाच्या बाबतीत श्रीदत्तात्रेयप्रभूनी उच्चारलेले शब्द, वर, आशीर्वाद वगैरे सर्व यथार्थपणे फलद्रूप होतात साराश श्रीदत्तात्रेयप्रभूचे दर्शन हे अमोघ होय ( ते अमोघ दर्शन की गा )

" अशा अमोघदर्शन श्रीदत्तात्रेयप्रभूनी अनेक जीवाचे त्रिविध ताप पूर्णपणे नाहीसे केले आहेत त्यापैकी अलर्काचे उदाहरण विशेष प्रसिद्ध आहे. ' अलर्काचे तिन्ही ताप शबोली शबोली म्हणून त्यानी फेडले, कारण त्याची वाणी अमृताचा वर्षाव करणारी आहे ' असे श्रीचक्रधरस्वामीनी सागितले आहे या अलर्काची हकीकत अशी

" मदळसेला सात मुले होती पैकी सहाजण तिच्या सागण्यावरून दत्तात्रेयप्रभूला अनुसरली सातव्या मुलाचे नाव अलर्क राज्यमदाने उन्मत्त झाल्यामुळे तो अनुसरत नव्हता तेव्हा मदळसेने आपला भाऊ काशीराज याजकडून अलर्काच्या राज्यावर स्वारी करविली काशीराजाने युद्धात अलर्काचा पराभव केला यामुळे अलर्क तिन्ही तापानी एकसारखा पोळत होता त्याचे राज्य गेल्यामुळे मन निवृत्त करून तो ' सतेव त्यागिया' बनला आणि श्रीदत्तप्रभूना शरण गेला त्या वेळी ' शबोली शबोली ' शब्दाना उच्चार करून अलर्काचे सर्व ताप त्यानी हरण केले श्रीदत्तात्रेय-प्रभूच्या वाणीने अलर्काचे ताप नाहीसे होण्याचे कारण असे की, त्या परमेश्वरावताराची वाणी अमृताचा वर्षाव करणारी व सुख देणारी होती साराश, " ये तो मदळसेचा कुमरू आलर्क नृपवरू श्रीदत्तदेवे दीक्षा गुरू उपदेशिला "

" अलर्काप्रमाणेच सहस्रार्जुनालाहि स्वामीनी आपल्या कृपाप्रसादाने पावन केले होते हा सहस्रार्जुन म्हणजे राजा कृतवीर्य आणि राणी रेणुकावती याचा मुलगा त्यालाच कार्तवीर्य असे म्हणत या " कृतवीर्याचिया कुमरा नाही हाता दो ससारा "—त्याला हातपाय नव्हते कारण, एकदा सकष्टी व्रत करताना कृतवीर्याला जाभई आली, त्याने त्याबद्दल आचमन वगैरे काही केले नाही, त्यामुळे त्याला जो मुलगा झाला त्याला तोड, नाक, डोळे, यादे हेच काय ते अवयव होते-तोच हा कार्तवीर्य होय गर्गमुनीच्या सागण्या-वरून त्याने माहूरजवळच्या सह्याद्रिपर्वतावर एक हजार वर्षेपर्यंत श्रीदत्तप्रभूची आराधना केली त्यामुळे प्रसन्न होऊन श्रीदत्तात्रेयानी त्याला सुदर शरीर व हजार हात दिले सर्व पृथ्वी जिंकण्याचा आणि केवळ श्रेष्ठ अशा वीराकडूनच मृत्यू येण्याचा वर दिला साराश, ज्या " कृत-वीर्याचिया कुमरा नाही हाता दो ससारा तया देऊनी सहस्र करा पृथ्विपति केला ।। श्वापदा आज्ञेचा भयो माहीष्मतीये राज्य करी हयहयो तेणें प्रसन्न करूनी दत्तात्रेयो वर लाधला ।। ऐसा दर्शन भोगमोक्ष देता न दीसे आणिक तो एक कैवल्यनायक श्रीदत्तावाचौनि "

" श्रीदत्तात्रेयप्रभूना निरतर पारधीचे व्यसन आहे पण ही आपली क्रीडा ते अदृश्य राहूनच करीत असतात नेहमी नाना प्रकारचे वेष ते धारण करतात आणि अधिकारी जीवाना मधून मधून दर्शन देतात " ( वि भि कोलते श्रीचक्रधरचरित्र, पृष्ठे ३०–३४ )

# वारकरी संप्रदायात दत्तात्रेय

तेराव्या शतकाच्या अखेरीस ज्ञानेश्वर-नाम-देवानी प्रवर्तित केलेल्या वारकरी सप्रदायाची उपास्य देवता बाळकृष्णरूपातील श्रीविठ्ठल ही आहे सगुणप्रेम, नामस्मरण, कथाकीर्तन या साधनानी परिपुष्ट होत राहिलेला हा वारकरी पथ पुढे श्रीएकनाथ व तुकोबा निळोबा यानी वाढविला असला तरी या पथाचे मूळ

दत्तात्रेयाशीही भिडते ज्ञानेश्वराची गुरुपरंपरा नाथसंप्रदायाची असून निवृत्ती-गहिनी-गोरखनाथ यांना दत्तात्रेय यांचा बोध असल्याचे आपण पाहिले आहे. दत्तात्रेयापासून उपदेश गोरखनाथांना मिळाला व नंतर उपदेशाचे हे बोधरहस्य वारकरी संप्रदायात परिपुष्ट झाले. 'ज्ञानेश्वरी' अथवा 'भावार्थदीपिका' या नावाने ग्रंथरचना करून वारकरी पंथास तात्त्विक पाया भक्कमपणे निर्माण करून देणाऱ्या ज्ञानेश्वरांनी आपली गुरुपरंपरा वर्णन करताना म्हटले आहे,

क्षीर सिंधुपरिसरी। शक्तीच्या कर्णकुहरी।
नेणों कै श्रीत्रिपुरारी। सांगितले जें ॥
ते क्षीरकल्लोळाआंतु। मकरोदरी गुप्तु।
होता जयाचा हातु। पैठें जालें ॥
तो मत्स्येंद्र सप्तशृंगी। भग्नावयवा चौरंगी।
भेटला की तो सर्वांगी। संपूर्ण जाला ॥
मग समाधि अव्युत्थया। भोगावी वासना या।
ते मुद्रा श्रीगोरक्षराया। दिधली मीनी॥
तेणें योगाब्जिनी सरोवर। विषय–विध्वंसैकवीर।
तिये पदीं का सर्वेश्वर। अभिषेकिले ॥
मग तिहीं तें शांभव। अद्वयानंदवैभव।
संपादिलें सप्रभव। श्रीगैनीनाथा ॥
तेणें कळिकळित भूतां। आला देखोनि निरुता।
ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा। दिधलीऐसी ॥
'ना आदिगुरु शंकरा-। लागोनि शिष्यपरंपरा।
बोधाचा हा संसारा। जाला जो आमुतें ॥
तो हा तूं घेऊनि आघवा। कळीं गिळितया जीवा।
सर्व प्रकारीं धांवा। करीं पां वेगीं ॥
आधीच तव तो कृपाळू। वरी गुरुआज्ञेचा जाला बोलू।
जाला जैसा वर्षाकाळू। खवळणे मेघा ॥
तेथ पुढां मी बापिया। मांडला आर्तां आपुलिया।
कीं यासाठीं येवढिया। आणिलों यशा
(१८ १७५२–६३)

खरे पाहाता नाथसंप्रदाय हा योगावर, वैराग्यावर, प्रखर तपस्येवर उभा असलेला. दत्तात्रेयही योगी व प्रमुख नाथही योगी. पण गहिनीनाथानंतर ही योगपरंपरा कृष्णनामाकडे कशी वळली? गहिनीनाथाच्या कृपेने आपले कुळ कृष्णनामे कसे पावन झाले याचे मोठे हृद्य वर्णन निवृत्तिनाथांनी एका अभंगात केले आहे. ते म्हणतात,

आदिनाथ उमाबीज प्रगटलें।
मच्छिंद्रा लाधलें सहजस्थिती ॥ १ ॥
तेचि प्रेममुद्रा गोरक्षा दीधली।
पूर्ण कृपा केली गयनीनाथा ॥ धृ० ॥
वैराग्यें तापला सप्रेमें निवाला।
ठेवा जो लाधला शांतिसुख ॥ २ ॥
निर्द्वंद्व निःशंक विचरता मही।
सुखानंद हृदयीं स्थिर जाला ॥ ३ ॥
विरक्तीचें पात्र अन्वयाचे सुख।
देऊनि सम्यक अनन्यता ॥ ४ ॥
निवृत्ति गयनी कृपा केली पूर्ण।
कुळ हे पावन कृष्ण नामें ॥ ५ ॥

श्रीरामाच्या नामस्मरणाने शिवाचा कंठदाह शमला. हेच कृष्णनामप्रेम आदिगुरू शिवाने गहिनीनाथामार्फत निवृत्तिनाथास दिले. नाथपंथीय निवृत्तिनाथांचे सर्वच अभंग कृष्णप्रेमाने आर्द्र झालेले दिसून येतात आणि यांच निवृत्तिनाथांचे व ज्ञानदेवांचे अनेक अभंग योगपर अनुभवाने समृद्ध झालेले आहेत. दत्तात्रेय-नाथांकडून वारकरी पंथास वैराग्य, शुद्धाचरण, प्राकृतभाषाप्रेम, जातिनिरपेक्ष वृत्ती इत्यादींबरोबर कृष्णप्रेमाचीही दीक्षा मिळालेली दिसते. ज्ञानेश्वरादी चार भावंडांना व समकालीन संतपरिवारास योग व भक्ती यांच्या अद्भुत मिश्रणाचा वारसा मिळाला. 'गयनीगव्हर कृपेचा उद्गार। धरूपता उदार अमृतमय ॥ तोचि ओघ साचा मुक्ताईसि लाटा। चाललो वैकुंठा समारंभें ॥ कुंचे गरुडटके टाळ श्रुति हरि।

चालिलो गजरी हरिसवे ।। निवृत्ति वैष्णव सोपान खेचर। करिताती गजर हरिनामें' अशा अनेक अभंगातून निवृत्तिनाथाचे सगुण प्रेम त्यांच्या प्रखर वैराग्यावरोबर शोभून दिसते. खरे पाहाता ज्ञानेश्वरादी भावंडात, म्हणजे वारकरी पंथाच्या या उगमस्थानावर ब्रह्मा, विष्णू व महेश यांचेच अवतार नाहीत काय? 'सदाशिवाचा अवतार। स्वामी निवृत्ति दातार। महाविष्णूचा अवतार। सखा माझा ज्ञानेश्वर ।। ब्रह्मा सोपान तो झाला। भक्ता आनंद वर्तला ।। आदि शक्ती मुक्तावाई। दासी जनी लागे पायी' या साध्या-भोळ्या पण वेचक शब्दात दासी जनी त्रैमूर्ती-च्याच अवताराचे रहस्य सांगत नाही काय? म्हणूनच नामकीर्तन, सगुणप्रेम यांच्यावरोबर वारकरीपंथीय संत आपला योगानुभवही शब्दांकित करताना दिसतात. काही नमुने येथे द्यावेसे वाटतात

१) शून्याचा शेवट डोळा पाहा निराळा।
नीळबिंदु सावळा प्रकाशला ।। १ ।।
ब्रह्म ज्योतिरूप विसावले जेथ।
अनुभव सांगत पहा तुम्ही ।। २ ।।
ऐसे कैलासनाथे सांगितले पार्वती।
ज्ञानदेवा निवृत्ति तचि सांगे ।। ३ ।।

२) सहस्रदळ ब्रह्मरंध्र ज्याचे घर।
सनावी निरंतर वसे जेथे ।। १ ।।
रक्त शुभ्रवर्ण नीळ पीत दिसे।
दृष्टि शुद्ध असे तयामध्ये ।। २ ।।
फार किती सांगो सज्ञान तुम्ही जन।
अर्थ हा समजोन मौन्य धरा ।। ३ ।।
गुह्याचेही गुह्य निवृत्तीने दाविले।
मीच वाचा हो बोले बोलतसे ।।४।।

३) त्रिगुणाचे मूळ सत्राबीचे सार।
उन्मनीचे बीज जाण त्या ।। १ ।।
शून्य ब्रह्म पूर्ण चक्षूचे अंतरी।
निर्विकार निरंजन तोचि ते गा ।।२।।
सूर्य चंद्र दोन्ही प्रकाशले साजिरे।
त्रिकुट सचरे अनाठसा ।। ३ ।।
ज्ञानदेव म्हणे निवृत्तिप्रसादे।
राहा रे निजबोधे निरंतर ।।४।।

४) रक्तवर्ण त्रिकुट स्थान।
श्रीहाट पाहे श्वेतवर्ण ।।१।।
श्यामवर्ण तें गोलाट।
निळबिंदु औटपीठ ।। २ ।।
वरि भ्रमरगुंफा पाहे।
दशमद्वारी गुरु आहे ।।३।।
नवद्वाराते भेदुनी।
दशमद्वारी गेली जनी ।।४।।

५) शून्यावरी शून्य पाहे।
तयावरी शून्य आहे ।।१।।
प्रथम शून्य रक्तवर्ण।
त्याचे नाव अध शून्य ।।२।।
अर्ध्व शून्य श्वेतवर्ण।
मध्यशून्य श्यामवर्ण ।।३।।
महाशून्य वर्णनील।
त्यात स्वरूप केवळ ।।४।।
अनुहात घटा श्रवणी।
ऐकुनी विस्मय जाहाली जनी ।। ५ ।।

अशा शेकडो अभंगातून वारकरी पंथीयांनी आपला आत्मानुभव योगप्रक्रियेच्या द्वारे निवेदन केला आहे. मूलाधार, त्रिकूट, श्रीहाट, गोल्हाट, औटपीठ, भ्रमरगुंफा, अनाहतनाद, निरंजन, अवधूत, उन्मनी व तुर्या, चित्ताकाश व चिदा-काश, ब्रह्मरंध्र, चंद्रामृत अथवा सत्राबीचे दूध इत्यादी प्रकारची शब्दपरंपरा वारकरी संतांच्या अभंगात विपुल प्रमाणात सापडते ती दत्त-प्रणीत नाथपंथाच्या प्रभावामुळेच. ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात तर योगमार्गाचे मोठे बहारदार व आत्मप्रचीतीने शोभायमान असे वर्णन आले आहे. नाथपरंपरेचा आदिगुरू शिव वा दत्तात्रेय यांचे मोठे हृद्य व मोचर वर्णन करताना ज्ञानेश्वर-महाराज एका अभंगात लिहितात—

पैल मेरूच्या शिखरी ।
एक योगी निराकारी ॥
मुद्रा लावुनी खेंचरी ।
प्राणायामी बैसला ॥ १ ॥
तेणे सांडियेली माया ।
त्यजियेली कथा काया ॥
मन गेले विलया ।
ब्रह्मानंदा माझारी ॥ २ ॥

अनुहत ध्वनि नाद ।
तो पावला परम पद ॥
उन्मनी तुर्याविनोदें ।
छंदें छंदें डोलतुसे ॥ ३ ॥

ज्ञान गोदावरीच्या तीरी ।
स्नान केले पंचाळेश्वरी ॥
ज्ञानदेवाच्या अंतरी ।
दत्तात्रेय योगिया ॥ ४ ॥

ज्ञानेश्वरनामदेवानंतरच्या काळात एकनाथ हे एक थोर सत्पुरुष व ग्रंथकार वारकरी पंथास लाभले इस्लामी आक्रमणाच्या काळात ज्ञानेश्वरीचा बोध लुप्त होऊ पाहात होता तो एकनाथांनी पुनः उजळून आबालवृद्धांसमोर ठेविला एकनाथाची दत्तोपासना पाहाण्यापूर्वी त्यांचे पणजे भानुदास व गुरू जनार्दनस्वामी यांच्या दत्तभक्तीचा थोडक्यात परिचय करून घेऊ भानुदासाचे घराणे विठ्ठलभक्तीत रंगलेले असले तरी त्याचेही योगपर अभंग आहेत यांच्याच कुळातील दत्तभक्ती व विठ्ठलभक्ती याचे मोठे मजेदार ऐक्य प्रचीतीस आणून देणाऱ्या एकनाथाचे गुरू देवगिरीचे जनार्दनस्वामी हे एक थोर दत्तोपासक होते हें प्रसिद्ध आहे जनार्दन स्वामींना दत्तकृपेचा अनुभव कसा आला हे सांगताना एकनाथांनी म्हटले आहे–

गुरुप्राप्तिलागी सर्वथा ।
थोर जनार्दनासी चिंता ।
विसरला तिन्ही अवस्था ।
सद्‌गुरू चिंतिता चिंतनी ॥
देवो भावाचा भोक्ता ।
दृढ जाणोनि अवस्था ।
येणे जालें श्रीदत्ता ।
तेणे हातु माथा ठेविला ॥
हातु ठेविताच तत्काळ ।
बोधु आकळिला सकळ ।
मिथ्या प्रपंचाचे मूळ ।
स्वरूप केवळ स्वबोधें ॥
कर्म करूनि अकर्ता ।
तोचि अकर्तात्मबोधु जाला देता ।
देही असोनि विदेहता ।
तेंही तत्वता आकळिली ॥
गृहाश्रमू न सांडिता ।
कर्मरेखा नोलांडिता ।
निजव्यापारी वर्तता ।
बोधु सर्वथा न मैळे ॥
तो बोधु आकळिता मना ।
मन मुकले मनपणा ।
अवस्था नावरेचि जनार्दना ।
मूर्छापन्न पडियेला ॥
त्यासी सावध करूनि तत्वता ।
म्हणे प्रभा राहे सत्वावस्था ।
तोहि गिळोनि सर्वथा ।
होयी वर्तता निजबोधें ॥
पूजाविधी करोनिया ।
जव जनार्दनु लागला पाया ।
तव अदृश्य जाला दत्तात्रेया ।
योगमायेचेनि योगें ॥
( एकनाथी भागवत ९४३०-०८ )

नाथांचे गुरू जनार्दनस्वामींची दत्तभक्ती प्रसिद्ध असून त्यांनीच नाथांना दत्तात्रेयाचे दर्शन घडवून आणले योगी, विरक्त व सन्यासमार्गी दत्तबोध एकनाथांपासून वारकरी पंथात

चालिलो गजरी हरिसंगे ॥ निवृत्ति वैष्णव सोपान खेचर। करिताती गजर हरिनामे' अशा अनेक अभंगातून निवृत्तिनाथाचे सगुण प्रेम त्याच्या प्रखर वैराग्याबरोबर शोभून दिसते खरे पाहाता ज्ञानेश्वरादी भावडांत, म्हणजे वारकरी पंथाच्या या उगमस्थानावर ब्रह्मा, विष्णू व महेश यांचेच अवतार नाहीत काय? 'सदाशिवाचा अवतार। स्वामी निवृत्ति दातार। महाविष्णूचा अवतार। सखा माझा ज्ञानेश्वर ॥ ब्रह्मा सोपान तो झाला। भक्तां आनंद वर्तला ॥ आदि शक्ती मुक्ताबाई। दासी जनी लागे पायी' या साध्या-भोळ्या पण वेचक शब्दांत दासी जनी नैमूर्ती-च्यात्र अवताराचे रहस्य सांगत नाही काय? म्हणूनच नामकीर्तन, सगुणप्रेम यांच्याबरोबर वारकरीपंथीय संत आपला योगानुभवही शब्दांकित करताना दिसतात काही नमुने येथे द्यावेसे वाटतात

१) शून्याचा शेवट डोळा पाहा निराळा।
नीळबिंदु सावळा प्रकाशला ॥ १ ॥
ब्रह्म ज्योतिरूप विसावले जेथ।
अनुभव साचत पहा तुम्ही ॥ २ ॥
ऐसे कैलासनाथें सांगितले पार्वती।
ज्ञानदेवा निवृत्ति तेचि सांगे ॥ ३ ॥

२) सहस्रदळ ब्रह्मरंध्र ज्याचे घर।
सनाचीं निरंतर वसे जेथे ॥ १ ॥
रक्त शुभ्रवर्ण नीळ पीत दिसे।
दृष्टि शुद्ध असे तयामध्यें ॥ २ ॥
फार किती सांगो सज्ञान तुम्ही जन।
अर्थ हा समजोन मौन्य धरा ॥ ३ ॥
गुह्याचेही गुह्य निवृत्तीनं दाविले।
मौच वाचा हो बोले बोलतसे ॥ ४ ॥

३) त्रिगुणाचे मूळ सनावीचे सार।
उन्मनीचें बीज जाण रया ॥ १ ॥
शून्य ब्रह्म पूर्ण चक्षूचे अंतरी।
निर्विकार निरंजन तोचि त गा ॥२॥
सूर्य चंद्र दोन्ही प्रकाशले साजिरे।
त्रिकूट सचरे अनाठसा ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे निवृत्तिप्रसादें।
राहा रे निजबोधें निरंतर ॥४॥

४) रक्तवर्ण त्रिकूट स्नान।
श्रीहाट पाहे श्वेतवर्ण ॥१॥
श्यामवर्ण तें गोलाट।
निळबिंदु औटपीठ ॥ २ ॥
वरि भ्रमरगुफा पाहे।
दशमद्वारी गुरु आहे ॥३॥
नवद्वारातें भेदुनी।
दशमद्वारी गेली जनी ॥४॥

५) शून्यावरी शून्य पाहे।
तयावरी शून्य आहे ॥१॥
प्रथम शून्य रक्तवर्ण।
त्याचे नाव अध शून्य ॥२॥
अर्ध्व शून्य श्वेतवर्ण।
मध्यशून्य श्यामवर्ण ॥३॥
महाशून्य वर्णनील।
त्यात स्वरूप केवळ ॥४॥
अनुहात घटा श्रवणी।
ऐकुनी विस्मय जाहाली जनी ॥ ५ ॥

अशा शेकडो अभंगातून वारकरी पंथीयांनी आपला आत्मानुभव योगप्रक्रियेच्या द्वारे निवेदन केला आहे मूलाधार, त्रिकूट, श्रीहाट, गोल्हाट, औटपीठ, भ्रमरगुफा, अनाहतनाद, निरंजन, अवधूत, उन्मनी व तुर्या, चित्ताकाश व चिदाकाश, ब्रह्मरंध्र, चंद्रामृत अथवा सत्रावीचे दूध इत्यादी प्रकारची शब्दपरंपरा वारकरी संतांच्या अभंगात विपुल प्रमाणात सापडते ती दत्त-प्रणीत नाथपंथाच्या प्रभावामुळेच ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात तर योगमार्गाचे मोठे बहारदार व आत्मप्रचीतीने शोभायमान असे वर्णन आले आहे नाथपरंपरेचा आदिगुरू शिव वा दत्तात्रेय यांचे मोठे हृद्य व गोचर वर्णन करताना ज्ञानेश्वर-महाराज एका अभंगात लिहितात—

पैल मेरूच्या शिखरीं ।
एक योगी निराकरी ॥
मुद्रा लावुनी खेंचरी ।
प्राणायामीं बैसला ॥ १ ॥

तेणें सांडियेली माया ।
त्यजियेली कंथा काया ॥
मन गेलें विलया ।
ब्रह्मानंदा माझारीं ॥ २ ॥

अनुहत ध्वनि नाद ।
तो पावला परम पद ॥
उन्मनीं तुर्याविनोदें ।
छंदें छंदें डोलतुसे ॥ ३ ॥

ज्ञान गोदावरीच्या तीरीं ।
स्नान केले पंचाळेश्वरीं ॥
ज्ञानदेवाच्या अंतरीं ।
दत्तात्रेय योगिया ॥ ४ ॥

ज्ञानेश्वरनामदेवानंतरच्या काळात एकनाथ हे एक थोर सत्पुरुष व ग्रंथकार वारकरी पंथास लाभले. इस्लामी आक्रमणाच्या काळात ज्ञानेश्वरीचा बोध लुप्त होऊ पाहात होता तो एकनाथांनी पुनः उजळून आबालवृद्धांसमोर ठेविला. एकनाथांची दत्तोपासना पाहाण्यापूर्वी त्यांचे पणजे भानुदास व गुरू जनार्दनस्वामी यांच्या दत्तभक्तीचा थोडक्यात परिचय करून घेऊ. भानुदासांचे घराणे विठ्ठलभक्तीत रंगलेले असले तरी त्यांचेही योगपर अभंग आहेत. यांच्याच कुळातील दत्तभक्ती व विठ्ठलभक्ती यांचे मोठे मजेदार ऐक्य प्रचीतीस आणून देणाऱ्या एकनाथांचे गुरू देवगिरीचे जनार्दनस्वामी हे एक थोर दत्तोपासक होते हे प्रसिद्ध आहे. जनार्दनस्वामींना दत्तकृपेचा अनुभव कसा आला हे सांगताना एकनाथांनी म्हटले आहे–

गुरुप्राप्तिलागी सर्वथा ।
थोर जनार्दनासी चिंता ।
विसरला तिन्ही अवस्था ।
सद्‌गुरू चिंतितां चिंतनी ॥
देवो भावाचा भोक्ता ।
दृढ जाणोनि अवस्था ।
येणें जालें श्रीदत्ता ।
तेणें हातु माथां ठेविला ॥
हातु ठेवितांच तत्काळ ।
बोधु आकळिला सकळ ।
मिथ्या प्रपंचाचें मूळ ।
स्वरूप केवळ स्वबोधें ॥
कर्म करूनि अकर्ता ।
तोचि अकर्तात्मबोधु जाला देता ।
देही असोनि विदेहता ।
तेंही तत्त्वता आकळिली ॥
गृहाश्रमू न सांडितां ।
कर्मरेखा नोलांडिता ।
निजव्यापारीं वर्ततां ।
बोधु सर्वथा न मैळे ॥
तो बोधु आकळितां मना ।
मन मुकले मनपणा ।
अवस्था नावरेचि जनार्दना ।
मूर्छापन्न पडियेला ॥
त्यासी सावध करूनि तत्त्वता ।
म्हणे प्रभा राहे सत्त्वावस्था ।
तोहि गिळोनि सर्वथा ।
होयी वर्तता निजबोधें ॥
पूजाविधी करोनियां ।
जंव जनार्दनु लागला पायां ।
तंव अदृश्य जाला दत्तात्रेया ।
योगमायेचेनि योगें ॥
( एकनाथी भागवत ९:४३०-०८ )

नाथांचे गुरू जनार्दनस्वामींची दत्तभक्ती प्रसिद्ध असून त्यांनीच नाथांना दत्तात्रेयांचे दर्शन घडवून आणले. योगी, विरक्त व संन्यासमार्गी दत्तबोध एकनाथापासून वारकरी पंथात

शुद्ध आचरणावर आधारलेल्या गृहस्थाश्रमाकडे वळलेला दिसतो वारकरी पंथातील दत्तभक्तीचा धागा कर्मठपणावर न जाता प्रेमावर पोसलेला दिसतो दत्ताला भौतिक सुखे मागण्यापेक्षा प्रेम-सुख मागणारे वारकरी संत प्रवृत्तीने थोडे वेगळेच दिसतात या दृष्टीने जनार्दनस्वामींचे दोनतीन अभंग पाहाण्यासारखे आहेत

१) ॐ अनंत निर्गुण सर्वाठायी पूर्ण ।
ना करी निर्वाण दासालागी ॥ १ ॥
हाकेबरोबरी धावोनी सत्वरी ।
भक्तालागी तारी गुरुनाथ ॥ २ ॥
सुंदर त ध्यान वस औदुंबरी ।
व्याघ्रचर्मधारी शोभतसे ॥ ३ ॥
कापाय अंबर दंडकमंडलु ।
डमरू त्रिशूळ शंखचक्र ॥ ४ ॥
किरीट कुंडले रुद्राक्षाच्या माळा ।
वंजयंती गळा हार रुळे ॥ ५ ॥
सूर्यचंद्र नेत्र शेष फणी छत्र ।
पीतांबर वस्त्र परिधान ॥ ६ ॥
गुरुचरणी सर्व तीर्थांची मिरासी ।
म्हणोनि जगासी उद्धरिती ॥ ७ ॥
जनार्दन म्हणे न लगे ब्रह्मज्ञान ।
गुरुचरणी मन राहो सदा ॥ ८ ॥

२) धन्य कृष्णातीरी धन्य औदुंबर ।
जेथें गुरुवर वसतसे ॥ १ ॥
धन्य तेचि नर येती जे यात्रेसी ।
दर्शनामात्रें त्यासी मोक्ष जोडे ॥ २ ॥
अनंत जन्माची पातकें संचित ।
नुरती किंचित तीर्थ घेता ॥ ३ ॥
याचिता चरित्र सद्‌गुरु स्वामिचे ।
निर्मूळ भवाचे सत्य होय ॥ ४ ॥
नामस्मरण ज्याच्या सद्‌गुरूचे होणे ।
व्यर्थ चिंता वाहणे संसाराची ॥ ५ ॥
गुरु गीती गावा भावे चित्ती ध्यावा ।
सगुण पाहावा डोळेभरी ॥ ६ ॥
जनार्दन म्हणे तीर्थे त्याचेपाशी ।
चारी मुक्ती दासी होती त्याच्या ॥ ७ ॥

३) तुमचा प्रसाद लाधला मस्तकी ।
श्रीदत्तराया तेणे जालो मी सुखी ॥ १ ॥
वाचे वद नाम दत्त दत्त आवडी ।
हीच माझी जोडी न करी दुजी ॥ २ ॥
पायाचा आठव द्यावा सर्वकाळ ।
अखंड कल्लोळ नामघोष ॥ ३ ॥
जनार्दन एकनाथा परियेसी ।
ध्यान अहर्निशी दत्तात्रय ॥ ४ ॥

जनार्दनस्वामींचा अनुग्रह एकनाथांना देवगिरीवरील मुक्कामात झाला देवगडावरच स्वामींचे एकान्तस्थान होते स्वामी दर गुरुवारी तेथे ध्यानधारणा करीत याच ठिकाणी श्रीदत्तात्रेयांनी मलग वेषात एकनाथांना दर्शन दिले दत्तराजाकडूनच भागवत धर्माची ध्वजा फडकविण्याची प्रेरणा एकनाथांना झाली दत्त-जनार्दन-एकनाथ या त्रिमूर्तींची अनेकदा सुखद चर्चा होई एकनाथांना दत्तभेटीची गोडी वाटू लागली दत्तप्रेरणने नाथांनी आपला भागवत ग्रंथ लिहिण्यास प्रारंभ केला 'आता नमू दत्तात्रेया । जो का आचार्यांचा आचार्या । तेणे प्रवर्तिले ग्रंथ-कार्या । अर्थवावया निजबोधू ' (१४१) असे प्रारंभीच्या विभागात दत्तप्रभूंना वंदन आहे भिक्षुगीतेच्या अखेरीसही परमगुरू दत्तात्रेयाचा उल्लेख करताना त्यांनी म्हटले आहे, ' माझे निजगुरुचाही गुरू । श्रीदत्त परमगुरू । तो भिक्षुगीतार्थे साचारू । योग्या योगेश्वरू तुष्टला ॥ तेणे तोखलेनि अद्‌भुते । आदरें आस्वावूनि माते । अभय देऊनि निजहस्ते । पूर्ण ग्रंथार्थे डुल्लनु (२३ १०००–०१) नाथाच्या कीर्तनप्रसंगी विठ्ठलाबरोबरच अथवा विठ्ठलरूपानेच दत्त प्रकट होत असे एका अभंगात नाथमहाराजांनी म्हटले आहे, 'भुक्तमंडपामाझारी निजनामगजरी । दत्त प्रगटला कीर्तनामाझारी ॥ दत्त स्थावरी जंगमी

विरवी विश्व धरी । तोचि घरोघरी नित्य भिक्षाकरी'

एकनाथानी दत्तभक्तीत रगून आपले भक्ति-कार्य आरभिले आपल्या भागवताच्या ७ ते ९ अध्यायात यदुअवधूताच्या सवादरूपात दत्तात्रे-यानी चोवीस गुरू का व कसे केले याचे फार विस्ताराने आणि मार्मिकतेने वर्णन केले आहे नाथाचा अवधूत म्हणजे श्रीदत्तात्रेयच 'तो अवधूत जाण दत्तात्रेय' असे त्यानीच म्हटले आहे सातव्या अध्यायात २५९–७६ ओव्यापर्यंत सागितलेली अवधूतलक्षणे महत्त्वाची आहेत 'सकल्पविकल्परहित । शुद्ध सर्वांगी विभूत । यालागी बोलिजे 'अवधूत' । येन्हवी विख्यात ब्राह्मणु ॥ सभावता समस्तु । प्रपच निजबोधे असे धूतु । यालागी बोलिजे 'अवधूत' । येन्हवी विख्यातु ब्राह्मणु ॥ अह धुई तो 'अवधूतु' । तोचि योगी तोचि पुनीतु । जो का अहकारग्रस्तु । तोचि पतितु जन्मकर्मी ॥' (२७०–७२) या अवधूताने यदुराजाला केलेला उपदेश दत्तभक्ताना फार मोलाचा वाटतो यदूने अवधूताची केलेली स्तुती व प्रार्थना, अवधूतकृत गुरुमाहात्म्य, स्थिरप्रज्ञ बुद्धीची लक्षणे, नरदेहाचे महत्त्व, कीर्तनमहिमा, कनककातांविचार, शरीराची दुर्गंधी, हरिकृपेने येणारे वैराग्य इत्यादी अतिशय महत्त्वाचे विषय दत्तपथीयाना आवडतील अशा सुलभ रीतीने नाथ-भागवतात आले आहेत आपण चोवीस गुरू का केले याचेही विवरण अवधूतानी केले आहे यदूला साक्षात्कार झाल्यानतर दत्तशिष्यपरपरा सागताना म्हटले आहे, 'तो अवधूत जाण दत्तात्रेया । तेणे आलिगूनि यदुराया । निजरूपाचा बोधु तया । अनुभवावया दीधला ॥ दत्तात्रेय-शिष्यपरपरा । सहस्रार्जुन यदु दुसरा । तेणे जनार्दनु तिसरा । शिष्य केला खरा कलियुगी ॥ गुरुप्राप्तीलागी सर्वथा । थोर जनार्दनासी चिंता । विसरली तिन्ही अवस्था । सद्गुरु चिंतिता चिंतनी ॥ (९ ४२८–३१)

विठ्ठलभक्तीत रगून गेलेल्या व भागवत धर्माची ध्वजा पुन: उभी करणाऱ्या एकनाथानी श्रीदत्तनाममहिमा, श्रीदत्तमानसपूजा, श्रीदत्तात्रेय-जन्म अशी काही प्रकरणे रसाळ व प्रसादपूर्ण अभगातून गाइली आहेत त्यातील काही नमुने पाहिल्यानतर वारकरी सत दत्ताची उपासना कोणत्या भूमिकेवरून करतात हे ध्यानात येईल

१) दत्त वसे औदुबरी ।
त्रिशूल डमरू जटाधारी ॥१॥
कामधेनू आणि श्वान ।
उभे शोभती समान ॥२॥
गोदातीरी नित्य वस्ती ।
अगी चर्चिली विभूती ॥३॥
काखेमाजी शोभे झोळी ।
अर्धचद्र वसे भाळी ॥४॥
एकाजनार्दनी दत्त ।
रात्रदिनी आठवत ॥५॥

२) दत्त माझा दिनानाथ ।
भक्तालागी उभा सतत ॥ १ ॥
त्रिशूल घेउनिया करी ।
उभा असे भक्तद्वारी ॥ २ ॥
भाळी चर्चिली विभूती ।
रुद्राक्षाची माळ कठी ॥ ३ ॥
जवळी असे कामधेनू ।
तिचा महिमा काय वानू ॥ ४ ॥
एकाजनार्दनी दत्त ।
रूप राहिले हृदयात ॥ ५ ॥

३) दत्त माझी माता दत्त माझा पिता ।
बहिण बधु चुलता दत्त माझा ॥ १ ॥
दत्त माझा गुरू दत्त माझा तारू ।
मजशी आधारू दत्तराज ॥ २ ॥
दत्त माझे धन दत्त माझें मन ।
सोइरा सज्जन दत्त माझा ॥ ३ ॥
एकाजनार्दनी दत्त हा विसावा ।
न विचारिता गावा जावे त्याच्या ॥४॥

४) दत्त माझी माय ।
आम्हां मुखा उणे काय ? ॥ १ ॥
नित्य प्रीती दत्तनामी ।
दत्त वसे गृहारामी ॥ २ ॥
दत्ताविण नसे दुजें ।
दत्त मायबाप माझे ॥ ३ ॥
दत्तात्रय दत्तात्रय ।
नाही कलिकाळाचें भय ॥ ४ ॥
एकाजनार्दनीं दत्त ।
नित्य देखे हृदयांत ॥ ५ ॥

५) माझी दत्त ती माउली ।
प्रेमपान्हा पान्हावली ॥ १ ॥
कुर्वाळुनी लावी स्तनी ।
नोहे निष्ठुर क्रोध नाही मनीं ॥ २ ॥
भक्तांसी न विसंबे ।
सदा वाट पाहे बिंबें ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं निश्चित ।
दत्तनामें पावन पतित ॥ ४ ॥

६) दत्त सबाह्य अंतरी ।
दत्तात्रय चराचरी ॥ १ ॥
दत्तात्रय माझें मन ।
हरोनि गेले मीतूंपण ॥ २ ॥
मुळी सिंहाद्री पर्वती ।
दत्तात्रयें केली वस्ती ॥ ३ ॥
भक्तामनीं केला वास ।
एकाजनार्दनी विश्वास ॥ ४ ॥

एकनाथांच्या समकालीन असणारे व दत्त-भक्तीत रंगून गेलेले आणखी एक सत्पुरुष म्हणजे बेदरच्या बहामनी शाहीतील नारायणपेठ येथील दासोपंत ( शके १४७३–१५३७ ) देशपांडे होत. आयुष्यभर दत्तभक्ती व प्रचंड प्रमाणावर ग्रंथ-लेखन हे दासोपंतांच्या आयुष्याचे ध्येय होते. आंबेजोगाई येथे त्यांच्या उपासनेतील दत्तमूर्ती अद्यापि आहे. अवधूतराज, दत्तात्रेयमाहात्म्य [illegible]इत), अवधूतगीता, दत्तात्रेयसहस्रनाम-स्तोत्र, दत्तात्रेयदशनामस्तोत्र, दत्तात्रेयषोडश-नामस्तोत्र, दत्तात्रेयशतनामस्तोत्र, दत्तात्रेय-द्वादशनामस्तोत्र, सिद्धदत्तात्रेयस्तोत्र, गुरुस्तोत्र, दत्तात्रेयनामावळी, अशी काही दत्तविषयक प्रकरणे दासोपंतानी लिहिली आहेत. दासोपंतांची पदे दत्तभक्तीने आर्द्र झालेली दिसतात. दत्तभेटीची तळमळ पाहा कशी आहे ती—

१) निढळावरि बाहे वाटुली मी पाहे ।
न दिसे वो अवधूतु आतां मोकलान धाये ॥
अश्रुपात न धरती ! सखिये ! सांवरूं किती ? ॥
येई दिगंबरा ! माझया माहेरा !
तुजविण प्राण सांडील शरीर ॥

२) वाटु पाहतां वेळु जाहाला वो बाइये !
श्रीदत्तु गुंतला कोठें ? अजुनी कां न ये ॥१॥
तो माझा प्राणु ! आत्मा ! सखिये !
मन हें न धरे माये ! काये करूं ! ॥ धृ. ॥
उपाये करितां सर्व विपरीत जाहालें ।
दिगंबरें अवृत्ती अंतर भरलें ॥ २ ॥

३) श्रीदत्तु सांवळा चैतन्यपुतळा मी कै
देखयीन डोळां वो ॥ १ ॥
कासे सोनसळा तिलक पिवळा
चंदनाची उटी वरि माळा वो ॥ २ ॥
जीवाचे जीवन जीवें वोवाळीन,
अखंड लागले त्याचें ध्यान वो ॥ ३ ॥
माझे पंचप्राण श्रीदत्त निधान
न स्मरे आणिक तेणेंवीण वो ॥ ४ ॥
बाहिवटे कंकणें मुद्रिकाचें लेणे
अगंद कानकें विभूषणे वो ॥ ५ ॥
दिगंबरे येणें कमळनयनें हरिली
साधूंची निजमनें वो ॥ ६ ॥

४) बहु दिवस क्रमले सखये ! मी काये करूं ?
भेटी नये अवधूत, त्याचे पाय धरूं ॥ १ ॥
भेटीचें आरत माझें परिपूर्ण करा ।
मन माझें उतावीळ पाहिन माहियेरा ॥२॥

वाट पाहतां कुंठली गति, मति, आठवण ।
दिगंबराचें भेटणे मनीं मारुनि मन ॥ ३ ॥

५) प्रेम दे मज प्रेम दे ! सर्व सुखमय प्रेम दे ।
परमानंदानंदकंदा ।
सर्वदा मज प्रेम दे ॥
आत्मया तुज जाणतां
मज योगसाधन कासया ?
पूर्ण ब्रह्म पुराण तू, तरि भेदु के परमात्मया ?
सगुणनिर्गुण भाग न करी–
नावडे मज ते क्रिया ।
दिगंबरा ! तव नित्य सेवन आवडे
मना माझिया ॥

विठ्ठलभक्तीत रंगून गेलेले वारकरी पंथाचे सर्वश्रेष्ठ सत्पुरुष श्रीतुकोबाराय यांचे दत्तावरील अभंग दोनच असले तरी अंतरंगाच्या जिव्हाळ्याने आणि भावभक्तीच्या स्पर्शाने ते दत्तभक्तांना नित्य पठणीय बनले आहेत.

१) तीन शिरें सहा हात ।
तया माझे दंडवत ॥ १ ॥
काखें झोळी पुढें श्वान ।
नित्य जान्हवीचें स्नान ॥ २ ॥
माथां शोभे जटाभार ।
अंगी विभूति सुंदर ॥ ३ ॥
शंख चक्र गदा हाती ।
पायी खडावा गर्जती ॥ ४ ॥
तुका म्हणे दिगंबर ।
तया माझा नमस्कार ॥ ५ ॥

२) नमन माझें गुरुराया ।
महाराजा दत्तात्रेया ॥ १ ॥
तुझी अवधूत मूर्ती ।
माझ्या जीवाची विश्रांती ॥ २ ॥
जीवींचे साकडें ।
कोण उगवील कोडें ? ॥ ३ ॥
अनसूयासुता ।
तुका म्हणे पाव आता ॥ ४ ॥

तुकोबानंतर वारकरीपंथीयांत निळोबा व बहिणाबाई यांच्याखेरीज मोठे साधुसंत निर्माण झाले नसले तरी शंकरस्वामी शिऊरकर, मल्लाप्पा वासकर, हैबतरावबाबा, वासुदेवबुवा देहूकर, चातुर्मास्ये महाराज, गंगूकाका शिरवळकर, साखरे महाराज, विष्णुबुवा जोग, दादा महाराज सातारकर, सं. बा. दांडेकर इत्यादी सत्पुरुषांनी संप्रदायाचे जतन व वर्धन केले. या सर्वांना पंढरीचा विठ्ठल हेच परम दैवत असले तरी नाथसंप्रदायाच्या संदर्भाने आदिगुरु दत्तात्रेयाचे विस्मरण त्यांना नव्हते. दत्ताच्या उपासनेचा प्रचार यानंतर वारकरी पंथीयांनी अर्थातच केलेला दिसत नसला तरी अनेक वारकरी नित्यनेमाने दत्ताची पूजाअर्चा करीत राहिले. काही विठ्ठलप्रेमी वारकऱ्यांनी दत्तावर काही पदे व अभंगादी कवनेही केली असतील. ' श्रीदत्तप्रबोध'कर्ते श्रीकावडीबोवा यांचा उल्लेख मागे आला आहेच. पंढरीच्या पांडुरंगावर नितान्त प्रेम करणारे आणि पंढरीची वारी करणारे कावडीबोवा आदिनाथ ( हंस )-अत्रिनाथ-दत्तात्रेय- जनार्दन-एकनाथ- निंबराज-अनंतराय अशा परंपरेतील होते. दत्त व विठ्ठल यांच्या ऐक्याचेमोठे मनोहर चित्रण 'दत्तप्रबोध' ग्रंथात असल्याचे आपण पाहिले आहेच.

दत्तपंथ व वारकरी पंथ यांच्यात तुलना करण्याचा प्रयत्नही अनेकांनी केलेला आहे. दत्तभक्तांचा कर्मठपणा, या पंथातील व्रतवैकल्ये, सोवळ्याचे महत्त्व, वर्णाश्रममहिमा यांच्या संदर्भात वारकरी पंथाचे स्वरूप फार वेगळे दिसते. दत्तसंप्रदायात मंत्र, तंत्र, यंत्र, व्रते, वैकल्ये यांना महत्त्व, तर वारकरी पंथात या सर्वांचा एक प्रकारे निषेधच आहे. श्री. अप्रबुद्ध यांनी गुरुचरित्रातील व्रतवैकल्यांचा केलेला पाठपुरावा भा. पं. बहिरट यांना मान्य नाही. ते म्हणतात, 'अनेक व्रतवैकल्यामुळे, नाना देवतांची नाना व्रते करणाऱ्यांची चित्तशुद्धी व्हावयाच्या ऐवजी चित्त-

भ्रमच होतो. देवाचे खरे प्रेमस्वरूप चित्तात साठविले जाण्याऐवजी निरनिराळे कल्पित विकृत रूपाचे ठसे उमटून चित्तचांचल्य वाढते; आज एक तर उद्या दुसरे, अशी मालिका सुरू होते. तेव्हा संस्कारदृष्टचा अगर वेळ चागला जाण्याच्या दृष्टीनेही त्याचा उपयोग नाही. म्हणून वारकरी संप्रदायाने असल्या व्रतवैकल्यांचा निषेधच केला आहे. प्रेमभक्तीस जीवनाचा केंद्रस्थानचा महत्तम बिंदू मानल्यामुळे वर्णाश्रमधर्माच्या कर्मासही त्याने फाजील महत्त्व दिले नाही. परमेश्वराच्या सन्निध जाण्यास, व्रतवैकल्ये अगर असली कर्मे सकाम केल्यामुळे व ही कर्मेच मनुष्याच्या मोठेपणाची गमक आहेत या विकृत समजुतीने आड येतात.' (वारकरी संप्रदाय : उदय व विकास, पृष्ठ २५८) श्री. वहिरट यांचे हे निरीक्षण महत्वाचे असले तरी त्यांनी पंत महाराज बाळेकुंद्रीकर, विष्णुदास माहुरकर यांच्यासारख्यांच्या दत्तप्रेमास तरी दृष्टीआड करू नये.

## समर्थ संप्रदायात दत्तात्रेय

समर्थ संप्रदयाचे मुख्य दैवत श्रीरामचंद्र असले तरी योगीराज दत्तप्रभूंचा संदर्भ समर्थचरित्रातून अनेकदा येतो. मलंगवेषात दत्तांनी समर्थांना दर्शन दिल्याच्या कथा चरित्रकार सांगतात. दत्तप्रणीत अवधूतगीतेचा व गुरुगीतेचा उल्लेख करताना समर्थांनी दासबोधात म्हटले आहे,' शिवगीता रामगीता। गुरुगीता गर्भगीता। उत्तरगीता अवधूतगीता। वेद आणि वेदान्त' (१. १. १८) समर्थांच्या दृष्टीने दत्त व गोरक्ष हे गुरुस्वरूप असून सिद्ध पुरुषाप्रमाणे ते त्याना मानतात. ' दत्त गोरक्ष आदि करूनी। सिद्ध भिक्षा मागती जनीं। निःस्पृहता भिक्षेपासुन। प्रगट होये' (दासबोध : १४.२.५) या ओवीत भिक्षा व निःस्पृहता यांचे समर्थसंप्रदायातील स्थान दत्तप्रणीत असावे. दत्तप्रभूंनी अवधूतगीता गोरक्षनाथास उद्देशून केली अशी समर्थांचीही साक्ष आहे. ' अवधूतगीता केली। गोरक्षास निरोपिली। ते अवधूतगीता बोलिली। ज्ञानमार्गं'। (दासबोध : ७.७.४४) समर्थांच्या एका स्वानुभवी शिष्याने, दिनकरस्वामी तिसगावकरांनी अवधूतगीतेचा आदर करून स्वानुभवदिनकरात दत्त व अवधूत सिद्ध यांच्यासंबंधी म्हटले आहे,

दत्त दुर्वासादि वशिष्ठ हनुमंत।
कपिल मत्स्येंद्रादि गोरक्ष अवधूत ॥
नवनाथ चौऱ्यासी सिद्ध युक्त।
योगसिद्धि थोरावले ॥
दत्त गोरक्ष हनुमंत।
आदिनाथ मीन गैनि अवधूत ॥
चौऱ्यासी सिद्ध आणि योगी समस्त नवही नाथ ॥
संत महंत मुनेश्वर।
सिद्ध साधु योगेश्वर।
दत्त गोरक्ष दिगंबर।
जये स्वरूपी निमग्न ॥

समर्थांनी दत्तावर अशी फारशी रचना केली नसली तरी शिवशंकरावरील त्यांची पदरचना वा अभंगरचना दत्तप्रेमीयांना पसंत पडेल अशा प्रकारची आहे. 'दंडडमरुमंडित। पिनाकपाणी' हे रामीरामदासांचे पद शिवभक्तांप्रमाणेच दत्तप्रेमीयानाही आवडेल. ' लवथवती विक्राळा ब्रह्मांडमाळा ' ही दासकृत सांबाची आरती दत्तभक्त नित्य म्हणत असतात. समर्थांनी दत्तात्रेयास उद्देशून केलेली भूपाळी व आरती येथे देण्यासारखी आहे.

(१) उठि उठि या दत्तात्रेया। भानु करं पाहे उदया। करणें दीनांवरती दया। चरण दावीं वेगेंसी ॥ ध्रु. ॥ मंद वायूही सुटला। पक्षी करिताती किल्विला। दीपवर्ण शुभ्र जाला। पूर्व दिशा

उजळली ॥१॥ करुनि कृष्णेंचें सुस्नान। घेउनि पूजेचें सामान। सकळां लागलें तव ध्यान। कपाट केव्हां उघडेल ॥२॥ आले देवादिक दर्शना। त्यांच्या पुरवाव्या कामना। संतोषोनि आपल्या मना। तीर्थप्रसाद अर्पावा ॥३॥ गुरु त्रैमूर्ति साकार। करिसी पतितांचा उद्धार। म्हणुनि धरिसी हा अवतार। संकटी भक्तां रक्षिसी ॥४॥ रामदास लागे पायी। मागे इच्छा हेंचि देईं। तूंचि माझी बाप मायी। प्रतिपाळावें भक्तांसी ॥५॥

(२) विधिहरिहर सुंदर दिगंबर झाले। अनुसूयेचें सत्व पहावया आले। तेथें तीन बाल करुनि ठेविले। दत्त दत्त ऐसें नाम पावले ॥१॥ जयदेव जयदेव जय दत्तात्रया। आरती ओवाळूं तुज देवत्रया ॥ ध्रु. ॥ तिहीं देवांच्या युवति पति मागों आल्या। त्यांना म्हणे वळखूनि न्या आपुल्याला। कोमल शब्दें करुनी करुणा भाकिल्या। त्यासी समजावील्या स्वस्थानी गेल्या ॥२॥ काशी स्नान करविरक्षेत्रीं भोजन। मातापुरिं शयन होतें प्रतिदिन। ऐसें हें अघटित सिद्ध महिमान। दास म्हणे हें तों नव्हे सामान्य ॥३॥

समर्थांच्या संप्रदायातील वैराग्य, गुरुभक्ती, तत्वविचार यांचा दत्ताशी विचार करता अनेक बाबतीत साम्य आढळून येईल. वैराग्यनिरूपण, मायाब्रह्मनिरूपण, आत्मानात्मविवेक, पिण्डोत्पत्तिनिरूपण इत्यादी प्रकरणे या संदर्भात दासबोधातून वाचण्यासारखी आहेत. दत्त व नाथ यांच्या अनुयायांतील परंपरेने आलेले अद्भुत चमत्कारही समर्थांच्या संप्रदायात शिष्यपरंपरेने वाढविलेले दिसतात. आत्माराम महाराज येक्केहाळीकर यांनी 'श्रीदासविश्रामधाम' नावाचा जो एक प्रचंड ग्रंथ लिहिला आहे त्यात असे चमत्कार अनेकदा आले आहेत. श्रीसमर्थ रामदासांना दत्तात्रेयांचे दर्शन कोणत्या प्रसंगी झाले याचे मोठे सुरस व अद्भुत वर्णन आत्माराम महाराजांनी पुढीलप्रमाणे केले आहे.

(१) जे ठायीं उभे दास समर्थ। तेथेंचि श्रीगुरुदेवदत्त। कमंडळी उदक भरित। धरोनि हातें पातले ॥ ९ ॥ मातापुरनगीं जयाचें शयन॥ मनकर्णिकेमाजी नित्य मज्जन। करवीरी जयाचें भिक्षा भोजन॥ जो सिद्ध सिद्धांचा मुनिराय ॥ ११० ॥ नित्यनेमाचे कथिलें चिन्ह॥ येरव्हीं जेथें सद्भक्त जन। भजती बाहती तेथें पाऊन॥ हरोनि संकट तारिती ॥ ११ ॥ रामदासा देऊन दर्शन। वोळखी वृत्तांतु सांगूनि पूर्ण॥ करवूनिया उदक प्राशन। नेले अवचट शिखरावरी ॥१२॥ जें सिद्धमुनी योगियां रमकस्थान॥ छाया सुशीतळ सफळित वन॥ तीर्थरूप सांचले जेथें जीवन॥ विसावोन बोलत बैसलें ॥ १३ ॥ अत्रिनंदना उपजली कृपा॥ पुसती वाटले भय तुज बापा॥ जी देहभृतया थेट साटोपा–॥ माझीं नयेचि सद्भाव ॥ १४ ॥ मग हासोनिया अनुसयासुत॥ निर्छायादि सांगोनि योग समस्त। मणका अमोल्य ईश्वरी दत्त। पाया स्वहस्तें बांधिला ॥ १५ ॥ जया मणीचा ऐसा प्रताप। न बाधे आंगा शाप कोप ताप। यमभये दृष्टीस न पडे अल्प॥ संतोष वृत्ति ठसावे ॥ १६ ॥ मग स्मरतां पावेन दे भाक कोपून॥ अवधूत पावला अंतर्धान॥ दास निघोनि निर्भयमनें॥ पाहात वनस्थान चालले ॥ १८ ॥

(२) जोगा अंबा पातले तेथुनी ॥ ॥ सहजस्वभावें विहरतां रानी। दृढ करोनि चौघे ब्राह्मणांनी। तपती श्रीदत्त भेटावया॥ ११–६४ देखोनि तयाला पुसतां वृत्तांत। ते वदती तो भेटवा अत्रिसुत॥ भाव दृढकरा वदोनि त्यांते। आपणहि बैसले त्या सन्निधी ॥ ६४ ॥ प्रहर येक लोटुनि गेली यामिनी॥ दत्तात्रय आले वेष

धरूनि ॥ पांच पोरांसह इच्छामोहिनी ॥ उभय करणी झळके पुढें ॥६५॥ अहंकार हल्यावरी ममता गोणी ॥ स्वस्तचि साहित्य ओस भरूनि । षड्रिपु मुरगे धरिले पाणी । बोकडा गर्व चालतो ॥ ६६ ॥ ते कपट कुविद्या झळके दुहिता । एवं गारोडी भासे तावता । उतरोनि क्षुधा गे लागली म्हणतां । स्वयंपाक माडिला पर्तोन तें ॥ ६७ ॥ अंतरस्थितीची चढविली हडी । न भरे साहित्यता घालिता थोडी । सिद्ध पुरुष सांगे कापूनि कोमडी ॥ तृप्तिवर वरी शिजवी का ॥ ६८ ॥ मुरगे येडका टोणगा कापूनि ॥ घालितां पात्र ते न ये भरूनि । सागे गारोडी पोरासी छेदुनि ॥ राधी मासातें निर्मो हे ॥ ६९ ॥ भजन भव्य चुली धडके निज । हुंडी भरेना ती सागे गुज ॥ दावी विनोदी ते पैलाड द्विज । आसती परदेशी कापित्या ॥ ७० ॥ ऐसे ऐकता कठोर वचन । ब्राह्मणी केलें पलायन ॥ धन्य दासाचें सर्वात्मज्ञान । धैर्य नग अढळ न हाले ॥७१॥ अहींद्र महींद्र जया स्वाधीन । तो पावतां समर्था सन्निधान । हांसोनि संतोषें म्हणे जी भोजन । तनु सार्थकीच करावें ॥७३॥ उभारणीतें करूनि अदृश्य । साक्षात दर्शन देऊन हरुषें । निघता नमोनि प्रार्थिलें दासें । ब्राह्मणा द्यावे दर्शना ॥७३॥ दत्त वदे ते असती कामिक । साक्षात्काराचें कैचें त्या सुख ॥ यद्यपि तुलंघवे सख्या तव वाक्य ॥ म्हणोनि त्या स्वप्नीं समजाविलें ॥ ७४ ॥

(३) आला उद्यावी साहित्य करूं ॥ की श्रीहरी सन्निधी पातला हरू । तवचि ढुल्लत अनुभयाकुगरू । पालटून यर्थे पातला ॥ १४ ॥ वमवण्याप्रति उमाकांत । हेग्गरसासी नागनाथ । नामयालागी पंढरीनाथ । परीक्षूं आले जयापरीं ॥ १५ ॥ ज्यासी अभेदें धरिलें हृदयीं । त्या वळगुपें वदलोनी आले जरी । जेंवि विदित आपले हृद्गत जीवीं । तेवी देवभक्त एकचि ॥ १६ ॥ मंगमीं असता दास विरक्त । कंगाल वेषें पावला दत्त । स्नान करोनि जाता सुपंथें । माउली न पडे आंगाची ॥ १७ ॥ पवनपरी जैसें गोरक्षआंग । मारुतिरायाचा निर्मळ योग । पाप निर्लेप देव श्रीरंग । निर्काया निःसंग शशिबंधु ॥ १८ ॥ निर्छायाचें मानोनि आश्चर्य । शुद्धत्वयुक्तीने धरिले पाय । छंदछिन्न दावितां न मनिचें भय । जैसा फरिद दृढमति ॥ १९ ॥ स्तवोनि यापरि तुष्टल्या चित्ते । सुचिलें सर्वहि ध्यान योगपंथ कितवनाम ठेऊं दासातें । प्रसन्न वेरसि योजिती ॥ २३ ॥ मुनिनाथ मुनीचा हाचि हा प्रेम । ठेविता न साजे यासी प्रतिनाम । क्रियाकर्तृत्वीं सफळित द्रुम । व्हावें सद्भक्त विसाऊं ॥२४॥ अभिलादिक जनाचा रिति । वडिलादेवाची नामे उपमिति । शौर्य शौय क्रिये ना शांति । प्रत्यक्षविण अशोभा ॥२५॥ प्रतिनव निर्मळा ना साजे म्हणत । मग नूतन क्रमाचा शोधूनि अर्थ । ठेऊनि सप्रेमें नाम समर्थ । जन धन्य प्रसिद्ध हो म्हणे ॥ ३७ ॥ कथा कीर्तनीं संकटांत । हें नामचिंतन करील त्यांत । साह्य होवोनि उर्विजानाथ । मनोरथातें पुरवील ॥३८॥ विनवी दासांनी आराध्य दैवत । श्रीराम माझा तोची समर्थ ॥ दत्तात्रेय वदे निशाणचिन्हातें । श्रीराम समर्थ चालवा ॥३९॥ परंतु समर्थ नाम हें तुमचें । जी म्हणे कीजे विरुद्ध साचे । म्हणोनि तथास्तु सवे । तेथेंच अंतर्धान पावला ॥ १५।४० ॥

# आणखी काही संप्रदाय

प्रमुख भारतीय उपासनासंप्रदायांशी दत्तात्रेयांचा संबंध आतापर्यंत आपण पाहिला. आता काही किरकोळ पंथांचा थोडक्यात विचार करू. गणपती, देवी, शक्ती इत्यादींच्या नावेही उपासनापंथ चालू आहेत. आनंद, चैतन्य अशा नावानीही महाराष्ट्रात उपासनासंप्रदाय आहेत. श्रीधरस्वामी नाझरेकर आणि 'हरिवरदा' कार श्रीकृष्णदयार्णव यांच्या गुरुपरंपरा दत्तात्रेयांशी संबंधित आहेत. दत्तात्रेय—सदानंद—रामानंद—

अमलानंद –गंभीरानंद –ब्रह्मानंद –सहजानंद– पूर्णानंद – दत्तानंद – ब्रह्मानंद व श्रीधर अशा परंपरेत दत्तभक्तीचा वारसा परिपुष्ट झालेला दिसतो. 'दत्तात्रया श्रीगुरुदेवा । श्रीब्रह्ममूर्ति तव पादसेवा । अभंग हें तूं मजलागि देईं । ठेवी तुझ्या श्रीधर नित्य पायीं ॥' अशी श्रीधरांची दत्ताजवळ प्रार्थना आहे. गुरुमाहात्म्य वर्णन करण्यासाठी श्रीधरांनी 'श्रीदत्तात्रय-माहात्म्य' नावाचे एक २६ ओव्यांचे छोटे प्रकरणही लिहिले आहे. 'रामविजय' नावाच्या आपल्या एका ग्रंथात अत्री ऋषींच्या आश्रमात रामाला झालेले दत्तदर्शन वर्णन करताना श्रीधरांनी मोठी बहार उडवून दिली आहे–

मग अत्रीचिया आश्रमाप्रति ।
येता झाला जनकजापति ।
तों देखिली दत्तात्रेयमूर्ति ।
अविनाश स्थिति जयाची ॥

सह्याद्रीवरी श्रीराम ।
अज अजित मेघश्याम ।
श्रीदत्तात्रेय पूर्णब्रह्म ।
देत क्षेम तयातें ॥

क्षीरसागरींच्या लहरिया ।
कीं जान्हवी आणि मित्रतनया ॥
परस्परें समरसोनिया ।
एक ठायी मिळताती ॥

कीं नाना वर्ण गाईं ।
परि दुग्धास दुजा वर्ण नाहीं ।
तैसा जनकाचा जांवई ।
आणि अत्रितनय मिसळले ॥

अवतारही उदंड होती ।
सवेंचि मागुती विलया जाती ।
तैसी नव्हे दत्तात्रेयमूर्ती ।
नाश कल्पाती असेना ।

पूर्ण ब्रह्म मुसावलें ।
तें हें दत्तात्रेयरूप ओतिलें ।
ज्याचे विलोकनेनमात्रें तरले ।
जीव अपार त्रिभुवनी ॥

सकळ सिद्ध ऋषी निर्जर ।
विधि वाचस्पति शचीवर ।
दत्तात्रेयदर्शना साचार ।
त्रिकाळ येती निजभावें ॥

अद्यापि सह्याद्रि पर्वतीं ।
देवांचे भार उतरती ।
सर्व ब्रह्मांडीची दैवतें धांवती ।
अवधूतमूर्ति पहावया ॥

घेतां दत्तात्रेयदर्शन ।
देवांसी सामर्थ्य चढे पूर्ण ।
मग ते इतरांसी होती प्रसन्न ।
वरदान द्यावयाते ॥

ज्यासी प्रयागी प्रातःस्नान ।
पांचाळेश्वरी अनुष्ठान ।
करवीरपुरात येऊन ।
भिक्षाटन माध्यान्ही ॥

अस्ता जाता वासरमणि ।
सह्याद्रीस जाती परतोनी ।
तों देवांचे भार कर जोडोनी ।
वाट पहाती अगोदर ॥

दृष्टी देखतां दिगंबर ।
एकचि होय जयजयकार ।
असंख्य वाद्यांचे गजर ।
अद्यापि भक्त ऐकती ।

दत्तात्रेय भक्त देखतां दृष्टीं ।
सकळ दैवते जीं जी सृष्टीं ।
त्याचे पायी घालिती मिठी ।
पुढे ठाकती कर जोडूनि ॥

करितां दत्तात्रेयस्मरण ।
भूत प्रेतें पळती उठोन ।
मग उपासकांशीं विघ्न ।
कवण करूं शकेल ॥

असो ऐसा स्वामी अवधूत ।
जो अत्रीचा महापुण्यपर्वत ।

तयास वदोनि रघुनाथ ।
अत्रिदर्शन घेतसे ॥ (१६ १७-३१)

आनद साप्रदायी आणखी एक सतकवी श्रीकृष्ण-दयार्णव यानी आपल्या 'हरिवरदा' या ग्रथात प्रत्येक अध्यायाच्या शेवटी दत्तकृपेचा उल्लेख आवर्जून केला आहे आपले लेखन 'आदिनाथ-वरदें दत्तात्रेय कृपाप्रसादे' झाल्याचा उल्लेख ते वारवार करतात 'अनसूयेचा वरद कुमार। दत्तात्रेय दिगबर । ज्याचा करिता नामोच्चार। अहकार विरे उभा ॥' (७ २१७) अशी एखादी मार्मिक ओळही कृष्णदयार्णव लिहून जातात. याच कृष्णदयार्णवाचे प्रख्यात शिष्य उमरखेडचे माधवराव व्यापारी ऊर्फ उत्तमश्लोक यानी 'श्रीदत्तजननोत्साहवर्णन' नावाचे एक लहानसे प्रकरण लिहिले आहे 'न येता वेण न दुखता पोट। अकस्मात अति भ्राजिष्ट। सायुध षड्-भुज उत्कृष्ट। अद्भुतनटधारक ॥ पद्मभाळी पद्मनेत्र। सर्वांगसुदर आश्चर्यकर। दिव्यालकृत दिगबर। परमेश्वर अवतरला ॥ ऊर्ध्वद्विकरी शखचक्र। मध्यद्विकरी त्रिशूळडमरु। अध पाणी-युगुळी सुदर। अक्षमाला कमडलु॥' (९१-९३) हे दत्तमूर्तीचे रेखीव वर्णन उत्तमश्लोकानी केलेलें आहे

मागे वारकरी पथाचा दत्तात्रेयाशी सबध पाहाताना आपण तुकोबाचा उल्लेख केला आहे हे तुकोबा वारकरी पथाचे शिरोमणी सत असले तरी त्याची गुरुपरपरा चैतन्य साप्रदायी आहे राघवचैतन्य-केशवचैतन्य-बाबाजीचैतन्य व तुकाराम अशी ही परपरा असून राघवचैतन्यानी दत्तात्रेयाची उपासना केली होती याच चैतन्य-सप्रदायात भैरव अवधूत ज्ञानसागर नावचे एक सत्पुरुष एकोणिसाव्या शतकात होऊन गेले दक्षिणामूर्ती–दत्तात्रेय–शिवचैतन्य-गोपाळचैतन्य-–आत्मारामचैतन्य – कृष्णचैतन्य – अद्वय-चैतन्य – चिद्घनचैतन्य – नागेशचैतन्य – शिव-चैतन्य व भैरव अवधूत अथवा अप्पाजीबोवा ज्ञानसागर अशी ही चैतन्यपरपरा आहे विटे येथील दत्तमदिर भैरव अवधूतानी बाधून तेथेच मठस्थापना केली. 'ज्ञानसागर' हा त्याचा ग्रथ अलीकडेच प्रसिद्ध झाला आहे. दत्तरूपाच्या वर्णनाचे व माहात्म्याचे काही नमुने पाहाण्यासारखे आहेत.

१

दत्त परब्रह्म केवळ ।
नित्य पवित्र निर्मळ ॥१॥
अरूप रूप हे चागले ।
ध्यानी मानस रगलें ॥२॥
भव्य प्रसन्न वदन ।
पाहता निवाले लोचन ॥३॥
जटा मुगुट मणि गगा ।
भस्म लावियेलें अगा ॥४॥
अनुहात निगम ध्वनी ।
श्रुति कुडले श्रवणी ॥५॥
रुळे वैजयती कठी ।
केशर कस्तुरी लल्लाटी ॥६॥
कासे पीतावर पिवळा ।
उभा षड्भुज सावळा ॥७॥
चरणी पादुका शोभती ।
सुरनर त्रिकाळ वदिती ॥८॥
ज्ञानसागर शिवगुरुस्मरणी ।
अवधुत प्रकटे अत करणी ॥९॥

२

पचामृत शुद्धस्नान ।
केशरमिश्रित चदन ॥१॥
केला पूर्ण अभिषेक ।
वाद्यें वाजती अनेक ॥२॥
पचगगा सरस्वती ।
कृष्णा गडकी गोमती ॥३॥
स्नान जल घेऊनि आल्या ।
ज्ञानसागरी मिळाल्या ॥४॥

गंगा यमुना भागिरथी ।
चंद्रभागा भीमरथी ॥५॥
तुंगभद्रा ताम्रपर्णी ।
शरयु कावेरी पुष्करणी ॥६॥
तीर्थ सेविता सकळ ।
शिवगुरु अवधूत प्रेमळ ॥७॥

३

विश्वपट परिधान ।
करी अनसूयानंदन ॥१॥
दिगंबराचें अंबर ।
वरवें शोभे चराचर ॥२॥
नाना रत्नें वसुंधरा ।
घेउनि आली अलंकारा ॥३॥
लेवविले अंगोअंगी ।
रंग रंगले निजरंगीं ॥४॥
ज्ञानसागराची शोभा ।
शिवगुरु अवधूत उभा ॥५॥

४

खेले होरी दत्त निरंजनधाम ॥ ध्रु. ॥
ब्रह्म परात्पर आपहि आपमो ।
प्रकृतिपुरुष अभिराम ॥१॥
अनुहत बाजत नाचत गावत ।
सप्तसूर तिन ग्राम ॥२॥
रोम रोम सब उडत फवारे ।
नयन भरे जलप्रेम ॥३॥
ज्ञानसागर शिवगुरु अवधूत ।
नामहि निजसुखधाम ॥४॥

# शाक्त - तांत्रिकांत दत्तात्रेय

शिवपत्नी काली हीच शक्ती मानून तिची स्त्रीतत्त्वप्रधान उपासना करणाऱ्या पंथास मध्ययुगीन काळापासून शाक्त असे नाव मिळाले आहे. शक्तीची ही उपासना बहुधा तांत्रिकांच्या मार्गाने म्हणजे तंत्र व मंत्र यांच्या साहृयाने केली जाते. बौद्ध, नाथ याच्या उत्तरकालीन अवनतीच्या काळात शाक्त व तंत्रमार्ग यांचा विस्तार विशेष झाला. कोणत्याही प्रकारचा जातिनिर्बंध या पंथात नसतो. शाक्तपंथाचे पवित्र ग्रंथ तांत्रिकाचे आहेत. भैरवपंथ, शीतलापंथ, मार्गी, मातापंथी, कुंडा इत्यादी पंथांचे लोक शक्तीचे उपासक असले तरी वामाचारी आहेत. भगवे वस्त्र, रुद्राक्ष व त्रिशूळ यांनी युक्त असलेल्या या साधकांच्या आचारविचारांविषयी सामान्य जनात नेहमीच कुतूहल रहाते. शाक्ताच्या उपासनेत वा साधनेत तंत्रवाङ्मयास वेदाप्रमाणे मान असतो.

'तनु विस्तारे' या धातूपासून तंत्र शब्द बनला असून ज्याच्या साहृयाने आत्मज्ञानाचा विस्तार होतो ते तंत्रशास्त्र असा मूळचा अर्थ आहे. तंत्रशास्त्रालाच आगम असे नाव आहे. कमिकागमात तंत्राची व्याख्या देताना म्हटले आहे, 'तनोति विपुलानर्थान् तत्त्वमन्त्रसमन्वितान् । त्राणं च कुरुते यस्मात् तन्त्रमित्यभिधीयते ।।' तत्त्व आणि मंत्र यांनी युक्त अशा व्यापक अर्थाचा विस्तार करणारे आणि साधनेच्या द्वारे परित्राण करणारे जे शास्त्र त्याला तंत्र असे म्हणतात. पुढे यालाच धार्मिक विधी अथवा नियम असा अर्थ प्राप्त झाला. व्यापक अर्थाने शास्त्र, सिद्धांत, अनुष्ठान, विज्ञान, आगम असे अर्थही तंत्राला प्राप्त झाले. तंत्र व तंत्रशास्त्र म्हणजे रहस्यमय शास्त्र असाही समज पसरत राहिला. शिवपार्वतीसंवादरूपाने असलेले हे तंत्रग्रंथ दत्तात्रेयांनी लिहिले असल्याचे समजले जाते. कलिग्रस्त माणसास कल्याणप्रद असे तंत्रज्ञान शंकराने पार्वतीला, पर्यायाने दत्तात्रेयांना सांगितले. आगम, यामल व तंत्र असे तंत्रांचे प्रकार होऊन देवतापूजन, पुरश्चरण, षट्कर्मसाधन, ध्यानयोग, सृष्टितत्त्व, ज्योतिष, नित्यकर्म, सूत्र, वर्ण, युगधर्म, मंत्र-यंत्रनिर्णय, तीर्थ, आश्रमधर्म, कल्प, शौचाशौच, स्नानविधी, प्राणायाम, न्यास, जप, तर्पण, पूजा, दीक्षा, अभिषेक, प्रायश्चित्त,

मुद्रा, चक्रपूजा इत्यादींना तन्त्रशास्त्रात प्राधान्य मिळाले

शाक्त अथवा तान्त्रिक यांना शक्तीप्रमाणे दत्तात्रेयही पूज्य वाटतात त्यांचे सर्व आचार-विचार दत्तप्रणीत आहेत अशी त्यांची श्रद्धा आहे इंद्रजालतन्त्र, उमामहेश्वरतन्त्र, कालाग्निभैरव तन्त्र कात्यायनी तन्त्र, कामेश्वरतन्त्र, कुलार्णव-तन्त्र, कौमारीतन्त्र, कपालभैरवतन्त्र, गायत्रीतन्त्र, गंधर्वतन्त्र, चामुंडातन्त्र, डामरतन्त्र, त्रिपुरार्णवतन्त्र, निर्वाणतन्त्र, नीलतन्त्र, बगलामुखीतन्त्र, बाला-विलासतन्त्र, विद्रुमालिनीतन्त्र, ब्रह्मयामलतन्त्र, भुवनेश्वरीतन्त्र, भैरवतन्त्र, महानिर्वाणतन्त्र, मातृका तन्त्र, माहेश्वरीतन्त्र, मुंडमाला तन्त्र, योगिनीतन्त्र, रुद्रयामलतन्त्र, लिंगतन्त्र, वामकेश्वरतन्त्र, वीरतन्त्र, वैष्णवीतन्त्र शक्तिसंगमतन्त्र, श्यामारहस्यतन्त्र, देवीरहस्यतन्त्र, कालिकापुराणतन्त्र, शारदातन्त्र, शारदातिलकतन्त्र, असे अनेक आगमग्रंथ या पंथाचे असून काली, श्री, तारा, महिषासुरमर्दिनी, नारसिंही, रुद्राणी, क्षववाहना, श्यामा, शक्ती, शरभा, राजराजेश्वरी, त्रिपुरसुंदरी, कामेश्वरी, वज्रेश्वरी, वनदुर्गा, योगिनी, भद्रकाली, कामाक्षी, तुळजा, व्याघ्रजा, कात्यायनी, मीनाक्षी, कौमारी, माहेश्वरी, भैरवी, धनुर्धारी, छिन्न-मस्तका, असितांगभैरव, कालभैरव, कपालभैरव, बटुभैरव, क्रोधभैरव, चंडभैरव, मार्तंडभैरव, उच्छिष्टभैरव, अशा अनेक देवदेवता तन्त्र-शास्त्रात प्रधान मानल्या आहेत शैव, शाक्त, गाणपत्य, सौर, वैष्णव, बौद्ध, जैन, इत्यादी पंथीयांच्या तान्त्रिक देवता वेगळ्या आहेत

शाक्तपंथ अथवा तन्त्रमार्ग यांच्या आचारा-संबंधी पुष्कळच गैरसमज आहेत दत्तसंप्रदायातही हे आचार वाच्यार्थाने शिरले असल्याने अनेकदा टीकेस पात्र झाले आहेत वेदाचार, वैष्णवाचार, शैवाचार, दक्षिणाचार, वामाचार, सिद्धान्ताचार, कौलाचार हे क्रमाक्रमाने श्रेष्ठ असल्याचे कुलार्णव तन्त्रात म्हटले आहे. शैवाचारात पशुहिंसेला स्थान मिळाले दक्षिणाचारात परमेश्व-रीची पूजा आणि रात्री विजयेचे (भांगेचे) सेवन या गोष्टी आल्या वामाचारात पंचमकारांना महत्त्व येऊन रजस्वलेचे रज व कुलस्त्री यांच्या पूजेस महत्त्व आले मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा व मैथुन यांच्या साहाय्याने इष्ट देवतेची तान्त्रिक पूजा शाक्त करू लागले ही उपासना वैयक्तिक व सामुदायिक पद्धतीनेही होत राहिली मदिरा तीर्थ बनून एकमात्र मुक्तिदायिनी बनली मद्यपानाने अष्टप्रकारचे ऐश्वर्य व परममोक्ष यांची प्राप्ती होते मांसभक्षणाने साधक साक्षात् नारायण-स्वरूप होतो मत्स्यभक्षणामुळे कालीचे दर्शन होते मुद्रेच्या सेवनाने साधक विष्णुस्वरूप बनतो मैथुनाने तो शिवसदृश होतो, अशी धारणा शाक्तांची व तान्त्रिकांची आहे या पंचमकारांचे रूपकात्मक अर्थही सांगितले गेले आहेत ब्रह्मरंध्राच्या ठिकाणी असलेल्या सहस्रदल-कमलातून द्रवणारा अमृतरस म्हणणे मद्य हे मद्य पिणारा मधुपायी झाला ज्ञानरूपी खड्गाने पुण्यपापरूप पशूचा बळी देणारा व परतत्त्वाच्या ठिकाणी चित्ताचा लय करणारा मांसभक्षक बनला इडा व पिंगला या दोन नाड्या म्हणजे गंगा व यमुना असून यांत प्रवा-हित होणारे श्वास व प्रश्वास हेच दोन मत्स्य होत यांचे नियमन करून त्यांना सुषुम्नेत प्रवा-हित करणे म्हणजेच मत्स्यभक्षण होय सत्संगाने मुक्ती व असत्संगाने बंधन, म्हणून सत्संगाची साधना म्हणजे मुद्रा योगशास्त्रात सुषुम्नेला शक्ती व जीवाला परशिव म्हटले आहे या शिवशक्तींचा संगम म्हणजे मैथुन होय अशा या रूपकात्मक अर्थाबरोबर पंचमकारांचे भौतिक अर्थही महानिर्वाणतन्त्रात सांगताना म्हटले आहे,

आद्यतत्त्वं विद्धि तेजो द्वितीयं पवनं प्रिये ।
अपस्तृतीयं जानीहि चतुर्थं पृथिवीं शिवे ॥
पञ्चमं जगदाधारं वियद्विद्धि वरानने ।
इत्थं ज्ञात्वा कुलेशानि कुलतत्त्वानि पञ्च च ॥

'आचारं कुलधर्मस्य जीवन्मुक्तो भवेन्नरः ॥ (७-१०९-११)

–हे प्रिये, मद्य म्हणजे तेज, मांस म्हणजे वायू, मत्स्य म्हणजे आप, मुद्रा म्हणजे पृथ्वी आणि मैथुन म्हणजे जगताला आधारभूत असलेले आकाश असे समजत. देवी, ही पचकुलतत्त्वे अशा प्रकारे जाणून जो कौलधर्म आचरतो तो जीवन्मुक्त होतो.–पंचमकारांचे रूपकात्मक वा भौतिक अर्थ सांगून झाल्यावर प्रत्यक्ष, अनुकल्प, दिव्य या प्रकारांनीही अर्थ विशद करण्यात आले आहेत. मद्य म्हणजे नारळाचे पाणी, मांस म्हणजे लसूण, आले, मीठ, तीळ व गव्हाच्या लोंब्या, मत्स्य म्हणजे लाल मुळा, वांगे इत्यादी, मुद्रा म्हणजे भाजलेल्या धान्याच्या लाह्या, तांदूळ इत्यादी, मैथुन म्हणजे मीलनाला उपयुक्त होईल अशा डोळेमोडीने पुष्पसमर्पण.

शाक्तांच्या वा तांत्रिकाच्या या पंचमकारात्मक साधनेचा शिरकाव दत्तपंथात झालेला दिसतो. प्रमुख तंत्रग्रंथ दत्तात्रेयप्रणीत आहेत असा एक समज आहे. जादूटोणा, जारणमारण, वशीकरण, पंचमकारांचा वाच्यार्थ यासारख्या अनेक विपरीत गोष्टी या मार्गातून दत्तपंथात नंतरच्या काळात आलेल्या दिसतात. तांत्रिकांचे देहविज्ञान योगशास्त्राशी जुळणारे असल्याने तेही दत्तपंथात स्थिरावून सहा चक्रे,कुंडलिनी,इडा व पिंगला नाड्या, सुषुम्ना, प्राणायाम इत्यादींचा प्रभाव दत्तपंथावरही पडलेला आहे. पंचमकारांचे शब्दशः अर्थच अधिक मानले गेले असल्याने शाक्तांच्या व तांत्रिकांच्या प्रभावामुळे दत्तपंथात काही विपरीत आचारही शिरलेले दिसतील. वासुदेवानंदसरस्वतीसारख्या सोवळ्या व कर्मठ दत्तावतारी समजल्या जाणाऱ्या भक्तासही मद्यपानासक्त अशा एका मायावी स्त्रीसह दत्ताचे दर्शन वर्णन करावे लागले आहे ! 'एक नग्न स्त्री घेऊन। श्रीदत्त तीरी येवून। स्वयें नग्न होऊन। क्रीडा करुनि राहिला ॥ स्वाश्रया जी स्वविषया। नारी झाली ती आदिमाया। ती अंकी बसोनिया। वाद्यें वाजवोनिया गातसे ॥ तोतें करवोनिया पान। शक्तीचें उच्छिष्ट घेई आपण। तिला देई वीर चर्वण।' (दत्तमाहात्म्य : ३ ९७-९९) अर्थात् याला आधार मार्कंडेय पुराणातील 'दिव्याम्बरधरा' आणि 'चारुपीननितम्बिनी' नारीचा आहे. दत्तात्रेयाच्या अशा अद्भुत क्रीडेचे समर्थन पुढे ग्रंथकाराने युक्तिवादाने केले असले तरी कलियुगातील सर्वसामान्य मानवी साधकास या क्रीडेतच विशेष स्वारस्य वाटत राहिलेले दिसते. तथाकथित अनेक दत्तभक्तांच्या लीला वा क्रीडा केवळ याच प्रकारच्या सामरस्याशी मिळत्याजुळत्या राहिल्या तर तो दोष कोणाचा ? एका बाजूला प्रखर वैराग्य आणि दुसऱ्या बाजूला शिष्याची परीक्षा पाहण्यासाठी का होईना, पण दत्ताचे विपरीत आचरण ! यांचा मेळ सर्वसामान्य माणसास बसेनासा होतो. दत्त देणारा, कृपाळू, रक्षणारा, माऊली येथपर्यंत ठीक; पण अद्भुतांच्या, तांत्रिकांच्या, शाक्तांच्या तावडीत सापडलेला दत्त आपल्या भक्ताची परीक्षा पाहाण्याच्या नादात वा बोधरहस्य समजावून सांगण्याच्या नादात भलतेच सांगून जाताना कधी दिसतो.

या प्रवृत्तीचे एक उदाहरण देता येण्यासारखे आहे. दत्तात्रेयतंत्र नावाचे एक प्रकरण उपलब्ध असून त्याचे दुसरे नाव 'वशीकरणविद्या' असे आहे. मोहन, मरण, स्तंभन, विद्वेषण, उच्चाटन, वशीकरण, आकर्षण, यक्षिणीसाधन, वध्यापुत्रवतीकरण, वाजीकरण, केशरंजन, सिंहव्याघ्रादिभयनिवारण इत्यादी विषयावरून या तंत्रग्रंथाचे स्वरूप समजून येण्यासारखे आहे. या तंत्रात सांगितलेले सर्व आचार आणि विधी कोणी तरी चिकित्सेने व शास्त्रीय बुद्धीने तपासून पाहिले पाहिजेत. कैलासशिखरस्थ शंकराने सांगितलेली ही कल्प-तंत्रे भक्तवत्सल दत्तात्रेयाना सांगितली

आहेत ! वाटेल त्या माणसास हे तंत्रमंत्र सागू नकोस अशी आज्ञा शिवशंकराने दत्ताला दिलेली असल्यामुळे याचे विपरीत परिणाम कमी होतील असे नव्हे या दत्तात्रेयतंत्रातील सर्व आचाराचे व उपचाराचे परीक्षण औषधीविज्ञान व शरीरशास्त्र याच्या साहचाने व्हावयास हवे. मंत्राची शक्ती मोठी असेलही, तंत्राचे सामर्थ्य खरे असेलही; परतु सर्वसामान्याच्या हाती हे साधन कितपत असावे ? शिवाय दत्तप्रभूच्या भक्तिप्रेमाशी याचा संबंध कोणता ? याही प्रश्नाची उत्तरे जाणत्यानी शोधावीत. मंत्र, मंत्रशास्त्र, तंत्र, तंत्रशास्त्र आणि या संदर्भातील यंत्रविज्ञान याच्या बाबतीत नव्याने संशोधन व्हावयास हवे. ही सावधगिरी बाळगूनच पुढील दत्तमंत्राचा विचार व्हावा.

(अ) अस्य श्रीदत्तमंत्रस्य । शबर ऋषि. । गायत्री छंद. । श्रीदत्तात्रेय देवता । द्रां बीजं । ऱ्हीं शक्तिः । क्रों कीलकम् । मम दत्तात्रेयप्रसादार्थं जपे विनियोगः । द्रां द्रीं द्रूं द्रैं द्रौं द्रः इति षडंगम् ।

ध्यानं–रविमण्डलमध्यस्थं रक्तरक्ताब्जसंस्थितम् ।
योगारूढं ज्ञानधनं दत्तात्रेयमहं भजे ॥

मंत्र– ॐ द्रां ऱ्हीं क्रौं दत्तात्रेयाय विद्महे योगीश्वराय धीमहि ।
तन्नो दत्तः प्रचोदयात् (दत्त गायत्री)

(आ) अस्य श्रीदत्तात्रय मंत्रस्य । ब्रह्मा ऋषिः। गायत्री छंदः । दत्तात्रेय देवता । आं बीजं । ऱ्हीं शक्तिः । क्रौं कीलकम् । 'आं ऱ्हीं क्रौं आं ऱ्हीं क्रौं' इति षडंगम् ।

ध्यान–वरीलप्रमाणे

मंत्र १–ॐ आं ऱ्हीं क्रौं एहि दत्तात्रेयाय स्वाहा ।

मंत्र २–दत्तात्रेयाय नमः ।

मंत्र ३–श्रीं ऱ्हीं क्लीं दत्तात्रेयाय स्वाहा ।

मंत्र ४–द्रां दत्तात्रेयाय नमः :

मंत्र ५–द्रां ओं दत्तात्रेयाय नमः ।

श्रीएकाक्षरी दत्तमंत्र–द्रां ।

दत्त षडक्षर मंत्र–द्रां ओं दत्तात्रेयाय नमः ।

(इ) षोडषाक्षरी दत्तात्रेयमंत्र–

ॐ ऐं क्रौं क्लीं क्लूं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं सौः दत्तात्रेय स्वाहाः ।

एतन्मंत्रस्य सदाशिव ऋषिः गायत्री छंदः दत्तात्रेय देवता ॥

ॐ बीजं । स्वाहा शक्तिः । दत्तात्रेयाय कीलकम् । चतुर्विध पुरुषार्थे जपे विनियोग. । अथ न्यासः । ॐ हृदयाय नमः । क्रों शिरसे स्वाहा । क्लां क्लीं क्लूं इति शिखाया । सौः इति कवचाय हुं । दत्तात्रेयाय इति नेत्रत्रयाय वौषट् । स्वाहा इति अस्त्राय फट् । सर्व मंत्रेषु ध्यान उपरिनिर्दिष्टं ग्राह्यम् ।



# ८ सांप्रदायिक तत्त्वज्ञान

## अद्वैत वेदान्ताची पार्श्वभूमी



तत्त्वज्ञान म्हणजे आपल्या भोवतीच्या चराचर सृष्टीविषयी विचार प्रत्येक मानवी प्राण्यास अनादिकालापासून अनेक प्रश्न सतावीत असतात मी कोण ? कोठून आलो ? कोठे जाण्यासाठी निघालो आहे ? अंतिम ध्येय कोणते ? मला कोणी व कसे निर्माण केले ? भोवतीच्या चराचर विश्वाचा व माझा संबंध काय ? हे विश्व तरी कोणी निर्माण केले ? कोणत्या हेतूने हे निर्माण झाले ? या भोवतीच्या सृष्टीचा नियंता कोण आहे ? सुखदुःखाचे स्वरूप कसे आहे ? जीव-शिव, आत्मा-परमात्मा यांचा संबंध कोणता ? अशा अनेक महत्त्वाच्या प्रश्नांची उत्तरे अंतर्मुख होऊन माणसाने प्राचीन काळापासून शोधण्याचा प्रयत्न केला आहे जन्ममृत्यू, तीन ऋतूंचे सृष्टि-चक्र चंद्रसूर्यादींचे भासमान होणारे भ्रमण, सृष्टीमधील विविध उत्पात, माणसावर येणारी नाना प्रकारची संकटे, अशा नाना विषयांचे चिंतन प्रतिभावान् पुरुषांनी केले ते तत्त्वज्ञानात येते सारांश, मानवी जीवनाच्या विविध अंगांची विश्वाच्या वा सर्व सृष्टीच्या संदर्भात सामान्य व मूलभूत तत्त्वांची वा विचारांची सुसंगत व तर्कशुद्ध मांडणी म्हणजे तत्त्वज्ञान होय

भारतीय तत्त्वज्ञानाची सर्वप्रथम मांडणी ऋग्वेद, उपनिषदे, ब्रह्मसूत्रे, भगवद्गीतादी ग्रंथ आणि काही पुराणे यांच्या साहाय्याने झाली. विस्मय, आदर, पूज्यबुद्धी व कुतूहल यांच्या पोटी अनेक सूक्तांतून सृष्टीच्या रचनेसंबंधी प्रतिभावंत ऋषिमुनींनी चर्चा केलेली आढळून येते पुरुष सूक्त अथवा नासदीय सूक्त सृष्टीच्या रचने संबंधी प्रगल्भपणे चर्चा करताना दिसते ' मूळा रंभी असतही नव्हते व सतही नव्हते

आकाश, पाणी काहीच नव्हते.....एकच एक चित्‌शक्ती असावी आणि तिच्यापासूनच या सृष्टीची निर्मिती झाली असावी.... हा सर्व पसारा अमक्यापासून झाला असे कोण सांगेल ? कारण देव झाले तरी पाठीमागूनचेच.' अशा अनेक प्रकारच्या विचारांतून चिकित्सा, संशय, तर्कनिष्ठ विश्वास यांचे मोठे मनोहर दर्शन होते.

जीव, जगत् व परमेश्वर यांच्या संबंधाने जो तात्त्विक विचार प्रारंभापासून होत राहिला त्याचे प्रामुख्याने भारतीय परंपरेत दोन विभाग होतात. पहिला निरीश्वरवादी म्हणविणाऱ्यांचा. बौद्ध, जैन आणि सांख्य यांचे तत्त्वज्ञान निरीश्वरवादी आहे. चार्वाक हे तर भौतिकवादी असून ऐहिकालाच महत्त्व देणारे असून त्यांचे तत्त्वज्ञान 'लोकायतिक' या नावाने प्रसिद्ध आहे. सांख्यदर्शनकार कपिलमुनी यांनी 'प्रकृती' आणि 'पुरुष' अशा दोनच वस्तू नित्य मानल्या आहेत. पतंजल मुनींनी ईश्वर हे एक स्वतंत्र व नित्य तत्त्व मानून आणखी थोडी प्रगती केली. सांख्यांच्या तत्त्वविचारात ईश्वरतत्त्व मिसळल्यामुळे पातंजल योगदर्शन दुसऱ्या सेश्वरवादी म्हणजे ईश्वर मानणारांच्या प्रकारात येते.

ईश्वरवादी तत्त्वपरंपरेत वेदान्त, न्याय, वैशेषिक इत्यादींचा अंतर्भाव होतो. यांपैकी वेदान्ताचे तत्त्वज्ञान प्रमुख असून त्याचीच विशेष छाप भारतीय विचारपरंपरेवर पडलेली दिसून येते. शंकराचार्यांनी या प्रसिद्ध तत्त्वपरंपरेचा शुद्ध तार्किक भूमिकेवरून विकास केला आणि ब्रह्म ही एकच वस्तू नित्य व सत्य असल्याचे सांगितले. जीवात्मा व परमात्मा यांचे संपूर्ण तादात्म्य या तत्त्वज्ञानात मानले गेले आहे. ज्याला आपण जीव म्हणतो ते वस्तुतः ब्रह्मच आहे; जीव, प्रपंच, सृष्टपदार्थ हा सर्व ब्रह्माचाच विकास आहे. 'अहं ब्रह्मास्मि', 'तत्त्वमसि', 'अयमात्मा ब्रह्म' इत्यादी महावाक्यांतून याच ऐक्याचे दर्शन घडते. 'अहमेव ब्रह्मास्मि' या वाक्यानुसार ज्ञान म्हणजेच आत्मसाक्षात्कार होय. हा झाला की बद्ध वाटणारा जीव मुक्त होतो. मला ब्रह्म व्हावयाचे आहे असे नाही, तर मीच ब्रह्म आहे, अशी अनुभूती शंकराचार्यांच्या या केवलाद्वैतवादात अभिप्रेत आहे.

## सृष्टिनिर्मितीची कहाणी

या सर्व चराचर जगाच्या बुडाशी एकच मूलतत्त्व असून त्याचाच विकास म्हणजे या जगताची वाढ अथवा मांडणी हा या वेदान्तशास्त्राचा मुख्य सिद्धान्त होय. 'एकोऽहं बहु स्याम'— मी एक आहे, तो बहुरूप होईन, अशा संकल्पापोटी ब्रह्माश्रित् असलेल्या मायेचा क्षोभ होऊन ती तमोगुणप्रधान होते आणि तिच्यापासून आकाश, वायू, अग्नी, जल आणि पृथ्वी अशी पाच भूते निर्माण होतात; व त्यांच्या ठिकाणी शब्दादी पंचगुण उत्पन्न होतात. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये यांची निर्मिती आकाशादी प्रत्येक भूताच्या सत्त्वगुणाच्या अर्ध्या व रजोगुणाच्या अर्ध्या भागापासून निर्माण होते. पंचमहाभूतांच्या मिलित सत्त्वांशापासून अंतःकरण निर्माण होते. वृत्तिभेदामुळे मन, बुद्धी, चित्त व अहंकार असे चार भाग अंतःकरणाचे होतात. पंचमहाभूतांच्या मिलित रजोगुणापासून प्राण, अपान, व्यान, उदान व समान् अशा पंचप्राणांची निर्मिती होते. पंच ज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये, पंचप्राण, मन आणि बुद्धी अशा सतरा तत्त्वांचे सूक्ष्म अथवा लिंगदेह तयार होतो. यानंतर ईश्वरी इच्छेनेच अपंचीकृत पंचमहाभूतांचे पंचीकरण होऊन पंचीकृत भूतांपासून ब्रह्मांड, चौदा भुवने, प्राण्यांची शरीरे, अशी स्थूल सृष्टी निर्माण होते.

पंचीकरण ही वेदान्तातील एक महत्त्वाची प्रक्रिया मानली जाते. पृथ्वी, आप, तेज, वायू

व आकाश या पंच महाभूतांतील प्रत्येक भूताचे दोन भाग करून एका भागाचे पुनः चार भाग होतात. मग चारांतला प्रत्येक भूताचा एक एक घेऊन तो त्या त्या भूताच्या अर्ध्या भागाला मिळवून ते भूत पूर्ण करतात. भूताचा अर्धा भाग व इतर चार भूतांचा प्रत्येकी एक अष्टमांश मिळून ते भूत पंचीकृत पूर्ण होते. शुद्ध भूताला अपंचीकृत भूत व वरील प्रक्रियेने बनविलेल्या भूताला पंचीकृत भूत असे नाव आहे. पंचीकृत भूत स्वतःबरोबरच इतर चार भूतांच्या अंशांनीही युक्त असल्याने सर्व भूतांत सर्व गुण आढळतात. या पंचीकरणामुळे आकाशात शब्द, वायूत शब्द व स्पर्श, अग्नीत शब्द, स्पर्श व रूप, जलात शब्द, स्पर्श, रूप व रस आणि पृथ्वीत शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे गुण निर्माण होतात. या पंचीकृत भूतांपासून स्थूल, स्थूलतर व स्थूलतम कार्यांची अभिव्यक्ती होते. चौदा भुवनयुक्त ब्रह्मांड निर्माण झाल्यावर त्यात राहाणाऱ्या जीवांची जरायुज, स्वेदज, अंडज व उद्भिज्ज अशी चार प्रकारची शरीरे व त्यांच्या आहारासाठी विविध पदार्थ निर्माण होतात.

याप्रमाणे एकच ईश्वर सत्त्व, रज व तम या गुणत्रयाच्या योगाने ब्रह्मा, विष्णू व रुद्र ही तीन रूपे धारण करून सृष्टिनिर्मिती, स्थिती आणि लय अथवा संहार ही कार्ये करतो. वेदान्ताने सृष्टिनिर्मितीचे हे तत्त्वज्ञानात्मक रहस्य सांगितले असले तरी सर्वसामान्य विचारी माणसाच्या दृष्टीने अनेक प्रश्न उपस्थित होतात. हे सर्व जगत् जर एकरूप व ब्रह्मरूप असेल तर मग ते लौकिक दृष्टीला अनेकरूप व पंचभौतिक असे का दिसते? जगत् हे आभासिक वा मिथ्या कसे? ब्रह्म सत्य असेल तर त्याचाच विकास जे जगत् ते मायिक वा मिथ्या का? अद्वैताचा अनुभव या लौकिक जगात कोणत्या उपायांनी येईल? इत्यादी प्रश्नांच्या चर्चेतूनच न्याय व वैशेषिकांचा आरंभवाद सांख्यशास्त्रप्रणेते कपिल व योगशास्त्रकर्ते पतंजली यांचा परिणामवाद; विवर्तवाद, सृष्टिदृष्टिवाद, दृष्टिसृष्टिवाद, चिद्विलासवाद अशा अनेक तत्त्वविचारप्रणाली निर्माण झाल्या.

सृष्टीच्या बुडाशी एकच तत्त्व का मानावे? असाही मूलभूत प्रश्न उपस्थित करणारे निघालेच. ब्रह्म वा परमेश्वर ही एक नित्य व सत्य वस्तू मानून जीव व जगत् ही आणखी एक दुसरी वस्तू नित्य व सत्य का मानू नये? असा प्रश्न निर्माण करून जीव, जगत् व ब्रह्म या तीन वस्तूंना सत्य व नित्य मानणारे रामानुजाचार्य व त्यांचे विशिष्टाद्वैत भारतीय परंपरेत प्रसिद्ध आहेत. रामानुजाचार्यांनी जीव व जगत् या नित्य व सत्य वस्तू मानून त्यांचा अंतर्भाव ब्रह्म या अद्वितीय वस्तूत केला, तर मध्वाचार्यांनी जीव, जगत व ब्रह्म या वस्तू नित्य, सत्य व स्वतंत्र मानल्या. मध्वाचार्यांचे पूर्ण द्वैत, वल्लभाचार्यांचे शुद्धाद्वैत असे काही तत्त्वज्ञानाचे उपपंथ भारतीय तत्त्वपरंपरेत स्थिरावलेले दिसतात. महानुभाव तर जीव, देवता, प्रपंच व परमेश्वर या चार वस्तू सत्य, नित्य व स्वतंत्र मानून पूर्ण द्वैताची स्थापना करतात.

भारतीय तत्त्वपरंपरांच्या या पार्श्वभूमीवर विचार करताना दत्तपंथीयांचे तत्त्वज्ञान परंपरागत अशा शंकराचार्यांच्या अद्वैती तत्त्वज्ञानाशी बरेच मिळतेजुळते आहे असे दिसून येईल. वेदान्तनिरूपण, महावाक्यविवरण, सृष्टीची उभारणी व संहारणी, योगसाधना व देहविज्ञान, पंचीकरणाचा विषय, गुरुतत्त्वनिरूपण इत्यादी विषयांचे तात्त्विक विवरण सांप्रदायिक ग्रंथांतून अनेकदा आले आहे. श्रीगुरुचरित्र, श्रीदत्तप्रबोध, श्रीगुरुलीलामृत, श्रीदत्तमाहात्म्य इत्यादी ग्रंथांतून पंथीयांच्या तत्त्वज्ञानाचा बोध होण्यासारखा आहे. परशुरामकल्पसूत्रम्, सिद्धसिद्धान्तपद्धती, अवधूतगीता, गुरुगीता, त्रिपुरारहस्य–ज्ञानखंड इत्यादी लहानमोठे ग्रंथ पंथीयांना मान्य असून

त्यातही सांप्रदायिक तत्त्वज्ञानाचे दर्शन होण्यासारखे आहे. जनार्दनस्वामी, एकनाथ, दासोपंत, मुक्तेश्वर, निरंजन रघुनाथ, नारायण महाराज जालवणकर, माणिकप्रभू, वासुदेवानंद सरस्वती इत्यादी अनेक दत्तभक्तांच्या शेकडो पदांतून, अष्टकांतून, स्तोत्रातून सांप्रदायिक तत्त्वज्ञानाची विविध अंगे प्रतीत होण्यासारखी आहेत.

दत्तसांप्रदायिकांचा वेद म्हणून ज्या गुरुचरित्रास मान्यता आहे, तो ग्रंथ प्रामुख्याने कथात्मक असला तरीही मधून मधून तत्त्वज्ञानाचा विषय त्यातही आलेला आहे. दुसऱ्याच अध्यायात 'वेद चारी उत्पन्न । झाले ब्रह्मयाचे मुखेंकरून । त्याचि पासाव पुराण । अष्टादश विख्यात ॥' (३२) असे सांगून पुराणातील मुख्य पुराण 'ब्रह्मवैवर्त' असून त्याच्या आधारे ब्रह्मदेव कलियुगास सृष्टिरचनेचा विस्तार सांगताना गुरुचरित्रकार लिहितात, 'ऐक शिष्या एकचित्ता । जधी प्रलयो झाला होता । आदिमूर्ति निश्चिता । होता वटपत्रशयनी॥' (४०) यानंतर आदिनारायण जागृत झाला आणि त्याच्या नाभीतून एक कमळ उदयास आले. 'तया कमळामधून । उदयो झाला ब्रह्मा आपण । चारी दिशा पाहोन । चतुर्मुख झाला देख ॥' (४४) आदिनारायणाच्या आज्ञेवरून ब्रह्मदेवाने सृष्टी रचण्यास आरंभ केला. वेदांत सृष्टिरचनेचे तत्त्व असल्याने तोच आधार घ्यावा म्हणून आदिनारायणाने सुचविले. 'या वेदमार्गे सृष्टीसी । रची गा ब्रह्मया अहर्निशी । म्हणोनि सांगे ऋषीकेशी । ब्रह्मा रची सृष्टीतें ॥ ५३ ॥ सृष्टी प्रजा अनुक्रमें । विविध स्थावर जंगमे । स्वेदज अंडज नामें । जारज उद्‌भिज उपजविलें ॥ ५४ ॥' यानंतर चारी युगाची उत्पत्ती आणि लक्षणे याचे निरूपण याच अध्यायात झाले आहे.

## अनसूयामातेस बोध

'श्रीदत्तमाहात्म्य' आणि 'श्रीदत्तप्रबोध' ही दत्तसांप्रदायिकांची दोन महत्त्वाची पुस्तके असल्याचे आपण पाहिलेच आहे. सहस्रार्जुन, परशुराम, अलर्क, आयुराजा, यदू आणि स्वतःची आई अनसूया यांना दत्तात्रेयांनी अनेक प्रकारचा केलेला बोध दत्तमाहात्म्यात आहे. श्रीदत्तप्रबोध या ग्रंथात तर १७ व्या पासून २० व्या अध्यायापर्यंत दत्तांनी अनसूयेस केलेला बोध वर्णन केला आहे. एकविसाव्या अध्यायात 'पंचभूत उत्पत्ती मूळापासोन' समजावून सांगितली आहे. बाविसाव्या अध्यायात 'पंचवीस तत्त्वांचा प्रकार । तो पृथक दाविला विस्तार ।' आणि 'जें ब्रह्मांडीं विस्तारलें । तें पिंडामाजीं सर्व दाविलें ।' असे वाक्य चोविसाव्या अध्यायात आले आहे. आपल्या मातेस आपण केलेल्या चोवीस गुरूंचे वर्तमान सांगून दत्तात्रेय म्हणतात,

'परिसी माते, मूळिचे कथन । विधीस आज्ञापी नारायण । सृष्टि उद्‌भवाचें कारण । करावें पूर्ण साक्षेपें ॥ तुवां सृष्टीतें रचावें । म्यां विष्णुरूपें प्रतिपाळावें । रुद्रशक्तीनें संहारावें । एवं प्रतिपाळावें आज्ञेतें ॥ अवश्य म्हणोनि विधाता । जाला सृष्टि तेव्हां रचिता । चौऱ्यांशी लक्ष योनीची सिद्धता । करोनि दाविता पै होय ॥ एकपदी आणि द्विपदी । त्रिपदी कोणी चतुष्पदी । पंचपदी केले षट्पदी । अष्टपदी नवपदी अपारा । बहुपदी केले अगणित । निष्पदी केले असंख्यात । नाना जीवरचना समस्त । पाहे अनंत सर्वांतें ॥' (श्रीदत्तप्रबोध : १७·७५-७९) अशा प्रकारची सृष्टिरचना झाल्यावर मग जीवांच्या उद्धरणासाठी वर्णाश्रमधर्मांची निर्मिती झाली असल्याचे सांगितले आहे. एकविसाव्या अध्यायात तर अनसूयेने 'पिंडब्रह्मांडीची कैसी रचना ?' असाच प्रश्न आपल्या पुत्रास केला आहे. मातेचा प्रश्न ऐकून पुत्राने सृष्टिरचनेचा तात्त्विक विचार तिला सविस्तर सांगितला आहे; तो असा—

'मूळ आधीं निराकार । तेथ कैचा कोण प्रकार । नव्हते पवन पाणी भू अंबर । तेज

संस्कार कोठोनी ? ॥ चंद्र सूर्य तारा ग्रहगण । नव्हते भूपाताळ स्वर्गस्थान । यक्ष राक्षस मनुष्य-गण । नक्षत्रे कोठून मेघमाला ? ॥ तीर्थ देव नव्हत्या देवता । ठाव कोठोनि वृक्ष पर्वता ॥ कैंचे सागर कैची सरिता । शब्द नामता वार्ता नसे ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर । नव्हते वेदशास्त्र प्रकार । कांहीच नसे आकार विकार । म्हणोनि निराकार त्या म्हणिजे ॥ मन बुद्धि नव्हते चित्त । अहंकार चैतन्य नव्हते सत्य । द्वीप खंडें कोठोनि असत । मेरूची मात कोठोनि ॥' (२१:३६-४०)

अशा प्रकारे प्रारंभी काहीच नव्हते. नाद नव्हता, बिंदू नव्हता, कला नव्हती, ज्योती नव्हती. वाचा, शब्द, वर्णभेद यापैकी काहीच नव्हते. अशा निराकारापासून प्रथम शून्य निर्माण झाले. त्यानंतर 'शून्य ब्रह्म तें साकारले । तयापासोनि आकाश जालें । आकाश पवनातें प्रसवले । पवनी निपजले तेज तें ॥ तेजापासोनि जालें जीवन । जीवनापासोनि भूमी जाण । एवं पंचभूतें निर्माण । एकापासोनि एक जाली ॥ या पंचभूताचे एकवटी । येथोनि जाली हे भूतसृष्टी । चराचराची राहाटी । मूळ खटपटी येथोनी ॥' (२१:४४-४६) यानंतर शुद्ध, निखिल ब्रह्म चैतन्याच्या प्रभावे व मायेच्या साहाय्याने व्यक्तास कसे आले याचे मोठे सुबक व रेखीव वर्णन आहे. 'अहं ब्रह्मास्मि' या उद्गारातच महामायेचा उभार असून तिच्याच इच्छेने व प्रेरणेने मूळ पुरुष प्रकृतिदशेस आला. 'मायातीत तो परमात्मा । तत्पद जाणिजे या क्रमा । त्वं पद म्हणजे जीवात्मा । पावला भ्रमा मायिकदशा ॥ विकार मायेचा पावला । मूळ स्वरूपातें विसरला । अविद्ये वेष्टित जाला । जीव हें त्याला नाम जाले ॥' (२१ : ५४-५५) पुढे त्रिगुणात्मक सृष्टीची निर्मिती कशी झाली याचेही विस्ताराने वर्णन आहे. 'आकार उकार आणि मकार । त्रय मात्रा मिळोनि ओंकार ।' असून 'आकारमात्री ब्रह्मदेव । उकारमात्री विष्णु स्वयमेव । मकारमात्रा तोचि शिव ।' असे स्पष्ट केले आहे.

पंचमहाभूतात्मक पिंड निर्माण झाल्यानंतर 'अस्थि आणि मांस । नाडी त्वचा वरी केश । हे पृथ्वीपासाव जाणिजे अंश । गुणविशेष पांच हे ॥' (२२:२०) असे सांगितले आहे. 'वीर्य आणि हे रक्त । लाळ मूत्र स्वेद निश्चित । हे पाच गुण यथार्थ । आपी निभ्रांत जन्मले ॥ निद्रा आणि मैथुन । क्षुधा तृषा आळस पूर्ण । हे तेजतत्त्वाचे गुण । जाले निर्माण पाच पै ॥ चलनवलन आकुंचन । प्रसरण आणि निरोधन । एवं हे पाची उत्पन्न । वायुपासोन असती ॥ द्वेष आणि भय । क्रोध चौथा लोभ होय । मोहो पाचवा निश्चय । आकाशी उदय या तत्त्वा ॥' (२२ : २१-२६) यानंतर संबंध पंचीकरणाचा विषय आलेला आहे. सर्व विषयाचा उपसंहार करताना अवधूतानी म्हटले आहे, 'मीच बाप निर्विकार । स्वइच्छें जालयो साकार । मीच नटलो चराचर । सर्व विस्तार माझाच मी ॥ मजपासाव हें ब्रह्मांड । मजमाजीच माझा पिंड । पिंडी दावी मी सुरवाड । माझेनि गोड सर्व दिसे ॥' (२३ : २३-२४)

योगप्रक्रिया, षट्चक्राचे भेद, अजपाचे योग इत्यादी तात्त्विक विषयाचे विस्ताराने निरूपण २६ व्या अध्यायापर्यंत झाल्यावर सत्ताविसाव्यात मातेच्या चाळीस प्रश्नाच्या उत्तरास सुरुवात झाली, ती पुढे पाचसात अध्यायापर्यंत विस्तारली गेली. दत्तात्रेयाच्या अपूर्व बोधामुळे प्रभावित झालेल्या अनसूयामातेच्या या चाळीस प्रश्नाच्या उत्तरांत दत्तपंथीयाच्या तत्त्वज्ञानाचे सार आहे. 'श्रीदत्तमुक्ता-माला' कार स. कृ. फडके यांनी दत्त-अनसूया संवादाचे संक्षेपाने तत्त्व-निवेदन केले आहे ते येथे देण्यासारखे आहे.

अनसूया.— ब्रह्म कशाला म्हणावे ? आणि ते कसे ओळखावे ?

दत्तात्रेय— ब्रह्म हे अखिल, असंग, निरुपाधिक, निःसंग, करून अकर्ते, भोगून अभोक्ते, शुद्ध,

शांत, निर्गुण निरामय, नित्यानंद, आणि मनाला अगोचर असे आहे. सर्व ब्रह्मांडरचनेला कारण तेच आहे. सर्व इंद्रियांना चालविणारे तेच आहे. तेच जगरूपाने नटले आहे आणि इतके असून ते अरूप आहे. वेदांनाही ते कळले नाही. असे ते सनातन ब्रह्म व्यापक आहे. अविनाशी आहे. सूर्यबिंबाप्रमाणे निर्लेप आणि अविकारी आहे. ते जाणावयास ज्ञानदृष्टी पाहिजे. ती सद्‌गुरूंस शरण गेल्यावाचून मिळणार नाही.

अनसूया – शबल ब्रह्म ते कोणते ?

दत्तात्रेय.– शुद्ध निखिल ब्रह्मापासून 'अहं ब्रह्मास्मि' हे चैतन्य-त्यातून महातत्त्व माया–पराअपरा प्रकृती-इच्छामात्रेकरून जीवतात्वं-पदासि हे त्रिपद त्रिमायिक प्रणवत्रिगुण, अंतःकरणपंचक, ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये, पंचतन्मात्रे, पंचमहाभूते-याप्रमाणे "एकोऽहं बहुस्याम्" अशा इच्छेने जो कर्म-ज्ञानार्थ अनेक रूपाचा संभ्रम त्यासच शबलब्रह्म म्हणावे.

अनसूया:– ईश्वर कोण ?

दत्तात्रेय.–जो सर्वात्मकत्वाने व्यापक, सकळांचा आश्रय, चालक आणि प्रेरक असून ज्याच्या आज्ञेत सर्व भूते वर्तत आहेत, जो षड्‌गुणैश्वर्यसंपन्न आहे, जो सृष्टीचा कर्ता, करविता व नियंता असून अखेर सर्व ब्रह्मांडाचा आवर आत्मरुपात करतो, जो निर्गुण असून सगुण असतो, व भक्तभावार्थ प्रकट होतो, तो ईश्वर होय.

अनसूया:– जीव कोण ?

दत्तात्रेय:–ब्रह्मा, विष्णू, महेश्वरादी व गंधर्व, चद्रभास्करादी अनेक देवताचे द्वारे जे निजध्यासन करतात, व निरनिराळ्या देहधारणेमुळे जे भिन्न दिसतात, त्यांसच स्थूलमानाने जीव म्हणावे.

अनसूया:– प्रकृती ती कोण ?

दत्तात्रेय:– मूळ ब्रह्मापासून इच्छाशक्ती–तेथून त्रिगुणात्मक माया-तेथून भूतसृष्टी व त्रिलोक, याप्रमाणे उत्पन्न करणारी जी ब्रह्माची अचाट शक्ती तीच प्रकृती होय.

अनसूया.– परमात्मा कोणास म्हणावे ?

दत्तात्रेय:– जो स्वपर देहात व्यापून असतो, द्वैत नसताही सहज भासतो, तो परमात्मा. संकल्प, विकल्प ज्याचे नाहीसे झाले, त्याला मी-तू-पण रहात नाही, त्यालाच परमात्मदर्शन होते.

अनसूया:– आद्य ब्रह्म कोणाला म्हणावे ?

दत्तात्रेय:– उमावर, रमावर, चतुराननादी देवांपासून श्वपच-चांडालादी काष्ठपाषाणापर्यंत सारेच ब्रह्माद्य होय. त्यात काहीच निवड करता येत नाही.

अनसूया:– जातीचा निश्चय कसा करावा ?

दत्तात्रेय.– मूळात जेथे द्वैतच नाही, तेथे जाती काय ठरवाव्या ? पण कश्यपसृष्टी निर्माण झाली तेव्हा वर्णाकृतीवरून जाती ठरल्या; व ज्या त्या जातीचे निरनिराळे अधिकार व धर्म ठरले. उदाहरणार्थ, ब्राह्मणांनी तप करावे, वेदशास्त्र पठण करावे, सूर्य व अग्नी यांची उपासना करावी, गायत्रीचे ध्यान व जप करावा. क्षत्रियाने भूमी व गोद्विज यांचे पालन व रक्षण करावे, वैश्याने व्यापार करावा, शिवोपासना करावी, शूद्राने शेती करून सेवाधर्माने वागावे. याप्रमाणे व्यावहारिक कर्मानुसार जाती निरनिराळ्या झाल्या त्याप्रमाणे वागावे.

अनसूया:– कर्म कशास म्हणावे ?

दत्तात्रेय:– वेदाचार, शास्त्राचार, श्रेष्ठाचार, वृद्धाचार, कुलाचार, देशाचार, लौकिकाचार यांप्रमाणे आचार पाळावे. 'यद्यपि शुद्धं लोकविरुद्धम्' असे जनात आचरू नये. जे जीवन्मुक्त आहेत, त्याना मात्र हे निर्बंध लागत नाहीत. इंद्रियाचे व्यापार इंद्रिये करीत असताही त्यांचे कर्तृत्व आपल्याकडे घेत नाहीत. इंद्रियास चाळविणारा धनी वेगळाच आहे, असे समजून आपण केवळ साक्षित्वाने मात्र राहतात. यामुळे त्यांचे

ठिकाणी हर्षशोक, लाभहानी, मानापमान, इत्यादी द्वंद्वे काहीच परिणाम करू शकत नाहीत. देहेंद्रिय-व्यापार ठराविक नियमाप्रमाणे परभारें चालले असता, ते आत्म्याचे ठिकाणी स्थिर असतात व बाहेर मात्र लौकिकाचार दाखवितात, यासच कर्म म्हणावे. अहंकृतीने आणि फलार्थ कामनेने केलेले जे कर्म ते अकर्म होय. ते रजोगुणी किंवा तमोगुणी असते. ईश्वरार्पणबुद्धीने केलेले कर्म सात्त्विक होय.

**अनसूयाः–** तप कोणते चांगले ?

**दत्तात्रेयः–** ज्यापासून निश्चयाने अपरोक्ष ज्ञान होते तेच उत्कृष्ट तप होय. दृष्टीने ब्रह्म-रूपच पाहावे, अध्यात्मज्ञानच ऐकावे, आणि त्याचेच निरूपण करावे. जगी वावरत असताही निःसंगता बाणणे; निद्रा, द्वेष, राग, विकार, विषय आणि भोग यांचा अव्हेर करणे हे तपाचे लक्षण होय.

**अनसूया–** असुर कोण ?

**दत्तात्रेय–** जप, तप, पूजा, ध्यान, यज्ञ, याग यांत विघ्न करणारे ते असुर. ते जसे बाहेर असतात तसे कामक्रोधादी असुर अंतःकरणातही असतात. *यासाठी बाहेरच्या असुरापेक्षा या घरच्या असुरांनाच फार जपले पाहिजे.*

**अनसूया–ज्ञान कशाला म्हणावे ?**

**दत्तात्रेय–** या शरीरात एकादश इंद्रिये आहेत. त्यांच्यासंबंधी सावध राहून आपल्या आयुष्यातील एक पळही व्यर्थ जाऊ देऊ नये. सत्कर्मातच सदा गुंतलेले रहावे. सुमतीचा लोभ धरावा; कुमतीच्या नादी लागू नये. आचरणात निष्कामता असावी. हरिकथा-पुराण-श्रवणाकडे कानांना लावावे. मनाने श्रवणाचे मनन करावे, रसना नामस्मरणात गुंतवावी. पायांनी तीर्थाटन करावे, किंवा ईश्वराच्या विभूतींस प्रदक्षणा घालाव्या. देवगुरु-द्विज-पूजनात हात गुंतलेले असावेत. विष्णुनिर्माल्य याचाच गंध घ्यावा. देवगुरूंच्या मूर्तीची पूजा करून त्यांचे ध्यान करावे. सर्वांभूती सत्कार करावा. वंदनभक्तीच्या योगाने निरहंकार व्हावे. अशा रीतीने मनोवृत्ती रंगविणे हाच खरा शृंगार होय. सत्संगाने प्रेमोद्भव होऊन साधक भक्तिपथाला लागतो. मन त्याचे ठिकाणी विरक्तता व शांती सहजीच बाणते. मग तारेवर नाच करणारे नट जसे एकीकडे हावभाव दाखवीत असताही आपले अखंडानुसंधान राखणे हेच ज्ञान होय. पटामध्ये ज्याप्रमाणे तंतूच व्यापून रहातो, त्याप्रमाणे सर्वत्र परमात्माच व्यापला आहे असा मग साक्षात्कार होतो.

**अनसूया–अज्ञान म्हणजे काय ?**

**दत्तात्रेय–**सर्वत्र परमात्माच भरून राहिला असता रज्जूवर जसा भ्रमाने सर्प भासतो, त्याप्रमाणे ह्या वाह्य जगासच सद्रूप मानणे तेच अज्ञान होय. अहंता आणि ममता हे अज्ञानाचेच प्रकार आहेत. सर्पदंश झाला असता मनुष्याची बुद्धी जशी भ्रष्ट होते, त्याला कडू तिखट काहीच कळत नाही. भलतेच बरळतो, तसे विषयी जनांचे अज्ञान भ्रांतिकारक असते.

**अनसूया–संसार कशाला म्हणावे ?**

**दत्तात्रेय–** ' अनादी जो क्रम । जो चालत आलासे उत्तम । तो मायावी संभ्रम । तेथें निगम वासनेसी ॥१८॥ तया वासनेचा उद्भव । आणि षड्विकारिक समुदाव । युक्त व्यवहार वैभव । लीला अभिनव विस्तार हो ॥१९॥ तेथें जन्मादि सुखसोहळे । तदुक्त मार्गाचे पुरविजे डोहाळे । सोपस्कारें वाढविजे कुळें । श्रेष्ठानुवळें आचरणा ॥२०॥ मृतादिकांचे विचार । जे शास्त्रानुसंगे कीजे प्रकार । शुद्धाचरणी आचार । या नांव संसार बोलिजे ॥२१॥ शास्त्राचार वृद्धाचार रीती । जाणोनि अधर्मातें त्यागिती । सदाचरणें आचरती । संसार म्हणती या नावें ॥२२॥ इंद्रियांच्या चंचलकृती । त्या विघडोनि लाविजे सुपंथी । सार जाणावया योजिजे वृत्ती । संसार

निश्चिती म्हणिजे या ।। २६ ।। रंग भोगिलेसे दिसावें । परि ते अंगी काही नसावे । सर्वां ऐसे सर्वी वसावें । असोनि नसावे कोठेंची ।।३०।। '

अनसूया– बंध कशाला म्हणावे ?

दत्तात्रेय–मी कर्ता आणि माझा संसार अशी जी बुद्धी आणि तत्संबंधी ज्या नाना प्रकारच्या ईषणा तोच बंध 'बाजे पाऊल आपुले । मागे म्हणे कोण आले ।। ' याप्रमाणं बंध खरा नसून आपणच आपल्या संकल्पविकल्पानी ओढविलेला असतो

अनसूया— मोक्ष म्हणजे काय ?

दत्तात्रेय–' नरदेही येवोनि प्राणी । राहे सदा स्वहितविचारणी । ज्ञानअभ्यासक्षणी । योग-निर्वाणी साधत ।।७७।। नित्यानित्य सारासार । विवेकी शोधिजे आत्मप्रकार । तत्त्वज्ञाने रंगवी अतुर। परात्पर रूप पाहे ।।७८।। संकल्प विकल्प जे उठती । विवेके उडवी तेथिंची भ्रांती । सदा सावधान ठेवी वृत्ती । चकवी आवृत्ती तोचि एक ।।७९।। सद्गुरुचरणी सदा शरण । बोध स्वीकारूनी साधी कारण । त्यागविले त्यागी अवगुण । साठवी गुण स्वहितार्था ।।८०।। जन्मोनि साधिजे हे स्वहित । सगुणभक्तीसी व्हावे रत । ईश्वर आहे सर्वगत । त्या पदी नत होइजे ।।८१।। सर्वांभूती साधिजे नमन । सर्वांतर व्यापक देवचि जाण । ही भावना जडता पूर्ण । भिन्नाभिन्न द्वैत विरे ।।८२।। नाना कल्पना सरता । देवभक्तचि उरे वार्ता । हृदयी चढे सप्रेमता । पावे कोमलता अंतरी ।।८३।। नामस्मरणी उल्हास । श्रवणी साठवी कीर्तनरस । वृत्तीसी होय उदास । लागे ध्यास आगळा ।।८४।। ध्यानी मन होता निमग्न । मग सहजचि होय उन्मन । साक्षात्कार ठाके पुढें येऊन। पावे दर्शन सगुणाचं।।८५।। सगुणी उपासना ठसता । ऐसीच दिसावी सर्वगता । ती केवी पावे एयता । तरी सद्गुरुनाथा विनवावे ।।८६।। सर्वात्मकी सर्वेश्वर । तो प्राप्त व्हावया जोडिजे पर । तो आर्त भूत बोळवोनि अंतर । अध्यात्मसार वाणविती ।। ८७ ।। तया अध्यात्मिकाचे विवरण । करी कल्पनेचे खंडण । निर्विकल्प होता शुद्ध मन । गुप्त धन दाविती ते ।। ८८ ।। सर्वात्मक जो सर्वेश्वर । कैसा व्यापला सर्वांतर । ते करविती दर्शन सत्वर । तो निर्विकार परमात्मा ।।८९।। निरालंब निरंजन ।। ते अखिल ब्रह्म सनातन । तेथें कैचें मी तूपण । देहवृत्तिभान काही नसे ।।।।९०।। ते लक्षातीत अलक्ष । तोचि सर्वात्मक होय पक्ष । नित्यानंद भोगी असता दक्ष । तोचि मोक्ष जाणिजे ' ।।९१।।

अनसूया –खरे सुख कोणते ?

दत्तात्रेय –विपयोपभोगाने प्राप्त होणारे जे ते खरे सुख नव्हे दान, धर्म, यज्ञ-क्रिया इत्यादी सत्कर्मानी आणि दया, क्षमा, शांती इत्यादी गुणानी प्राप्त होणारे ते खरे सुख होय स्वर्गादी प्राप्तीने होणारे जे ते खरे सुख नव्हे तर जे योगी, ज्ञानी, संत, सज्जन, सच्चिदानंदरूप लक्षून चारी देहाच्या पलीकडे पाचवे देही असतात, किंवा जे देहादेह ओलांडून अकराव्यात असतात, जे आठवे सहस्रदळ, किंवा संनावीचे पान अनुभवितात, ते योगीजनच उत्कृष्ट सुख काय ते जाणतात

अनसूया –दु ख कसे असते ?

दत्तात्रेय –आत्मरूपाच्या विसरापासून रौरव-नरकातील यातनापर्यन्त सारे दु खच दु ख आहे

अनसूया –स्वर्ग कोणता ?

दत्तात्रेय –सत्संग हा स्वर्गच आहे

अनसूया –नरक कोणता ?

दत्तात्रेय –अर्थात् दुष्ट संग हा नरकच होय नीच धर्माचरण हा नरक होय

अनसूया –परपद ते कोणते ?

दत्तात्रेय –'तया नाही नामरूप । त रूपातीत गा अरूप । त्यावीण सर्व विरूप । त्याचेनि रूप दृश्यत्वे ।। ३८ ।। ते गुणातीत निर्गुण । ते चौ देहापरत जाण । चहुवाचेहुनी असे भिन्न । परात्पर पूर्ण परपद ' ।। ३९ ।।

**अनसूया** –उपास्य कोणते ?

**दत्तात्रेय** –ब्रह्मा, विष्णू, महेश्वरादी देव दाखविणारे सद्‌गुरू हेच श्रेष्ठ उपास्य होत

**अनसूया** –विद्वान कोण ?

**दत्तात्रेय** –सर्व विश्वात्मा ईश्वर। अभेदचि हे चराचर। ऐसे देही ज्ञान जया गभीर। विद्वान निर्धार तोचि पैं॥ ७९॥ अंगी असोन सर्वज्ञता। मिरवावी वाटे न धनार्था। विनयपद होय मिरविता। धन्य विद्वत्ता त्याचीच॥ ८०॥

**अनसूया** –मूढ कोण ?

**दत्तात्रेय** –अविवेकी, अहंकारी, तो मूढ त्याचे वर्णन कोठवर करावे ?

**अनसूया** –संन्यासी कोण ?

**दत्तात्रेय** –फळवासनेचा त्याग। स्वस्वरूपीं सदा भोग। निजात्मरंगी रंगला रंग। हाचि योग संन्यास॥ २१॥

**अनसूया** –ग्राह्य काय ?

**दत्तात्रेय** –प्रवृत्ती आणि निवृत्ती हे दोन्ही मार्ग पारखून घ्यावे

**अनसूया** –अग्राह्य कोण ?

**दत्तात्रेय** –विकार, कुतर्क, कुसंग, वगैरे जे अमान्य, अप्रासंगिक असेल ते अग्राह्य समजावे

**अनसूया** –समाधी कशास म्हणावे ?

**दत्तात्रेय** –आब्रह्मस्तंबपर्यंत। वस्तुरूपेंच सर्व देखत। तद्रूपीच रंगलें चित्त। जीवीं विपरीत न दिसे त्या॥ ३९॥ साक्षित्वें करून व्याप्ति। जगीं स्वानंदें विचरती। कर्म अकर्मातीत होती। आनंदें डुलती तद्रूपी॥ ४१॥

**अनसूया** –ब्राह्मण कोण ?

**दत्तात्रेय**– वेदें स्थापिल्या वर्ण याती। कर्मधर्म लाविले निश्चिती। ते नुल्लंघावे कल्पांती। निवेदिल्या रीती आचरावे॥१०॥

**अनसूया**–आसन कोणते ?

**दत्तात्रेय**–बाह्य आसने अनेकांची अनेक आहेत, पण मनाचे दृढासन हेच खरे आसन होय

**अनसूया**–मुद्रा कोणत्या ?

**दत्तात्रेय** - बिंबीं बिंबातें पाहिजे। बिंबोनि बिंबी हरपिजे। बिंबातीत स्वयें होइजे। पद हें पाविजे अविनाश॥३१॥ हेच खऱ्या मुद्रेचे लक्षण

**अनसूया**- ध्यान कोणते ?

**दत्तात्रेय**- स्वस्वरूपा जडले मन। नावडे तया पदार्थ आन। तद्रूप दिसे ज्यास्त पूर्ण। या नांव ध्यान त साधी॥४९॥

**अनसूया**--जप कोणता ?

**दत्तात्रेय**– सद्‌गुरूस शरण जाऊन ते जो बीजमंत्र मुमुक्षूस देतील त्याचा जप करावा

**अनसूया**–वर्णव्यवस्था ती कशी ?

**दत्तात्रेय**--ज्याची स्वात्मस्वरूपीं जडली प्रीती। त्याची भलती असो वर्ण याती। तया स्वात्मभानी रमापती। तो या त्रिजगती धन्य होये॥२४॥ वर्ण व्यवहार अधिकारें। वेदाज्ञे ते राखिजे बरें। विरोधार्थ हे विचार खरे। राखिजे सारें जगरूढी॥२५॥

**अनसूया**-- जागृती म्हणजे काय ?

**दत्तात्रेय** - विकृती विकार उद्भवता किंचित। यांचिलागी हानी मानीत। मग ते विवेके करी शांत। एवं जागृत या म्हणिजे॥४३॥

**अनसूया** -निद्रा म्हणजे काय ?

**दत्तात्रेय**--मायामोह हे निद्रेचे स्वरूप होय

## गीताप्रबोधातील तत्त्वचिंतन

'श्रीदत्तप्रबोध' हा कथात्मक अथवा आख्यानात्मक ग्रंथ त्यातील तत्त्वबोधासाठीही प्रसिद्ध आहे ४४ व्या अध्यायात दत्तगोरक्षाच्या संवादास प्रारंभ झाला असून ४६ व्या अध्यायात गीताप्रबोध नावाचा एक महत्त्वाचा विषय सुरू झाला असून अवधूतविरचित सप्तश्लोकी गुरुगीतेवर अनंतसुत कावडीबावांनी अत्यंत मननीय असे निरूपण केले आहे 'परमार्थतत्त्वाचे' निरूपण फा.१००

'वेदा न लोक न सुरा नरा वा वर्णाश्रमं नैव कुलं न जातिः। न धूममार्गो न च दीप्तिमार्गो ब्रह्मैकरूपं परमार्थतत्त्वम् ॥' या श्लोकावरचे भाष्य मनात सतत धारण करण्यासारखे आहे. वेद, लोक, देवता, सर्व जग इत्यादींच्या पलीकडे परतत्त्व असल्याचे सांगताना बोवा म्हणतात,

'इंद्र वरुण सविता कुबेर। गणगंधर्व यक्ष किन्नर। रुद्र रुद्रगण अप्सरा। यांहोनि पर वेगळाची ॥ यम पितृगण प्रजापती। सनकसनंदन महामूर्ती। सनत्कुमारादि विभूति। याहोनि निश्चिती वेगळाची ॥........राक्षस दैत्य दानव। चतुर्लक्षादि मानव। नाना रूपांचा समुदाव। याहोनि अपूर्व वेगळाची ॥ ग्रह तारा नक्षत्र। अंबुधरादि योग विचित्र। कर्ण ऋषिगण पवित्र। याहोनि स्वतंत्र वेगळाची ॥....पृथ्वी आप तेज वायु आकाश। यांचेचि प्रकार पंचवीस। सेखीं त्रिगुणाचा सौरस। यांहोनि निःशेष वेगळाची ॥ ....आश्रम आश्रम कुळ याती। नाना भेद विद गती। अस्तोदय कृष्णदीप्ती। याहोनि निश्चितीं वेगळाची ॥....वेद शास्त्र पुराण। श्रुति शाखा ग्रंथ पूर्ण। विद्या वैभव धन। असे यांहून वेगळाची ॥ कर्म धर्म मार्ग दोन्ही। दीप्तिमान जाणा तोही। आक्रम विक्रमादि सर्वही। त्याहोनि पाही वेगळाची ॥' (४६ : २९-४२) असे हे परतत्त्व सर्वातीत असून 'व्यापोनि वर्ते निराळा' या जातीचे असून त्याची 'अनुपम लीला अतर्क्य' असते.

पुढल्या श्लोकात मी मूर्ख नाही, पंडित नाही, मी वार्ता करणारा किंवा मौन धारण करणाराही नाही, नाना प्रकारचे तर्कवितर्क करणारा मी नसून सर्व उपाधिरहित असा संसारदुःखापासून वेगळा आहे हे सांगताना ग्रंथकाराने म्हटले आहे, 'तेवी ब्रह्म निश्चळ निर्मळ। अखंड अभेद अचळ। तेथें तर्क वितर्क विटाळ। केवीं स्पर्शतील स्वरूपीं त्या ॥ मन वाचेचा न लगे लाग। तेथें थाय येरांचा पांग। तें निरामय निःसंग। अखिल अभंग अवीट ॥' (४६:७५-७६) असा हा अभंग, अवीट, निरामय, निःसंग परमात्मा मग गुणरूपास कसा आला? या प्रश्नाचे उत्तर कावडीबावांनी मार्मिकपणे देऊन म्हटले आहे, 'जे अखिल ब्रह्म निरुपाधिक। तेणें इच्छिलें निर्मिलें दृश्य कौतुक। तो हा साकाररूपे मी देख ॥' खरे पाहता या तत्त्वाला वेदश्रुतीही ओळखू शकत नाहीत. परंतु 'मद्‌भक्तिप्रेमाचे श्रम। जाणोनि द्यावया आराम। अयोनि अवतरलों सुखधाम। द्यावया विश्राम अनन्यांसी ॥' अरूप असलेला परमात्मा याप्रमाणे आपल्या भक्तिसुखाची गोडी चाखण्यासाठी अनेक रूपांनी अवतरला, व्यक्त झाला. 'न मे च माता न पिता न बंधुर्न मे च पत्नी न च पुत्रमित्रम्।' या श्लोकावर भाष्य करताना ग्रंथकाराने म्हटले आहे, असा जरी मी अनन्य भक्तांसाठी अवतरलो असलो तरी 'त्या मज माता न कोण्ही पिता। बंधु न कोण्ही चुलता। भगिनी न कोण्ही आप्ता। न मज कांता पिशुनादि ॥ मी मायातीत निरंजन। गुणातीत गा निर्गुण। नामरूपातीत भिन्न। शून्यातीत निःशून्य आभासत्वे ॥ निःशून्यचि हे शून्य जालें। शून्यचि शून्याते व्यालें। स्वतेजें तें प्रकाशलें। तेचि उद्‌गारलें पाहे पां ॥ अहं ब्रह्मास्मि स्फुरतां। त्या नाव गा चैतन्यता। एकोऽहं बहुस्यमता। उदेली इच्छिता इच्छा ते ॥ इच्छा चैतन्याचे मेळीं। महातत्त्वी माया उदेली। ते प्रणवात्मकें प्रगटली। द्विविधा जाली तेचि पुढें ॥' (४६:८३ ८७) यानंतर पुढे 'पुरुष आणि प्रकृति। उभय रगली एकप्रीती। ब्रह्मत्वा विसरलें निश्चितीं। म्हणोनि पदप्राप्ती जीव त्या ॥' (८८) असा निर्वाळा दिला आहे.

यानंतरच्या चौथ्या 'जितेंद्रियोहं ह्यजितेंद्रियोहं' या श्लोकावर निरूपण करताना बोवा दत्तमुखाने यमनियम, इंद्रियदमन, शमदम इत्यादींचा उल्लेख करून सर्वांत श्रेष्ठ योग कोणता हे सांगताना म्हणतात, 'जें अखंड

अभेद ओतप्रोत। भरोनि उरलें सदोदित। तें अलक्ष्य आणिजे लक्षांत। श्रेष्ठ योगांत योग हा॥' (११३) एवढें सांगून झाल्यावर पाचव्या 'शिवं न जानामि कथं वदामि' या श्लोकावर टीका करताना शिवतत्त्वाचे वर्णन मोठ्या बहारीने उभे केले आहे. 'आब्रह्मस्तंबपर्यंत। व्यापक हा शिव समस्त। तो साक्षात हृद्‌गत। शुद्ध शांत गगनोपम॥ तो मतीचा होय दाता। या इंद्रियांचा चालिता। ज्ञानामृतातें प्रकाशिता। असे सर्व सत्ता जयाची हे॥ सकळ बीजांचें हें बीज। सकळ तेजाचें जें तेज। सकळ गुजांचें हे गुज। तो स्वात्म निजशिवची॥ शिव सनातन सर्वज्ञ। शिव अज अजित प्राज्ञ। शिव गुणातीत गुणज्ञ। अपरंपरज्ञ शिव हा॥ तत्त्वातीत तें तत्त्व जाण। गुणातीत तो निर्गुण। जो निराकार निरंजन। सर्व संपूर्ण पूर्णत्वें॥ अंडपिंडब्रह्मांड सूक्ष्म स्थूळ प्रचंड। शब्द स्वाद रस उदंड। नाद वितंड तांडव शिव॥ सजीवनी जीव भाव अभाव। दृश्यादृश्य अवघा शिव। रिक्त त्याविण नसे ठाव। शिवोहं अनुभव प्रत्यक्ष॥ सर्व शिवेति हें जाण॥ येथें कैचे तूंमीपण। अहं शिवोहं हें वचन। नव्हे अप्रमाण शब्द हा॥ शिव सत्य ज्ञानप्रकाश। शब्दान्वये जाणिजे चोख। स्वात्मानुभवीच हें ओळख। केवळ वाचक नोव्हे हा॥' (४६ : १२४-३२ )

सहाव्या 'अतत्त्वरूपं न हि वस्तु किंचित्' या श्लोकावर भाष्य करताना पुनः परतत्त्व म्हणजे काय नाही व काय आहे हे सांगून आणखी खुलासा करताना म्हटले आहे, 'नाना आकार विकार। नाना वस्तूंचे प्रकार। नाना भूतें औडंबर। तत्त्वसार नव्हेचि तें॥ नाना बीजें नाना तरू। अनेक श्वापदें जलचरू। कृमीकीटकें आफणफणीवरू। अनंत विस्तारू नोव्हेचि तें॥ लक्ष चौऱ्यांशीचा उभारा। व्योमचंद्र ग्रह नक्षत्र तारा। वनस्पती जंगम नग धरा। उदक वारा नोव्हेचि तें॥ अतळ वितळ सुतळ। तळातळ रसातळ पाताळ। तेवींच एकवीस स्वर्गमंडळ। द्वीपाचळ उधदी नसे॥ देव दानव ऋषीगण। अष्टदिक्‌पति लोक संपूर्ण। भूस्वर्गपाताळादि दैवता भिन्न। न होती जाण तत्त्व हें॥ ......नाना घटपटादि योग। नाना हुत महायाग। अतत्पाचरणें प्रयोग। नोव्हे जोग तें कांही॥ शुची अशुची चांडाळ। सुबुद्धी दुर्बुद्धी अमंगळ। नाना विद्या नाना खेळ। कळ विकळ नोव्हेचि तें॥ देह गेह सुत जायर। अनेक प्रकारें विस्तार सायर। स्वार्थ परमार्थ प्रपंचक्रिया॥ लोभ मोह दया नोव्हे ते॥ ... ... तें गुह्य आत्मतत्त्व पाहीं। व्यापक असे सर्वांठायी। अतर्क्य याची नवलाई। निवडितां कांही न पवे करी॥ ते आणीतल्याविण ठावें। उगेचि कैसें सांपडावें। तुज वाटे परी परिसावें। तरी श्रवण द्यावे श्रवणासी॥' (४३: १३६-४२)

सर्वत्र व्यापक असणाऱ्या या गुह्यतत्त्वाचे रूप वर्णन करताना अनेक दृष्टान्त देऊन बोधांनी स्पष्ट केले आहे की, 'पाहे पां रस अंगीं जडला स्वाद। शब्दध्वनीमाजीं नाद। ग्रंथामाजि अर्थभेद। वादी विवाद ओळखिजे॥ कनकी शोभे ती कांती। दीपामाजीं पाहे दीप्ती। रत्नीं कळा फांकती। पुष्पीं नियती परिमळ॥ नाना पदार्थमात्री जाण। रुचिपरत्वे भिन्नभिन्न। क्षार आम्ल मधुर तीक्ष्ण। कटू गोडपण ओळखी हें॥.... नाना गुंफित पुष्पहार। अंतरी सुताचा आधार। तेवीं व्यापक जगदीश्वर। पट निर्धार सूतचि तें॥ रंगविरंगी पट शोभले। नाना नामी प्रौढी प्रौढले। पाहोनि त्यातें जग भुलले। अंगी शृंगारले लेवोनिया॥ तेवींच ईश्वरापासोन। विश्व जालें हें निर्माण। परी विश्वगत असे कोण। ही तो खूण नोळखसी॥' (४६:१५४-६१) जीव आणि शिव, आत्मा आणि परमात्मा यांच्या ऐक्याची ओळख पटणे हे महत्त्वाचे आहे. 'सुवर्णाचेचि अलंकार। येर धातूचे पात्र प्रकार। तेवींच मृत्तिकेपासाव सुंदर। होती अपार भिन्नत्वें॥

त्या आकारे वेगळेपण । पाहता पाहतसो आपण । परी ते नोव्हे वेगळीक जाण । असति समरसोन एकमेकी ।। एवं ब्रह्मचि हे व्यापिले । दृश्य नगरूपे विस्तारले । हे सर्वात्मकी ओळखी भले । यावीण वेगळें नसे काही ।। " (५६: १६२–६४) शेवटच्या सातव्या ' षडंगयोगो न च नैव शुद्धम्' या श्लोकावरील भाष्यात कावडीबुवानी षडंगयोगाचे विवेचन करून या योगाची मर्यादाही स्पष्ट केली आहे. या सप्तश्लोकातून दत्तात्रेयानी जे परतत्त्वनिरूपण गोरक्षासमोर केले ते सर्वांनाच मार्गदर्शक आहे. गोरक्षनाथाची स्थिती तर ' चाकाटोनि मनी थिजला राहे । वाटे अर्पावी पदी काये । पसरोनि बाहे कवळावा ।। ' (२७९) अशी झाली.

# सहस्रार्जुनास तत्त्वबोध

श्रीवासुदेवानन्दसरस्वतींचा ' श्रीदत्तमाहात्म्य' हा ग्रंथही साम्प्रदायिक तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचा आहे कार्तवीर्यार्जुन, परशुराम, अलर्क, आयुराज, यदू इत्यादींच्या कथाबरोबर दत्तानी त्याना केलेला तत्त्वबोधही महत्त्वाचा आहे. श्रीदत्तानी कार्तवीर्याला केलेला तत्त्वोपदेश बाराव्या व तेराव्या अध्यायांत आला आहे. अलर्काच्या आख्यानात मदालसेने अंगाईगीत गाताना व दत्तात्रेयाच्या प्रश्नांना उत्तरे देताना तत्त्वज्ञानाचेच दर्शन प्रामुख्याने घडते. यदूच्या आख्यानात अवधूतगीतेमधील तत्त्वज्ञान व्यक्त झाले आहे. अलर्काच्या आख्यानात व अर्जुनाख्यानात योगप्रक्रियेचे विवेचनही मधून मधून आले आहे. श्रीदत्तमाहात्म्याच्या आठव्या अध्यायापासूनच सहस्रार्जुनास उपदेश सुरू झाला आहे. शिल्पशास्त्र, कामशास्त्र, मंत्रशास्त्र, मीमांसाशास्त्र, कर्मविपाकशास्त्र, तंत्रशास्त्र, वेदान्तप्रक्रिया इत्यादी विषयाचे विवेचन पुढील अध्यायांत आले आहे. ' जें सत्य ज्ञान अनंत । ब्रह्म एक सदोदित । भ्रमे नामरूपे निश्चित । असती कल्पीत ब्रह्मावरी ।। दिसे जो हा सर्व लोक । ते पूर्वी ब्रह्म होतें एक । भेदरहित देख । सच्चित्सुखस्वरूप ।। ' ( श्रीदत्तमाहात्म्य : १२ : ७-८ ) असे हे सच्चिदानदस्वरूपी ब्रह्म व्यक्तास कसे आले याचे मार्मिक विवेचन पुढे आले आहे. आरंभवाद, परिणामवाद, विवर्तवाद याच्या समर्पक व्याख्या सांगताना स्वामीमहाराजानी म्हटले आहे, ' घेवूनिया माती । कुंभार घडा करी हाती । हा आरंभवाद म्हणती । उपादान माती निमित्त कुलाल ।। ....आम्लाने होतें दुधाचें दही । हा परिणामवाद तोही । हया निर्विकार आत्म्याला नाही । म्हणूनी विवर्तवाद बोलती ।। ' (१२ : १७–२०) यानंतर स्वामीनी जगनिर्मितीचा प्रपंच विस्ताराने खुलवून सांगितला आहे.

तेराव्या अध्यायात दत्तांनी अर्जुनाला महावाक्याचा केलेला उपदेश आला आहे. ' हे जग पूर्वी सद्रूप । होतें ब्रह्म अरूप । ' परंतु पुढे इच्छा व्यक्त झाल्याने ते नानाविध झाले. याचे मोठे यथार्थ व रेखीव वर्णन वासुदेवानंदसरस्वतींनी केले आहे. तात्पर्यनिर्णायक लिंगाचा समन्वय, तत्त्वंपदार्थविवरण, अष्टांगयोगाचे स्वरूप, मोक्षासाठी वाक्यविचाराची आवश्यकता, आत्म्याचे निषेध्य व विधेय असे दोन गुण, आश्रमधर्माचे स्वरूप, जीवन्मुक्ताचा व्यवहार इत्यादींविषयी अतिशय उद्बोधक असे विवरण दत्तमुखातून अर्जुनासाठी झालेले आहे. श्रीदत्तात्रेयांनी अर्जुनास केलेला हा बोध अतिशय महत्त्वाचा असून त्याचे सार स. कृ. फडके यांनी पुढीलप्रमाणे काढले आहे.

' अर्जुना, आत्मस्वरूप जाणायचे असेल तर प्रथम शास्त्राची मदत घेतली पाहिजे. पूर्वसंस्कारांच्या योगाने मनुष्याचा स्वभाव बनतो व त्या स्वभावानुसार तो कर्म करतो. कर्मे बंधनकारक होतात. शास्त्रांच्या अध्ययनाशिवाय कर्माचे बंधकत्व नाहीसे करण्याची युक्ती कळत

नाही. [illegible], [illegible] इत्यादी सामान्य स्वरूपाचे जरी पूर्ण ज्ञान असेल तरी त्याचेही [illegible] होत व [illegible] मुक्तीचा लाभ होतो. प्रायश्चित्ताच्या योगाने ज्याप्रमाणे रोगाचा नाश होतो, त्याप्रमाणे शास्त्रांच्या योगाने अविद्येचा नाश होतो. आपल्या आजारी मुलाला खाऊची लालूच दाखवून आई कडू औषध देते व नंतर युक्तीने खाऊही त्याच्यापासून काढून घेते, त्याप्रमाणे सामान्य फलाची आशा लावून शास्त्रवाक्ये लोकांच्याकडून वर्णाश्रमानुसार कर्मे करवून घेते. ज्याप्रमाणे खाऊच्या आशेने जरी मुलाने औषध घेतले, तरी त्याला औषधाचे मुख्य फल जे आरोग्यप्राप्ती ते मिळतेच; त्याप्रमाणे सामान्य फलाच्या आशेने जरी लोकांनी शास्त्रविहित कर्मे केली, तरी त्यांचे मुख्य फळ जे चित्तशुद्धी ते त्यांस मिळतेच. याप्रमाणे शास्त्रे युक्तीने भ्रम-निवारण करून परोक्षज्ञान प्राप्त करून देतात. स्वस्वरूपाला विसरून कर्तृत्वभोक्तृत्वाचा अहंकार धरून सर्व मूढ जीव कष्टी होतात. त्यांचा भ्रम-निरास शास्त्राच्या योगाने होतो. शास्त्रांत तात्पर्य काय सांगितले आहे, ते आता सांगतो.

'जगदुत्पत्तीपूर्वी अखंडैकरस ब्रह्म होते. त्या ब्रह्मासारखे दुसरे काही नसल्यामुळे त्याला सजातीय भेद नाही व त्यावाचून दुसरे काहीही नसल्यामुळे त्याला विजातीय भेदही नाही. त्याच-प्रमाणे ते अखंडैकरस असल्यामुळे त्यात वृक्षा-प्रमाणे स्वगत भेदही नाही. माया ही ईश्वराची शक्ती आहे व ज्याप्रमाणे शक्ती व शक्तिवान् पुरुष यात भेद नसतो, त्याप्रमाणे मायेमुळे ईश्वरात द्वैत येत नाही. ते ब्रह्म संकल्पाने स्वतः अनेक रूपांनी नटले. घटाला कुंभार निमित्त व व माती उपादान अशी दोन भिन्न कारणे असतात. परंतु जगाची कारणे तशी भिन्न नाहीत. ईश्वर ऊर्णनाभीप्रमाणे निमित्त-उपादान उभय-रूप आहे. म्हणून येथे आरंभवाद संभवत नाही,

[illegible]

[illegible] नाही. हा भेद [illegible] असा [illegible] मन [illegible] आहे. हा भेद-मनाचे [illegible] असे [illegible] हा त्यांची [illegible] या मनाचे निरसन करण्या-करिता आहे; कारण हा मन जरी निरुद्ध असला तरी तो अन्तर्वर्ती आहे. म्हणून ज्ञानयोगाच्या योगाने या मनाचे निरसन केले म्हणजे अखंड चैतन्याचा अनुभव येतो. आता ब्रह्म मुळात एक असून अनेक कसे झाले ते ऐक.

'अखंडैकरस ब्रह्माची जी शुद्ध सत्त्वगुणी शक्ती, विद्या-माया, तिच्या उपाधीने ब्रह्माला सर्वज्ञत्वादि-गुणविशिष्ट असे ईश्वरत्व येते. मलिनसत्त्वप्रधान प्रकृतीत ब्रह्माची जी प्रतिबिंबे पडतात, त्यांना जीव असे म्हणतात. हे जीव किंचिज्ज्ञत्वादी विशिष्ट असतात. या मायेला आवरण आणि विक्षेप अशा दोन शक्ती आहेत. आवरणशक्तीच्या योगाने माया ही परब्रह्म-स्वरूप झाकून ठेवते आणि विक्षेपाच्या योगाने त्या ब्रह्मावर जगताचा आभास दाखवते. ब्रह्मा-पासून प्रकृती, तिच्यापासून महत्तत्त्व, महत्तत्त्वा-पासून अहंकार व अहंकारापासून आकाश (शब्द-गुण), वायू (शब्द, स्पर्श), तेज (शब्द, स्पर्श, रूप), जल (शब्द, स्पर्श, रूप, रस), आणि पृथ्वी (शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध) या पंचमहाभूतांची उत्पत्ती होते. पंचमहाभूतांच्या सत्वगुणांपासून पाच ज्ञानेंद्रिये उत्पन्न होतात. रजोगुणांशापासून कर्मेंद्रिये व प्राण उत्पन्न होतात. सर्व पंचभूतांच्या सत्वांशाच्या एकीकरणाने अंतःकरण होते. हे अंतःकरण वृत्तिभेदाने,

होते. निर्विकल्प असता अंतःकरण, संकल्पात्मक मन, निश्चयात्मक बुद्धी, अनुसंधान करणारे चित्त व मीपणा असणारा अहंकार, ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये व प्राण मिळून लिंगदेह होतो (१) देह अधिष्ठान (२) अहंकार कर्ता, (३) इंद्रियसमूह कारण (४) वायू चेष्टा आणि (५) इंद्रिय देवता ही पंच एकत्र येऊन शुभाशुभ कर्मे घडते

'याप्रमाणे हा सर्व सृष्टिक्रम शास्त्रामध्ये वर्णन केलेला आहे हा सृष्टिक्रम सत्य आहे हा भ्रम घालवण्यासाठी अमानित्वादी गुणाची जोपासना करून गुरूला शरण जावे निष्काम बुद्धीने स्वधर्माचे पालन केल्याने ईश्वरी कृपा होऊन सद्गुरूची भेट होते गुरूची श्रद्धने सेवा केल्याने त्याचा अनुग्रह होऊन आत्मानात्म विचाराची प्राप्ती होते हे ज्ञान परोक्ष व अपरोक्ष असे दोन प्रकारचे असते गुरुमुखाने वेदान्ताचे तात्पर्य उपक्रमादी सहा लिंगानी समजून घेणे हे परोक्ष ज्ञान होय व श्रवण, मनन, निदिध्यासन व ध्यान याच्या योगाने अहं ब्रह्मास्मि हा अनुभव घेणे हे अपरोक्ष ज्ञान होय शब्दज्ञान हे परोक्ष आहे व आत्मा हा अपरोक्ष आहे यामुळे तो ध्यानानेच जाणता येतो

'उपक्रमोपसंहार, अभ्यास, अपूर्वता, फल, अर्थवाद, उपपत्ती ही श्रवणादी सहा लिंगे आहेत हे जग पूर्वी सद्रूप व अद्वितीय होते, हा उपक्रम ते ब्रह्मात्मक आपलेच रूप असून आत्माच एक आहे, हा उपसंहार अभ्यास– (१) शरीराचे कारण अन्न, अन्नाचे जल, जलाचे तेज व तेजाचे ब्रह्म, हा एकच अभ्यास (२) सर्व नद्या समुद्रास मिळाल्यावर भिन्न नामरूपानी उरत नाहीत, त्याप्रमाणे ज्ञानाने जीव ब्रह्मात लीन झाल्यावर भिन्नतेने रहात नाहीत (३) मधुकरानी निरनिराळ्या पुष्पातील रस एकत्र केलेल्या मधात ती रसभिन्नता उरत नाही त्याप्रमाणे ब्रह्मीभूत जीवाचे वैशिष्ट्य ओळखू येत नाही (४) वडाच्या फळातील बीज अति सूक्ष्म असते त्याचा ऋतु-क्षेत्र जल याच्या साह्याने मोठा वृक्ष बनतो त्याप्रमाणे जगत्कारण सूक्ष्म असले तरी कालदैवादी योगाने त्याचे हे अमर्याद जग बनते (५) किंवा समुद्रातूनच निघालेले मीठ पुन्हा आपले नामरूप सोडून देते, त्याप्रमाणे जीवब्रह्मैक्यात जीवाचे नामरूप उरत नाही (६) झाडाची फांदी तोडली तर ती निर्जीव होते त्याप्रमाणे शरीराने जीवाला सोडले तर शरीर नाश पावते जीव नाश पावत नाही कारण जीव हा ब्रह्मरूप असल्यामुळे त्यास जन्ममरण नाही (७) एखाद्याला डोळे बांधून दूर कोठे चोरानी पळविला व त्याचे जवळचे द्रव्य काढून त्याला दूर अरण्यात नेल्यावर डोळे उघडून सोडून दिला, तर त्याला एखादा मार्गदर्शक ज्याप्रमाणे त्याच्या घरच्या वाटेला लावतो, त्याप्रमाणे षड्रिपूनी या जीवाला डोळे बांधून या भवाटवीत सोडून दिला आहे, त्यास मार्गदर्शक गुरूची फार गरज आहे (८) मनुष्याच्या अंत काळी ज्याप्रमाणे इंद्रिये मनात, मन प्राणात, प्राण तेजात, तेज परदेवतेत लीन होत जाते, त्याचप्रमाणे लयाभ्यास करावा (९) ज्याप्रमाणे चोरीचा खोटा आळ आला असता, तापलेला शूळ हाती धरला तरी तो जाळीत नाही, असे दिव्य होऊ शकते, त्याप्रमाणे जो निरभिमानी व अलिप्त त्यास यमदंड बाधा करू शकत नाही याप्रमाणे 'ते तू ब्रह्म आहेस,' हे अभ्यासाचे दुसरे लिंग होय ब्रह्म हे अतींद्रिय आहे, म्हणून ते प्रमाणाचा विषय होऊच शकत नाही ते निरंकुश आहे म्हणून अनुमानगम्य नाही ते केवळ वेदान्तवाक्यानेच जाणावयाचे आहे, म्हणून आप्तवाक्य हे तिसरे लिंग होय विज्ञानानंतर प्रारब्ध सरल्यावर विदेहकैवल्यात येते ते चौथे लिंग जाणावे (१) उत्पत्ती (२) स्थिती (३) प्रलय (४) (जीवरूपाने ब्रह्माचा शरीरात) प्रवेश (५) ब्रम्हयानेच सर्वांचे (नियमन) (६) तत्त्वपदार्थशोधनाचे रहस्य ब्रम्हच, (७) ब्रह्मज्ञानाचे फळ निर्वाण याप्रमाणे सात अर्थवाद हेच पाचवे

लिंग समजावे घट उत्पन्न होण्याचे पूर्वी मध्ये व अंती एक मातीच खरी तिला आकार आला म्हणजे नाम येते परंतु मृत्तिका हीच सत्य ही उत्पत्ती हे श्रवणाचे सहावे लिंग होय अशा रीतीने श्रवण करावे

'जीवब्रह्माचे ऐक्य' प्रतिपादन करणारे जे 'तत्त्वमसि' हे उपनिषद्वाक्य तेच महावाक्य होय याच महावाक्याचे विवरण आरुणि यानी छंदोग्योपनिषदात केले आहे या तत्-त्वम् असि महावाक्यात तत् या पदाने परब्रह्म विवक्षित व त्वम् या पदाने प्रत्यक् ब्रह्म विवक्षित आहे देहाहून निराळा, अंतःकरण व त्याच्या वृत्तींना पाहाणारा, स्वतः अलिप्त राहून बुध्यादिकाना खेळवणारा जो आत्मा, तो त्वम्पदाने लक्षित आहे व सच्चिदानद-स्वरूप असा परमात्मा तत्-पदाने लक्षित आहे सर्वज्ञता-परोक्षत्वादी-विशिष्ट चैतन्य तत्पदाने व किंचिज्ञता अपरोक्षादी विशिष्ट चैतन्य त्वम्पदाने वाच्य असता या दोहोंचे ऐक्य कसे होईल असे म्हणशील, तर तत् या पदातील परोक्षत्वादि-वैशिष्ट्य व त्वम्-पदातील अपरोक्षादि-वैशिष्ट्य या विरुद्धाशाचा त्याग केल्यानतर या दोन्ही पदात अखड चैतन्यच लक्ष्य असल्यामुळे त्याचे ऐक्य सभवते यामध्ये एका अशाचा त्याग करून उरलेल्याचा स्वीकार केल्यामुळे याला जहदजहल्लक्षणा म्हणतात योगाभ्यासाने मन स्थिर करून मी ते ब्रह्म आहे किंवा ते ब्रह्म मी आहे, असे ध्यान केल्याने स्वस्वरूपाचा अनुभव येतो

'आता योगाचे निरूपण करतो [ १ ] यम (१) अहिंसा (२) अस्तेय, (३), दया, (४) ब्रह्मचर्य, (५) सरळपणा, (६) क्षमा, (७) निर्विकारता, (८) मिताहार (९) शुचिर्भूतता, (१०) ध्यान [ २ ] नियम (३) देह शोषण-तप (४) संतोष, (५) आस्तिक्य, (६) श्रवण, (७) दान, (८) पूजन-कृष्णार्पण, (७) श्रद्धा,-वेदोक्त कर्मी प्रीती, (८) कुकर्मी लज्जा, (९) व्रत-उपवास, (१०) गुरूपदिष्ट मंत्राभ्यास जप-वाचिक अधम, उपाशु मध्यम, मानसिक उत्तम [ ३ ] आसन ( स्वस्तिकासन, पद्मासन, सिद्धासन इ ) [ ४ ] प्राणायाम [ ५ ] प्रत्याहार-इंद्रिय-सयमन, [ ६ ] धारणा-सगुण निर्गुण, [ ७ ] ध्यान आणि [ ८ ] समाधी अशी योगाची आठ अंगे आहेत. जेथे कोणापासूनही उपद्रव होत नाही, अशा एकात व पवित्र स्थळी, पाषाण, अग्नी व जल यांच्यापासून दूर ठिकाणी दर्भावर कृष्णाजिन घालून त्यावर बसून ध्यानाचा अभ्यास करावा मन निश्चळ झाले, म्हणजे प्रथम ते सगुणावर एकाग्र करावे, ध्येयापासून मन प्रचलित झाले, तरी धीर न सोडता ते अभ्यासाने पुन्हा त्या ठिकाणी एकाग्र करावे लयविक्षेपादी विघ्ना-पासून सावध राहून ध्यान करता करता, निर्वात जागेतील दीपशिखेप्रमाणे, मन अखड चैतन्यावर एकाग्र झाले असता हळूहळू ध्याता, ध्येय व ध्यान ही त्रिपुटी लय पावून मन चैतन्यस्वरूप होऊन जाते तेव्हा त्या स्थितीला निर्विकल्प समाधी म्हणतात अशा रीतीने मायेचे आवरण दूर झाल्यावर घट फुटल्यावर ज्याप्रमाणे घटाकाश महाकाशात विरून जाते, त्याप्रमाणे आत्मा अखड चैतन्यात मिसळून जातो अधकारात घट पाहणे झाल्यास त्यास दिवा आणि नेत्र दोन लागतात पण दिवाच पाहाणे असल्यास नेत्र पुरेसे होतात त्याप्रमाणे आत्मस्वयप्रकाश असल्यामुळे त्याच्या आड आलेल्या त्या अज्ञानाचा नाश करण्यास एक बुद्धिवृत्ती पुरेशी होते त्या बुद्धिवृत्तीला श्रवणादिक हेच पोषक आहेत उन्हाने ज्याप्रमाणे कापूस जळत नाही, पण सूर्यकांत मध्ये धरताच जळून जातो, त्याप्रमाणे सामान्य ज्ञान हे अज्ञान-निवारक असून 'मी ब्रह्म' असे वृत्तिज्ञान अज्ञानाचे नाशक होते '

# अलर्काला उपदेश

श्रीदत्तमाहात्म्याच्या पंचविसाव्या अध्याया-पासून अलर्काचे आख्यान सुरू झाले आहे ऋतुध्वज व मदालसा याचा पुत्र अलर्क असून तो फार पराक्रमी होता त्याची आई मदालसा ही ब्रह्मज्ञानी व दत्तभक्त असल्याने ती आपल्या मुलाना नित्य ब्रह्मोपदेश करी त्यामुळे मुले विरक्त होऊन रानावनात तपासाठी निघून गेली अलर्क हा तत्त्वप्राप्तीचा शोध घेता घेता सह्याद्री-वरील रेणुकाश्रमात आल्यावर त्याला दत्तप्रभूचे दर्शन घडले जिज्ञासू अलर्काने त्याना जे प्रश्न केले त्याचीही उत्तरे दत्तानी दिली कर्मयोग, अष्टागयोग, नाना सिद्धी, चित्तनिश्चलतेसाठी सात धारणा, अष्टमहासिद्धी, ध्यान व समाधी, योगाभ्यास, नादाभ्यास, प्रणवोपासना, मृत्यु-लक्षणवर्णन, प्राणोत्क्रमणविचार व प्रकार; अशा अनेक बाबतीत दत्तात्रेयानी अलर्कास उपदेश केला तत्त्वज्ञान, मन शाती व वासनाक्षय अशा तीन कारणानी मुक्ती सपादिता येते. स्वत च्या वर्णास अनुसरून उचित असे कर्म केल्यास मन शुद्ध व पवित्र बनते वेदान्ताचे श्रवण, मनन व निदिध्यास याच्या साहृयाने वासनाचा क्षय करता येतो

दत्तानी अभ्यासाचे गुणदोष विवरून सागितले अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्तिसिद्धी ईशत्वसिद्धी, वशितासिद्धी इत्यादी सिद्धीच्या फलाचे विवरण करून दत्तात्रेयानी योगी पुरुषाच्या आचाराविषयीही निरूपण केले आहे ज्या विष्णूच्या स्वरूपाचे ध्यान योगी करतो त्याचे स्वरूप वर्णन करताना दत्तात्रेय म्हणतात, 'अलर्का, विष्णू विराट् पुरुष असून त्याला हजारो पाय, हजारो हात, हजारो नेत्र, हजारो मस्तके आहेत. त्याच्या पोटात अखिल ब्रह्माड मावते. त्याच्या ठिकाणी अखड आनदाची व तेजाची वस्ती आहे. सर्व प्राणिमात्र नाडीस्वरूप असून अतलादी सप्त पाताळानी पावले, पिढरी, गुल्फ, जघा, जानु, माडी व कटिप्रदेश अशी रूपे धारण केली आहेत भूलोकादी सप्त लोक म्हणजे नाभी, उदर, हृदय, कठ, मुख, भाल व मस्तक असून जड वातावरण म्हणजे त्याचे प्राण होत पृथ्वी हा त्याचा देह. या महात् देहाचे दात म्हणजे नक्षत्रे असून माया म्हणजे त्याचेच हास्य होय याचे नेत्र म्हणजे दिशा, कूस म्हणजे समुद्र, नद्या म्हणजे नीला रोहिणी, केस म्हणजे औषधी झुडपे, रेतस म्हणजे पाऊस, सपत्ती म्हणजे पर्वत, सामर्थ्य म्हणजे हात, दिशा, वायू सूर्य, वरुण व अश्विनीकुमार म्हणजे त्याची श्रवणादी इद्रिये होत अग्नी, इद्र, अच्युत, नियती व प्रजापती ही त्याची कर्मेंद्रिये चद्र हे त्याचे मन व नारायण हे त्याचे चित्त. बुद्धी, अहकार यानी बृहस्पती व रुद्र याची रूपे घेतली विश्वेश्वर ही त्याची ध्यानमूर्ती होय. दत्तकृत विराट् विष्णुस्वरूपाचे हे वर्णन वेदोक्त पुरुषसूक्तास समातर आहे या विष्णुस्वरूपाचे महत्त्व गाताना वासुदेवा-नदसरस्वती दत्तप्रभूच्या मुखातून पुढीलप्रमाणे लिहितात

'ज्या ध्याता ये महोत्सव ।
ज्याचा वाचक प्रणव ।
तयाचे तीन अवयव ।
अकार उकार मकार ॥

ह्या मात्रा तीन ।
ऋषी देवादि जाणून ।
करावे तयाचे ध्यान ।
पापा जाळून टाकीजे ॥

एकाती बसून ।
घालून दृढासन ।
दीर्घ उच्चार करून ।
भावे प्रणव जपावा ॥

अकार उकार मकार ।
ह्या तीन मात्रा निर्धार ।

जिचा नोहे उच्चार ।
सूक्ष्मतर अर्धमात्रा ती ॥
ही मात्रा योगी जाणती ।
जसी भृंगीची गती ।
तसी मस्तकीं ती ।
घुमे सूक्ष्म गतीनें ॥
ही गांधारस्वरासम ।
म्हणूनी गांधारी हें नाम ।
इला देती योगी परम ।
ही विश्राम दे जीवा ॥'
( श्रीदत्तमाहात्म्य : ३५.४६-५१ )

योगाचा अभ्यास करणाऱ्याने मृत्युलक्षणांचा विचार कसा करावा याचेही दिग्दर्शन या अध्यायात आहे. पुढला सबंध छत्तिसावा अध्याय मृत्युलक्षणांचा आहे. मृत्युदर्शनाच्या काही शकुनात्मक खुणाही येथे प्रकट झाल्या आहेत. दत्तगुरूंच्या या उपदेशामुळे 'मदालसेचा लेंक । हृष्ट होऊन अलर्क । म्हणे चित्तीं ज्ञानार्क । उदित केला ॥' अशी अवस्था झाली. 'हें जग ईश्वराहून । नसे भिन्न निश्चयें ॥' अशी अलर्काच्या मनाची खात्री झाली. दोघांनी एकमेकांना आलिंगन दिले. 'गुरूनें देतां आलिंगन । अंगीं रोमांच उठून । प्रेमें गळा दाटून । आले नयन भरूनी ॥ देहभाव हरपून । राजा निश्चळ होऊन । बाह्याभ्यंतरभान । दे सोडून तत्क्षणीं ॥ ज्या सुखा नाही मिती । योग्या न ठावी जी स्थिती । प्रेमळ भक्ताची स्थिती । ती गती अनिर्वाच्य ॥' (३७:४५-४७) असा हा गुरुभक्तांच्या कृपेचा, भेटीचा व मीलनाचा आनंद तत्त्वबोधानंतर श्रीदत्तमाहात्म्यकारांनी वर्णन केला आहे. संतुष्ट झालेल्या अलर्काने श्रीदत्तप्रभूंची जी स्तुती केलेली आहे तीवरूनही दत्तबोधाचे रहस्य प्रकट होण्यासारखे आहे. अलर्काने म्हटले आहे;

तूं सर्वकारण सर्वाधार ।
स्वेच्छेनें झालासी नराकार ।
असरी स्वेच्छाचार ।
वाङ्मनोदूर रूप तुझें ॥ (३७-८१)

जंव भ्रम होता । तंव जगाची सत्यता ।
वाटली ती आतां ।
तव प्रसादें नासली ॥ (३७-८७)

तुझी दृष्टी पडता ।
धन्य झालों आतां ।
हरपली जीवता ।
ब्रह्मता अंगी आली ॥ (३७-८८)

तूं ब्रह्म साक्षात ।
मला दिली प्रचीत ।
अभेदें कळलें अद्वैत ।
झालें शांत मीतूंपण ॥ (३७-८९)

तरी व्हावें भजन ।
म्हणून मार्झे मन ।
विकल्प मानून ।
हें भजन चालवी ॥ (३७-९०)

अतएव मानी देव ॥
मी जीव तूं शिव ।
मी भक्त तूं देव ।
भक्तिभाव हा असा (३७-९१)

जो तूं मायाधीश ।
सर्वेंद्रियांचा ईश ।
तूंचि विज्ञानेश ।
तो तूं अनीश भाससी ॥ (३७-१०१)

असी ही तुझी लीला ।
न कळे ब्रह्मादिकांला ।
हे अनंत लोकपाला ।
असो तुला नमस्कार ॥ (३७-१०२)

आमुचा तूं मोक्ष ।
हा तूं समक्ष ।
वेद म्हणे ज्या परोक्ष ।
तो तूं अपरोक्ष आम्हांसी ॥ (३७-१०३)

# आयुराजास भक्तितत्त्वाचा बोध

श्रीदत्तमाहात्म्याच्या एकोणचाळिसाव्या अध्यायापासून आयुराजाचे आख्यान सुरू झाले आहे. पुरुरवा व उर्वशी यांचा मुलगा आयुराजा धर्मशील वृत्तीचा होता अपत्यसुखासाठी तो दत्तगुरूंचा शोध घेत घेत सह्याद्रीजवळ आला. या पर्वतावर सिद्धासन घातलेल्या दत्तप्रभूंचे दर्शन त्याला झाले. दत्तगुरूंनी त्याला प्रसन्न होऊन नवविधा भक्तीचे स्वरूप विशद करून सांगितले. स्मरण, कीर्तन, श्रवण, सेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन अशा नऊ प्रकारच्या भक्तीचे विवरण दत्तगुरूंनी केले. दत्तसंप्रदायाच्या तत्त्वज्ञानात या नवविधा भक्तीसही फारच महत्त्वाचे स्थान आहे. ज्ञान झाले की मुक्ती मिळते हे खरे असले तरी ज्ञान प्राप्त होण्याची खाण भक्तीच असल्याचे हा संप्रदाय सांगतो. 'भक्ती ज्ञानाची माउली। करी कृपेची साउली। जिणें नामरूपा आणिली। ब्रह्ममूर्ती भली अनायासें ॥' ( श्रीदत्तमाहात्म्य : १-१७ ) अशी या पंथीय ग्रंथाची श्रद्धा असल्याचे आपण मागे पाहिले आहेच. पहिल्या अध्यायातील नवविधा भक्तीचे वर्णन या संदर्भात अतिशय महत्त्वाचे आहे.

आयुराजास उपदेश करताना त्रेचाळिसाव्या अध्यायात दत्तांनी अर्थी, आर्त, मुमुक्षू व मुक्त असे भक्तांचे चार प्रकार सांगून त्यांची लक्षणेही सांगितली आहेत. मुक्तीचे नाना उपाय केले तरी भक्ती हा सुलभ व खास उपाय असल्याचे सांगताना दत्तप्रभू म्हणतात,

जे नानोपाय मुक्तीचे ।
ते सर्व कष्टाचे ।
सुलभ साधन भक्तीचे ।
हें सुखाचें साधन ॥

सुमती मग तो जरी ।
दैवयोगें पडे तरी ।
ईश्वर खास तयावरी ।
कृपा करी सर्वथा ॥

हे महत्त्व भगवद्भक्तीचें ।
पतन न होऊं दे भक्तांचें ।
दुर्वर्तन जें पूर्वीचें ।
तेंही तयाचें पालटी ॥

दुष्ट वासना ज्या असती ।
त्याही नष्ट होती ।
उत्तरोत्तर ये शांती ।
जडे विरक्ती अनुक्रमें ॥ (४३:२६-२९)

या दत्तप्रभूंनीच नारदाकरवीही आयुराजाला भक्तीचा उपदेश केला. दत्तकृपेनेच नारदाची फेरी झाली म्हणून मनाची भ्रांती फिटली असे राजाला वाटले व त्याने तत्त्वबोधाच्या भूमिकेवरून दत्तप्रभूंची स्तुती केली—

जय भगवंता दत्ता ।
पुरुषोत्तमा अनंता ।
अधोक्षजा तूंचि कर्ता ।
भर्ता संहर्ता विभु तूं ॥

गुणत्रय नियात्मक ।
भाससी तू ज्ञानशक्तिक ।
नाना रूप नायक ।
मायीकसा दिससी तूं ॥

तूं शंकर संहारक ।
तू ब्रह्मांड उत्पादक ।
तू विष्णू जगत्पालक ।
तूंचि एक अनेक होसी ॥

अपर्णेश्वरा लक्ष्मीवरा ।
सावित्रीहृदयसंचारा ॥
तुज नमो सर्वाधारा ।
परात्परा सगुणरूपा ( ४३

# चोवीस गुरूंपासून बोध

दत्तपंथीयांच्या तत्त्वज्ञानाचे स्वरूप समजावून घेण्यासाठी त्यांचे गुरुतत्त्व ध्यानात घ्यावयास हवे. या गुरुतत्त्वाची ओळख करून घेण्यापूर्वी दत्तप्रभूंनी केलेल्या २४ गुरूंची ओळख त्यांच्या गुणसामग्रीसह करून घेऊ. आपल्या २४ गुरूंची सविस्तर हकीकत दत्तप्रभूंनी यदुराजास निवेदन केली आहे. भागवताच्या एकादशस्कंधात व एकनाथी भागवताच्या ७, ८ व ९ या अध्यायांत हा यदु-अवधूत सवाद आला आहे. ' संकल्पविकल्परहित । शुद्ध सर्वांगी विभूत । यालागीं बोलिजे 'अवधूत ॥ ' किंवा ' अहं धुई तो ' अवधूत ' अशी अवधूताची लक्षणे एकनाथांनी येथे सांगितली आहेत. ' गुरुविण आत्मप्राप्ती । सर्वथा न घडे गा नृपती ॥' असा या संप्रदायाचा सिद्धान्त आहे. 'जे जे सद्‌गुण म्यां देखिले भूतीं ॥ ते ते स्थिती तो गुरु ॥' अशी गुरूची सद्‌गुणवाचक व्याख्या दत्तपंथीयांत दिसते. ' जो जो ज्याचा घेतला गुण । तो तो गुरु म्यां केला जाण । ' अशी व्यापक कल्पना या गुरुतत्त्वापाशी आहे. जो गुण ज्यापासून घेतला तो गुरु झाला; पण जो गुण ज्यापासून त्यागला तोही गुरु झाला, हेही ध्यानात ठेवण्यासारखे आहे. ' ज्याचा गुण घेतला । तो सहजें गुरुत्वा आला । ज्याचा गुण त्यागरूपें घेतला । गुरु झाला अहित त्यागें ॥' (एकनाथी भागवत : ७.३४२ ) अशा प्रकारे ' गुरुत्व आलें जगासी । हेंचि साधन जयापासीं । तोचि परमार्थासी साधकु ॥' असा या पंथाचा सिद्धान्त आहे.

देवयानी ही शुक्राचार्यांची कन्या. तिचा पती ययाती. यांचा ज्येष्ठ पुत्र म्हणजे यदुराजा. शर्मिष्ठेच्या मुलाला म्हणजे पुरुरव्याला राज्य गेल्यामुळे यदुराजा कष्टी झाला. वैराग्यप्राप्तीसाठी रानावनात भटकत असताना त्याने श्रीदत्तप्रभूंची आराधना केली. येथून पुढचे सारे आख्यान श्रीवासुदेवानंदसरस्वतींनी आपल्या 'श्रीदत्तमाहात्म्य' या ग्रंथात अध्याय ४६ पासून ५० पर्यंत विस्ताराने निवेदन केले आहे. दत्तपंथीयांत या अवधूतआख्यानास व २४ गुरूंच्या माहात्म्यास तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनेही बरेच महत्त्व आहे. वैराग्यसंपन्न यदुराजा कसा होता ? ' तो होता दत्तार्चक । त्याला होता विवेक । दत्त म्हणे हा सम्यक । ज्ञानाधिकारी जाहला ॥ ' ( श्रीदत्त माहात्म्य : ४६.५७ ) या यदुराजाला 'स्वात्मैक रहस्य ' सांगावें म्हणून दत्तात्रेय अवधूतरूपाने प्रकट झाले. या अवधूताची दिव्य मूर्ती पाहाताच यदूने त्यास विचारले, 'या घोर वनात तुम्ही कोण आहात ? तुमचा योगक्षेम कसा होतो ? चिरकाल अशा स्वरूपात तुमचे अंत.करण समाधानी कसे दिसते ? ' ' जगांत पाहतां जागो जाग । कामक्रोधलोभ आग । पेटतां हें तुझें आंग । सांग कसें न भाजलें ? ॥ सर्वत्र तूं उदासीन । संपत्तीकडे न देसी मन । जीविताची पर्वा सोडून । कीर्तीची गरज न ठेविसी ॥ जगीं कोणी ज्ञानहीन । कोणी शक्ती नसोन । कोणी निपुणता नसून । राहती वसून अकर्तृत्वें ॥....मोहशोकाग्नी सोडून । निराशपणें राहून । स्त्रीपुत्रादि नसून । आनंदघन कसा होसी ?' ( ४६ : ६६.७२ ) यदुराजाचे हे प्रश्न ऐकून अवधूत हसून म्हणाले, ' मला लाधलें तत्त्वज्ञान । तेणें असा होऊन राहिलों ॥ हें तत्त्वज्ञान जाण । म्यां चोवीस गुरूंपासून । यत्नें केले संपादन । तें सांगेन तुज आतां ॥ ' ( ४६ : ७५.७६ ) यदुराजास आपल्या ज्ञानाचे व बोधाचे मर्म सागताना अवधूत म्हणाले,

> ज्याचें मनन करितां । ब्रह्म उमजे तत्त्वतां ।
> निदिध्यासन करितां । साक्षात्कार होईल ॥
> हा मनुष्यासच विचार । घडतसे साचार ॥
> शरीरें जी इतर । आहारविहार घेण्याचीं
> येथें परमात्मा उघड । अन्यत्र अवघड ।'
> येथें प्रज्ञानाचें बिन्हाड । असे दृढ ज

अवश्य नरदेही जाण । मिळविजे विज्ञान ।
शास्त्रानुमानें करून । ये कळून सर्वही ॥
जे अंतःकरणा विदित । तें ब्रह्म निश्चित ।
वृत्तिज्ञानें होई विदित । जेणें मुक्त होई नर ॥

चौवीस गुरूंपासून । हेयोपादेय लक्षण ।
( हेय-टाकण्याचा उपादेय–घेण्याचा )

घेतलें मी तत्त्वज्ञान । तेणें मन शांत झालें ॥
( ४६.७७-८२ )

काही गुण घेणे व काही टाकणे अशा दोनही वृत्तीतून गुणसंपदा जतन करण्यात आली आहे. अशा पद्धतीने अवधूतानी जे २४ गुरू केले ते त्यांनी यदुराजास सांगितले.

अनुक्रमें करून ।
सांगतों तत्त्वज्ञान ।
पहिला गुरु पृथ्वी जाण ।
दुसरा पवन तो गुरु ॥
हें व्योम तिसरा गुरु ।
चौथा उदक गुरु ।
पांचवा जाण अग्नि गुरु ।
सहावा गुरु चंद्रमा ॥
सूर्य कालात्मा सातवा गुरु ।
कपोत आठवा गुरु ।
नववा अजगर गुरु ।
दहावा गुरु समुद्र ॥
तो होय अकरावा गुरु पतंग ।
बारावा गुरु भृंग ।
तेरावा गुरु मातंग ।
मधुहा (मधमाशी) गुरु चौदावा ।
मृग मम गुरु पंधरावा ।
मत्स्य गुरु सोळावा ।
पिंगळा वेश्या गुरु सत्रावा ।
गुरु अठरावा कुरर ( टिटवी ) ॥
जे तीव्र मानापमान चिंता ।
तत्परिहारार्थ करितां ।
बालक गुरु तत्त्वता ।
हा आतां एकुणिसावा ॥
कंकण कुमारीचें विसावा गुरु ।
एकविसावा सर्प गुरु ॥
बाविसावा गुरु ।
शरकार (बाण करणारा) जाण तूं ॥
मम गुरु तेविसावा ।
पेशस्कार ( कुंभारीण ) जाणावा ।
कोळी गुरु चोविसावा ।
ज्ञानार्णवा घे यापासुनी ॥
त्यांत स्नान करून ।
सर्व पाप धुवून ।
ज्ञानसंपन्न होवून ।
मी भय सोडून पडें येथें ॥
मी ह्या विवेकें संपन्न ।
झालों असें म्हणून ।
सर्व तळमळ जाऊन ।
आनंदें भरून राहिलों येथें ॥
निजरंगें रंगून ।
मी सर्वदा असें म्हणून ।
सुखदुःखाचें स्फुरण ।
नसे जाण सर्वथा मला ॥
नित्य शुद्ध बुद्ध मुक्त ।
मी असे योगयुक्त ।
केलें सर्व परित्यक्त ।
असे असक्त सर्वत्र ॥' ( ४६.८७-९८ )

अवधूतांनी आपल्या चोवीस गुरुंची नामावली सांगून इतके गुरू करण्यातील रहस्यही यदूस विशद केले. त्यानंतर यदूच्या विनंतीवरून कोणापासून कोणता गुण घेतला वा त्यागला याचेही विस्ताराने वर्णन अवधूतांनी केले आहे. अवधूतांचा पहिला गुरु पृथ्वी असून क्षमा, शांती हा गुण त्यांनी पृथ्वीपासून घेतला. 'उपरि जावया शिडी जशी । सहनशीलता तशी । पाहिजे मुमुक्षूसी । हें भूमीपाशीं शिकलों मी ॥ जेंवी भूमीवरी नर ।

टाकिती मळमूत्र । थुंकिती तरी त्यावर । न होतां क्रूर क्षमा करी ॥ ' (४७.३-४) पृथ्वी नेहमीच क्षमाशील असते. ती आपल्या लेकरांवर कधीच रागावत नाही. 'सर्वथा मी मातेपरी । दे जीव परोपरी । यांही कांही केलें तरी । म्यां अंतरीं तें न धरावें ॥ पोरा तनूवरी धरूनी । दूध पाजितां लालांनी । मारितां तया जननी । न ह्मणी सर्वथा ॥ जरी थान देतां बाळ । अंगावरी मूत्रमळ । टाकी तरी माता तत्काळ । तया न दे गाळ न मारी ॥' (४७.१०-११) या मातेच्या क्षमाशील वृत्तीचे दर्शन पृथ्वीत होते. 'हो क्षमा ज्याचे पदरीं । त्याला ब्रह्मांडोदरीं । कोणी न दिसती वैरी । ' या क्षमावृत्तीसाठीच पृथ्वी गुरू बनली. पृथ्वी-वरील पर्वत, वृक्ष, जमीन इत्यादीही अवधूतांना गुरुस्वरूप झाले. या पृथ्वीवरील वृक्ष कसे परोप-कारी असतात ! 'नित्य प्रसन्न असती । जरी पराधीन असती । तरी परोपकार करिती । वृक्ष-जाती आमरणांत ॥ पक्षी विविध येऊन । वरी राहती बसून । कित्येक घरें करून । राहती तयां न निवारती ॥ भयशंका न धरिती । शीत उष्ण सोशिती । जरी पशु पाला खाती । तरी न होती वृक्ष दु:खी ॥ तोडिती कोणी कोणी उपटती । कोणी मुळ्या काढिती कोणी साल काढिती । कोणी तोडिती फुलें ॥ कित्येक पाला नेती । कित्येक फळें तोडिती । कित्येक चीक नेती । डाळ्या तोडिती किती एक ॥' (४७.२८-३२) असे दु:ख सहन करून वृक्ष सतत परोप-कारच करीत असतात. वृक्षाचा संहार झाला तरी त्याचा उपयोग आपणांस विविध प्रकारांनी होतो. पृथ्वीवरील पर्वतापासूनही खूप शिकण्या-सारखे आहे. 'पोटीं सर्व संग्रह करून । परोप-कारार्थ ठेवावा । मोठ्या मोठ्या खाणी रत्नाच्या । पोटीं असती पर्वताच्या । त्यापासून लोकांचा । उपयोग बरा होतसे ॥ ' (४७.४६-४७) पर्वताचाही माणसास किती उपयोग होतो ! नाना रत्ने, वारा, पाणी, नद्या, गुहा, वनसृष्टी यांचा लाभ आपणांस पर्वतामुळेच होतो.

अवधूत दत्तात्रेयांनी दुसरा गुरू केला तो वायू होय. कोणत्याही बाबतीत वायू आसक्त असत नाही. 'हें बहु मिष्ट असे । हें अन्न गोड तसे । हें अन्न विरस असे । कदापि प्राण असें न विचारी ॥ जें चर्वित अन्न । मिळे तें सेवून । आपुला व्यापार चालवून । राहे प्रसन्न प्राणवायू ॥' (४७.५९-६०) अशी निर्लेपता योग्याच्या मनास असते आणि विषयांचा संबंध आपोआप सुटावा. 'विषया सर्वथैव टाकावें । असेंही स्वयें न करावें । आपोआप तें सुटावें । तरीच बरवें वैराग्य ॥ ' (४७.६९) ममता, असंगती, अभेदता, निर्मळता हे गुण तिसऱ्या गुरूपासून म्हणजे आकाशापासून अवधूतांनी घेतले. 'भूपा यदाकदाचित । काल कर्म गुणांचे विभाग होत । तेधवा अकस्मात । देह नासत असे हा ॥ समस्त देह मेले तरी । आत्मा न मरे मारी । तो आकाशाचे परी । निर्विकारी व्यापक एका ॥ ' (४७.९२-९३) 'जरी अचळ आकाश असे । तरी घडयाबरोबर जसें । चाल-तसे असें भासे । परी नसे तसें तें ॥ तो जेवि अचळ । आत्मा जसा निश्चळ । देह चालेल तरी अढळ । जो केवळ अकंद ॥ ' (४७.१००-१०१) या आकाशाप्रमाणेच आत्मा अखंड व अविनाशी आहे. हा बोध आकाशापासून मिळतो- 'फुटे मृत्तिकेचा पिंड । तेवी मरतां देहपिंड । आत्मा न मरे जो सुदृढ । तो अखंड अज सदैव ॥ ' (४७.१०४) हा अमरत्वाचा, अखंडत्वाचा संदेश आकाश देत असते. आकाश कधी मलिन होत नाही, वितळून जात नाही, भिजत नाही की वाऱ्यावरोबर उडून जात नाही. आत्म्याचे स्वरूप असेच आहे. आकाशात वीज चमकून गेली तरी तिची बाधा आकाशास नसते. आत्मा असाच निर्लेप असतो.

दत्तअवधूतांचा चौथा गुरू जल अथवा पाणी होय. पाणी अत्यंत निर्मल, मधुर, पवित्र असते. आपले अंत:करण पाण्यासारखे स्वच्छ व निर्मळ

असावे. ' स्वच्छ असावें उदकापरी ।। नित्य या जगीं सर्वांशीं । स्नेह ठेवावा दिवानिशी । कडू न व्हावें कोणासी । रहाटी अशी असावी ।। जे अमृतासम भाषण । ते परिमित बोलून । सर्वांशी गोडी ठेवून । अनुदिन वागावें ।। अमृतप्राय गोड बोलता । सर्व वळती तत्त्वतां । उदकाला गुरु करितां । ये हातां हा गुण ।। ' ( ४८. १–४ ) पाण्याची ही अमृतप्राय निर्मळता व स्वच्छता अवधूतांना गुरुस्थानी वाटली. पुनः पाणी सर्वांना समान असते. याला गोड, त्याला कडू, अशी भावना त्याची नसते. पाण्याचा थेंब अंगावर शिंपडावा, त्याने आचमन करावे अथवा त्याने स्नान करावे. सर्व काही पवित्र होऊन जाते. किंवा कोणी घाणेरडे पदार्थ पाण्यात टाकले तरी पाणी पवित्रच राहाते. 'सर्व धंदे जळावर । लोक करिता वारंवार । परी तें न विटे साचार । तसा आचार नरें ठेवावा ।। ' (४८.९) इतकेच नव्हे तर, ' नरें प्रशस्तपणा धरून । जलाप्रमाणें राहून । स्वयें पवित्र असून । इतरां पवित्र करावें ।।' (४८. १२) या जळाचा विशेष गुण असा की, ' जळ पोटीं मळ ठेवून । बाहेर स्वच्छ असून । करी मळक्षालना इतरांचे ।। ' (४८. १३) पाचवा गुरू अग्नी असून वाईट, हीन, घाणेरडे जाळून टाकण्याचे कार्य अग्नी करीत असतो. तेजस्वीपणा हाही गुण अग्नीचाच आहे. 'तपें तेजस्वी असावें । लोकां प्रदीप्त दिसावें । पाहिजे तिकडे खावें । परी न शिवावें दोषासी ।।'(४८.२३) याच अग्नी-पासून उष्णता, प्रकाश यांची प्राप्ती होते. ' अग्नी इकडे तिकडे फिरून । पाहिजे तें खाऊन । पुनः सोंवळा राहून । सर्वांसमान वागतसें ।। ' (४८. २८) यजमानाच्या घरी अग्नी अहोरात्र राहून त्याची सेवा करतो. ' आहुती ज्या देवांची । देती तया ती पोंचवी ' हेही काम या अग्नीचेच आहे. ' अग्नी संग्रहही न करी । त्याला काष्ठादि मिळे तरी । जाळुनी त्याची राख करी । यापरी नरें वागावें ।। ' ( ४८.३५ ) अग्नीच्या योगें आत्म्याचेही काही गुण प्रकट होतात. ' अग्नी असे निराकार । काष्ठ मिळतां तदाकार । दिसे तसा हा साकार । नाना शरीरयोगें आत्मा ।। ' (४८.४०)

दत्तप्रभूंनी सहावा गुरु केला तो चंद्र होय. चंद्राची क्षयवृद्धी होत असली तरी वस्तुतः चंद्र अविकारीच असतो. नाना प्रकारच्या वृत्तींमुळे सुखदु:खादी भावना निर्माण झाल्या तरी आत्मा निर्विकार असतो हे चंद्रापासून समजते. ' विकार नसे चंद्रमंडळा ' हे तत्त्व महत्त्वाचे. त्याचप्रमाणे ' आत्मा न होयी न वाढे न मरे । हे विकार सारे । भूपा जाण देहावर रे । चंद्रमंडळीं कळा जशा । ' (४८.६५) हा बोध चंद्रापासून घ्यावा. दत्ताचा सातवा गुरू सूर्य असून तो अल्प घेऊन पुष्कळ देतो. पृथ्वीवरील सर्व रस, समुद्रातील थोडे पाणी तो आपल्या किरणांनी शोषून घेतो आणि लक्षावधी धारांनी परत करून धरतीला तृप्त करतो. पुनः तो या पाण्याशी कधीच आसक्त होऊन रहात नाही. सूर्यबिंब पाण्यात पडले तर बिंबाचे सारे विकार सूर्याला वाटतात, पण सूर्य तत्त्वतः विकाररहितच आहे. ' जे जे विकार जळावर । ते ते प्रतिबिंबावर । भासती ते सूर्यावर । नसती हें सादर आण मनी ।। ' (४८.७६) सूर्या-पासून घेण्यासारखा आणखी एक गुण असा की, 'चराचर जगांत । जे दिसेल उपयुक्त । ते ठेवावें सुरक्षित । आपण आसक्त न होतां ।।' (४८.७९) पुढे इष्ट काळ येताच रक्षिलेले सर्व परोपकार-बुद्धीने सूर्य सर्व परतही करतो. 'समस्त संपले तरी ।। खेद न धरावा अंतरी ।। ' अशी त्याची वृत्ती असते. ' रागद्वेष सोडून । अनायासें अर्थ जोडून । यथाकाळी पात्री सोडून । अलिप्त होऊन रहावें ।।' (४८. ८२) हा महत्त्वाचा गुण सूर्यापासून अवधूत दत्तात्रेय शिकले. दत्तांचा आठवा गुरू कपोत पक्षी होय. अति स्नेहामुळे, आसक्तीमुळे विशेषतः स्त्रीच्या प्रेमामुळे कसा नाश होतो हे कपोतापासून शिकावे. काममोहित कपोताला

कपोतीशिवाय दुसरे जगच दिसत नाही. विषय-भोगाशिवाय त्याच्या चित्तात दुसरा विषयच नसतो. अति प्रेम, अति आसक्ती, बेभान वृत्ती शेवटी नाशाला करणीभूत होते हे या कपोत-कपोतीवरून समजते. विषयसेवनाने कधीच मन तृप्त होत नाही हे कपोतावरून समजावे. यासाठी कपोत–कपोती यांची एक कथाही सांगितली जाते. अतिरिक्त विषयसेवनाने हे जोडपे नाश पावले. 'विषयी जे शांत न होऊन। घरीं राहती परिवारीं रमून। कवडधापरी सहसा काळ येऊन। परिवारासह मारून ने तया॥' (४८. १०७) अशी अवस्था आपली न व्हावी म्हणून आपण कोठेही फार आसक्ती ठेवून वागू नये.

अजगर हा अवधूताचा नववा गुरू असून 'कल्याण किंवा अकल्याण। तें आपोआप ये घडून॥' हा संदेश अजगर देत असतो. सर्वांस प्रारब्ध कारणीभूत असल्याने आपण व्यर्थ खटपटी केल्यास आपत्तीच पदरी येते. 'हें सत्य मानून। व्यर्थ उद्योग करून। सुखार्थ आयुष्य न खर्चून। राहावें पडून अजगरापरीं॥' (४९.५) कष्ट करून, हाव धरून इंद्रियसुख घेणे शेवटी दुःख-दायकच असते. 'परतंत्र इंद्रियसुख। सर्वांसी समान देख। आदिअंतीं सर्वत्र दुःख। मध्यें हा सुखभासमात्र॥' (४९. ९) अशी या सुखाची अवस्था असते. म्हणून 'जीव जेथें वसे। तेथे दैवें तेंही मिळतसे। कळे असे अजगरापासून॥' (४९. १०) याकरता, 'मनी खंती न धरून। आर (अजगर) राहे पडून। तसें रहावें उदासीन। नित्य धरून अजगरवृत्ती॥' (४९.११) समुद्र हा दत्तात्रेयांचा दहावा गुरू असून गंभीरता, निर्मळता, आनंदी वृत्ती हे गुण या समुद्रापासून मी शिकलो असें अवधूत सांगतात. समुद्र आपल्या मर्यादेचे उल्लंघन करीत नाही, त्याप्रमाणे योगी गुरूची आज्ञा मोडीत नाही. हा समुद्र नित्य पूर्ण असतो. 'तो नित्य पूर्ण असून। वर्षाकाळी नद्या येऊन। मिळता न जाय फुटून। हर्षे वेळा सोडून बाहेर॥ विविध नद्या त्या ग्रीष्मी वाळती। समुद्रा न मिळती। तरी दुःखे वाळे न सरित्पती। ती रीती घ्यावी॥' (४९.२१-२२) योग्याच्या अंतःकरणा-प्रमाणेच समुद्राच्याही अंतरंगाचा ठाव लागत नाही. तो नेहमीच प्रसन्न असतो. 'सदा पूर्ण समुद्रापरी। प्रसन्नता दावावी बाहेरी। हें समुद्रा-पासून स्वीकारीं॥' असा अवधूतांचा संदेश आहे.

श्रीदत्तात्रेयांचा अकरावा गुरू पतंग हा असून पुरुषाच्या नाशाला स्त्रीसंग कसा आहे हे पतंगा-वरून समजते. 'जो न करी इंद्रियें स्वाधीन। स्त्रियांचे विलास लावण्य पाहून। जाई मोहित होऊन। पतंगासमान मरे तो॥' (४९ ३१) हाडामांसाचा एक गोळा म्हणजे स्त्री. तिच्या रूपावर इतके आसक्त झाल्यावर दिव्यावर झडप घालणाऱ्या पतंगाप्रमाणेच आपली स्थिती होणार. 'जो जाय नर भुलुनी। पाहता नवी रमणी। फडीं विलासिनी तरुणी। तो व्यर्थ मरून जाईल॥ वस्त्रें मणी सुवर्ण भूषण। टिळे टिक्के भांग सोडून। पाहता काय ये दिसून। प्रेतासमान जें असे॥' (४९.३३-३४) बारावा गुरू मधमाशी असून अतिसंग्रही वृत्तीनेच तिचा नाश होतो हे ध्यानी घ्यावे. धनाचा, संपत्तीचा लोभ धरल्याने हानीच होणार. धनसंग्रह झाला की चोर धन-वंतास ठार करून तो संग्रह चोरून नेतात. मधमाशा उंच उंच वृक्षांवर हिंडून मध गोळा करतात; स्वतः चाखीत नाहीत; इतरांना देत नाहीत. शेवटी 'यत्नें त्यां जाळून सर्वथा। लोक नेती तें मधु॥' (४९.४८) म्हणून निष्कर्ष असा की, 'तेव्हां जो सांठा करी। त्याचा उपयोग न करी। तो त्या साठ्याबरोबरी। खरोखरी नाश पावेल॥' (४९.४८) दत्तात्रेयांचा तेरावा गुरू गज म्हणजे हत्ती असून हत्तिणीमुळे तो कसा संकटात पडतो हे ध्यानी येते. हत्तिणीच्या संगतीत बेसावध असलेला हत्ती सापडला जातो. त्याला गुलामगिरी पत्करावी लागते. दत्तात्रेयांचा चौदावा गुरु भ्रमर असून तो फुलांना त्रास न

देता त्याच्यातील मध चाखतो. त्याचे मन किती निर्मल व कोमल ! तसाच हा योगी मनुष्य-कोणाला न दुखविता जे मिळेल त्यात समाधान मानून असतो

अवधूताचा पधरावा गुरु मृग किंवा हरिण असून संगीतामुळे, लोभामुळे कशी फसगत होते हे मृगावरून समजते. शिकारी माणसाच्या मंजुळ घंटेच्या नादाला हरिण मोहित होते; वेश्येच्या नादमाधुर्याला मनुष्य मोहित होऊन नाश पावतो. 'मृग तंत्रीवरी होता लीन। मृगयू ( पारधी ) त्याचें करी बंधन। त्यापासून घेतलें शिक्षण। नाद सोडून द्यावया॥' (४९.८८) भगवद्भक्ती-वीण गायन म्हणजे 'कोल्ह्याची ओरड' होय. ऋष्यशृंगमुनी असाच स्त्रियांच्या नृत्यादिकांत लुब्ध होऊन बद्ध झाला दत्तप्रभूचा सोळावा गुरु मत्स्य असून गळास लागलेल्या मासाच्या तुकड्याच्या लोभामुळे तो प्राणास मुकतो. जिभेवर ताबा ठेवणे अगत्याचे आहे. मत्स्य कसा असतो ? 'सत्वर गती जया असे। जो जळी धावतसे। धरिता हाता न येतसे।तो बद्ध होतसे जिव्हेमुळें॥' (४९.९६) म्हणून बोध असा की, 'नको तववरी सुखाशा। जर न सुटली रसाशा। मासा असा उपदेशा। देतसे रसाशा टाकावया॥' ( ४९.९८ ) जिव्हेचे चोजले पुरविण्यासाठी माणसे कोण तडफडतात'! 'गुरे पोरे विकती। रसनातृप्ती करावया॥' म्हणूनच 'तुम्ही तंववरी जितेंद्रिय न व्हाल। जवर रसना न जिंकाल। रस जिंकितां सर्व जिंकाल। जित सर्व जिते रसें॥' ( ४९.६०७ )

अवधूतानी सतरावा गुरु पिंगला वेश्येस केले हेही नीट ध्यानात घ्यावयास हवे. लग्न न करता प्रत्येक दिवशी नवा पती वरण्याचे काम करणारी वेश्या दत्तात्रेयाची गुरू कशी झाली ? पिंगला नावाच्या एका वेश्येस सतत वाट पाहूनही कोणी ग्राहक मिळाले नाही. ही पिंगला कशी होती ? 'जीची सुवर्णापरी दीप्ती। नवयौवन चंद्रकांती। तिला पाहतां वस्त्रें गळती। नरांची मती भ्रष्ट होई॥' ( ५०.५ ) धनरास कमावण्यासाठी ती लोभी असे. परंतु एकदा तिला वैराग्य उत्पन्न झाले. 'जो विश्वाधार अंतर्यामी रमण। तो रती अर्थ देऊन। रमवी तया सोडून। भयशोक मोहदा का इच्छी॥ मी अनित्य मर्त्या इच्छी मला। धिक्कार असो ये वेळा। हा देह विकून विमळा। आत्मारामा भजेन॥' ( ५०.१३-१४ ) अशा वृत्तीने ही पिंगला अंतर्मुख बनली. 'आशा वसे जयापाशीं। सुखें निद्रा नये त्यासी। हें शिक्षण घेतलें वेश्ये-पाशी॥' ( ५०.१६ )

दत्तगुरूचा अठरावा गुरु टिटवी होय. एक कुरर ( टिटवी ) पक्षी मासाचा तुकडा न खाता तसाच राखून ठेवताना इतर पक्ष्यांनी पाहिला व त्यांनी तिच्याशी झुंजण्यास सुरवात केली. व्यर्थ संग्रह करता दु:ख येतेच. संग्रह करण्याच्या वृत्ती-पासून निराश होण्यातच सुख आहे. 'परिग्रह दु:खाला कारण। टिटावूपासून कळले॥ जो विद्वान परिग्रहरहित ब्राह्मण। मिळे ते खाई अग्निवत्। तो जरी धनरहित। तरी जो सतत सुखी होई॥' (५०. २१-२२) निरभिमानी व निष्पाप बालकास पाहून दत्तात्रेयांनी त्याच्या-पासूनही बोध घेतला. बालक हे दत्तात्रेयाचा एकोणिसावा गुरू होय. बालकाला उच्चनीच भाव माहित नसतो. मानापमान ते जाणीत नाही. लहान मूल निश्चिंत बनून आपल्याच ठिकाणी रमलेले असते. 'मानापमानचिंता सोडून। द्यावया बाळ गुरु झाला॥ जो भस्म किंवा चिखल। नेणे सुगंधी परिमळ। सत्कार तिरस्कार सकळ। नेणे बाळ निजानंदें॥ हा रज्जु किंवा सर्प। नेणे तो न करी अनुताप। जो नेणे पुण्य पाप। न घे लेप आपणावरी॥' ( ५०. २५-२७ ) धन कसे मिळवावे, कसे राखावे, अशी चिंता बाळकाला कधी नसतेच. 'जो मनोरथ न करी। आपण आपुल्यासी क्रीडा

करी। आपणांवरी प्रीती करी.। यापरी बाळ सुखी॥ ' (५०.३२) रागद्वेषादिराहित्य दत्तानी या बालकापासून घेतले.

कुमारी कंकण या विसाव्या गुरूपासून एकान्त-वासाची दीक्षा दत्तात्रेयानी घेतली. मुसळाने भात कांडणाऱ्या कुमारीच्या कंकणांचा आवाज होतो. तो आवाज न व्हावा म्हणून सारी कंकणे काढावीत; तर तेही अशुभ. म्हणून तिने दोनच काकणे ठेविली. तरी आवाज झालाच. दोन वस्तू एकत्र आल्या की आवाजाची कटकट आली हे तिच्या ध्यानात येऊन तिने हातात एकच कंकण ठेविले. मग आवाज थांबला. एकान्त झाला. या एकान्ताचा फार मोठा लाभ जाणून दत्तप्रभूनी कुमारी कंकणास किंवा कंकणकुमारीस गुरु केले. ' दोहोचें होई भापण । एक असता ध्यान घडे ' हा बोध दत्तांनी घेतला. सर्प हा त्यांचा एक-विसावा गुरू असून सर्पापासूनही संपर्कहीन अशा एकाकी अवस्थेत राहण्याचा, आत्मस्वरूपी रत होण्याचा गुण त्यांनी घेतला. घर करण्याचे बंधनही सर्प कधी करीत नाही. ' विश्वपणें न फिरे सर्प । निर्धोकाने न घे झोंप । निष्कारण आपोलाप । न करी कोप कोणावरी ॥ हे संपूर्ण गुण घ्यावे । सर्पापरी वागावें । सिद्धस्थान लक्षावें । अद्वस्या घरांत नागोबा जसा ॥ ' (५०.५१–५२) आपण पानांची झोपडी बांधली तरी तीपासून कटकट व दुःख सुरू होणारच. म्हणून स्वतःचे घर न बांधण्याचा बोध सर्पा-पासून घ्यावा.

एकाग्रता हा गुण दत्तात्रेय अवधूतानी बाविसावा गुरू शरकार अथवा धनुर्धारीपासून घेतला. ' बाण दत्तचित्त शरकार । पुढचांतून राजा सपरिवार । चाले सवे गजर । होई तरी नेणें तो॥' (५०.५७) असे शिक्षण शरकारापासून त्यानी घेतले. राजा पुढून वाजतगाजत गेला तरी शरकरास त्याचे भान नव्हते. इतके त्याचे लक्ष आपल्याच धनुष्याकडे होते. पेशस्कार अथवा कुमारीण हा दत्तात्रेयांचा तेविसावा गुरू असून चिंतनशीलता, ध्यानमग्नता हा गुण त्यांनी या कीटकापासून घेतला. भ्रमर या कीटकाला मारतो. म्हणून हा कीटक सतत त्याचेच ध्यान इतक्या तीव्रतेनें करतो की तो स्वत:च भ्रमर बनून जातो. माणसाने असाच ध्यास एकरूपत्वाचा घेतला तर तोही परमात्मस्वरूप बनून जाईल. 'जो वर्ण आश्रम जाती । सोडून सर्वदा चित्ती । चिंती ईश्वराची मूर्ती । त्याला गती तीच ये ॥ स्वयमेव ब्रह्म असून । ब्रह्माचेंच करितां चिंतन । जीव जाई ब्रह्म होऊन । हे आश्चर्य कोण मानील ?' (५०.६९–७०) दत्तात्रेयाचा शेवटचा चोविसावा गुरू कोळी कीटक असून अद्वैताचा उपदेश त्यांनी त्याच्यापासून घेतला. कोळी आपल्याच पोटातून धागे काढून जाळे विणतो, आत क्रीडा करतो, आणि शेवटी आपणच ते तंतू फस्त करून टाकतो. परमात्मा या जगताचा विस्तार व संहार याच पद्धतीने करीत असतो. निर्मिती व संहार करून पुनः तो एकटा निर्वि-कार असतो. 'कोळी नाभीपासून काढी सूत । त्याचें घर करोनी अहोरात्र। करी विचित्र क्रीडा तेथें । मग अंती तें सूत्र खाऊन । राही एकला होऊन । असा ईश्वर जाण। सृष्टिसंरक्षण करीतसे ॥ ' (५०.७५-७६)

याप्रमाणे दत्तअवधूतांनी चोवीस गुरू करून नाना गुणांचा संग्रह केला. ' तो विष्णु व्यापक । मीच असें एक । असा घेतला विवेक । असे चोवीस गुरू करून म्या॥' (५०. ८५) असे दत्तप्रभू म्हणतात. हे ब्रह्मज्ञान वैराग्यामुळे मनात स्थिरावते. यासाठी देहासही गुरू करून शिक्षण घ्यावे लागते. मानवी देहाची यथार्थता वर्णन करताना शेवटी दत्तमाहात्म्यात वासुदेवा-नंद सरस्वती म्हणतात,

' माझाच हा देह म्हणून। व्यर्थ करितो पालन। अंती ज्याला कोल्हे श्वान। जाती खावून। तो कोणाचा जो शुक्रशोणितापासून । मातेच्या

विटाळात झाला उत्पन्न । त्याचे नित्य धारण । करिता क्षीण वाटला ॥ ९० ॥ या अमेध्य देहावांचून । वैराग्य कारण आणावें कोठून । येथें ज्याचे विटे मन । त्याला कोण बोध करी ॥९१॥ देह पृथिव्यादि भूतांचा गोळा । जो आपुल्यासह परिवाराला । रक्षूनी मागेबीजाला । ठेवून मरे वृक्षापरी ॥९२॥ ह्या पृथ्वीवरी वृक्षजाती । मागे बीज राखून मरती । बीजाचे वृक्ष पुन: होती । तीच रीती देहाची ॥९३॥ नाना व्यासंग करून । त्रिविध कर्मं करी उत्पन्न । तेंच पुढें देह करी उत्पन्न । असें ज्ञान होई तंव ॥९४॥ मनस्संकल्प उठती । इंद्रिये इकडे तिकडे ओढती । जेवी एका पुरुषा सवती । येती गती देहास ॥९५॥ विक्षिप्तसा होई व्याकुळ । सर्व तापांचें हें मूळ । असा हे देह अमंगळ । तरी दुर्मिळ असे हा ॥ ९६ ॥ विविधाकार शरीरें । निर्मिलीं जरी ईश्वरें । तरी शेवटी हीं मनुष्यशरीरें । पाहतां पुरे ठाव हर्षा ॥ याच मनुष्य शरीरें करून । मिळे असें हे मोक्षसाधन । तें ज्यां घेतलें साधून । म्हणून नि:शंक पडे येथें ॥९८॥' (५०-८९)

## 'त्रिपुरारहस्या'तील ज्ञानखंड

श्रीदत्तप्रभूंचा आणखी एक शिष्य म्हणजे भार्गव अथवा परशुराम. दत्तशिष्य सहस्रार्जुन कार्तवीर्याचा उल्लेख मागे आलाच आहे. या कार्तवीर्याने अमर्याद वर्तन करून जमदग्नी, रेणुकामाता यांना त्रास दिला. कार्तवीर्यपुत्राने तर जमदग्नीचा वध केला. क्षत्रियहननाची प्रतिज्ञा भार्गवाने याच वेळी केली. परशुराम दत्तप्रभूंना शरण आला. त्याच्या नेतृत्वाने त्याने पित्यावर और्ध्वदेहिक संस्कार केले. श्रीदत्तप्रभूच्या कृपेने त्याने एकवीस वेळा पृथ्वी क्षत्रियविहीन केली. परंतु या कृत्यामुळेही त्याच्या मनाचे समाधान झाले नाही; म्हणून तो पुन: दत्तात्रेयांना शरण गेला. दत्तांनी त्याला सुखदु:खाचे वास्तव स्वरूप, उपासनेची आवश्यकता, ईश्वरतत्त्व, जगाचे अस्तित्व, आत्मज्ञान इत्यादी विषयांचे स्वरूप समजावून सांगितले. सहस्रार्जुन हा आपलाच शिष्य असला तरी आपल्याच वराने तो प्राणास मुकला, परशुरामाचा त्यात काही दोष नाही, अशी दत्तांनी त्याची समजूत काढली. दत्तप्रभूंनी केलेल्या उपदेशाचा थोडाफार मथितार्थ वासुदेवानंद सरस्वतींच्या 'श्रीदत्तमाहात्म्य' या ग्रंथात आला आहेच. 'श्रीदत्तांचें सख्य करून । राम राहिला सन्निधान । श्रीदत्त प्रसन्न होऊन । सांगे ज्ञान तयासी ॥ व्हावया स्वरूपज्ञान । त्रिपुरारहस्य निरूपण । करी रामा उद्देशून । दत्त स्वजन उद्धरावया ॥' (२४. ८०-८१)

हा त्रिपुरारहस्य नावाचा ग्रंथ दत्तपंथाच्या तत्त्वज्ञानासाठी फारच महत्त्वाचा आहे. त्रिपुरा हे एक देवीचे महत्त्वाचे रूप होय. 'त्रीन् धर्मार्थकामान् पुरति पुरतो ददातीति'–धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषांना मिळवून देते ती त्रिपुरादेवी. तंत्रशास्त्रातही या त्रिपुरा देवीची उपासना केली जाते. ब्राह्मी, रौद्री आणि वैष्णवी या तीन शक्तींनी युक्त अशी पुरे म्हणजे शरीरे जिला आहेत ती त्रिपुरा असेही हिचे वर्णन केले जाते. या देवीची विविध रूपे, उपासनाप्रकार आणि स्वरूपज्ञान यांचे वर्णन त्रिपुरारहस्य या ग्रंथात आले आहे. यातील कथाभाग हरितायन ऋषींनी नारदास सांगितला असून पहिल्या माहात्म्यखंडात त्रिपुरादेवीचा महिमा वर्णन केला आहे. त्यानंतर ज्ञानखंडात तत्त्वज्ञान वा आत्मविचार समजावून दिलेला आहे. वैदिक, वैष्णव, शैव, शाक्त, पाशुपत इत्यादी पंथांचा चांगला शोध घेऊन श्रीगुरू दत्तात्रेयांच्या मुखातून परशुरामासाठी हा आत्मबोध हरितायन ऋषींनी प्रकट केलेला असल्याने तो दत्तपंथीयांना महत्त्वाचा वाटतो. चित्तशुद्धी म्हणजे काय ?

जगात प्राप्त होणाऱ्या सुखदु:खाचे स्वरूप कोणते ? ईश्वराचे स्वरूप कोणते ? सद्गुरु कोणास म्हणावे ? चिरंतन सुख म्हणजे काय ? आत्मसाक्षात्कार केव्हा व कसा होतो ? वेदान्ती लोक जगाला स्वप्न म्हणतात, त्याचा अर्थ काय ? हे जगत् कोणी, केव्हा, कशासाठी निर्माण केले ? कर्मनिष्ठा खरी की ज्ञाननिष्ठा खरी ? ज्ञानी कोणास म्हणावे ? लोकसंग्रहासाठी कर्मे करावीत की अरण्यात जाऊन राहावे ? अशा अनेक महत्त्वाच्या प्रश्नांचे सुबोध विवेचन या ज्ञानखंडात आलेले आहे. बा. भा. जोशी यांनी 'श्रीदत्तभार्गवसंवाद' या नावाने या ज्ञानखंडाचे मोठे सरस व सविस्तर निरूपण केले आहे. त्याच्याच आधाराने त्रिपुरारहस्यातील ज्ञानखंडाचे स्वरूप समजाऊन घेऊ.

दत्तप्रभूंकडून परशुरामाने त्रिपुरादेवीचे माहात्म्य ऐकले आणि तो संतुष्ट झाला. त्याला देवीच्या उपासनेचे रहस्यही दत्तांनी समजावून दिले. महेंद्र पर्वतावर जाऊन परशुरामाने एकान्तवासात त्रिपुरादेवीची उपासना केली. त्याच्या मनात आत्मज्ञानाविषयी जिज्ञासा उत्पन्न झाली. जगद्व्यवहाराचे स्वरूप समजावून घ्यावेसे त्याला वाटले. हे एवढे मोठे विश्व कोणी निर्माण केले? हे कोठे चालले आहे ? त्याचा मुक्काम तरी कोठे होणार आहे ? दर एक क्षणी पालटणारे हे जग स्थिर का वाटते ? अशा अनेक प्रश्नांनी भार्गव व्यथित झाला. महेंद्रपर्वतावरून तो गंधमादन पर्वतावर आला. तेथे दत्तप्रभूंची व त्याची भेट झाली. परशुराम त्यांना सद्गदित अंत:करणाने म्हणाला, 'प्रभू, तुमच्या आशीर्वादाने मी पुष्कळ पराक्रम केले, क्षत्रियांचा संहार केला. गर्वाने रामावर चालून गेलो, पण माझा तेथे पराभव झाला. या मन:स्थितीत असताना मला संवर्त अवधूत भेटले. त्यांच्या भेटीने मनास शांती वाटली. त्यांनी मला आत्मबोधही केला; पण तो पूर्णपणे आकलन झाला नाही. त्यांच्याच सांगण्यावरून मी आपणांकडे आलो आहे. संवर्त मुनींनी सांगितलेल्या ज्ञानाचे रहस्य आपण मला सांगावे.' शिष्याच्या मनाची एवढी तयारी झालेली पाहून दत्तात्रेयांनी त्याला ज्ञानाचा बोध करून देण्यास सुरुवात केली. आत्मप्राप्तीची तळमळ लागणे व तसा विचार सुचणे हे महत्त्वाचे आहे. हा विचार सत्संगतीने सुचतो. परमार्थाच्या फलाची प्राप्ती सताच्या संगतीने होते.

या संदर्भात दत्तप्रभूंनी परशुरामास एक कथा सांगितली. दशार्ण देशाचा राजा मुक्तापीड नावाचा होता. हेमचूड आणि मणिचूड ही त्याची दोन मुले एकदा मृगयेसाठी अरण्यात गेली. हेमचूड एका तपस्व्याच्या आश्रमात आला. त्याला तेथे एक सुंदर व तेजस्वी कन्या दिसली. व्याघ्रपाद नावाच्या एका शिवभक्त मुनीची धर्मकन्या म्हणजे ही मुलगी असून तिचे नाव हेमलेखा होते. विद्युत्प्रभा नावाची एक विद्याधरी व वंग देशाचा राजा सुषेण याची ही मुलगी व्याघ्रपाद मुनींनी धर्मकन्या म्हणून पाळली. व्याघ्रपाद मुनींनी हेमलेखेस हेमचूडास अर्पण केले. हेमचूड व हेमलेखा विवाहानंतर राजवाड्यात राहू लागले. परंतु हेमलेखा सुखभोग व विलास यांविषयी निरिच्छ व उदासीन राही. तिच्या या वैराग्याचे स्वरूप दोघांच्या संवादांतून प्रकट झाले आहे. या जगात प्रिय वस्तू कोणती ? अप्रिय कोणती ? या प्रश्नांचा विचार हेमलेखा करीत असते. या दोघा पतिपत्नींच्या संवादांतून सुखदु:खाच्या स्वरूपाचे मोठे मार्मिक विवेचन आले आहे. ज्यापासून सुख होईल ते प्रिय वा ज्यापासून दु:ख होईल ते अप्रिय, एवढे ढोबळ स्वरूप हेमलेखेस मान्य होईना. धनी, द्रव्य, सुखभोग इत्यादींपासून मिळणारे सुख दु:खमिश्रित असले तर ते सुख खरे कसे ? स्त्रीचे स्वरूप व तिच्यापासून मिळणारे सुख यांचेही विवेचन या संवादात आहे. मांसाने लपेटलेले, रक्ताने भरलेले, शिरांनी बांधलेले, त्वचेने

वेष्टिलेले, कफपित्तानी व्यापून राहिलेले, मल-मूत्रानी लिडबिडलेलें शरीर कोणत्या प्रकारचे सुख देणार ? इत्यादी प्रश्न उपस्थित करून हेमलेखेन हेमचूडास खऱ्या सुखाची कल्पना आणून दिली हेमचूडासही खऱ्या सुखाची व वैराग्याची भूक केवळ हेमलेखेच्या सत्सगती-पासून निर्माण झाली

हेमचूड व हेमलखा याचे हे आख्यान आणखीही पुढे चालूच राहिल हेमलेखेनें आपल्या पतीस कसकसा बोध केला हे ऐकण्याची उत्सुकता परशुरामास असल्याने दत्तात्रेयानी त्याला त्या पतिपत्नीच्या सवादाचे रहस्य सागितले पूर्वी सुखदायक वाटणाऱ्या गोष्टी आता हेमचूडास दु खदायक झाल्या तो वैराग्य-शील बनला शाश्वत सुखाची ओळख करून देण्यास हेमलेखेने आपल्या पतीस एक गोष्ट सागितली या रूपकात्मक कथेवरून ती आपल्या पतीस खऱ्या सुखाचा बोध करीत राहिली शुद्ध स्वरूप चिती, बुद्धी, जीवस्वरूप चिती, अविद्या, मोह, सकल्पविकल्प, मन, पचेंद्रियें, विषयभोग, आशा व वासना, शरीराचे वास्तवरूप, योगप्रक्रिया अशा अनेक बाबींचे रूपकात्मक कथेतून तिने विवरण केलें आपल्या पतीचा आपल्यावर विश्वास बसावा म्हणून ती नाना कथा सागत राहिली

सुख-दु खाचा विवेक एकदा पक्का झाला की मग मनात वैराग्य निर्माण होते ज्याच्या प्राप्तीपासून पुन दु ख कधी येणारच नाही, त्यालाच परमश्रेय म्हणावे सपत्ती, स्त्री, पुत्र, राज्य, खजिना, सैन्य, नावलौकिक, बुद्धी, पाणि-दार डोळे, सुदर शरीर इत्यादीत दु खाचा अकुर उत्पन्न करणारी बीजे आहेत म्हणून याना महत्त्व न देता शाश्वत सुखाचे स्वरूप ओळखा-वयास हवे ईश्वराची निष्काम उपासना करूनच असे शाश्वत सुख प्राप्त होईल या ईश्वराचे स्वरूप तरी काय आहे ? हे सर्व जगदाडबर उत्पन्न करणारा व पुन लीन करणारा तो ईश्वर तोच विष्णू, तोच शकर, तोच ब्रह्मदेव, तोच सूर्य व तोच चद्र होय, असे सर्वजण सागत असले तरी वस्तुत तो शिवही नव्हे, विष्णूही नव्हे, ब्रह्मदेव नव्हे भक्तानी त्याला आकार व गुण दिले तरी तो शुद्ध चेतन स्वरूपातच असतो अशा विविध विषयाच्या निरूपणावरून हेमचूडास आत्मज्ञानास प्रवृत्त करण्याचे कार्य हेमलेखेनें केले आत्म्याचे स्वरूप, त्याची प्राप्ती अशा विषयाचेही वर्णन तिने केले प्रियेच्या उपदेशामुळे हेमचूडाचे अत करण शात झाले त्याची भ्राती दूर झाली राजा हेमचूड हा केवळ सत्सगामुळे जीवन्मुक्त व तत्त्वज्ञानी बनला

हे सारे दिसणारे विश्व चैतन्यस्वरूपच कसे आहे, याचेही विवेचन दत्तात्रेयानी परशुरामा-साठी केले सृष्टीच्या आरभी एक शुद्ध चैतन्य-रूप महादेव होता त्यापासून हे चराचर जगत् उत्पन्न झाले ते त्याच्यावर राहाते व त्याच्याच ठिकाणी लीन होते जगत् हे केवळ चैतन्य-स्वरूपाचे असल्याचे दत्तप्रभू पटवून देतात हे जगत खरे असल्याचे तरी का भासते ? याही प्रश्नाचे विवेचन दत्तानी तरुण मुनीची गोष्ट सागून केले हे जगत् केवळ सत्यत्वाच्या भावनेमुळेच सत्य रूपाने भासते हे दत्तानी परशुरामास पटवून दिले सवेदन म्हणजे चैतन्य अथवा ज्ञान हेच काय ते एक सत्य तत्त्व आहे सवेद्य अथवा ज्ञेय भाव हे त्याच्या आधारावर कल्पित आहेत आदर्शात भासणाऱ्या नगराप्रमाणे ती खोटी कल्पना आहे चैतन्य हाच परम समर्थ सविद्रूप परमेश्वर असून तोच स्वस्वरूपभूत भिंतीच्या ठिकाणी बाह्य पदार्थांनी बहुविध झालेले हे जगच्चित्र भासवितो तो स्वतत्र असल्यामुळे त्याला या कामी अन्य सामग्री लागत नाही यानतर जनक व अष्टवक्र याच्या सवादातून निर्विकल्प समाधीचा बोधही स्पष्ट केला आहे परशुरामाच्या अनेक शकाचेही

निरसन दत्तांनी केले. मुक्त झालेल्या माणसांच्या वर्तनाचे स्वरूपही स्पष्ट केले. मुक्त झालेले ज्ञानी पुरुष उत्तम, मध्यम व कनिष्ठ असा तीन प्रकारचे असतात. जे स्वस्वरूप जाणत असतात, परंतु प्रारब्धवशात् प्राप्त होणाऱ्या सुखदुःखादी भोगांनी क्षणोक्षणी कष्टी होतात, ते मंद ज्ञानी होत. दुसरे कित्येक प्रारब्धप्राप्त सुखदुःखे भोगतात; परंतु झोपेत डास चावतात त्याप्रमाणे तिकडे लक्षच ठेवीत नाहीत. ते मध्यम ज्ञानी होत; आणि जे कोटयवधी प्रारब्धकर्मांची विचित्र फळे प्राप्त झाली असताही अगदी ढळत नाहीत, संकट-परंपरा उभी राहिली तरी उद्विग्न होत नाहीत, महासुख प्राप्त झाले तरी हर्षयुक्त होत नाहीत व आत्मशांत राहून बाहेरून इतराप्रमाणे व्यवहार चालवितात ते उत्तम ज्ञानी होत. त्या-नंतर वासनांचे स्वरूप, त्यांचे प्रकार, खरी समाधी याही विषयांचे विवरण दत्तात्रेयांनी केले आहे.

तत्त्वबोधासाठी दत्तात्रेयांनी परशुरामास देवीच्या अवताराची एक कथा सांगितली. ब्रह्म-देवाच्या एका ज्ञानसत्रामध्ये अनेक ब्रह्मर्षी व राजर्षी जमले होते. ब्रह्मा, विष्णू व महेश असे देव आणि ऋषिमुनी माहेश्वरी श्रीविद्यादेवीस शरण गेले. त्यांची ज्ञानलालसा पाहून श्रीत्रिपुरा-देवी प्रकट झाली. सर्वांनी तिला नमस्कार करून प्रार्थना केली—

(१) देवी, तुझे पर रूप कोणते ?
(२) देवी, तुझे अपर रूप कोणते ?
(३) तुझे ऐश्वर्य कोणत्या प्रकारचे आहे ?
(४) तुझे ज्ञान कोणत्या प्रकारचे आहे ?
(५) त्या ज्ञानाचे फल काय आहे ?
(६) खरा मोक्ष मिळण्याचे साधन कोणते ?
(७) खरा साधक कोण ?
(८) सिद्धीची पूर्णावस्था कोणती ?
(९) सिद्ध पुरुषांत श्रेष्ठ कोण ?

देवांच्या व ऋषिमुनींच्या या प्रश्नांची उत्तरे देताना त्रिपुरादेवीने प्रमुख तात्त्विक प्रश्नाचा ऊहापोह केला आहे. ती सांगते—

उत्तर १—प्रथमतः माझे पररूप. तर ज्याच्या ठिकाणी हे सर्व जगत् दर्पणातील प्रतिबिंबाप्रमाणे उत्पन्न होते, राहते व लीन होते व सर्वांना नेहमी भासते; आत्मज्ञान नसणारांना जे जगाच्या आकाराने भासमान होते; योग्यांना जे केवळ निर्विकल्प म्हणून अनुभवास येते; शांत, गंभीर सागराप्रमाणे जे अगदी निश्चल भासते; एक-निष्ठ भक्त प्रेमाने व कोणतीच कामना न ठेवता ज्याचे नित्य सेवन करितात; अद्वैतपदाचे ज्ञान झाले असताही मनाला स्वाभाविक ओढ लागून अत्यंत तत्परतेने, देव आणि भक्त असा भेदभाव ते ज्यासाठी उत्पन्न करितात; इंद्रिये, मन, बुद्धी यांचे जे अंतःसूत्र; ज्याचे अभान झाल्यास काहीच नाही; आणि शास्त्रावरून जे सामान्यतः जाणता येते; ते माझे परमश्रेष्ठ रूप होय.

उत्तर २—सर्व ब्रह्मांडाच्या पलीकडे असलेल्या अमृतसमुद्रात जे रत्नाचे दीप आहे, त्यातील एका कदंबाच्या उपवनामध्ये चिंतामणींनी बनविलेले एक सुमनोहर मंदिर आहे. त्यात ब्रह्मदेव, विष्णू, रुद्र व ईश्वर या चार पादांचा व सदाशिवात्मक पृष्ठभाग असलेला जो मंचक आहे, त्यावर विराजमान झालेली अनादि—मिथुनात्मक जी त्रिपुरसुंदर मूर्ती, ते माझे अपर रूप होय. तसेच ऋषीहो, सदाशिव, ईशान, ब्रह्मदेव, विष्णु, शंकर, गणपती, षडानन, इंद्रादी दिक्पाल, लक्ष्मी इत्यादी शक्ती, वसुरुद्रादी गण, राक्षस, देव, नाग, यक्ष, किंपुरुष इ. जे जे म्हणून पूजनीय आहेत, ते ते सर्व माझी अपर रूपे होत. अशी मी सर्वत्र असूनही माझ्या मायेने मोहित झालेले पुरुष मला ओळखीत नाहीत; पण ते माझीच सेवा करितात व मीच त्यांना त्यांचे अभीष्ट देते. मजवेगळे कोणीच पूजनीय नाही आणि फलदायीही नाही.

जो जसे माझे सेवन करितो, त्याला तसे मजपासून फळ मिळते

उत्तर ३–माझे ऐश्वर्य अमर्याद आहे कशाचेही साहाय्य न घेता, एकाकी व चितस्वरूप असता मी अनंत जगताच्या आकाराने भासमान होते, आणि अशी भासमान होतानाही आपल्या स्वरूपापासून मुळीच ढळत नाही ! अशी दुर्घट गोष्ट घडवून आणणारे हेच माझ ऐश्वर्य तुम्हाला सागते सूक्ष्म दृष्टीने तुम्ही पाहा मी सर्वांना आश्रय असून व अतर्यामी असूनही मी पुन केवळ सगरहित आहे मी नित्यमुक्त असूनही पुन पुन मुक्त होते सदगुरुकडे जाऊन त्याचे शिष्यत्व पत्करून पुन आत्मस्वरूपाला जाणते पुन आत्मस्वरूपाला विसरून पुष्कळ काळ ससारात गुतून राहते ! आणि एवढे हे जग कोणत्याही साधनसामग्रीवाचून निर्माण करिते ! असे माझे नाना तऱ्हेचे ऐश्वर्य आहे ! सहस्रमुखालाही गणना होणे शक्य नाही म्हणून शेवटी थोडक्यात सागते की, माझ्या ऐश्वर्याच्या एका लेशानेच ही अद्भुत जगधाना चोहोकडे पसरली गेली आहे

उत्तर ४–माझे ज्ञान द्वैत, अद्वैत इत्यादी अनेक प्रकारचे आहे तसेच त्याचे फळही श्रेष्ठ कनिष्ठभेदाने निरनिराळे झाले आहे द्वैतज्ञान हेही अनेक प्रकारचे आहे कारण ते निरनिराळ्या उपास्यमूर्तींवर अवलबून असते त्याला ध्यान किंवा उपासना असे म्हणतात परतु ते स्वप्नाप्रमाणे किंवा मनोराज्याप्रमाणे क्षणिक अनुभवास येणारे असते तेही त्याच्या मानाने सफळ होतेच तशीच नियतीची योजना आहे याच्या अनेक प्रकारामध्ये पूर्वी सागितलेले माझ्या अपर मूर्तीचे ध्यान हे मुख्य आहे कारण ते क्रमाक्रमाने मुख्य फळ म्हणजे मोक्ष देण्यास कारण होते अद्वैत ज्ञानालाच मुख्यत ज्ञान हे नाव आहे मज परम श्रीविद्यादेवीची आराधना केल्यावाचून ही अद्वैत सज्ञक महाविद्या कशी प्राप्त होईल ? जे केवळ परम चैतन्य तेच अद्वैत विज्ञान, त्याच्याच शुद्ध अवस्थेचे ज्ञान झाले असता द्वैतभावनेची निवृत्ती होते जेव्हा चित्त केवळ आत्माभिमुख होते, तेव्हाच हे विज्ञान अनुभवास येते ऋषीहो ! वेदव्यासाच्या योगाने किंवा सयुक्तिक विचाराच्या योगाने केवळ आत्मा प्रतीत होऊन, 'देहच मी' इत्यादी भावनाचा नाश होणे, यालाच ज्ञान म्हणतात ज्या ज्ञानाने हे भासणारे दृश्य कोठेही किंचितही स्फुरत नाहीसे होते, ज्या ज्ञानाच्या योगाने कोठे काही एक लेशसुद्धा जाणावयाचा रहात नाही, सर्व तऱ्हेचे विषयादिकाचे अनुभव जेथे आत्मरूप होतात, तच खरे अद्वैत ज्ञान होय जे ज्ञान प्राप्त झाले असता चिरकाल पुष्ट झालेले सशय वायूने लय पावणाऱ्या अभ्राप्रमाणे पळ काढतात, आणि जेथे कामादी क्षुद्र वासना पुढे येऊ शकत नाहीत, दात पाडलेल्या सर्पाप्रमाणे व्यर्थ होतात, तेच ऋषीहो माझे परम विज्ञान होय

उत्तर ५– सर्व दु खाचा नाश होणे हे विज्ञानाचे फळ आहे अत्यत निर्भय अवस्था प्राप्त होणे हेच खरे फळ होय 'हा दुसरा कोणी आहे' या भावनेने भय उद्भूत होते पण अद्वैततत्त्व पूर्णपणे ज्ञात झाल्यावर, सूर्योदयानतर जसा अध कार दूर पळून जातो, तशी ही द्वैत भावना कोठल्या कोठे नष्ट होते ते कळतही नाही ! म्हणून ऋषीहो द्वैतसकल्प नष्ट झाल्यावर कोठेच भय नाही स्वस्वरूपाहून निराळे फळ ज्यापासून मिळते ते सर्वदा भयदायी असणार ! कारण की, स्वात्मरूपाशिवाय अन्य ते सर्वदा नाशवत असते, असे प्रत्यक्षच आढळून यते नाशवत वस्तूला भय असल्यामुळे तेथे निर्भयता कोठून प्राप्त होणार ? सर्व सयोगाच्या शेवटी वियोग असतो, असा सर्वत्र अनुभव आहे तेव्हा फलाचा योगही नष्ट होणार हे निश्चित आहे त्या अर्थी जोवर फळ आत्मरूप नसून अन्यरूपाचे आहे, तोवर भय असते म्हणून जे आपल्या

स्वरूपाहून वेगळे नव्हे, तेच निर्भय फल होय; त्यालाच मोक्ष म्हणतात. जेव्हां ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही सर्व एकरूप होतील, तेव्हा सर्व भय-रहित असे मोक्ष नामक सर्वोत्तम फल मिळते. संकल्प-विकल्पशून्य आणि तमोगुणाने रहित जे ज्ञात्याचे शुद्ध आत्मस्वरूप तेच ज्ञान. ते स्वरूप प्रथमतः ओळखता येत नाही; गुरु व शास्त्र ही त्याची ओळख करून देतात. जे विज्ञेय तत्त्व म्हणून म्हणतात ते हेच. ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान ही जोवर निरनिराळी अनुभवास येतात, तोवर ती व्यर्थ होत. पण त्या त्रिपुटीतील परस्परभेद जेव्हा नष्ट होईल, तेव्हाच तो ज्ञाता, तेव्हाच ते ज्ञेय व तेव्हाच ते ज्ञान. हेच ज्ञानाचे फळ. वस्तुतः ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय आणि फल यामध्ये भेदच नाही. व्यवहाराची सिद्धी होण्यासाठी त्यात हा भेद कल्पिलेला आहे. म्हणून येथे नवीन असे काही फल मिळावयाचे नाही. हा आत्माच मायेच्या योगाने ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान व त्याचे फल इत्यादी रूपानी जोवर भासतो, तोवर हा संसार पर्वता-सारखा कठीण होतो. परंतु जेव्हा कोणत्याही कारणाने प्रसंगवशात् भेदशून्य स्वरूप भासमान होते, तेव्हा वाऱ्याने ढग नष्ट व्हावेत त्याप्रमाणे ह्या सर्व संसाराचा विलय होतो.

उत्तर ६– अशा प्रकारचा खरा मोक्ष प्राप्त होण्याला त्यासंबंधात तत्परता हे मुख्य साधन आहे. तीव्र तत्परता असल्यावर अन्य साधनाची काही जरूरी नाही आणि ती तत्परताच विशेष नसली तर दुसऱ्या चांगल्या हजारों साधनांनी तरी काय होणार आहे ? तेव्हा तत्पर होणे हे मोक्षाचे मुख्य साधन आहे, 'सर्व काही करीन पण हे कार्य साधीन !' असे निरंतर वाटणे हीच तत्परता. ज्याला अशी अवस्था प्राप्त झाली आहे तो सर्वथा मुक्तच आहे कारण मग तो काही दिवसांनी किंवा महिन्यांनी, किंवा वर्षांनी–किंव-हुना दुसऱ्या जन्मात म्हटले तरी चालेल–पण मुक्तच व्हावयाचा ! कारण तो मार्गालाच लाग-लेला असतो. बुद्धीच्या निर्मलपणात जसा फरक असेल तसे दिवस थोडे किंवा फार लागतील इतकेच. सर्व पुरुषार्थाच्या आड येणारे हे बुद्धीचे दोष पुष्कळ प्रकारचे आहेत. त्यानीच हे लोक घोर संसाराग्नीत जळत घातले आहेत. त्यात पहिला अनाश्वास, दुसरी कामवासना व तिसरी जाड्यता असे तीन प्रकार मुख्य आहेत. त्यात अनाश्वासाचे प्रकार दोन; एक संशय आणि दुसरा विपर्यय. वरील तत्परतेलाही दोन मुख्य विघ्ने आहेत. उलट निश्चय करीत गेल्याने हे द्वय क्रमाने नाश पावते. या कामी मुख्य उपाय म्हणजे मूळच छेदून टाकले पाहिजे. हे अनाश्वा-साचे मूळ शास्त्रविरुद्ध असलेल्या तर्काचे चिंतन करणे हे आहे. त्याचा त्याग करावा; व सत्त-र्काचा विचार चालण्यासाठी त्या विरोधी तर्का-विरुद्ध निश्चय करू लागावे. असे केल्याने श्रद्धेचा जन्म होऊन अनाश्वास नष्ट होतो. बुद्धीवर कामादी वासनांचे पुट असले तर ते श्रवणाच्या आड येते. कामादिकानी व्यापिलेली बुद्धी ज्ञान-विषयाकडे प्रायः प्रवृत्त होत नाही. व्यवहारातही कामी पुरुष आपल्या प्रिय विषयाच्या चिंतनात अगदी गढून गेला असता त्याला पुढील काही दिसत नाही की ऐकू येत नाही ! तसेच मानेही श्रवण केले तरी ते न केल्यासारखेच होते; म्हणून या कामवासना वैराग्यबळाने स्वाधीन करून घ्याव्या. या काम, क्रोध, लोभ, दंभ इ. हजारो आहेत. त्या सर्वांना काम हा मूळ आहे. तो नष्ट झाल्यावर मग दुसरे कोणी उरत नाहीत. तो काम वैराग्याने नाश पावतो. 'असे मला असावे' अशा तऱ्हेची जी आशा तीच काम. ती प्राप्त पदार्थांच्या संबंधात स्थूल झालेली असते व अप्राप्य गोष्टीत सूक्ष्म असते. दृढ वैराग्याने ती सर्व घालवावी. त्या वैराग्याचे मूळ म्हटले तर प्रतिक्षणी काम्य विषयाच्या दोषाचा विचार करणे व त्या विषयाचा संबंध वर्ज्य करणे हे आहे. या योगाने तो वासना नष्ट होते. बुद्धीचा तिसरा

दोष जे जाडय, तो तर अभ्यास करूनही जिकावयास कठीण आहे. हा दोष असला तर, पुरुषाने मोठ्या तत्परतेने श्रवण चालू ठेविले तरी ते बुद्धीत प्रविष्ट होत नाही. हा पुरुषार्थाचा नाश करणारा मोठा दोष आहे. त्याला परमेश्वराची सेवा केल्यावाचून दुसरा उपाय नाही. त्या सेवेप्रमाणे मी त्याच्या बुद्धीचे जाडय हरण करिते. या जाडयाच्या अधिक-उणेपणाला अनुसरून त्याच किंवा दुसऱ्या जन्मी त्यालाही फलप्राप्ती होते ऋषीहो, सर्व साधनसामग्री कोणालाही माझ्या कृपेनेच प्राप्त होते. जो पुरुष निष्काम बुद्धीने व भक्तिपूर्वक नित्य माझी उपासना करितो, तो साधनाच्या अडचणीचे निवारण करून लौकरच कृतार्थ होतो उलट जो सारखा अनेक साधनांचे पाठ घेतो, पण सर्वांच्या बुद्धीला विकसित करणाऱ्या मज परमेश्वरीकडे मात्र दुर्लक्ष करतो, त्याचे बुद्धिमांद्य दूर न होता, त्यास त्यामुळेच पदोपदी ठेचा खाव्या लागतात आणि फळ मिळण्याचीही वानवाच असते. साराश, ऋषिहो, तत्परता हे ज्ञानाचे मुख्य साधन आहे.

उत्तर ७– ज्याला अशी तत्परता आहे, असा निश्चय होणे याचे नाव सिद्धी. देहादिकांच्या ठिकाणी भासणारे आत्मत्व नाहीसे होऊन बुद्धी निर्मल झाली म्हणजे सिद्धी झालीच. आत्म्यासंबंधी निश्चय सर्वांचाच आहे, म्हणजे आपण आहो हे सर्वांनाच माहीत आहे. पण तो निश्चय केवलरूपाने नसून देहादींच्या रूपाने आहे. म्हणूनच ही महान् अनर्थपरंपरा ओढवली आहे. म्हणून 'देहादिकाना भासित करणारे जे केवल चैतन्य, तोच आत्मा' असा निश्चय होऊन सर्व संशय लयास जाणे यालाच ज्ञानसिद्धी असे म्हणतात. खेचरत्वादी आणि अणिमादी सिद्धी या ह्या ज्ञानसिद्धीच्या सोळाव्या हिश्श्याच्याही बरोबर येत नाहीत. या सर्व सिद्धी विशिष्ट कालाने आणि देशाने मर्यादित असतात. अर्थात् त्यांचे सामर्थ्य अमुक वेळी आणि अमुक ठिकाणी मात्र अनुभवास यावयाचे, असे असते. पण ही शिवस्वरूप स्वात्मसिद्धी अमर्याद आहे. आत्मज्ञानाच्या साधनेमध्येच त्या त्या अणिमादी क्षुद्र सिद्धी प्राप्त होतात; पण त्या आत्मज्ञानाच्या प्राप्तीला विघ्न करणाऱ्या आहेत. गारोड्याच्या खेळाप्रमाणे असणाऱ्या या सिद्धींनी स्वहित काय होणार आहे? ज्याला आत्मज्ञान झाल्यामुळे ब्रह्मदेवाचे अधिकारस्थानही तृणतुल्य होते, त्याला या सिद्धी म्हणजे काय, एक पोरखेळ आहे. म्हणून एका आत्मज्ञानाशिवाय दुसरी सिद्धीच म्हणता येत नाही. जिने दु:खाचा कायमचा नाश होतो, आनंद दाट भरून जातो व मृत्यूच्या तोंडूनही सुटका करून घेता येते, तीच खरी सिद्धी हे काय सांगावे? ही ज्ञानसिद्धी विविध अभ्यासभेदाने, बुद्धीच्या कमीजास्त निर्मलपणामुळे व ज्ञानाच्या परिपक्वतेतील तारतम्यामुळे तीन प्रकारची आहे; उत्तम, मध्यम व कनिष्ठ. ब्राह्मणांचा वेदाचा पाठही असाच असतो. तीव्र बुद्धिमत्तेमुळे व फार अभ्यास झाल्यामुळे दुसरे कित्येक उद्योग करीत असतानाही ज्यातील अक्षरे अस्खलित म्हटली जातात, तो पाठ उत्तम; ज्यामध्ये दुसऱ्या कार्याकडे आणि पाठाकडे चित्त ठेवावे लागते तरच पूर्ववत् म्हणता येते, तो मध्यम प्रकार; आणि ज्यामध्ये केवळ पाठाकडेच मन लावले अर्थात् उद्योगाकडे दुर्लक्ष केले, तर मात्र जो बिनचूक म्हणता येतो, तो कनिष्ठ. अशीच ज्ञानसिद्धीही त्रिविध आहे. जिच्यात व्यवहार करताना तत्त्वानुसंधान ठेवावे लागत नाही, स्वभावत:च ते राहाते, ती उत्तम; तसे ते ठेवावे लागते; ती सिद्धी मध्यम व जिच्यात व्यवहार मुळीच होत नसून सारखे स्वरूपानुसंधानच करावे लागते, ती ज्ञानसिद्धी कनिष्ठ होय. वस्तुत: याच्यांत स्वरूपत: काही भेद नाही. तरी त्यांत उत्तम सिद्धी आहे तिला सिद्धीची पराकाष्ठा म्हटली आहे. स्वप्नादी अवस्थातही जिचे वास्तव्य

असते आणि विचार उदित होताच जी अनुभवास येते, तीच स्वरूपसिद्धी सर्वांत श्रेष्ठ आहे. सर्व व्यवहारांमध्ये जेव्हा पूर्वसंस्कारवशात् आपोआप हेतूवाचून प्रवृत्ती होऊ लागते, तेव्हा ती सिद्धीची पराकाष्ठा समजावी. प्रयत्न न करता, संविद्रूप आत्म्याच्या ठिकाणी जेव्हा अखंड स्थिती होऊ लागते, तेव्हा ती सिद्धी मर्यादेवर पोचली म्हणावयाची. व्यवहारात वागत असता पदार्थमात्राचा अनुभव घेत असूनही ज्याला द्वैत भासत नाही, त्याची सिद्धी पूर्णावस्थेस गेली असे समजावे. जागृतीत व्यवहार करताना जेव्हा झोपी गेल्यासारखी अंत:करणात स्वस्थता असते, तेव्हा ती ज्ञानसिद्धीची परिपूर्णता होते.

उत्तर ९–अशी स्थिती ज्याला प्राप्त झाली तो उत्तम सिद्ध. व्यवहारात असताही ज्या बुद्धिमानाची समाधी केव्हाच भंग पावत नाही, तो उत्तम सिद्ध होय. निरनिराळ्या ज्ञान्यांची निरनिराळी स्थिती स्वानुभवावरून ज्याला अंतरात ओळखता येते, तो उत्तम सिद्ध होय. ज्याला तिळमात्र संशय नाही व तिळमात्र इच्छा नाही, तो सर्वोत्तम सिद्ध म्हणतात. जो व्यवहारात अगदी निर्धास्त असतो, आणि सर्व सुखे, दु:खे आणि जगाचे नाना व्यवहार, हे सर्व मजवरच भासत आहेत असे समजतो, त्याला पूर्ण सिद्ध म्हणावे. अत्यंत बद्ध व पूर्ण मुक्त हे ज्याला आपलेच स्वरूप आहे असे वाटते, तो उत्कृष्ट सिद्ध समजावा. जो आपणावर बंधाचे जाळे पसरलेले इतराप्रमाणे स्पष्टपणे पाहत असताही त्यातून सुटण्याची इच्छा मुळीच करीत नाही; कारण, त्याला त्यापासून पीडाच होऊ शकत नाही, तो सर्वांत श्रेष्ठ सिद्ध समजतात. ऋषींनो, फार काय सांगावे ? तो उत्तम सिद्ध म्हणजे मीच म्हणून समजा. आम्हा दोघात मुळीच भेद नाही. हे तुमच्या प्रश्नाचे उत्तर मी तुम्हाला अगदी स्पष्ट सांगितले आहे. हे रहस्य चांगले समजल्यावर पुन: म्हणून कोणाला मोह होणार नाही हे खास.

श्रीविद्यादेवी अथवा भगवती त्रिपुरासुंदरीचे हे तत्त्वनिरूपण सर्वांनाच मान्य होण्यासारखे आहे. दत्तपंथीयात या विद्यागीतेचे माहात्म्य मोठे असून ती स्वानंदसाम्राज्याची प्राप्ती करून देणारी आहे अशी श्रद्धा सांप्रदायिकाची आहे.

भगवान श्रीदत्तात्रेयांनी त्रिपुरासुंदरीकृत बोधाचे विवरण केल्यानंतर ज्ञानाचे सुलभ साधन जी परमेश्वराची कृपा तिचे वर्णन केले. ज्ञानी माणसाच्या व्यवहाराचे वर्णन केले. राजपुत्र हेमांगद व ब्रह्मराक्षस यांच्या संवादातूनही दत्तांनी तत्त्वनिरूपण केलेले दिसते. या संवादाचा सारांश असा.

" राजपुत्रा, आकाशाहून विस्तृत व परमाणूहून सूक्ष्म ती कोण, तिचे स्वरूप काय व ती कोठे असते, हे सांग."

" ब्रह्मराक्षसा, ऐक. चिती ही आकाशाहून विस्तृत व परिमाणूहून सूक्ष्म आहे. स्फुरणे हे तिचे स्वरूप आहे व आत्मा हे तिचे स्थान आहे."

" राजपुत्रा ! एकच चिति अति विस्तृत असून तीच पुन: अति सूक्ष्म कशी होते ? आणि स्फुरणे म्हणजे काय व आत्मा म्हणजे काय, हे सांग."

" ब्रह्मराक्षसा, ऐक. चिती ही सर्वांला कारण असल्यामुळे विस्तृत आहे, आणि आकलन करण्यास कठीण म्हणून सूक्ष्म आहे. चिती हेच स्फुरणे व चिती हाच आत्मा."

" राजपुत्रा, ती सापडण्याचे स्थान कोणते ? ती कशी प्राप्त होते ? व तिच्या प्राप्तीपासून फल काय, हे सांग "

" ब्रह्मराक्षसा, ऐक. बुद्धी हे तिच्या प्राप्तीचे स्थान आहे. ती एकाग्रतेने उपलब्ध होते. ती प्राप्त झाल्याने पुन: जन्म म्हणून येत नाही."

" राजपुत्रा, बुद्धी कशाला म्हणतात? ही एकाग्रता म्हणजे काय ? व जन्म कसा येतो? हे सांग."

" ब्रह्मराक्षसा, ऐक. अविद्येने आवरण केलेल्या चित्तोला बुद्धी म्हणतात. आपल्याकडे अभिमुख होणे म्हणजे एकाग्रता; व देह हाच आत्मा अशी भावना होणे हाच जन्म होय."

" राजपुत्रा! कशामुळे चित्ती उपलब्ध होत नाही ? आणि ती कोणत्या साधनाने उपलब्ध होते ? व तो जन्म कशामुळे प्राप्त होतो ? हे सांग."

" ब्रह्मराक्षसा, ऐक. अविवेकामुळे चित्ती उपलब्ध होत नाही. ती आपण स्वत:च उपलब्ध होते. कर्तृत्वाचा अभिमान धरल्यामुळे जन्म प्राप्त होतो."

" राजपुत्रा! तू सांगतोस हा अविवेक कोण? तसेच आपण म्हणजे कोण ? आणि कर्तृत्वाचा अभिमान तो कोण ? हे सांग."

" ब्रह्मराक्षसा, ऐक. देहादिकाहून आत्मा निराळा आहे हे ओळखता न येणे हाच अविवेक. आपण कोण याचे उत्तर तुझे तूच आपणाला विचार. 'मी कर्ता' अशी भावना, म्हणजे कर्तृत्वाचा अभिमान."

" राजपुत्रा, अविवेक कशाने नष्ट होतो? विचाराचे मूळ वैराग्य आहे व वैराग्याला दोषदृष्टी कारण आहे."

" राजपुत्रा ! विचार तो कोण आहे? वैराग्य कशाला म्हणतात? आणि दोषदृष्टी म्हणजे काय ? हे सांग."

" ब्रह्मराक्षसा, ऐक. द्रष्टा आणि दृश्य याचे परीक्षण करणे हा विचार. दृश्यावर आसक्ती नसणे हे वैराग्य; व दृश्य हे दु:खकारक आहे अशी भावना ही दोषदृष्टी."

" राजपुत्रा! हे सर्व कशाने साध्य होईल? तसेच ते कशाने मिळेल? आणि त्यालाही मूळ कारण काय ? हे सांग."

" ब्रह्मराक्षसा ! ऐक. ईश्वराच्या कृपेने हे सर्व साध्य होईल. ती कृपा भक्ती केल्याने होईल. भक्तीला सत्संग हे मूळ कारण आहे."

" राजपुत्रा, ईश्वर कोणाला म्हणतात? भक्ती कशाला म्हणावे ? आणि संत कसे असतात ? हे सांगा."

" ब्रह्मराक्षसा, ऐक. जगाचे धारण करतो तो परमेश्वर. त्याकडे मन लागणे याला भक्ती म्हणतात, संत हे शान्त व दयाळू असतात."

" राजपुत्रा, जगात सदोदित भिणारा कोण? सदा दु:खी कोण ? व सदा दीनवाणा कोण ? हे सांग."

" ब्रह्मराक्षसा, ऐक. अतिशय धनवान सदा भीत असतो. ज्याचे कुटुंब मोठे असेल तो सदा दु:खी असतो; आशेने ग्रासलेला पुरुष सदा दीनवाणा असतो."

" राजपुत्रा, जगात निर्भय कोण आहे ? दु:खरहित कोण आहे ? व ज्याला दैन्य नाही असा कोण आहे, हे सांग."

" ब्रह्मराक्षसा, ऐक. ज्याचा कशाचीच संग म्हणजे संबंध नसतो, तो निर्भय. ज्याने मन जिंकले आहे तो दु:खरहित; व जो आत्मज्ञानी आहे, त्याला तेवढे दैन्य नाही." .

" राजपुत्रा, ज्याचे लक्षण करता येत नाही असा कोण ? देहरहित असा कोण ? व निष्क्रियाची क्रिया कोणती हे सांग."

" ब्रह्मराक्षसा, ऐक. जीवन्मुक्ताचे लक्षण करता येत नाही, तोच देही असून देहरहित असतो आणि त्याची क्रिया तीच निष्क्रिय पुरुषाची क्रिया होय."

" राजपुत्रा, जगात आहे व नाही असे काय आहे? व अत्यंत असंभव कोणाचा आहे ? एवढे आता सांग, म्हणजे तुझ्या बंधूला मी सोडून देतो."

" ब्रह्मराक्षसा, ऐक. आहे व नाही अशी एक दृश्य वस्तु आहे. दृश्य व्यवहाराचा अत्यंत असंभव

आहे. हे सांगितले; आता माझ्या बंधूला सोडून दे."

हेमागद व ब्रह्मराक्षस यांच्या वरील संवादावरून सांप्रदायिक तत्त्वज्ञानाचे स्थूल स्वरूप लक्षात येण्याजोगे आहे. हा ब्रह्मराक्षस म्हणजे पूर्वजन्मीचा मगध देशातील वसुमान् ब्राह्मण होय. या वसुमान ब्राह्मणाने पुन. हेमागद या राजपुत्रापासून ज्ञानाचा लाभ करून घेतला. आत्मतत्त्व जाणणारा हेमागद व्यवहार का व कसा करतो ? या प्रश्नाचे उत्तर देताना हेमागदाने ज्ञानी माणसाचे कर्म, त्याचे अपक्व, पक्व व हलोदित असे तीन प्रकार इत्यादी विषयाचे उत्कृष्ट विवरण केले. दत्तप्रभूकडून हा सर्व आत्मविचार निरनिराळ्या कथांच्या संदर्भात ऐकून परशुराम संतुष्ट झाला आणि म्हणाला, "श्रीगुरो, आता माझा संदेह नष्ट झाला. माळेच्या सूत्राप्रमाणे सर्वात अनुस्यूत असणारे संवेदन तोच आत्मा व तोच सर्वत्र भासत आहे." आपल्या सर्वोत्तम व बुद्धिमान शिष्यास दिलेला बोध पक्का राहावा म्हणून दत्तात्रेयांनी पुनः एकदा सारांशरूपाने सांगितले,

'जी परम समर्थ व पूर्णाहंता धारण करणारी देवी चिती, ती आपल्या इच्छेने किंवा स्वातंत्र्य-नामक मायाशक्तीच्या अद्भुत घटना करणाऱ्या विलक्षण प्रभावाने आदर्शावरील प्रतिबिंबाप्रमाणे आपल्याच स्वरूपावर जगत् भासित करिते. प्रथमतः ती पूर्ण परम चिती पूर्णाहंतेमुळे मोठी विस्तृत असता, आपल्या इच्छेने किंवा स्वातंत्र्याने तिने आपणाला दोन रूपांनी प्रकट केले. त्यात एका अंशामध्ये जेव्हा अपूर्ण अहंभाव प्रकट झाला, तेव्हा अर्थातच त्याचा प्रतियोगी म्हणून दुसरा भाग त्या अहंभावातून बाहेर पडून, म्हणजे अहंस्फूर्तिरहित—अचेतन होऊन, त्या पहिल्या अंशाच्या दृष्टीने बाह्य आणि अव्यक्त असा होऊन राहिला. परशुरामा ! या अपूर्ण अहंभावात्मक प्रथमांशाला 'सदाशिव' असे नाव आहे. नंतर हे अव्यक्त आणि सत् तत्त्व आपणाहून भिन्न आहे असे पाहात असताही हा सदाशिव 'हेच मी' असा एकतेचा अध्यास त्यावर सतत करू लागला. त्यालाच पुढे इच्छा होऊन विविध जगत् उत्पन्न करावेसे वाटले; तेव्हा ते अव्यक्त तत्त्व म्हणजे जो याचा देह, त्यावर 'तो माझा देह नव्हे, तो मीच आहे' असे समजून त्याने तसेच चिंतन दृढ केले. तेव्हा हा अहंभावनेने अव्यक्त तत्त्वात समाविष्ट झालेला ईश्वरच ब्रह्मा, विष्णू व शंकर अशा तीन प्रकारचा झाला. नंतर दृश्य आणि द्रष्टा यांच्या मोठ्या राशीचा समुदाय अशी ब्रह्मांडे भासमान करणारे पुष्कळ ब्रह्मदेव झाले; त्या ब्रह्मांडाची संस्थिती ठेवणारे विष्णू पुष्कळ झाले. तसेच त्यांच्या संहारासाठी अनेक रुद्रही निर्माण झाले. अशा तऱ्हेने हे जग आकारास आले. म्हणजेच परशुरामा ! हे जग केवळ आरशातील प्रतिबिंबाप्रमाणे भासत आहे !

'वस्तुत' काही उत्पन्न झालेच नाही. एक परम चिती पूर्ण अहंभावाने सर्वदा स्थित असून, तीच अनेक अपूर्ण अहंकारांनी स्वरूपात विकसित झाली आहे. परशुरामा ! तू जसा सर्व देहभर अहंभावाने व्यापक असूनही पुनः नेत्रादि निरनिराळ्या अंशावर अहंकार धरून त्या त्या क्रिया करतोस, त्याप्रमाणे एक परम संवित् पूर्णाहंतारूपात्मक असताही ती ब्रह्मदेवापासून एखाद्या शुष्क काष्ठापर्यंत सर्वांच्या ठिकाणी अहंकाराने स्थित आहे हे सर्व भासमान होते ही ती एक चितीच होय. सर्व देहावर अहंभाव ठेवणाऱ्या तुला रूपरसादिकांचे ग्रहण करण्यास स्वतः सामर्थ्य नसल्यामुळे ज्याप्रमाणे तू इंद्रियांशी तादात्म्य पावून त्यांचे ग्रहण करितोस, तसाच हा सदाशिव स्वतः सर्वभेदरहित असताही ब्रह्मदेवापासून अगदी क्षुद्र जंतूंपर्यंत सर्व जीवराशीशी आतून तादात्म्य पावून, जाणणारा व करणारा होतो परशुरामा ! ?

निर्विकल्प शुद्ध स्वरूप सर्वांना आश्रय असूनही ते स्वत काही जाणत नाही आणि करीतही नाही ! त्याप्रमाणे परम सवित सर्व जगताला आश्रय असूनही जगद्रूप भेद जाणतही नाही आणि करीतही नाही !

' हे सर्व जगत् दर्पणातील प्रतिबिंबाप्रमाणे तिजवरच तिच्याच इच्छेने भासमान होते त्यामुळे प्रतिबिंब पहाणे म्हणजे जसा आरसाच पहाणे, त्याप्रमाणे जगाचा भास हा तिचाच भास आहे येथे असणारा तू किंवा मी किंवा दुसरे सारे द्रष्टे केवळ दृङमात्र आहोत दृश्य सबधाच्या अभावी चिती शुद्धच आहे, दुसरे काय ? घटादी प्रतिबिंबानी युक्त असलेला आरसा घटाचा सबध न धरला तर जसा स्वयशुद्ध व केवलच असतो,– भेद काय तो प्रतिबिंबाचा, त्याप्रमाणे विकल्पाने उत्पन्न झालेल्या दृश्यभासाचे निरसन होताच उरणारी परम सवित् केवळ एकीएक अद्वयच आहे. तिच्या ठिकाणी दु खाचा लेशमात्र स्पर्श नसल्याने ती महाआनदघन आहे ज्या अर्थी सर्वांना तिच्या प्राप्तीची इच्छा आहे, त्या अर्थीही सर्व आनद हेच तिचे स्वरूप होय सुख हेच आत्म्याचे स्वरूप आहे, कारण सुखच सर्वांना हवेहवेसे आहे त्यासाठीच देहादिकाची आवश्यकता किंबहुना लोभ उत्पन्न होतो ते कोणालाही नकोसे होत नाही आणि विषयानद हा त्याचाच अंश म्हणून म्हणतात तो आनद सुषुप्तीत, तसेच एखादे सकट वगैरे दूर झाल्यावर, अशा दोन प्रसगी सर्वांना अनुभवास येतो एखाद्या सुखोत्पादक साधनावाचून म्हणजे केवळ निर्निमित्त असा जो आनद अनुभवास येतो, तोच स्वरूपानद

' चित् हेच सर्वांचे अभीष्ट असल्यामुळे चित् हाच आनद होय हे स्वात्मस्वरूपभूत महासुख मूढाना ओळखत नाही हे सुख व्यक्त होण्याला जे अनेक बाह्य विषय कारण होतात, त्यावरून ते या महासुखाला बाह्यसुख म्हणून समजतात ! ज्याप्रमाणे गारगच्नात् आरशावर उमटलेली प्रतिबिंबे, तो आरसा आहे असे कळून आले नाही तोवर, ते निरनिराळे पदार्थच आहेत असे भासते, मग त्याचे प्रतिबिंबत्व माहीत झाले म्हणजे पूर्ववत ती भासमान होत असताही दर्पणाहून भिन्न भासत नाहीत, आणि आरसा शुद्धच असतो, त्याप्रमाणे तत्त्वज्ञान झालेल्या पुरुषाला जगत् भासमान होत असताही ते स्वस्वरूपभूतच असते, त्याहून निराळे नसते ज्याप्रमाणे मातीच्या ठिकाणी घट, किंवा सुवर्णाच्या ठिकाणी अलकार किंवा पाषाणाच्या ठिकाणी मूर्ती भासते, त्याप्रमाणे चिद्रूप आत्म्यावर हे जगत् भासते, मग ते निराळे कोठे आहे ? पण एवढ्यावरून परशुरामा ! जगत् मुळीच नाही असा सिद्धान्त तू करू नकोस जगत् नाही ही भावना अपूर्ण होय, व जगत् नाही असा भलताच सिद्धान्त सिद्धही होत नाही कारण सर्व जगाचा निरास केला तरी ते जग निरास करणाऱ्या आत्म्याच्या रूपाने पुन रहातच असल्यामुळे 'जगत् मुळीच नाही' अशासारखे शाप देऊन जगाचा लय कसा होणार ? आदर्शातील नगर असे वस्तुत नाही, तरी आदर्शाच्या स्वरूपाने आहेच, त्याप्रमाणे जग हे जगद्रूपाने नसले तरी चिदात्मरूपाने आहे, हे उघड आहे याचेच नाव पूर्ण ज्ञान कारण येथे हे भासमान होणारे जगत् नाही अशी भावना धरून जो स्वरूपाचा सकोच व्हावयाचा, तो होत नाही आदर्शच ज्याप्रमाणे बाह्य निमित्ताने नगररूपाला प्राप्त होतो, त्याप्रमाणे केवळ दृक् हीच आपल्या स्वरूपभूत माहात्म्याने दृश्यस्वरूपाला प्राप्त झाली आहे हेच सर्व शास्त्राचे सार आहे बध नाही आणि मोक्ष नाही, तसेच साधक नाही आणि साधनही नाही असड, अद्वय, चिच्छक्ती त्रिपुराच एक सर्वथा भासत आहे तीच अविद्या आणि तीच विद्या बधही तीच व मोक्षही तीच आणि मोक्षाचे साधनही तीच परशुरामा ! एवढेच काय ते ज्ञेय, दुसरे काही नाही ह्या विज्ञानाचा क्रम तुला अगदी मुळापासून सांगितला आहे हे एवढे उत्तम

रीतीने जाणून घेतल्यावर पुरुषाला पुन्हा केव्हाच शोक करण्याच प्रसंग येत नाही.'

असा हा श्रीदत्तभार्गवसंवाद तत्त्वबोधात्मक असून सांप्रदायिकांना प्रिय आहे. 'त्रिपुरारहस्या'-तील ज्ञानखंडाचे तात्पर्य वरीलप्रमाणे आहे.

## 'अवधूतगीते'तील अद्वैतबोध

दत्तपंथीयाचे तत्त्वज्ञान प्रामुख्याने अद्वैताचे प्रतिपादन करणारे आहे असे आपल्या ध्यानात आले असेलच. याच तत्त्वज्ञानाचे संपूर्ण दर्शन घडविणारी 'अवधूत गीता' या संदर्भात महत्त्वाची मानावी लागेल. या गीतेचा श्रोता आहे श्रीकार्तिकेय स्वामी. हा पार्वतीचा ज्येष्ठ पुत्र. श्रीगणेशाचा थोरला भाऊ. आणि वक्ता आहे प्रत्यक्ष भगवान श्रीदत्तात्रेय. यात 'आत्मसंवित्युपदेश' असल्याचे प्रत्येक अध्यायाच्या शेवटच्या निर्देशावरून स्पष्ट होते. संवित्ति म्हणजे पूर्ण ज्ञान. आत्मा व परमात्मा, जीव व शिव याच्या ऐक्याचे पूर्ण ज्ञान म्हणजे अवधूतगीतेचा गाभाच होय. जीवापासून शिव, आत्म्यापासून परमात्मा केव्हाच वेगळा नसल्याची ग्वाही अनेक दृष्टान्त आणि पर्याय सुचवून अवधूत दत्तात्रेय येथे देत असताना दिसतात. 'आत्मैव केवलं सर्वं भेदाभेदो न विद्यते।' (१.३) सर्वव्यापक असा केवळ आत्माच असून कसल्याही प्रकारचा भेदाभेद असू शकत नाही. हेच वेदान्ताचे सारसर्वस्व असून 'अहमात्मा निराकारः सर्वव्यापी स्वभावतः।' (१.५) मीच आत्मा निराकार व सर्वव्यापी असल्याचे दत्तअवधूत सांगतात आणि परमात्माही प्रकाशमान व अवयवरहित असा आहे. तो स्वभावतःच निर्मळ व शुद्ध स्वरूपाचा आहे. तो अव्यय, अनन्त, शुद्ध ज्ञानस्वरुप आणि सुखदुःखातीत आहे. 'आत्मानं सततं विद्धि सर्वत्रैकं निरंतरम्।' (१.१२) एकच आत्मा सर्वत्र आहे असे जाणावे. 'न जातो न मृतोऽसि त्वं न ते देहः कदाचन। सर्वं ब्रह्मेति विख्यातं ब्रवीति बहुधा श्रुतिः।' (१.१३) तो आत्मा जन्म पावत नाही, त्याला मृत्यू नाही, त्याला देह कोठून असणार? सर्व जगच ब्रह्मरूप, आत्मरूप असल्याचे श्रुतीही सांगतात. आत बाहेर जो चैतन्यस्वरूपाने नटतो तो शिवस्वरूपाचा असल्याने त्याच्या शोधासाठी पिशाचाप्रमाणे वणवण करीत हिंडण्याची जरूरी नाही. 'जन्ममृत्युर्न ते चित्त बन्धमोक्षौ शुभाशुभौ। कथं रोदिषि रे वत्स नमरूपं न ते मे।(१.१७) बाळा, जन्म, मृत्यू, बंध, मोक्ष, शुभ, अशुभ हे चित्ताचे धर्म तुला लागू नाहीत. कारण मी स्वयंभू परमात्मा असून माझाच अंश तू आहेस. तूच निश्चयाने आत्मरूप आहेस. तू विकाररहित, रागरहित, कामरहित असल्याने संतप्त तरी कशासाठी होतोस?

'साकारमनृतं विद्धि निराकारं निरंतरम्' (१.२१) साकार व सगुण जे आहे ते खोटे आहे असे समज. तू मात्र निराकार, शुद्ध, एकरस, देहरहित, जन्मरहित, नाशरहित आहेस. 'तत्त्वमस्यादि' वाक्यानी खरे म्हणजे आपल्या आत्म्याचेच प्रतिपादन होत असते. 'विशुद्धोऽसि समं तत्वं विदेहमजमव्ययम्। विभ्रमं कथमात्मार्थे विभ्रान्तोऽहं कथं पुनः॥ घटे भिन्ने घटाकाशं सुलीनं भेदवर्जितम्। शिवेन मनसा शुद्धो न भेदः प्रतिभाति मे॥' (१.३०-३१) तू विशुद्ध आहेस, समत्वाने आहेस, विदेही आहेस, अव्यय म्हणजे नाशरहित आहेस. घटाचा नाश झाल्यावर घटाकाश आपोआप आकाशात विलीन होते, त्याप्रमाणे शरीराची उपाधी सुटल्यावर आत्मा परमात्वतत्त्वाशी समरस होतो. घट नसेल तर घटाकाशही नसते. त्याप्रमाणे देहधारी जीवाचे जीवत्व मुक्त असून ते केवळ परमात्मस्वरूपच असते. आत्मतत्त्व सर्वत्र भरून राहिलेले असून ते नित्य व अचल आहे. व्याप्यव्यापकभावाच्या विरहित आहे. त्याला श्वेतादी रंग वा

वर्ण नाही, शब्दादी गुण नाहीत. मनवाचेस तो अगोचर आहे. ब्रह्माप्रमाणेच अथवा परमात्म्याप्रमाणेच जीव अथवा आत्मा हाही चैतन्यरूप व अनादी आहे. जीव व ब्रह्म यांचा अभेद आहे. येथे कोणी कोणाचे ध्यान करावयाचे? इंद्रियाच्या कर्माशी आत्म्याचा कसा संबंध असणार? कारण आत्मा शुद्ध, मलरहित, जन्मरहित, नाशरहित आहे. 'सत्त्वं त्वं नहि सदेहः किं जानाम्यथवा पुनः। असंवेद्यं स्वसंवेद्यमात्मानं मन्यसे कथम्।' (१.४२) तू तेच रूप आहेस असा निश्चय असताना स्वत.ला वेगळा समजून त्याला जाणण्याचा प्रयत्न कशासाठी?

आत्मतत्त्वाला आदि, मध्य, अन्त या अवस्था नाहीत. त्याला बद्धता नाही, म्हणून मुक्तताही नाही. स्वभावाने ते तत्त्व मूळचेच अतिशय निर्मळ असे आहे. सर्वत्र ब्रह्मतत्त्व व्यापून असल्याने वर्णाश्रमस्थिती तरी कशी संभवणार? (१.४५) हा आत्मा नपुंसक नाही, पुरुष नाही की स्त्रीही नाही. तो बोधस्वरूपाचा नाही की कल्पनास्वरूपही नाही. तो आनंदासहित असल्याने त्याला तू जाणतोस तरी कसे? षडंगयोगाने अथवा मनोनाशाने आत्मा शुद्ध होत नाही; कारण तो स्वभावत.च शुद्ध व निर्मळ आहे. (१.४८) 'न बद्धो नैव मुक्तोऽहं न चाहं ब्रह्मणः पृथक्। न कर्ता न च भोक्ताहं व्याप्यव्यापकवर्जितः।(१.५०)मी म्हणजे आत्मा बांधलेला नाही की मुक्तही नाही. मी ब्रह्मापासून वेगळा नाही. करणारा, भोगणारा मी नाही. व्याप्य व व्यापक यांपासूनही मी वेगळा आहे. पाणी पाण्यात फेकल्यावर कधी वेगळे भासते काय? हा आत्मा गगनाप्रमाणे सर्वव्यापी आहे. तो ज्ञान व अज्ञान यांच्या पलीकडील बोधस्वरूपाचा आहे. दुसऱ्या ज्ञानाने, तर्काने, समाधीयोगाने, गुरुपदेशाने तो आकलन होतो असे नाही. तो आकाशाप्रमाणे स्वभावत.च सर्वव्यापक असा आहे; साकार आणि निराकार यांच्या पलीकडचे, भेदाभेदाच्या पलीकडचे शिवतत्त्व सर्वव्यापी आहे. आत्मस्वरूपात दिवस-रात्र, उदयास्त, सुखदुःख; हे भाव नसतात. कर्म करणे अथवा त्या कर्माचे फळ भोगणे या गोष्टी आत्म्याला माहीत नाहीत. राग-दुःखादी देहविकार त्याला नसतात.

हे आत्मतत्त्व सारासाररहित असे सूक्ष्म व कल्याणरूप आहे. मृदू वस्तूतील कोमलता, कठीण वस्तूतील काठिण्य, गुळातील गोडी, कडू वस्तूतील कडवटपणा, पाण्यातील थंडपणा असे अंगभूत गुण जसे वस्तूपासून वेगळे दिसत नाहीत, त्याप्रमाणे प्रकृतिरूप जगत् आत्मरूप पुरुषापासून वेगळे नसते. हा आत्मा नामरूपातीत आहे. सूक्ष्मापेक्षाही सूक्ष्म आहे. मन, बुद्धी व इंद्रिये यांच्या पलीकडचा आहे. अकलंक आहे. चेतनयुक्त, दोषरहित असे आत्मतत्त्व सर्वव्यापी आहे. तो चलनवलन करीत नाही; वारा त्याला चलित करू शकत नाही, की पाण्याने तो भिजला जात नाही. नेहमी तेजात राहणारा आत्मा प्रकाशमय आहे. 'बाह्यभावं भवेद्विश्वमन्तः प्रकृतिरुच्यते। अन्तरादन्तरं ज्ञेयं नारिकेलफलाम्बुवत्।' (२.१९) बाहेरच्या पदार्थमात्राला विश्व असे नाव असून आतील भावास प्रकृती असे म्हणतात. त्या अन्तर्भागातही जे अत्यंत सूक्ष्म आहे, त्याला आपण जाणले पाहिजे. नारळाच्या कठीण कवचाच्या आत ज्याप्रमाणे शुद्ध पाणी असते, तसे चेतनस्वरूपाचे आत्मतत्त्व जाणून घ्यावयास हवे. बाहेरच्या विश्वाचे ज्ञान हे भ्रांतिरूप असून सूक्ष्मरूपाचे ज्ञान हेच खरे ज्ञान होय. पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणे आत्मा निर्मळ व स्वच्छ असतो. 'घटे भिन्ने घटाकाश आकाशे लीयते तथा। देहाभावे तथा योगी स्वरूपे परमात्मनि' (२.२५) घटाचा नाश झाला की घटाकाशही संपते, महाकाशात ते लीन होते. त्याप्रमाणे देहभाव संपल्यावर जीवन्मुक्त परमात्म्याच्या रूपात विलीन होतो.

हे आत्मतत्त्व शिवरूप म्हणजे कल्याणस्वरूप आहे. त्याला ना कोणता रंग, ना कोणता गुण. ते कोणापासून निर्माण झालेले नसल्याने त्याच्या ठिकाणी दोष या अज्ञान नसते. ते निर्धूम म्हणजे धुरापासून वेगळे व प्रकाशरूप असते. त्याला दिवा प्रकाशित करणार तरी कसा ? तो निष्काम आहे, निःसंग आहे, निःसार आहे तो स्थूल नाही की कृश नाही. त्याला चलनवलन नाही. 'सत्य वदामि खलु वै परमार्थतत्त्वं । ज्ञानामृत समरस गगनोपमोऽहम् ।' (३.६) हा परमात्मा ज्ञानरूपी अमृतासारखा एकरस आहे. तो बद्धमुक्तीच्या पलीकडचा आहे. सर्व कर्मापासून, दुःखापासून तो वेगळा असला तरी सर्व कर्मांचा नाश करणारा अग्नी आहे. तो पापरहित असला तरी पापाचा नाश करणारा आहे. धर्मरहित असला तरी अधर्माचा नाश करणारा आहे. बंधनरहित असला तरी बंधनाचा नाश करणारा आहे. तो मोहरहित अथवा मोहसहित नाही. तो शोकरूप अथवा शोकरहित नाही. तो लोभरहित अथवा लोभसहित नाही. त्याला संसारसंततिलता नाही की संतोषसंततिसुख नाही. त्याला अज्ञानाचे बंधन नाही. तो मुळातच आकाशाप्रमाणे ज्ञानरूप अमृतासारखा एकरस आहे. त्याला संसाराचे विकार नाहीत की संतापरूपी विकाराचा त्रास त्याला नाही. संताप देणारे दुःखाचे मार्ग त्याला माहीत नाहीत, की संतापाच्या योगाने निर्माण होणारे विकारी मन त्याला माहीत नसते. तो कधी भीतीने कापत नाही की संकल्पविकल्पाच्या भानगडीत तो कधी नसतो.

निद्रा व जागृती यापासून तो वेगळा आहे. हित-अहित, सार-निःसार, चर-अचर याच्या पलीकडचा तो आहे. रागद्वेषादी दोषांपासून तो अलिप्त आहे. जागृती, स्वप्न, सुषुप्ती, तुरीय या अवस्था त्याला लागू पडत नाहीत. कारण तो ब्रह्मस्वरूप शांत व परमार्थरूप आहे. त्याच्यात लांब, लहान, सूक्ष्म, ऱ्हस्व असा प्रकार नाही. गोलाकार, त्रिकोणाकार असे भाग नाहीत. त्याला ना आईबाप, ना स्त्रीपुत्र त्यामुळे तो निर्व्याकुल असा आहे. तो अतिशुद्ध, विचाररहित, निर्लेप, नाशरहित आहे तो शुद्ध असून सर्वत्र भरलेला आहे. तो कर्मरहित असूनही नाना प्रकारची कामं करणारा, संगरहित असून विनोद करणारा, देहरहित असूनही आनंदी आहे. कुटिलता, कपट, ढोंग आदि विकार त्याला नसतात. संध्याकाळ, सकाळ, माध्यान्ह अशा काळापासून तो अलिप्त आहे. तो बहिरा नाही की मुका नाही. त्याचा कोणी मालक नाही किंवा तो कोणाचा मालक नाही. जन्म-मरण, सुखदुःख हे विकार त्याला नाहीत. त्याला कसलीच देहाची लक्षणे नतात. (३. ३-४२)

या सर्वात्मक चेतनस्वरूप आत्म्याची पूजा होऊ शकत नाही. पानेंफुले त्याला कशी वाहाता येतील ? त्याचे ध्यान मंत्रपूर्वक कसे करता येईल ? सर्वत्र समत्वाची दृष्टी ठेवणे हीच त्याची पूजा होय. कारण त्याला ना रूप, ना गुण, ना संकल्प, ना जन्म, ना मरण. तो रोगरहित असतो. ज्ञान व अज्ञान याच्या पलीकडचा तो आहे. बंध आणि मोक्ष हे त्याच्यापासून निर्माण होणारे असल्याने तो त्यात सापडत नाही. पर-अपर असे भाव त्याच्यात नसतात. तो उपासक नसतो की उपास्यही नसतो. तो कोणाच्याही आश्रयावर नसतो. ग्राह्य-ग्राहक असा प्रकार त्याच्यात नाही. कार्यकारणभाव त्याच्यात नसतो. तो कोणाचा भेद करीत नाही; तर त्याचा भेद कोणी करू शकत नाही. तो शरीररहित अथवा शरीरी नाही. मन, बुद्धी, इंद्रिये यांचा विकार त्याला नसतो. त्यामुळे इंद्रियांना जिंकणे या न जिंकणे हा भावच त्याच्या ठिकाणी नसतो. जयपराजय हे भाव त्याला नसतात. तो मूर्ख नाही की पंडित नाही. तर्ककुतर्क त्याच्याजवळ नसतात. त्याला आई, बाप, कुळ, जात

यांपैकी काही नसते. जन्ममरणरूपी संसारापासून तो अलिप्त असतो.

ॐकाराचा उच्चार हा ब्रह्माचा वाचक आहे. एकरसपणाने हे ब्रह्मी तत्त्व सर्वत्र भरून आहे ज्ञान-अज्ञान, देश-विदेश, काल-अकाल असा प्रकार या ब्रह्मतत्त्वात नाही. निराकार, निरवय, आत्मस्वरूपात लांब, आखूड, गोलाकार कोणाकार असा प्रकार नाही या आत्मस्वरूपात शून्य व अशून्य असाही भेद नाही. तो सर्वांपासून भिन्न अथवा अभिन्न असेही नाही तो जगापासून वेगळा आहे अथवा नाही, आत आहे, बाहेर आहे असेही नाही. तो कोणाचा शत्रू नाही की मित्र नाही. त्याच्यात शिष्यभावना नाही. रूप-अरूप, भेद-अभेद, उत्पत्ती-प्रलय याच्या पलीकडचा तो आहे तो सगुणनिर्गुणापासून वेगळा आहे. सर्वव्यापक असा आत्मा निश्चल आहे. त्याला हातपाय नाहीत, पण तो सर्वत्र व्यापून असतो त्याला काळ व्यापू शकत नाही की तेज प्रकाशित करू शकत नाही. त्याला विधि-निषेध नसतो. सुखदु:ख नसते. सारसहित अथवा साररहित कर्म त्याच्यात नसते. आत्मा हा अद्वितीय, सर्वव्यापी व कल्याणकारी असा आहे. त्याला कोणत्याही प्रकारचे आश्रम वा वर्ण नसतात. ज्ञान-अज्ञान, विचार-अविचार असे भावही त्याच्यात नसतात ' त्वमह नहि हत कदाचिदपि कुलजातिविचारमसत्यमिति । अहमेव शिवः परमार्थ इति अभिवादनमत्र करोमि कथम् ? ' ( ६.२२ ) हा मी, हा तू अशा तऱ्हेचा भेद येथे नसतो. कुळ, जात याच्याविषयी खोटा विचार येथे नसतो तो अद्वैतरूपी असल्याकारणाने त्याला नमस्कार तरी कसा करावा ? या ब्रह्मस्वरूपात हा गुरू, हा शिष्य असा भाव नसल्यामुळे नमस्कार कसा करता येईल? अशा रीतीने अवधूतगीतेच्या सर्व अध्यायातून ऐक्यभावाचे या अद्वैतबोधाचे सुरेख दर्शन दत्तगुरूपासून उभे राहिले आहे.

# 'श्रीगुरुगीते'तील गुरुतत्त्व

दत्तपंथीयात श्रीगुरूला व गुरुपरंपरेला अतिशय महत्त्व असते. श्रीदत्तात्रेयांना 'श्रीगुरुदेवदत्त' असेच म्हणतात. गुरुतत्त्वाचा आविष्कार श्रीगुरुगीतेत उत्तम प्रकारचा झालेला असल्याने दत्तपंथीयात या लहानशा ग्रंथास अतिशय महत्त्व आहे. परमतत्त्वाचा साक्षात्कार श्रीगुरूच्या कृपेशिवाय होत नसल्याने श्रीगुरूस परमेश्वरापेक्षा महत्त्व आहे. परम गुह्याचा बोध केवळ श्रीगुरुकृपेनेच होत असल्याची साक्ष अनेकांची आहे. माता, पिता याच्यापेक्षाही श्रीगुरूला महत्त्व अधिक आहे. ब्रह्माण्डपुराणात श्रीगुरूचे महत्त्व सांगताना म्हटले आहे–

मनुष्यचर्मणा बद्धः साक्षात्परशिवः स्वयम् ।
सच्छिष्यानुग्रहार्थाय गूढं पर्यटति क्षितौ ।
अत्रिनेत्रः शिवः साक्षादचतुर्बाहुरच्युतः ।
अचतुर्वदनो ब्रह्मा श्रीगुरुः कथितः प्रिये ॥

माणसाच्या कातडीत बांधलेला मानवदेहधारी गुरू हा साक्षात परमशिव होय. तो सच्छिष्यावर अनुग्रह करण्यासाठीच पृथ्वीवर भ्रमण करीत असतो. प्रिये, श्रीगुरू हा त्रिनेत्र नसलेला शिव, चतुर्भुज नसलेला विष्णू व चतुर्मुख नसलेला ब्रह्मा आहे. 'गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः । गुरुः साक्षात् परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ।' गुरू हा ब्रह्मा, विष्णू व महेश्वर असून तो साक्षात् परब्रह्म आहे. त्या गुरूला नमस्कार असो.

श्रीगुरुगीतेचे स्वरूपही संवादात्मक आहे. रम्य अशा कैलासाच्या शिखरावर भक्तीचे साधन करण्यात कुशल असलेल्या श्रीशंकराला मोठ्या भक्तीने प्रणाम करून पार्वतीने प्रश्न विचारला, 'देवदेवेश, परात्पर जगद्गुरो, सदाशिव, महादेव, मला गुरुदीक्षा द्यावी. स्वामी, देहधारी असतानाही कोणत्या मार्गाने गेल्यावर ब्रह्मय

होता यईल?' देवीच्या या प्रश्नाने भगवान शिवशंकर प्रसन्न झाले. शंकरांनी तिला स्पष्ट्च सांगितले, 'गुरुं विना ब्रह्म नान्यत्–' श्रीगुरूशिवाय दुसरे ब्रह्म नाही. ज्ञानस्वरूप आत्म्याहून श्रीगुरू भिन्न नाही. गुरू शब्दाने आत्मज्ञानाच्या प्रकाशाचा उदय होतो. श्रीगुरूच्या चरणसेवेने सर्व पापांतून मुक्तता मिळते. देहधारी जीव ब्रह्मरूप होतो. श्रीगुरुचरणांवरील जल मस्तकी धारण केल्यास सर्व तीर्थांत स्नान केल्याचे श्रेय मिळते. ते ज्ञानवर्धक, पापनाशक आहे. अज्ञानाचे मूळ नाहीसे करणारे, जन्म व कर्म यांचे निवारण करणारे व ज्ञान व वैराग्य यांची प्राप्ती करून देणारे आहे. 'काशीक्षेत्रं तन्निवासो, जान्हवी चरणोदकम्। गुरुर्विश्वेश्वरः साक्षात्, तारकं ब्रह्म निश्चितम्।' (गुरुगीता. १६) श्रीगुरूंचे निवासस्थान म्हणजे काशीक्षेत्र, त्यांचे चरणतीर्थ म्हणजे गंगा, श्रीगुरू म्हणजे प्रत्यक्ष श्रीकाशीविश्वेश्वर समजावेत. श्रीगुरू हे तारणारे निश्चित स्वरूपाचे परब्रह्मच होत. श्रीगुरू हीच गया. अक्षयवटही श्रीगुरूच. श्रीगुरू हेच एकमेव दैवत मानावे. कुलीन स्त्री ज्याप्रमाणे आपल्या पतीचे चिंतन करते, त्याप्रमाणे श्रीगुरूचे सतत चिंतनमनन करावे.

'गुरु' या शब्दाचा अर्थ सांगताना श्रीगुरुगीता म्हणते, 'गुकारस्त्वन्धकारश्च, रुकारस्तेज उच्यते। अज्ञानग्रासकं ब्रह्म, गुरुरेव न संशयः।' (२३) गु या अक्षराचा अर्थ अज्ञानाचा अंधकार होय. रु या अक्षराचा अर्थ ज्ञानप्रकाश असा असून अज्ञानाचा नाश करणारे सगुण ब्रह्म म्हणजेच गुरु होय यात मुळीच संशय नाही. गुकार हा पहिला वर्ण मायादी गुण प्रकट करणारा असून दुसरा रु हा वर्ण ब्रह्मस्वरूप असून तो मायानिर्मित भ्रम दूर करणारा आहे (२४) अशा या श्रीगुरूला संतुष्ट करण्यामाठी आसन, शयन, वस्त्र, भूषण, वाहन इत्यादी अर्पण करावे. शरीर, इंद्रिये, प्राण इतकेच नव्हे तर 'आत्मदारादिकं सर्वं'–पत्नीपासून सर्व प्रिय व्यक्ती गुरुकार्यासाठी आहेत असे मानावे. (२९) कारण हे श्रीगुरू संसारवृक्षावर आरूढ होऊन नरकार्णवात पतन पावलेल्याचा उद्धार करतात. श्रीगुरुगीतेतही सांगितले आहे की 'गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः। गुरुरेव परब्रह्म, तस्मै श्रीगुरवे नमः।'(३२) हा गुरू काय करतो? तर 'अज्ञानतिमिरांधस्य, ज्ञानांजनशलाकया। चक्षुरुन्मीलितं येन, तस्मै श्रीगुरवे नमः॥' (३४) अज्ञानतिमिराने अंध झालेल्या या जीवाच्या नेत्रांत श्रीगुरू अंजनशलाकेने ज्ञानांजन घालून त्याचे दिव्य चक्षू उघडतो. त्याला आत्मस्वरूपाचा प्रकाश दाखवितो. म्हणून गुरु हाच पिता, गुरु हाच माता, गुरु हाच बंधू होय. त्याच्यामुळेच जगाला अस्तित्व असून त्याच्या प्रकाशाने जग प्रकाशते. त्याच्या आनंदी वृत्तीमुळे जग आनंदित होते. तो सूर्यरूप असल्यामुळे सर्वांना प्रकाश देतो. त्याच्या प्रीतीमुळे पुत्रादी सर्व प्रिय वाटतात. त्याच्याचमुळे या विश्वाला सजीवता प्राप्त होते. अद्वैताचा साक्षात्कार त्याच्यामुळेच होतो. जगाचे मूळकारण म्हणजे श्रीगुरु. जगातील विविध रूपे ही गुरुस्वरूपच होत.

श्रीगुरु फार प्रेमळ असतो. शंकर रागावला तर गुरू पाठीराखा असतो. अशा या गुरूचे स्मरण सतत असावे. गुरू शब्दाची फोड करताना पुनः एकदा म्हटले आहे, 'गुकारं च गुणातीतं, रुकारं रूपवर्जितम्' (४६)– 'गु' अक्षराने गुणातीत व 'रु' अक्षराने रूपातीत असे स्वरूप असून रूपगुणाच्या पलीकडे रमणाऱ्या निर्गुणनिराकार ब्रह्मपदाचा साक्षात्कार जो करून देतो तोच श्रीगुरु होय. पुन गुरुगीतेतही म्हटले आहे, 'अ-त्रिनेत्रः सर्वसाक्षि, अ-चतुर्बाहुरच्युतः। अ-चतुर्वदनो ब्रह्मा श्रीगुरुः कथितः प्रिये।' (४७) अशा प्रकारे श्रीगुरूत तीन देवांचे ऐक्य असते. श्रीगुरूची भक्ती म्हणजे एक पूर्ण योगच आहे. गुरूच्या स्वरूपाचे, मूर्तीचे चिंतन म्हणजे शिवाचे ध्यान होय. गुरु व सदाशिव एकच होत. त्याच्या

चरणधुलीचा एक कणही संसारसागर तरुन नेण्यास समर्थ असतो. या गुरुची उपासना कशी करावी, त्याचे ध्यान कसे करावे, यासबंधीचे मार्गदर्शनही गुरुगीतेत आहे आनदस्वरूप गुरुतत्त्व गतिशील आहे, अचलही आहे. ते दूर आहे व जवळ पण आहे ते सर्वाच्या अतरी आहे, बाहेर आहे (६२) आत्मस्वरूप गुरु जन्मरहित आहे. त्याला वृद्धत्व नाही. आदिअत नाही. तो सतत ज्ञानमय, आनंदमय असतो तो अणूहून लहान व मोठ्याहून मोठा असतो गुरुसारखा एक गुरुच होय. या गुरुचे ज्ञान म्हणजेच ब्रह्मज्ञान.

हा श्रीगुरू आणखी कसा आहे ? 'अखण्ड-मण्डलाकारं, व्याप्तं येन चराचरम्। तत्पदं दर्शितं येन, तस्मै श्रीगुरवे नमः।' (६७) श्रीगुरुने चराचर असे खडित न होणारे वर्तुळाकार मंडळ व्यापिले आहे. तो ब्रह्मपद दाखविणारा असल्याने त्याला नमस्कार असो. त्याचे चरणकमल सर्व वेदाच्या मुकुटमणीरूप महावाक्यांनी सुशोभित असून तो त्या वेदान्तरूप कमळाला विकसित करणारा सूर्यच आहे. त्याच्या स्मरणानेंही ज्ञान होते. तो चैतन्यरूप आहे. शाश्वत, शांत, आकाशादिपेक्षा सूक्ष्म, निरंजन, नादातीत, बिंदूतीत, कलातीत अशा या श्रीगुरुंना नमस्कार असो (७०). या श्रीगुरुने सर्व स्थावरजगम, सजीवनिर्जीव विश्व व्यापले आहे. हा आत्मज्ञानाच्या शक्तीवर आरूढ झालेला असून भोग व मोक्ष याचा दाता आहे. हा गुरु म्हणजे प्रखर ज्ञानाग्नीच होय. या गुरुचे माहात्म्य केवढे ? तर 'न गुरोरधिकं तत्त्वं न गुरोरधिकं तपः। तत्त्वं ज्ञानात्परं नास्ति, तस्मै श्रीगुरवे नमः।' (७४) श्रीगुरुहून श्रेष्ठ असे दुसरे काही नाही. गुरसेवेवाचून दुसरे तप नाही. त्याच्या ज्ञानाखेरीज दुसरे तत्त्वज्ञान नाही. श्रीगुरु हाच खरा जगाचा स्वामी होय. हा गुरू प्रथमपासून आहे. हा सर्वांचे उगमस्थान आहे. गुरुचरणाच्या तीर्थामुळे सप्तसागरातील स्नानाचे पुण्य मिळते. गुरूशिवाय कोणीच श्रेष्ठ नाही. या श्रीगुरूच्याच कृपाप्रसादाने ब्रह्मा, विष्णू व महेश यांनी जगाची उत्पत्ती, स्थिती व सहार असे कार्य केले. गुरुसेवेवाचून कोणीच मुक्त होत नाही. या गुरूच्या ध्यानामुळे आनंद मिळतो. हा गुरू आणखी कसा आहे ?

ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं।
द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम्॥
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं।
भावातीतं त्रिगुणरहितं सद्‌गुरुं तं नमामि॥(८९)

हा श्रीगुरु ब्रह्मानंदरूपी आहे. परमसुखाचा दाता आहे. केवळ ज्ञानरूप आहे. सुखदुःखादी द्वंद्वरहित आहे. आकाशासारखा निर्लेप व विशाल आहे. 'तत्त्वमसि' सारख्या महावाक्यांचा अनुभव आणून देणारा आहे. एक, नित्य, विमल, निश्चल सर्वांच्या बुद्धीचा साक्षी, भावातीत, त्रिगुणरहित अशा या सद्‌गुरूला माझा नमस्कार असो. तो नित्य, शुद्ध, आभासरहित, निराकार, निरंजन, नित्य, बोधरूप, चिदानंदरूप, आहे (९०). या श्रीगुरुचे ध्यान कसे करावे तेही पुढल्या तीन श्लोकात सांगितले आहे.

श्रीगुरू हा आनंदस्वरूप असून प्रसन्नमुख, ज्ञानस्वरूप, आत्मबोधयुक्त, योगीश्वर, स्तुती करण्यास योग्य, संसाररूपी रोगावर औषध देणारा वैद्य आहे; अशा विविधरूपी श्रीगुरुला नमस्कार असो. या श्रीगुरुच्या आधारानेच सारे जग चालते. श्रीगुरुशिवाय दुसरे काहीही महत्त्वाचे वा श्रेष्ठ नाही. हे गुरुतत्त्व कल्याणकारी असून त्याच्यामुळे जीवाच्या ठिकाणी आत्मज्ञानाचा उदय आपोआप होतो. श्रीगुरुचे ध्यान कसे करावे, त्याच्याशी बोलावे कसे, यासबंधीही मार्गदर्शन श्रीगुरुगीता करते. 'गुरु' हा खरे म्हणजे दोन अक्षरांचा मंत्रराजच आहे. गुरुसेवेमुळेच संन्यासी सज्ञा मिळते. एका दिव्यापासून दुसरा लावावा, त्याप्रमाणे जो नित्य, निराकार, निर्गुण, निराभास परब्रह्माचा बोध देतो तोच

गुरु होय (१०९). ब्रह्मदेवापासून तृणवत् जीवापर्यंत सर्व स्थावरजंगम, चराचर व्यापणारा गुरू आहे. तो नित्य, पूर्ण, निराकार, निर्गुण आहे. पराहून पर, ध्यानाचे लक्ष्य, नित्य आनंद-दायक, हृदयाकाशात मध्यभागी स्थिर, शुद्ध स्फटिकाप्रमाणे निर्मळ असणाऱ्या श्रीगुरूचे सूक्ष्म ध्यान करावे. त्यातूनच ब्रह्माचा साक्षात्कार होईल. श्रीगुरूचे अखंड ध्यान चिंतनपूर्वक केल्याने ब्रह्मपदाची प्राप्ती होईल.

श्रीगुरुतत्त्वाचे माहात्म्य शंकरांनी सांगितल्या-वर पार्वती आणखी काही तात्त्विक प्रश्न विचारीत आहे. 'महादेवा, पिंड म्हणजे काय ? पद कशास म्हणावे ? रूप म्हणजे काय ? रूपातीत कसे होता येते ?' त्यावर महादेवांनी उत्तर दिले, 'कुंडलिनी शक्तीला 'पिंड' म्हणतात.' 'हंस' म्हणजे पद. 'बिंदू' रूप व निरंजन निराकार परमात्म्याला रूपातीत म्हणतात (१२१). ज्याची कुंडलिनी शक्ती जागृत झाली आहे, ज्याचा प्राण स्थिर झाला आहे, जो निरंजन, निराकार, निर्विकल्प स्थितीत आहे तोच मुक्त होय (१२२). ही स्थिती श्रीगुरूच्या कृपेने प्राप्त होते. श्रीगुरूचे माहात्म्य सांगणारी अशी ही श्रीगुरुगीता मंत्रतुल्य असल्यामुळे सांप्रदायिकांत प्रिय आहे. भक्तिमुक्तिदायिनी अशी ही गुरुगीता गुरुतत्त्वाचा बोध स्पष्ट करणारी आहे. गुरुगीते-खेरीज इतर दुसरा ग्रंथ नाही असे शेवटी म्हटले आहे. श्रीगुरुगीतेच्या या महतीमुळे 'गुरुगीता' अनेक देशी भाषांतून अनुवादित झाली आहे. मराठी भाषेतही 'गुरुगीतेचे' चे अनुवाद बरेच आहेत. पूर्णानंद अवधूत, शिवरामस्वामी, रंग-नाथस्वामी, आत्मानंद, ब्रह्मानंद, चिदानंद, सदा-नंद, समर्थ रामदास, झोळीराम, नागेशशिष्य, नृसिंह माणिकप्रभू, नित्यानंद सरस्वती, श्रीगोपाल-नाथ इत्यादी अनेक संतमहंतांच्या गुरुगीताटीका प्रसिद्ध असून सांप्रदायिकांना तत्त्वबोध देण्यास समर्थ आहेत. रामचंद्र कृष्ण कामत यांनी मोठ्या परिश्रमाने संपादित केलेली श्रीगुरुचरित्रांतर्गत 'श्रीगुरुगीता' साधकांच्या दृष्टीने अतिशय मह-त्त्वाची आहे. दत्तपंथीयांचे गुरुतत्त्वदर्शन या गुरु-गीतेमुळे होण्यासारखे आहे.

## योगप्रक्रियेतील देहविज्ञान

दत्तपंथीयांत योगप्रक्रियेला फारच महत्त्व असल्याचे आपण पाहिले आहे. सहस्रार्जुनास श्रीदत्तात्रेयांनी योगाभ्यासाची शिकवण दिलेली आहे. आदिनाथ, मत्स्येन्द्रनाथ, गोरखनाथ यांची परंपरा प्रामुख्याने योगमार्गावर उभी आहे. गोरखनाथांना बोध दत्तात्रेयांचा असल्याचे आपणांस माहीत आहे. या योगमार्गास तांत्रिकां-चाही पाठिंबा मिळाल्याने हठयोग, राजयोग, तारकयोग, अमनस्क योग, सहजयोग इत्यादी प्रकार योगाचे प्रवर्तित झाले. पैकी हठयोग हा प्रामुख्याने मानवी शरीरावर आधारलेला आहे. योग हा प्रामुख्याने आचारावयाचा धर्म असल्याने त्याचा आणखी विचार आपण पुढल्याच प्रकरणात करू. येथे फक्त हा आचार ज्या देहाने साधा-वयाचा त्या देहाच्या वा शरीराच्या रचनेसंबंधी वा शरीरव्यापाराच्या नियंत्रणासंबंधी जे शास्त्र हा पंथ मानतो त्याचाच फक्त निर्देश करावयाचा आहे. पद्मासन घालून, प्राणायाम करून व त्रिबंध साधून सुषुम्नाद्वारा प्राणवायू ब्रह्मरंध्री नेऊन परमात्मरूपी रममाण होणे हे हठयोगाचे अंतिम ध्येय असल्याने व ते मानवी शरीराच्या साहाय्यानेच साधावयाचे असल्याने पंथीय शरीरविज्ञानाचा थोडक्यात परिचय करून घेणे अगत्याचे आहे.

**षट्चक्रे :** योगी लोकांनी मानवी शरीरात भ्रूमध्याच्या वरच्या भागात सहा चक्रे भ्रूमध्याच्या खालच्या भागात सहा चक्रे मान आहेत. त्रिकुट, श्रीहाट, गोल्हाट, ...

भ्रमरगुफा व ब्रह्मरंध्र ही सहा चक्रे वरच्या ब्रह्मांडातील होत, आणि मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध व आज्ञा अथवा अग्नी ही सहा चक्रे पिंडातील होत (१) मूलाधार हे सर्वांत खालचे चक्र असून ते लिंगाच्या मध्यभागी अधोमुख असते याचा वर्ण अतिरक्त असून हे चतुर्दलाचे मानले आहे त्याची देवता गणेश तान्त्रिकाच्या मताने डाकिनी शक्ती व सद्योजात (ब्रह्मा) याचे वास्तव्य या चक्रात असते हे चक्र पृथ्वीतत्त्वाचे द्योतक आहे याची चार दले जन्म, मृत्यू, जरा, व्याधी दर्शवितात याच्या बीजकोशात एक त्रिकोण असून तो इच्छा, ज्ञान व क्रिया याचा दर्शक आहे याच्याच ठिकाणी साडतीन वलयाची कुंडलिनी निद्रित स्वरूपात असते (२) स्वाधिष्ठान चक्राचे स्थान लिंगमूलात असून त्यात चतुर्भुज नारायण व त्याची शक्ती डाकिनी याचे वास्तव्य असते हे चक्र जलतत्त्वाचे असून त्याला कामभूमी असेही नाव आहे याची सहा दले म्हणजे कामक्रोधादी सहा रिपू होत सामान्य जीवाचे मन येथे जीवात्म-स्वरूपात अधिष्ठित राहाते; म्हणून याला स्वाधिष्ठान चक्र असे नाव आहे (३) मणिपूर हे दहा पाकळ्याचे चक्र नाभिस्थानात असून त्याचा वर्ण निळा आहे हे चक्र तेजस् तत्त्वाचे असून रुद्र व त्याची शक्ती लाकिनी याचे स्थान त्यात आहे कोणी याची देवता विष्णूही मानतात

(४) हृदयदेशात अनाहत नावाचे द्वादशदल चक्र असून ईशान, रुद्र व त्याची शक्ती काकिनी याचे हे स्थान आहे हे चक्र वायुतत्त्वाचे असून या ठिकाणी अनाहत ध्वनी ऐकू येतो ईश्वरी लीलाभूमीचे हे स्थान असून येथे चित्त स्थिर झाल्यास ईश्वर आपल्या देहाची क्रिया कशी चालवितो याचे ज्ञान होते जीवात्म्याचे स्थान म्हणूनही याला ओळखतात (५) विशुद्ध चक्र कंठप्रदेशात असून हे सोळा पाकळ्याचे आहे हे आकाशतत्त्वाचे असून सदाशिव व त्याची शक्ती शाकिनी याचे निवासस्थान आहे . (६) भ्रूमध्याच्या ठिकाणी आज्ञा अथवा अग्निचक्र असून ते दोन पाकळ्याचे आहे शिव आणि त्याची शक्ती हाकिनी याचे वास्तव्य येथे असते. द्रष्टा व दृश्य, भोक्ता व भोग्य याचा भेद पहिल्याच प्रथम येथे लक्षित होतो

योगप्रक्रियेत आणखी एक सातवे सहस्रार-चक्र अथवा सहस्रदलचक्र नावाचे शिरोदेशात सर्वांच्या वर मानले आहे सहस्र हा शब्द अनंतवाचकही मानतात या कमलाच्या मध्य-बिंदूतून सतत अमृताचा स्राव होत असतो या कमळाची कांती अवर्णनीय असते सुवर्णवत्, कर्पूरवत् असे कोणी याचे वर्णन करतात येथेच परमात्म्याचे विश्रांतिस्थान आहे उन्मनीचे लावण्य, तुर्येचे तारुण्य, अकाराचा प्रांत, मोक्षाचा एकान्त, महाभूताचे तेज, योगद्रुमाचे फळ, आनंदाचे चैतन्य अशा स्वरूपाचे चैतन्यतत्त्व येथेच नांदते सत्रावी जीवनकला, अमृताचा झरा, कामधेनूचा पान्हा अशा शब्दानीही या स्थानाचे वर्णन केले जाते खालची सहा चक्रे वा कमळे सुप्त असल्याने यातील अमृत कालाग्निकुंडात पडते त्यामुळे जीवाला देहाच्या ठिकाणी जरा मृत्यू भोगावे लागतात सहस्रारकमल हे प्रियस्थान असून ही पुरुषोत्तमाची अधिष्ठानभूमी आहे येथे जीव स्वस्वरूपी लीन होऊन सामरस्याचा अनुभव घेत असल्याने याला अद्वैतभूमी असेही नाव आहे

योगी पुरुषाच्या षट्चक्रभेदनाची प्रक्रिया माहूर येथील देवीचे व दत्ताचे थोर उपासक श्रीविष्णुदास यानी पुढील कवितेत स्वानुभव-पूर्वक वर्णन केली आहे

सहस्रकमलदलपत्रि विराजे निपट, निरंजन, मुनी
अखंडित दृढ मुद्रा उन्मनी ॥ ध्रु० ॥
कनकरत्नमणिमय सिंहासन त्रिकोण माणिक पिठी
ऐं—ह्रीं—क्लीं—बीजासंपुटी

कोटी रवीची प्रभा प्रकाशे अमृतसरोवरतटी
सुशोभित कल्पद्रुम तळवटी
परमहंससिद्धयोगिजन तिष्ठति पुढें योगिनी
अखंडित दृढ मुद्रा उन्मनी ॥ १ ॥

मुलाधार-चक्राचा नायक नमिला गणपती अधी
प्रार्थिला स्वाधिष्ठानी विधी
मणिपुरचक्री चक्र धरी हरि सत्त्वगुणाचा निधी
सदाशिव नांदे अनाहतपदी
गेला सुषुम्नानाडीअधारें ब्रह्मरंध्र लघुनी
अखंडित दृढ मुद्रा उन्मनी ॥ २ ॥

वदन मदन,तनु कोमल, घननिळ मुगुट जटेचा शिरी
बैसला आज्ञाचक्रावरी
शंख, चक्र, तलवार,गदा, धनु, चमकतिआयुधे करी
वदिती ब्रह्मदेव, शिव, हरी
विष्णुदास म्हणे श्रीगुरुदत्तात्रय, तू त्रिभुवनधनी
अखंडित दृढ मुद्रा उन्मनी ॥ ३ ॥

सहा चक्रांपैकी मणिपूर, अनाहत व आज्ञा या तीन चक्राना अनुक्रमाने ब्रह्मग्रंथी, विष्णुग्रंथी व रुद्रग्रंथी अशी नावें असून पुत्रैषणा, वित्तैषणा व लोकैषणा या नावानी त्या ओळखल्या जातात. या तीन एषणाचा म्हणजे इच्छाचा त्याग करण्याच्या क्रियेस ग्रंथिभेद असे नाव आहे. या ग्रंथिभेदाने कामादी वृत्तीचा नाश होतो. 'या षट्चक्रांचा भेद करून साधकाने पुढे जायचे असते. तोवर त्याला पूर्णत्वाची प्राप्ती होत नाही. तांत्रिक परिभाषेप्रमाणे ज्ञानचक्षूचे उन्मीलन झाल्याशिवाय देहात्मभाव नष्ट होत नाही. या प्रज्ञाचक्षूंचे उन्मीलन करण्याची प्रक्रिया म्हणजे षट्चक्रभेद होय. षट्चक्रातल्या प्रत्येक चक्रात एकेक बिंदू असतो. तेच त्या चक्राचे केंद्र असते. चक्राधिष्ठाता चक्रेश्वर त्याच बिंदूवर अधिष्ठित असतो. प्रत्येक चक्राचे बहिरंग वर्णमय असते. अं, यं, रं, लं इत्यादी वर्णांना कुंडलिनीच्या साहाय्याने विगलित करून नादामध्ये परिणत करायचे असते. तसे केल्याने साधकांना चक्रस्थ बिंदूची प्राप्ती होते. हा बिंदू ज्ञानात्मक ज्योतिस्वरूप असतो. त्यानंतर ब्रह्मनाडीच्या स्वभावसिद्ध ऊर्ध्वमुख स्रोतातून त्याची ऊर्ध्वगती होत असते अशा प्रकारे सहाही चक्रातील बिंदूची ऊर्ध्वगती होऊन भ्रूमध्याच्या किंचित वर प्रज्ञाचक्षूचे उन्मीलन होते. या अवस्थेत प्रत्येक साधकाला विशुद्ध ज्ञानस्वरूप अशी ज्योती प्राप्त होते. त्यानंतर त्याला समष्टीराज्यात प्रवेश मिळतो. मग तो ब्रह्मांडाचा अभिमानी होऊन क्रमशः ऊर्ध्वगती मिळवू लागतो या प्रक्रियेने त्याचा समष्टीतून महासमष्टीत म्हणजेच ज्ञानराज्यातून महाज्ञानराज्यात प्रवेश होतो. ज्ञानाच्या या विकासाला पूर्णज्ञान असे म्हणतात.'

**नाडीविज्ञान :**—योगाने देहाचे दोन भेद केले आहेत. व्यष्टिदेहाला पिंड व समष्टिदेहाला ब्रह्मांड असे नाव आहे. ब्रह्मांडातील सर्व काही पिंडात म्हणजे मानवी देहात असल्याने देहाचे ज्ञान योगशास्त्रात महत्त्वाचे आहे. मनुष्याच्या शरीरात साडेतीन कोटी नाड्या असल्याचे सांगितले आहे. कोठे कोठे ७२००० नाड्यांचाही निर्देश आहे. शक्तीचा स्रोत म्हणजेच नाडी. 'शत चैका हृदयस्य नाड्यः' प्रमाणे एकशे एक नाड्या मुख्य म्हणून सांगितल्या आहेत. यांतील चौदा नाड्या प्रमुख असून इडा, पिंगला व सुषुम्ना या तीन महत्त्वाच्या होत. यांतील एक महत्त्वाची म्हणजे सुषुम्ना. मनुष्याच्या शरीरात लिंग व गुदा यांच्या मध्यभागी असलेल्या शिवणीच्या वरच्या बाजूस व बेंबीच्या खालच्या बाजूस एक त्रिकोणाकृती कंद असून येथूनच पाठीच्या कण्यास प्रारंभ होतो. पाठीचा हा कणा 'ळ' अक्षरातल्या आकृतीप्रमाणे तयार झालेल्या हाडाच्या मणक्यापासून तयार झालेला असतो. सुषुम्ना नाडी मेरुदंडाच्या पोकळीतून मूलाधार चक्रात प्रवेश करते व तेथून क्रमाक्रमाने वर स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत व विशुद्धचक्रात

जाते. येथे तिला दोन फाटे फुटतात. एक पश्चिमेकडे व दुसरा पूर्वेकडे जातो. पश्चिमेकडील फाटा मेरुदंडाच्या मणक्यांतून सहस्रारचक्रापर्यंत म्हणजे ब्रह्मरंध्रापर्यंत जातो. दुसरा पूर्वेकडील फाटा भुवयांच्या मध्यभागी असणाऱ्या दोन पाकळ्याच्या आज्ञाचक्रातून सहस्रार चक्रापर्यंत जाऊन पोचतो. या सुषुम्ना नाडीच्या दोनही बाजूस दोन नाड्या आहेत. डाव्या बाजूच्या नाडीस इडा नाडी असून ती शुक्लवर्ण, चंद्ररूपिणी, शक्तिरूप व मूर्तिमान अमृत आहे. उजव्या बाजूची पिंगला नाडी सूर्यरूपिणी व रक्तवर्ण आहे. इडेचे बहिर्गमन डाव्या नाकपुडीतून होते, तर पिंगलेचा अंत.प्रवेश उजव्या नाकपुडीतून होतो. इडेला गंगा, पिंगलेला यमुना व सुषुम्नेला सरस्वती अशी नावे आहेत. या आज्ञाचक्रात एकत्र येतात; म्हणून त्या स्थानाला **त्रिवेणी** असे नाव आहे. सुषुम्नेचे मूलाधारातले द्वार ब्रम्हद्वार असून ते कुंडलिनीच्या वेटोळ्याने बंद असते.

**कुंडलिनी** :—नाभीच्या खाली एक सर्पाकार शक्ती वेटोळी घालून बसलेली असते, तिलाच कुंडलिनी असे नाव आहे. तीन पूर्ण व एक अर्धे अशी तिची साडेतीन वेटोळी असतात. कुंडलिनी नावाप्रमाणेच कुंडलित अथवा वेटोळे घालून राहाणारी असते. ही शक्ती सरळ व स्वाभाविक रूपात प्रतिष्ठित झाल्यास शिवाशी अभिन्न बनते. चिद्रूप आत्मा हा नित्य शक्तिसमन्वित असतो. तो सर्वकाळ एकरस आणि निष्क्रिय असतो. पण त्याची शक्ती कधी सक्रिय तर कधी निष्क्रिय असते. या शक्तीचे चित् व अचित् असे दोन भेद आहेत. चित्‌शक्ती ही चित्स्वरूप असते. ती आत्म्याशी अभिन्न स्वरूपात राहाते. अचित् शक्ती ही विशुद्ध जगताची उपादान कारण आहे. या शक्तीला वैष्णव लोक शुद्धसत्त्व व तांत्रिक लोक बिंदू किंवा महामाया म्हणतात. अशुद्ध अचित् शक्तीमुळे अनंत ब्रह्मांडे अर्थात् सर्व मायिक जगत् प्रकाशित होते. हिलाच कुंडलिनी असे म्हणतात. जोवर क्रियारूप चित्‌शक्तीची संमती मिळत नाही, तोवर ही कुंडलिनी सुप्तवत् राहाते. तिच्या ठिकाणी कोणत्याही स्वरूपाचा क्षोभ उत्पन्न होत नाही. ही सृष्टीची पूर्णावस्था होय. जेव्हा चित् शक्तीच्या आघाताने ही सुप्त महामाया कुंडलिनी जागृत होते, तेव्हा तिच्या ठिकाणी संकोच करून राहिलेली चिद्‌अणूंची राशीही जागृत होऊन उठते.'

या कुंडलिनी शक्तीस जागृत करण्याचे व तिला ऊर्ध्वमुखी बनविण्याचे काम महत्त्वाचे असते. 'मूलबंधपूर्वक आसन साधले म्हणजे गुदद्वारातून जाणारा 'अपान' वायू खालून जाण्याचा बंद होऊन गुदस्थानाच्या ठिकाणी असणाऱ्या 'मूलाधार' चक्राजवळून लिंगस्थानासमीप असणाऱ्या 'स्वाधिष्ठान' चक्राच्या द्वारे जाऊन नाभिस्थानाखाली स्वस्थ झोप घेणाऱ्या 'कुंडलिनी'च्या अंगावर आपटतो. उड्डियानबंधाने खालचा वायू वर खेचण्यास तसेच कुंभक करून प्राणवायू नाभीच्या खाली ढकलण्यास आरंभ केला म्हणजे नाभिस्थानी असणाऱ्या मणिपूरचक्राच्या खाली व भ्रूमध्यापासून नाभिस्थानापर्यंत गेलेल्या सुषुम्ना नाडीच्या द्वाराशी निजलेली कुंडलिनी एकाएकी जागृत होऊन आपले वेटोळे हळूहळू उकलावयास लागून काही काळाने सरळ होते. त्या वेळी सुषुम्नेचे द्वार मोकळे होऊन आजपर्यंत परस्परांशी उभा दावा करणारे, पण आता सख्य झाल्यामुळे एक झालेले प्राण व अपान हे दोघे वायू सुषुम्नेत गेल्यामुळे व इडापिंगलांशी त्यांचा वियोग झाल्यामुळे योग्यास मरणप्राय दुःख होते. 'कुंडलिनी' सर्पिण जागी झाली म्हणजे ती हृदयकमलाखाली असलेला वायू पिऊन अस्थी, शिरा व मांस यांचे सत्त्व शोषते, नासिकेबाहेर जाणाऱ्या प्राणवायूला अधोगामी करते, अधोगामी अपानाला ऊर्ध्वगामी करते व षट्चक्रांचा भेद करते.'

अशा प्रकारे कुंडलिनी शक्ती जागृत करून

योगी पुरुषास आत्मसुखाचा लाभ घेता येतो. अनंत ब्रह्मांडाची रचना करून शिल्लक राहिलेली व जगास आधारभूत असलेली म्हणून शेष असेही नाव तिला आहे. मानसिक शक्ती, प्रज्ञा-पारमिता, दिव्य आदिशक्तीचे व्यक्त रूप, विश्व-व्यापी विद्युत् शक्ती, चित्‌शक्ती, जीवात्म्याची प्राणस्वरूप आदिशक्ती, आध्यात्मिक शक्ती, शरीरांतर्गत सुप्त चेतना शक्ती अशा विविध नावांनी कुंडलिनी शक्तीचे वर्णन केले जाते. श्रीज्ञानेश्वरांनी सहाव्या अध्यायात हिचे मोठे काव्यमय वर्णन करताना म्हटले आहे;

नागाचें पिलें ।
कुंकुमें नाहलें ।
वळणे घेऊन आलें ।
सेजे जैसें ॥
तैसी ते कुंडलिनी ।
मोटकी औट वळणी ।
अधोमुख सर्पिणी ।
निदेली असे ॥
ते कुंडलिनी जगदंबा ।
जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा ।
जिया विश्वबीजाचिया कोंभा ।
साउली केली ॥
जे शून्यलिंगाची पिंडी ।
जे परमात्मया शिवाची करंडी ।
जे प्रणवाची उघडी ।
जन्मभूमी ॥

'गुरुदत्तयोग' कर्ते श्री. शं. खानवेलकरांच्या मताने कुंडलिनी ही एक शरीरान्तर्गत शक्ती असून तिच्या स्थानाविषयी मात्र अनेक तर्क आहेत. मानवी शरीरात जी स्वतंत्र अशी सहकारी तंतुसंस्था आहे, तिच्यात पाठीच्या कण्यामध्ये ज्ञानतंतूंच्या दोन रज्जूंचे वास्तव्य आहे. या रज्जूंनाच इडा व पिंगला अशी नावे आहेत. इडा-पिंगलाच्या मधल्या पोकळीस सुषुम्ना म्हणतात. सुषुम्नेतून ज्ञानतंतू ( Sensery nerves ) वर जात असतात आणि शरीराला चालना देणारे कर्मतंतू ( Motor nerves ) तिच्यातून खाली येतात. इडा-पिंगलातील तंतूंचे सहकार्य या दोनही प्रकारच्या तंतूशी असते. इडा-पिंगलांच्या मार्गात पाठीच्या कण्याच्या खालच्या टोकापासून टाळूपर्यंत ठिकठिकाणी या मज्जातंतूंची जाळी असतात. ही जाळी म्हणजेच योगशास्त्रातील चक्रे किंवा कमळे होत. ही चक्रे कोणी सहा, कोणी नऊ, तर कोणी वीस ते बावीसपर्यंतसुद्धा मानतात. या चक्रांच्या स्थानांविषयी व नावांविषयी सुद्धा बरेच मतभेद आहेत. थिऑसॉफिस्टांच्या मते ही चक्रे स्थूल शरीराची नसून ती चक्रे म्हणजे प्राणमय कोशा-तल्या ईथर या द्रव्यातले भोवरे होत. त्या कोशा-तून प्राण, अपान वगैरे प्राणप्रवाह वाहत असतात. हे भोवरे चक्राकार किंवा उत्फुल्ल कमलासारखे असतात. अशी त्यांची कल्पना आहे. या कमलांना अनेक पाकळ्या असून त्या कमळांची बीजे, तत्त्व, देवता, रंग, स्थल, मातृका इत्यादी गोष्टी ठरलेल्या आहेत.

कुंडलिनी शक्ती ही भुजंगाप्रमाणे असून ती साडेतीन वेटोळी घालून मूलाधारचक्रात स्वस्थ निद्रा घेत असते. या साडेतीन वेटोळ्यांचा संबंध कोणी ॐकाराच्या साडेतीन मात्रांशी लावतात, तर कोणी तिचे साडेतीन वेढे तुर्येशी संबंधित अशा अवस्थात्रयाचे द्योतक मानतात. कुंडलिनी ही जप, तप, ध्यान, कीर्तन, भक्ती, ज्ञान, कर्म, मुद्रा, बंध, शक्तिचालन, प्राणायाम, शक्तिपात, परा-काष्ठेचे दुःख, दीर्घाभ्यास इ. प्रकारांनी जागृत होते. ही जागृत कुंडलिनी स्वाधिष्ठान, मणिपूर इ. चक्रांतून वर जात टाळूतील सहस्रारचक्रात शिरते, तेव्हा साधकाला कैवल्य प्राप्त होते. कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर होणाऱ्या सुखाचे व प्राप्त होणाऱ्या सिद्धींचे मोठे बहार-

दार वर्णन ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात ज्ञानेश्वरांनी केले आहे. कुंडलिनिजागृतीचे रहस्य समजावून सांगताना पं. गोपीनाथ कविराज यांनी स्पष्ट केले आहे की—

कुंडलिनी ही जीवदेहात श्वासक्रियेच्या रूपाने प्रवाहित राहून जीवधारणाला साहाय्यक होते. जीवाचे मन व प्राण यांच्याशी कुंडलिनीचा निकटचा संबंध आहे. जीवदेहात प्राण आणि मन यांचा संबंध अतिमधुर असा आहे. मन जेथे जाते तेथे प्राण स्वतः उपस्थित होण्याचा प्रयत्न करतो. प्राण जेथे क्रिया करतो, तेथे मन गेल्यावाचून राहात नाही. या मनप्राणांचे ऐक्य करणे म्हणजेच कुंडलिनी जागृत करणे होय. मनाला भगवताची इच्छाशक्ती व प्राणाला भगवंताची क्रियाशक्ती म्हटले आहे. मन अथवा इच्छाशक्ती ही संस्कारवशात् वक्रतेला प्राप्त होऊन आपल्या बरोबर प्राणशक्तीलाही वक्र करून षट्चक्रांमध्ये फिरविते. त्यामुळे सरळ व स्वच्छ असलेल्या ज्ञानावरही आवरण पडून ते सुप्तावस्थेत परिणत होते. मनाला सरळ करण्याने प्राणही सरळ होतो व ते प्राण सहित मन सुषुम्नामार्गात प्रविष्ट होते; म्हणून मन म्हणजेच मूलाधारातली सुप्त व वक्र अशी कुंडलिनी शक्ती होय. मनोरूप कुंडलिनीला सरळ करून तिला चिच्छक्तीत-परिणत करणे याचा अर्थ कुंडलिनी जागृत करणे असा होतो. त्यासाठी सर्वप्रथम मनाला बाह्य विषयापासून खेचून घेऊन मूलाधार प्रदेशात जखडून ठेवण्याचा प्रयत्न करावा लागतो. या मनोयोगाच्या साधनेमुळे पुढे हळुहळू मेरुदंडाच्या निम्नप्रदेशात एक प्रकारे स्पंदन प्रत्ययाला येऊ लागते. त्यातून पुढे शक्तीची क्रिया स्पष्टपणे जाणवू लागते. त्या वेळी साधकाला असे वाटू लागते की; एक विद्युत्प्रवाह मूलाधारातून सहस्राराकडे चाललेला आहे आणि त्याच्या बरोबरच मनही ऊर्ध्वगतीने जात आहे. या अनुभवानंतर काही काल साधकाला नाद ऐकू येऊ लागतो. मन त्या नादाच्या स्रोतात वाहत वाहत अलक्ष्याच्या ठिकाणी लीन होऊ लागते. त्याचा परिणाम म्हणून पुढे महाज्ञानाचा आविर्भाव होतो. हा आविर्भाव प्रथम स्थायी नसून चंचल असतो; पण अविच्छिन्न दीर्घकालीन साधना केल्यास मनावरचे संस्कार व मल दूर होऊन तो महाज्ञानाचा आविर्भाव स्थिर होतो. त्याच्या बरोबर मनाच्या सर्व बाह्य प्रवृत्तीही शांत होतात.

विवेकानंदांनी ' राजयोगा'वर भाष्य करताना प्राणशक्ती या प्रकरणात कुंडलिनीचे व तिच्या जागृतीचे वर्णन केले आहे. मनुष्याच्या पाठीच्या कण्यात असलेल्या दोन रज्जूस पिंगला व इडा अशी नावे असून या दोन रज्जूतील पोकळी सुषुम्ना नावाची असते. या पोकळीच्या खालच्या टोकास ज्ञानतंतूचे चक्र आहे. हे चक्र त्रिकोणाकृती असून त्यात कुंडलिनी नावाच्या प्राणशक्तीचे वास्तव्य असल्याचे योगी सांगतात. ही कुंडलिनी जागृत झाली की ती सुषुम्नेतून वर जाऊ लागते. सुषुम्नेचा मार्ग कुंडलिनी आक्रमण करू लागली की मनावरील एकएक पडदा दूर होण्यास सुरुवात होते आणि योग्यास दिव्यदृष्टी आणि अमानुष सामर्थ्य यांची प्राप्ती होऊ लागते.

कुंडलिनी मेंदूपर्यंत पोचली म्हणजे मन आणि देह यांजपासून योगी विभक्त होऊन त्याचा आत्मा मुक्त होतो. षट्चक्रे व त्यांतून कुंडलिनीचा प्रवास यांचे वर्णन करताना विवेकानंदांनी म्हटले आहे,' मनुष्याच्या पाठीच्या कण्याची रचना एका विशिष्ट पद्धतीने झाली आहे. इंग्रजी आठाचा आकडा आडवा (∞) लिहिला असता जसा दिसतो, तशा आकृतीचे हाडाचे कित्येक मणके एकावर एक रचलेले आहेत. यापैकी डाव्या भागातून गेलेल्या ज्ञानरज्जूस इडा व उजव्या भागातील ज्ञानरज्जूस पिंगला अशी नावे आहेत. या दोहोंच्या मधील पोकळीला सुषुम्ना असे नाव

आहे. या कण्याच्या तळाच्या मणक्याला इंग्रजीत लंबर मणका ( Lumbar Vertebra ) असे नाव आहे. या लंबर मणक्याच्या खाली एक मणका असून त्यातील शेवटच्यास सेक्रम असे नाव आहे. हा मणका साधारण त्रिकोणाकृती आहे. ज्ञानरज्जूचा एक सूक्ष्म तंतू या मणक्यापर्यंत आला आहे. या सेक्रम मणक्याच्या आत एक Sacral Plexus नावाचे ज्ञानतंतूचे चक्र असून ते त्रिकोणाकृती आहे, ही गोष्ट आधुनिक शरीरवेत्त्यांस माहीत आहेच. या चक्राप्रमाणेच Lumbar Plexus, Solar Plexus, Semilunar Plexus वगैरे ज्ञानतंतूची चक्रे आहेत. ही गोष्टही त्यांस विदित आहे. यासच आमच्या योग्यांनी सूर्यकमल, चंद्रकमल अशी नावे दिली आहेत, असे म्हटले असता वावगे होणार नाही.

'योग्यां'च्या मताप्रमाणे अगदी पहिले मूलाधारचक्र हे आहे आणि शेवटचे चक्र मेंदूत असून त्याला त्यांनी सहस्रदलचक्र असे नाव दिले आहे. आपल्या शरीरातील ज्ञानतंतूंत दोन प्रकार आहेत, ही गोष्ट शास्त्रज्ञांस ठाऊकच आहे. यापैकी एकास Afferent किंवा Sensory असे नाव आहे. यांचे काम शरीरावर होणाऱ्या स्पर्शाचे ज्ञान मेंदूस पोहोचवावयाचे आहे. यास आपण स्पर्शवाहक ज्ञानतंतू म्हणू. दुसऱ्या प्रकारास Efferent किंवा Motor असे नाव आहे. मेंदूचा हुकूम अवयवांस पोहोचविण्याची कामगिरी यांजकडे आहे. यांस आपण आज्ञावाहक असे नाव देऊ या. दोन क्रिया आणि त्या करणारे ज्ञानतंतू भिन्न असले तरी त्या दोहोंचेही पर्यवसान मेंदूत होते. याशिवाय आणखीही कित्येक गोष्टी लक्षात ठेवण्यासारख्या आहेत; त्या लक्षात असल्या म्हणजे पुढील विवेचन समजण्यास बरे पडेल. कण्यातील ज्ञानरज्जूंचा मेंदूत जेथे शेवट होतो, तो भाग पोकळ असून मेंदूशी त्याचा प्रत्यक्ष संबंध नसतो. त्या भागाच्या भोवती एक प्रकारच्या पातळ पदार्थाचे आवरण असून त्या पदार्थात तो पोकळ भाग तरंगत असतो. डोक्यावर काही आघात झाला तर त्याचा जोर त्या पदार्थात जिरून जाऊन पोकळ भागास धक्का लागत नाही. नव्या शरीरशास्त्राचे हे निरीक्षण विशेषतः लक्षात ठेवण्यासारखे आहे. यामुळे योगशास्त्राचे सिद्धान्त नव्या पद्धतीने समजण्यास आपणांस सुलभ होते. त्याचप्रमाणे वर जी ज्ञानचक्रे सांगितली, त्यांपैकी तीन आपण विशेष लक्षात ठेवली पाहिजेत. पहिले मूलाधार, दुसरे सहस्रदल आणि तिसरे मणिपूर. शरीरशास्त्रातील या माहितीशिवाय पदार्थविज्ञानातील एक दोन गोष्टीही लक्षात ठेवण्यासारख्या आहेत. वीज आणि तिची शक्ती यांबद्दल बऱ्याच गोष्टी आपल्या कर्णपथावरून गेल्या आहेत; पण वीज हा वास्तविक पदार्थ काय आहे, याची शास्त्रज्ञांसही निश्चित माहिती आज मिळालेली नाही. अत्यंत झपाट्याच्या गतीचा तो एक स्पंद, तरंग अथवा गती आहे, इतकेच सध्या आपणांस ठाऊक आहे.'

श्वासोच्छ्वासाचे नियंत्रण,प्राणायाम इत्यादीविषयी माहिती देऊन विवेकानंदांनी म्हटले आहे, 'श्वासोच्छ्वासांच्या नियमनाने देहातील परमाणूंस समांतर गती प्राप्त होऊन मेंदूतील त्यांच्या गोलकांवर आपणांस ताबा मिळविता येतो व श्वासोच्छ्वास-गोलकाच्या (Respirating centre)साहाय्याने इतर गोलक आपणास ताब्यात आणणे सुलभ होते. या सर्व गोलकांचे प्राणायामाने नियमन झाले म्हणजे मूलाधार चक्रातील (Sacral plexus) निद्रित असलेली कुंडलिनी नावाची शक्ती जागृत होऊ लागते. योगप्रक्रिया, योगाचे प्रकार, योगांतर्गत देहविज्ञान, षट्चक्रभेद, प्राणायाम, पंचप्राण, ज्ञानतंतू व त्यांचे कार्य, कुंडलिनीशक्ती, तिची जागृती, तिच्या जागृतीचे परिणाम असे अनेक महत्त्वाचे विषय या योगप्रणीत देहविज्ञानात लक्षणीय आहेत. या विषयावर अनेक वाचनीय पुस्तकेही उपलब्ध

आहेत श्री म वैद्य यांची 'पट्चक्रदर्शन व भेदन' व 'साधुसंताचा देवयान पथयां' पुस्तकांतून या विषयाचे साधार विवेचन आले आहे स्वामी विष्णुतीर्थ यांच्या 'डिव्हाईन पॉवर' या पुस्तकाचा सर्वधित भावानुवाद विनायकराव घरमळकर यांनी 'दैवात्मशक्ती' या नावाने केलेला आहे त्यातही यासंबधी मार्मिक विवेचन आलेले आहे

योगसंप्रदाय, योगप्रक्रिया, योगप्रकार इत्यादींचे विवेचन 'पातंजलयोगदर्शन' 'घेरंड-संहिता', 'हठयोगप्रदीपिका' अशा सांप्रदायिक ग्रथांतून आले आहे सर जॉन वुड्रॉफ यांचे 'सर्पंट पॉवर', लीडबीटर यांचे 'कुंडलिनी' डॉ बेहनन यांचे 'योग', अरविंदाचे 'सिन्थिसिस ऑफ् योग' अशा काही पुस्तकांचा उपयोग योगासंबधी सर्वांगीण माहिती देण्यास होण्यासारखा आहे

डॉ वि म भट यांच्या 'योगसिद्धी आणि ईश्वरसाक्षात्कार' या एका अप्रतीम ग्रथाचा निर्देश याच संदर्भात करावयास हवा वि म भट यांनी शरीरशास्त्र, वैद्यक, मानसशास्त्र इत्यादींच्या दृष्टिकोणातून व काही अनुभवसिद्ध निवेदनावरून या ग्रथाची रचना केली आहे योगशास्त्राचा परिचय, सिद्धींचे अनुभूत शास्त्रीय प्रयोग, सिद्धी आणि साक्षात्काराची साधने, पिंडी ते ब्रह्मांडी, देहात्मज्ञान, मानसशास्त्र, आत्मज्ञान व आत्मसाक्षात्कार, लिंगदेह, मरणोत्तर अस्तित्व, ज्ञानसिद्धी, शांतियोग व ईश्वरसाक्षात्कार, स्वप्न-समाधी अशा अनेक विषयांचे मोठ्या अधिकार-वाणीने या ग्रथात विवेचन आले असल्याने जिज्ञासूंना त्याचा उपयोग होण्यासारखा आहे

अलीकडे वामनरावजी गुळवणी यांनी व त्यांच्या प्रेरणेने त्यांच्या निकटवर्तीयांनी जे वाङ्मय प्रसिद्ध केले आहे त्यातही या विषयाची सांगोपांग चर्चा आलेली आहे

कुंडलिनीच्या जागृतीमुळे प्राप्त झालेल्या दैवी शक्तीचे संक्रमण करता येते, शक्तिसंक्रमण करून इतरांची कुंडलिनी जागृत करता येते, स्पर्श, शब्दोच्चार, दृष्टिकटाक्ष, संकल्प या चार मार्गांनी साधक मुमुक्षूची कुंडलिनी जागृत करता येते, असा विचार गुळवणी महाराजांच्या दत्त-पथीय परंपरेत प्रसृत आहे शिष्यावर शक्ति-संक्रमण झाले की शरीर पडणे, कंप, अत्यानंद, घाम सुटणे, शिरशिरी येणे अशी काही लक्षणे शक्तिसंचाराचीही सांगितली जातात शक्ति-पाताच्या या दीक्षापद्धतीचे महत्त्व या संप्रदा-यात फार मोठे आहे 'योगभक्तिदर्शन' व 'योगसंप्रदायदर्शन' या दोन महत्त्वाच्या प्रकाश-नांत दत्तपथीय गुळवणी संप्रदायाचे शक्तिपात-रहस्य यथार्थ रूपाने प्रकट झाले आहे स्वत गुळवणी महाराजांनीच श्रीवासुदेवानंद सरस्वती-कृत 'योगरहस्या' चे स्पष्टीकरण विस्ताराने केलेले आहे कुंडलिनीयोग, गुरुतत्त्व, दीक्षेचे प्रकार इत्यादींचे खुलासेवार निवेदन स्वानुभ-वाने त्यांनी केले आहे गुरुदत्तशक्तीचा प्रत्यय, जागृत क्रियाशील दैवी शक्ती, शक्तिपाताचे लक्षण, दीक्षेचे फळ, दीक्षाग्रहणाचा विधी, दीक्षाद्वारा कुंडलिनी शक्तीची मंत्रसृष्टी, स्वत-सिद्ध प्रणव, दिव्यरूपदर्शन, दिव्यदर्शनाचे प्रकार, दिव्य-शब्द-नादोत्पत्ती, दिव्य नादाचे प्रकार, नादश्रवणाचे फळ, दिव्य स्पर्शज्ञान, ब्रह्मज्योतीचे दर्शन, शक्तिपाताचे प्रकार व फळ, योगविघ्नांचा प्रतिकार, योगसिद्धीचा उपाय इत्यादी अनेक महत्त्वाच्या व रहस्यमय प्रश्नांवर गुळवणी महा-राजांनी प्रकाश टाकला आहे या कुंडलिनि-जागृतीची वा शक्तिपातरहस्याची परंपरा प्राचीन असली तरी श्रीस्वामी गंगाधरतीर्थ देवजी–श्रीस्वामी नारायणतीर्थ देवजी–श्रीस्वामी शंकर पुरुषोत्तम तीर्थजी–श्रीस्वामी लोकनाथतीर्थ–श्रीगुळवणी महाराज अशी ही आधुनिक माळा-तील परंपरा आहे याच परंपरेत योगानंद

विज्ञानी, स्वामी विष्णुतीर्थ, संत उपाध्याय, माता रमाबाई, स्वामी शिवोत्तमतीर्थ इत्यादी सत्पुरुष झाले आहेत या परंपरेने योगमार्गातील शक्ति-पाताचे माहात्म्य वाढविले आहे

# दोन तात्त्विक ग्रंथ

दत्तपर्यायाच्या प्रमुख ग्रंथावरून आतापर्यंत आपण साम्प्रदायिक तत्त्वज्ञानाचा शोध घेतला साम्प्रदायिक दत्तभक्तानी जे अफाट स्तोत्रादी स्फुट वाङ्मय निर्माण केले आहे त्यातही तत्त्व-विचाराचे सुदर दर्शन होण्यासारखे आहे तत्त्व-बोध आणि त्यानुसार अनुभूती याचा आढावा या स्फुट अभग, पदादी सामग्रीतून घेता येण्या-सारखा आहे याच उद्देशाने ग्रथाच्या शवटी अशी सामग्री निवडक पण विपुल स्वरूपात मुद्दाम दिलेली आहे दत्ततत्त्वज्ञानाचा विस्तार कसकसा झाला हे आपण मागे पाहिलेच आहे साम्प्रदायिक तत्त्वज्ञानाचा विचार करणाऱ्या एकदोन ग्रथाचा उल्लेख येथे करणे उचित होईल श्रीमाणिकप्रभु-ग्रथावलीत श्रीमार्तंड माणिकप्रभुकृत ' श्रीज्ञान-मार्तंड ' ( पूर्वार्ध व उत्तरार्ध ) या नावाचा एक ग्रथ प्रसिद्ध झाला आहे 'हा ग्रथ ज्ञानी होऊन आत्मतत्त्व आळखणाऱ्यानी लिहिला आहे' असे या तात्त्विक ग्रथासबंधी म्हटले आहे अनुबध-चतुष्टय साधन सपत्ती, सहजमुक्ताचे लक्षण, आत्मशब्दाची मीमासा महावाक्यार्थ,आत्मस्वरूप, पचीकरण प्रशसा, मुक्तीचे स्वरूप, एकजीववाद, दृष्टिसृष्टिवाद, तत्त्वविवेक, वेदान्तविचार, जागृतिविवेचन, स्वप्नविचार, सुषुप्तिविचार, ब्रह्मज्ञान, सत्यस्वरूपवर्णन, चित्स्वरूप, मृत्युवर्णन, आनदस्वरूपवर्णन इत्यादी विविध विषयाच्या नामावलीवरूनही या ग्रथाचे तात्त्विक स्वरूप समजून येईल व साम्प्रदायिक तत्त्वज्ञानाचे दर्शन सुलभ होईल

असाच आणखी एक साम्प्रदायिक ग्रथ म्हणजे आळदीच्या श्रीनृसिंहसरस्वतीचा 'श्रीस्वात्म-सौख्य' या नावाचा होय 'जीव अर्थात् त्याचे शरीर पिंड आणि त्या जीवात्म्यापलीकडे जो सदाशिव 'परमात्मा' त्याचे ब्रह्माड म्हणून आत्मा, परमात्मा आणि पिंडब्रह्माड रूप शरीर याच्याविषयी जे शास्त्र ते 'स्वात्मसौख्य' अशी फोड करण्यात आली आहे हा ग्रथ महाराजाचे कोणी एक शिष्य नारायण स्वामी होते, त्याना सांगितला असून याची निर्मिती विदर्भातील लाडाचे कारंजे येथील आहे ५१६ ओव्याच्या या ग्रथात आध्यात्मिक उन्नतीचे कर्म उपासना, आणि ज्ञान हे तीन मार्ग सांगितले आहेत 'दत्तात्रेय गुरुप्रसाद । उपदेश वरद लाधला ॥' ( ज्ञानकाड २१५ ) आणि 'त्या प्रसादाचा महिमा । सकल व्युत्पत्ति आली आम्हा । अनत शास्त्र मनोरमा । ध्यानासी आला ॥' (ज्ञानकाड २१६ ) यासारख्या संदर्भावरून श्रीदत्तात्रेयाच्या उपदेशावरूनच या ग्रथाची रचना झालेली असल्याने 'ज्ञान अबाधित होईजे । सिद्ध पुरुषासारखे ॥' अशी प्रचीतीही साधकास येण्यासारखी आहे विदर्भातील लोणार क्षेत्रातील श्रीसच्चिदाश्रम स्वामीना आळदीच्या श्रीनृसिंहसरस्वतीनी जो योगाभ्यास शिकविला, तो 'अतरानुभव' नावाच्या एका प्रकरणात ग्रथित झाला आहे मुमुक्षू व ज्ञानाधिकाऱ्याची लक्षणे योगाभ्यास, आसनादी प्रकार, मार्गाभ्यास करीत असताना येणाऱ्या भयाचे निवारण, अमनस्कयाग, ईश्वरस्थितीचा निवाडा, परोक्ष-ज्ञान इत्यादी विषयाचे तात्त्विक विवेचन सक्षेपाने 'अतरानुभवात' झाले आहे या दोन तात्त्विक ग्रथातील विषयाची ओझरती ओळख व्हावी म्हणून काही उतारे खाली दिले आहेत प्रथम 'ज्ञानमार्तंड' या ग्रथातील तत्त्वविचार पाहू

**आत्मस्वरूप** —'आनद, सुख, प्रिय, ही नावे आत्म्यासच आहेत कारण सुख देणे हा जडाचा धर्म नाही जडापासून सुख होते असे वाटणे हीच

माया होय आपणास स्वसामर्थ्याने सर्वावस्थेत भासविणे, म्हणजे मी आत्मा आहे असे स्फुरणे हा ब्रह्म-स्वभाव होय जडात हे सामर्थ्य नाही. ते आपणास अगर दुसऱ्यास भासवू शकत नाही. यावरून हे सिद्ध होते की, बोधरूपी आत्मा स्वत आपल्या सामर्थ्यानेच स्फुरतो आत्मा नित्यप्राप्त आहे 'मला मी जाणले' हा ज्ञानाचा व्यापार अत करणनिमित्तक घडतो, त्या वेळी आत्माही तदाकार स्फुरतो मी अल्प किंवा विभू आहे, असे मानणे हा अत करणाचा धर्म होय, आत्म्याचा नव्हे, ज्याप्रमाणे अत करणात विकल्प उत्पन्न होतात, त्याप्रमाणे अत करणाने धारण केलेल्या विषयाकृतीत आत्मा स्फुरू लागतो पहा की, 'मी देही' या अनुभवात आढळणारा मी-पणा म्हणजे अल्पाकृती हा अहकाराचा धर्म आहे आणि 'मी देही आहे' यात केवळ स्फुरण मात्र आत्मधर्म आहे 'मी' ह्या उच्चारात परा, पश्यती, मध्यमा, वैखरी वाणीचे साह्य अवश्य आहे, तथापि, 'मी' या स्फुरणाचे वाच्य माया असून लक्ष्य ब्रह्म आहे साराश, सविषयक स्फूर्ती, उच्चनीचभाव, बधमोक्ष इत्यादी ज्या ज्या भावनेने अत करण युक्त झालेले असते त्या त्या विषयानुरूप आत्मा स्फुरू लागतो, म्हणून अत करणातील हे मल नाहीसे करून खरे आत्मज्ञान व्हावे एवढ्यासाठीच वेदान्तोपदेश आहे'

**ज्ञानाची आवश्यकता** – 'ज्ञानविचाराचे साह्य सर्वांस पाहिजे जरी भक्तिमार्ग उत्तम आहे, तथापि तो कसा आहे याचाही विचार केलाच पाहिजे कारण देवाच्या देवपणात व भक्ताच्या भक्तपणातही चैतन्य व्यापक असणारच, त्यावाचून काहीच होणे नाही काळ, कर्म, स्वभाव, हे सर्व व्यवहारास लागू असल्यामुळे सृष्टीचे नियम, क्षणिकपणा सर्व ठिकाणी सारखा आहे म्हणून बऱ्याच महतानी आत्मनिवेदनभक्ती श्रेष्ठ मानिली आहे येथे विशेष गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी ही की, योग, कर्म, भक्तिमार्ग, मन्त्र, उपासना ही सर्व आत्मज्ञानी पुरुषास पूर्ण कळत आहेत.

> यावानर्थ उदपाने सर्वत सम्प्लुतोदके ॥
> तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानत ॥
> ( भगवद्गीता २-४६)

**तत्त्वविवेक** – तत्त्वविचारात पचभूते वेगळाली आहेत असे न मानता एकच परमेश्वर या सर्व तत्त्वरूपानी प्रेक्षणीय आहे

> यच्चापि सर्वभूताना बीज तदहमर्जुन ॥
> न तदस्ति विना यत्स्यान्मया भूत चराचरम् ॥
> ( भगवद्गीता १०-३९ )

हे परमेश्वराचे विराट रूप असून, त्या विराटाचे लहान रूप म्हणजे आमचा देह आणि व्यापक आत्मा एक आहे यात आपण म्हणणारा कोणी नाही ही समजूत पुरुषास होईल, म्हणजे सर्वात्रा आत्मा आपण आहो असा निश्चय होईल तोच सकलमती समजावा त्याचा जन्म धन्य आहे

'पचभूते ईश्वरच बनला आहे, सर्व रूप ईश्वराचेच आहे, ही गोष्ट सर्वमान्य आहे. 'जनी जनार्दन', 'सर्व भूती भगवद्भाव' या गोष्टी प्रसिद्ध आहेत जसा स्वप्नात मारणारा हाच आहे, त्याचप्रमाणे मारण्याचे साधन कुऱ्हाड, भाला अगर तलवार ही रूपेही याचीच आहेत, आणि मारून घेणाराही हाच आहे यात हे सिद्ध होते की, ज्याने मारणाराची आकृती केली, त्यानेच कुऱ्हाडही उत्पन्न केली, आणि मारून घेणाराही तोच बनला तात्पर्य, जडात स्वत. रूपातर होण्यास सामर्थ्य नाही दृष्टान्त, गारुड्याने उत्पन्न केलेले आब्याचे झाड कितीही वर्षे झाली तरी फलद्रूप होणार नाही, कारण स्वत फळ उत्पन्न करण्याची शक्ती झाडास मुळीच नाही. ज्या गारुड्याने ते झाड उत्पन्न केले, त्याच्या मर्जीस वाटेल तर तोच फलही उत्पन्न करील. या दृष्टान्ताप्रमाणे पचमहाभूतात

स्वतः अन्य पदार्थास उत्पन्न करण्याची शक्ती नाही. म्हणजे आकाश आपल्या शक्तीने वायूस उत्पन्न करते असे म्हणणे अज्ञानाचे आहे; तर ज्या ईश्वराने आकाशरूप बनून दाखविले त्यानेच वायुरुपाने बनून आपले वायुरूप दाखविले. तसेच वायूत तेज उत्पन्न करण्याचे सामर्थ्य नसून ईश्वरच तेजरूप बनला आहे; म्हणजे आत्मरूप दाखविले आहे. अर्थात् परमेश्वर हाच पंचमहाभूतांनी नटतो, स्वतः हे पदार्थ वेगळे म्हणून नाहीत आणि ईश्वरी सत्तेवाचून यांच्यांत वेगळे सामर्थ्य नाही. शंकराचार्यांनी यात पचीकृत आणि अपंचीकृत असे दोन भाग दाखविले आहेत. समर्थांनी सूक्ष्म असो वा जड असो, सर्व पंचीकृतच आहेत, अपंचीकृत मुळीच नाहीत, असे म्हटले आहे. तात्पर्य, ही माया ज्यास जशी दिसते तसे ते वर्णन करितात. भाष्यातही विश्वसृष्टीचे वर्णन अनेक तऱ्हांनी लिहिले आहे. जेथे पचीकरण स्वतंत्र सांगण्यात येते, तेथे कोणत्या भूतापासून कोणते इंद्रिय कसे होते हे स्पष्टपणे दाखविले आहे. साराश, सर्वरूप पंच-भूतात्मक ईश्वरच आहे.'

**जाणीव एक आहे.**–' मन व मनाची जाणीव सर्व जगात एकच आहे, असे म्हटले; यात अशा पुष्कळशा शंका उत्पन्न होतात की, एकाच्या मनातील दुसऱ्यास समजत नाही, एकाचे दुःख दुसऱ्यास येत नाही; एक मुक्त होतो, तर एक बद्ध राहतो; एकपणा असणे हा तर परमेश्वराचा स्वभाव आहे व अनेकपणा असणे हा मायेचा स्वभाव आहे, तसेच सर्व व्यक्ती स्वतंत्र उत्पन्न होतात; मग त्यांचे कर्म, धर्म, गुण, स्वभाव, जाणीव वेगळी आहे असे का मानू नये ? जाणीव एक आहे, तर मग एक-मेकाच्या मनोवृत्तीचे ज्ञान एकमेकास का बरे होत नाही ? यास उत्तर हे की, वेदान्तशास्त्राच्या सिद्धान्ताप्रमाणे आत्मा स्वार्थ आहे. म्हणजे तो आपल्या सामर्थ्याने सर्व विषयांस-तदाकार वृत्तीस आपणांकडे ओढतो आणि सर्व व्यवहार आत्म्यातच लीन होतात, असा अनुभव सर्वत्रास आहे झोपेत तर हा अनुभव सर्वच जाणतात. आता आत्मा हा सर्वव्यापी व सर्वांचा एकच असल्याने सर्व जाणीव व जाणिवेचा सर्व व्यापार यांचे यजमानत्व किंवा कर्तृत्व सर्व आत्म्याकडेच येते असे म्हणावे लागते. यावरच सर्वांचा आत्मा किंवा अंतःकरण एक असून एकमेकास एक-मेकाचे ज्ञान का होत नाही ? असा आक्षेप येतो. त्याचे समाधान असे–क्रियेचा यजमान, भोक्ता जरी एकच असला तरीसुद्धा भोग–साधन-संपत्ती जशी जशी असेल त्या त्याप्रमाणे क्रिया घडत असते. उदाहरणार्थ, श्रोत्र, चक्षू, घ्राण या सर्व इंद्रियांचा भोक्ता एकच असला तरीही एका इंद्रियास दुसऱ्या इंद्रियाच्या विषयाचे ज्ञान होत नाही. कारण क्रियारूपाने जो भोग घडतो त्या वेळी त्या त्या विषयावर परिणाम होतो. मनात आत्मतेज असते; त्यास त्या विषयाचा भोग घडतो. म्हणजे अंतःकरणविशिष्ट चैतन्य, विषयाचा भोक्ता होते. केवळ चैतन्य तर अक्रिय आहे. बुद्धयारूढ जे चैतन्य आहे ते बुद्धी जी आकृती ग्रहण करील त्या आकृतीस, त्या विषयास आत्मा ज्या वेळी आत्मज्योतीने प्रकाशित करतो, त्या वेळी त्या आत्मज्योतीस अवगती असे म्हणतात. एकूण कूटस्थ चैतन्याचा प्रकाश झाल्यावाचून विषयावगती होत नाही; म्हणजे 'मी विषयास जाणले' असा बोध होत नाही. हे असो. यातही एक गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे, ती ही की, प्रमाण-भूत पंडित म्हणतात की, प्रमाण, प्रमेय, प्रमाता यांमध्ये असलेले चैतन्य म्हणजे प्रमातृ, प्रमेय व प्रमाणचैतन्य यांचा अभेद झाल्यावाचून प्रत्यक्ष ज्ञान होत नाही. अर्थात्, जरी चैतन्य एकच असले तथापि ते अक्रिय आहे आणि जो भेद दिसतो त्यास उपाधिभेदच कारणीभूत होत असतो. असो. सर्वज्ञता किंवा अल्पज्ञता वगैरे

सर्व गोष्टी उपाधी जशी निर्मळ किंवा मलिन असेल त्यावर अवलंबून आहेत. म्हणूनच ज्याची अंत:करणोपाधी अगदी स्वच्छ, निर्दोष व व्यापक अशी असेल त्याना त्रैलोक्याचेही ज्ञान सहज होते. ज्ञानेश्वर म्हणतात, 'मुंगीचे मनोगत जाणणे, स्वर्गीचे बोल ऐकणे' इत्यादी प्रमाणा-वरून चैतन्य एकच असले तथापी उपाधि-भेदामूळे सामर्थ्यभेदही होतो हे उघड आहे.'

**ब्रह्मज्ञान**–'ब्रह्माचे ज्ञान होत नाही, परंतु सृष्टिविषयक ज्ञानापासून ब्रह्मप्राप्ती होते; शंकराचार्योक्तीप्रमाणे ब्रह्मविद्या, ब्रह्माभ्यास, ब्रह्मधारणा असे म्हणणे हा आरोप आहे. खऱ्या दृष्टीने पाहता ब्रह्मरूप हे विशेस विषय नाही, ज्ञानास विषय नाही, अभ्यासास विषय नाही, धारणेस विषय नाही, तर या सर्व क्रिया सृष्टीस लागू पडतात. म्हणजे सृष्टीचा विचार तोच ब्रह्मविचार, सृष्टीचे ज्ञान तेच ब्रह्मज्ञान होय; कारण सृष्टीचे ज्ञान ब्रह्माहून वेगळे नसून ब्रह्म सृष्टिरूपाने दिसते.

'दंतिनि दारुविकारे दारु तिरोभवति सोऽपि तत्रैव ।
जगति तथा परमात्मा परमात्मन्यपि जगत्ति-रोधत्ते ॥ ९४ ॥ स्वा. नि.'

त्या पक्षी समर्पक निश्चयपूर्वक सृष्टीचे ज्ञान संपादन केले पाहिजे. कित्येक मतवादी द्वैतपक्षी म्हणतात की, द्वैताचा निरास मागण्यास द्वैताचे अस्तित्व कबूल करावे लागेल परतु ही गोष्ट सिद्धान्तास विरुद्ध आहे. सिद्धान्तात जे जे भ्रम दृष्टीने भासतात, जसे–आकाशनीलिमा, रज्जु-सर्प, शुक्तिरजत, क्षितिज, स्थाणुपुरुष अशा पदार्थात जो अंश खरा असून भ्रमात दृष्टीस पडतो; म्हणजे रज्जुसर्पांत रज्जू, शुक्तिरजतात पांढरेपणा हे अंश खऱ्या पदार्थांचेच आहेत. या ग्रंथात क्लिष्ट कल्पना आणि त्याचा निरास सांगावयाचा हेतू नाही; कारण आमचा सिद्धान्त आबालवृद्धांस समजावा असा हेतु आहे. तथ्यांश हा की, ज्यास आत्मविद्येची आवड आहे त्यांनी अहोरात्र, आळस न करिता, सृष्टीचे नियम व सृष्टिज्ञान संपादून सहजमुक्ती प्राप्त करून घ्यावी. आता ब्रह्म दाखविणारी वाक्येही पुष्कळ आहेत. कित्येक विधिमुखाने ब्रह्म दाखवितात; आणि अशी वाक्ये ही लक्षणारूपाने दाखवितात. त्यास त्यातही ब्रह्म सांगणे असल्यास म्हणजे ज्यापासून सृष्टी उत्पन्न होते तीच ब्रह्माची ओळख होय. 'जन्माद्यस्य यत:' (ब्र. सू. शा. भा. अ. १ पा. १) अर्थात् सृष्टीच्या लक्षणांनीच विधिवाक्यही प्रतिपादन करितात. आता निषेधमुखाने कसे प्रतिपादन करितात हे सांगतो. सीतास्वयंवरात सीतामुखाने, या सभेत पती कोणता पसंत आहे हे कळवून घेणे होते; म्हणून सख्या प्रत्येक पुरुषास दाखवीत होत्या आणि विचारत होत्या की, तुझा पती हाच काय? सीता 'हा नव्हे! हा नव्हे!' असा निषेध करीत होती. शेवटी रामचंद्रास दाखविताच मौनपणाने बोलेनाशी झाली. आता त्या मौन-पणामुळे जशी रामचंद्राची खूण पटली; त्या-प्रमाणे आत्म्याचे रूप सांगताना श्रुती म्हणते की, आत्मा वाचेने सांगता येत नाही, शब्दास विषय होत नाही, परंतु ज्या सामर्थ्याने ही वाचा बोलते ते आत्मरूप समजा. जेथे वाचा खुंटली तेच आत्मरूप होय. या ठिकाणी हे लक्षात ठेवावे की, वेदास आत्म्याचे अस्तित्व सांगण्याची विशेष गरज नाही पण ब्रह्म नाही, ते ब्रह्म मी नव्हे, हा जो नास्तिकपणा आहे तो दूर झाला म्हणजे नको नाही म्हटल्यासही स्वत सिद्ध स्वभावत: सर्व काल स्फुरतच राहते हा सिद्धान्त ज्ञानी पुरुषास अतिशय आनंददायक आहे '

'श्रीज्ञानमार्तंड' या सांप्रदायिक ग्रंथातील वरील उताऱ्यावरून माणिकनगरच्या दत्त-पंथीयांच्या तत्त्वज्ञानाचे स्वरूप समजून येण्या-सारखे आहे. याच ग्रंथात श्रीमार्तंड माणिक-प्रभूंनी 'श्रीदत्तात्रेयस्वरूपकथन' या प्रकरणात

श्रीदत्तात्रेयाचे तात्त्विक स्वरूप विस्ताराने वर्णन केले आहे त्याचा सांप्रदायिक अभ्यासकांना फार उपयोग होण्यासारखा आहे. या ग्रंथाच्या उत्तरार्धात मुक्ताचा मायिक जन्म, जडाजड विभागविचार इत्यादी विषयावर अधिकारवाणीने निरूपण केले आहे शेवटी परिशिष्टातून महामौन शतक, निर्विकल्पबोध, मुक्तानंदलहरी इत्यादी श्रीमार्तंड माणिकप्रभुविरचित प्रकरणे देऊन दत्ततत्त्वज्ञानास पायाशुद्ध असा आधार उपलब्ध करून दिला आहे आत्मरूपप्रतीती, अनिर्वाच्य ( श्रीनृसिंह माणिकप्रभुविचरित ) या छोट्या प्रकरणाचाही तत्त्वजिज्ञासूंना उपयोग होण्यासारखा आहे

श्रीस्वात्मसौख्य-कर्मकांड, उपासनाकांड व ज्ञानकांड यातील तात्त्विक ओव्या निवडून नमुन्यासाठी येथे दिल्या आहेत

ॐकार बीज वेदमाता ।
तेथुनि त्रिकांडी प्रसिद्धता ॥
अकार, उकार, मकारता ।
सुलीनता प्रसवली ॥ क का १८ ॥
प्रथम कर्मभोग गहन ।
हे तव देहाचे लक्षण ॥
देहरूपे ब्रह्म आपण ।
सहज साधन पैं त्याचे ॥ २१ ॥
कनकावेगळी कांति नोहे ।
भानव प्रभेची दीप्ति होये ।
रजनी अंधकार साहे ।
कर्म पाहे या रीती ॥२५॥
वृक्षी पत्र पुष्पी फळ ।
शरीर कर्मचि अनुकूल ॥
अनुकूल तेथें प्रतिकूल ।
कर्म प्रांजळ जाणिजे ॥२८॥
सृष्टी कर्मारंभें झाली ।
कर्मयोगे सिद्धता आली ॥
प्रजापाळें निर्माण केली
धर्मवली चळीवंत ॥५६॥
पशुपतीसी कर्म जडले ।
कारण देहाते स्वीकारिले ॥
सरूपता मुक्तिसी वरिले ।
कर्म झाले तामस ॥५७॥
निर्गुणगुण तो त्रिपुरासुर ।
संहारिला अति दुर्धर ।
निर्गुण माया गौरीहर ।
कर्मविचार त्यालागी ॥ ५८ ॥
ॐकार मायेपासाव सर्व ।
ब्रह्मा विष्णु महादेव ॥
ऋषी आणि गणगंधर्व ।
प्रिय सदैव मायेचे ॥ ६२ ॥
पाहता निर्गुण तेचि सगुण ।
साक्षी आपुला आपण ।
तेथें कर्मत्यागी तो कवण ।
दुसरेपण विकल्पें ॥ ७२ ॥
एकमेवाद्वितीय ब्रह्मेति ।
ऐसी बोलली सिद्धान्तश्रुति ।
तेचि कर्म कळावयाप्रति ।
द्वितीय ख श्रुति यदर्थे ॥ ७६ ॥
आपुले स्वरूपी निमग्न ।
रक्त श्वेत आणि कृष्ण ॥
जाणीव ते नीलवर्ण ।
वर्णरहित तोचि तो ॥ १०३ ॥
पिंड ब्रह्मांडाचा सांधा ।
येथे साधिला रे प्रबुद्धा ॥
हेचि धडले जरासंधा ।
कृष्णद्वंद्वा तोचि तो ॥ १०५ ॥
स्वानंदाचे आनंदपण ।
गुह्य वस्तूचे आकर्षण ॥
सर्वांग देखणे परिपूर्ण ।
कर्म सौजन्यें करावे ॥ ११९ ॥
अनंत ब्रह्मांड कलेवरें ।
अंगी त्यालासी एकसरे ॥
तेथे कोणी मी दुसरे ।
निवड अवसरे करिसी कीं ॥ उ. का १५ ॥

किंवा शर्करेची गोडी ।
वेगळी काढोनि बांधी जो पुडी ।
द्वैत न जोडता आवडी ।
अद्वय परवडी वदसी की ॥ १६ ॥
मृत्तिकेपासुनी घट झाला ।
यथाकाळें जरी भगला ॥
स्वरूपी न मिळत राहिला ।
व्यर्थ केला सायास ॥ २३ ॥
शिवशक्तीचा अपार पार ।
अवसान आले स्वरूपावर ॥
जन्ममृत्यूचा प्रकार ।
विधिचा व्यापार जाणिजे ॥ २६ ॥
पंचभूते भिन्न भिन्न ।
एकत्र मीनली अभिन्न ॥
गुणानुवादें परिच्छिन्न ।
प्रगट वर्ण जयाचा ॥ ५० ॥
निजसुखी सुखाचा सुकाळू ।
स्पर्शास्पर्श कैचा विटाळू ॥
जेथे द्वैताचा दुकाळू ।
स्वानंद कवळू भूतमात्री ॥ ६१ ॥
ब्रह्मी ब्रह्मत्व समूळ नसे ।
आनंदमात्रचि विलसे ।
अर्धमात्रा गुरु समरसे ।
उपाधिवेषें जडधारी ॥ ११६ ॥
अद्वैतानंद दर्शन ।
मीतूपणाचे मापण ॥
विश्वी आपुला आपण ।
झाले पाहिजे ॥ ज्ञा का २७ ॥
विश्व काय आपणा वेगळें ।
पाहता भरली दोन्ही बुबुळें ॥
आता संसाराचे मळें ।
तापला कोण ? ॥ २८ ॥
अवकाशाचे पोकळी ।
एक जन्मली पुतळी ॥
तिचे स्वरूपाची नव्हाळी ।
देखिली डोळा ॥ ३५ ॥
ते प्रत्यक्ष डोळा दिसे ।
की आकाश ओतिलें असे ॥
नभमंडळी नीलिमा भासे ।
सत्तामात्रें ॥ ३६ ॥
प्रगट लाविली दीपमाळा ।
तेणे प्रकाश झाला सकळा ॥
ब्रह्मांड व्यापुनी घननीळा ।
वेगळा कैसा ॥ ३९ ॥
वेगळेपणाचि नाही ।
वेगळें करावे ते काई ॥
सर्व भूताच्या ठायी ।
माझा मीच एक ॥ ४० ॥
ब्रह्मांडाचा कुलस्तंभ ।
स्वरूपसुखाचा कोंभ ॥
जागृत होऊनि स्वयंभ ।
उभा ठाके ॥ ४३ ॥
विश्रांतिसुखाचे स्थळ ।
ते शुद्ध सत्त्व केवळ ॥
वस्तुमात्र निर्मळ ।
देखणे लागे ॥ ४६ ॥
आत्मा आत्मवी मुसावे ।
तेणे आनंदा आनंद पावे ॥
मग निजवृत्तीचे ठेवे ।
आपेआप उमटती ॥ ५३ ॥
सद्‌गुरुसत्ता ज्ञानसिंधू ।
ओंकारमात्र कृतार्थ बोधु ॥
ओंकाराचा लागला छंदु ।
ओंकार बिंदु ते तुर्या ॥ ५६ ॥
हे ज्ञाताचें ज्ञानकांड ।
केवळ विवेकाचा पिंड ॥
संपूर्ण शोधोनि ब्रह्मांड ।
बिंदु प्रचंड दाविला ॥ ६३ ॥
बिंदुसी बिंदुत्व कैचे ।
कौशल्य महामायेचे ॥
शुद्ध पीठ ईश्वराचे ।
परात्पर जें ॥ ६४ ॥

ईशत्व आपुलें स्वरूप ।
तुटला द्वैताचा विक्षेप ॥
परोपकारार्थं संक्षेप ।
बोलावाचि लागे ॥ ६५ ॥
स्वरूपसुखाचा कल्लोळ ।
पाहतां गळे अंतर्मळ ॥
स्वयंज्योति निर्मळ ।
देखिजे डोळां ॥ ७७ ॥
जे आकाशाची गवसणी ॥
मेरुमस्तकीं रत्नखाणी ॥
कीं विश्वाची विश्वजननी ।
व्यंजनरूपें ॥ ७८ ॥
गुरू काय आम्हां वेगळा ।
सर्व प्रकारें जिव्हाळा ॥
होणार तें त्याची लीळा ।
तोचि जाणे ॥ १०९ ॥
सहजवृत्तीचा कोंभ ।
वाढो लागला स्वयंभ ॥
अवकाशामाजीं स्तंभ ।
यदृच्छेचा ॥ १५० ॥
शुद्ध परमार्थ ग्रहण ।
करितां होय समाधान ।
एवं सिद्धाचें लक्षण ।
तत्त्ववेत्ते जाणती ॥ २०३ ॥
धन्य धन्य तो स्वानंद ।
ब्रह्मनिष्ठ ब्रह्मानंद ॥
आत्मानंद हा प्रसिद्ध ।
होईल आतां ॥ २०७ ॥
अद्वैतानंद सोहळा ।
विद्यानंद देखिला डोळां ॥
विषयानंद द्वारपाळा ।
इष्टत्व कीजें ॥ २०८ ॥
आत्मसौख्य पूर्ण बोध ।
अबोल बोलणें प्रसिद्ध ॥
गुरुचरणांसंनिध ।
कृष्णानंद बैसला ॥ २४५ ॥



आळंदीच्या श्रीनृसिंहसरस्वतीचा संबंध श्रीगुरू नृसिंहसरस्वतींशी जोडण्यात येत असल्याने त्यांच्या या 'श्रीस्वात्मसौख्य' ग्रंथाला तत्त्व-बोधाच्या दृष्टीने अनन्यसाधारण महत्त्व आले आहे. श्रीअप्रबुद्धांनी या ग्रंथाचे संपादन अतिशय नेटक्या रूपात व प्रत्येक ओवीचा अर्थ देऊन केले आहे. महत्त्वाच्या संदर्भाच्या स्पष्टीकरणार्थ टीपाही दिलेल्या आहेत.

## बोधकथांतून तत्त्वदर्शन

दत्तपंथीय ग्रंथांतील तत्त्वज्ञान वर सांगितल्या-प्रमाणे कितीही थोर असले तरी त्याचे आवाहन फार मर्यादित स्वरूपाचे असते. सर्वसामान्य प्रापंचिकास वा व्यावसायिकास जित्याच्या धाव-पळीत त्या तत्त्वाचे चिंतन व मनन करायला त्याला वेळ नसतो. कधी त्याची तेवढी बौद्धिक कुवतही नसते. अमूर्त, निराकार, निर्गुण अशा उपासनेचा तात्त्विक भाग त्याला रुचत नसल्यामुळे त्याला त्यासंबंधी काहीच प्रत्यय येत न राहिल्यामुळे तो यासंबंधी उदासीन राहातो. त्याची ही अडचण लक्षात घेऊन आबालवृद्धांना व स्त्रीपुरुषांना, सर्व जातिजमातींना सहजपणे साध्य होईल अशी सगुणोपासना नाना कथांच्या, आख्यानांच्या द्वारे प्रत्येक पंथात आकारास आलेली दिसेल. या कथांमुळे वाचकांच्या, श्रोत्यांच्या अंतःकरणास परमेश्वराचा, सद्-भक्ताच्या गुणांचा वेध लागतो. नित्य स्मरणाला कथांचे हे सगुण रूप त्याच्या अंगवळणी पडते. कोरड्या व रुक्ष वेदान्तनिरूपणापेक्षा हे तत्त्वज्ञान ज्यांच्या अंगी मुरून राहिले त्या श्रेष्ठ भक्तांच्या, साधकांच्या, सिद्धांच्या, मुक्तांच्या आख्यानात्मक कथा त्याला बोधप्रद वाटतात. या रसाळ बोध-कथांतील तत्त्वदर्शन त्याला मानवते.

दत्तपंथातील सांप्रदायिक ग्रंथांतून अशा बोध-कथांचा चांगला संग्रह झालेला दिसतो. निष्ठेने,

श्रद्धेने केलेले व्रताचरण, पुण्यकर्म, तीर्थयात्रा इत्यादींपासून झालेला लाभ या बोधकथांतून व्यक्त झालेला असल्यामुळे तत्त्वबोधाबरोबरच ऐहिकाची प्राप्ती झाल्याचे समाधान साधकास मिळते. श्रीगुरूच्या कृपेच्या लाभाच्याही अनेक कथा सांप्रदायिक ग्रंथात आहे. 'श्रीगुरुचरित्र' हा ग्रंथ खरे पाहाता अशा बोधकथासाठीच प्रसिद्ध आहे. या सर्व बोधकथाना श्रीश्रीपादयती आणि श्रीगुरुनृसिंहसरस्वती याचा संदर्भ असल्याने त्या सांप्रदायिकांना आदर्श स्वरूप ठरल्या आहेत. श्रीगुरुवरील भक्तीचा आदर्श सदीपकाच्या कथेत साकार झालेला आहे. आपल्या भक्तासाठी परमेश्वर अवतार धारण करतो या तत्त्वबोधासाठी अंबरीष द्विजाची कथा आलेली आहे. सुपुत्राच्या प्राप्तीसाठी शनिप्रदोष-व्रताचे कथन, रजकाला राज्यवराचे दान, श्रीगुरूंच्या कृपेने विप्राची उदरव्यथा जाणे, विप्राचे दैन्यहरण, मृत पुन उठविणे, वांझ महिषीचे दोहन, रुद्राक्षाचे माहात्म्य सांगणे, वृद्ध वंध्याप्रसवाची हकीकत, शुष्क काष्ठाला संजीवन प्राप्त करून देणे, ऐश्वर्यप्राप्तीसाठी अनंतव्रताचे आचरण, शूद्राला वर देऊन त्याची शेती समृद्ध करणे; अशा अनेक बोधकथा श्रीगुरुचरित्रात आलेल्या आहेत. या बोधकथांतून सांप्रदायिक वाचकांस तत्त्वबोध सहजासहजी होत राहातो.

## 'खेळ चिद्विलासडोहीं रे'

आतापर्यंतच्या विवेचनावरून ध्यानात येईल की, दत्तपर्यायांचे तत्त्वज्ञान अद्वैत तत्त्वज्ञानापेक्षा वेगळे नाही. अद्वैताचे ज्ञानच भोगासाठी प्रेमावर, द्वैतावर येते. एकाच तत्त्वाचे स्फुरण होते, एकाच तत्त्वाचा विकास होतो, एकच अव्यक्त व्यक्तास येते. एकाच चिद्तत्त्वाचा विकास होतो. 'सर्वं खल्विदं ब्रह्म', 'एकमेवाद्वितीयम् ब्रह्म', 'नेह नानास्ति किंचन' इत्यादी श्रुतिवचनांप्रमाणे परब्रह्म वस्तू ही एकच नित्य, परिपूर्ण व सत्य असली तरी तिच्याच स्फुरणाने जगाचा दृश्य विकास प्रकट झाला. 'सोऽकामयंत। बहुस्यां प्रजायेयेति॥' (तै. २–६) त्या ब्रह्मतत्त्वास आपण पुष्कळ व्हावे, आपणास प्रजा व्हावी अशी इच्छा झाली. 'स वै नैव रेमे तस्मादेकाकी न रमते स द्वितीयमैच्छत् ॥' (बृ. १–४–३) त्या ब्रह्म-तत्त्वाला ते एकाकी असल्यामुळे रममाण होता आले नाही. म्हणून अद्यापीही एकट्याला रम-माण होता येत नाही. त्याला दुसऱ्या जोडी-दाराची इच्छा झाली. याच इच्छेतून एकच पर-मात्मा प्रेमभोगासाठी आकारास, गुणास आला. ज्ञानेश्वर, नामदेवादी संतानी परमात्म्याच्या या चिद्विलासाचे मोठे बहारदार वर्णन केले आहे. 'माझें या विस्तारलेपणाचेनि नांवें। हें जगचि नोहे आघवें? ॥ जैसें दूध मुराले स्वभावें। तरि तेंचि दहीं ॥ कां बीजचि जालें तरु। अथवा भांगारचि अलंकारु। तैसा मज एकाचा विस्तारु। तें हें जग ॥' (ज्ञानेश्वरी : ९.६४-६५) माझ्या निर्गुण स्वरूपाचा विस्तार म्हणजेच हे चराचर जग नव्हे काय? दूध विरजले तर ते स्वभावतःच दही बनते. तसेच या जगाचे आहे. बीजच झाडाच्या रूपाने व्यक्तास येते, सोनेच अलंकार रूपाने बनते. त्याचप्रमाणे माझ्या एकाचा विस्तार म्हणजे हे जग होय.

ज्ञानेश्वरांनी एकामागून एक अशा दिलेल्या दृष्टान्ताचीही मौज पाहाण्यासारखी आहे. दुधाचे दही होते, पण दह्याचे पुनः दूध नाही होत; म्हणजे दृष्टान्त थोडा उणा पडला. बीजाचे झाड व झाडापासून बीज या दृष्टान्ताने आणखी स्पष्ट झाले. पण सोने आणि अलंकार यात एकरूपता आहे. फक्त आकाराचा बदल. 'अलंकार येणें नामें। असिजे निखिल हेमें' (चांगदेव पासष्टी : ११)—मूळ सुवर्ण व त्याचे अलंकार यात वजनात, कसात, मूल्यात फरक उरत नाही. 'सोने सोने-पणा उणें। न येतांचि झालें लेणें। तेवि न

वेंचिता जग होणें । अंगें जया ॥' (चांगदेवपासष्टीः ४) याच नात्याने व्यक्त जगत् हे परमात्मस्वरूप आहे. परमेश्वराचा विस्तार, त्या चित्तत्त्वाचा विलास म्हणजे हे जग असे या तत्त्वज्ञानाचे साररूप आहे. ' तैसें विश्व येणें नांवें । हें मीचि पैं आघवें । आतां चंद्रबिंब सोलावें । न लगे जेवीं ॥' (१४. ३७७) इतके सुस्पष्ट असे हे परमात्म्याचे व जगताचे नाते दृढ आहे. ' वन्हि आणि ज्वाला । दोन्ही वन्हीची केवळ ॥'(ज्ञानेश्वरी:१४. १२२) असे या ऐक्याचे स्वरूप आहे. अव्यक्त तत्त्वच व्यक्तास येऊन पसरते. पाण्यावरच्या फेसाप्रमाणे महत्तत्त्वापासून देहापर्यंत सर्व भूते परमात्म्याच्या ठिकाणी साकार होताना दिसतात. सुतांत मणी ओवावेत, सोन्याच्या सूत्रात सुवर्णाचे मणी ओवावेत त्याप्रमाणे हे चराचर जगत् परमात्मतत्त्वात अनुस्यूत आहे.

अशा रीतीने ब्रह्मतत्त्वाचा या परमात्म्याचा त्याच्याच आवडीने झालेला विकास म्हणजे हे जग हा सिद्धान्त दत्तपंथीय तत्त्वज्ञानासही मान्य आहे. चित् म्हणजे या विश्वाच्या आदिस्थानी असलेले चैतन्य होय त्याचा विकास म्हणजे चिद्विलास. कोणी याला स्फूर्तिवाद असेही म्हणतात. वेदोपनिषदांतून याच चिद्विलासाचे स्पष्टीकरण आहे. ज्ञानोत्तर स्थितीत श्रीमदाद्य-शंकराचार्य जगताच्या व्यक्त रूपास चिद्विलासच मानतात. ' यावान् पिण्डो गुडस्य स्फुरति मधुरिमा वास्ति सर्वोऽपि तावान् ॥ यावान् कर्पूर-पिण्डः परिणमति सदा मोद एवात्र तावान् ॥ विश्वं यावद् विभाति द्रुमनगनगरारामचैत्याभिरामम् ॥ तावच्चैतन्यमेकं प्रविकसति यतस्तत्तदात्मावरोपम् ॥ ' जेवढा गुळाचा खडा तेवढी त्यात गोडी सर्वत्र असते. जेवढा कापुराचा खडा तेवढा तो सुवासाने व्याप्त असतो. वृक्ष, पर्वत, नगर, आराम, चैत्य इ. गोष्टींनी भासमान होणारे विश्व म्हणजे एकच चैतन्य सर्वत्र त्या त्या आत्म्याच्या ठिकाणी विकसित असते–(शतश्लोकी १९) याच सिद्धान्ताची अप्रतिम खुलावट ज्ञानेश्वरांनी अनुभवामृतात केलेली जाणत्यांना माहीत आहेच. शिवशक्ती, गुरुशिष्य इत्यादी दोन भासणाऱ्या वस्तूंचे ऐक्य त्यांनी अनेक दृष्टान्त देऊन सिद्ध केले आहे. अनादी तत्त्वच दोघेपणाने स्वसुखासाठी नांदते. ' जिहीं एकएकावीण । न कीजे तृणाचेंही निर्माण । जिये दोघे जिवु प्राण । जिया दोघां ॥' (१.१२) शिव व शक्ती ही दोन तत्त्वे एकमेकांच्या साहाय्यावाचून जगताची काडीही निर्माण करू शकत नाहीत. ही वाटतात दोन, पण असतात एक; कशी ? तर–

> दो दांडीं एक श्रुति ।
> दोन्हीं फुलीं एक दृति ।
> दोहीं दिवीं दीप्ती :
> एकचि जेवीं ॥ १. १८
>
> दोही होटीं एक गोठी ।
> दोही डोळां एकी दिठी ।
> तैंचि दोघे जिहीं सृष्टि ।
> एकीच जे ॥ १९ ॥
>
> दाऊनि दोन्हीपण ।
> एकरसाचें आरोगण ।
> करीत आहे मेहुण ।
> अनादि जें ॥ २० ॥

दोन टिपऱ्यांचा नाद एकच असतो, दोन सजातीय फुलांचा वास एकच असतो, दोन दिव्यांचा प्रकाश एकच असतो, दोन ओठांतून एकच शब्द बाहेर पडतो, त्याप्रमाणे शिव-शक्ती दोन दिसली तरी वास्तविक पाहता एकच आहेत. शिवशक्तीचे हे मेहुण अनादिकालापासून ऐक्यानंदरसाचे आस्वादन करीत आहे. एकच तत्त्व स्वसुखासाठी भक्तीच्या, प्रेमाच्या भोगासाठी, विलासासाठी अनेक रूपांनी व्यक्त झाले. म्हणजे दिसायला दोन, पण असायला एक.

अद्वैत तत्त्वज्ञानाचे साररूप तत्त्व म्हणजे चिद्‌विलास हे असून त्याचाच आविष्कार दत्त-पंथीयांच्या वाङ्‌मयात उपलब्ध झालेला दिसतो. अनेक थोर दत्तभक्तांचे जे स्फुट वाङ्‌मय उपलब्ध आहे, त्यातून याच चिद्‌विलासाचे सुंदर दर्शन होते. माहुरचे श्रीविष्णुदास अथवा बेळगावकडचे श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रीकर यांच्यासारख्या प्रेमी भक्तांच्या स्फुट उद्‌गारातही चिद्‌विलासाचेच साररूप दर्शन होईल. ' परब्रह्माचि विश्व झालें। प्रेमार्थ दोन भासलें ।।' (दत्तप्रेमलहरी ४७२), ' एकचि अनेकरूपें विलसें । नाही भेदाभेद ।।' (२४१२), 'ब्रह्मरूपें त्रिपुटी दिसली । विश्व नोहें चैतन्यकेलि ।।' (१७६५) अशा शेकडो वचनां-तून श्रीपंतांनी परमात्म्याचा प्रेमविलास म्हणजे जगाचे हे व्यक्तरूप स्पष्ट केले आहे. परमात्माच देव, तोच भक्त; तोच शिव, तोच शक्ती; तोच सत्ता, तोच स्फूर्ती; तोच गुरु, तोच शिष्य; ' देव भक्त हा आपणची होऊनी । खेळे आनंदभुवनीं। झाला सर्वहि कांहीं न होऊनी । प्रेमळ भक्त-जननी । वेदां न कळे हो सद्‌गुरूची लीला ।।' (३३०) असा मोठा ऐक्याचा देखावा प्रेमभोगा-साठी द्वैतावर उभा असल्याचे श्रीपंतांनी सांगि-तले आहे. ' चैतन्याची लीला सहज भास झाला। नाहीं नाहीं चैतन्यासी चिद्‌विलास भासला ।।' (२२१५) ' चिद्‌विलासमात्रें सगुण तेंची झालें। एकचि अनंतरूपें सहज भासलें । निजप्रेम भोगाया देव भक्त झालें। सर्वत्र असूनि नाही कोणा दिसलें' (२३७), ' एकाकी न रमते म्हणूनी । प्रेमास्तव विश्व बनुनी । गुरुशिष्य स्वयें होउनी । प्रगट केलें दत्तानंदा ।।' (१७६५), ' एकीं अनेक दाविली लीला । एकपणेंसी नाही विकरला ।। स्वानंदीं स्वानंद दाटला। शिवशक्तिरूपें नटला।।' (१७४६) ' सत्ताची स्फूर्ती (दत्त अवधूतमूर्ती) । सत्तारूपें शिवचि असे । विलास ती शक्ति ।।' (१६२२), ' व्यतिरेकान्वयें पाहतां दृष्टि । ब्रह्मचि विश्व दाही रे ।। सत्ता स्फूर्ति विलसे त्रैमूर्ति । खेळ चिद्-विलासडोहीं रे ।।' (२९९२) अशा अनेक वचनां-तून श्रीपंतांनी चिद्‌विलासाचे स्वरूप अत्यंत सोप्या व अनुभूतिसंपन्न अशा भाषेत व्यक्त केले आहे. हे जगत् म्हणजे श्रीपंतांच्या दृष्टीने चिद्-विलासाच्या डोहातला खेळच आहे.



# ९ सांप्रदायिक आचारधर्म



## व्रतकथामहिमा

दत्तपंथीयांच्या आचारधर्माकडे लक्ष देण्यापूर्वी ध्यानात घ्यावयास हवे की, कोणतीही उपासना अथवा धर्मपंथ त्याच्या आचारावरून ओळखला जातो तत्त्वज्ञान हे अमूर्त वा अव्यक्त असून ते प्रामुख्याने आचारातून प्रत्ययास येते किंबहुना तत्त्वज्ञान हा केवळ चर्चेचा विषय राहातो आणि आचार मात्र त्या तत्त्वज्ञानास आधारून लक्षात येईल असा गोचर बनतो म्हणूनच ' आचारप्रभवो धर्मः ।' धर्म हा आचारापासून ओळखला जातो असे म्हणतात. एखाद्या धर्मपंथाप्रमाणे शिष्टसमत आचरण म्हणजे आचार होय किंवा आचार हे एक धर्माचे प्रधान अंग मानले गेले आहे ' आचार परमो धर्मः ' असे वसिष्ठस्मृतीचे म्हणणे आहे आचारानुसार फलप्राप्ती, असेही समीकरण सांगितले गेले आहे धर्मशास्त्राप्रमाणे आचार असेल तरच विहित फल मिळते असे स्मृतिकार म्हणतात आचार, व्यवहार, प्रायश्चित्त यांचा समावेश धर्मविचारात असल्याने दत्तपंथीयांनी आचारधर्मास महत्त्वाचे स्थान दिले आहे याज्ञवल्क्यस्मृतीने श्रुति-स्मृतींबरोबरच सदाचारास महत्त्व दिले आहे किंवा श्रुतीत, स्मृतीत आधार मिळाला नाही तर त्या प्रसंगी शिष्टाच्या आचारास प्राधान्य द्यावे असेही शास्त्रकार सांगतात ' श्रुतिस्मृतिविहिनो धर्मः । तदलाभे शिष्टाचारः प्रमाणम् ॥' (वसिष्ठस्मृती १४) आचारधर्मास इतके महत्त्व असल्याने व त्यावर सांप्रदायिक तत्त्वज्ञानाचा प्रभाव असल्याने सर्वसामान्य लोकांना आचारच धर्मप्रमाणे वाटतो

हा आचार एकदा प्रधान मानल्यानंतर कोणाचा आचार, असा एक प्रश्न सहजच उपस्थित होतो. ज्यांना वेदाचे ज्ञान असते, जे निर्मत्सर असतात, जे निरहंकारी आहेत, दंभ, दर्प, लोभ, मोह, मद व कोध यापासून जे मुक्त आहेत, ते शिष्ट असून त्यांची वर्तणूक पाहून सर्वसामान्य लोकांनी आपले आचरण ठेवावे. जनपदधर्म, ग्रामधर्म, कुलधर्म, व्रताचरण, पूजापाठ, दिनचर्या, आन्हिक इत्यादींना आचारधर्मात प्रामुख्याने स्थान मिळालेले दिसते. प्रजेची धारणा करणारा धर्म पालन करण्यासाठी मुख्यतः आचाराची जपणूक करावी लागते. जीविताचे ध्येय मोक्ष मानले तर त्यानुसारही आचारधर्मास महत्त्व प्राप्त होते. नाना व्रते, वैकल्ये, तीर्थयात्रा, पूजाविधी इत्यादींचा समावेश आचारधर्मात होत असल्याने व सर्वसामान्य लोकांना तात्त्विक चिंतनापेक्षा आचरणशील धर्मांचेच आवाहन पोचत असल्याने दत्तपंथीयांनी आचारधर्मास विशेष महत्त्वाचे स्थान दिलेले दिसेल. सर्वसामान्य प्रापंचिकांना ऐहिक साधून मोक्षसुखाची वाटचाल करणे सुलभ व्हावे म्हणून आचारधर्माची व्यवस्थित मांडणी सांप्रदायिक ग्रंथातून झालेली दिसते. जे उग्र तापसी आहेत, साधक आहेत, योगी आहेत, त्यांच्याही आचारासंबंधी दत्तपंथीयांनी तात्त्विक भूमिकेवरून विचार केलेला दिसतो.

श्रीगुरुचरित्रादी सांप्रदायिक ग्रंथांनुसार ब्राह्मणांच्या आचारधर्मावर विशेष कटाक्ष असल्याचे दिसते. धर्मरक्षण, ज्ञानविद्याचे वर्धन, तत्त्वचिंतन, सद्‌विचाराची जपणूक इत्यादी कामे वर्णकल्पनेप्रमाणे ब्राह्मणाकडे असल्याने सांप्रदायिक आचारधर्माचा कल ब्राह्मणाकडे असल्याचे स्वाभाविक आहे. असे असले तरी स्त्रीशूद्राकरिता दत्तपंथीयात अनेक प्रकारची व्रते आणि वैकल्ये सांगितली आहेत. नाना प्रकारची व्रते आणि वैकल्ये यात जडलेल्या मनास एक प्रकारची शिस्त लागते, निष्ठा उत्पन्न होते. त्यागाची शिकवणूक मिळते, चित्तशुद्धी होते, असा एक सिद्धान्त सांप्रदायिकांचा आहे. व्रते आणि वैकल्ये यांचे आचरण हाही एक ' विशेष धर्म ' मानला गेला आहे. सांप्रदायिकांत ब्राह्मणाच्या आचारधर्मास प्राधान्य असले तरी रजक, शूद्र वा म्लेच्छ उपेक्षिलेला नाही. मांडीचा फोड बरा करण्यासाठी यवन राजा श्रीगुरुंच्या दर्शनासाठी गाणगापुरास आल्याची कथा श्रीगुरुचरित्रात आहे. ' नगरी नित्य धेनुहत्या। यवनजाति तुम्ही सत्या। जीवहिंसा पापकृत्या। वर्जावें आतां निर्धारें॥' ( श्रीगुरुचरित्र : ५०–९३ ) असा आचारप्रधान उपदेश श्रीगुरूंनी म्लेंच्छ राजास केलेला दिसतो. याच ग्रंथाच्या अठ्ठेचाळिसाव्या अध्यायात शूद्र भक्ताच्या शेतातील जोंधळा ' शतगुणें पिकवुनि पुढती। आनंदविलें तयाते ' अशी कथा आहे. या दृष्टीने चाळिसाव्या अध्यायातील शबरसुताची व चव्वेचाळिसाव्या अध्यायातील तंतुक भक्ताची आणि विमर्षण राजाची कथा वाचण्यासारखी आहे.

अशा प्रकारे स्त्रीशूद्रादिकांनाही सन्मार्गाचे धडे देणाऱ्या या पथात व्रतांना व वैकल्यांना आचारधर्माच्या दृष्टीनेही महत्त्वाचे स्थान आहे. ही व्रते आणि वैकल्ये बहुतेक ठिकाणी ऐहिक लाभासाठी असली तरी तप, त्याग, शुद्ध आचरण, चित्तशुद्धी इत्यादी सद्‌गुणांना त्यात स्थान आहे. आठव्याच अध्यायात शनिप्रदोष व्रताची कथा आलेली आहे. करवपुरीची अंबिका माता आपला मुलगा मंदबुद्धीचा पाहून त्याच्यासह जीव देण्यास निघाली; पण श्रीपादयतींनी तिला सांगितले, ' प्रदोषकाळी श्रीशंकराची आराधना करीत जा. ' गवळ्याच्या मुलाने शनिवारच्या त्रयोदशीस पाषाणाच्या शिवलिंगाची पूजा करून ऐश्वर्य मिळविल्याची कथाही त्यांनी तिला सांगितली. शनिप्रदोषी शिवलिंगाची पूजा केल्यावर पुत्र ज्ञानी होईल

असा त्यांनी विप्रस्त्रीस आशीर्वादही दिला. ' भक्तिकृपा करून । करी वो ईश्वर आराधन । पुत्र होईल श्रीहरी ऐसा ॥' हा श्रीपादयतींचा उपदेश पुढे सर्वांनाच मार्गदर्शक ठरला. 'प्रदोपसमयी पूजा देखती । गौळणी होय देवजननी ॥ तिच्या पोटी होईल सुत । तोचि विष्णुअवतार विख्यात ॥' असा प्रदोषकाळीच्या महादेवपूजेचा महिमा आहे. 'तुझें मनी असेल जरी । होईल पुत्र मजसरी । संशय सांडूनि निर्धारी । शनिप्रदोषी पूजी शंभु ॥' ( १. १०४ ) असे नुसते श्रीपादयतींनी सांगितले नव्हे, तर ' बोलावूनि तिचे कुमारकासी । हस्त ठेविती मस्तकेसी । ज्ञान जाहलें तत्काळेंसी । त्रिवेदी झाला शास्त्रज्ञ॥' (८.१०६) विप्रस्त्रीच्या पुत्रास पुढे सर्व प्रकारच्या विद्या आल्या. 'पुत्र झाला तिचा महाज्ञानी । वेदशास्त्रसंपन्नी । पूज्य जाहला अति गहनी । सर्वांहूनि अधिकता ॥ विवाह झाला मग तयासी । पुत्रपौत्री नांदे हर्षी । श्रीगुरुकृपा होय ज्यासी । ऐसें होय अवधारा ॥' (८.११२-१३) असा हा महिमा शनिप्रदोप व्रताचा सांप्रदायिकांत असल्याने या व्रताचे आचरण आजही होत असताना दिसते.

पस्तिसाव्या अध्यायात सीमंतिनीच्या कथेच्या अनुरोधाने सोमवारव्रताची अशीच एक कथा श्रीगुरुचरित्रात आली आहे. सोमवारचे व्रत केल्याने अखंड अशा सौभाग्याची प्राप्ती होते. सोमवारचे व्रत आचरणे म्हणजेच श्रीगुरुंची सेवा होय. स्त्रियांना पतीशिवाय दुसरा गुरू नसल्याचेंही याच अध्यायात स्पष्ट केले आहे. 'स्त्रियांसी न सांगावा मंत्र' कारण 'पतिसेवा । याचि कारणें मंत्र न द्यावा । व्रतोपवास करावा । गुरु-पुरुष-निरोपें ॥' (३५.८७) असा श्रीगुरुंचा आदेश आहे. शिवव्रताचा महिमा सांगताना श्रीगुरुंनी म्हटले आहे, ' नित्यानंद वसे शांत । निर्विकल्प निरामय वस्त । ऐसा ईश्वर अर्चा त्वरित । सकळाभीष्ट पाविजे ॥ विरक्त अथवा मदनरत विषयातुर आसक्त । जे पूजिती पूर्ण भक्त । त्यासी ईश्वर प्रसन्न ॥ संसारमायासागरांत । बुडताति जन समस्त । एखादे समयी श्रीगुरुभक्त । शिवव्रत आचरिती ॥ त्याणें पावतील पैलपार । ऐसें बोलती वेदशास्त्र । स्वर्गापवर्ग अधिकार । त्यासी होती परियेसा ॥ विशेष असे व्रत एक । सोमवार महासुख । ईश्वरार्चन करावें ऐक । सकळाभीष्ट पाविजे ॥ नक्तभोजन उपवास । जितेंद्रिय करावें विशेष । वैदिकादि लौकिक मार्गी सुरस । विधिपूर्वक पूजावें ॥ गृहस्थादि ब्रह्मचारी । सुवासिनी कन्याकुमारी । भ्रताराविण विधवा जरी । व्रत करावें अवधारा ॥' (३५. ९८-१०४) यानंतर सोमवारव्रताचे आचरण करून सीमंतिनीनें सौभाग्य कसे मिळविले याचीही कथा याच अध्यायात आलेली आहे.

श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून वनवासातील युधिष्ठिराने अनंतव्रताचे आचरण केले म्हणून त्याला पुनः राज्यप्राप्ती झाली. या अनंतव्रताची कथा श्रीगुरुचरित्राच्या बेचाळिसाव्या अध्यायात आलेली आहे. सुमंतू नावाचा एक विप्र होता. त्याची भार्या दीक्षा. त्यांची कन्या सुशीला. विप्राची पत्नी निधन पावल्यावर त्याने कर्कशी नावाच्या दुसऱ्या स्त्रीशी लग्न केलें. सुशीलेचा विवाह कौंडिण्य ऋषीबरोबर झाला. कौंडिण्य ऋषी सुशीलेबरोबर एका नदीतीरी आले. तेथें मोठा स्त्रीसमुदाय अनंतचतुर्दशीचे व्रत करताना त्यांना दिसला. सुशीलेने अनंताची पूजा केली. त्यामुळे तिच्या पतीस ऐश्वर्य प्राप्त झाले. परंतु हे ऐश्वर्य स्वतःच्या तपश्चर्येचे अशी खात्री कौंडिण्यऋषींना होती. त्यांनी पत्नीच्या हातातील तावडा दोर अग्नीत टाकून दिला. पत्नीने तो दुधात टाकून विझविला. कौंडिण्यांना यामुळे दारिद्र्य आले. त्याना पश्चात्ताप झाला. अनंताचे दर्शन झाल्याखेरीज अन्नपाणी घेणार नाही अशी त्यांनी प्रतिज्ञा केली. शेवटी त्याला अनंतरूपी

परमेश्वराचे दर्शन झाले. 'व्रतामध्यें उत्तम व्रत। अनंत नाम विख्यात ॥' अशीच केवळ ख्याती श्रीगुरूंनी सांगितली आहे असे नव्हे, तर 'अनंत' नामाचा महिमा सांगताना त्यांनी म्हटले आहे, 'आता सांगेन तुम्हांसी। अनंत कवण म्हणसी। सर्वां ठायी आपण वासी। 'अनंत' नाम आम्हा असे ॥ कला काष्ठा मुहूर्त आपण। दिन रात्र सर्व शरीर जाण। पक्ष मास वर्ष आपण। युग कल्प आदिकरोनिया ॥ अवतरलो मी नारायण। भूभार उतरावया कारण। दानव दुष्ट निवारण। जन्म जाहला वासुदेवकुळी ॥ अनंत मीच जाणसी। संशय न धरी मानसी। त्रैमूर्ति मीच सर्वांशी। ब्रह्मा-विष्णु-महेश्वर ॥' (४२.३४-३७)

हे व्रत केव्हा व कसे आचरावे याचाही खुलासा याच अध्यायात आहे. 'भाद्रपद शुक्ल चतुर्दशी। व्रत करावे परियेसी। अनंत नाम ख्यातीसी। सांगेन तुज ऐक पा। रक्तपट्ट सूत्रेसी। अनंत करावा चतुर्दश-ग्रंथीसी। घेवोनि यावें नदीसी। स्नान करावें शुचीने ॥ दिव्यांवर परिधानूनि। हळदी कुंकुम लावोनि। आणावे कलश नूतन दोनी। गंगा यमुना म्हणोनिया ॥ उदक भरोनि तयांत। पंचपल्लव रत्नसहित। घालूनि पूजावे त्वरित। षोडशोपचारें करूनि ॥ नाना प्रकारे आरती। करावी गंगायमुनेप्रती। मग पूजावें दर्भग्रंथी। शेषरूपें करोनिया ॥' (४२.७७-८१) अनंत-पूजेचा सविस्तर विधीही येथे सांगितलेला आहे. पूजा केलेला अनंत उजव्या हातात बांधतात. चौदा वर्षांनंतर या व्रताचे उद्यापन कसे करावे याचेही मार्गदर्शन येथे आहे. या काम्य व्रताच्या आचरणाने गतवैभव परत मिळते अशी श्रद्धा आहे. हे व्रत सार्वत्रिक नसून कोणी उपदेश केल्यास अथवा अनंताचा दोरा सहज सापडल्यास करायचे असते. या व्रताची मुख्य देवता विष्णू व उपदेवता शेष व यमुना या आहेत. कुलपरं-परेतही हे व्रत चालते.

...शी अनेक व्रते प्रामुख्याने शिवपूजेची श्रीगुरुचरित्रात आली आहेत. व्रताचरणामुळे आचारात शुद्धता येते, त्यास शिस्त लागते व अखंड परमेश्वरानुसंधान लागते. या दृष्टीने तिसऱ्या अध्यायातील अंबरीष व्रतनिरूपणाची कथा लक्षणीय आहे. अंबरीष नावाचा एक राजा एकादशीव्रत, अतिथिपूजा करून हरिचिंतनात मग्न असे. त्याच्या व्रताचा भंग करण्याचा प्रयत्न एकदा दुर्वास ऋषीने केला. परंतु आपल्या भक्तास तारण्यासाठी प्रत्यक्ष विष्णूनेही दहा अवतार घेण्यास आनंदाने मान्यता दिली. ब्रह्मदेवाचा रजोगुण, विष्णूचा सत्त्वगुण व उमा-रमणाचा तमोगुण यांचे एकीकरण होऊन दत्तात्रे-यांचा अवतार याच हेतूने झाला. कपटवेष धरून आलेले तीन देव अनसूयेचे पुत्र झाल्याचा उल्लेख याच अध्यायाच्या शेवटी आला आहे.

## आणि असा क्षेत्रमहिमा

श्रीदत्तप्रेमिकाना काही स्थानाचे वा क्षेत्राचे प्रेम विशेष असते. श्रीदत्तप्रभूंचा अवतार ज्या स्थानी झाला, क्रीडा जेथे झाल्या, भ्रमण, भिक्षा, निद्रा जेथे झाली, त्या स्थानांना भेटी देणे, तेथे अनुष्ठान करणे, तेथील तीर्थांत स्नान करणे, तेथील देवताची पूजाअर्चा करणे इत्यादींनी त्याचा एक आचारधर्मच बनून जातो. श्रीपाद-यती, श्रीनृसिंहयती, श्रीवासुदेवानंद सरस्वती, श्रीसमर्थस्वामी अक्कलकोटकर, श्रीमाणिकप्रभू, श्रीपंतमहाराज इत्यादींच्या अवतारलीला ज्या ठिकाणी प्रकटल्या त्या क्षेत्राची यात्रा करणे, तेथील महिमा गाणे, हाही एक आचारधर्माचाच भाग होय. गिरनार, श्रीक्षेत्र मातापूर (माहूर) गाणगापूर, नृसिंहवाडी, औदुंबर, नारेश्वर-गरुडेश्वर इत्यादी दत्तक्षेत्राप्रमाणे काही शिव-क्षेत्रेही दत्तपंथीयांना महत्त्वाची वाटतात, काशी, श्रीशैल्य, श्रीगोकर्णमहाबळेश्वर इत्यादी क्षेत्रांची महती श्रीगुरुचरित्रकारांनीच वर्णन केली आहे.

इतिहासकाळातील पहिला दत्तावतार म्हणजे श्रीपादयती होत. यांचा जन्म 'पीठापूर'चा. 'पीठापुर पूर्वदेशी' (५.१०) एवढाच या स्थानाचा उल्लेख करून पुढे 'पीठापुरीं दत्तात्रेय वास असे सनातन ।।' (१५.८७) असे म्हटले आहे. श्रीपादवल्लभ तीर्थयात्रा करीत करीत निवृत्तिसंगमावर कृष्णेच्या काठी कुरवपूर नावाच्या गावी आले. हेच क्षेत्र कुरगुड्डी म्हणूनही प्रसिद्ध आहे. श्रीगुरुचरित्रकारांनी या क्षेत्राबद्दल म्हटले आहे 'कुरवपुर महाक्षेत्र । कृष्णा गंगा वाहे तीर। महिमा सांगतां असे अपार । भूमंडळांत दुर्लभ ।।' (८.८) याच कुरवपुरात श्रीपादयतींच्या पुढील जन्मीचे धागेदोरे स्पष्ट झाले आणि येथील गंगेत धुणे धुणाऱ्या भक्त रजकाला पुढील जन्मी राज्यपद लाभण्याची संधी लाभली. याच कुरवपुरी श्रीगुरूंनी निजानंदी गमन केले. श्रीगुरुचरित्राच्या दहाव्या अध्यायात याच कुरवपुराचा महिमा सांगण्यासाठी वल्लभेश नावाच्या एका व्यापारी द्विजाची कथा सांगितली आहे. श्रीपादवल्लभ गुप्तवेषाने वावरतात अशी श्रद्धा असल्यामुळे या स्थानाची यात्रा जिज्ञासू अजूनही करतात. 'श्रय मूर्तीचा अवतार । त्याचा कवणा कळे पार। निधानतीर्थ कुरवपुर । वास तेथें गुरुमूर्ति ।।' (१०.८) श्रीगुरूंचा निवास ज्या स्थानी तेथे कामधेनूच असल्याची प्रचीती भक्तांना येते. या स्थानाचा महिमा वल्लभेश नावाच्या 'उदीममार्गें उदर भरीत' फिरणाऱ्या एका द्विजाच्या कथेत चांगल्या रीतीने प्रकट झाला आहे. हा श्रीपादभक्त कुरवपुराच्या यात्रेस निघाला. मार्गात काही चोरांनी त्याला ठार करून त्याचे द्रव्य हरण केले. त्यावेळी भक्तकैवारी श्रीपादयती तेथे प्रकट झाले आणि त्यांनी आपल्या त्रिशूलाने चोरांचा नाश केला आणि ब्राह्मणास सजीव केले. 'असे अनेक भक्तजन । सेवा करिती श्रीपादस्थान । कुरवपुर प्रख्यात जाण। अपार महिमा परियेसा ।।' (१०.३८)

श्रीगुरू श्रीपादयतींनी काशी, बद्रिकाश्रम, गोकर्णक्षेत्र इत्यादींची यात्रा केली होती. श्रीगुरू गोकर्णक्षेत्रीच का आले? या नामधारकाच्या प्रश्नास अनुसरून गोकर्णक्षेत्राचा महिमा श्रीगुरुचरित्रातील सहाव्या आध्यायात आलेला आहे. म्हणून दत्तभक्तांना गोकर्णमहाबळेश्वराचे महत्त्व वाटते. श्रीपादयती स्वत: दत्त असून ते तीर्थयात्रा का करतात? याचे उत्तर असे की, 'दत्तात्रेय देव जाण । तीर्थें हिंडे याचि कारणे। भक्तजनां दीक्षा करणें । उपदेशोतसे हितार्थ ।।' (६.९) आणि विशेष महिमा गोकर्णींचा का? तर 'विशेष तीर्थ आपुले स्थान । गोकर्णीं असे शंकर आपण । याचि कारणें निर्गुण । त्रैमूर्ति वस्ती तयें स्थानी ।।' (६.१०) या तीर्थस्थानी महाबळेश्वर हे एक स्वयंभू शिवलिंग कसे निर्माण झाले; यासंबंधीची रावणाची प्रसिद्ध कथा येथे आलेली आहे. पुलस्त्य ब्राह्मणाची भार्या कैकया अथवा कैकसी ही थोर शिवभक्त होती. हिचा पुत्र रावण. मातेच्यासाठी रावणाने तपश्चर्या करून शंकराचे आत्मलिंगच प्राप्त करून घेतले. हे लिंग जमिनीवर ठेवता कामा नये अशी आज्ञा शंकराची होती. गणपतीने हे लिंग जमिनीवर ठेवले. रावणाची संध्या झाल्यावर त्याने ते लिंग हालवून पाहिले; पण ते जमिनीपासून अलग होईना. या ओढाताणीत त्याचा आकार गाईच्या कानासारखा झाला म्हणून या स्थानास गोकर्णमहाबळेश्वर असे नाव पडले याच गोकर्णक्षेत्राचा महिमा विस्ताराने पुढच्याच सातव्या अध्यायात आलेला आहे. गोकर्णक्षेत्राच्या यात्रेने ब्रह्महत्यादी पातके कशी नाहीशी होतात हे इक्ष्वाकू वंशातील मित्रसह नावाच्या प्रतापवंत व शास्त्रपारंगत राजाच्या कथेवरून स्पष्ट होते सौदामिनी नावाच्या एका पतित स्त्रीने चुकून बिल्वपत्रे वाहून शिवपूजा केली. त्यामुळे तिचा उद्धार झाल्याची कथा याच अध्यायात आहे म्हणून या स्थानाची महती विशेष आहे. 'महाबळेश्वर'

लिंग देखा । स्वयभू शिव असे ऐका । आख्यान असे विशेषा । लवोदरे प्रतिष्ठिले ॥' ( ६-१३ ) अशी याची महती आहे 'लिगमहिमा ऐके कानी । जे पूजितील वर्षे तीन्ही । तेचि ईश्वर होतील निर्गुणी । वरदमूर्ति तोचि होय ॥' ( ६-१४८ ) अशी या लिगस्थानाची ख्याती आहे- या क्षेत्राचा आणखी महिमा वर्णन करताना श्रीगुरुचरित्रकारानी म्हटले आहे

'स्मरण करिता गोकर्णासी ।
ब्रह्महत्यादि पाप नाशी ।
ईश्वर तेथें सदा निवासी ।
मृत्युजय सदाशिव ॥
जैसे कैलासीचे शिखर ।
अथवा मूर्धानमदिर ।
निश्चय वास कर्पूरगौर ।
गोकर्णक्षेत्री परियेस ॥
सहस्र ब्रह्महत्या जरी ।
घडल्या असतील या शरीरी ॥
प्रवेश होता गोकर्णक्षेत्री ।
शुद्धात्मा होय परियेसा ॥
रुद्रोपेंद्रविरिंचि देखा ।
जाऊनि तया स्थानी ऐका ।
तप केलें हो सकळिका ।
काम्यसिद्धी व्हावया गति ॥
भक्तिपूर्वक तया स्थानी ।
जप व्रत करिती जाण ।
फळ होय लक्ष गुण ।
ऐसें पुण्यक्षेत्र असे ॥
जेथें ब्रह्मा विष्णु देखा ।
इद्रादि देवगण सकळिका ।
साध्य झालें तप ऐका ।
यावेगळें काय सागू ॥
जाणा तो साक्षात् ईश्वर ।
गोकर्ण क्षेत्र कैलास पुर ।
प्रतिष्ठा केली विघ्नेश्वरें ।
विष्णूनिरोपें विनयार्थ ॥
समस्त देव तेथें येती ।
पुण्यक्षेत्री वास करिती ।
ब्रह्मा विष्णु इद्रासहिती ।
विश्वेदेव मरुद्गण ॥
.................................
.................................
गोकर्ण क्षेत्र असे गहन ।
लिंग तीर्थे असख्यात जाण ।
पदोपदी असती निर्गुण ।
ऐसें क्षेत्र अनुपम्य ॥
सागो किती त्याची खूण ।
असख्यात तीर्थे जाण ।
पाषाण समस्त लिंग सगुण ।
तीर्थ जाण समस्त उदके ।
कृतायुगीं महाबळेश्वर श्वेत ।
त्रेतायुगी दिसे लोहित ।
द्वापारी रूप पीत ।
कलियुगी कृष्णवर्ण जाणा ॥'
( ७ ५५-१०१ )

गोकर्णमहाबळेश्वरच्या दर्शनाने कोणती पापे कशी नाहीशी होतात हेही या अध्यायात सागितले आहे गोकर्णक्षेत्री कोणता विधी कोणत्या दिवशी करावा याचेही निरूपण आहे 'आदित्य-सोम-बुधवारी । अमावस्यादि पर्वाभीतरी । स्नान करूनि समुद्री । दानधर्म करावा ॥' ( ७१०८ )- शिवपूजाव्रत, होमहवन, जप, ब्राह्मणसतर्पण इत्यादी विधी या क्षेत्री केल्यास 'ईश्वर भोळा' सतुष्ट होतो गोकर्णक्षेत्राच्या यात्रेमुळे चतुर्विध पुरुषार्थ साधतात- म्हणून दत्तपर्यायानाही या क्षेत्राच्या यात्रेचा मोह नेहमीच होतो-

तीर्थक्षेत्राच्या यात्रेचे महत्त्व श्रीगुरुचरित्रात अनेकदा वर्णन केले आहे श्रीगुरू नृसिंहसरस्वतीनी आपल्या शिष्याना तीर्थयात्रा करण्याचा उपदेश केला आहे काशी, तटाकस्थाने, नदीसगम, पुष्कर, बदरी, केदार, कुरुक्षेत्र, गाणगापूर,

कोल्हापूर, श्रीशैल्यपर्वत इत्यादी स्थानांच्या यात्रा शिष्यांनी कराव्यात असे श्रीगुरूंनी सांगितले आहे 'श्रीगुरु म्हणती शिष्यासी। तुम्ही आश्रमी संन्यासी। राहू नये पाच दिवसी। एके ठायी वास करीत ॥ चतुर्थाश्रम घेऊनि। आचरावी तीर्थे भुवनी। तेणे मनी स्थिर होऊनि। मग रहावे एकस्थानी॥' (१५ १६–१७) ब्रह्मांड-गोलकात प्रसिद्ध असलेल्या तीर्थराज काशीचा निर्देश श्रीगुरूंनी प्रथम केला आहे गंगाभागी-रथीतटाकयात्रा, वरुणानदी, कुशावर्ती, शतद्रू, विपाशका, वितस्ता, शरावती इत्यादी नदींच्या तटाकांची यात्रा, चंद्रभागा, रेवती, शरयू, गोमती, वैदिका, मंदाकिनी इत्यादी नदींतून स्नाने, नदीसंगमात स्नाने, सेतुबंध रामेश्वर, त्रावणकोर येथील श्रीरंग पद्मनाभसरोवर, बदरी तीर्थ, कुरुक्षेत्र, श्रीशैल्य, केदार, पुष्कर, कोटिरुद्र नर्मदातीर्थ, मातृकेश्वर कुब्जतीर्थ, गोकर्ण, शंखकर्ण इत्यादी तीर्थस्थानांतील स्नाने, अयोध्या, मथुरा, कांची, द्वारावती, गया, गोदावरीतटाक इत्यादी क्षेत्रांची यात्रा श्रीगुरूंनी उपदेशिली आहे पूर्णा, कृष्णावेण्णा, तुंगभद्रा, पंपासरोवर अशा आणखी काही तीर्थस्थानांचा उल्लेख श्रीगुरू करतात 'पांडुरंग मातुर्लिंग। क्षेत्र बरवे पुरी गाणग। तीर्थे असती तेथे चांग। अष्टतीर्थे मनोहर॥ अमरजासंगमात। कोटितीर्थे असती ख्यात। वृक्ष असे अश्वत्थ। कल्पवृक्ष तोचि जाणा॥ तया अश्वत्थसन्मुखेसी। नृसिंहतीर्थ परियेसी। तया उत्तरभागेसी। वाराणसी-तीर्थ असे॥' (१५ ५१–५४)

अशा या गाणगापुराचा महिमा वर्णन करून आचरणाचा आदर्श सांगताना म्हटले आहे, 'तेथे जे अनुष्ठान करिती। तया इष्टार्थ होय त्वरिती। कल्पवृक्ष आश्रमती। काय नोहे मन-कामना॥' (१५ ५८) कोणत्या पर्वणीस कोणती तीर्थयात्रा करावी यासंबंधीही मार्गदर्शन या अध्यायात आहे महाबळेश्वर, कोल्हग्राम, भिल्लवडी, अमरापुर इत्यादी क्षेत्रांचा निर्देश करून श्रीगुरूंनी म्हटले आहे, 'अखिल तीर्थे तया स्थानी। तप करिती सकळ मुनि। सिद्ध होय त्वरित ज्ञानी। अनुपमक्षेत्र परियेसा॥ ऐसे प्रख्यात तया स्थानी। अनुष्ठिता दिवस तीनी। अखिलाभीष्ट पावोनि। पावती त्वरित परमार्थी॥' (१५ ८१–८२) जगालय, शूर्पालय, छाया, मणिगिरी अशी अनेक तीर्थे असून 'नव्हे संसारयेरझारी। तया क्षेत्रा आचरावे॥' असा श्रीगुरूंचा उपदेश आहे तीर्थयात्रा करीत असताना सावधगिरी कोणती घ्यावी, काय काय टाळावे, यासंबंधीही मार्गदर्शन करताना म्हटले आहे, 'समस्त तीर्थे भूमीवरी। आचरावी परिकरी। रजस्वला होता सरी। स्नान करिता दोष होय॥ संक्रांति कर्काटक धरूनि। त्यजावे तुम्ही मास दोनी। नदीतीरी वास करिती कोणी। त्यासी काही दोष नाही॥' (१५ ९१–९२)

श्रीपादयती, श्रीनृसिंहसरस्वती, श्रीवासुदेवा-नंद सरस्वती यासारख्या दत्तावतारी महात्म्यांनी ज्या ज्या ठिकाणी आपले वास्तव्य केले, ती ती ठिकाणेही दत्तपंथीयांना यात्रेसाठी पवित्र वाटली. अवधूताने काशीक्षेत्राचा सांगितलेला महिमा श्रीगुरुचरित्राच्या एकेचाळिसाव्या व बेचाळि-साव्या अध्यायात आलेला आहे श्रीगुरूंनीही सायंदेवास काशीक्षेत्राचा महिमा निवेदन केला आहे 'विश्वेश्वरआराधन। असे एक निधान। काशीपुर महास्थान। सकळाभीष्टे साधतील॥' (४१ ३६) असा काशीचा महिमा आहे 'नाम 'आनंदकानन।' विख्यात असे महास्थान। समस्तांची मनकामना। तये ठायी होतसे॥ नाम असे पुरी 'काशी।' समस्त धर्मांचिये राशी। सकळ जीवजंतूसी। मोक्षस्थान परियेसा॥ वास करिती तये स्थानी। त्याते देखताचि नयनी। जाती दोष पळोनि॥ स्थानमहिमा काय सांगू?' (४१ ४३–४५) या क्षेत्रात एक पावलागणिक अश्वमेधाचे फळ मिळते धर्म, अर्थ, काम, मोक्ष

यापैकी जो हेतू मनात येईल तो सिद्धीस जाईल.

काशीक्षेत्री गेल्यावर कोणत्या क्रमाने कोणत्या देवाची कशी पूजा करायची याचे सविस्तर मार्गदर्शन श्रीगुरुचरित्रात आहे विश्वेश्वराची संपूर्ण यात्रा कशी करावी याचे दिग्दर्शन झाल्यानंतर सायदेवाने श्रीगुरूची मुक्तकंठाने स्तुती केली आहे यानंतर अठ्ठेचाळिसाव्या अध्यायात गंधर्वपूर अथवा गाणगापूर या क्षेत्राचा महिमा वर्णन केला आहे अमरजा नदीची उत्पत्ती याच अध्यायात सांगून 'या कारणें या नदीसी । जे स्नान करिती भक्तींसी । काळमृत्यु न होय त्यासी । अपमृत्यु कैंचि घडे ? ॥ शतायुषी पुरुष होती । रोगराई न पीडिती । अपस्मारादि दोष जाती । ब्रह्महत्यादि पातकें ॥' (४८ २७–२८) अशी फलश्रुतीही सांगितली आहे गाणगापुरातील सर्व तीर्थांचा महिमा या अध्यायात असल्याने यानेकरूनं या क्षेत्राचे दर्शन वाचतानाही होण्यासारखे आहे षट्कुलतीर्थ, नृसिंहतीर्थ, वाराणसीतीर्थ, पापविनाशी तीर्थ, कोटितीर्थ, रुद्रतीर्थ, चक्रतीर्थ, मन्मथदहन, कल्लेश्वर अशा अनेक स्थानांचा महिमा यात आहे श्रीगुरूंचे निजधामगमन श्रीशैल्य मल्लिकार्जुनास असलेल्या पाताळगंगेवर झाल्यामुळे या स्थानाची यात्राही भाविकांना मोठी प्रेरक वाटते

# औदुंबर-भस्म-रुद्राक्ष

दत्तपंथीयांच्या दैनंदिन आचारधर्माकडे वळण्यापूर्वी त्यांच्या आचारनिष्ठेस आधारभूत असलेल्या काही प्रतीकांचा येथे उल्लेख करणे अगत्याचे आहे औदुंबरतळी निवास, भस्मलेपन, रुद्राक्षधारण इत्यादी आचारप्रधान कृतींना दत्तपंथात फार महत्त्वाचे स्थान आहे दत्तप्रभूंना औदुम्बर वृक्षाची मोठीच प्रीती असल्याचे प्रसिद्ध आहे औदुंबरतळी त्यांचा निवास असल्याचेही सर्वांना माहीत आहे 'अनेक पुण्यवृक्ष त्यजून । काय प्रीती औदुंबरी ?' (१९ ८) असा प्रश्न विचारल्यावरून एकोणिसाव्या अध्यायात श्रीगुरूंनी औदुंबर वृक्षाची महती सांगितली आहे श्रीनृसिंहसरस्वतींनी औदुंबराचा संबंध श्रीनृसिंहाशी असलेला स्पष्ट केला आहे हिरण्यकशिपूचा श्रीनृसिंहांनी वध केल्यानंतर भगवताच्या हाताची अतिशय आग होत राहिली कारण 'त्या दैत्याचे पोटीं । विष होतें काळकूटीं । जैसी वडवाग्नि मोठी । तैसें विष परियेसा ॥ विदारण करितां दैत्यासी । वेधलें विष त्या नखासी । तापली नखें बहुवसी ॥' (१९ १२-१३) त्यावेळी लक्ष्मीने एक औदुंबराचे फळ आणले आणि 'तये वेळी शीतलार्थ । नखें रोविली औदुंबरात । विषाग्नि झाला शांत । उग्र नरसिंह शांत झाला ॥' (१९ १५) अशा या औदुंबरास दत्तपंथीयांत कल्पवृक्षाचे स्थान प्राप्त झाले या वृक्षाचे माहात्म्य वर्णन करताना आचरणशील साधकासाठी श्रीगुरुचरित्रकारांनी म्हटले आहे,

'तया समयीं औदुंबरासी ।<br>
देती वर हृषीकेशी ।<br>
सदा फलित तू होसी ।<br>
'कल्पवृक्ष' तुझें नाम ॥<br>
जे जन भजती भक्तींसी ।<br>
काम्य होय त्वरितेंसी ।<br>
तुज देखताचि परियेसीं ।<br>
उग्र विष शांत होय ॥<br>
जे सेवितील मनुष्य लोक ।<br>
अखिलकाम्य पावोनि ऐक ।<br>
फल प्राप्त होय निकें ।<br>
पापावेगळा होय नर ॥<br>
वांझ नारी सेवा करितां ।<br>
पुत्र होतील तिसी त्वरिता ।<br>
जे नर असतील दैन्यपीडिता ।<br>
सेवितां होतील श्रियायुक्त ॥

तुझे छायीं बैसोन ।
जे जन करिती जपानुष्ठान ।
अनंत फळ होय ज्ञान ।
कल्पिलें फळ होय त्यासी ॥
तुझे छायी जळांत ।
स्नान करिता पुण्य बहुत ।
भागीरथीं स्नान करीत ।
तितुकें पुण्य परियेस ॥
तुज सेविता त्या नरासी ।
व्याधि नव्हती कवणे दिवसीं ।
ब्रह्महत्यादि महादोषी ।
परिहार होती परियेसा ॥
जें जें कल्पूनि मानसी ।
तुज सेविती भावेसी ।
कल्पना पुरती भरवसीं ।
कलियुगीं कल्पवृक्ष तूंचि ॥
सदा वसो तुजपाशीं ।
लक्ष्मीसहित हृषीकेशी ।
म्हणोनि वर दे हर्षी ।
नरसिंह मूर्ति तये वेळीं ॥'
( १९ १७–२५ )

याप्रमाणे औदुंबर वृक्षाची महती दत्तपंथीयात आहे कलियुगातील या कल्पतरूपाशी, त्याच्या फळामुळेच उग्र नृसिंहमूर्ती शांत झाली श्रीगुरू दत्तात्रेयानीही याच स्थळी निवास केला आहे 'तया कल्पद्रुमतळीं । होते श्रीगुरु सोममौळी । ब्रह्मा विष्णु-नेत्रमाळी । देह मानुषी धरोनिया ॥ भक्तजना तारणार्थ । पावन करिती समस्त तीर्थ । अवतार त्रयमूर्ति गुरुनाथ । भूमीवरी वर्तत असे॥ वृक्षातळीं अहर्निशीं । श्रीगुरु असती गौप्येसीं । माध्यान्हकाळमयासी । समारंभ होय सेवें ॥' ( १९ ३०-३२ ) या औदुंबर वृक्षाच्या तळाशी श्रीगुरू मनुष्यरूप धारण करून गुप्त वास करीत आहेत अशी श्रद्धा आहे - याच एकोणिसाव्या अध्यायात औदुंबरतळी निवास करणाऱ्या श्रीगुरूंची आराधना अमरेश्वराजवळच्या चौसष्ट योगिनी करीत असल्याची कथा आहे कृष्णा-तीरावर असलेल्या औदुंबर क्षेत्राची महती याच कारणासाठी आहे योगिनींना उद्देशून श्रीगुरूंनी म्हटले आहे, ' तुम्हांसहित औदुंबरी । आमुच्या पादुका मनोहरी । पूजा करिती ते तत्परीं । मन-कामना पुरती जाणा ॥ औदुंबरवृक्षातळीं । जप करिती जे मननिर्मळीं । कोटिगुणे होती फळें । होम केलिया तैसेचि ॥' ( १९ ८१-८९ )

दत्तपंथीयांच्या आचारधर्मास भस्मधारणाला फार महत्त्व आहे कपाळावर, हातावर भस्माचे पट्टे ओढलेले, गळ्यात रुद्राक्षाची माळ घातलेले अनेक दत्तभक्त या संप्रदायात दिसतात एकोणति-साव्या अध्यायात श्रीगुरूंनी त्रिविक्रमभारतीला भस्ममाहात्म्याची कथा सांगितली आहे कृतयुगात वामदेव नावाचा एक योगी ब्रह्मनिष्ठ सर्वांगाला भस्म लावून हिंडत असताना राक्षसांचा संचार असणाऱ्या क्रौंचारण्यात आला तेथील ब्रह्म-राक्षसाने खाण्यासाठी म्हणून वामदेवास कवटा-ळिले तेव्हा वामदेवाच्या अंगाच्या भस्माचा संपर्क येताच ब्रह्मराक्षसाचे पूर्वपातक नष्ट होऊन तो ब्रह्मज्ञानी झाला वामदेवानेही त्यास भस्ममाहा-त्म्याची एक कथा ऐकविली एका आचारहीन विप्राच्या प्रेतास श्वानाकडून भस्माचा स्पर्श झाला शिवदूतांनी यमदूतास हे प्रेत नेऊ दिले नाही कारण त्याच्या अंगी भस्म होते भस्मा-कित त्रिपुंड्र कपाळावर लावल्याने सर्व पातकें नष्ट होतात भस्मधारणेचा समंत्रक विधीही आहे भस्ममहिमा वर्णन करताना याच अध्या-यात श्रीगुरुचरित्रकारांनी म्हटले आहे,

भस्ममहिमा अपरंपार ।
परी ब्रह्मादिकां अगोचर ।
याचि कारणें कर्पूरगौर ।
भूषण करी सर्वांगीं ॥ ९८ ॥
ईश्वरें वर्णिल्या यत्नेंसीं ।
वर्णिता अशक्य आम्हांसी ।

तोचि शंकर व्योमकेशी ।
जाणे भस्ममहिमान ॥ ६९ ॥
ऐसी विनंति ऐकोनि ।
सांगे शंकर विस्तारोनि ।
गोमय द्रव्य देवता अग्नि ।
भस्म करणें परियेसा ॥ ९८ ॥
पुरातनीचे यज्ञस्थानी ।
जे का असे मेदिनी ।
पुण्य बहुत लावितांक्षणीं ।
भस्मांकिता परियेसा ॥ ९९ ॥'

भस्म धारण करताना कोणत्या ठिकाणी कोणत्या मंत्राने ते लावावे याचेही मार्गदर्शन श्रीगुरुचरित्रात आहे या भस्मलेपनाचा परिणाम सांगताना म्हटले आहे, ' मुक्तिकामे जे लविती । त्यांसी नाहीं पुनरावृत्ति । जे जे मनी संकल्पिती । लाधे चारी पुरुपार्थ ॥ ब्रह्मचारी गृहस्थासी । वानप्रस्थ यतीसी । समस्ती लाविजे हर्षी । भस्मांकित त्रिपुंड्र ॥ महापातकी असे आपण ॥ उपपातकी जरी जाण । भस्म लावितां तत्क्षण । पुण्यात्मा तोचि होय ॥ क्षत्रिय-वैश्य-शूद्र स्त्रीवर्गासी । गोहत्यादि पातकासी । वीरहत्या आत्महत्येसी । शुद्धात्मा करी भस्मांकित ॥ विधिपूर्वक मंत्रेसीं । जे लाविती भक्तीसी । त्यांची महिमा अपारेसी । वंद्य होय देवलोकी ॥ जरी नेणे मंत्रासी । त्याणें लाविजे । भावशुद्धीसी । त्याची महिमा अपारेसीं । एकचित्त परियेसा ॥' (२९. २१३–१८) परद्रव्यहरण, परस्त्रीगमन, परनिंदा, परपीडा, परक्षेत्रहरण, नीचसेवा, व्यभिचारादी कर्मे, अभक्ष्यभक्षण इत्यादी पातकाचा नाश भस्मलेपनाने होतो. ' जाणोनि अथवा अज्ञानता । पाप घडले असस्याता ॥ भस्म लावितां पुनीता । पुण्यात्मा होय जाणा ॥.... रुद्राक्षमाळा जयाचे गळां । लाविला असेल त्रिपुंड्र टिळा । अन्य पापी होय केवळा । तोही पूज्य तिही लोकीं ॥ जितुकीं तीर्थे भूमीवरी । असतील क्षेत्रें नानापरी । स्नान केलें पुण्यसरीं । भस्म लावितां परियेसा ॥ मंत्र असती कोटी सात । पंचाक्षरादि विख्यात । अनंत आगम असे मंत्र । जपिले फळ भस्मांकिता ॥ इहलोकी अखिल सौख्य । होती पुरुप शतायुष्य । व्याधि न घेती शरीरास । भस्म लावितां नरासी॥' (२९. २२८–३५)

रुद्राक्षधारण व रुद्रसूक्तपठण याचेही माहात्म्य दत्तपंथीयांत फार मोठे आहे. रुद्राक्ष धारण केल्यामुळे कोणतीच पातके लागत नाहीत असे सांगून श्रीगुरूंनी राजकुमार सुधर्म व मंत्रीसुत तारक या दोन कुमारांची कथा सांगितली आहे. दोघेही शिवभक्त. कपाळावर त्रिपुंड्र व गळयात रुद्राक्षाची माळ, असा त्यांचा वेप असे. एकदा पराशर नावाच्या त्रिकालज्ञ ऋषींनी राजास या दोन कुमारांचे पूर्ववृत्त सांगितले. नंदी नावाच्या नगरीतील एका वेश्येने आपल्या एका कोंबड्याच्या व माकडाच्या गळयात रुद्राक्ष बांधले होते. एकदा तिच्या मंदिरास आग लागली असताना कुक्कुट-मर्कटांची 'जोडी जळून गेली. हेच प्राणी पुढल्या जन्मी रुद्राक्षधारणामुळे राजाच्या मंदिरात अवतीर्ण झाले. मर्कट राजाच्या पोटी आला व कुक्कुटाने प्रधानाच्या घरी जन्म घेतला. श्रीगुरुचरित्राच्या तेहतिसाव्या अध्यायात रुद्राक्षधारणाचे परिणाम सांगणारी ही कथा विस्ताराने आली आहे. याच राजकुमारास अल्पायुष्य असून आता त्याचे फक्त सात दिवस उरल्याचे पराशरऋषी राजास सांगतात. शंकरास शरण जाऊन शंभर ब्राह्मणांकडून दहा सहस्र रुद्राभिषेक करण्याचा उपाय राजास त्यांनीच सुचविला. रुद्राच्या अभिषेकाचे हे माहात्म्य पुढल्या चौतिसाव्या अध्यायात आले आहे. याप्रमाणे रुद्राक्ष व रुद्राभिषेक यांची महती दत्तपंथीयांना वाटते. रुद्राक्षाची महती सांगताना श्रीगुरुचरित्रकारानी म्हटले आहे,

भक्ति अथवा अभक्तीसी ।
रुद्राक्षधारण नरासी ।

पापें न लागती परियेसीं ।
उत्तम अथवा नीचातें ॥
रुद्राक्षधारण पुण्य ।
मिति नाहीं अगण्य ।
आणिक द्यावया नाहीं साम्य ।
श्रुतिसंमत परियेस ॥
सहस्रसंख्या जो नर ।
रुद्राक्षमाळा करी हार ।
स्वरूपें होय तोचि रुद्र ।
समस्त देव वंदिती ॥
सहस्र जरी न साधती ।
दोहीं बाहूंसी षोडश असती ।
शिखेसी बांधा एक त्याति ।
चतुर्विंशति दोंही करीं ॥
कंठाभरण बत्तिसाचें ।
मस्तकीं बांधा चत्वारिंशाचें ।
श्रवणद्वयीं द्वादशाचें ।
धारण करावें परियेसा ॥

ज्याचे गळां रुद्राक्ष असती ।
त्यासी पापें नातळती ।
त्यासी होय सद्‌गति ।
रुद्रलोकीं अखंडित ॥
रुद्राक्षमाळा धरोनि ।
जप करिती अनुष्ठानीं ।
अनंत फळ असे जाण ।
ऐका श्रोते एकचित्तें ॥
रुद्राक्षाविणें जो नर ।
वृथा जन्म जाणा घोर ।
ज्याचे कपाळीं नसे त्रिपुंड्र ।
जन्म वायां परियेस ॥
रुद्राक्ष बांधोनि मस्तकेंसी ।
अथवा दोन्ही श्रवणांसी ॥
स्नान करितां नरासी ।
गंगास्नानफळ असे ॥
रुद्राक्ष ठेवोनि पूजेसी ।
अभिषेकावें रुद्रसूक्तेंसीं ।
लिंगपूजा समानेंसी ।
फळ असे निर्धारें ॥ (३३.१२–२४)

श्रीगुरुचरित्राच्या पुढल्या चौतिसाव्या अध्यायात रुद्राध्यायाचे अथवा रुद्राभिषेकाचे माहात्म्य निवेदन केले आहे. रुद्रजपाने जन्मान्तरीची पापे नाहीशी होतात. ' तैसा अल्पायुषी नर । रुद्रजाप्य करितां निर्भर । पापें जावोनि निर्धार । दीर्घायुषी होय ॥....रुद्रजाप्यमंत्रेसीं । स्नान करविती ईश्वरासी । तेंचि उदक भक्तीसीं जे जन करिती स्नान पान ॥ त्यांतें मृत्युभय नाहीं । आणिक एक नवल पाहीं । रुद्रजाप्यें पुण्यदेहीं । चिरंजीव फळ असे ॥ रुद्र जपोनि उदकासी । स्नान केलिया नरांसी । मृत्यु भीतसे तयांसी । तेही तरतील भवार्णवीं ॥ शतरुद्र अभिषेकासी । पूजा करिती महेशासी । ते जन होती शतायुषी । पापनिर्मुक्त परियेसा ॥' (३४.७१–७६) अशा प्रकारच्या रुद्राभिषेकामुळेच काश्मीरच्या राजाचा पुत्र दीर्घायुषी व ऐश्वर्यसंपन्न झाला. दहा सहस्र रुद्रविधी झाल्यामुळे राजकुमाराचे आयुष्य वाढले. शिवदूतांनी यमदूतांपासून राजकुमाराचे रक्षण केले.

अशा प्रकारची अनेक माहात्म्ये श्रीगुरुचरित्रात आली आहेत. अनेक व्रते, वैकल्ये, यात्रास्थानांना भेटी, रुद्राक्ष, भस्म, रुद्राभिषेक इत्यादी सर्व काही आचरणाचा भाग दत्तपंथीयांना मोलाचा वाटतो. यांतील बहुतेक सर्व व्रते काम्य आहेत. भौतिक सुखसमृद्धीच्या इच्छेने ही सर्व करावयाची असली तरी त्यांमागील निष्ठा, आचरणशीलता, ईश्वरी कृपा आणि चित्तशुद्धी नजरेआड करून चालण्यासारखी नाही. दत्तपंथीयांच्या आचारधर्माचा हा एक महत्त्वाचा गाभा असल्याने आतापर्यंत त्याचा एवढ्या विस्ताराने परिचय करून दिला. सर्वसामान्य सांसारिक लोकांना व्रताचरणांत, यात्रांत, अनुष्ठानात गुंतवून दत्तपंथाने त्यांच्या आचारशुद्धीचा फार मोठा प्रयत्न केलेला दिसतो.

# पापपुण्य व कर्मविपाक

दत्तपंथीयांच्या आचारधर्माचे आणखी एक सूत्र असे की, स्वकर्मानुसार माणसास परिणाम भोगावा लागतो. मागील जन्माची पापपुण्ये ध्यानात घेता या जन्मी आपणास त्याप्रमाणे बरी-वाईट फळे भोगावी लागतात. या जन्मी मनुष्य जशी कर्मे करील त्याप्रमाणे त्याला पुढील जन्मात परिणाम भोगावा लागेल. या धर्मशास्त्रीय सिद्धान्तावर श्रीगुरुचरित्रादी सांप्रदायिक ग्रंथांचा फार मोठा विश्वास आहे. पापपुण्यविचार एकदा पक्का झाला की मग त्यानुसार माणसे आपला आचार सुधारतील असा विचार यामागे दिसतो. या दृष्टीनेच श्रीगुरुचरित्रातील अठ्ठाविसाव्या अध्यायात पापपुण्यविचार व त्यानुसार कर्मविपाक म्हणजे कर्मानुसार फलप्राप्ती यांचे दिग्दर्शन आहे. अधर्ममूलक व अशुभ फल उत्पन्न करणाऱ्या कर्मांचा परिणाम म्हणजे कर्मविपाक होय. या लोकी मनुष्य रोगादी दु:खे उत्पन्न करतो आणि परलोकी नरकादी दु:खे भोगतो, अशी धर्मशास्त्राची विचारसरणी आहे. चोरी करणाऱ्याची नखे वाईट होतात, ब्रह्महत्या करणारा कुष्ठी होतो, मद्य पिणाऱ्याचे दात किडतात व गुरुपत्नीशी संबंध ठेवणाऱ्याची कातडी घाणेरडी होते; अशी अनेक कुकर्मे आणि त्यानुसार भोगायला लागणारे परिणाम यांची यादी स्मृति-ग्रंथातून उपलब्ध आहे.

परस्त्रीचे हरण करणे, ब्राह्मणाचे द्रव्य चोरणे, धान्य चोरणे, अशा अनेक पापांची परिगणना धर्मशास्त्र करीत असते. ईश्वरी नियमाविरुद्ध अथवा धर्मशास्त्राविरुद्ध आचरण करणे पापात जमा होते. पापामुळे शारीरिक, नैतिक व मानसिक अध:पात होतो अशी ही विचारसरणी आहे. कायिक, वाचिक व मानसिक अशी तीन पापे सांगितली आहेत. समाजाचा अनाचार जसजसा वाढत जातो, तसतशी पापाची यादीही लांबते. मग ही पापे संपण्यासाठी नाना प्रायश्चित्तांची गर्दी होते. पुण्यकर्माची शिफारस केली जाते. विहित कर्म केल्याने पुण्य होते. धर्मशास्त्रात सांगितलेले नीतिनियम पाळल्याने आचारधर्म सुधारून पुण्याचा संचय होतो; देवतापूजन, तीर्थयात्रा, गोपूजा, विविध दाने, व्रते, उपवास इत्यादी मार्गांनी माणसाने पुण्यकारक आचार ठेवावा अशी धर्मशास्त्राची आज्ञा आहे. या पापपुण्यदायक आचारानुसार माणसास इष्ट व अनिष्ट अशा परिणामाचा लाभ होतो, अशी धर्मशास्त्राची श्रद्धा आहे. पूर्वकर्मानुसार आपणांस या जन्मी इष्टानिष्ट फळे भोगावी लागतात, हा सिद्धान्त सर्व स्मृती व पुराणे यांनी मान्य केलेला असल्याने दत्तपंथासारख्या कर्मनिष्ठ परंपरेने त्याचा पुरस्कार केला आहे. संचित, प्रारब्ध, क्रियमाण असे कर्मांचे तीन प्रमुख भेदही धर्मशास्त्राने केले आहेत.

श्रीगुरुचरित्राच्या सत्ताविसाव्या अध्यायात दोन मदोन्मत्त विप्रांना शापग्रस्त केल्याची कथा आहे. दोन ब्राह्मणांना श्रीगुरूंनी शाप देऊन ब्रह्मराक्षस केले. याच अध्यायात एका विप्राने आपण पतित अशा मातंगयोनीत कसे गेलो? असा प्रश्न विचारला आहे. त्याचे उत्तर देताना श्रीगुरू पतित, हीन अथवा चांडालयोनीत जन्म येण्याची कारणे पुढील अठ्ठाविसाव्या अध्यायात विस्तृतपणे सांगत आहेत. प्रथम त्यांनी काही दुराचारी वर्तनाचे नमुने दाखविले आहेत. 'पापपुण्याचिया गती। आपुले आर्जव भोगिजेति। कर्मविपाकी असे ख्याति। जन्मोजन्मी तीच याती॥' (२८४) या मुख्य सूत्रानुसार माणसाचे पापाचरण व त्यानुसार फलप्राप्ती यांचे विवेचन येथे आले आहे. अनाचाराचे वर्णन अर्थातच व्यभिचारापासून आहे. 'ब्राह्मण स्त्रियेपाशी देखा। शूद्र जाय व्यभिचारिका। पिंड उपजे चांडाळिका। सोळावी जाति चांडाळा॥' (६) असा निष्कर्ष आहे. सर्व वर्णांना मार्गदर्शन करणारे ब्राह्मणव

भ्रष्ट झाले तर समाज टिकणार नाही, अशी खात्री असल्याने ब्राह्मण्यरक्षणाकडे श्रीगुरुचरित्राचा कटाक्ष आहे 'ब्राह्मण रहाटे अनाचार। पावे तें हीनयोनीसी ।।' (८) असे सांगून या अनाचाराचा तपशीलही दिलेला आहे जन्मदात्या मातापित्यास सोडून जाणे, कुलदेवता सोडून इतर देवताची पूजा करणे, सतत खोटे बोलणे, सदा जीवहिंसा करणे, कन्येची विक्री करणे, शूद्राघरी भोजन करणे, अश्वविक्रय करणे, अशी दुराचाराची अनेक उदाहरणे श्रीगुरू सांगतात शूद्रस्त्रीसंग, दासीगमन, घराला–वनाला अग्नी लावणे, श्राद्धादी कर्मे न करणे, अभिषेक न करणे, दानधर्म न करणे, मातापित्याची सेवा न करणे, अनेक बायका एकाच वेळी करणे, अतिथीस विन्मुख पाठविणे, यतीची पूजा न करणे, तळेविहिरी मोडणे, गंगातीर्थाची निंदा करणे, एकादशीस अथवा पर्वणीस स्त्रीभोग घेणे, भागीदाराशी कपट करणे, ज्ञान नसता वैद्यकी करणे, जारणमारणादी विद्यात गुंतणे, हरिहराची निंदा करणे, विधवा स्त्रियांचा संग करणे, श्राद्धाच्या दिवशी पिंड न करणे, गुरूची निंदा करणे, वेदाना दूषण देणे, लोकांची वर्मे काढणे, गर्भपात करणे, ब्रह्महत्या करणे, अशा विविध दुराचाराचा व त्याच्या परिणामाचा म्हणजे कर्मविपाकाचा प्रपंच श्रीगुरुंनी या अध्यायात विस्ताराने केलेला आहे सुवर्णाची चोरी करणे, अश्ववध, गोवध करणे, दुसऱ्याचा विश्वासघात करणे, स्त्रीची चोरी करणे अशी आणखीही दुराचाराची नामावली येथे आहे

तस्करप्रकरणात चोरीचे प्रकार व त्याचे परिणाम याचा निर्देश आहे 'सुवर्ण चोरी करी नर। प्रमेहव्याधि होय निर्धार। एखादा दुस्तर करी तस्कर। आंधळा होऊनि उपजे ।। वस्त्रे चोरी जरी करी। त्वित्री (कोढी) रोगी होय निर्धारी। गणद्रव्यचोरी करी। गंडमाळा होऊनि उपजे ।। श्वासोच्छ्वासी असेल नर। त्याची वस्तु आणी चोर। सदा वसे बंधन घर। ब्रह्माडपुराणी बोलिले असे ।।' (५६–५८) याप्रमाणे परद्रव्याचा अपहार, अन्नधान्याचा अपहार, तैलचोरी, परस्त्रीचोरी, ब्राह्मणाचे द्रव्य चोरणे, मोती–माणिक रत्ने याची चोरी, पत्रशाखादी फळाची चोरी, 'कास लोह कापूस लवण' याची चोरी, देवद्रव्याची चोरी, दुसऱ्याचे पुरून ठेवलेले द्रव्य चोरणे, धेनू चोरणे, फलजल चोरणे, घरातील भांडीकुंडी चोरणे, मधुगोरस चोरणे, अशी आणखीही पातके त्याच्या परिणामासहित श्रीगुरूंनी सांगितली आहेत

यानंतर दुराचारातील सर्वांत महत्त्वाचे पातक म्हणजे व्यभिचार त्याच्याही नाना प्रकाराचा निर्देश या अध्यायात विपाकासहित आहे परस्त्री-आलिंगन, परस्त्रीयोनिदर्शन, वधुभार्यासंपर्क, मित्रभार्यागमन, मातुलस्त्रीसंपर्क, दुष्ट बुद्धीने परस्त्रीमुखावलोकन, शूद्राचा विप्रस्त्रीशी संपर्क, अशा विविध प्रकाराचा निर्देश श्रीगुरूंनी केला आहे श्रीगुरुचरित्रातील काय किंवा कोणत्याही धर्मग्रंथातील काय, तेथील पातकाची यादी पाहून समाजाची अधोगतीच लक्षात येते मनुष्य जात्याच पतनशील आहे क्षणिक सुखासाठी तो विवेकहीन बनतो या विवेकहीन व सर्वसामान्य माणसास सुधारावे तरी कसे ? कोणते शासन त्याला करावे ? राज्यव्यवस्थेनुसार कायद्याच्या बंधनामुळे अशा पातकाना शासन असेलही, पण त्यातली उणीव ध्यानात घेता धर्मशास्त्रानेही या अनाचारास शासन सांगितले आहे कर्मविपाक हे एक शासन मानले आहे श्रीगुरुचरित्रातही याचा तपशिलाने विचार आला आहे नाना पातकाची यादी देऊन त्याचे फलितही सांगितले आहे

या दुष्ट कर्मानुसार कोणी चांडाल होतो, कोणी हीनयातीत जन्मास येतो, कोणी श्वान होतो, कोणी कृमिकीटक होतो, कोणी ब्रह्मराक्षस होतो, कोणास अपस्मार होतो, कोणी

कुष्ठी वनतो, कोणी बेरड होतो, कोणी गाढव होतो, कोणी हरिण वनतो, कोणी क्षयरोगी होतो, कोणी शामदंती होतो, कोणी कारागृहात पडतो, कोणी नरकास जातो, कोणी सर्प होतो, कोणी आधळा होतो, कोणास गंडमाळा होतात, कोणी निपुत्रिक होतो, कोणास गुल्मव्याधी होते, कोणास खरूज होते, तर कोणी गोचीड होतो, कोणी पङ्गुरोगी वनतो, कोणी उटाच्या जन्मास जातो, कोणी कावळा होतो; असा हा कर्मविपाकाचा नियम पुराणातूनही अनेकदा आलेला आहे कोणत्या पातकामुळे कोणता रोग होतो याचे निरीक्षण वैद्यक अथवा आरोग्यशास्त्रद्वारा आणखी वेगळे असेल, पण येथील कर्मविपाकनियम सर्वसामान्य लोकाना दुराचारापासून निवृत्त करतील तरी त्याचा उपयोग झाला असेच म्हणावे लागेल माणसाने स्वभावतःच चागले वर्तन करावे ही अपेक्षा उत्तमच, पण सर्वसामान्य दृष्टीने पाहाता वहुतेक माणसे दुराचार करणारी असल्याने त्याच्या दुर्वर्तनास पायबंद घालणे धर्मशास्त्राचे काम वनले. आपणांस फार वाईट परिणाम भोगावे लागतील, या भीतीने का होईना, पण लोकांनी दुराचाराचा त्याग करावा असा या कर्मविपाकामागचा हेतू आहे. 'परस्त्रीचे हरण करणारा व ब्राह्मणाचे द्रव्य चोरणारा, निर्जल अरण्यात ब्रह्मराक्षस होऊन पडतो, धान्य चोरणारा उंदराच्या जन्मास जातो, सोने चोरणारा कृमी, कीटक व पतग या योनीत जन्मतो, कित्येक पाककर्माचा विपाक म्हणून वर्त्याला वृक्षवल्लीचाही जन्म घ्यावा लागतो; असे याज्ञवल्क्याने सागितले आहे. कर्मविपाकाची ही कल्पना भारतीय परपरेत वैदिक काळापासून चालत आलेली आहे. महापर्वाच्या शातिपर्वात म्हटले आहे;

सुशीघ्रमपि धावन्तं विधानमनुधावति ।
शेते सह शयानेन येन येन यथा कृतम् ॥
उपतिष्ठति तिष्ठन्तं गच्छन्तमनुगच्छति ।
करोति कुर्वतः कर्म च्छायेवानुविधीयते ॥
येन येन यथा यद्यत्पुरा कर्म समीहितम् ।
तत्तदेकतरो भुङ्क्ते नित्यं विहितमात्मना ॥
(१८१.८–१०)

मनुष्य कितीही वेगाने धावू लागला, तरीही पूर्वजन्मीचे कर्म त्याचा पाठलाग करीत असते. तो निजला तर ते त्याच्यावरोवर झोपते. तो उठला की ते त्याच्यावरोवर उठते. तो चालू लागला की ते त्याच्यामागून चालू लागते आणि तो कर्म करू लागला तर तेही त्याच्या कर्मात सहभागी होते. प्राण्याच्या मागे त्याचे प्राक्तन छायेप्रमाणे लागलेले असते. ज्याने पूर्वी आपल्या इच्छेनुसार जे कर्म केले असेल त्यानुसार फल त्याला एकट्यालाच भोगावे लागते. माणसाचे साप्रत त्या क्षणापर्यंतचे जे कर्म ते **संचित** होय. या सचित कर्मांपैकी जी फलोन्मुख झालेली असतील ती कर्मे **प्रारब्ध** होत आणि वर्तमान कर्मे म्हणजे **क्रियमाण** होत. सृष्टीच्या नियमानुसार त्यांचे विद्या, बुद्धी, द्रव्यलाभ, यशापयश, सुखदुःख, आयुष्य इत्यादींची प्राप्ती होत असते. प्रारब्धकर्माचा भोगानेच क्षय होतो, असा कर्मविपाकशास्त्राचा सिद्धान्त आहे.

## प्रायश्चित्तविचार

दुराचार अथवा पातके यानी निर्माण झालेल्या आपत्तीतून सुटका नाही का ? कर्मविपाकाचे दुःख सौम्य होईल असा उपाय नाही का ? अशुभ फलाचा परिणाम कमी करता येईल का ? या प्रश्नांची उत्तरे शास्त्रकारांनी शोधली आहेत. 'अकामतः कृतं पापं वेदाभ्यासेन शुध्यति । कामतस्तुकृत मोहात् प्रायश्चित्तैः पृथग्विधैः ॥'. ( मनुस्मृती : ११.४६ ) अबुद्धिकृत पाप वेदाभ्यासाने धुतले जाते. मोहामुळे आणि बुद्धिपूर्वक केलेले

पाप नाना प्रकारच्या प्रायश्चित्तांनी नष्ट होते. या विचारापोटी धर्मशास्त्रकारांनी प्रायश्चित्त-विचार केलेला दिसतो. हातून घडलेल्या पापाच्या निष्कृतीसाठी देहदंडनात्मक अथवा द्रव्यात्मक जो विधी शास्त्रकार सांगतात त्यास प्रायश्चित्त असे नाव आहे. विहित कर्म न केल्याने, निंदित कर्म आचरल्याने व इंद्रियांचे दमन न केल्याने मनुष्य पतित होतो. म्हणून त्याने आपल्या शुद्धी-साठी प्रायश्चित्त घ्यावे. त्यामुळे त्याच्या आत्म्याला प्रसन्नता येते व लोकांनाही बरे वाटते; असे याज्ञवल्क्यांनीही म्हटले आहे. काम, क्रोध, लोभ, इत्यादी विकारामुळे माणसाच्या हातून दुराचार घडतो. त्याची आध्यात्मिक व लौकिक प्रगती खुंटते. म्हणून प्रायश्चित्ताचा विधी शास्त्र-कार सांगतात. प्राय: म्हणजे तप व चित्त म्हणजे निश्चय. तप व निश्चय यांनी युक्त असलेले कर्म प्रायश्चित्त होय. पंचमहापातके, गोहत्या, पशु-हत्या, आत्महत्या, श्राद्धान्नभोजन, अभोज्यान्न-सेवन, अशुचि अन्नसेवन, चौर्यकर्म, अगम्यागमन, व्यभिचार, पशुगमन, व्रतलोप, परिवेदन (वडील भावाच्या आधी लग्न अथवा अग्निहोत्र करणे), संसर्ग, स्पर्श, प्राणिवध, व्रात्यत्व, कन्यादूषण, अग्नित्याग, वृक्षच्छेदन, निषिद्धदान, संकरीकरण, मलिनीकरण, खोटी साक्ष देणे, अशा विविध पातकांना वेगवेगळी प्रायश्चित्ते धर्मशास्त्रात सांगितली आहेत.

गुरू, मित्र व शिष्य यांच्या पत्नीशी व सुनेशी व्यभिचार यांना वधार्ह पातक शास्त्रकार मानतात. मनुष्यवध, सन्यासाश्रमातून गृहस्था-श्रम अशा काही अपराधांना देहत्यागाची प्राय-श्चित्ते आहेत. तप्त लोहशय्येवर शयन, लोहाच्या तप्त प्रतिमेला आलिंगन, कुत्र्याकडून खावविणे, तप्त मद्य मुखात ओतणे गवताच्या आगीत जाळणे, इत्यादी प्रायश्चित्तेही काही ठिकाणी मनुष्यवधा-साठी सांगितली आहेत. ब्राह्मणाची प्रार्थना, संकल्प, क्षौर, भस्म, गोमय, मृत्तिका व पंचगव्य यांची स्नाने, शुद्धोदकाने स्नाने, देवऋषीपितरांचे तर्पण, विष्णुश्राद्ध, गाय व सुवर्ण यांचे दान, ब्रह्मकूर्च होम इत्यादी पूर्वकृत्ये झाल्यानंतर पर्षत्ने (पंचसभा) अथवा अनुवादकाने सांगितलेले प्रायश्चित्त घ्यायचे असते. प्रायश्चित्ताचे नाना प्रकारही सांगितले आहेत. पहिला प्रकार कृच्छ्र प्रायश्चित्ताचा. पहिल्या दिवशी दिवा भोजन, दुसऱ्या दिवशी नक्त भोजन, तिसऱ्या दिवशी अयाचित भोजन व चौथ्या दिवशी उपवास, याला पादकृच्छ्र म्हणतात. या पादकृच्छ्राचा कोणताही एक भाग तिप्पट वाढविल्याने प्राजापत्य कृच्छ्र होते. असे अनेक प्रकार कृच्छ्र प्रायश्चित्ताचे विष्णुस्मृतीत सांगितले आहेत. शुक्लपक्षात प्रति-दिवशी एक एक घास अन्न वाढविणे व कृष्ण पक्षात एकएक घास कमी करीत आणण्याचा विधी चांद्रायण प्रायश्चित्तात येतो. अशा प्रकारे रहस्य, विष्णुस्मरण, प्रत्याम्नाय असे आणखीही प्रायश्चित्तविधी धर्मशास्त्राने सांगितले आहेत.

दत्तसंप्रदायातही प्रायश्चित्तविधी श्रीगुरु-चरित्राच्या अठ्ठाविसाव्या अध्यायात सविस्तर सांगितला आहे. दुराचारजनक अनेक पापे व व त्यांचा विपाक यांचे श्रवण झाल्यावर त्रिवि-क्रमभारतींनी श्रीगुरूंना प्रश्न केला आहे. 'जरी घडलें एक वेळ। पाप जाय कवणे परी ?' त्यावर श्रीगुरूंनी उत्तर दिले, 'प्रायश्चित्त असे पापासी। पश्चात्ताप होय ज्यासी। त्यासी पाप नाही देखा ॥' (७९) त्यानंतर श्रीगुरूंनी प्रायश्चित्ताचे विधान निवेदन केले आहे, 'प्रथम द्यावा ब्रह्मदंड। त्याणें होय पापखंड। गोदान द्यावे अलंकृतकाड। अशक्य तरी द्रव्य द्यावें॥ निष्क अथवा अर्ध-निष्क। सूक्ष्म असलिया पाव निष्क। स्थूल सूक्ष्म असेल पातक। तेणे विधी पै द्यावें॥ अज्ञानकृत पापासी। पश्चात्तापें शुद्ध परियेसी। गुरुसेवा तत्परतेसी। केलिया गुरू निवारील ॥ नेणतां पाप केलियासी। प्रायश्चित्त परियेसी। प्राणायाम द्विशतेसी। पुण्यतीर्थी दहा स्नाने॥ तीन गुंजा

कुष्ठी बनतो, कोणी वेरड होतो, कोणी गाढव होतो, कोणी हरिण बनतो, कोणी क्षयरोगी होतो, कोणी ग्रामदंती होतो, कोणी कारागृहात पडतो, कोणी नरकास जातो, कोणी सर्प होतो, कोणी आधळा होतो, कोणास गंडमाळा होतात, कोणी निपुत्रिक होतो, कोणास गुल्मव्याधी होते, कोणास खरूज होते, तर कोणी गोचीड होतो, कोणी पंडुरोगी बनतो, कोणी उंटाच्या जन्मास जातो, कोणी कावळा होतो; असा हा कर्मविपाकाचा नियम पुराणातूनही अनेकदा आलेला आहे. कोणत्या पातकामुळे कोणता रोग होतो याचे निरीक्षण वैद्यक अथवा आरोग्यशास्त्रद्वारा आणखी वेगळे असेल; पण येथील कर्मविपाकनियम सर्वसामान्य लोकांना दुराचारापासून निवृत्त करतील तरी त्याचा उपयोग झाला असेच म्हणावे लागेल. माणसाने स्वभावतःच चांगले वर्तन करावे ही अपेक्षा उत्तमच, पण सर्वसामान्य दृष्टीने पाहाता बहुतेक माणसे दुराचार करणारी असल्याने त्यांच्या दुर्वर्तनास पायबंद घालणे धर्मशास्त्राचे काम बनले. आपणांस फार वाईट परिणाम भोगावे लागतील, या भीतीने का होईना, पण लोकांनी दुराचाराचा त्याग करावा असा या कर्मविपाकामागचा हेतू आहे. 'परस्त्रीचे हरण करणारा व ब्राह्मणाचे द्रव्य चोरणारा, निर्जल अरण्यात ब्रह्मराक्षस होऊन पडतो, धान्य चोरणारा उंदराच्या जन्मास जातो, सोने चोरणारा कृमी, कीटक व पतंग या योनीत जन्मतो, कित्येक पापकर्मांचा विपाक म्हणून कर्त्याला वृक्षवल्लीचाही जन्म घ्यावा लागतो; असे याज्ञवल्क्याने सांगितले आहे. कर्मविपाकाची ही कल्पना भारतीय परंपरेत वैदिक काळापासून चालत आलेली आहे. महापर्वाच्या शांतिपर्वात म्हटले आहे;

> सुशीघ्रमपि धावन्तं विधानमनुधावति ।
> शेते सह शयानेन येन येन यथा कृतम् ॥
>
> उपतिष्ठति तिष्ठन्तं गच्छन्तमनुगच्छति ।
> करोति कुर्वतः कर्म च्छायेवानुविधीयते ॥
>
> येन येन यथा यद्यत्पुरा कर्म समीहितम् ।
> तत्तदेकतरो भुङ्क्ते नित्यं विहितमात्मना ॥
>
> (१८१.८–१०)

मनुष्य कितीही वेगाने धावू लागला, तरीही पूर्वजन्मीचे कर्म त्याचा पाठलाग करीत असते. तो निजला तर ते त्याच्याबरोबर झोपते. तो उठला की ते त्याच्याबरोबर उठते. तो चालू लागला की ते त्याच्यामागून चालू लागते आणि तो कर्म करू लागला तर तेही त्याच्या कर्मात सहभागी होते. प्राण्याच्या मागे त्याचे प्राक्तन छायेप्रमाणे लागलेले असते. ज्याने पूर्वी आपल्या इच्छेनुसार जे कर्म केले असेल त्यानुसार फल त्याला एकटयालाच भोगावे लागते. माणसाचे सांप्रत त्या क्षणापर्यंतचे जे कर्म ते संचित होय. या संचित कर्मापैकी जी फलोन्मुख झालेली असतील ती कर्मे प्रारब्ध होत आणि वर्तमान कर्मे म्हणजे क्रियमाण होत. सृष्टीच्या नियमानुसार त्यांचे विद्या, बुद्धी, द्रव्यलाभ, यशापयश, सुखदुःख, आयुष्य इत्यादींची प्राप्ती होत असते. प्रारब्धकर्माचा भोगानेच क्षय होतो, असा कर्मविपाकशास्त्राचा सिद्धान्त आहे.

## प्रायश्चित्तविचार

दुराचार अथवा पातके यांनी निर्माण झालेल्या आपत्तीतून सुटका नाही का ? कर्मविपाकाचे दुःख सौम्य होईल असा उपाय नाही का ? अशुभ फलाचा परिणाम कमी करता येईल का ? या प्रश्नांची उत्तरे शास्त्रकारांनी शोधली आहेत. 'अकामतः कृतं पापं वेदाभ्यासेन शुध्यति । कामतस्तुकृतं मोहात् प्रायश्चित्तैः पृथग्विधैः ॥'. ( मनुस्मृती : ११.४६ ) अबुद्धिकृत पाप वेदाभ्यासाने धुतले जाते. मोहामुळे आणि बुद्धिपूर्वक केलेले

पाप नाना प्रकारच्या प्रायश्चित्तांनी नष्ट होते. या विचारापोटी धर्मशास्त्रकारांनी प्रायश्चित्त-विचार केलेला दिसतो. हातून घडलेल्या पापाच्या निष्कृतीसाठी देहदंडनात्मक अथवा द्रव्यात्मक जो विधी शास्त्रकार सांगतात त्यास प्रायश्चित्त असे नाव आहे. विहित कर्म न केल्याने, निंदित कर्म आचरल्याने व इंद्रियांचे दमन न केल्याने मनुष्य पतित होतो. म्हणून त्याने आपल्या शुद्धीसाठी प्रायश्चित्त घ्यावे. त्यामुळे त्याच्या आत्म्याला प्रसन्नता येते व लोकांनाही बरे वाटते; असे याज्ञवल्क्यांनीही म्हटले आहे. काम, क्रोध, लोभ, इत्यादी विकारांमुळे माणसाच्या हातून दुराचार घडतो. त्याची आध्यात्मिक व लौकिक प्रगती खुंटते. म्हणून प्रायश्चित्ताचा विधी शास्त्रकार सांगतात. प्रायः म्हणजे तप व चित्त म्हणजे निश्चय. तप व निश्चय यांनी युक्त असलेले कर्म प्रायश्चित्त होय. पंचमहापातके, गोहत्या, पशुहत्या, आत्महत्या, श्राद्धान्नभोजन, अभोज्यान्नसेवन, अशुचि अन्नसेवन, चौर्यकर्म, अगम्यागमन, व्यभिचार, पशुगमन, व्रतलोप, परिवेदन (वडील भावाच्या आधी लग्न अथवा अग्निहोत्र करणे), संसर्ग, स्पर्श, प्राणिवध, व्रात्यत्व, कन्यादूषण, अग्नित्याग, वृक्षच्छेदन, निषिद्धदान, संकरीकरण, मलिनीकरण, खोटी साक्ष देणे, अशा विविध पातकांना वेगवेगळी प्रायश्चित्ते धर्मशास्त्रात सांगितली आहेत.

गुरू, मित्र व शिष्य यांच्या पत्नीशी व सुनेशी व्यभिचार यांना वधार्ह पातक शास्त्रकार मानतात मनुष्यवध, संन्यासाश्रमातून गृहस्थाश्रम अशा काही अपराधांना देहत्यागाची प्रायश्चित्ते आहेत तप्त लोहशय्येवर शयन, लोहाच्या तप्त प्रतिमेला आलिंगन, कुत्र्याकडून खावविणे, तप्त मद्य मुखात ओतणे गवताच्या आगीत जाळणे, इत्यादी प्रायश्चित्तेही काही ठिकाणी मनुष्यवधासाठी सांगितली आहेत. ब्राह्मणाची प्रार्थना, संकल्प, क्षौर, भस्म, गोमय, मृत्तिका व पंचगव्य यांची स्नाने, शुद्धोदकाने स्नाने, देवऋषीपितरांचे तर्पण, विष्णुश्राद्ध, गाय व सुवर्ण यांचे दान, ब्रह्मकूर्च होम इत्यादी पूर्वकृत्ये झाल्यानंतर पर्षत्ने (पंचसभा) अथवा अनुवादकाने सांगितलेले प्रायश्चित्त घ्यायचे असते प्रायश्चित्ताचे नाना प्रकारही सांगितले आहेत पहिला प्रकार कृच्छ्र प्रायश्चित्ताचा. पहिल्या दिवशी दिवा भोजन, दुसऱ्या दिवशी नक्त भोजन, तिसऱ्या दिवशी अयाचित भोजन व चौथ्या दिवशी उपवास, याला पादकृच्छ्र म्हणतात. या पादकृच्छ्राचा कोणताही एक भाग तिप्पट वाढविल्याने प्राजापत्य कृच्छ्र होते. असे अनेक प्रकार कृच्छ्र प्रायश्चित्ताचे विष्णुस्मृतीत सांगितले आहेत. शुक्लपक्षात प्रतिदिवशी एक एक घास अन्न वाढविणे व कृष्ण पक्षात एकएक घास कमी करीत आणण्याचा विधी चांद्रायण प्रायश्चित्तात येतो. अशा प्रकारे रहस्य, विष्णुस्मरण, प्रत्याम्नाय असे आणखीही प्रायश्चित्तविधी धर्मशास्त्राने सांगितले आहेत.

दत्तसंप्रदायातही प्रायश्चित्तविधी श्रीगुरुचरित्राच्या अठ्ठाविसाव्या अध्यायात सविस्तर सांगितला आहे. दुराचारजनक अनेक पापे व व त्यांचा विपाक यांचे श्रवण झाल्यावर त्रिविक्रमभारतींनी श्रीगुरूंना प्रश्न केला आहे. 'जरी घडले एक वेळ। पाप जाय कवणे परी ?' त्यावर श्रीगुरूंनी उत्तर दिले, 'प्रायश्चित्त असे पापासी। पश्चात्ताप होय ज्यासी। त्यासी पाप नाही देखा॥' (७९) त्यानंतर श्रीगुरूंनी प्रायश्चित्ताचे विधान निवेदन केले आहे, 'प्रथम द्यावा ब्रह्मदंड। त्याणे होय पापखंड। गोदान द्यावे अलंकृतकांड। अशक्य तरी द्रव्य द्यावे॥ निष्क अथवा अर्धनिष्क। सूक्ष्म असलिया पाव निष्क। स्थूल सूक्ष्म असेल पातक। तेणे विधी पै द्यावे॥ अज्ञानकृत पापासी। पश्चात्तापे शुद्ध परियेसी। गुरुसेवा तत्परतेसी। केलिया गुरू निवारील॥ नेणता पाप केलियासी। प्रायश्चित्त परियेसी। प्राणायाम द्विशतेसी। पुण्यतीर्थी दहा स्नाने॥ तीन गुंजा

सुवर्ण द्यावें। नदी आचरावी दोन गावे। सौम्य पातक याचि भावें। जाती पापे परियेसी ॥ स्त्री-पुरुष दोघात। एक पापपुण्य करीत। दोघासम घडे हे निश्चित। दोघे आचरावे प्रायश्चित्त ॥ आणखी असे एक प्रकार। त्याणे होय पाप दूर। गायत्री जप दहा सहस्र। विप्रा द्वादश भोजन द्यावे ॥' (२८.८२-८८) यानंतर श्रीगुरूंनी प्राजापत्यकृच्छ्र, तीर्थकृच्छ्र अशा अनेक प्रकारच्या प्रायश्चित्ताचा उल्लेख केला आहे. पर्णकृच्छ्र प्रायश्चित्ताचा विधी वर्णन करताना म्हटले आहे, 'पर्णकृच्छ्र करा ऐसी। पर्णोदिक घ्यावें प्रतिदिवशी। करावे तितुके उपवासी। पश्चात्तापे घ्यावे ॥ कमलबिल्वअश्वत्थ। कुशोदकमिश्र पान करा नित्य। पान करावे प्रत्य। 'पर्णकृच्छ्र' परियेसा ॥ (२८.९८-९९)

गायत्रीमंत्र, पवमानसूक्त, त्रिसूपर्णसूक्त, नारायणोपनिषत्, अघमर्षणसूक्त, अशा अनेक मंत्राचा वा सूक्तांचा विशिष्ट संख्याचा जप करुनही प्रायश्चित्त घेता येते. 'वरकड तीर्था गेलियासी। गायत्रीजप सहस्रेसी। पाप जाय त्वरितेसी। अगस्त्यवचन बोलिलें असे ॥ समुद्रसेतुबंधेसी। स्नान केलिया परियेसी। भ्रूणहत्यापाप नाशी। कृतघ्नादि पातके ॥ विधिपूर्वक शुचीसी। जपा कोटी गायत्रीसी। ब्रह्महत्यापाप नाशी। ऐक त्रिविक्रमा एकचित्ते ॥ लक्ष वेळा जप जाणा ॥ अष्ट लक्ष गुरुतल्पकासी। गायत्री जपतां पाप नासी। आता सांगेन परियेसी। वेदाक्षरे पाप जाय ॥' (२८. १०४–०८) अज्ञानामुळे काही पाप घडले तर अनुतप्त होऊन पंचगव्य प्राशन करावे. गायीचे मूत्र, शेण, दूध, दही व तूप यात दर्भोदक मिसळून प्रायश्चित्त घेता येते. ही गाय तरी कशी असावी ? 'नीलवर्णाचे गोमूत्र। कृष्णवर्ण गोमय पवित्र। ताम्र गायीचे क्षीर शुभ्र। श्वेत धेनूचे दधि घ्यावे ॥ कपिला गाईचें तूप बरवें। ऐसें पंचगव्य घ्यावे।' (२८.१९–२०) हे सर्व पदार्थ किती प्रमाणात मिसळावेत याचाही निर्देश याच ठिकाणी आहे. पंचगव्य घेताना मंत्र कोणता म्हणावा याचाही उल्लेख करून निर्वाळा दिला आहे की, 'ऐसे मंत्रोनि पंचगव्य घ्यावें। अनुतप्त होऊनि एकभावें। अस्थिगत चर्मपूर्व। पापे नासती अवधारा ॥' (२८.१२५) वेगवेगळ्या रंगांच्या गायी मिळाल्या नाहीत तर 'कपिला गाई उत्तम' म्हणून थोडी सोडवणूकही आहे. अशा प्रकारे ब्रह्महत्या, सुरापान, गुरुस्त्रीगमन, सुवर्णचोरी आणि या पातकांना सहय अशी पाच महापातके व त्यांच्या निवारणाचे उपाय श्रीगुरुचरित्रात आले आहेत. याच अठ्ठाविसाव्या अध्यायात जो मातंग पतित भेटला होता, त्यास श्रीगुरु म्हणाले, 'तू पूर्वजन्मी ब्राह्मण होतास. पण माता, पिता, गुरु या सर्वांना तू दोष दिल्यामुळे तुला चांडालाचा जन्म प्राप्त झाला. हा चांडालाचा जन्म संपल्यानंतर तू पुनः ब्रह्मकुलात जन्म घेशील.' श्रीगुरूंनी त्या पतिताना या जन्मीचा संसारभोग भोगायला सांगितले. त्याच्या अंगावरील विभूती पुसून टाकल्यावर तो पुनः अडाणी झाला. येथून पुढे श्रीगुरूंनी या विभूतीचा म्हणजे भस्माचा महिमा सांगितला असल्याचे आपणास माहीत आहेच.

# पतिव्रतेचा धर्म

सर्वसामान्य गृहस्थाच्या घरी आचारधर्म सुरक्षित राहायचा असेल तर त्याच्या स्त्रीस उत्तम प्रकारचे संस्कार व्हावे लागतात. घराण्यातील चालीरीती व आचारपरंपरा प्रामुख्याने स्त्री सांभाळते आणि वयात येणाऱ्या मुलांना वळण लावते. प्रसंगी पतीसही सन्मार्ग दाखविते. श्रीगुरुचरित्रात म्हणूनच पतिव्रतेच्या आचारधर्माचे विस्ताराने वर्णन आले आहे. यासाठी तिसाव्या अध्यायात एक पतिव्रतेचे आख्यान निवेदन केले आहे. माहूरचा गोपीनाथ नावाचा एक सधन ब्राह्मण. पुत्र जगेनात म्हणून

त्याने व त्याच्या पत्नीने श्रीदत्तात्रेयांची आराधना केली. पुढे त्यांना एक पुत्र झाला. त्याचे नाव दत्त. त्याचाही नंतर विवाह झाला. मुलास एक प्रकारची व्याधी जडली. संकटनिवारणार्थ ती पतिव्रता आसन्नमरण पतीला घेऊन गाणगापुरास आली. संगमाकडे जात असतानाच तिचा पती निधन पावला. तिच्या दु:खाची परिसीमा झाली. अशा वेळी एक साधुबैरागी तिच्याजवळ आला. 'भस्मांकित जटाधारी। रुद्राक्षमाळा भूषण अलंकारी। त्रिशूळ धरला असे करी।' असे त्याचे स्वरूप होते. त्याने त्या साध्वी स्त्रीची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. त्याचे समाधान देणारे सांत्वनपर शब्द ऐकून तिने त्या सिद्धाला विनंती केली. 'कवणेपरी तरेन आपण। हा संसार भवार्णव। तुझा निरोप करीन।' म्हणोनि चरणा लागली ॥' (३०.१५२) यानंतर त्या योगी पुरुषाने प्रसन्न वदनाने पतिव्रता स्त्रियांच्या आचरणाबद्दल तिला उपदेश केला.

सिद्ध पुरुषाकरवी श्रीगुरूंनी पतिव्रता स्त्रियांच्या आचरणाबद्दल एकतिसाव्या अध्यायात सविस्तर निरूपण केले आहे. 'स्त्रियांचे आचार भवसागर तरावया' असल्यामुळे दत्तपंथीयात त्यांना विशेष स्थान असल्यास नवल नाही. योगी पुरुषाने हा स्त्रीधर्म स्कंदपुराणातील काशीखंडाच्या आधाराने सांगितला आहे. प्रथम त्याने पतिव्रतेचा एक आदर्श म्हणून अगस्त्यपत्नी लोपामुद्राची कथा निवेदन केली आहे. विन्ध्यपर्वताने नम्र व्हावे म्हणून सर्व देवगण व बृहस्पती अगस्त्य व लोपामुद्रा यांच्यापाशी काशीभुवनास आले. अरुंधती, सावित्री, अनसूया, लक्ष्मी, पार्वती, ध्रुवमाता यांच्यापेक्षाही लोपामुद्रा विशेष पतिव्रता होती. या संदर्भात बृहस्पतीकडून पतिव्रतेचा आचारधर्म श्रीगुरुचरित्रात आलेला आहे. 'पुरुष जेविता प्रसाद जाण। मुख्य भोजन स्त्रियेसी ॥' (३१.३३) पुरुष म्हणजे पती उभा असेल तर पत्नीने उभे राहावे, त्याची आज्ञा झाली तरच खाली बसावे. तिने अखंडित असे सेवापरायण असावे. अतिथीची पूजा करावी आणि 'पतिनिरोपाविण जाण दानधर्म न करावा ॥' (३५) पतीस श्रीहरिरूप मानून त्याची पत्नीने नेहमी एकनिष्ठेने पूजा करावी.

आचरणातील अगदी बारीकसारीक तपशीलही पतिव्रतेसाठी धर्मशास्त्रकारानी ठरविलेले दिसतात. 'पति निद्रिस्त जाहलियावरी। आपण मग शयन कीजे नारी। चोळी तानवडें ठेवी दूरी। पुरुष शरीरी न स्पर्शावे ॥' (३७) कारण काय? तर 'स्पर्श चोळी पुरुषासी। होय उणा तो आयुषी ॥' (३८) पतीचे स्वमुखाने नाव घेऊ नये, कारण त्याचे आयुष्य त्यामुळे कमी होते. पती जागा व्हायच्या आधी पत्नीने जागृत व्हावे. निर्मळ आणि मंगलप्रद असे सडासंमार्जनादिक काम करावे. 'पतिपूजा करणे नित्य। सदा ध्यावें पादतीर्थ। चरणांवरी ठेवूनि माथा। म्हणावे तूचि शंकरा ॥' (४०) पती गावी असला तरच स्त्रीने शृंगार करावा आणि तो गावाला गेला तर 'शृंगार आपण करूं नये ॥' (४१) पती निष्ठुरपणे बोलला तर 'आपण मनी कोप न करी। क्षमा म्हणोनि चरण धरी। राग न धरिजे मनात ॥' (४२) पती बाहेरून आला की हंसून त्याला सामोरी जावे, त्याला वदन करून त्याच्या मनाप्रमाणे वागावे.

आधी सहसा पतिव्रतेने घराबाहेरच पडू नये, आणि प्रसंग आलाच तर 'पाहूं नये नरनारी' (४६) पतिव्रतेने परपुरुषाचे मुख जरी पाहिले तरी तिला घुवडाचा जन्म येतो. अगस्त्यऋषीची पत्नी लोपामुद्रा अशा प्रकारची पतिव्रता होती. सडासमार्जन झाल्यानंतर 'देवउपकरणी उजळोनि। गंधाक्षतादि करूनि। पुष्पवर्ती पंचवर्णी। रंगमालिका देवासी ॥' (४९) अशी तयारी करीत राही. पतीचे उच्छिष्ट खाऊन ती राही. पती गावाला गेला तर तिने 'अतिथिधेनुप्रसाद घ्यावा'

(५१) ती सतत आपले गृह निर्मल राखीत असे. नगरातील उत्सव, तीर्थयात्रा, विवाहादी समारंभ इत्यादींचा लोभ तिला कधीच नसे. त्याच्या सुखदुःखाशी ती समरस होई. 'पुरुष सतोष असता जरी। दुश्चित्त नसावे त्या नारी। पुरुष दुश्चित्त असे तरी। आपण संतोषी नसावे ॥' (५५) रजस्वला असताना स्त्रीने बोलू नये, वेदध्वनी ऐकू नये आणि चार दिवसानंतर 'सुस्नात होता अवसरी। पुरुषमुख अवलोकिजे॥' (५७) यावेळी पुरुष जर घरी नसेल तर सूर्य-मंडळाकडे पाहून त्याचे रूप आठवावे. 'पति-आयुष्यवर्धनार्थ। हळदीकुंकुम लाविजे रयात। सेंदूर काजळ कंठसूत्र। फणी माथा असावी ॥ तांबूल घ्यावे सुवासिनी। असावी तिचे माथा वेणी। करी कंकण, तोडे कानी। पुरुषासमीप येणे-परी॥' (५९-६०) शेजारणीशी, खालच्या स्त्रीशी पतिव्रता स्त्रीने मैत्री करू नये. पुरुषाची निंदा करणाऱ्या स्त्रियांशी तिने बोलू नये. घरात एकत्र मंडळीसहित राहावे. वेगळेपणाची हौस धरू नये. 'सासू श्वशुर नणंदे वहिनी। दीर भावे त्यजूनि। राहूं म्हणे वेगळे। श्वानयोनि पावे सत्य ॥' (६३) पतिव्रतेने नग्न न होता स्नान करावे, उखळामुसळावर बसू नये, पाटधावरवटयावर बसू नये. जात्याउंबऱ्यावर बसू नये. वडीलमाणसांकडे तोंड करून बसू नये. 'पतिसवे विवाद देखा। करिता पावे महादुःखा।' (६६)

पती रूपाने व गुणाने कसाही असला तरी पतिव्रता स्त्रीने त्याचा आदरच करावा असे श्रीगुरुचरित्रकाराचे सांगणे आहे; 'जरी असेल अभाग्य पुरुष। अथवा दुष्ट नपुंसक। असे व्याधिष्ठ पुरुष ऐक। देवासमान मानावा ॥' (६७) पतीला श्रीहरीसमान मानावे. 'पतीचे मनी जे आवडी। तेचि घ्यावी लेणी लुगडी। पति दुश्चित्त असतां घडी। आपण शृंगार करू नये ॥' (६९) काही दागदागिने वा सामान-सुमान हवे असल्यास कन्यापुत्रांमार्फत मागावे. 'जरी नसेल जवळी कोण। दाखवावी वस्तूची खूण। अमुक पाहिजे म्हणोन। निर्धारूनि न सांगावें ॥' (७१) आपल्या पतीस जेवढे मिळेल तेवढ्यावरच तिने संतुष्ट असावे. उगाच श्रीमंता-कडे पाहून पतिनिंदा करू नये. केवळ लोक जातात म्हणून आपण तीर्थयात्रेस जाऊ नये. 'पुरुषाचे पादोदक। तेचि तीर्थ म्हणावे ॥ भागीरथीसमान देखा। पतीचें चरणतीर्थ अधिका। पतिसेवा करणें सुखा। त्रयमूर्ति संतुष्ट होती ॥' (७३–७४) कोणतेही व्रत करणे असेल तर पतीस विचारून करावे. पतीला कधी रागाने उत्तर देऊ नये. 'नित्य नेम करणें नारी। पुरुषोच्छिष्ट भोजन करी। पाद प्रक्षाळुनी तीर्थ धरी। तीर्थ घेऊनि मग जेवावे ॥' (७८) अशाच स्त्रियांना प्रत्यक्ष भगवान शंकराची भेट होईल. पतीस टाकून स्त्रीने 'जाऊं नये वनभोजनासी। अथवा शेजारिया गृहासी ॥' (८०) आपला पुरुष दुर्बल वा धनहीन असला तरी इतर धनिक पुरुषाची वाखाणणी तिने करू नये. पती वाईट आचरणाचा असला तरी पतिव्रतेने त्याची निंदा करू नये. 'कैसा तरी असो पति। आपण करावी त्याची स्तुति। तोचि म्हणावा लक्ष्मीपति। एकोभावे करूनिया ॥ सासूश्वशुर पुरुषापुढें। नेटें बोलों नये गाढें। हासों नये तयापुढे। पति-आयुष्य उणें होय ॥' (८२–८३)

आपल्या पतिविरुद्ध जी वागेल तिची गत कशी होईल तेही श्रीगुरुचरित्राच्या या अध्यायात सांगितले आहे. पुरुषाने दुसरी स्त्री केली तरी पहिल्या पत्नीनें त्याच्याशी वैर करू नये अशी सांप्रदायिक शिकवण आहे. पतिव्रता स्त्रीने पर-पुरुषावर दृष्टीसुद्धा देऊ नये. तिचे आचरण अत्यंत पवित्र व निर्मळ असावे. 'पुरुष येता बाहेरूनी। सामोरे जावें ते भामिनी ॥ उदकें पाद प्रक्षाळुनी। विंझणा करिजे श्रमहर ॥' (९१) त्याच्या पायाची सेवा करावी, त्याच्याशी

गोड शब्दानी बोलावे कारण 'पुरुष होता सतोषी। निर्मूर्ति सतोषपती॥' (९२) पतिदेव हाच स्त्रीचा सर्वस्व असावा 'काय देतील मातापिता। नेदी इष्टवर्ग बंधु भ्राता। इहपराची जोडी देता। पुरुष आपला देव जाणा॥' (९३) पती हा आपला प्राणच समजावा पती असणे हे केवढे सुखदायक आहे! 'पति नसता स्त्रियासी। पाहू नये मुख त्यासी। अपुनी असता अधिक जाणा॥' (९७) गावास जाताना एखादी विधवा समोर आली की 'मरण होय सत्य' (९८) अशी धारणा सनातन धर्मशास्त्राची दिसते 'पुत्राविणे विधवा जे नारी। नमन तिसी करू नये॥' (९९) असा दडक आहे म्हणूनच श्रीगुरुचरित्रकारानी पतिव्रतेचे, सुवासिनीचे माहात्म्य वर्णन केले आहे

श्रीगुरुचरित्राच्या शिकवणीप्रमाणे पतिव्रता ही थोर खरीच, पण दुर्दैवाने स्त्रीचा पती निधन पावला तर? तिने काय करावे? कसे वागावे? देहाची सावली देहाबरोबर जाते त्याप्रमाणे 'पतिव्रता। वरवें पुरुषासवे जाता॥ चद्रासवे चादणे जैसे। मेघासवे विजु असे। मावळता सवेचि जाय जैसे। तैसे पतीसवे जावे॥' (१०२) सहगमन केल्याने माहेरची एकवीस व सासरची एकवीस अशा बेचाळीस कुळाचा उद्धार होतो 'पुरुष प्रेत झालियावरी। सहगमन करिती ज्या नारी। एकेक पदे पादचारी। अश्वमेध सहस्र पुण्य॥' (१०४) आपला पती पापी असला तरी त्याच्याबरोबर स्त्रीने सहगमन करावे म्हणजे 'जैसी सर्पासी नेती घारी। तैसी पतीसी स्वर्गा नेई॥' (१०६) पतिव्रता स्त्री विधवा झाली व ती पतीबरोबर सती गेली तर यमदूताचे काहीच चालत नाही 'सूर्य भिता देखूनि तिसी। तपतो सजमदेसी। अग्नि भिऊनी सतीसी। उष्ण तिसी होऊ न शके॥ नक्षत्रें भिती पाहता तिसी। आपुलें स्थान घेईल ऐसी। जाय स्वर्गभुवनासी। पतीसहित परियेसा॥' (११०–११) अशा प्रकारे स्त्रीने सहगमन केल्यास 'आपुले पतीसी घेऊनि। राहे स्वर्गी निरतर॥' (११२) तीन कोटी केसाचे दान या सतीने अग्नीला दिलेले असल्यामुळे 'एकेक रोमासी। स्वर्गी राहे शतकोटि वर्षी। पुरुषासवे स्वानदसी। पतिव्रता राहे तेथें॥' (११८) असे हे सहगमनाचे पुण्य आहे उलट पतीसवे सहगमन न करणारी दुराचारी नारी 'अगावरी रोम किती। तितुकी वर्षे त्याति। नरकामध्यें पचे निरुती॥' (१२०) परतु पतिव्रता स्त्रीचा मात्र सर्व चराचरास अभिमान वाटतो तिचे चरण आपल्यावर पडतात म्हणून भूमाता सतुष्ट होते. आपले किरण पतिव्रतेवर पडतात म्हणून चद्रसूर्य धन्य आहेत! 'वायु आणि वरुण देखा। पतिव्रतेचे स्पर्शे ऐका। पावन आपण जाहलो निका। पहाता समस्त पुनीत होती॥' (१२३) अशा पतिव्रता ज्याच्या घरी नादतात त्याच्या पुण्याईचे वर्णन काय करावे? पतिव्रता स्त्रीमुळेच पुरुषास चतुर्विध पुरुषार्थ साधता येतात 'ज्याचे घरी नाही सती। पुण्यें काही त्यासी न होती। यज्ञादि कर्मे त्याति। अर्हता नव्हे तो नर॥ सती नाही ज्याचे घरी। त्यासी नाही अरण्य दूरी। वृथा जन्मोनि ससारी। कर्मबाह्य तो जाणा॥' (१२०–२८) अशी पुण्यवान व पतिव्रता स्त्री ज्यास लाभते त्याना सर्व पुण्यफले प्राप्त होतात 'पुत्रसतान परलोकासी। साधन होय सतीचेनि॥' (१२९) गगास्नानाने जे पुण्य मिळते तेच सतीच्या दर्शनाने प्राप्त होते . . .

## विधवापणाचा आचार

पतिनिधनानतर पतिव्रतेने सती जावे हेच उत्तम परतु कित्येकदा काही अपवाद निर्माण होतात पती दूर प्राती मरण पावला असेल तर पत्नीने सहगमन कसे करावे? 'अथवा असेल गरोदरी। असे तान्हा कुमार कुमरी। काय करावे तैसियें नारी?' (३२४) असे प्रश्न

श्रीगुरुचरित्राच्या पुढल्याच बत्तिसाव्या अध्यायात निर्माण झाले आहेत. आणि त्यांची उत्तरे देताना स्पष्टपणे निर्देश केला आहे की, 'असेल आपण गरोदरी। करूं नये सहगमन॥ स्तनपानी असेल कुमर। तिणें करितां पाप थोर। पुरुष मेला असेल दूर। सहगमन करूं नये॥' (१०६-७) पतिनिधनानंतर तिने मुलांना वाढविण्यासाठी जगावे व विधवापणाचा आचारधर्म पाळावा. तो सहगमनाप्रमाणेच थोर आहे. या आचाराचे पहिले लक्षण म्हणजे 'निवर्तता आपुला भ्रतार। केशवपन करावे॥' (९) विधवा स्त्रीने केस ठेविले तर त्यांच्या बंधनात पुरुष अटकून तो नरकाला जातो. म्हणून विधवा स्त्रीने केशवपन करावे, नित्य स्नान करून एकभुक्त असावे. ईश्वराची भक्ती करावी. तिने उपासतापास कोणते करावेत, व्रते कोणती आचरावीत, आहार कोणता असावा, यासंबंधीही या अध्यायात मार्गदर्शन आहे. 'जेणें राहे प्राण मात्र। स्वासोच्छ्वास चाले ऐसें॥' (१७) असेच खाणेपिणे विधवेने ठेवावे. तिने कधी पलंगावर शयन करू नये. मंगल स्नान करू नये. देहमर्दन, गंध, परिमल, तांबूल, फुले यांना स्पर्श करू नये.

तिने नित्य देवाच्या पूजेत मग्न असावे. 'विष्णुपूजा करावी नित्य। आपुला पुरुष हाचि म्हणत। पुरुषरूप आठवी चित्त। विष्णुस्थानी आरोपिजे॥' (२१) विष्णुमूर्तीलाच पती मानून त्याची आराधना तिने करावी. 'तीर्थयात्रा-उपवासव्रत। विष्णुनिरोपें करणे पवित्र। अथवा गुरु द्विज असत। त्याचे निरोपे करावें॥' (२३) वैशाख-कार्तिक मासांत विशेष असा आचार पाळावा. 'वैशाखी जळकुंभदान। कार्तिकी दीपाराधन। घृतदान द्यावें ब्राह्मणां। यथानुशक्त्या दक्षिणेंसी॥ माघमासी तिळघृतेंसी। दान द्यावें ब्राह्मणासी। वैशाखमासी अरण्यासी। पोई घालिजे निर्मळोदकें॥ शिवालयी ईश्वरावरी। गळती ठेविजे निर्मळ वारी। गंध परिमल पूजा करी। अनंत पुण्य असे देखा॥ ब्राह्मणाचे घरोघरीं। उदक घालिजे शक्त्यानुसारीं। अन्न द्यावें अवधारीं। अतिथिकाळीं विद्वज्जना॥ तीर्थयात्रे जात्यालोकां। त्यांतें द्याव्या छत्रपादुका। येतील आपुले गृहांतिका। पादप्रक्षालन करावें॥ वारा घालिजे विंझणेंसी। द्यावें वस्त्र परिधानेंसी। गंध तांबूल परिमळेंसी। कर्पूरविडा परियेसा॥ जलपात्र द्यावें शक्तीसी। गुड-आम्लपानकेंसीं। द्राक्षकर्दळी-फळेंसी। ब्राह्मणा द्यावें मनोहर॥' (२५-३२) अशा प्रकारच्या अनेक दानांचे उल्लेख या अध्यायात आहेत. नाना व्रतांची उद्यापने कशी करावीत यासंबंधीचेही मार्गदर्शन आहे.

दानधर्म, व्रते, पूजाअर्चा यांतच विधवेने आपले आयुष्य व्यतीत करावे असा धर्मशास्त्राचा आदेश आहे. नारायण हा आपलाच पतिरूप आहे असे समजून तिने त्याची पूजाअर्चा करावी. 'भेमें असावें ते नारी। न बैसावें बैलावरी। लेवूं नये चोळी करी। श्वेत वस्त्र नेसावें॥ रक्त कृष्ण चित्रवस्त्र। नेसतां जाण दोष बहुत॥' (५२) पतीच पुत्ररूपाने जन्मास आला असल्यामुळे तिने पुत्राच्या आज्ञेत असावे. दुराचारी पती निधन पावला व तो नरकात दुःख भोगीत असला तरी त्याच्या विधवेच्या आचारामुळे तिच्या निधनानंतर ती आपल्या पतीसमवेत स्वर्गसुख भोगेल.

असा हा सर्व उपदेश मागील अध्यायापासून योगेश्वरांनी दत्तभार्येस केला.या उपदेशाप्रमाणे 'तू सहगमन कर अथवा विधवेचा आचारधर्म पाळ' त्यावर दत्तभार्या म्हणाली, 'विधवापणाचा आचारधर्म फारच खडतर असल्याने मी सहगमन करीन.' तिचा हा निर्धार पाहून योगेश्वरांनी तिला कपाळी भस्म लावण्यास दिले, पतीच्या कंठास व कानात घालण्यासाठी चार रुद्राक्ष दिले. ब्राह्मणांकरवी रुद्रसूक्त म्हणण्यास सुचविले. सहगमनाची सर्व तयारी करून ती श्रीगुरूंचे दर्शन घेण्यास निघाली. श्रीगुरूंनी तिला

'तू निरंतर सुवासिनीच राहशील' असा आशीर्वाद दिला. 'तू अष्टपुत्रा होशील' असा पुन: आणखी एक आशीर्वाद दिला. श्रीगुरुंनी तिच्या मृत पतीवर चरणतीर्थ शिंपडून त्याला सजीव केले. सर्वत्र आनंदी आनंद झाला. यानंतर श्रीगुरुंनी रुद्र व रुद्राक्ष यांचे माहात्म्य निवेदन केले असल्याचे आपण मागे पाहिले आहेच.

## अन्नग्रहणविवेक

दत्तपंथ केवळ स्त्रीच्या, पतिव्रतेच्या, विधवेच्या आचरणाबद्दलच दक्ष आहे असे नव्हे पुरुषवर्गास, गृहस्थासही आचारासंबंधाने श्रीगुरुचरित्रात विस्ताराने सांगितले आहे. सर्वसामान्य माणसाचा धर्म हा प्रामुख्याने आचारप्रधान असल्यामुळे दत्तपंथाच्या प्रवर्तकांनी आपल्या अनुयायांसाठी आचारधर्माचे विस्तृत विवेचन केले आहे; आणि तेही प्रामुख्याने ब्राह्मणांच्या दैनंदिन आचारासंबंधी आहे. श्रीगुरुचरित्राच्या छत्तिसाव्या आणि सदतिसाव्या अध्यायांत ब्राह्मणांच्या दैनिक आन्हिकाचे वर्णन सकाळपासून संध्याकाळपर्यंतचे आहे. रोजच्या व्यवहाराचा बारीकसारीक तपशीलही गुरुचरित्रकारांनी निवेदन केला आहे. छत्तिसाव्या अध्यायात या निमित्ताने एका वेदरत ब्राह्मणाची कथा आली आहे. तो कोरडीच भिक्षा मागत असे. परान्न कधीही घेत नसे. त्यामुळे गावात कितीही समाराधना आणि मेजवान्या झाल्या तरी त्याच्या बायकोला कधीच त्यांचा लाभ झाला नाही. परंतु एकदा श्रीगुरुंच्या सांगण्यावरून हे दांपत्य एके ठिकाणी भोजनास गेले. तेथे विप्रस्त्रीस विपरीत प्रकार दिसला. श्वानसूकरही आपल्याबरोबर अन्न ग्रहण करीत असल्याचे तिने पाहिले. श्वानसूकराचे उच्छिष्ट व पक्वान्न आपणास मिळाल्याचे दु:ख दोघांनाही झाले. ते दांपत्य श्रीगुरुंना पुन: शरण गेले. त्यांना त्यांनी अन्न कोणाचे घ्यावे यासंबंधी सविस्तर निवेदन केले. परान्न कोणाकडे घ्यावे व घेऊ नये यासंबंधीचा विवेक महत्त्वाचा आहे.

गुरूच्या घरी अन्न घ्यावयास हरकत नाही. शिष्याच्या घरी जेवणास बाधा नाही. 'वैदिकादि विद्वज्जन । मातुळ आपुला श्वशुर जाण । सहोदरादि साधुजन–। गृही अन्न जेवावें ॥ अडला विप्र ब्राह्मणाधीण । त्याचे घरी घ्यावें अन्न। करावें गायत्रीजपन । दोष नाहीं अवधारा ॥' (३६. ६१–६२) श्रीगुरुंनी निषिद्ध अन्नाचेही वर्णन केले आहे. 'नित्य मातापितयाशी । सेवा घेती अतिदोषी । जेवू नये त्या सदतासी । धनलोभिष्ठ द्विजांधरी ॥ कलत्रपुत्र कष्टवोनि । धर्म करी ब्राह्मणजनी । अन्न निषिद्ध तया भुवनी । दोष घडती जेवलिया ॥ गर्विष्ठ चिम्रिक शस्त्रधारी । विप्र होवोनि मल्लयुद्ध करी । वीणाविद्या ज्याचे घरी । न घ्यावें अन्न ब्राह्मणानें ॥ बहिष्कारी विप्राघरीं । याचकवृत्ती उदर भरी । अन्न वर्जावें तया घरी । आत्मस्तुतिपर निंदका ॥ बहुजन एक अन्न करती । पृथक् वैश्वदेव न करिती । वर्जावें अन्न विप्रजाती । महादोष बोलिजे ॥ गुरु होऊनि समस्तांसी । आपण मंत्र उपदेशी । शिष्य राहटे दुर्वृत्तीसी । त्या गुरुघरी जेवू नये ॥ क्रोधवंत ब्राह्मण असे । अन्न न घ्यावें गृही ऐसे । स्त्रियेसी वर्जिता पुरुष असे । जेवूं नये तया घरी ॥' (६५–७१)

याप्रमाणे स्मृतिचंद्रिकेच्या आधारे निषिद्ध अन्नाची ठिकाणे श्रीगुरुचरित्र सांगते. धनगर्वी, तामसी, कृपण, निर्दय, व्यभिचारी, दांभिक, दुराचारी अशा ब्राह्मणाच्या घरी अन्न घेऊ नये. पुत्र-पतीला सोडून वेगळी राहणाऱ्या ब्राह्मणीच्या घरी अन्न घेऊ नये. आपले स्वत:चे कर्तव्य सोडून देणारा, सुवर्णकारी करणारा, लोहकारी करणारा, रजकाप्रमाणे वस्त्र धुणारा व रंगविणारा ब्राह्मण असला तरी त्याचे अन्न सेवन करू नये. मद्यपान करणाऱ्या, तस्करविद्या

घोडयांची विक्री करणाऱ्या, अशा ब्राह्मणाच्या घरी भोजन करू नये. जो भगवद्कीर्तन करीत नाही, जो स्नान केल्याशिवाय जेवतो, जो संध्या-वदन करीत नाही, पितृकर्म करीत नाही, द्रव्य घेऊन जपजाप्य करतो, अन्यायाने व्याजबट्टयाचा व्यवहार करतो, द्विजोत्तमाची वा साधूची जो अवहेलना करतो, कुळदेवत व मातापिता यांचा जो त्याग करतो, आपल्या गुरूची जो निंदा करतो, गोब्राह्मणांचा वध करतो, स्त्रीचा वध करतो, अशाच्या घरी अन्नाचे सेवन करू नये. पंचमहायज्ञ न करणाऱ्याच्या घरी अन्न घेऊ नये. 'घरीचें अन्न दूपण करी। पराञ्नाची स्तुति अपारी' अशी ज्याची वृत्ती त्याचेही अन्न घेऊ नये. भूमिदान, सुवर्णदान, गजवाजी-रत्नदान घेतल्याने फार दूपण नाही लागणार, पण अन्न घेतल्याने मात्र अतिदोप निर्माण होतो.'आपुल्या कन्येच्या घरासी। जाऊं नये भोजनासी। पुत्र झालिया कन्येसी। सुखें जावें अवधारा॥'(१०१) हा दंडक अजूनही कोठे कोठे पाळला जातो. सूर्यचंद्रग्रहणासी अन्न सेवन करू नये. जनना-शौच व मृताशौच ज्याचे घरी त्याच्याकडे अन्न ग्रहण करू नये.

## गृहस्थाचे आन्हिक

यानंतर श्रीगुरुंनी ब्राह्मणांचा आचारधर्म विस्ताराने निवेदन केला आहे. पराशर मुनींच्या वचनांधारे या आचारधर्माचे विवेचन आहे. ब्राह्मणाने रोज ब्राह्म मुहूर्तास म्हणजे पहाटेच्या पाच घटका रात्री उठावे. श्रीगुरू व ब्रह्मा-विष्णू-महेश यांचे स्तवन करावे. नवग्रह, सनत्कुमार, सनक, सनंदन, सनातन, नारद, तुंबर, सिद्ध, योगी, सप्तसमुद्र, सप्तपर्वत यांचे स्मरण करावे. सप्त द्वीपे, सप्तभुवने यांचे स्मरण 'प्रातःस्मरामि खलु तत्सावितुर्वरेण्यम्'.या श्लोकानुसार करावे. मग शयनासनावरून उठून दोन आचमने करावीत आणि नंतर 'मूत्रशंकेसी जाउनी। शौचाचमन करावे॥' (११८) या आचमनविधीचेही नाना प्रकार सांगितले आहेत. निजता, उठता, दोनही भोजनांपूर्वी, जांभई, शिंक आली असता, अधो-वायुशब्द झाल्यानंतर, काही वाईट पाहिल्या-नंतर आचमन करावे. जवळ पाणी नसेल तर ब्राह्मणाच्या उजव्या कानात सप्त देवता असल्याने 'त्यासी स्पर्शितां तत्क्षणी। आचमनफळ असे देखा॥' (१२४)त्यानतर चांगल्या मनाने उत्तम आसनावर मौन होऊन बसावे. अरुणोदय होताच बहिर्भूमीस म्हणजे प्रातर्विधीस जावे. हा विधी कसा व कोठे करावा याचे मोठ्या सक्षेपाने व वारकाईने मार्गदर्शन आहे. 'यज्ञोपवीत कानीं ठेवोनि। नैर्ऋत्य दिशे जाऊनि। डोईं पालव घेवोनि। अधोमुखी बैसावें॥ दिवसा बैसावें उत्तरमुखी। रात्रीं बैसावें दक्षिणमुखी। मौन असावें अति विवेकी। चहूंकडे पाहूं नये॥' (१२९-३०) पाण्याने नीट शुद्धी करावी. पाणी दुर्लभ असेल तर मृत्तिकेने स्वच्छता राखावी. प्रातर्विधी कोठे करावा वा करू नये याचेही मार्गदर्शन आहे. 'न बैसावें भूमीवरी। बैसिजे पानगवतावरी। हिरवें पान करावें दूरी। वाळल्या पर्णी बैसावें॥' (१३६) यानंतर 'मलविसर्जन करूनि। उठावें ऐका ब्रह्म (लिंग) धरूनि। जळपात्रापाशी जाऊनि। शौच करावें परियेसा॥' (१३७) हातास लावण्यासाठी माती कोणती आणावी? वारुळ, मूपकगृह, नदी, वृक्षाचा तळ, देवालय, तीर्थक्षेत्र इत्यादी ठिकाणची माती वर्जावी. 'वापीकूपतडागांत। मृत्तिका आणितां पुण्य वहुत। उदक करी घेऊनि प्रोक्षित। मृत्तिका घ्यावी शौचासी॥' (१४०) या मृत्तिकेने शौचकर्म कसे साधावे यासंबंधीही मार्गदर्शन आहे. हा शौचविधी चारी वर्णांना सारखाच आहे.

या शौचविधीनंतर चूळ भरावी व 'शुद्धस्थानीं बैसून निर्मळा। कुलदैवत स्मरावें॥'.

(१५१) यानंतर आचमनविधी करून विष्णु-मधुसूदनादी वीस नामांनी शरीराच्या वीस स्थानांना स्पर्श करावा. या स्थानांचे व त्यांतील देवतानिवासाचे वर्णन महत्त्वाचे आहे. 'अंगुष्ठ-मूळ तळहातेसीं । 'ब्राह्मतीर्थ,' 'अग्नितीर्थ' परियेसी । अंगुष्ठतर्जनीमध्यदेशी । 'पितृतीर्थ' असे जाण ।। चतुरंगुळ तळवेवरी । 'देवतीर्थ' असे निर्धारीं । कनिष्ठिकाअग्रोत्तरी । 'ऋषितीर्थ' असे जाणा ।। तर्पण देव-पितृ-ऋषि । जे ते स्थानतीर्थें करा हर्षी । आचमन ब्राह्मतीर्थेसीं । करावें ब्रह्मविद्वज्जनें ।। ब्रह्मतीर्थें आचमनें तीनी । 'केशव-नारायण-माधव' म्हणोनि । देवतीर्थें उदक सोडोनि । 'गोविंद' नाम उच्चारावें ।। 'विष्णु-मधुसूदन' हस्त दोनी । 'त्रिविक्रम-वामन' गाल स्पर्शोनि । विवोष्ठी तळहस्त ठेवोनि । 'श्रधर' नाम उच्चारावें ।। पुनरपि हस्त 'हृषीकेशी' । 'पद्मनाभें' पादस्पर्शी । सव्य हस्त पंचांगुलींसी' । 'दामोदरें' शिरस्थानीं ।। चतुरंगुलपृष्ठेंसी । 'संकर्षण' घ्राणेसी । तर्जनी आदि अंगुष्ठेंसी । म्हणावा 'वासुदेव-प्रद्युम्न ।।' अंगुष्ठानामिकें 'अनिरुद्ध पुरुषोत्तम' नेत्रासी; । श्रोत्र स्पर्शावे अंगुष्ठकनिष्ठिकेसी । 'अधोक्षज-नारसिंह' म्हणा ऐसी; । 'अच्युते' नाभि 'जनार्दनें' हृदयस्पर्श ।। पंचांगुली 'उपेंद्र' शिरसी देखा । 'हरि-कृष्णें भुजांस ऐका । पांचां-अंगुली विधिपूर्वका । येणें विधीं स्पर्शावें ।।' (१५४–६२) असा हा आचमन-विधी नाना निमित्तांनी सांगितला आहे.

यानंतर दात कसे घासावेत ते सांगितले आहे. दंतधावन केव्हा करू नये याचाही विचार आहे. चारही वर्णांनी दंतधावनकाष्ठ किती लांबीचे आणावे हेही ठरले आहे. दंतधावन-काष्ठ तोडताना 'आयुःप्रजा' हा मंत्र म्हणावा. 'दंतधावन करोनि ऐसें । काष्ठ टाकावें नैर्ऋत्य दिशे । चूळ भरोनि द्वादश । द्विराचमन करावें ।।' (१७७) यानंतर प्रातःस्नानाचा विधी सांगितला आहे. गृहस्थाने, वानप्रस्थाने, संन्याशाने स्नान केव्हा व कसे करावे, याचाही खुलासा आहे. निर्मळ पाणी मिळाले नाही तर अग्निस्नान, भस्मस्नान, वायुस्नान, मंत्रस्नान अशी स्नाने सांगितली आहेत. शीतोदक, उष्णोदक अथवा दोघांचे मिश्रित असे पाणी स्नानास घ्यावे. मंत्रांचे पठण कसे व केव्हा करावे याचाही निर्देश स्नानाच्या संदर्भात आहे. स्नान झाल्या-नंतर वस्त्र सूर्यास दाखवून समंत्रक नेसावे; स्नान, आचमन, नारायणमूर्तीचे ध्यान इत्यादींचा निर्देश येथे आहे. मंगल स्नानाचा विधिनिषेध सांगून झाल्यावर 'नदीस्नान प्रवाहमुखी । घरीं प्रातः पूर्वमुखी । संध्याकाळी पश्चिममुखी । स्नान करावें अवधारा ।।' (२०९) नदीत स्नान करताना अघमर्षण करावे, 'नमोऽग्नयेऽप्सुमते' हा मंत्र म्हणून नदीस नमस्कार करावा. 'यदपांक्रूरं' मंत्र म्हणून दोनही हातांनी नदीचे पाणी लोटून 'इमं मे गंगे' म्हणून प्रार्थना करावी. 'ऋतं च सत्यं च' मंत्र म्हणून नदीत स्नान करावे. रडल्या-नंतर, उलटी झाल्यानंतर, स्त्रीसंगानंतर, दुष्ट स्वप्नानंतर स्नान करावे. गृहस्थाने ओले व भगवे वस्त्र नेसू नये. तांबडे, जीर्ण, न धुतलेले वस्त्रही उपयोगाचे नाही. 'श्वेतवस्त्र ब्राह्मणासी । मुख्य असे परियेसीं ।।' (२१६).

धोतर नेसल्यानंतर ब्राह्मणाने भस्म लावावे. भस्म न मिळाल्यास गोपीचंदन लावावे. कोणत्या बोटाने कोणी कशासाठी भस्म लावावे याचाही खुलासा येथेच आहे. द्वादश नामे उच्चारून अंगाच्या विविधभागी भस्म लावावे. ब्रह्मयज्ञतर्पणासाठी दहा प्रकारचे दर्भ सांगितले आहेत. दुर्वेचा महिमा याच ठिकाणी सांगताना म्हटले आहे, 'अग्रस्थानी असे ब्रह्मा । मूळीं रुद्र मध्यें हरि ।।' (२३४) दर्भस्पर्शाने पातकांचा नाश होतो. निरनिराळ्या प्रसंगी दर्भाची ग्रंथी कशी बांधावी याचे विवरण आहे. या भस्मधारणानंतर प्रातःसंध्येचे विधान

विस्ताराने सांगण्यात आले आहे. उदयसमयी सूर्यास अर्घ्य देणे महत्त्वाचे आहे. शेंडीला गाठ मारून, नीट आसन घालून गायत्रीचा मंत्र जपावा. तीन आचमने, विष्णुनामस्मरण, प्राणायाम, इत्यादीचे विधी सांगताना न्यास व व्याहृती यांचे विवरण विस्ताराने आले आहे. गायत्रीमंत्राच्या प्रत्येक अक्षरानुसार ऋषी, देवता, छंद, वर्ण, फल, न्यास, मुद्रा इत्यादींचे सविस्तर वर्णन श्रीगुरुचरित्राच्या या अध्यायात आहे. स्मृतिचंद्रिकेस अनुसरून मार्जनविधीही सांगितला आहे. गायत्रीमंत्रपूर्वक सायंप्रातःकाळी तीन अर्घ्य द्यावेत. असे अर्घ्य द्यावयाचे कारणही निवेदन केले आहे. तीस कोटी राक्षस सूर्याला वेढायला येतात; परतु अर्घ्य दिल्यानंतर त्यांची वज्रायुधे होऊन दैत्यांचा पराभव होतो.

संध्या केल्याचे फल कोठे किती आहे हे सांगताना म्हटले आहे–'दश फळ ग्रामाबाहेर देखा । नदीस केलिया शतफल ऐका । पुष्करतीर्थी सहस्री एक । गंगा-सुरनदीं कोटिफल ॥' (२९४) संध्या केल्याने काय होते ? 'सुरापान दिवामैथुन । अनृतवाक्यादि पाप जाण । संध्या बाहेर करितां क्षण। जळतीं पापे प्रत्यक्ष॥'(२९५) गायत्रीचा जप कोठे कसा करावा यासबंधीही सविस्तर निवेदन आहे. या गायत्रीचे ध्यान कसे करावे ? 'या गायत्रीची स्वरूपता। अत्यंत असे वर्णिता । रक्तांगी वास रक्ता । हंस वाहन असे देखा ॥' (३०६) सकाळ, माध्यानकाळ व सायंकाळ अशा तीनही काळी संध्या करून गायत्री मंत्राचा जप करावा. 'ॐ तत्सवितुर्वरेण्यं, भर्गो देवस्य धीमहि । धियो यो नः प्रचोदयात्' या त्रिपदा गायत्रीमंत्राच्या चोवीस अक्षरांचा न्यासविधी सुलासेवार सांगितला आहे. गायत्री, सावित्री व सरस्वती अशी तीन रूपे या एकाच देवतेची काळानुसार सांगितली जातात. गायत्री मंत्र जपण्यापूर्वी चोवीस मुद्राही करावयाच्या असतात. सुमुख, संपुट, वितत, विस्तृत, द्विमुख, त्रिमुख, चतुर्मुख, पंचमुख, षण्मुख इत्यादी चोवीस मुद्रांचा निर्देश करून म्हटले आहे, 'मुद्राविणें गायत्रीमंत्र । जप करितां सर्व व्यर्थ ।' (४४८) गायत्रीमंत्र व त्याचा महिमा वर्णन करताना प्रथम मंत्र शब्दाचा अर्थ स्पष्ट केला आहे. 'मन्-कार म्हणजे आपुलें मन । त्र-कार नाम आपुला प्राण । मन-प्राण एकवटोन । जप करावा एकचित्तें ॥' (४६०) 'जप' शब्दाचा अर्थ सांगताना म्हटले आहे; 'ज-कार जन्म विच्छेदोनि । प-कारे जन्मपाप दुरी ॥' (४६१)

हा गायत्री जप कसा करावा यासंबंधीही मार्गदर्शन आहे. 'उदक वर्जावें याकरण । बैसिजे आपण शुभासन । हस्त स्पर्शोनि नाभिस्थानीं । प्रातःकाळी जपावा ॥ माध्यान्ही हृदयस्थानी । जपावा माळ धरोनि । हस्त मुखें स्पर्शोनि । सायंकाळी जपावा ॥ उभेनि जपावा प्रातःकाळी । बैसोन कीजे माध्यान्हकाळीं । अथवा उभा राहोनि निश्चळी । उभय पक्षीं करावा ॥' (४६६–६८) ब्रह्महत्येसारखी महापातके या मंत्राच्या जपाने नाहीशी होतात. किती जप केल्याने कोणते पातक नाहीसे होते याचाही निर्देश आहे. गायत्रीजपानंतर 'चारी दिशा नमोनि । प्रदक्षिणा करावी सगुणी । गोत्र प्रवर उच्चारोनि । नमस्कार करा परियेसा ॥' (४९३).

## न्यास व मुद्रा

गायत्री मंत्राचा जप विशिष्ट न्यास मुद्रांच्या साहाय्याने केल्यास विशेष रूपाने फलित होतो अशी श्रद्धा असल्याने न्यास व मुद्रा यांची अगदी थोडक्यात ओळख करून घेऊ. नि+अस् = ठेवणे, स्थापणे यावरून न्यास शब्द बनला असून शरीराच्या विशिष्ट भागावर विशिष्ट देवतेची स्थापना करणे असा त्याचा अर्थ आहे. देवपूजा

## श्रीगुरुचरित्र ( अ. ३६ ) मधील गायत्रीमंत्राच्या न्यासादिकांचे दर्शन

| वर्णाक्षर | देवता | वर्ण | फल | न्यास | मुद्रा |
|---|---|---|---|---|---|
| १ तत् | अग्नी | सुवर्णचंपक | पापनाश | पादांगुष्ठ | सुमुख |
| २ स | वायू | अतसी पुष्प | उपपातकनाश | गुल्फ | संपुट |
| ३ वि | सूर्य | कपिल वर्ण | महापापनाश | जंघा | वितत |
| ४ तु | विद्युद्देवता | इंद्रनील | महारोगनाश | जानू | विस्तृत |
| ५ र्व | यम | वन्ही | भ्रूणहत्यादोषनाश | ऊरू | द्विमुखी |
| ६ रे | वरुण | ( ? ) | अगम्यागमनपापनाश | गुह्य | त्रिमुखी |
| ७ णि | बृहस्पती | विद्युत्प्रकाश | अभक्ष्यपापनाश | वृषण | चतुर्मुखी |
| ८ य | पर्जन्य | तारका | देहहत्यापापनाश | कटी | पंचमुखी |
| ९ भ | इंद्र | कृष्णमेघ | गुरुहत्यापापनाश | नाभी | षण्मुखी |
| १० र्गो | गंधर्व | रक्तवर्ण | गोहत्यापापनाश | उदर | अधोमुखी |
| ११ दे | पूषा | ( ? ) | स्त्रीहत्यापापनाश | स्तन | व्यापकांजली |
| १२ व | रुद्र | शुक्ल | वाग्जातपापनाश | हृदय | शकट |
| १३ स्य | त्वष्टा | काञ्चन | मानकौटिल्यपापनाश | कंठ | यमपाश |
| १४ धी | वसू | धवल कुमुद | पितृहत्यापापनाश | दंत | ग्रथित |
| १५ म | मरुत् | पद्मराग | सर्वजन्मपापनाश | तालू | सन्मुखोन्मुख |
| १६ हि | सोम | शंख | सर्वपापनाश | नासिका | प्रलंब |
| १७ धि | अंगिरा | पांडुर | पाणिग्रहण० | नेत्र | मत्स्य |
| १८ यो | विश्वेदेव | रक्तगौर | प्राणिवधपापनाश | भ्रूमध्य | मुष्टिक |
| १९ यो | अश्विनी | रक्ताभ | सर्वपापनाश | ललाट | कूर्म |
| २० न | प्रजापती | उदित सूर्य | विरंचिपदप्राप्ती | पूर्वमुख | वराह |
| २१ प्र | सर्वदेव | इंद्रनील | सर्वदेवपदप्राप्ती | दक्षिण | सिंहाक्रांती |
| २२ चो | रुद्रदेवता | कुंकुम | कैलासपदप्राप्ती | पश्चिम | महाक्रांती |
| २३ द | ब्रह्मा | शुक्ल | ब्रह्मपदप्राप्ती | उत्तर | मुद्गर |
| २४ या | विष्णू | सुवर्ण | विष्णुपदप्राप्ती | मूर्ध्नी | पल्लव |
| २५ त् | विष्णू | विष्णुरूप | वैकुंठवास | शिखा | |

विस्ताराने सांगण्यात आले आहे. उदयसमयी सूर्यास अर्घ्य देणे महत्त्वाचे आहे. शेंडीला गाठ मारून, नीट आसन घालून गायत्रीचा मंत्र जपावा. तीन आचमने, विष्णुनामस्मरण, प्राणायाम, इत्यादींचे विधी सांगताना न्यास व व्याहृती यांचे विवरण विस्ताराने आले आहे. गायत्रीमंत्राच्या प्रत्येक अक्षरानुसार ऋषी, देवता, छंद, वर्ण, फल, न्यास, मुद्रा इत्यादींचे सविस्तर वर्णन श्रीगुरुचरित्राच्या या अध्यायात आहे. स्मृतिचंद्रिकेस अनुसरून मार्जनविधीही सांगितला आहे. गायत्रीमंत्रपूर्वक सायंप्रातः-काळी तीन अर्घ्ये द्यावेत. असे अर्घ्य द्यावयाचे कारणही निवेदन केले आहे. तीस कोटी राक्षस सूर्याला वेढायला येतात; परतु अर्घ्य दिल्यानंतर त्याची वज्रायुधे होऊन दैत्यांचा पराभव होतो.

संध्या केल्याचे फल कोठे किती आहे हे सांगताना म्हटले आहे–'दश फळ ग्रामाबाहेर देखा। नदीस केलिया शतफल ऐका। पुष्कर-तीर्थी सहस्री एक। गंगा-सुरनदी कोटिफल॥' (२९४) संध्या केल्याने काय होते? 'सुरापान दिवामैथुन। अनृतवाक्यादि पाप जाण। संध्या बाहेर करितां क्षण। जळतीं पापे प्रत्यक्ष॥'(२९५) गायत्रीचा जप कोठे कसा करावा यासंबंधीही सविस्तर निवेदन आहे. या गायत्रीचे ध्यान कसे करावे? 'या गायत्रीची स्वरूपता। अत्यंत असे वर्णितां। रक्तांगी वास रक्ता। हंस वाहन असे देखा॥' (३०६) सकाळ, माध्यान्हकाळ व सायंकाळ अशा तीनही काळी संध्या करून गायत्री मंत्राचा जप करावा. 'ॐ तत्सवितुर्व-रेण्य, भर्गो देवस्य धीमहि। धियो यो नः प्रचो-दयात्' या त्रिपदा गायत्रीमंत्राच्या चोवीस अक्षरांचा न्यासविधी सुलासेवार सांगितला आहे. गायत्री, सावित्री व सरस्वती अशी तीन रूपे *या एकाच देवतेची काळानुसार सांगितली जातात.* गायत्री मंत्र जपण्यापूर्वी चोवीस मुद्राही करा-वयाच्या असतात. सुमुख, संपुट, वितत, विस्तृत, द्विमुख, त्रिमुख, चतुर्मुख, पंचमुख, षण्मुख इत्यादी चोवीस मुद्रांचा निर्देश करून म्हटले आहे, 'मुद्राविणें गायत्रीमंत्र। जप करितां सर्व व्यर्थ।' (४४८) गायत्रीमंत्र व त्याचा महिमा वर्णन करताना प्रथम मंत्र शब्दाचा अर्थ स्पष्ट केला आहे. 'मन्-कार म्हणजे आपुलें मन। त्र-कार नाम आपुला प्राण। मन-प्राण एकवटोन। जप करावा एकचित्तें॥' (४६०) 'जप' शब्दाचा अर्थ सांगताना म्हटले आहे; 'ज-कार जन्म विच्छेदोनि। प-कारें जन्मपाप दुरी॥' (४६१)

हा गायत्री जप कसा करावा यासंबंधीही मार्गदर्शन आहे. 'उदक वर्जावें याकारण। बैसिजे आपण शुभासन। हस्त स्पर्शोनि नाभिस्थानीं। प्रातःकाळीं जपावा॥ माध्यान्हीं हृदयस्थानी। *जपावा माळ धरोनि।* हस्त मुखें स्पर्शोनि। सायंकाळीं जपावा॥ उभेनि जपावा प्रातःकाळी। बैसोन कीजे माध्यान्हकाळी। अथवा उभा राहोनि निश्चळी। उभय पक्षी करावा॥' (४६६-६८) ब्रह्महत्येसारखी महापातके या मंत्राच्या जपाने नाहीशी होतात. किती जप केल्याने कोणते पातक नाहीसे होते याचाही निर्देश आहे. गायत्रीजपानंतर 'चारी दिशा नमोनि। प्रदक्षिणा करावी सगुणी। गोत्र प्रवर उच्चारोनि। नमस्कार करा परियेसा॥' (४९३).

## न्यास व मुद्रा

गायत्री मंत्राचा जप विशिष्ट न्यास मुद्रांच्या साह्याने केल्यास विशेष रूपाने फलित होतो अशी श्रद्धा असल्याने न्यास व मुद्रा यांची अगदी थोडक्यात ओळख करून घेऊ. नि+अस् = ठेवणे, स्थापणे यावरून न्यास शब्द बनला असून शरीराच्या विशिष्ट भागावर विशिष्ट देवतेची स्थापना करणे असा त्याचा अर्थ आहे. देवपूजा

## श्रीगुरुचरित्र ( अ. ३६ ) मधील गायत्रीमंत्राच्या न्यासादिकांचे दर्शन

| वर्णाक्षर | देवता | वर्ण | फल | न्यास | मुद्रा |
|---|---|---|---|---|---|
| १ तत् | अग्नी | सुवर्णचंपक | पापनास | पादागुष्ठ | सुमुखं |
| २ स | वायू | अतसी पुष्प | उपपातकनाश | गुल्फ | संपुटं |
| ३ वि | सूर्य | कपिल वर्ण | महापापनाश | जंघा | वितत |
| ४ तु | विद्युद्देवता | इंद्रनील | महारोगनाश | जानू | विस्तृत |
| ५ र्व | यम | वन्ही | भ्रूणहत्यादोषनाश | ऊरू | द्विमुखी |
| ६ रे | वरुण | ( ? ) | अगम्यागमनपापनाश | गुह्य | त्रिमुखी |
| ७ णि | बृहस्पती | विद्युत्प्रकाश | अभक्ष्यपापनाश | वृषण | चतुर्मुखी |
| ८ यं | पर्जन्य | तारका | देहहत्यापापनाश | कटी | पंचमुखी |
| ९ भ | इंद्र | कृष्णमेघ | गुरुहत्यापापनाश | नाभी | षण्मुखी |
| १० र्गो | गंधर्व | रक्तवर्ण | गोहत्यापापनाश | उदर | अधोमुखी |
| ११ दे | पूषा | ( ? ) | स्त्रीहत्यापापनाश | स्तन | व्यापकांजली |
| १२ व | रुद्र | शुक्ल | वाग्जातपापनाश | हृदय | शकट |
| १३ स्य | त्वष्टा | काञ्चन | मानकौटिल्यपापनाश | कंठ | यमपाश |
| १४ धी | वसू | शुक्ल कुमुद | पितृहत्यापापनाश | दंत | ग्रथित |
| १५ म | मरुत् | पद्मराग | सर्वजन्मपापनाश | तालू | सन्मुखोन्मुख |
| १६ हि | सोम | शंख | सर्वपापनाश | नासिका | प्रलंब |
| १७ धि | अंगिरा | पांडुर | पाणिग्रहण० | नेत्र | मत्स्य |
| १८ यो | विश्वेदेव | रक्तगौर | प्राणिवधपापनाश | भ्रूमध्य | मुष्टिक |
| १९ यो | अश्विनौ | स्वर्णाभ | सर्वपापनाश | ललाट | कूर्म |
| २० नः | प्रजापती | उदित सूर्य | विरंचिपदप्राप्ती | पूर्वमुख | वराह |
| २१ प्र | सर्वदेव | इंद्रनील | सर्वदेवपदप्राप्ती | दक्षिण | सिंहाक्रांती |
| २२ चो | रुद्रदेवता | कुंकुम | कैलासपदप्राप्ती | पश्चिम | महाक्रांती |
| २३ द | ब्रह्मा | शुक्ल | ब्रह्मपदप्राप्ती | उत्तर | मुद्गर |
| २४ या | विष्णू | सुवर्ण | विष्णुपदप्राप्ती | मूर्ध्नी | पल्लव |
| २५ त् | विष्णू | विष्णुरूप | वैकुंठवास | शिखा | |

अथवा मंत्रानुष्ठान सफल होण्यासाठी शरीराचा प्रत्येक अवयव पवित्र व शक्तिमान व्हावा म्हणून न्यासक्रिया महत्त्वाची मानली जाते. मातृका-न्यास, देवतान्यास, तत्त्वान्यास, पीठन्यास, षडंग-न्यास असे न्यासाचे अनेक प्रकार आहेत. हाताची सर्व बोटे, करतल व करपृष्ठ या ठिकाणी जो न्यास करतात त्याला करन्यास म्हणतात. गायत्री मंत्राच्या जपात मुद्रांना महत्त्वाचे स्थान आहे. अनुभवी गुरूच्या मुखातून या मुद्रांचे रहस्य समजून येते, व त्यांच्या योगे देवताची प्रीती संपादन करता येते. ग्रहादिकांच्या बाधेतून, पाप-समुदायापासून मुक्त करणाऱ्या या मुद्रा देवते-प्रमाणे भिन्न भिन्न असतात. 'सुमुखं सम्पुटं चैव विततं विस्तृतं तथा' या नामावलीतील चोवीस मुद्रा गायत्री मंत्राचा जप सुरू करण्यापूर्वी केल्या जातात. हाताच्या बोटांनी साधावयाच्या चोवीस मुद्रा संक्षेपाने खालीलप्रमाणे आहेत.

**चोवीस मुद्रा**–'सुमुखं सपुटं चैव, विततं विस्तृतं तथा। द्विमुखं त्रिमुखं चैव, चतुः पंचमुखं तथा ॥ षण्मुखाऽधोमुखं चैव, व्यापकाञ्जलिकं तथा। शकटं यमपाशं च, ग्रंथितं चोन्मुखोन्मुखम् ॥ प्रलंबं मुष्टिकं चैव, मत्स्यः कूर्मो वराहकम्। सिंहाक्रांतं महाक्रांतं मुद्गरं पल्लवं तथा ॥ एता मुद्रा न जानाति, गायत्री निष्फला भवेत्। एता मुद्रास्तु कर्तव्या, गायत्री सुप्रतिष्ठिता ॥'

१. **सुमुखं**–दोन्ही हात एकमेकावर बरोबर बोटे ठेवून (हृदयाकडे नमस्कारासारखे) जोडावे.

२. **संपुटं**–खाली डावा हात उताणा करून त्यावर उजवा हात दोन्ही हातांमध्ये पोकळी ठेवून उपडा ठेवावा. याची आकृती मोत्यांच्या दोन शिंपा एकमेकांवर झाकल्यावर जशा दिस-तात त्याप्रमाणे असते.

३. **विततं**–दोन्ही हात मनगटाचे ठिकाणी जोडून पुढील भाग (म्हणजे दोन्ही हातांच्या तळव्यांसहित बोटे) उपडा ठेवावा.

४. **विस्तृतं**–डावा हात खाली व उजवा हात वर करून दोन्ही हातांमध्ये एक फूट अंतर ठेवून समांतर दोन्ही हात ताठ करावे.

५. **द्विमुखं**–दोन्ही हात एकमेकांना जोडून हातांची परस्पर बोटे एकमेकांना चिकटवून जोडावी व दोन्ही तळव्यांच्या मध्यभागाला खाली व वर दोन मुखे राहतील अशी पोकळी ठेवावी.

६. **त्रिमुखं**–वरीलप्रमाणे दोन मुखे ठेवून तिसरे मुख दोन आंगठ्यांमध्ये पोकळी सोडून ठेवावे.

७. **चतुर्मुखं**–वरीलप्रमाणे ३ मुखे ठेवून तर्जनी व मध्यमा यांमध्ये पोकळी ठेवून चवथे मुख ठेवावे.

८. **पंचमुखं**–वरीलप्रमाणे ४ मुखे ठेवून मध्यमा व अनामिका यांमध्ये पाचवे मुख ठेवावे.

९. **षण्मुखं**–वरीलप्रमाणे ५ मुखे ठेवून अना-मिका व कनिष्ठिका यांमध्ये सहावे मुख ठेवावे.

१०. **अधोमुखं**–दोन हात मनगटाजवळ जोडून पुढील भाग उपडा ठेवून खाली जमिनीकडे मुख दाखवावे.

११. **व्यापकांजलिकं**–दोन हात एकमेकांना सारखे उताणे जोडून म्हणजे ओंजळ करून आंतील बाजूने गोल फिरवावे..

१२. **शकटं**–दोन्ही हाताचे आंगठे व तर्जनी जोडाव्या, व डावा हात उपडा करून त्याच्या त्या मध्यमा व अनामिका यांवर उजवा हात उपडा घालून उजव्या हाताच्या मध्यमा व अना-मिका डाव्या हाताच्या अनामिकेवर व मध्यमे-वर अनुक्रमे ठेवाव्या आणि दोन्ही हाताच्या कनिष्ठिका आतील बाजूस वाकवून धराव्या.

१३. **यमपाशं**–दोन्ही हातांच्या मध्यमा व अनामिका या मिटून त्यांवर आंगठा मिटून दाबून धराव्या. नंतर डावा हात उताणा ठेवून व त्यावर उजवा हात उपडा ठेवून एकमेकांना

भिडवून जोडावे; म्हणजे अनामिका व मध्यमा आणि मध्यमा व अनामिका या एकमेकांना भिडून रहातील. नंतर डाव्या हाताची मध्यमा व अनामिका डाव्या हाताच्या आंगठ्याखाली दाबून धराव्या.

१४. ग्रंथितं–डाव्या व उजव्या हाताची तर्जनी सोडून बोटे आंगठ्याखाली दाबून धरावी व डावा हात उताणा ठेवून उजवा हात उपडा ठेवावा आणि दोन्ही हातांच्या तर्जनी एकमेकांना साखळीच्या दुव्याप्रमाणे अडकवाव्या.

१५. उन्मुखोन्मुखं–डाव्या व उजव्या हातांची पाच बोटे एके ठिकाणी जोडून धरून डावा हात खाली व उजवा हात वर करून दोन्ही हातांच्या बोटांची अग्रे एकमेकांवर ठेवावी व तशा स्थितीत उजवा हात खाली व डावा हात वर आणि डावा हात खाली व उजवा हात वर असे खाली वर करावे.

१६. प्रलंबं–डावा हात उजव्या कुशीकडे उताणा ताठ आडवा ठेवून त्याच्या पंज्यावर उजव्या हाताचे कोपर ठेवून तो हात सरळ उभा करावा (ही आकृती काटकोनासारखी होते.)

१७ मुष्टिकं-दोन्ही हातांच्या मुठी करून डाव्या हाताच्या मुठीवर उजव्या हाताची मूठ ठेवणे.

१८. मत्स्य–दोन्ही हातांची बोटे ताठ करून डावा हात पालथा करून त्यावर उजव्या हाताचा पंजा तसाच ठेवावा. म्हणजे दोन बाजूला दोन हाताचे आंगठे येतील व डाव्या हाताची कनिष्ठिका, अनामिका मध्यमा, तर्जनी यानंतर उजव्या हाताची तर्जनी, मध्यमा, अनामिका व कनिष्ठिका या अनुक्रमे येतील. नंतर दोन्ही आंगठे माशाच्या पंखाप्रमाणे हलवावे.

१९. कूर्म–दोन्ही हातांची बोटे ताठ फाकून डावा हात खाली व उजवा हात त्यावर पालथा घालून सर्व बोटे एकमेकांवर चांगली चिकटवून वळव्याच्या मध्यभागी पोकळी ठेवावी.

२०. वराह–दोन्ही हातांची बोटे एकमेकांना चिकटवून धरावी व डावा हात खाली उताणा व त्यावर उजवा हात पालथा ठेवून पुढील बोटाच्या टोकांना वराहाच्या तोंडाप्रमाणे निमूळतेपणा दाखवावा.

२१. सिंहाक्रांता–दोन्ही हातांच्या कनिष्ठिका व आंगठे परस्परांशी जोडावे व मनगटे एकमेकांशी चिकटवून बाकीची बोटे पुढे सिंहाच्या उघड्या तोंडाप्रमाणे ताठ करून फाकून ठेवावी.

२२. महाक्रांता–डावा हात ताठ करून उताणा ठेवावा व उजवा हात ताठ करून मध्यंतरी एक फुटाचे अंतर ठेवून पालथा धरावा.

२३. मुद्गर–डाव्या हातावर उजव्या हाताचे कोपर ठेवून उजव्या हाताची मूठ मिटून तो कोपरापासून सरळ उभा धरावा.

२४. पल्लवं–डाव्या हाताचा आंगठा उजव्या हाताच्या आंगठ्यात पकडून दोन्ही हात आतील बाजूने बाहेर फिरवावे; म्हणजे आंगठे एकमेकात अडकून राहून दोन्ही हातांचे पृष्ठभाग एकमेकाना जोडले जातील. नंतर पंखाप्रमाणे दोन्ही हातांची बोटे हलवावी.

श्रीगुरुचरित्राच्या छत्तिसाव्या अध्यायात गायत्रीमंत्राचे संपूर्ण विधान शास्त्रोक्त पद्धतीने वर्णन केले आहे. गायत्रीमंत्राचे माहात्म्य आणि फलित यांचाही निर्देश तेथे आहे. या मंत्राच्या प्रत्येक वर्णानुसार देवता, वर्ण, फळ, न्यास, मुद्रा इत्यादींचा संक्षेपाने आलेख पृष्ठ २४५ वर दिलेला आहे. या मंत्राचा ऋषी विश्वामित्र व छंद दैवी गायत्री असल्याचे प्रसिद्ध आहेच.

संध्येनंतर औपासन, म्हणजे सायंप्रातर्होम करावा. वेळणीसारख्या भांड्यात अग्नी स्थापन करून आहुती द्याव्यात. साळी, साव, नीवार,

तंदुल म्हणजे न पेरता आपोआप उगवणारे देव-भात, गहू, जव, जोंधळे, राळे यांची आहुती घृतसंपर्के करावी. औपासन केल्यानंतर ब्रह्मयज्ञ करावा. वसू, रुद्र, आदित्य, देव, पितर यांना तृप्त करावे. हा तर्पणविधीही विस्ताराने यात्र अध्यायात आला आहे.

# गृहस्थाचा कर्ममार्ग

श्रीगुरुचरित्राच्या पुढल्या म्हणजे सदतिसाव्या अध्यायात ब्राह्मणाचा कर्ममार्ग आणखी खुलासेवार सांगितला आहे. ब्राह्मणाने आपल्या घरी अग्निमंथनाची काष्ठे, कृष्णमार्जार, चंदन, रत्न, तूप, काळ्या पाठीच्या हरणाचे कातडे, छागवस्त्र, शुकसारसपक्षी आणि पापविनाशी धेनू यांचा संग्रह करावा. त्याच्या घरी रोज देवपूजा व्हावी.

घर चांगले झाडून लोटून, गोमयाने सारवून ठेवावे. ' रंगमालिका घालोनि । निर्मळ असावें देवता भुवनीं । मग शुभासनीं बैसोनि । देवपूजा करावी ॥' (१२) वैश्वदेव व देवपूजा या गोष्टी ब्राह्मणास अगत्याच्या आहेत. नित्य पूजा जर साधली नाही तर 'सायंकाळीं मंत्रेंसीं । पुष्पें वहावीं भक्तीसी । ऐसें न साधे जयासी । भोजन काळीं करावें ॥' (१५) उदकनारायण देवस्वरूप समजून त्याची पूजा करावी. अग्निपूजा, मानसपूजा, सूर्यपूजा, प्रतिमापूजा, धेनुपूजा, गुरुपूजा असे पूजेचे विविध प्रकार गुरुचरित्रकारांनी सांगितले आहेत. श्रीगुरूंच्या सांगण्यावरून काष्ठपाषाणाच्या देवांची पूजा केली तरी ' तेचि होती देव जाण । प्रसन्न होय परियेसा ॥ ' (२८)

देवपूजेचे सविस्तर कथन येथे आहे. शुद्ध आसनावर बसून आचमन करावे, प्राणायाम करावा, संकल्प जपावा. कलश, शंख, घंटा यांची पूजा करावी. देवाचे निर्माल्य काढून ते नैर्ऋत्य दिशेस टाकावे. चारही दिशांना वंदन करून 'शांताकारं' हा मंत्र म्हणून देवाला आवाहन करावे. आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, पंचामृताचे स्नान, पुरुषसूक्त अथवा रुद्राच्या मंत्रांनी अभिषेक, वस्त्र-यज्ञोपवीत समर्पण, गंधअक्षदा व पुष्पसमर्पण इत्यादी सर्व पूजाविधी येथे क्रमवार सांगितले आहेत. फुले कोणत्या रंगाची, झाडाची निवडावीत याचेही शास्त्र आहे. शिळे, सच्छिद्र, कृमिभक्षक, भूमीवर पडलेले फूल देवासाठी आणू नये. 'शतपत्रें-वकुल-चंपकासी । पाटलें-कमळें पुन्नागेंसी । मल्लिका-जाती-करवीरेंसी । कल्हार पुष्पें अर्पावीं ॥ '(४७) कोणत्या देवास कोणती फुले आवडतात, आवडत नाहीत याचेही दर्शन येथे आहे. धोतरा, रुई, कण्हेर, पांढरा गोकर्ण, निर्गुंडी, सेवगा, कवठ, करंज, आवळीचे पान, कोहळ इत्यादी फुले विष्णूस वर्ज आहेत. ही फुले विष्णूस वाहिल्यास अनेक दोष घडतात. केवडा, काळ्या निळ्या रंगांची, वकुल, डाळिंब, माधवी इत्यादी पुष्पे शंकरास वाहू नयेत. गणेशाला तुळशीची पानें व मंजिरी वाहू नये. देवीस दुर्वा वाहू नयेत. पुष्पसमर्पणानंतर 'यत्० पुरुषं' या मंत्राने सुगंध धूप समर्पण करून एकारती करावी. 'चंद्रमा मनसो' मंत्राने नैवेद्य दाखवून तांबूल द्यावा. पुष्पांजली अर्पण करावी.

देवाला, गुरूला, मातेला, पित्याला, ब्राह्मणाला नमस्कार कसा व केव्हा करावा याचे दर्शन यात्र अध्यायात आहे. कोणाला नमस्कार करू नये हे सांगताना 'वय उणें असेल ज्यासी । नमूं नये विद्वज्जनीं ॥' (७१) अशा रीतीने देवपूजा, गुरुपूजा ब्राह्मणास अत्यावश्यक म्हणून सांगितली आहे. 'अन्नसंस्कार व्हावया काजा । वैश्वदेव करावा ॥' (७८) म्हणून मार्गदर्शन आहे आणि वैश्वदेवाच्या वेळी 'अतिथि आलिया घरासी । चोर चांडाल होय हर्षी । पूजा करावी मनोभावें॥' (८२) अतिथी दारात आल्यावर 'न विचारावें गोत्रकुळा । अन्न घालावें तात्काळा ॥' (८६) बळिहरण, गोग्रास यांचाही निर्देश येथे आहे.

अतिथीच्या तृप्तीने ब्रह्मा-विष्णू-महेश्वर संतुष्ट होतात. 'ग्रास मात्र दिधला एक। मेरु समान पुण्य अधिक। वरवें द्यावें त्यासी उदक। समुद्रा-समान दान असे॥' (१०१) एवढे अन्नदानाचे महत्त्व आहे. अतिथीस एक व आपणास दुसरे अन्न असा पंक्तिप्रपंच करू नये. पूर्वाभिमुख होऊन भोजन करावे. चतुष्कोनी मंडल, सुरवरांना आवाहन केल्यानंतर भोजनाची तयारी करावी. जेवणासाठी पात्र कसे व कोणते घ्यावे यासंबंधी मार्गदर्शन आहे. भोजनाची वेळ कोणती असावी, जेवताना सभोवती कोण असावे, याचाही निर्देश आहे. 'संगें घेऊनि बाळकांसी। जेवूं नयें श्राद्ध दिवशी॥' (१२३) असा निर्देश आहे.

भोजनाच्या प्रारंभी कोणते मंत्र कसे म्हणावेत यासंबंधी निर्देश आहे. व्याहृतिमंत्राने अन्नाचे प्रोक्षण करावे. डाव्या हाताने पान धरून चित्राहुती घालाव्यात. आपोशन केल्यानंतर मग प्राणाहुती घ्याव्यात. 'अहं वैश्वानरो भूत्वा' या मंत्राबरोबर प्राणाहुती घ्याव्यात. प्राण, अपान, व्यान, उदान, समान यांना आहुती देताना 'दंतां स्पर्शो नये जाण। जिव्हेनें गिळोनि तत्क्षण। मग धरावें मौन देखा॥' (१४०) हे झाल्यानंतर जेवण किती वेळात करावे? तर 'धेनू उदक प्यावयासी। जितुका वेळ लागे तिसी। भोजन करावें परियेसीं॥' (१५०) गृहस्थाने बत्तीस घासांत जेवण उरकावे. इष्ट मित्राबरोबर एका ताटात भोजन करू नये. परंतु 'व्रतबंधाविणें पुत्रासी। कन्याकुमारासी दोष नाही॥' (१५५) अन्न फार सांडू नये. परंतु सर्व अन्न न जेवता एक घास राखून ठेवावा. असा भोजनविधीही धर्मशास्त्राने खुलासेवार सांगितला आहे. जेवण कोठे करावे, कोठे करू नये यांसंबंधीही मर्यादा आहे. वाढणाऱ्या स्त्रीच्या मुखाकडे पाहू नये, अशी बारीक सूचनाही येथे आहे. भोजनाप्रमाणेच पाणी पिण्याचाही विधी सशास्त्र सांगितला आहे. 'सभे बैसोनि एकासनीं। अथवा आपुले अंथरुणीं। प्राशन न करावें पाणी। महादोष परियेसा॥' (१८०) असा दंडक आहे. भोजन करताना रजस्वलेचा शब्द ऐकू नये. 'कलहशब्द कांडण, दळण। ऐकतां जेवूं नयें अन्न। अपशब्द स्पृष्टास्पृष्ट जाण। त्यजावें अन्न परियेसा॥' (१८३) अशी शास्त्राची आज्ञा आहे. काळे निळे वस्त्र नेसून भोजन करू नये. 'स्त्रीजन वाढिती कासेवीण। उच्छिष्ट समान परियेसा॥' (१८६) असा एक दंडक आहे. भोजनसमाप्तीनंतर समंत्र आचमन करावे. भोजन झाल्यावर तोंड कसे धुवावे याचाही बारकावा श्रीगुरुचरित्र सांगते.

श्रीगुरूंनी आपल्या शिष्यांना याच अध्यायात निषिद्ध अन्नें कोणती ती सांगितली आहेत. वैश्वदेव केल्याशिवाय अन्न भक्षण करू नये व फार मीठ घातलेले अन्न खाऊ नये. 'लसुण, गाजर, कांदे मुळे। वृंताक श्वेत वाटोळें भोपळे। छत्राकार शाका सकळ। वर्जाव्या तुम्ही परियेसा॥' (२०५) अशा प्रकारे निषिद्ध अन्नाची यादी दिलेली आहे. कोणत्या वारी कोणते अन्न वर्ज्य याचाही विचार केलेला आहे. 'नख केश पडलें अन्न। स्पर्श केलिया मार्जारें जाण। वायसघारी कुक्कुटादिकरून। स्पर्शिलें अन्न त्यजावें॥' (२११) फार तळलेले शिळे अन्न खाऊ नये. भोजनानंतर तांबूल भक्षण करताना किती काळजी घ्यावी याचेही फार बारकाईने विवेचन आहे. सायंसंध्या, रात्रीचे भोजन, वेदाभ्यास झाल्यानंतर शयन करावे हा शयनविधीही श्रीगुरुचरित्रकार धर्मशास्त्रसंमत असा सांगतात. 'खट्वा निर्मळ असावी जाण। वर्जावी त्रिपाद भिन्नदूषण। औदुंबर अश्वत्थ पिंपरी निर्गुण। न करावी खट्वा परियेसा॥' (२३३) कोणत्या मुहूर्तावर पलंग विणावा हेही सांगितले आहे. 'स्वगृही शयन पूर्वमुखी। श्वशुरगृही दक्षिणमुखी। प्रवासकाळीं पश्चिममुखी। शयन करावे परियेसा॥' (२३८) उत्तर दिशेकडे मुख करून कधीच झोपू नये. उशाला पूर्णकुंभ ठेवावा. रात्रिसूक्त म्हणावे, विष्णुस्मरण करावे,

तंदुल म्हणजे न पेरता आपोआप उगवणारे देव-भात, गहू, जव, जोंधळे, राळे यांची आहुती घृतसंपर्कें करावी. औपासन केल्यानंतर ब्रह्मयज्ञ करावा. वसू, रुद्र, आदित्य, देव, पितर यांना तृप्त करावे. ह्या तर्पणविधीही विस्ताराने याच अध्यायात आला आहे.

## गृहस्थाचा कर्ममार्ग

श्रीगुरुचरित्राच्या पुढल्या म्हणजे सदतिसाव्या अध्यायात ब्राह्मणाचा कर्ममार्ग आणखी खुलासेवार सांगितला आहे. ब्राह्मणाने आपल्या घरी अग्निमंथनाची काष्ठे, कृष्णमार्जार, चंदन, रत्न, तूप, काळ्या पाठीच्या हरणाचे कातडे, छागवस्त्र, शुक्सारसपक्षी आणि पापविनाशी धेनू याचा संग्रह करावा. त्याच्या घरी रोज देवपूजा व्हावी.

घर चांगले झाडून लोटून, गोमयाने सारवून ठेवावे. 'रंगमालिका घालोनि । निर्मळ असावें देवता भुवनी । मग शुभासनीं बैसोनि । देवपूजा करावी ॥' (१२) वैश्वदेव व देवपूजा या गोष्टी ब्राह्मणास अगत्याच्या आहेत. नित्य पूजा जर साधली नाही तर 'सायंकाळी मंत्रेसी । पुष्पें वहावीं भक्तीसी । ऐसें न साधे जयासी । भोजन काळीं करावें ॥' (१५) उदकनारायण देवस्वरूप समजून त्याची पूजा करावी. अग्निपूजा, मानसपूजा, सूर्यपूजा, प्रतिमापूजा, धेनुपूजा, गुरुपूजा असे पूजेचे विविध प्रकार गुरुचरित्रकारांनी सांगितले आहेत. श्रीगुरूंच्या सांगण्यावरून काष्ठपाषाणाच्या देवाची पूजा केली तरी 'तेचि होती देव जाण । प्रसन्न होय परियेसा ॥' (२८)

देवपूजेचे सविस्तर कथन येथे आहे. शुद्ध आसनावर बसून आचमन करावे, प्राणायाम करावा, संकल्प जपावा. कलश, शंख, घंटा यांची पूजा करावी. देवाचे निर्माल्य काढून ते नैर्ऋत्य दिशेस टाकावे. चारही दिशांना चंदन करून 'शांताकारं' ह्या मंत्र म्हणून देवाला आवाहन करावे. आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, पंचामृताचे स्नान, पुरुषसूक्त अथवा रुद्राच्या मंत्रांनी अभिषेक, वस्त्र-यज्ञोपवीत समर्पण, गंधअक्षदा व पुष्पसमर्पण इत्यादी सर्व पूजाविधी येथे क्रमवार सांगितले आहेत. फुले कोणत्या रंगाची, झाडाची निवडावीत याचेही शास्त्र आहे. शिळे, सच्छिद्र, कृमिभक्षक, भूमीवर पडलेले फूल देवासाठी आणू नये. 'शतपत्रें-बकुल-चंपकासी । पाटलें-कमलें पुन्नागेंसी । मल्लिका-जाती-करवीरेंसी । कल्हार पुष्पें अर्पावीं ॥' (४७) कोणत्या देवास कोणती फुले आवडतात, आवडत नाहीत याचेही दर्शन येथें आहे. धोतरा, रुई, कण्हेर, पांढरा गोकर्ण, निर्गुंडी, सेवगा, कवठ, करंज, आवळीचे पान, कोहळ इत्यादी फुले विष्णूस वर्ज आहेत. ही फुले विष्णूस वाहिल्यास अनेक दोष घडतात. केवडा, काळ्या निळ्या रंगांची, बकुल, डाळिंब, माधवी इत्यादी पुष्पे शंकरास वाहू नयेत. गणेशाला तुळशीची पाने व मंजिरी वाहू नये. देवीस दुर्वा वाहू नयेत. पुष्पसमर्पणानंतर 'यत्-पुरुषं' या मंत्राने सुगंध धूप समर्पण करून एकारती करावी. 'चंद्रमा मनसो' मंत्राने नैवेद्य दाखवून तांबूल द्यावा. पुष्पांजली अर्पण करावी.

देवाला, गुरूला, मातेला, पित्याला, ब्राह्मणाला नमस्कार कसा व केव्हा करावा याचे दर्शन याच अध्यायात आहे. कोणाला नमस्कार करू नये हे सांगताना 'वय उणे असेल ज्यासी । नमूं नये विद्वज्जनी ॥' (७१) अशा रीतीने देवपूजा, गुरुपूजा ब्राह्मणास अत्यावश्यक म्हणून सांगितली आहे. 'अन्नसंस्कार व्हावया काज । वैश्वदेव करावा ॥' (७८) म्हणून मार्गदर्शन आहे आणि वैश्वदेवाच्या वेळी 'अतिथि आलिया घरासी । चोर चांडाल होय हर्षी । पूजा करावी मनोभावें ॥' (८२) अतिथी दारात आल्यावर 'न विचारावें गोत्रकुळा । अन्न घालावें तात्काळा ॥' (८६) बळिहरण, गोग्रास यांचाही निर्देश येथे आहे.

अतिथीच्या तृप्तीने ब्रह्मा-विष्णू-महेश्वर संतुष्ट होतात. 'ग्रास मात्र दिधला एक। मेरू समान पुण्य अधिक। वरवें द्यावें त्यासी उदक। समुद्रासमान दान असे॥' (१०१) एवढे अन्नदानाचे महत्त्व आहे. अतिथीस एक व आपणांस दुसरे अन्न असा पंक्तिप्रपंच करू नये. पूर्वाभिमुख होऊन भोजन करावे. चतुष्कोनी मंडल, सुरवरांना आवाहन केल्यानंतर भोजनाची तयारी करावी. जेवणासाठी पात्र कसे व कोणते घ्यावे यासंबंधी मार्गदर्शन आहे. भोजनाची वेळ कोणती असावी, जेवताना सभोवती कोण असावे, याचाही निर्देश आहे. 'संगें घेऊनि बाळकांसी। जेवूं नयें श्राद्ध दिवशीं॥' (१२३) असा निर्देश आहे.

भोजनाच्या प्रारंभी कोणते मंत्र कसे म्हणावेत यासंबंधी निर्देश आहे. व्याहृतिमंत्राने अन्नाचे प्रोक्षण करावे. डाव्या हाताने पान धरून चित्राहुती घालाव्यात. आपोशन केल्यानंतर मग प्राणाहुती घ्याव्यात. 'अहं वैश्वानरो भूत्वा' या मंत्राबरोबर प्राणाहुती घ्याव्यात. प्राण, अपान, व्यान, उदान, समान यांना आहुती देताना 'दंतां स्पर्शों नये जाण। जिव्हेनें गिळोनि तत्क्षण। मग धरावें मौन देखा॥' (१४०) हे झाल्यानंतर जेवण किती वेळात करावे? तर 'धेनू उदक प्यावयासी। जितुका वेळ लागे तिसी। भोजन करावें परियेसीं॥' (१५०) गृहस्थाने बत्तीस घासांत जेवण उरकावे. इष्ट मित्रांबरोबर एका ताटात भोजन करू नये. परंतु 'व्रतबंधाविणें पुत्रासी। कन्याकुमारांसी दोष नाहीं॥' (१५५) अन्न फार सांडू नये. परंतु सर्व अन्न न जेवता एक घास राखून ठेवावा. असा भोजनविधीही धर्मशास्त्राने खुलासेवार सांगितला आहे. जेवण कोठे करावे, कोठे करू नये यासंबंधीही मर्यादा आहे. वाढणाऱ्या स्त्रीच्या मुखाकडे पाहू नये, अशी बारीक सूचनाही येथे आहे. भोजनाप्रमाणेच पाणी पिण्याचाही विधी सशास्त्र सांगितला आहे. 'समें बैसोनि एकासनी। अथवा आपुले अंथरुणीं। प्राशन न करावें पाणी। महादोष परियेसा॥' (१८०) असा दंडक आहे. भोजन करताना रजस्वलेचा शब्द ऐकू नये. 'कलहशब्द कांडण, दळण। ऐकतां जेवूं नयें अन्न। अपशब्द स्पृष्टास्पृष्ट जाण। त्यजावें अन्न परियेसा॥' (१८३) अशी शास्त्राची आज्ञा आहे. काळे निळे वस्त्र नेसून भोजन करू नये. 'स्त्रीजन वाढिती वासेवीण। उच्छिष्टसमान परियेसा॥' (१८६) असा एक दंडक आहे. भोजनसमाप्तीनंतर समंत्र आचमन करावे. भोजन झाल्यावर तोंड कसे धुवावे याचाही बारकावा श्रीगुरुचरित्र सांगते.

श्रीगुरूंनी आपल्या शिष्यांना याच अध्यायात निषिद्ध अन्नें कोणती ती सांगितली आहेत. वैश्वदेव केल्याशिवाय अन्न भक्षण करू नये व फार मीठ घातलेले अन्न खाऊ नये. 'लसुण, गाजर, कांदे मुळे। वृंताक श्वेत वाटोळे भोपळे। छत्राकार शाका सकळ। वर्जाव्या तुम्ही परियेसा॥' (२०५) अशा प्रकारे निषिद्ध अन्नाची यादी दिलेली आहे. कोणत्या वारी कोणते अन्न वर्ज्य याचाही विचार केलेला आहे. 'नख केश पडलें अन्न। स्पर्श केलिया मार्जारें जाण। वायसघारी कुक्कुटादिकरून। स्पर्शिलें अन्न त्यजावें॥' (२११) फार तळलेले शिळे अन्न खाऊ नये. भोजनानंतर तांबूल भक्षण करताना किती काळजी घ्यावी याचेही फार बारकाईने विवेचन आहे. सायंसंध्या, रात्रीचे भोजन, वेदाभ्यास झाल्यानंतर शयन करावे. हा शयनविधीही श्रीगुरुचरित्रकार धर्मशास्त्रसमत असा सांगतात. 'खट्वा निर्मळ असावी जाण। वर्जावी त्रिपाद भिन्नदूषण। औदुंबर अश्वत्थ पिंपरी निर्गुण। न करावी खट्वा परियेसा॥' (२३३) कोणत्या मुहूर्तावर पलंग विणावा हेही सांगितले आहे. 'स्वगृहीं शयन पूर्वमुखी। श्वशुरगृहीं दक्षिणमुखी। प्रवासकाळीं पश्चिममुखी। शयन करावें परियेसा॥' (२३८) उत्तर दिशेकडे मुख करून कधीच झोपू नये. उशाला पूर्णकुंभ ठेवावा. रात्रिसूक्त म्हणावे, विष्णुस्मरण करावे,

अगस्त्य, माधव, मुचुकुद, आस्तिक, कपिल, सर्प याची स्तुती करावी शयन कोठे करू नये याचेही विवरण आहे 'जीर्ण देऊळ स्मशानेसी । एक वृक्षातळी वर्जावें ॥' ( २४२ ) वारुळाजवळ तळ्याच्या काठी, नदीतीरावर, धान्यावर, मोठ्या घरी झोपू नये.

श्रीगुरुचरित्रकारानी गृहस्थाचा धर्म सविस्तर कथन करताना स्त्रीसगाचाही यथायोग्य निर्देश केला आहे 'असू नये स्त्रियेपाशी । रजस्वला चतुर्थ दिनी ॥' (२४७), 'असावे जानवे उपवीतीसी । दृष्टी पडो नये योनीसी । आयु क्षीण परियेसी । दीप वर्जावा याकारणे ॥'(२४८) इतकी सूचना देऊन म्हटले आहे, 'नीळवस्त्र नेसले स्त्रियेसी । करिता सग परियेसी । पुत्र उपजे चाडाळ ऐसी । शुभ्र वस्त्र विशेष ॥' (२४९) समागमकाळाची नोद कन्या वा पुत्र होणार या सदर्भात अशी आहे ' ऋतु देता चतुर्थ दिवसी ।–पुत्र उपजे अल्पायुषी । कन्या होय पाचवे दिवसी । सहावे दिनी पुत्र परियेसा ॥ विषमदिवसी कन्या जाण । समदिवशी पुत्र सगुण । दहा दिवस ऋतुकाळ खूण । चद्रबळ असावें ॥ मूळ - मघा - रेवतीसी । सग न करावा परियेसी । कोप नसावा उभयतासी। सतोषरूपें असावे ॥ ऋतुकाळी स्त्रीपुरुषासी । जें जें असेल मानसी । सत्त्वरजतमोगुणेसी । तैसा पिंड उपजे देखा ' ॥ (२५४–५७)

पराशरमुनीकृत असा हा आचारधर्म श्रीगुरूनी सागितला आहे या आचारधर्मामुळे ' तो वध होत देवासी । कामधेनु येईल घरासी । लक्ष्मी राहे अखडेसी । पुत्रपौत्रीं नादत ॥' (२६०) या आचारामुळे ब्राह्मण शतायुषी होईल, ब्रह्मज्ञानी होईल त्याला अपमृत्यू येणार नाही असे या आचारधर्माचे महत्त्व आहे

## परिस्थितिसापेक्ष विचार

दत्तपथीयाच्या आचारधर्माचे स्वरूप आपण सामान्यत प्रापचिकाच्या, व्यावसायिकाच्या दृष्टिकोणातून समजावून घेतले परतु जे मुमुक्षू साधक आहेत त्याच्या आचरणासबधाने दत्तपथात कोणता विचार झाला आहे ? लाखात एखादा मनुष्य जेव्हा सर्वसगपरित्याग करून ईश्वरी साक्षात्काराच्या मार्गाने वाटचाल करू लागतो तेव्हा त्याचा आचार कोणता असतो ? या प्रश्नाचे उत्तर शोधण्याआधी सर्वसामान्य गृहस्थाच्या वा प्रापचिकाच्या आचारासबधी आणखी थोडा विचार करणे प्राप्त आहे आपल्या ध्यानात आले असेल की, दत्तपथीयाचा आचारधर्म एकदम निराळा नसून तो प्रामुख्याने श्रुतिस्मृतिपुराणोक्त असा आहे जपजाप्य, व्रतवैकल्ये, तीर्थयात्रा, कर्मकाड याच्या साधनेतून मानवी जीवनास एक प्रकारची शिस्त लावण्याचा प्रयत्न श्रीगुरुचरित्र, श्रीदत्तमाहात्म्य इत्यादी साप्रदायिक ग्रथाचा आहे येथे महत्वाचा प्रश्न असा की, हा आचारधर्म परिस्थितिसापेक्ष आहे काय ? म्हणजे परिस्थितिनुसार त्यात बदल होणे अपरिहार्य आहे काय ? अन्नग्रहण, दानधर्म, दैनिक कर्मकाड अथवा आन्हिक इत्यादी आचार पोथीत सागितल्याप्रमाणे आज शक्य आहे काय ?

आज मानवी जीवन सर्व अगानी अतिशय गतिमान बनले आहे, समिश्र झाले आहे अशा स्थितीत आचारातील तपशील महत्त्वाचा मानावा की तत्त्व प्रमाण मानावे ? उत्तम साबण उपलब्ध असताना साप्रदायिक ग्रथातील शरीरशुद्धीची जटिलता साभाळावी काय ? उत्तम टूथपेस्ट किंवा पावडर असताना परपरागत दतधावनविधी पाळावा काय ? नाना प्रकारच्या स्नानाचा विधी ठेवावा काय ? 'अथवा दर्शन मातापिता । चरणतीर्थ भक्तीनें घेता । अगावरी प्रोक्षिता । तीर्थस्नान फळ असे ॥' हा श्रीगुरुचरित्रातील विवेक सर्वत्र पाळता येईल का ? नित्य देवपूजा आणि तीमधील जटिलता कितीही शास्त्रोक्त असली तरी बदलत्या परिस्थितीत ती साधी सुटसुटीत करता येईल का ? परपरागत

आचारधर्म कितीही थोर आणि शास्त्रशुद्ध असला तरी त्यात नवीन कालमानाप्रमाणे सुलभता आणता येईल असे वाटते.

या संदर्भात आणखी एका मुद्याचा विचार करणे अगत्याचे आहे. दत्तपंथीयांच्या आचारधर्मात पतिव्रता स्त्रीचे आचरण विशेष रीतीने सांगितले आहे. दांपत्यरहस्याच्या दृष्टीने त्यामधील अनेक आचारपद्धती व रीती उत्तम असल्या तरी नवीन कालमानानुसार व व्यक्ति-स्वातंत्र्याच्या या युगात त्याना काही मर्यादा पडतात की काय ? सतीत्वापासून दास्यत्वापर्यंत पोचणारा आचारधर्म आज मान्य होईल का ? 'पुरुष दुजी पत्नी करी । तिसी आपण वैर न धरी ॥' अथवा 'जरी असेल अभाग्य पुरुष । अथवा दुष्ट नपुंसक । असे व्याधिष्ठ पुरुष एक । देवासमान मानावा ॥' या वचनांना या नव्या काळात मुरड पडणार नाही का ? 'सहगमन करणें मुख्य जाण । थोर धर्मश्रुतीचें वचन ॥' खरे असले तरी या आचाराचा आग्रह नव्या परिस्थितीत शिल्लक कसा राहील ? वास्तविक पाहाता श्रीगुरुचरित्रकारानी पतिव्रता आणि सती यांचा मोठा गौरव केला आहे. 'असतां आपण गरोदरी' किंवा 'स्तनपानी असतां कुमारु' स्त्रीने सती जाऊ नये असेच स्पष्टपणे म्हटले आहे. याच विवेकाचा धागा नव्या कालमानानुसार परिपुष्ट करता येण्यासारखा आहे. नीतिमत्तेच्या दृष्टीने अत्यावश्यक असणारा विषयांचा आचारधर्म आज नव्या परिस्थितीत कसा टिकून राहाणार ? समाज सुसंघटित राहावा, बलवान व्हावा, चारित्र्यसपन्न व्हावा, याच उद्देशाने दत्तपंथीयांचा आचारधर्म आहे हे खरे; परंतु कालमानानुसार त्यात बदल होणे अपरिहार्य आहे हेही तितकेच खरे. स्त्रीवर श्रीगुरुचरित्रकारानी अनेक बंधने घातली असली तरी स्त्रीचा गौरव पतिव्रता व सती म्हणून दत्तपंथीयांत मोठाच आहे. पतीपेक्षा सतीचे माहात्म्य सांगणाऱ्या या पंथात अनसूया, कौशिकभार्या, ऋतुध्वजाची मदालसा, जमदग्नीची रेणुका, हेमचूडाची हेमलेखा, आयूची शीलधरा, शिखिध्वजाची चुडाला अशा अनेक पतिव्रतांचा अधिकार गौरवाने वर्णन केलेला दिसेल.

आणखी एक बारीकसा विचार येथे करावयाचा आहे. धर्मशास्त्रानुसार आचार जर घडला नाही तर जी पातके होतात, जी प्रायश्चित्ते घ्यावी लागतात, कर्मविपाकाचे जे शास्त्र निर्माण होते, त्याना तर्कशास्त्रीय आधार आहे काय ? पापपुण्य, स्वर्गनरक इत्यादी कल्पना सर्वसामान्य लोकांना धाक दाखवून त्याना सन्मार्गास लावण्यास उपयोगी पडतात म्हणून आल्या काय ? दुराचरण घडले की, कोणी नरकात जातो, कोणी रोगी बनतो, कोणी आंधळा होतो, कोणी गाढव होतो, कोणी कावळा होतो, कोणी उदराच्या जन्मास जातो, कोणी चांडाल होतो; अशा कर्मविपाकास श्रीगुरुचरित्रकार अथवा श्रीदत्तमाहात्म्यकार पारंपारिक म्हणून मान देत असले तरी नव्या वैज्ञानिक युगात या हास्यास्पद गोष्टी अशास्त्रीय वाटल्या तर दोष कोणाचा ? अशा कठोर दडकानी व प्रायश्चित्तांनी समाज सदाचारी होत असेलही, पण प्रायश्चित्त घेतले की पापमुक्ती होत असेल तर मग पापाचरणास वा दुराचारास तरी लोकानी का भ्यावे ? तेव्हा कर्मविपाक या शास्त्राची नव्याने तपासणी केली तर येणारे निष्कर्ष पत्करावे लागतील. अथवा ही सर्व बंधने अज्ञान अशा प्रापंचिकासाठी आहेत असे तरी मानावे लागेल. शुद्धता व पावित्र्य यांना महत्त्व देऊनही सोवळेओवळे अथवा शूद्र यांच्या कल्पना बदलायला हव्यात.

## योगी साधकाचा आचार

सर्वसामान्य प्रापंचिक वा व्यवसायी याचा आचारधर्म पाहून झाला. आता साधक योगी

पुरुषाचा आचार कसा असावा यासंबंधी दत्त-पंथीय ग्रंथ काही सांगतात का ? या प्रश्नाचा विचार करताना प्रथमच ध्यानात येते की, नाथ-पंथाशी जवळचा संबंध असल्यामुळे स्वाभाविक-पणे दत्तपंथीयात योगाच्या आचारास महत्त्व आले आहे. आदिनाथ शिवशंकरापासून प्रवर्तित झालेली ही योगधारा दत्तपंथात परिपुष्ट झालेली आपण मागे पाहिली आहेच. सहस्रार कमलातील अमृतबिंदू प्राशन करून मुक्त होऊ पाहाणाऱ्या योग्याच्या देहविज्ञानाचा थोडक्यात परिचय आपण मागच्याच तत्त्वज्ञानावरील प्रकरणात करून घेतला आहे. आता येथे योगी पुरुषाच्या आचारासंबंधी थोडक्यात पाहू.

'योग' हा शब्द 'युज्' जोडणे या धातूपासून बनला असून कर्मयोग, भक्तियोग, ज्ञानयोग इत्या-दींच्या साहयाने परतत्त्वाशी संबंध प्रस्थापित करणे, असा याचा स्थूल मानाने अर्थ होतो. परंतु पातंजलसूत्रांप्रमाणे योग म्हणजे समाधियोग, मंत्र-योग, हटयोग, राजयोग, तारकयोग, अमनस्क-योग, असे योगाचे प्रकार अनेक असले तरी मानवी शरीराचा व्यापार नियंत्रित करून समाधिसुखाचा अनुभव घेण्याची प्रक्रिया महत्त्वाची आहे. ईश्वरप्राप्ती वा स्वरूपसाक्षात्कार करून घेण्याचे प्रमुख साधन म्हणून योगाचे आचरण होत आले आहे. राजयोग व ज्ञानयोग ही तर दत्तसंप्रदायाची प्रमुख अंगे होत. श्रीदत्ता-त्रेय हे स्वतः योगीमकुटमणीच असल्यामुळे त्यांच्या भक्तांचा आचारही योगमार्गास धरून राहिल्यास नवल नाही. स्वतः श्रीदत्तात्रेयांनी आपली माता अनसूया, शिष्य कार्तवीर्य, अलर्क, भार्गवराम इत्यादींना योगाचाच उपदेश केल्याचे आपण पाहिले आहेच. हठयोग हा प्रामुख्याने शरीर व इंद्रिये यांच्यावर प्रभुत्व मिळवणारा योग असून राजयोगात प्राण व मन यांच्यावर प्रभुत्व संपादन केले जाते. आसन, कुंभक, मुद्राकरण व नादानुसंधान ही हटयोगाची प्रमुख अंगे असून अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, क्षमा, धृती, दया, आर्जव, मिताहार व शौच या दहा नियमांना हठयोगात महत्त्वाचे स्थान आहे. राजयोगातही यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी अशा आठ अंगांना महत्त्व असते.

पातंजलयोगसूत्रांनुसार चित्तवृत्तीचा निरोध म्हणजे योग. चित्त निस्पंद झाले की योग्यास खरे स्वरूपदर्शन होते. योगी मनुष्य अभ्यास आणि वैराग्य यांच्या साह्याने वृत्तींचा निरोध करतो. रोग, मनाची शिथिलता, शंका, निरुत्साह, जाड्य, भ्रांती, बाह्यवर्ती मन, च्युती असे काही अडथळे योगी माणसास येतात. दुःख, मनाची उद्विग्नता, शरीरकंप, श्वासात कमीअधिकपणा, हे विकारही उद्भवतात. अभ्यासाने या विकारांना दूर करावे लागते. श्वासोच्छ्वासाच्या नियमाने हे कार्य साधते. यासाठी सर्व विषय सोडून अंतःकरण स्थिर करावे लागते. या राजयोगात साधनक्रमालाही महत्त्व असते. तप, अभ्यास, कर्मफल यांना परमेश्वरास समर्पण करावे लागते. देहधारणेची आवड दूर सारावी लागते. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधी ही आठ योगांगे महत्त्वाची आहेत. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रम्हचर्य, अपरिग्रह हे यम होत. अंतर्बाह्य शुचिता, संतोष, तप, अभ्यास, परमेश्वरपूजन हे नियम होत. जे स्थिर आणि सुखावह असेल ते आसन होय. प्राण-वायूच्या गतीचे नियमन म्हणजे प्राणायाम होय. हे इंद्रियांना त्यांच्या विषयातून परावृत्त करून चित्तरूपात स्थिर करण्यास प्रत्याहार असे नाव आहे. एकाच विषयावर मन स्थिर करण्यास धारणा म्हणतात. त्या विशिष्ट ठिकाणी चित्ताची एकाग्रता अखंडित राहिली म्हणजे त्यास ध्यान म्हणतात. ध्येयाचे बाह्यरूप सोडून अंतःस्वरूपात मन तदाकार होऊन राहाते, त्या स्थितीस समाधी असे नाव आहे. योगसाधना पूर्ण झाली की योगी

पुरुषास नाना प्रकारच्या सिद्धी प्राप्त होतात.

हटयोग काय किंवा राजयोग काय, प्राणायामास फारच महत्त्व आहे. पूरक, कुंभक, रेचक यांच्या योगाने योगी श्वासोच्छ्वासाचे नियमन करतो. हृदयापासून निघालेल्या प्राणाचे, नासिकेच्या द्वारे बाहेर जाणे याला रेचक म्हणतात. बाहेरच्या वायूचे नासिकेच्या द्वारा हृदयात येणे याला पूरक म्हणतात आणि हृदयात आलेला वायू तेथेच कोंडून ठेवण्यास म्हणजे त्याचा रेचक होऊ न देण्याच्या क्रियेस कुंभक म्हणतात. हटयोगात या क्रियांना विशेष महत्त्व असते. नाडी शुद्ध नसल्यास योगी षट्कर्मविधीचे आचरण करीत असतो. पाणी आकंठ पिऊन ते ओकून टाकणे, किंवा कपडा गिळून आतडी साफ करून तो बाहेर काढणे याला धौती असे नाव आहे. गुदद्वाराने नलिकेच्या साह्याने पाणी पोटात ओढून घेऊन ते तेथे थोडा वेळ ठेवून पुनः बाहेर टाकायच्या विधीला बस्ती असे म्हणतात. बारीक फडक्याची लहान गुडाळी नाकपुड्यांतून घशात काढायची व दोनही टोके हातात धरून घुसळण करण्याच्या विधीला नेती म्हणतात. एकाग्र चित्ताने एखाद्या सूक्ष्म पदार्थावर पापणी न हलविता पाहाण्याच्या विधीस त्राटक असे नाव आहे. ओणव्याने उभे राहून, वाकून, पोट आत ओढल्यासारखे करून उजवीकडून डावीकडे व डावीकडून उजवीकडे गदगद फिरविण्यास नौली असे म्हणतात. लोहाराच्या भात्याप्रमाणे श्वास वर ओढून तसाच बाहेर सोडायचा, या क्रियेस कपालभाती अथवा भस्त्रा असे नाव आहे. धौती, वस्तीने मल साफ होतो. नेतीने नासिकेची शुद्धी होते, त्राटकाने नेत्रदोष जातात, नौलीने वातपित्तकफ दूर होतात, कपालभातीने कफदोष दूर होतो. हटयोगात भूचरी, खेचरी, चाचरी, अगोचरी अशा अनेक मुद्रा सांगितल्या आहेत. घेरंडसंहितेत महामुद्रा, नभोमुद्रा, उड्डियान, जलंधर, मूलबंध, महाबंध, खेचरी, विपरीत करणी, वज्रोली, शांभवी, आंभसी, आश्विनी, मातंगी इत्यादी पंचवीस मुद्रा हटयोगातील सांगितल्या आहेत. मूलबंध, उड्डियानबंध, जालंधरबंध, अशा तीन बंधांच्या क्रियाही हटयोगात महत्त्वाच्या आहेत.

योगी पुरुषाच्या आचरणाचे व साधनक्रमाचे अतिशय रेखीव व अनुभवसिद्ध वर्णन ज्ञानेश्वरांनी सहाव्या अध्यायात केले आहे. योगी पुरुषाने अतिशयरमणीय असे स्थान शोधावे. एखादा मठ अथवा शिवमंदिरही चालेल. मृगचर्म व दर्भांकुर यांचे सोयीस्कर उंचीचे दर्भासन असावे. आसनावर बसून सद्गुरूंचे स्मरण करावे. मन सात्त्विक वृत्तीने भरून यावे. इंद्रियांची चुळबूळ थांबावी. प्रवृत्तिपराङ्मुख होऊन चित्ताची एकाग्र स्थिती होते. या वेळची मुद्रा म्हणजे मांडी पोटरीला खेटून, पायाचे तळवे वाकडे म्हणजे उताणे करून गुदस्थानाच्या बुडाशी घट्ट ठेवावेत. उजवा तळवा तळाला ठेवून त्याने गुदस्थानाची शिवण मधोमध दाबावी. मग डावा तळवा सहजच त्याच्यावर भिडेल. गुद व वृषण यांच्यामध्ये चार अंगुळे अंतर आहे. त्यांपैकी दीड दीड अंगूळ प्रत्येक बाजूला सोडले म्हणजे मध्यंतरी एक अंगूळ रहाते. तेथे टाचेचा मागला भाग, वरचे सर्व शरीर नीट तोलात सावरून नेटाने रेटावे. वरचे शरीर उचलून धरले आहे की काय याचा बोध होणार नाही, अशा हळुवारपणाने पाठीच्या कण्याचे खालचे टोक वर उचलावे आणि दोनही घोटे तसेच तरते धरावे. हेच मूळबंध किंवा वज्रासन होय. यानंतर जालंदर बंध. उड्डियान किंवा 'वोढियाणा' बंध इत्यादींचे वर्णन करून ज्ञानेश्वरांनी कुंडलिनीच्या जागृतीचे वर्णन केल्याचे आपण मागे पाहिलेच आहे.

दत्तपंथात या योगसाधनेला महत्त्व असल्याने याचा आचारधर्म सर्वत्र अनुसरला जातो. बहुतेक दत्तभक्तांना योगी पुरुषाचे सामर्थ्य प्राप्त

झालेले असते. गुरू दत्तात्रेय-गोरक्षनाथ संवादात्मक 'ज्ञानदीपबोध,' 'अमनस्कयोग' इत्यादी योगप्रवण ग्रंथ दत्तपंथीयांत लोकप्रिय आहेत. गोरक्षासन, सिद्धासन, ऊर्ध्वपद्मासन, शीर्षासन, मत्स्येंद्रासन, भुजंगासन, शवासन, मयूरासन, सिद्धासन, योगमुद्रा, महायोगमुद्रा इत्यादी आसने योगी व दत्तपंथीय यांच्यात प्रसिद्ध आहेत. सहस्रार्जुनास, अलर्कास श्रीदत्तात्रेय योगमार्गाचा उपदेश करताना दिसतात. 'श्रीदत्तमहात्म्या'च्या बत्तीस व तेहतीस अध्यायांत या योगमार्गातील आचारासंबंधी सविस्तर वर्णन आहे, त्याचे संक्षेपाने दर्शन असे--

(१) प्राणापान निरोधन।
तोचि प्राणायाम जाण।
त्याचे त्रिविध लक्षण।
लघु मध्योत्तम भेदें॥
घर्म ये लघु प्राणायामें।
कंप उठे मध्यम प्राणायामें।
ब्रह्मरंध्री उत्तम प्राणायामें।
प्राण जाई निश्चित॥
वाम हातीं टाळी देऊन।
तमा करावी प्रदक्षिण॥
हे मात्रेचे प्रमाण।
किंवा श्वासोच्छ्वास निद्रिताचा॥
किंवा तर्जनी फिरवून।
जानूसी करावी प्रदक्षिण।
एक चुटकी वाजवून।
मात्रामान मानावे॥
बारा मात्रांसी सम।
कनिष्ठ प्राणायाम।
चोविसांनी मध्यम।
उत्तम अठ्ठेचाळिसांनी॥
श्वास घेणे तो पूरक।
धरणे तो कुंभक
सोडणे तो रेचक।
मिळोनी एक प्राणायाम॥
तया पुरकाहून।
कुंभक तो चतुर्गुण।
रेचक साधावा द्विगुण।
उत्तरोत्तर जाण वाढवावा॥
जोराने रेचक करिता।
शीघ्र येई दुर्बळता।
सोईसोईने सोडिता।
ये आरोग्यता निश्चित॥
हळूहळू करिता अभ्यास।
जिंकवेल प्राणास।
जसा सोईनें सिंहास।
वश्य खास करवेल॥
बळें वश्य करिता।
कधी न ये हाता।
हळू हळू अभ्यासिता।
होय वश्य निश्चयें॥
वश्य करिता जसा हरी।
छू करिता मृगा धरी।
वश्य करिता तयापरी।
प्राण मळाते॥
वश्य होता सिंह।
न तोडी धन्याचा देह।
वश्य प्राणे देह।
नोहे पीडित॥
चालता अभ्यासक्रम।
नासे शुभाशुभ कर्म।
ईंचे ध्वस्ती नाम।
योगी विश्वास पावती॥
जे लोभमोहात्मक।
सर्वकाम ऐहिक।
तसेच पारलौकिक।
हे सकळिक नष्ट होती॥
शांत होय चित्तवृत्ती।
होई सुखाची प्राप्ती।
इला प्राप्ती म्हणती।
योगी डुल्लती जियेनें॥

वाढे ज्ञान संपत्ती।
त्रिकालिक अर्थ कळती॥
ही प्राणजयाची स्थिती।
इला म्हणती सवित्त॥
इंद्रिये होती प्रसन्न।
मन पावे समाधान॥
ही प्रसाद म्हणून।
अवस्था जाण चवथी॥
ह्या अवस्था चार।
साधी तो योगीश्वर।
त्याला ईश्वर नाही दूर।
त्याच्या बरोबर प्रत्यक्ष वसे॥
(३२ ६१-७८)

(२) पद्मासनी बैसोन।
शरीर करोनी समान
दाता दात न लावून।
दृष्टी ठेवून नासाग्री॥
हालविता अंग।
शीघ्र न साधे योग॥
म्हणूनी ताठूनी अंग।
धरिता योग साधेल॥
आळस निद्रा भ्रांती।
ह्या तमोगुणाच्या वृत्ती।
त्या जिंकूनी पुढती।
योगाभ्यास करावा॥
काम क्रोध लोभ यत्न।
या रजोगुण वृत्ती जाण।
या विक्षेपें न घडे ध्यान।
म्हणूनी ह्या सोडाव्या॥
वैराग्य शमदमादिक।
या सत्ववृत्ती सम्यक।
ह्या धरिता साधक।
पावे सुख अभ्यासी॥
जो केवळ कुंभक।
न साधे सम्यक।
तोवरी पूरक रेचक।
धरूनी कुंभक साधावा॥
न घेता न सोडिता।
उगी स्तब्ध राहता।
प्राण न हो खालता।
अथवा वरता योग्या॥
योगी न हो घावरा।
वायू कोंडे वरा।
केवळ कुंभक तो खरा।
तो साधावा यत्नाने॥
असा प्राण जिंकावा।
मग प्रत्याहार करावा॥
तेणे मग जीवा।
समाधान वाटेल॥
जसा कूर्म अंगे आवरी।
तसा जेव्हा इंद्रिया सावरी।
तेव्हा प्रत्याहार होय तो वरी।
ना वारिजेल वाह्य भान॥
होता प्रत्याहार।
शब्द नये कानावर।
स्पर्श नेणे शरीर।
घडते बाहेर काय ते॥
विषय डावे न होती।
इंद्रिये स्थिर राहती।
ही प्रत्याहाराची स्थिती।
योगी जाणती आत्मनिष्ठ॥
प्रत्याहार झाल्यावरी।
धारणा करावी बरी।
नाभ्यादि देशावरी।
चित्त स्थिरीकरण व्हावे॥
ही धारणा साधता।
दोष जाती सर्वथा॥
योगिया ये स्वस्थता।
उद्विग्नता न येईल॥
मग करावे ध्यान।
चित्तैकाग्र्य होऊन।

होई परम समाधान ।
हें साधन उत्तम ॥
हें ध्यान विसरता ।
जेव्हां ध्येयाकारता ।
आपोआप ये चित्ता ।
हे समाधी जाणावी ॥
न हाले न चाले मन ।
ध्येयाकार होऊन
निश्चल राहे अनुदिन ।
हे जाण समाधी ॥
आपणा आपणा पाहून ।
राहे संतोषून
हालावया तेथून ।
न होय भान सर्वथा ॥
हेचि निरुपाधिक ।
जाणावें नित्य सुख ।
याहूनि नसे अधिक ।
त्रिभुवनी सुख सर्वथा ।
( ३२.८०-९८ )

याच 'श्रीदत्तमाहात्म्य' ग्रंथात श्रीदत्तात्रेयांनी सहस्रार्जुनास अष्टांगयोगाचे सविस्तर मार्गदर्शन केल्याचे वर्णन चौदाव्या अध्यायात आले आहे. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार इत्यादी विविध अंगांची सुबोध ओळख येथे आहे. नाना प्रकारची आसनें, प्राणायामाचा अभ्यास, कुंभक-पूरक-रेचक, विविध बंध, उन्मनी अवस्था, सविकल्प समाधी, तुर्यावस्था इत्यादींचे वर्णन करून म्हटले आहे; 'अर्जुना असा हा योग। वारी सर्व उद्वेग । करी दुःखाचा वियोग । जीव-ब्रह्मयोग करी ॥' (१४.१०८)

दत्तपंथीयांना प्रमाण वाटणाऱ्या अनेक ग्रंथांतून योगमार्गातील या आचारधर्माचे विवरण आढळून येईल. जाबालदर्शनोपनिषद् हा एक लहानसा भाग मूळ स्वरूपात ग्रंथाच्या उत्तरार्धात दिलेलाच आहे. भगवान दत्तात्रेयांचा एक प्रख्यात शिष्य सांकृती 'अथवा रंतिदेव यालाही जीवन्मुक्त होण्यासाठी श्रीदत्तांनी अष्टांगयोगाचाच उपदेश दिला. परंपरागत अशा योगाचरणाचे जाबालदर्शनातील मथितार्थ सदाशिव कृष्ण फडके यांच्या शब्दांत असा आहे.

'अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, दया, आर्जव, क्षमा, धृती, मिताहार आणि शौच हे दहा यम होत. अहिंसा–वेदोक्त प्रकारावाचून काया, वाचा, मनाने केलेली जी हिंसा तीच हिंसा. (अर्थात् वेदोक्त प्रकाराने होणारी हिंसा नव्हे.) व्याख्या दुसरी. आत्मा हा सर्वज्ञ असून तो अच्छेद्य आहे, कोणालाही तो ग्रहण करता येणार नाही अशी जी बुद्धी, ती श्रेष्ठ अहिंसा होय. सत्य–चक्षुरादिक इंद्रियांच्या योगाने जसे दृष्ट, श्रुत किंवा वास घेतलेले असेल त्याचेच प्रतिपादन करणे हें सत्य होय. ते केव्हाही अन्यथा होत नाही. व्याख्या दुसरी–सर्वव्यापी जे परब्रह्म तेच सत्य आहे, दुसरे काही एक सत्य नाही, अशी जी बुद्धी ते श्रेष्ठ सत्य होय. अस्तेय–दुसऱ्याच्या मालकीचे तृण रत्न, कांचन, मौक्तिक काही असो, त्याविषयी जी मनाची निवृत्ती ते अस्तेय होय. व्याख्या दुसरी–आत्म्याच्या ठिकाणी अनात्मभावाने होणारा जो व्यवहार त्याचे वर्जन किंवा राहित्य हे खरे अस्तेय होय. ब्रह्मचर्य–काया-वाचा-मनाने परस्त्रीचे परिवर्जन आणि ऋतुकाळी स्वभार्यागमन हे ब्रह्मचर्य होय. व्याख्या दुसरी–ब्रह्मभावात मनाचा संचार हे ब्रह्मचर्य. आर्जव–पुत्र, मित्र, कलत्र, शत्रू व स्वतः यांच्या ठिकाणी जें निरंतर एकरूप वर्तन ते आर्जव होय. दया–काया-वाचा-मनाने सर्व भूतांच्या ठिकाणी स्वतःप्रमाणे जे वर्तन ती दया. क्षमा–शत्रूकडून पीडित झाला असता काया-वाचा-मनाने बुद्धिक्षोभापासून जी निवृत्ति ती क्षमा होय.

धृती:–संसाराचा निःशेष मोक्ष वेदापासूनच होईल, दुसऱ्या कशानेंही नाही, अशी जी बुद्धी तिला वैदिक धृती म्हणतात. व्याख्या दुसरी–

मी आत्मा आहे, दुसरा कोणीही नाही, अशी जी निश्चित बुद्धी ती धृती होय. मितभोजन–थोडे आणि चांगले अशा प्रकारच्या अन्नाने योगाला अनुसरून पोटातील चतुर्थांश भाग रिकामा ठेवून जे भोजन ते मितभोजन होय. शौच–माती आणि पाणी यांच्या योगाने शरीराच्या मलाचा जो निरास हे बाह्य शौच होय. मनन करणे हे अंत:शौच होय. व्याख्या दुसरी-मी शुद्ध आहे अशा प्रकारचे ज्ञान ते शौच होय. ज्ञानरूप शुद्धतेचा त्याग करून जो बाह्यशुद्धीत रममाण होतो, तो मूर्ख सुवर्ण टाकून मातीचाच गोळा घेतो. ज्ञानरूप अमृताने तृप्त आणि कृतकृत्य अशा योग्याला कोणतेही कर्तव्य शिल्लक रहात नाही. जर शिल्लक रहात असेल तर तो तत्त्ववेत्ता नव्हे. आत्मवेत्त्या मानवाना त्रैलोक्यातही काही कर्तव्य असत नाही म्हणून हे मुने, सर्व प्रयत्नाने अहिंसादी साधनांच्या योगाने वेदनरूप ज्ञानाने अक्षर आणि ब्रह्मरूप अशा आत्म्याला जाण.

तप, संतोष, आस्तिक्य, दान, ईश्वरपूजन, सिद्धान्तश्रवण, लज्जा, मती, जप, व्रत हे नियम होत. तप :–वेदोक्त प्रकाराने कृच्छ्रचान्द्रायणादी प्रायश्चित्ताच्या योगाने शरीरशोषण ते तप होय. व्याख्या दुसरी–मोक्ष हा काय आहे ? तो मज संसाऱ्याला कशाने प्राप्त होईल ? अशा प्रकारचे जे चिंतन ते तप होय. संतोष–सहज प्राप्त झालेल्या लाभाने जी नित्य तृप्ती मानवाना प्राप्त होते, त्याला प्राज्ञ संतोष म्हणतात. व्याख्या दुसरी-ब्रह्मादी लोकापर्यंत विरक्तीच्या योगाने जे प्राप्त होईल तेच प्रिय होय, असे मानणे आणि कोठेही प्रेम न ठेवणे याचे नाव परमसंतोष होय. आस्तिक्य–श्रौत–स्मार्त कर्मावर विश्वास. दान–न्यायाने संपादन केलेले धन किंवा दुसरी वस्तू याप्रमाणे श्रात अशा वैदिक पुरुषास जे श्रद्धेने दिले जाते ते दान होय. ईश्वरपूजन–रागादी दोषानी रहित असे हृदय, अनृतादी दोषानी अदुष्ट अशी वाणी आणि हिंसादी दोषानी रहित कर्म, हे ईश्वरपूजन होय. सिद्धान्तश्रवण–सत्य, ज्ञान, अनंत, परमानंद, परध्रुव एतद्रूप आत्मा जाणण्यास योग्य आहे हे सिद्धान्तश्रवण होय. लज्जा ( ऱ्ही ) वैदिक मार्गात आणि लौकिक मार्गात जे विहित कर्म असेल, त्याविषयीची जी लज्जा ती ऱ्ही होय. मती–सर्वही वैदिक मार्गाविषयीची जी श्रद्धा ती मती. जप–केवळ वेदोक्त मार्गानेच जो मन्त्राभ्यास त्याला जप म्हणावे. व्याख्या दुसरी–कल्पसूत्र, वेद, धर्मशास्त्र, पुराण आणि इतिहास यामध्ये जी वृत्ती अथवा यांचे जे वाचन तो जप होय. जपाचे वाचिक आणि मानस असे दोन प्रकार आहेत. वाचिकात उपांशू व मोठ्याने असे दोन प्रकार आहेत. मानसिक जपातही मनन आणि ध्यान असे दोन प्रकार आहेत. मोठ्याने जप करण्यापेक्षा उपांशूचे महत्त्व सहस्रपट आहे आणि उपांशूपेक्षा मानस जप सहस्रपट आहे मोठ्याने केलेल्या जपाचे शास्त्रोक्त फल मिळतेच. पण चांडालिकाच्या कानी पडल्यास ते कर्म निष्फल होते. यानंतर आसन-प्राणायाम यांची माहिती दिली आहे त्या गोष्टी गुरुसान्निध्यानेच करणे योग्य असल्यामुळे त्यांचा सारांश येथे देत नाही. पुढे प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधी यांच्या व्याख्या दिल्या आहेत. त्या अशा :–

प्रत्याहार–विषयामध्ये स्वभावतः इंद्रियांचा संचार होऊ लागला असता त्यांचे जबरदस्तीने आकर्षण करणे हा प्रत्याहार होय. व्याख्या दुसरी–जे पाहातो ते सर्व ब्रह्म असा निश्चय असणे हा प्रत्याहार होय व्याख्या तिसरी-जन्माला आल्यापासून मरेपर्यंत जे जे शुद्ध किंवा अशुद्ध कर्म करतो ते सर्व ब्रह्मार्पण करणे हा प्रत्याहार होय. व्याख्या चवथी-नित्य किंवा काम्य कर्मे ब्रह्माराधन-बुद्धीने करणे हा प्रत्याहार होय. व्याख्या पाचवी–शरीरातील एका स्थानापासून दुसऱ्या स्थानी शास्त्रोक्त रीतीने वायू नेणे हा एक प्रत्याहार होय. धारणा–देहान्तर्गत आकाशात बाह्य

आकाशाची धारणा करणे, प्राणात वाह्य वायू, उदरगत अग्नीत वाह्य अग्नी, अतर्जलात वाह्य जल, अतर्गत पृथ्वीतत्त्वात वाह्यभूमी, अशी धारणा करणे व ती ह, य, व, र, ल असा पच वर्णात्मक मन्त्र उच्चारित करणे हे पापविनाशक आहे आपल्या ठिकाणी सर्वांचा शास्ता वोधरूप व आनदरूप असा जो शिव त्याची सर्व पापाची शुद्धी होण्याकरिता बुद्धिमान् माणसानी धारण करावी ब्रह्मदेवादी सर्व कार्यस्वरूपे आपापल्या कारणात उपसहृत करुन सर्वांचे कारण अनिरूपणीय अचेतन असे जे अव्यक्त त्याची सपूर्ण अशा साक्षात् आत्म्याच्या ठिकाणी मनासह इद्रियाची योजना करावी ध्यान–ऋत, सत्य, परब्रह्म, सर्वससारभजक विश्वरूप, विरूपाक्ष महेश्वर, तोच मी असे आदराने ध्यान करावे समाधी–पर आणि जीव याचे जे एकत्व त्याला उद्देशून जी ज्ञानाची उत्पत्ती ती समाधी होय

योगी किंवा सिद्ध यास योगमार्गाच्या आचारात प्रगती साधता आली की त्याला अनेक प्रकारचे नाद ऐकू येतात तेजाच्या या प्रकाशाच्या खुणा दिसू लागतात भ्रूमध्यात कधी तेजोराशी दिसू लागते डोळ्याच्या मध्यभागी निळे तेज प्रकट होते तारकब्रह्माचे ध्यान साधले की, निळा, हिरवा, तावडा, पिवळा अशा रगाचे दर्शन होते या रगावरोवरच काही नादही योग्यास ऐकू येऊ लागतात हठयोगात या नादाची साधना सागितलेली आहे अनाहत नाद हा अव्यय व परमश्रेष्ठ असून त्यास मूर्तिमत शब्दब्रह्म मानले आहे त्याचा आवाज तैलधारेप्रमाणे अखड व घटानादाइतका मोठा असतो चिणी, चिचणी, घटा, शख, तत्री, ताला, वेणू, भेरी, मृदग, मेघनाद असे नादाचे दहा प्रकार हसोपनिपदात सागितले आहेत वेकानाद, निर्झर, समुद्राचा आवाज, वीणानाद, भ्रमरनाद इत्यादीचे वर्णन नादबिंदूपनिपदात आले आहे

नाद व बिंदू याच्या साधनेचा मार्ग नव्य उपनिपदातून स्पष्ट केला आहे नादतत्त्व बिंदूपेक्षाही सूक्ष्म असल्याचे योगशिखोपनिपदात सागितले आहे आघातावाचून उमटणारा व केवळ योग्यानाच ऐकू येणारा नाद अनाहतनाद म्हणून प्रसिद्ध आहे जागृत कुडलिनीच्या ऊर्ध्वगतीच्या रोखामुळे उत्पन्न होणाऱ्या स्फोटाला नाद म्हणतात हाच नाद उपाधियुक्त झाला की सात स्वरात विभक्त होतो या नादानुसधानाचे विस्तृत विवेचन हठयोगात येते नादाच्या अभ्यासाने योग्याचे चित्त एकाग्र होते या अनाहत नादाची अनुभूती स्थूलातून सूक्ष्मात नेते नादाच्या दुसऱ्या प्रकारात आघाताचा सबध आहे कशावर तरी आघात केल्याने हा नाद, आहत नाद उत्पन्न होतो सगीतशास्त्रात याच नादास महत्त्व आहे योगी माणसाच्या अभ्यासामुळे हा आहत नाद त्याच्या देहातही अनुभवास येतो हृदयप्रदेशात असलेल्या अनाहतचक्रात वायू आणि अग्नी याच्या सयुक्त आघाताने आहत नादाची उत्पत्ती होते नाभी, हृदय, कठ, मुख व शिर या पाच स्थानी होणारा नाद हा भिन्न भिन्न असतो मद, मध्य, तार अशी नादाची नावेही प्रसिद्ध आहेत

अनाहत व आहत नादाच्या अभ्यासास योगात फारच महत्त्व आहे अनाहत ध्वनीचे अनेक प्रकार असल्याचे 'अनाहताख्यो वहुभि प्रकारैं । अन्त प्रवर्तेत सदा निनाद ।' असे शकराचार्य 'योगतारावली' ग्रथात सागतात ध्यानयोग नीट साधू लागला की, योग्यास हा नाद ऐकू येऊ लागतो नामस्मरणाच्या गजरात चित्त तल्लीन झाले तरी हा नाद ऐकू येईल 'सहस्रदलामधून अनुहात ध्वनि उठी । नामाचेनि गजरे रिघाली कपाटी ॥' अशी नामदेवाची साक्ष आहे मुक्ताई चागदेवास याच नादाच्या अनुसधानाचा उपदेश करताना म्हणते, 'निजी निज वाळा न करी आळी । अनुहत टाळी वाजवीते ॥ सोह सोह हाचि धरी छद । सुखें निद्रा अद्वैती रे ॥'

आणि मुक्ताईच्या म्हणण्याप्रमाणे चांगदेवांना अनुभवही आला.

'रुणझुण रुणझुण किनारी वाजे । येणेंचि आनंद त्रिभुवन गाजे । चांगावटेश्वर नादीं निजला । ब्रह्म पाहतां ब्रह्मचि जाहला ॥' असे त्यांनी म्हटले आहे. 'सोहं ज्योति उभारली' की 'अनुहात घंटा श्रवणीं । ऐकून विस्मित झाली जनी ॥' अशी अवस्था जनाबाईने वर्णन केली आहे. 'धिं धिं तुरे वाजती । अनुहत ध्वनि गर्जति' अशी नामदेवांची व 'जय जय झनकत जय जय झनकत । अनुहात जंगट नाद गर्जे ॥' अशी गोरा कुंभाराची साक्ष आहे.

'नादबिंदूपनिषद्' या एका नव्य उपनिषदात योग्यास ऐकू येणाऱ्या विविध नादांचे वर्णन करताना म्हटले आहे,

> आदौ जलधिजीमूतभेरीनिर्झरसम्भवः ।
> मध्ये मर्दलशब्दाभो घण्टाकाहलजस्तथा ॥
> अन्ते तु किङ्किणीवंशवीणाभ्रमरनिः स्वनः ।
> इति नानाविधा नादाः श्रूयन्ते सूक्ष्मसूक्ष्मतः ॥

प्रथम समुद्राची गर्जना, मेघांचा गडगडाट, भेरीचा आवाज, निर्झराची झुळझुळ, यांसारखे आवाज; मग नगारा, घंटा, कासाळू यांच्या आवाजासारखे नाद आणि शेवटी क्षुद्र घंटा, वेणू, वीणा, भ्रमर यांच्या आवाजासारखे ध्वनी; असे हे अनेक प्रकारचे सूक्ष्मातिसूक्ष्म नाद आहेत. दत्तपंथातील अनेक साधकांना व सिद्धांना या विविध नादांचा आणि रंगांचा अनुभव नित्य येत असतो.

दत्तपंथातील आचारधर्मात महत्त्वाचे अंग बनून राहिलेल्या या योगसाधनेमुळे नाना प्रकारच्या सिद्धी प्राप्त होतात. अनेक दत्तभक्त व अवलिये, सिद्ध पुरुष व महंत यांच्या अद्भुत आचरणाचे मर्म त्यांच्या योगसिद्धीत सापडण्यासारखे आहे. शरीराला मेरूसारखे स्थैर्य व पुष्टी यांची प्राप्ती गरिमा सिद्धीत होते. हलके झालेले शरीर वर आकाशात तरंगू लागून आकाशगमन सिद्धी साध्य होते. आकाशात संचारणाऱ्या सिद्धांचेही दर्शन कधी कधी होते. परकायाप्रवेश करण्याची सिद्धी काहीना प्राप्त होते. दूरदर्शन सिद्धीमुळे शेकडो योजनांपलीकडचे योग्यास दिसू लागते. पर्वतासारखे मोठे व तृणासारखे लहान बनण्याच्या सिद्धींना गरिमा व अणिमा अशी नावे आहेत. त्रिकालज्ञान सिद्धी, भूतजन्मादिस्मरणा सिद्धी, सत्यसंकल्पतासिद्धी अशा अनेक सिद्धींची प्राप्ती योगाचारात होत राहाते योग्याचे शरीर कांतीने सोन्याचे पण वजनाने वायूचे बनते. ज्ञानेश्वरांनी या सिद्ध योग्याचे वर्णन करताना म्हटले आहे, 'त्याला समुद्रापलीकडचे दिसते, स्वर्गीचे नाद ऐकू येतात आणि मुंगीचे मनोगत तो जाणू शकतो. तो वाऱ्याच्या घोड्यावर स्वार होतो, पाण्यावरून तो गेला तर त्याच्या पावलांना पाण्याचा स्पर्श होत नाही.' वि. म. भट यांनी या योगसिद्धीचा वस्तुनिष्ठ असा विचार आपल्या 'योगसिद्धी आणि ईश्वरसाक्षात्कार' या ग्रंथात केला आहे. अर्थात् या सिद्धींना खरा साक्षात्कारी पुरुष महत्त्व देत नाही हे दत्तपंथीयांनाही मान्य आहे.

## जीवन्मुक्ताचा आचार

ज्ञान, भक्ती, योग अशा कोणत्याही मार्गाने का होईना, पण ईश्वरी साक्षात्कार झालेल्याचा आचार कसा असतो ? जीवन्मुक्ताच्या आचाराचे स्वरूप कसे असते? जीवन्मुक्त म्हणजे तरी कोण? अशा प्रश्नांची उत्तरे शोधताना प्रथमच लक्षात येते ते असे की, याच देहाने ज्याने परमेश्वरास जाणले, हृदयस्थ परमात्म्याचा ज्याला साक्षात्कार झाला, देहधारी असला तरी ज्याचे चित्त सतत ईश्वरमय झालेले असते अशाला जीवन्मुक्त म्हणावयास हरकत नाही. सिद्ध पुरुषाची ही एक सर्वोत्तम अशी अवस्था आहे. 'जीवन्नेव

मुक्तः आत्मज्ञानेन मायाबंधरहितः ' अशी व्याख्या शब्दकल्पद्रुमात केलेली आहे. जिवंतपणी जो आत्मज्ञानाने मायापाशरहित होऊन मुक्त होतो त्यास जीवन्मुक्त म्हणावे. त्याला अंतिम तत्त्वाचा साक्षात्कार झाला असला तरी तो देहाने वावरत असतो. त्याचे रागलोभ संपलेले असतात. भगवद्गीतेने या पुरुषाचे वर्णन स्थितप्रज्ञ, कर्मयोगी, ज्ञानी, योगारूढ, भक्त, गुणातीत, दैवी संपद्युक्त, ब्रह्मभूत इत्यादी शब्दांनी करून या अवस्थेची विस्तृत लक्षणेही दिलेली आहेत. ज्ञानेश्वरांनी प्राकृत भाषेत स्थितप्रज्ञ, ज्ञानी, भक्त यांच्या आचारासंबंधी विस्तृतपणे भाष्य केलेले दिसून येते. वसिष्ठांनी जीवन्मुक्ताचे वर्णन करताना म्हटले आहे, 'यो जागर्ति सुषुप्तिस्थो यस्य जाग्रन्न विद्यते । यस्य निर्वासनो बोधः स जीव्नमुक्त उच्यते ॥' इंद्रियांचा लय झालेला नसल्यामुळे जो जागत असतो, पण विषयांचे ग्रहण करीत नाही, म्हणून त्याला निजला आहे असे म्हणतात; तसेच सामान्य लोकांप्रमाणे ज्याची जागृत अवस्था नसते व ज्याचे ज्ञान वासनाशून्य असते, त्याला जीवन्मुक्त म्हणतात.

दत्तपंथात अशा जीवन्मुक्ताला फारच महत्त्व आहे. योगी, सिद्ध, महात्मा, महंत, अवधूत अवलिया, भक्त, ज्ञानी अशा विविध नावांनी ओळखल्या जाणाऱ्या या श्रेष्ठ पुरुषाच्या आचाराचे वर्णनही सांप्रदायिक ग्रंथांतून सापडते. अवधूतोपनिषदाच्या पहिल्या दोन श्लोकांत अशा पुरुषाचे वर्णन केले आहे. 'अक्षरत्वाद्वरेण्यत्वाद्धूतसंसारबंधनात् । तत्त्वमस्यादिलक्ष्यत्वादवधूत इतीर्यते । यो विलङ्घ्याश्रमान्वर्णानात्मन्येवस्थित सदा । अतिवर्णाश्रमी योगी अवधूतः स कथ्यते ॥ '— अविनाशित्व, श्रेष्ठत्व, संसाराच्या पाशातून मुक्तता श्रुतिवचनाची मर्मज्ञता, वर्णाश्रमधर्माचे बंधन नसणे, आत्मनिष्ठता, अखंडयोग इत्यादी लक्षणांनी अवधूत आपल्याच नादात मग्न असतो. दत्तपंथात या योगी अवधूतांच्या वर्तनाच्या अनेक लीला वर्णन केलेल्या आहेत. या योगी, सिद्ध वा अवधूताच्या वेषाचा विचार आपण मागेच केला आहे. स्वतः दत्तात्रेयही द्विज, मलंग, योगी, फकीर अशा रूपांनी प्रकट होताना दिसतात. व्याघ्ररूपाने त्यांनी अनेकांना दर्शने दिलेली आहेत. दत्तपंथीय ग्रंथांच्या आधाराने या सिद्धांच्या वा अवधूतांच्या आचाराचे थोडक्यात दर्शन घेऊ.

'अवधूतगीता' हा दत्तप्रणीत ग्रंथ असल्याचे आपणास माहित झाले आहेच. या ग्रंथात अवधूताची वा जीवन्मुक्ताची लक्षणे अनेक ठिकाणी आली आहेत. सिद्ध अवधूत आपल्याच स्वरूपात मग्न असतो. रस्त्यात पडलेल्या चिंध्यांची गोधडी करून तो वापरतो. पापपुण्यरहित असा हा अवधूतसिद्ध मोकळ्या म्हणजे रिकाम्या घरात निवास करतो. लक्ष्य व अलक्ष्य यांपासून वेगळा असणारा हा पुरुष योगातच नेहमी मग्न राहातो. कोणाशीही वादविवाद न करता तो आपल्याच स्वरूपात दंग असतो. आशारूपी पाशापासून तो मुक्त असतो. त्याला कोणतीच बंधने नसतात. बाहेरच्या शौच म्हणजे निर्मळपणापासून तो मुक्त असतो; कारण तो नेहमीच आत्मानंदात रमलेला असतो. त्याला स्वतःच्या शरीराचेही भान नसते. तो कोणावर रागावत नाही की कोणावर प्रेम करीत नाही. त्याचे चित्त आकाशाप्रमाणे व्यापक असून त्याच्या ठिकाणी फारसे चलनवलनही संभवत नाही. रूपवान वा कुरूप असे त्याचे वर्णन करता येत नाही. त्याला देहभान नसल्यामुळे देहाच्या विषयाचीही जाणीव नसते. त्याला संयोग नाही की वियोग नाही. तो संग व भोग याविरहित असतो जगातील कोणत्याही पदार्थाबद्दल त्याला आसक्ती वाटत नाही. त्याला जन्ममरणाचीही पर्वा नसते. ध्यान करणे वा न करणे हे त्याला सारखेच असते. त्याला मोक्षाचीही इच्छा नसते.

तो निष्काम असल्यामुळे त्याला बाह्य विषयाची इच्छाच होत नाही. त्याचे चित्त

अतिशय कोवळे असते. तो पवित्र आचरण करतो, तो कोणत्याही वस्तूचा संग्रह करीत नाही. त्याचे जेवण अल्प असते. त्यांची वृत्ती शांत व बुद्धी स्थिर असते त्याचे बोलणेही फार नसते. तो नेहमी सावध असतो. त्याने षड्विकाराना जिंकलेले असते. तो सर्वांशी मित्रभावाने वागत असतो. सर्वांवर तो कृपाच करतो. जागृती, स्वप्न, सुषुप्ती अशा अवस्थात त्याचे चित्त कधीही विकारवश नसते. भूत, भविष्य व वर्तमान अशा तीनही काळात त्याचे चित्त शुद्धच असते. त्याचे चित्त वासनारहित असते. त्याच्या सर्वांगावर माती किंवा धूळ पसरलेली असते. दैवी संपत्तीच्या योगाने त्याचे चित्त शुद्ध झालेले असते. त्याचे चित्त पापरहित असते. तो नेहमीच आत्मचिंतनात रमलेला असल्याने सांसारिक गोष्टींची चिंता त्याला नसते. स्त्रीलोभ त्याला कधीच नसतो.

अवधूताच्या अवस्थेचे आणि वर्तनाचे वर्णन गोरक्षनाथकृत 'सिद्धसिद्धान्तपद्धति' या ग्रंथात विस्ताराने आले असल्याचे आपण मागे पृष्ठ १३६ वर पाहिले आहेच 'जीवन्मुक्तगीता' हाही एक ग्रंथ श्रीदत्तात्रेयप्रणीत मानला जातो. नुकतेच दिवंगत झालेले म्हैसूरचे महाराज जयचामराजेंद्र वाडियार यांनी आपल्या दत्तात्रेय : दि वे ॲण्ड दि गोल या नावाच्या विवेचक ग्रंथात 'दत्तात्रेय दि स्पिरिच्युअल डिसिप्लीन' नावाच्या तिसऱ्या प्रकरणात या 'जीवन्मुक्तगीता' ग्रंथावर विस्तृत असे विवेचक भाष्य केले आहे. या गीतेच्या आधाराने म. स. पारखे यांनी आपल्या 'श्रीविद्येचे आचार्यवर्य श्रीअवधूतदत्तात्रेय' या नावाच्या लहानशा पुस्तिकेत जीवन्मुक्ताच्या वर्तनाचे थोडक्यात वर्णन केले आहे ते असे—

जीवन्मुक्तिश्च या मुक्ति. सा मुक्ति. पिण्डपातने।
या मुक्तिः पिण्डपतने सा मुक्ति. शुनि सूकरे ।।
(जीवन्मुक्तगीता २)

तिये नांव जीवन्मुक्ति । जियेची सदेही अनुभूति ।
पिंडपतनानंतर मुक्ति । श्वानसूकर अनुभवति ।।

पार्थिव देहात वावरत असतानाच ज्याला मुक्तावस्था प्राप्त झाली आहे तोच खरा जीवन्मुक्त होय. पार्थिव देहाचे विसर्जन म्हणजे मुक्ती नव्हे. नाही तर ती श्वानसूकराच्या मुक्तिसारखीच होईल. देह धारण केला असतानाच जीवन्मुक्त अवस्था येऊ शकते. आणि ती अवस्था सर्वसाधारण पार्थिव देहविसर्जनाच्या कल्पनेपेक्षा कशी निराळी आहे हे जीवन्मुक्तच अनुभवू शकतात. क्वचित् प्राप्त होणारी अशी ही अवस्था असून योग्याना व सिद्धानाच ते भाग्य लाभते. अर्थात् जीवन्मुक्तावस्थेची तत्त्वप्रणाली वेदोपनिषदादी वाङ्मयातूनही आपणाला धुंडाळता येते. उपाधीपासून विमोचन हेच सदेह मुक्तावस्थेचे लक्षण होय. साधकाच्या मनोळेवणीचे मोठे मार्मिक वर्णन करून त्यातूनही एका गीतात त्यानी जीवन्मुक्तावस्था वर्णन केली आहे.

कर्मेंद्रियपरित्यागी ध्यानवर्जितचेतसः ।
आत्मज्ञानी तथैवैको जीवन्मुक्तः स उच्यते ।।
(जीवन्मुक्तगीता ८)

कर्मेंद्रियें व्यापाररहित ।
आणि तैसेचि ध्यानवर्जित चित्त ।
करूनि आत्मानुभवी स्थित ।
तया नाव जीवन्मुक्त ।।

माणसाचे मन हे बंधनाच्या पलीकडे असते. पापणीचे पाते लवण्यापूर्वी त्याला पृथ्वीप्रदक्षणा करता येते. वैचित्र्याने भरलेल्या या जगात मानवाच्या मनाच्या उडचा अगर तो करीत असलेल्या क्रिया या तितक्याच विचित्र असतात. ज्या वेळेला हे सर्व मनादी इंद्रियांचे व्यापार स्थिरावतात आणि मन निर्विकार होते त्याच वेळेला तो जीव आत्मानुभवामध्ये रंगू लागतो. अशी स्थिती प्राप्त होणे हीच जीवन्मुक्तावस्था.

शारीरं केवलं कर्म शोकमोहादिवर्जितम् ।
शुभाशुभपरित्यागी जीवन्मुक्त स उच्यते ॥
(जीवन्मुक्तगीता ९)

केवळ शरीरपरिरक्षणार्थ ।
कर्म शोकमोहादिवर्जित ॥
शुभाशुभ परित्यजित ।
तया नाव जीवन्मुक्त ॥

शोक आणि मोह यापासून जो मोकळा आहे, शुभाशुभाचा ज्याला विषाद आणि आनंदही नाही तो जीवन्मुक्त होय ही शिकवण देत असताना श्रुतिस्मृतीतील शिकवणच दत्तात्रेयांनी पटवून देण्याचा प्रयत्न केला आहे अशा रीतीने प्रत्येक गीतातून जीवन्मुक्तावस्थेची महती गात गात व मार्ग सांगत सांगत अवधूत साधकाच्या मनाची बैठक तयार करून घेतात असेच म्हणावे लागेल

अभ्यासे रमते नित्यं मनो ध्यानलयं गतम् ।
बन्धमोक्षद्वयं नास्ति जीवन्मुक्त स उच्यते ॥
(जीवन्मुक्तगीता १६)

जयाचे मन अभ्यासी रमते ।
तैसेचि ध्यानी लय पावते ।
जया बंधमोक्षाचे द्वंद्व नसते ।
तया नाव जीवन्मुक्त ॥

साधकाची स्थिती कोणती व्हावयास पाहिजे याचे अगदी कमी पण नेमक्या शब्दात अत्यंत मार्मिक वर्णन आपण या गीतात पाहू शकतो

श्रीवासुदेवानंद सरस्वतींनी आपल्या 'श्रीदत्तमाहात्म्य' या ग्रंथातही श्रीदत्तात्रेयांनी सहस्रार्जुन, परशुराम, अलर्क, आयू, यदु, इत्यादिकांना उपदेश करून कर्मप्रवृत्त केले असल्याचे दर्शविले आहे दत्तकृपा झाल्यानंतर प्राप्त कर्तव्ये करणाऱ्यांची परंपरा फार मोठी अगदी वासुदेव बळवंत फडके अथवा अण्णासाहेब पटवर्धनापर्यंतची आहे 'श्रीदत्तमाहात्म्या'च्या बत्तिसाव्या अध्यायात अलर्कास कर्मयोगाचे महत्त्व दत्तात्रेयांनी पटवून दिल्याचे वर्णन आहे. सोळाव्या अध्यायात ज्ञानी झालेल्या कार्तवीर्याने परोपकारार्थ आश्रमधर्माने वागण्याचा उपदेश करताना दत्तात्रेय दिसतात याच अध्यायात जीवन्मुक्ताच्या व्यवहारासंबंधी वर्णन आले आहे 'जे असती मुक्त । ते कोठेंही न होती सक्त । त्यांना करी अनुरक्त । अशी वस्तु जगी नाही ॥ सूर्य होता शीतल । उष्ण होता चंद्रमण्डल । अधोभागी पसरता अनल । न मानी नवल जीवन्मुक्त ॥ जसी कुग्रामललना । नागरी कांताच्या मना । न रमवी तसें मुक्तजना । न रमवी जनामाजी कोणी ॥ माझा जो म्हणावा । तो मुळीच न होयी ठावा । ज्याचा हा मी म्हणावा । त्याचे नावा नेणेची ॥ असा मुक्ताचा सिद्धान्त । मी तू पणाची नसे मात । तसा तूही सतत । राहें यावत् प्रारब्ध ॥' ( १६ २९–३३ ) अशा या जीवन्मुक्ताप्रमाणे कार्तवीर्याने वर्तावे असे सांगून दत्तात्रेय पुन म्हणतात, 'श्रेष्ठ करी जसा आचार । पाहुनी तसा वागे इतर । जे प्रमाण मानी थोर । वागें इतर तदनुसारें ॥ येणे न होय अतिप्रसंग । बालासमान व्हावे असंग । गुणबुद्धीचा करूनी त्याग । वागता व्यंग काय होय? ॥ जो आत्मरती आत्मतृप्त । आत्मरूपी संतुष्ट । त्याचे कार्य न अवशिष्ट । हें सर्व शिष्ट जाणती ॥ करिता पुण्य त्याणें । न लगे स्वर्गाप्रती जाणें । पापही करिता त्याणें । नरकी जाणे न घडेल ॥ तथापी हेंची बरवें । पुण्यमार्गा अनुसरावे । चित्तीं लक्ष्य धरावे । लोकी वागावे असंगत्वें ॥' ( १६ ३४–३८)

तांत्रिक व शाक्त यांच्या सहवासानें दत्तपरंपरेत काही विपरीत गोष्टी शिरल्याचे आपण मागे पाहिलेच आहे नग्नस्त्रीसहवास मद्यपान, अभक्ष्यभक्षण, विपरीत वर्तन, घृणास्पद आचारविचार इत्यादींची बाधा दत्तपंथासही फार झालेली दिसते पिसाट वृत्ती, बालभाव दत्तावधूतात दिसतो अनेक भक्तांचे आचार असेच वाटतात. परंतु यामागे निरलस व निष्काम वृत्ती आहे हे

ध्यानात ठेवले पाहिजे श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रीकरांनी 'बालोन्मत्त पिशाच योगी। भोगी धूलिधूसरितांगी –' दत्ताचे वर्णन अनेक पदांतून केले आहे 'योगी भोगी यति फकीर नग्न ब्रह्मचारी। अनंतरूपे दासा भेटे प्रेमें श्रीनरहरी' असे त्यांनी वर्णन केले असले तरी या नग्नपणाचे वा पिसेपणाचे सहज अनुकरण करता येणे अवघड आहे 'सहज पिसेपण मिरवीत आपण। खेळवी भक्तमेळा।' अथवा 'जनी वेड पांघरूनीया। जड मूढ जना उद्धरी' अशा कर्तृत्वाच्या दत्तात्रेयाचे वा अवधूताचे अनुकरण केवळ आचारातही करण्यासाठी फार मोठी उच्च अवस्था गाठावी लागते तसे पाहिले तर श्रीदत्तात्रेयांनी स्त्रीदेह व स्त्रीसंग याचे यथार्थ स्वरूप अवधूतगीतेत वर्णन केले असल्याचे आपण पाहिले आहेच 'मद्यपान महापापम्' असाही संदेश याच अवधूतगीतेच्या शेवटी दत्तात्रेयांनी दिलेला मान आपण विसरतो

अंगी ब्रह्मभाव न बाणता, आत्मस्थितीचे ज्ञान अनुभवास न येता जे केवळ बाह्य आचाराचे चाळे करतात, त्यांचा निषेधच थोर साक्षात्कारी पुरुषांनी केलेला दिसून येतो या दृष्टीने श्रीगोरक्षनाथाच्या नावावर असलेल्या 'अमनस्क-योग' या ग्रंथातील एक दोन श्लोकांचा उल्लेख येथे करण्यासारखा आहे बाह्य वेष आणि बाह्याचार याचा व्यर्थपणा दाखविण्यासाठी श्रीगोरक्षनाथांनी म्हटले आहे–

एकदण्डत्रिदण्डादि जटाभस्मादिकं तथा।
केशमुंचननग्नत्वे रक्तचीवरधारणम् ॥
उन्मत्ततामभोज्यान्नपानं पाखण्डवृत्तिता।
इत्यादिलिंगग्रहणं नानादर्शन दशनम् ॥
(उत्तरार्ध ३५-३६)

कोणी एक दंडधारी असतो, तर कोणी त्रिदंड धारण करतो कोणी जटाधारी असतो, तर कोणी सर्वांगावर भस्म चर्चितो कोणी डोक्याचे मुंडन करतो, तर कोणी सतत नग्न म्हणजे दिगंबर-अवस्थेत वावरतो, तर कोणी रक्तवस्त्र धारण करणारा असतो कोणी उन्मत्तपणे स्वैर संचार करतात, तर कोणी अभक्ष्यभक्षण, अपेयपान करून पाखंडी असतो अशा प्रकारे केवळ बाह्य लिंगाचे म्हणजे चिन्हाचे ग्रहण केवळ प्रदर्शनासाठी असते श्रीशंकराचार्यांच्या मताने असे लोक म्हणजे 'उदरनिमित्तं बहुकृतवेषः' याच जातीचे असतात

दत्तसंप्रदायाशी निगडित असणाऱ्या काही तान्त्रिकांची, शाक्तांची या अवलियांची वागणूक अतिशय घृणास्पद असते मूत्रविष्ठेचा, अर्वाच्य भाषेचा, दुराचाराचा, विपरीत वर्तनाचा त्यांना संकोच वाटत नाही लोकविरुद्ध अशा यांच्या आचरणाने सामान्य लोकही त्यांच्यात दैवी शक्ती असल्याचे मानतात त्यांच्यापासून लोकांनी सावध असावे म्हणून 'अमनस्कयोगा'मध्येच श्रीगोरक्षनाथांनी म्हटले आहे,

केचिन्मूत्रं पिबन्ति स्वमलमथ
तनौ केचिदुज्झन्ति लालां।
केचित्काष्ठा प्रविष्टा युवति-
भगगतं बिन्दुमूर्ध्वं नयन्ति ॥
केचित्खादन्ति धातून् अखिल-
तनुशिरावायुसंचारदक्षाः।
नैतेषां देहसिद्धीर्विगतनिज-
मनोराजयोगाद् वृते स्यात् ॥
(उत्तरार्ध ३३)

काही अघोरपंथी लोक स्वतःचे मूत्र पितात काही आपली विष्ठा भक्षण करतात काही लोक आपल्या शरीरावर राख चोपडतात. दुराचरणाच्या पराकाष्ठेच्या अवस्थेवर पोचलेले काही तरुण स्त्रियांच्या योनीतील बिंदूस वरती ओढून घेतात काही विविध प्रकारच्या धातूंचे वा रसांचे सेवन करतात, तर काही शरीरातील सर्व नाड्यांमधून वायूचा संचार करण्यामध्ये निपुण असतात परंतु या सर्वांना कार्यसिद्धी प्राप्त होत नाही कार्यसिद्धी प्राप्त होण्यासाठी अमनस्क

राजयोगाखेरीज ( ज्यात स्वत:चे मन विलीन होऊन जाते ) दुसरे साधन नाही.

## तत्कालीन संदर्भात

दत्तपंथीयाच्या आचारधर्माचे सर्वसाधारण स्वरूप आपण आतापर्यंत पाहिले. सर्वसामान्य प्रापंचिक वा व्यावसायिक आणि मोक्षमार्गी साधक वा सिद्ध यांच्या आचाराची वा वर्तनाची थोडीफार कल्पना आता आली असेल. दत्तसंप्रदायाचा मुख्य आधारग्रंथ ' श्रीगुरुचरित्र ' हा असून त्यात प्रामुख्याने आचारधर्माचेच विवेचन कथांच्या माध्यमातून श्रीनृसिंहसरस्वतींच्या संदर्भात केले आहे. हा आचारधर्म त्या काळाच्या संदर्भात विशेष महत्त्वाचा मानावा लागेल. आज त्यात जटिलता दिसते, परंतु त्या काळाच्या संदर्भात त्याचे महत्त्व अनन्यसाधारण असावे. अत्यंत प्रतिकूल अशी राजकीय परिस्थिती, परधर्मीयांची जुलमी सत्ता, ब्राह्मणवर्गाचा होत असलेला ऱ्हास, यातून मार्ग काढण्याचा फार मोठा प्रयत्न श्रीपादवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती यांनी केला. व्रतवैकल्ये व कर्मकांड आज जटिल वाटत असले तरी त्या काळात चित्तशुद्धीसाठी, मानसिक स्थैर्यासाठी व स्वाभिमानाच्या वाढीसाठी त्याचा उपयोग झाला असावा. प्रत्यक्ष यवन बादशहासही सुनावण्यास श्रीनृसिंहसरस्वती कमी करत नसत, असा उल्लेख आपण मागे पाहिलाच आहे. शुष्क तत्त्वज्ञान सांगण्यापेक्षा आचारसंहिता निर्माण करून लोकरक्षणाचे फार मोठे कार्य करणाऱ्या चौदाव्या - पंधराव्या शतकातील दत्तावताराचे मूल्यमापन करताना ल. रा. पांगारकर यांनी म्हटले आहे,

'मुसलमानी रियासतीच्या ऐन भरात नृसिंहसरस्वतींनी चातुर्वर्ण्यघटित वैदिकधर्माचे स्वतःच्या आचरणाने व उपदेशाने संरक्षण करून हिंदू व मुसलमान, ब्राह्मण व शूद्र, गृहस्थ व संन्यासी या लोकांवर आपल्या तपोनिष्ठेची व योगैश्वर्याची प्रभा पाडली व स्त्रीपुरुषांना आचारधर्माचा सोज्वळ मार्ग दाखवून दिला. त्यांनी हजारो लोकांना दु:खमुक्त केले. पंढरीचे माहात्म्य गाणगापुरास आणले ' ( मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड २, पृष्ठ ११५ ) सनातन हिंदू धर्म सर्व बाजूंनी शिथिल झाला होता. कोणीच वाली उरला नव्हता. जो होता तो परधर्मीय व जुलमी. समाजाचे पुढारीपण पत्करणारे, ज्ञानाचे, विद्येचे संवर्धन करणारे ब्राह्मणच आचाराने हीन झाले होते. समाजाचा धार्मिक बंध अशा प्रतिकूल परिस्थितीत शिथिल झाल्यामुळे अनाचारास व पापवृत्तीस वाट मोकळी झाली होती. अशा परिस्थितीत ज्ञानेश्वर-नामदेव आणि एकनाथ या दोघांच्यामध्ये आचारधर्माची मांडणी करून समाजास सावरले ते दत्तावतारी श्रीनृसिंहसरस्वतींनी. यासाठीच त्यांनी पतिव्रतेचा, विधवापणाचा आचार सांगितला. ब्राह्मणाचे आन्हिक उजळून दाखविले. व्रतवैकल्ये व तीर्थक्षेत्रे यांचा महिमा गाइला. नित्याच्या आचारप्रधान कर्मकांडाला शिस्त लावली. तत्कालीन संदर्भात या आचारधर्माचे श्रेष्ठत्व कोण अमान्य करील ?



# १० प्रमुख दत्तभक्त

## अशी चरित्रमाला



या विस्तृत प्रकरणात प्रमुख दत्तभक्तांचा संक्षेपाने परिचय करून घेऊ दत्तात्रेयाच्या पौराणिक शिष्यांची वा भक्तांची ओझरती ओळख आपण मागेच करून घेतली आहे. विवेचनाच्या ओघात कित्येक दत्तभक्तांचे संदर्भही आलेले आहेत आता या ठिकाणी महत्त्वाच्या दत्तभक्तांचा चरित्रात्मक निर्देश करावयाचा आहे काही दत्तभक्तांची महती प्रथमपासूनच इतकी वाढलेली दिसते की, त्यांना अवतारी पुरुष म्हणूनच ओळखले जाऊ लागले. श्रीपादवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती हे इतिहास-काळातले वा कलियुगातले पहिले दोन दत्ता-वतार असल्याने त्यांचा विस्तृत परिचय आपण या पूर्वीच करून घेतला आहे आता येथे ज्यांच्या नावावर अनेक दत्तक्षेत्रे वा दत्तस्थाने ओळखली जातात त्यांची प्रामुख्याने ओळख करून घेऊ त्यांच्या परंपरेत नावारूपास आलेले आणि ज्यांची वाङ्मयसंपदा उल्लेखनीय आहे अशा-चाही निर्देश येथे करावयाचा आहे काहींना साक्षात् दत्तापासून उपदेश वा साक्षात्काराचा लाभ झाला असेल तर काहींना मानवी दत्ता-वताराची परंपरा लाभलेली असेल या प्रकरणा-तील चरित्रमाला मुख्यत कालानुक्रमाने आहे प्रमाणबद्धता राखण्याचा शक्य तो प्रयत्न केला असला तरी काही अप्रसिद्ध वा दुर्मिळ दत्त-भक्तांच्या चरित्राचा मुद्दाम विस्तार केलेला आहे सर्व दत्तभक्तांची नोंदही घेणे अशक्य असले तरी आवश्यक त्या परंपरा सुटलेल्या नसाव्यात

# १. गोरक्षनाथ
## ( सुमारे ११ वे शतक )

आदि गुरू दत्तात्रेय आणि गोरक्षनाथ याचा सबध मागे आपण पाहिला आहेच भगवान दत्तात्रेय आणि सिद्धाचार्य गोरक्षनाथ याची भेट गिरनार पर्वतावर झाली असल्याचे प्रसिद्ध आहे याच ठिकाणी गोरखनाथावर दत्तात्रेयानी सिद्धि-सामर्थ्य दाखवून अनुग्रह केला आज या स्थानाला 'कमडलू तीर्थ' या नावाने महत्त्व प्राप्त झाले आहे गोरखनाथानी येथील शिखरावरील दत्त-पादुकाचे दर्शन घेतल्याची कथा प्रसिद्ध आहे दत्तानी त्याना या ठिकाणी उन्मत्त पिशाचवत् अशा दिगबर, भस्मचर्चित, जटाजूटधारी अशा स्वरूपात दर्शन दिले नाना सिद्धीचे चमत्कार दाखवून गोरखनाथावर दत्तात्रेयानी याच ठिकाणी कृपा केली गोरखनाथाच्या परपरेतील बहुतेक सर्व नाथाचा दत्तात्रेयाशी सबध असल्याने व दत्त-पथातील अनेक महत्त्वाच्या बाबी नाथपथाने विकसित केल्या असल्याने श्रीगोरक्षनाथाच्या चरित्राची रूपरेखा पाहाणे अगत्याचे आहे

नाथसिद्धाच्या ज्या विविध नामावली सध्या उपलब्ध आहेत त्यात गोरक्षनाथाचे नाव प्रामु-ख्याने असते मत्स्येन्द्रनाथाचे शिष्य म्हणून गोरखनाथाचा उल्लेख येतो मत्स्येन्द्रनाथाना म्हणजे आपल्या गुरूना स्त्रीराज्यातून म्हणजे वामाचारी पथातून मुक्त करणारा एक थोर सिद्ध पुरुष म्हणूनही गोरखनाथाचा गौरव केला जातो गोरक्षनाथाचा काल व त्याचे जीवनवृत्त याची विश्वसनीय माहिती उपलब्ध नाही मत्स्येन्द्रनाथ व गोरखनाथ याचे कार्य अकराव्या शतकातले असावे, असा सशोधकाचा तर्क आहे या योगी सिद्धाचे आयुर्मान अनेकदा मोठे अस-ल्याने काळाचा निर्णय घेणे अवघड काम होऊन बसले आहे या दोनही सिद्धपुरुषाचे अनेक अव-तार असल्याचेही सागतात

गोरक्षनाथाच्या जन्मासबधी एक आख्यायिका अशी की, एका पुत्रकाक्षिणी स्त्रीस महादेवानी विभूतीभस्माचा प्रसाद दिला या स्त्रीने अश्रद्धपणे तो प्रसाद शेणाच्या उकीरड्यावर टाकून दिला बारा वर्षांनी आपल्या प्रसादाचा परिणाम पाहाण्यासाठी महादेव आले तेव्हा त्यानी राखेच्या ढिगाऱ्यातून हाक मारून 'गोरक्ष' नाथास उभे केले कधी या कथेतील आदिनाथाऐवजी म्हणजे शिवाच्या ऐवजी मत्स्येन्द्रनाथाचे नाव येते ही पुत्रकाक्षिणी स्त्री ब्राह्मण असल्याचे सागतात मत्स्येन्द्रनाथ व गोरखनाथ यानी नेपाळमध्ये अनेक प्रकारचे चमत्कार केले नेपाळी परपरेप्रमाणे मत्स्येन्द्रनाथ हे गोरक्षाचे गुरू आहेत, तर गोरक्षसिद्धातानुसार गोरक्ष हे प्रत्यक्ष शकरा-चेच पुत्र वा शिष्य आहेत गोरक्षनाथाचे जन्मस्थान नेपाळ, पजाब, गोरखपूर, यापैकी कोठेतरी असावे गोदावरी नदीच्या तीरी चद्र-गिरी नावाच्या गावी एका ब्राह्मण स्त्रीस गर्भ-सभव होऊन गोरक्षनाथ जन्मल्याचेही सागतात गोपीचदाची आई मैनावती ही गोरक्षनाथाची शिष्या होती नेपाळी परपरेनुसार दक्षिणेकडील वडव नावाच्या देशात महामत्राच्या प्रसादाने महाबुद्धिशाली गोरक्षनाथाचा जन्म झाला. ब्रूस आणि ग्रियर्सन याच्या मते सत्ययुगात पजाबमध्ये, त्रेतायुगात गोरखपुरामध्ये, द्वापार-युगात हुरभुजमध्ये व कलियुगात काठेवाडात गोरखमढी येथे गोरखनाथ यानी अवतार घेतले गोरक्षनाथानी नेपाळ, पजाब, बगाल, कच्छ, काठेवाड, नासिक, उडिसा इत्यादीच्या यात्रा केल्या होत्या

गोरखनाथाचा जन्म, त्याचे कार्य, त्याचे पथीय तत्त्वज्ञान याचा अभ्यास आजकाल वाढत आहे डॉ कल्याणी मल्लिक, डॉ प्रबोधचद्र बागची, डॉ हजारीप्रसाद द्विवेदी, डॉ मोहन-सिंग इत्यादी सशोधकाच्या अभ्यासामुळे श्रीगोरक्षनाथाच्या कार्यावर नवा प्रकाश पडत

आहे. मोहनसिंग याच्या मतानुसार गोरक्षनाथ हे एका हिंदू विधवेचे अवैध पुत्र असावेत. रामाजात त्यामुळे खालचे स्थान मिळाल्याने त्यांनी स्वपराक्रमाने वैचारिक क्रांती केली. गोरक्षसिद्धान्तसंग्रहात त्यांना ' ईश्वरी संतान ' ( वेवारशी ) म्हटले आहे. ' मतिरत्नाकर ' नावाच्या महानुभावी ग्रंथात तर गोरक्षनाथासंबंधी म्हटले आहे, ' आणि गोरक्ष जन्मता शूद्र कुळी.' त्यांचा जन्म ब्राह्मणकुळात झाला असल्याचेही काही संशोधक सांगतात. त्यांचे वैराग्य प्रखर होते. आपल्या वैराग्यपूर्ण मार्गावरून घसरणाऱ्या आपल्या गुरूस, म्हणजे मत्स्येन्द्रनाथास त्यांनी सावरले म्हणून की काय ज्ञानेश्वर त्यांना ' विषयविध्वंसैकवीर ' म्हणतात. त्यांचा संचार सर्व भारतभर असून अमरनाथ, गहिनीनाथ, निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर ही शिष्यपरंपरा महाराष्ट्राच्या दृष्टीने फारच महत्त्वाची आहे.

गोरखनाथांचा एक महत्त्वाचा विशेष असा की, त्यांनी सर्वसामान्य लोकांसाठी आपला धर्मविचार लोकभाषांतून सांगितला. संस्कृत, प्राकृत वा अपभ्रंशमिश्र हिंदी अशा भाषांतून त्यांचे ग्रंथ मिळतात. अमनस्कयोग, ज्ञानदीपप्रबोध, गोरक्षपद्धती, गोरक्षसंहिता, योगमार्तंड, गोरक्षकल्प, अवधूतगीता, गोरक्षगीता, गोरखबानी; असे काही ग्रंथ गोरक्षनाथांच्या नावावर मिळतात. अमरौघशासनम्, महार्थमंजरी, सिद्धसिद्धान्तपद्धती; हेही ग्रंथ गोरक्षनाथांचे म्हणून सांगतात. योगधारणा, पिंडब्रह्मांडविचार, कुंडलिनीजागृती, गुरूचे महत्त्व, देशकालातीत व जातिभेदातीत तत्त्वज्ञान, लोकभाषांचा उपयोग; हे गोरखनाथांच्या पंथाचे मुख्य विशेष होत. हिंदू व मुसलमान एका विचारावर प्रथम वावरले ते गोरक्षनाथांच्या परिवारात. नाथपंथाच्या रावळ शाखेत आजही मुसलमानांचा भरणा विशेष दिसतो. नाथपंथात स्त्रीशूद्रांच्या उद्धाराची तळमळही प्रामुख्याने दिसते. विमलादेवी व मैनावती या दोन स्त्रिया नाथपंथात होत्या. बंगालमधील नाथपंथीय हडिपा ( जालंदरनाथ ) हा एक अंत्यज होता. गोरखनाथांच्या प्रेरणेमधूनच भाषेचा उपयोग अखिल भारताच्या संदर्भात होत राहिला. गोरक्षनाथांच्या पंथात वर्णाश्रमधर्माला स्थान नसल्यामुळे वर्णभ्रष्टांना या संप्रदायाचा मोठाच आधार वाटला.

' गोरक्षचरित्र म्हणजे गुण व प्रचीती या दोन गोष्टींचा एक सुरेख मणिकांचन योग आहे. ब्रह्मचर्यपरायण, हठयोगाचारनिष्ठ व नीतिसंपन्न अशा योगी संप्रदायाच्या विकासाचे मूळ श्रेय गोरक्षनाथांकडेच आहे....त्यांचा उपदेश व त्यांचे प्रत्यक्ष आचरण यामध्ये फरक नव्हता....त्यांनी जीवनाकरिता ब्रह्मचर्य, संयम, उद्वेगरहित हृदय-मार्ग योग्य मानला होता. जर त्यांनी ह्या मार्गाचे प्रत्यक्ष आचरण केले नसते तर निखालसपणे मत्स्येंद्राच्या उद्धाराकरिता ते न जाते व स्वतःच त्या ठिकाणी रममाण झाले असते. त्यांनी लिहिलेल्या ग्रंथावरून हे स्पष्ट दिसून येते की, ते कामिनी आणि कांचन या दोनही गोष्टींना साधी राहणी व साधनात्मक जीवन याच्या दृष्टीने विघातक मानीत असत .... ते यौगिक सिद्धीचा प्रयोग फक्त परहितसाधनाकरिताच करीत होते ' ( अमनस्कयोग : पृष्ठे २८-२९ ) त्यांचा संप्रदाय स्वतःला अतिवर्णाश्रमी मानतो. ते समदृष्टीने वावरत. भोग, मद्य, मांस इत्यादींच्या सेवनापासून ते अलिप्त होते. योगी पुरुषांना द्रव्याची इच्छा नसावी, असे त्यांना वाटे. स्त्रीकडे बघण्याची त्यांची दृष्टी मातृभावाची होती. संयमपूर्ण जीवन व साधी राहाणी याचा ते आदर्शच होते.

## २. चक्रपाणी

महानुभावपंथाचे संस्थापक श्रीचक्रधर यांचे परमगुरू म्हणून श्रीचक्रपाणीचे नाव

विख्यात आहे. सातारा जिल्ह्यातील फलटण या गावी जनकनायक नावाचा एक कऱ्हाडा ब्राह्मण रहात असे. त्याची बायको जनकाइसा. व्यापारउदीम करून हे कुटुंब आपले पोट भरीत असे. पुत्रसौख्यासाठी जनकनायकाने पुन लग्न केले तरी त्याला पुत्र झाला नाही. पहिली पत्नी जनकाइसा हिचे माहेर चाकण येथील. हिच्या माहेरच्या माणसानीही चाकणच्या 'चक्रपाणी' देवतेस पुत्रप्राप्तीसाठी नवस केला होता. जनकनायकाचा नवस याचमाठी 'चागदेव' नावाच्या देवतेस होता. दोनही देवाची कृपा म्हणून की काय, जनकाइसेला पुत्र झाला. या मुलास चक्रपाणी व चागदेव अशी दोनही नावे माहेरची व सासरची म्हणून मिळाली. या चागदेवाच्या पत्नीचे नाव कमळवदना अथवा कमळाइसा होते. चागदेव प्रथमपासून वैराग्यशील होते. घराण्याच्या व्यापारात वा ससारात त्याचे तितपैसे लक्ष नसे. सभोगसुखासाठी कमळाइसा आतुर असे, तर चागदेव पूर्णपणे विरक्त. एकदा एकादशीच्या दिवशी याच सदर्भात त्याना व्रत मोडावे लागल्यामुळे त्याना एकदर प्रपंचाचा वीट आला.

यच्याच लोकाबरोबर एकदा चागदेव चक्रपाणी मातापूर तथा माहूर या क्षेत्राच्या यात्रेस निघाले. गडाच्या पायथ्याशी असलेल्या 'मेरुमाला' तलावात त्यानी स्नान केले व ते श्रीदत्तप्रभूच्या शयनस्थानाच्या दर्शनासाठी निघाले. वाटेने दाट झाडी होती. एकाएकी एका मोठ्या वाघाने डरकाळी फोडून त्याना हटकले. चागदेवाच्या बरोबरीने लोक भिऊन दूर पळून गेले. तरी ते मात्र त्याच्यापुढे पाटात स्तब्ध उभे राहिले. व्याघ्ररूपाने दत्तप्रभूच आपल्यासमोर उभे आहेत असे त्यानी मनोमन जाणले. चागदेव एकटेच राहिले तेव्हा वाघाने आपला एक पजा त्याच्या डोक्यावर ठेवला. श्रीदत्तप्रभूपासून चागदेवानी या वेळी सन्यास स्वीकार केला. त्यानतर चागदेव माहूर येथेच बरीच वर्षे राहिले. त्यानी अवधूताचा वेष धारण केला होता. गावात भिक्षा मागून पर्वतीय भागावर भटकत राहाणे हा त्याचा उद्योग होता. त्यानंतर ते द्वारावतीच्या यात्रेसही गेले. तेथील गोमतीच्या तीरावर एका गुफेत त्याचा निवास होता. उजव्या हातात खराटा व डाव्या हातात सूप घेऊन ते द्वारावतीचे रस्ते स्वच्छ करीत. सूप अथवा खराटा डोक्यावर मारून त्यानी बावन पुरुषाना विद्या दिली होती.

एकदा रिद्धपूरहून काही यात्रेकरूबरोबर श्रीगोविंदप्रभू द्वारावतीस आले. त्यानी येथेच सन्यासदीक्षा स्वीकारली. चागदेवानी आपल्या हातातील सूप व खराटा गोविंदप्रभूच्या डोक्यावर ठेवून विद्या प्रदान केली. चागदेवाचा आचार वैराग्यसपन्न असा होता. उच्चनीच हा भेद त्याना माहीत नव्हता. 'शूद्राच्या घरी आरोगण करीति। तैसेचि अंत्येजाचा घरी क्रीडा करीति।' अशी त्याची वृत्ती होती. योगसामर्थ्याच्या बळावर अनेक प्रकारच्या लीला दाखवून त्यानी भीवतीच्या क्षेत्रात चागलाच लौकिक कमावला होता. शेवटी त्यानी योगसामर्थ्यानेच शरीराचा त्याग केला व त्याच वेळी भरवस येथील स्मशानात आणलेल्या हरपाळ देवाच्या मृत शरीरात प्रवेश करून नवा अवतार धारण केला. तोच श्रीचक्रधर होय.

## ३. गोविंदप्रभू

वरील चागदेव राऊळाचे अथवा चक्रपाणीचे शिष्य श्रीगोविंदप्रभू हे आपण पाहिलेच. रिद्धपूरजवळ काटसरे नावाचे गाव आहे. तेथील एक काण्व ब्राह्मण अनंतनायक. त्याची बायको नेमाइसा. अनेक मुले झाली तरी जगेनात. म्हणून शेवटच्या मुलाचे नाव 'गुंडो' असे ठेवण्यात आले. दोन वर्षांच्या आतच गुंडोचे आईवडील मरण पावले. मामा व मावशीने त्याचे पालन

केले गुंडो अतिशय बुद्धिमान व वैराग्यशील होता. द्वारावतीच्या चांगदेव राऊळाकडून त्यांनी शक्तीचा स्वीकार केला. गुंडो गोविंदप्रभू या नावाने ओळखले जाऊ लागले नाना चमत्कार करून गोविंदप्रभूंनी आपला लौकिक वाढविला. त्यांचे खाणेपिणे, वागणे, बोलणे एखाद्या अर्धवट माणसासारखे असे 'राऊळ वेडे: राऊळ पीस' असे लोक त्याच्याबद्दल म्हणत. खादाडपणाची सवयही त्यांना होती. गोविंदप्रभू मोठे नैष्ठिक ब्रह्मचारी होते त्यांचे वैराग्य कडकडीत होते. त्यांचीही दृष्टी आपल्या गुरूप्रमाणेच समत्वाची होती. 'राऊळ मातांगा महाराचा घरोघरी विचरताती आणि तैसेचि दीक्षीता ब्राह्मणाचा घरी विचरताती' अशी त्यांची मनोवृत्ती होती.

त्यांच्या आकृतीची वेषाची, वर्तनाची मोठी रेखीव चित्रे महानुभावीय वाङ्‌मयात आढळतात आगीचे, मृत्यूचे भविष्य वर्तविणे, मेले. त्यांना जिवंत करणे, पर्जन्य बोलावणे, दुरून गाईचे दूध काढणे, पांगळ्यांना पाय देणे, मुक्यांना वाचा देणे, सापाचे विष उतरविणे असे काही चमत्कार ते करीत. यांचा वेष कसा असे? तर 'आरिख म्हणजे मळवट : कुंकुम भरणे माथा भाग खोपा जवादि भरणे : कर्णी सुकडी लावणे : पायी वाकि : गळा साखळ मुकुटी तैल : वेणी : नाभिचुंबित खाड (दाढी) तथा स्मश्रु.' 'आवो मेली जाय' अशी एक शिवी नित्य त्यांच्या तोंडी असे. श्रीचक्रधरांचे हे साक्षात गुरु असल्याने त्यांना महानुभावपंथातही विशेष महत्त्वाचे स्थान आहे. श्रीचक्रधरांनी गोविंदप्रभूंची सेवा मनोभावे केली. गोविंदप्रभूंच्या स्वभावाच्या अनेक लकबी महानुभाव ग्रंथकार देतात. उगाच वेडावणे दाखविणे, हातवारे करणे, गरगरा हात फिरविणे; अशा त्यांच्या सवयी होत्या खादाडपणा हा त्यांचा विशेष स्वभाव होता गूळ खावा तर तो कसा? श्रीकरे भेली मुखी घातली : आणि आरोगु लागले : ते श्री मुखौनि ओघळु नीगेति : ते खाड (दाढी) माखे दोंदावरी गळे ऐसा गुळु आरोगीला :' अशा या गोविंदप्रभूकडून श्रीचक्रधरांनी शक्तीचा स्वीकार केला. गोविंदप्रभूही महानुभाव पंथात ईश्वराचा अवतारच मानले जातात.

## ४. चक्रधर
### (सन ११९४–१२७४)

दत्तात्रेयांना आदिकारणाचे स्थान देणाऱ्या महानुभाव पंथाचे हे संस्थापक. विशालदेव नावाचा भरवसचा, भडचचा हा एक प्रधान. त्याच्या पत्नीचे नाव माल्हाइसा दत्ताच्या कृपेने या दांपत्यास एक मुलगा झाला त्याचे नाव हरिपाळदेव याचे लग्न कमळाइसा नावाच्या स्त्रीशी झाले याला जुगार खेळण्याचे मनस्वी वेड होते. एकदा एकाएकी याची प्रकृती बिघडून याला मृत्यू आला. स्मशानात चमत्कार असा झाला की, परमेश्वराने हरिपाळदेवाच्या हृदयात प्रवेश केला चांगदेव राऊळाचा हा नवा अवतार म्हणून हरिपाळदेव जिवंत झाला

या नव्या स्पर्शाने त्याच्या मनात वैराग्य दाटून आले एकदा द्यूतात तो हरला कमळाइसेने दागिने देण्यास नकार दिला त्याच्या मनात खिन्नता पसरली राजविलासात व वैभवात त्याचे चित्त रमेना त्याने एके दिवशी घर सोडले व तो नागपूरकडील रामटेकच्या यात्रेस निघाला. रितपूर अथवा ऋद्धिपूर येथे त्याची व गोविंदप्रभू यांची गाठ पडली प्रभूंनी त्याच्या अंगावर स्वतःच्या मुखातील 'सेगुळे बुडडे' फेकून त्याला आपणाकडे वेधून घेतले हरिपाळाने गोविंदप्रभूंचे शिष्यत्व स्वीकारण्याची त्यांच्याकडून शक्तीची दीक्षा घेतली. गोविंदप्रभूंनीच त्याचे नाव चक्रधर असे ठेविले

यानंतर चक्रधरांनी सालबर्डीच्या डोंगरावर बारा वर्षे तप केले. सत्य, अहिंसा, समता या तीन तत्त्वांनीच मानवजातीचे कल्याण होईल हे

पटल्यावरून त्यानी या तत्त्वाच्या प्रसारासाठी प्रयत्न करायचे ठरविले फिरता फिरता हे नागपूरकडील काटोल या गावी आले तेथील उधळीनाथ नावाच्या एका सिद्धाकडून त्यानी वयस्तभनी म्हणजे चिरतारुण्याची विद्या मिळविली पुढे त्यानी आध्र, वरगळ येथे प्रयाण केले तेथील एका घोड्याच्या व्यापाऱ्याच्या सुदर मुलीशी त्यानी लग्न केले चक्रधराच्या या पत्नीचे नाव हसावा होय थोडे दिवस त्यानी ससार केला, पण मूळ वृत्ती जागी झाल्याने पुनः त्यानी गृहत्याग केला भडारा येथे त्याना नीलभट भाडारकर नावाचा पहिला शिष्य मिळाला त्याचा दुसरा शिष्य अळजपूरचा रामदरणा होय रामदरण्याच्या उमादेवी नावाच्या कन्येशी चक्रधरानी तिसरा विवाह केला वडनेर येथे त्याना विद्यावत रामदेव नावाचा शिष्य मिळाला मेहेकर येथे त्याना बोणाबाई नावाची एक विरक्त स्त्री भेटली पैठणला नागुबाई नावाची एक स्त्री त्याची शिष्या बनली हीच पुढे नागाविका अथवा बाइसा म्हणून नावारूपास आली

पैठण येथे त्यानी सन्यास स्वीकारून लोकोद्धाराच्या कार्यास आरभ केला सर्वत्र सचार करून त्यानी अनेकाना प्रेमशक्तीचे दान दिले क्षुद्र देवताच्या नादी लागलेल्या अडाणी जीवाना सावध केले चक्रधराच्या पथात जातिभेदास स्थान नाही त्यानी स्वत मागाच्या घरी अन्न खाऊन समत्वाची दृष्टी सिद्ध केली होती सोवळेओवळे, उपासतापास, व्रतवैकल्ये याच्यावर त्याचा विश्वास नव्हता अहिसक वृत्तीने सर्वाशी समत्वाने व ममतेने वागावे हा त्याच्या धर्माचा मुख्य गाभा आहे स्त्रीशूद्राना स्वत च्या उद्धारास अवसर त्याच्या पथात मोठ्या प्रमाणावर मिळत राहिला सस्कृतऐवजी मराठी भाषेचा स्वीकार करून त्यानी लोकाच्या उद्धारास आणखी चालना दिली श्रीचक्रधराच्या या वागण्यामुळे व धर्मदृष्टीमुळे सनातन धर्माचे व वर्णाश्रमाचे पुरस्कर्ते त्याच्या विरुद्ध उठले. अनेकदा त्याच्यावर विषप्रयोग होत राहिले परंतु चक्रधराचा प्रभाव जनमानसावर जास्तच उमटत गेला रामदेवराव दादोस, नागदेवाचार्य, आबाइसा, उमाइसा, महदाइसा, म्हाइभट, छर्दोबा, सारगपडित, डागरेश इत्यादीचा परिवार त्याच्या भोवती असे देवळामठात, गुफेत राहून त्यानी आपल्या प्रसाराचे कार्य केले

श्रीचक्रधरस्वामी हे ईश्वराचाच अवतार होत अशी साप्रदायिकाची श्रद्धा आहे, त्यामुळे त्याच्या कृपेने वा स्पर्शाने अनेक लोकाना स्थित्यानदाचा अनुभव येत असे त्यानी अनेक प्रकारचे चमत्कार करून दाखविले अनेकाच्या रोगाचा परिहार केला चक्रधराच्या शिष्यानी त्याच्या दिनचर्येचे टिपण बारकाईने केले आहे पहाटे उठणे, प्रार्तविधी, चितन, दतधावन, स्नान, सकाळचा पूजावसर, भक्तजनाबरोबर विहार, निरूपण, आरोगणा व दुपारचा पूजावसर, पहुड व उपहुड, दुपारचे निरोपण, सायकाळचा पूजावसर, रात्रीचे निरूपण, इत्यादीच्या नोंदी तपशीलवार मिळतात भूतमात्र, पशुपक्षी याच्याबद्दल त्याच्या मनात अतिशय प्रेम असे गुजराथी, मराठी व सस्कृत या भाषा त्याना चागल्या येत स्वत चक्रधरानी स्वहस्ते एकही ग्रथ लिहिला नसला तरी त्याच्या तोडच्या वचनाचा सग्रह ग्रथासारखाच आहे लीळाचरित्र, सूत्रपाठ, दृष्टान्तपाठ, हे 'श्रीमुखीचे शब्द' साप्रदायिकाना मोलाचे वाटतात

श्रीचक्रधर व त्याचा महानुभाव पथ याचे तत्त्वज्ञान हे पूर्णपणे द्वैती आहे त्यानी जीव, देवता, प्रपच व परमेश्वर हे चार पदार्थ नित्य, स्वतत्र व अनाद्यनत मानले आहेत. या चार पदार्थाचे ज्ञान माणसास करून देण्यासाठी त्यानी तीन प्रकारचे अवतार मानले (१) गर्भावतार– इतर जीवाप्रमाणेच मातेच्या उदरातून जन्म घेणे

(२) पतितावतार–एखाद्या मृत शरीरात प्रवेश करणे (३) दवडण्याचा अवतार–मातेच्या उदरातील जीवाला तेथून घालवून आपण ते स्थान पकडणे अवतारी परमेश्वराचे शरीर मायेने व्याप्त असल्याने शरीराला मायापूर असे ते म्हणतात देवता नावाच्या पदार्थात त्यांनी ८१ कोटी ११ लक्ष १० देवता मानल्या आहेत कर्मभूमी, अष्टदेवयोनी, अत्तराळ, स्वर्ग, सत्य-कैलास–वैकुंठ, क्षीराब्धी अष्टभैरव विश्व, माया अशा नऊ थोव्यातून या समूहातून त्यांची वाटणी झालेली आहे ईश्वरी आनंदाचा अनुभव घेणे हे या तत्त्वज्ञानाचे ध्येय आहे त्याच्या दृष्टीने ज्ञानमार्ग हा बहिर्याग व भक्तिमार्ग हा अंतर्यागमार्ग होय ज्ञानमार्गाने जीव ब्रह्म-स्वरूप होईल तर भक्तिमार्गाने तो ईश्वरस्वरूप होईल असे त्याचा पंथ मानतो श्रीचक्रधरांचा आचारमार्गही अतिशय कडक व वैराग्यपूर्ण असा आहे

श्रीचक्रधरांनी प्रस्थापित अशा चातुर्वर्ण्याला विरोध केला, रूढ तत्त्वज्ञानास सोडून द्वैती तत्त्वज्ञान निर्माण केले, यामुळे त्यांना प्रथमपासूनच विरोध झाला रामदेवराव यादवाचा प्रधान हेमाद्रिपंडिताने तर त्यांना पकडून त्यांच्यावर काही आरोप ठेवले आणि त्यामुळे त्यांचा शिरच्छेद झाला कोणी म्हणतात, त्यांनी उत्तरेस हिमाल्याकडे प्रयाण केले श्रीचक्रधर व त्यांचा पंथ महानुभाव यांचा महाराष्ट्राच्या संस्कृतीच्या जडणघडणीत मोठा वाटा आहे मराठी गद्याच्या आरंभीच्या सुंदर शैलीचा बोध त्यांच्याच मुखातून निघालेल्या वाक्यावरून आज आपणास समजतो सांप्रदायिकांच्या मताने ते एक श्रेष्ठ अवतारी पुरुष होते श्रीचक्रधरांच्या गुरुपरंपरेचा उगम दत्तात्रेय आहेत हे महत्त्वाचे आहे 'या मार्गासि श्रीदत्तात्रेयप्रभु आदिकारण' असे स्वामींनीच म्हटले आहे श्रीदत्तप्रभू, श्रीचांगदेवराऊळ, श्रीगोविंदप्रभू, श्रीचक्रधर, अशी ही परंपरा असल्याचे आपणास माहीत आहेच महानुभावांचा दत्तात्रेय हा 'चतुर्युगी अवतार' असल्याचे श्रीचक्रधर सांगतात सर्व युगांत श्रीदत्तात्रेय वावरत असतात, असाच याचा अर्थ होय त्यांच्या मते दत्तप्रभूंची वाणी अमृताचा व सुखाचा वर्षाव करणारी आहे श्रीचक्रधरांना पांचाळेश्वर या दत्तात्रेयाच्या स्थानाचे विशेष महत्त्व वाटे 'तुमाचिया गावापासी आत्मतीर्थ असे की होजी तुम्ही तेथ जा तेथ जाइजे हो ते आणिका स्थावरा-सारखे नव्हे तेथ श्रीदत्तात्रेयप्रभूची प्रतिष्ठा हो शोधु पचाळेश्वरा गेला होतासि पुसीले हे ते स्थानी होते तेथ जाईजे हो' अशा शब्दांत जानोपाध्यांना दत्तप्रभूंच्या या स्थानास जाण्यासाठी सांगतात आपल्या शिष्यांजवळ ते अनेकदा दत्तप्रभूंच्या लीलांचे निरूपण करीत असत

## ५. जनार्दनस्वामी

इस्लामी सत्तेत देवगिरी अथवा दौलताबाद येथे अधिकारावर राहून दत्तोपासनेचा प्रसार करणारे व एकनाथांवर अनुग्रह करणारे म्हणून थोर दत्तोपासक श्रीजनार्दनस्वामी यांचे नाव प्रसिद्ध आहे फाल्गुन व ६ शके १४२६ रोजी यांचा जन्म चाळीसगावच्या देशपांडे घराण्यात झाला हे शुक्ल यजुर्वेदीय वाजसनेयि माध्यंदिन ब्राह्मण असून नित्य धर्मकृत्ये व पूजाउपासना यात यांना प्रथमपासूनच गोडी वाटत होती शके १४४७ मध्ये त्यांनी एकाच कुलगोत्रातील दोन मुलींशी लग्न करून गृहस्थाश्रमास प्रारंभ केला भगवच्चिंतन, स्नानसंध्यादि कर्मे, अतिथिसेवा, राजकार्य आणि सावित्री-रमा या दोन स्त्रियांशी संसार, असा जीवनक्रम त्यांचा होता राजकारणात नित्य दगदग, वसुली, अधिकारी लोकांची ताबेदारी, यवनांची लहर, हीन लोकांची संवय यातून त्यांना मार्ग काढायचा होता स्वधर्मनिष्ठा राखायची होती घरातील दत्तोपासना वाढ-

वायची होती कृष्णातीरी अकलखोप, कुरवपूर, वाडी, औदुबर इत्यादी दत्तस्थानाना ते भेटी देत असत अकलखोप येथे त्याना दत्तात्रेयाचा अनुग्रह झाला

देवगिरीवर येऊन त्यानी यवनसेवा पत्करली या एका प्रसिद्ध स्थानाभोवती जनार्दनस्वामी व एकनाथ याच्या अनेक रम्य व भावगर्भ स्मृती एकवटलेल्या आहेत दुर्गातीर्थ व श्रीगोरक्षगुहा ही दोन स्थाने भाविकाना सुखविणारी होती जनार्दनपतानी यवनसेवा पत्करूनही आपली धार्मिक वृत्ती सोडली नाही नित्याचे आन्हिक, गुरुचरित्र ज्ञानेश्वरी इत्यादी ग्रथाची पारायणे, नामस्मरण व राजकारण यात त्याचे चित्त रगून गेले होते गोरक्षगुहा व गडाखाली सहस्रस्तभ देवीजवळच स्थान या ठिकाणी एकान्तात त्याची ध्यानधारणा चाले नाथचरित्रकार केशव अध्यापक याने जनार्दनासबधाने लिहिताना म्हटले आहे, ' जनार्दनाचा नित्य नेम। स्नान सध्या अति उत्तम। तयावरी आवड परम। निज धर्म आचार ॥ सिद्धराज श्रीज्ञानदेव। ज्ञानेश्वरी अमृतानुभव। स्वानुभवे वदला अपूर्व। जनार्दना भाव त्या ग्रथी ॥ तया पठनी अति गोडी नित्य व्याख्यानाची आवडी। मध्यान्हापर्यंत प्रतिदिनी। नित्यनेमें असावे। तयावरी भोजनपक्ति। सहब्राह्मण ब्रह्ममूर्ती। सारूनिया यथा पद्धती। राजदर्शना मग जावे। न्याय नीती तथा रीती। शिष्टाशी मान्य पडे रीती। या परी प्रपच परमार्थी। दक्षता लोकसग्रहार्थी ॥' जनार्दनस्वामीच नैष्ठिक आचरण व दत्तभक्ती याचा प्रभाव यवनसत्तेवरही असावा असे सागतात की, याना व याच्या परिवारास सोयीचे व्हावे म्हणून देवगिरीच्या आसपास शुक्रवारऐवजी गुरुवारी सुट्टी असे

देवगिरीच्या जवळच पाचसहा मैलाच्या परिसरात सुलभोजन शिखराच्या सपाटीवर शिवमदिरे आहेत तेथेच सूर्यकुंड नावाचे एक तळे आहे याच भागात सहस्रलिंग म्हणूनही एक स्थान आहे दाट झाडी व एकान्त यामुळे जनार्दनपत दत्तध्यानासाठी येथे येत असत ' जनार्दनपत ते अवसरी, गुरुवारी अखड जात पर्वतशिखरी। सहस्रलिंग सरोवर परिसरी; सुलभोजन गिरी नेम सत्य ' असे एकनाथचरित्रकार केशवाने सागितले आहे अनेकाना या ठिकाणी साक्षात्कार होत असत याच ठिकाणी जनार्दनस्वामीना दत्ताचा साक्षात्कार झाला. दत्तावधूताने कलियुगातील पहिला शिष्य जनार्दन केला असे नाथानी म्हटले आहे या दत्तसाक्षात्काराचे वर्णन एकनाथ आपल्या भागवतात करताना लिहितात,

गुरुप्राप्तीलागी सर्वथा। थोर जनार्दनवासी चिंता।
विसरला तिन्ही अवस्था। सद्गुरु चिंतिता चिंतनी॥
देवो भावाचा भोक्ता। दृढ जाणोनि अवस्था।
येणे जाले श्रीदत्ता। तेणे हातु माथा ठेविला॥
हातु ठेविताच तत्काळ। बोधु आकळिला सकळ।
मिथ्या प्रपचाचे मूळ। स्वरूप केवळ स्वबोधे॥
कर्म करूनि अकर्ता। तोचि अकर्तात्मबोधु जाला देता
देही असोनि विदेहता। तेही तत्वता आकळिली॥
गृहाश्रमु न साडिता। कर्मरेखा नोलाडता।
निजव्यापारी वर्तता। बोध सर्वथा न मैळे॥
तो बोधु आकळिता मना। मन मुकले मनपणा।
अवस्था नावरेची जनार्दना। मूर्छापन्न पडियेला।
त्यासी सावध करूनि तत्वता। म्हणे प्रेमा राहे सत्वावस्था।
तोही गिळोनि सर्वथा। होई वर्तता निजबोधे॥
पूजाविधी करोनिया। तव जनार्दनु लागला पाया।
तव अदृश्य जाला दत्तात्रेया। योगमायेचेनि योगे॥
( नाथभागवत ९४३१-३८ )

याप्रमाणे जनार्दनस्वामीवर प्रत्यक्ष दत्तात्रेयाचा अनुग्रह असल्यानेच वर सांगितल्याप्रमाणे नाथानी म्हटले आहे, ' दत्तात्रयशिष्यपरपरा। सहस्रार्जुन यदु दुसरा। तेणे जनार्दनु तिसरा।

शिष्य केला खरा कलीयुगि ॥ ' पुढे नाथांनाही जनार्दनस्वामींनी असेच याच ठिकाणी दत्तदर्शन करविल्याचे आपण पुढे पाहूच. नाथांच्याबरोबर जनार्दनस्वामी नाशिक–त्र्यंबकेश्वरच्या तीर्थयात्रेसही गेले होते. नासिकच्या चंद्रबोध नावाच्या ब्राह्मणाशी भेट झाली. श्रीगोंदे येथील सिद्धान्तबोधकर्ते शेख महंमद हे याच चंद्रबोधाचे शिष्य होत. जनार्दन स्वामींना साक्षात् दत्ताचा अनुग्रह असल्याचे आपण पाहिलेच आहे. परंतु कोणी त्यांना उपदेश श्रीनृसिंहसरस्वतींनी दिल्याचे सांगतात. पण हा उपदेश प्रत्यक्ष असण्याचा संभव नाही. श्रीनृसिंहसरस्वतींचे निर्याण शके १३८० मधील, व जनार्दनस्वामींचा जन्म शके १४२६ मधील. नाथांच्या अभंगगाथेत जनार्दनस्वामींच्या नावे असलेल्या अभंगांतील पहिले चौदा अभंग नृसिंहसरस्वतींना उद्देशून आहेत. परंतु हे अभंग नाथगुरू जनार्दनस्वामींचे नसावेत असा अभ्यासकांचा तर्क आहे. अठराव्या शतकाच्या अखेरीस नृसिंहक्षेत्रात होऊन गेलेल्या जनार्दनाचे असावेत असा या. सी. वेंद्रे यांचा कयास आहे.

अलीकडे जनार्दनपंतांचे गुरु नेमके कोण याविषयीही मतभेद होत आहेत. ' ॐ नमोजी श्रीसद्‌गुरु चांद बोधले। त्यांनीं जानोपंता अंगिकारलें। जानोबानें एका उपदेशिलें। दास्यत्वगुणें ' असे शेखमहंमद आपल्या 'योगसंग्राम' नावाच्या ग्रंथात म्हणतात. म्हणून चांदबोधले–जनार्दन व शेखमहंमद–एकनाथ अशी एक नवीनच परंपरा सांगितली जाते. नाथांची गुरुपरंपरा याप्रमाणे सूफी पथीय चांदबोधल्याकडे जाते. वर सांगितलेले चंद्रभट ब्राह्मण कालान्तराने सूफी झाले व त्यांचाच उपदेश जनार्दनपंतांना होता. परंतु या नव्या संशोधनास एकनाथांच्या वाङ्मयात फारसा आधार नाही. नारायण–अत्री–दत्तात्रेय–जनार्दन अशीच गुरुपरंपरा सांप्रदायिक मानतात, ते योग्यच आहे. एकनाथांप्रमाणेच जनार्दनस्वामींच्या दत्तोपासनेत कृष्णभक्तीलाही स्थान होते. दत्त–कृष्ण–विठ्ठल या त्रयीचे अभेदरूप नाथांच्या वाङ्मयात यथार्थपणे मिळते. जनार्दनस्वामींनी राजकारण, परमार्थ व प्रपंचयोगी योग्य रीतीनें सांभाळून शके १४९७ च्या फाल्गुन व. ६ रोजी आपला अवतार संपविला त्यांचा जन्म, त्यांना दत्तदर्शन, नाथांना बोधदान आणि समाधियोग यांचा दिवस फाल्गुन व. ६ हाच आहे, आणि आणखी नवल असे की, नाथांच्या समाधीचा दिवसही फाल्गुन व. ६ असाच आहे !



जनार्दनस्वामींची काही स्फुट रचना असावी. 'आत्मानात्मविवेकसार' नावाचा एक ओवीवृत्तात्मक ग्रंथ त्यांनी पचीकरणावर लिहिलेला आहे. उपनिषदवेदान्त भावगीता त्यांनी रचिली असल्याचे कन्नडकर वि. वा. जोशी आपल्या 'श्रीसंत जनार्दनस्वामी' या चरित्रग्रंथात सांगतात. जनीजनार्दन, रामाजनार्दन, एकाजनार्दन अशा काही शिष्यांचा परिवारही त्यांच्याबरोबर असे. पैठण, देवगिरी, काशी इत्यादी ठिकाणी जनार्दनस्वामींचे संबंध आहेत. नाथांनी काशीस ब्रह्मघाटापाशी जनार्दन मठाची स्थापना केली. देवगिरी, दौलताबाद मानपुरी मठात, बीडपटाणग मठात, परभणी जिल्ह्यातील चारठाणा येथील मठात, नाशिकच्या तपोवनातील मठात, जनार्दनस्वामींच्या मठाची परंपरा चालू आहे. उमरखेड, औरंगाबाद, कमळनुरी तालुक्यातील शेवाळे, देवपैठण ( निंबराजांचे ), कारंजा, अशा अनेक ठिकाणी जनार्दनस्वामींच्या दत्तोपासनेच्या परंपरा चालू आहेत. जनार्दनस्वामींची समाधी अहमदनगर जिल्ह्यातील खरवंडीला नसून देवगिरीलाच असल्याचे संशोधक सांगतात. 'श्रीजनार्दन गुप्त दत्त आज्ञा विचारीन ॥ पाहुनिश्रीं धौम्यस्थळ समोवती ऋषीमंडळ ॥ येथें घेतली समाधी एका जनार्दन वन्दीं ॥' यातले वर्णन खरवंडीपेक्षा देवगिरीनजीकच्या परिसरालाही लागू पडते. नाथांनी स्वतःच्या निर्याणसमयी श्रीजना-

र्दनस्वामींची आरती केली ती नाथचरित्रकार केशवाने दिलेली आहे.

जयदेव जयदेव जय जनार्दना ।
परमार्थी आरती अभिन्न भावना ।। ध्रु०।।

अवलोकिता जन दिसे जनार्दन, भिन्नाभिन्न कैंचे दाखवि अभिन्न । अनेक एकत्वे दिसे परिपूर्ण, ठकली मन-बुद्धि कैंचे अवगुण ।। १ ।। ज्योति चारी दीप्ती उजळुनिया दीप्ती, तेणें तेजस केली तेज आरती । पाहाता पहाणेपण पहावया स्थिती नुरेचि पें वेगळे देह आणि दीप्ती ।। २ ।। उजळी ते उजळणें उजळाया लागी । वेगळेपण कैंचे नुरेचि भवभागी । आगी अभिप्रायले आगीच्या आगी, जिव शिवपण गेलें हरपुनि वेगी ।। ३ ।। पाठी ना पोटी अवघा निवोटी, सर्वांगे देख गा सर्वी वरिष्ठी । इष्ट ना निष्ट गुप्त ना प्रगट, अहं सोहं सगट भरियेला घोट ।। ४ ।। सर्वदा दिसे परि ना कळे ना मना, जे जे दिसे ते ते दर्शन जाणा । अभाव भावेंसी हरपलि भावना अभिनव आरती एका जनार्दना ।। ५ ।।

अशा रीतीने जनार्दनस्वामींपासून महाराष्ट्रात दत्तोपासनेची एक शाखा समृद्ध झालेली दिसेल एकनाथानी दत्तभक्ती विठ्ठलभक्तीत मुरवून टाकली असली तरी जनार्दन स्वामींच्या कृपेने जागृत झालेला दत्तभक्तीचा धागा अतूट होता. 'धन्य गुरु जनार्दन । स्वानंदाचें जें निधान' असे नाथानी यासाठीच म्हटले आहे. आपणांस ज्ञानबोध दत्तात्रेय-जनार्दन यांच्याकडूनच मिळाल्याची ग्वाही देताना एकनाथांनी म्हटले आहे, 'जनार्दनाचा गुरू । स्वामी दत्तात्रय दातार ।। त्यानी उपकार केला । स्वानंदाचा बोध दिला ।। गचितगुणाचा अनुभव । दाखवला स्वयमेव ।। एकाजनार्दनी दत्त । वसे माझ्या हृदयात ।।'

# ६. एकनाथ

## (शके १४५५–१५२१)

भागवतधर्माच्या कलत्या इमारतीस खांब देऊन ती सावरणारे एक थोर संत पुरुष एकनाथ हे विठ्ठलाचे उपासक असले तरी प्रारंभी त्याना दत्तात्रेयांचेच दर्शन झाले होते एकनाथी भागवत, भावार्थ रामायण या ग्रंथांनी ज्यांचे नाव समग्र वारकरी पंथात आदराने घेतले जाते त्या एकनाथानी विपुल अशी अभगरचना व भारुडनिर्मितीही केलेली आहे उच्च दर्जाचा गृहस्थाश्रम व चागली सांपत्तिक स्थिती याची बाधा परमार्थास होत नसल्याचे एकनाथाच्या उदाहरणावरून दिसते. मानवी समतेचा पुरस्कार केवळ तात्त्विक ग्रंथातच नव्हे तर प्रत्यक्ष आचरणातही करून दाखविणारे एकनाथ हे पहिले कर्ते समाजसुधारक होत. त्यांच्या वारकरी पंथाच्या विठ्ठलभक्तीत दत्तप्रेमाचा एक बळकट धागा समरसतेने विणला गेला असल्याचे दिसून येते. 'दत्तनाममहिमा', 'दत्तमानसपूजा, 'दत्तजन्म' अशी त्याची काही छोटी प्रकरणे त्यांच्या दत्तभक्तीचा धागा स्पष्ट करताना दिसतात.

नाथांचे पणजे भानुदास हे एक मोठे सत्पुरुष म्हणून गणले गेले आहेत. पैठणच्या या घराण्यात विठ्ठलाची उपासना होती. याचेही काही अभंग उपलब्ध आहेत. यांनीच पंढरपूर येथील विठ्ठलाची मूर्ती अनागोंदीहून परत पंढरीस आणली. या भानुदासांचा मुलगा चक्रपाणी. चक्रपाणीचा मुलगा सूर्यनारायण व सूर्यनारायणाच्या पोटी शके १४५५ मध्ये एकनाथांचा जन्म झाला. एकनाथ मूळ नक्षत्रावर जन्मले म्हणून की काय, थोड्याच दिवसांत त्यांच्या आईवडिलांचे निधन झाले. चक्रपाणीने नातवाचा सांभाळ चागला केला. नाथाना लहानपणापासूनच स्नानसंध्येची, हरिभजनाची, पुराणश्रवणाची व नामस्मरणाची आवड होती. थोडे वय होताच एकनाथ देवगिरी-

वर जनार्दनस्वामींच्या सहवासात आले देवगिरी-वर मुसलमानी सत्तेत राहूनही जनार्दनस्वामी दत्तभक्तीचा प्रसार करीत एकनाथांनी जनार्दन-स्वामींची हरप्रकारची सेवा करून त्यांची कृपा संपादन केली याच्याच कृपेने नाथांना देवगडा-जवळील एका निसर्गरम्य अशा एकान्तस्थानी दत्तात्रेयांनी मलंगवेषात दर्शन दिले सर्वांग चर्माने वेष्टिलेले, बरोबर कुत्रीच्या रूपात कामधेनू, डोळे आरक्त झालेले असे हे दत्तरूप एकनाथांनी ओळखले दत्ताच्या आज्ञेवरून जनार्दनस्वामींनी त्या कामधेनूचे दूध काढले, झोळीतून शिळ्या भाकरीचे तुकडे काढून त्यात कालविले आणि उभयतांनी यथेच्छ भोजन केले भोजनानंतर ते मृण्मय पात्र एकनाथांना विसळण्यासाठी दिले नाथांनी ते विसळताना हाच आपला प्रसाद म्हणून त्यातील जल सेवन केले 'श्रीगुरुचे उशिटें। लाहे जें अवचटें। तें तेणें लाभें विटे। समाधीसी' (१३ ३४९) या ज्ञानेश्वरांच्या भावनेने नाथांनी तो प्रसाद म्हणून धारण केला नाथांची ही निष्ठा पाहून दत्तात्रेयांनी आपल्या खऱ्या रूपात प्रकट दर्शन देऊन नाथांना कृतार्थ केले दत्त व जनार्दनस्वामी एकरूप असल्याची खात्री नाथांची झाली

यानंतर एकनाथांच्या दत्तभक्तीस बहर आला 'भरला। ओतप्रोत स्वामी माझा देवदत्त,' 'दत्त सबाह्य अंतरी । दत्तात्रेय चराचरी' अशी त्यांची वृत्ती बनून गेली आपल्या ग्रंथांतून नाथ या दत्तकृपेचा मोठ्या आदराने व श्रद्धेने उल्लेख करताना दिसतात भागवताच्या प्रारंभीच नाथांनी म्हटले आहे, 'आतां नमूं दत्तात्रेया। जो आचार्यांचा आचार्या। तेणें प्रवर्तविलें ग्रंथ-कार्या। अर्थवावया निजबोधु॥' (एकनाथी भागवत १ १४२) तसेच 'भिक्षुगीते'च्या अखेरीस नाथ म्हणतात, 'माझे निजगुरुचाही गुरू। श्रीदत्त परमगुरु। तो भिक्षुगीतार्थे साचारु। योग्या योगेश्वरु तुष्टला॥ तेणें तोखलेनि अद्भुतें। आदरें आश्वासूनि मातें। अभय देऊनि निजहस्तें। पूर्ण ग्रंथार्थे डुल्लतु॥' (२३ १०००-१००१) या दत्तात्रेयांचे दर्शन एकदा त्यांना काशीसही झालेले होते ते एके ठिकाणी म्हणतात,

> एका एकी एकला काशीवासा गेला।
> स्वलीला श्रीदत्त स्वयें प्रकटला॥
> दत्त देव आला, दत्त देव आला।
> स्वभावा सांडोनि भेटावया चला॥
> मुक्तिमंडपामाझारी निजनाम नगरी।
> दत्त प्रकटला कीर्तनामाझारी॥
> भेटणे भेटी उठी दत्ता जाली भेटी।
> सांगणे ऐकणे दत्त होऊनि उठी॥
> कीर्तनाआतौता नाम श्रीदत्त दत्ता।
> निजकीर्ति ऐकोनि डोले तत्त्वता।
> दत्त जंगमी स्थावरी विश्वी विश्व धरी।
> तोचि दत्त घरोघरी नित्य भिक्षा करी॥

याप्रमाणे नाथांना वारंवार दत्तदर्शन होत राहिले नाथांनी स्मरण करावे व दत्तांनी प्रकट व्हावे असे त्यांचे नाते जडले देवगिरीजवळील शूलभंजन वा सुलभपर्वतावरील सूर्यकुंडानजीकच्या एकान्तात ध्यानधारणा करून नाथांनी दत्तात्रेयांना प्रसन्न करून घेतले दत्ताच्या सगुण दर्शना-मुळे त्यांना दत्ताचे व्यापक रूपही ध्यानात आले. 'स्वानंदे आवडी दत्त पाहूं गेलो डोळा। तंव चराचर अवघे दत्तचि लीळा॥ विस्मयो दाटला आतां पाहूं मी कैसे। देखतां देखणे अवघं दत्तचि दिसे॥' अशी त्यांच्या चित्ताची अवस्था होऊन गेली भागवताच्या एकादश स्कंधाच्या सात, आठ, नऊ या अध्यायांत दत्तावधूतांनी आपल्या चोवीस गुरूंचे केलेले वर्णन नाथांनी आणखीनच रसाळपणे सांगितले आहे या यदुअवधूत संवादा-तील अवधूत म्हणजे दत्तच असे नाथ म्हणतात 'तो अवधूत जाण दत्तात्रेया' असे नाथांचे या संदर्भात वचन आहे नाथांची गुरुभक्तीही त्यांच्या दत्तप्रेमास साजेशी होती नाथांची दत्तभक्ती

चिती गाढ होती व दत्ताची नाथावर केवढी प्रीती होती हे समकालीन दत्तभक्त दासोपंतानीच एका प्रसंगी सांगितले आहे 'दत्तात्रय घरूनि दार। रक्षी होऊनि चोपदार॥' नाथाच्या दारावर दत्तात्रेय चोपदार बनून त्याचे रक्षण करतात अशी दासोपंताची साक्ष आहे अशा या एकनाथाच्या दत्तावरील अभंगापैकी चार-पाच अभंगाचा येथे निर्देश करू.

(१) दत्त माझा दिनानाथ। भक्तालागी उभा सतत ॥ १ ॥ त्रिशूल घेउनिया करी। उभा असे भक्तद्वारी ॥ २ ॥ भाळी चर्चिली विभूति। रुद्राक्षाची माळ कंठी ॥ ३ ॥ जवळी असे कामधेनु। तिचा महिमा काय वानू ॥ ४ ॥ एका जनार्दनी दत्त। रूप राहिले हृदयात ॥ ५ ॥

(२) दत्त माझी गाय। आम्हा सुखा उणे काय ॥ १ ॥ नित्य प्रीति दत्तनामी। दत्त वसे गृहारा ॥२॥ दत्ताविण नसे दुजे। दत्त मायबाप माझे ॥ ३ ॥ दत्तात्रय दत्तात्रय। नाही कळिकाळाचे भय ॥४॥ एका जनार्दनी दत्त। नित्य देखे हृदयात ॥ ५ ॥

(३) माझी माता दत्तगुरु। मज तिचाचि आधारु ॥१॥ तियेविण मजलागी। कोण रक्षील सर्वांगी ? ॥२॥ दत्त माझा आधार। त्यासी चिंती वारंवार ॥३॥ निर्विकार निरंजन। स्वामी माझा दत्त जाण ॥४॥ एकाजनार्दना दत्त। नित्य देखे ध्याना आत ॥ ॥ ५ ॥

(४) हाती कमंडलु दंड। दत्तमूर्ती ती अखंड ॥१॥ ध्यान लागो माझे मना। विनवितो गुरुराणा ॥ २ ॥ अंगी चर्चिली विभूती। हृदयी वसे क्षमा शांति ॥ ३ ॥ तोचि चित्तात आठव। गुरुराज दत्तदेव ॥ ४ ॥ एकाजनार्दनी दत्त। तद्रूप झाले हे चित्त ॥५॥

(५) मनासी स्थिरता नामे दत्तवेध। दुजा नाही छंद आणिक काही ॥ १ ॥ म्हणोनी ममत्व दूर सारुनी पायी। दत्तापासूनी ठाई मोठे पाही ॥ २ ॥ पाहता पाहणे परतले मन। पाहण्याचे विदान विसराल ॥ ३ ॥ एकाजनार्दनी परब्रह्म पुतळा। दत्त देखिला डोळा आत्मदृष्टी ॥ ४ ॥

(६) दत्त सबाह्य अंतरी। दत्तात्रय चराचरी ॥ १॥ दत्तात्रेय माझे मन। हरोनी गेले मीतूपण ॥ २ ॥ मुळी सिंहाद्री पर्वती। दत्तात्रये केली वस्ती ॥ ३ ॥ भक्ता मनी केला वास। एका जनार्दनी विश्वास ॥ ४ ॥

# ७. दासोपंत

## (शके १४७३–१५३७)

बिदरच्या बहामनीशाहीतील नारायणपेठ नावाच्या गावी दिगंबरपंत देशपांडे यांच्या घरी भाद्रपद व ८, शके १४७३ रोजी दासोपंताचा जन्म झाला घराण्यात चांगली श्रीमंती नांदत होती याच वेळी प्रांतात मोठा दुष्काळ पडला म्हणून दिगंबरपंतानी आपल्या अधिकारात सरकारी कोठारातील धान्य भुकेलेल्याना वाटून टाकले या धान्याच्या रकमेची भरपाई वेळेवर खजिन्यात झाली नाही यामुळे बादशहा नाराज झाला बादशहाने दासोपंतास ओलीस ठेवून दिगंबरपंतास बजावले की, 'एक महिन्यात बाकी चुकती झाली नाही तर पोरास मुसलमानी दीक्षा देऊ' दिगंबरपंत व दासोपंत या उभयतांनी दत्तप्रभूची करुणा भाकली दत्ताजी पाडेवार नावाच्या एका दत्तस्वरूप विभूतीने रक्कम सरकारात भरून दासोपंताची सुटका केली दासोपंत मुक्त झाल्यामुळे सर्वांना आनंद वाटला तरी खुद्द दासोपंताची चित्तवृत्ती वैराग्याने उजळून निघाली त्याना अस्वस्थता वाटत राहिली ज्या दत्तप्रभूने आपणास वाचविले त्याचाच शोध घेण्यासाठी ते एकाएकी घरातून निघून बाहेर पडले.

हिलालपूर, डाबुळगी, प्रेमपूर, नांदेडवरून ते मातापूर तथा माहूर या क्षेत्री आले तेथील निसर्गरम्य परिसर, रेणुकामातेचे दर्शन, दत्त-

अनसूचे दर्शन, मातृतीर्थावर स्नान इत्यादीत त्याचे मन रमले ध्यानधारणेस अतिशय अनुकूल अशा या ठिकाणी दासोपतानी दत्तभक्तीचा अनुभव येथेच घेतला ते माहूर येथे सुमारे बारा वर्षपर्यंत दत्तसेवेत रमून गेले त्यानतर ते पुन्हा सचारास निघाले राक्षसभुवन येथील गोदामाईच्या वाळवटात त्याना दत्तपादुकाचा प्रसाद मिळाला येथेच त्याना एकान्तवासात अवधूताचे दर्शन झाले. त्यानतर ते पुन डाकुळगीस आले कृष्णाजीपतास येथे त्यानी एक दत्तमूर्ती नित्याच्या उपासनेसाठी देऊन ते वाणीसगमी आले येथेच त्याना त्याच्या घरचा परिवार भेटला बारा वर्षे पतीचा पत्ता नसल्यामुळे त्या काळच्या लौकिक रूढीप्रमाणे सौभाग्यचिन्हाचा विधिपूर्वक त्याग करण्यासाठी दासोपताची पत्नी आपल्या घरच्या लोकासमवेत येथेच आली होती अशा या नाट्यपूर्ण प्रसगात सर्वांचे मीलन झाले वाघेश्वराच्या मदिरात दासोपत आपल्या आईवडिलाना व पत्नीला भेटले सर्वांना अतिशय आनद झाला दासोपतानी नारायणपेठ येथील आपल्या वतनाचे दानपत्र करून ते कायमचे राहाण्यासाठी म्हणून आबेजोगाईस येऊन स्थायिक झाले

सितोपत देशपाडे यानी त्याचे शिष्यत्व पत्करून आबेजोगाईस दासोपताची सर्व व्यवस्था लावून दिली या ठिकाणी दासोपतानी अखडपणे लेखन करून मराठी शारदेस उत्कृष्ट नजराणे समर्पित केले 'गीतार्णव' नावाचा त्याचा एक ग्रथ सव्वा लाख ओव्याचा आहे ग्रथराज, वाक्यवृत्ती, पचीकरण, पदार्णव, अनुगीता, महापूजा, वज्रपजरकवच अशी त्याची लहानमोठ्या प्रमाणावरची रचना विपुल आहे दत्तात्रेयाचा महिमा तर त्यानी अनेक पदातून गायिला आहे दासोपताच्या दत्तोपासनेची पद्धतही वैशिष्ट्यपूर्ण आहे दासोपताच्या परपरेत दत्तात्रेयाचे सोळा अवतार प्रसिद्ध असून सतरावा अवतार म्हणजे स्वत दासोपत असून त्याचा उल्लेख 'श्रीसर्वज्ञावतार' म्हणून होतो उपासनेची त्यानी ठरवून दिलेली पद्धती अजून चालू आहे 'प्रत्येक दिवशीचा उपासनाविधी, सात वाराची वेगवेगळी भजने, पर्वकाळाची आणि उत्सवाची विशेष भजने, पदे, आरत्या, शेजारत्या, अष्टके, स्तोत्रे हे सर्व त्यानी आखून व रचून ठेविले आहे विशिष्ट प्रसगी करावयाची ललिते, सगीत, टिपऱ्या याचीही रचना केलेली आहे नित्यासाठी दशनाम, शतनाम, सहस्रनाम, स्तवराज माहात्म्ये हीही तयार करून दिलेली आहेत . उत्सवपद्धती, सेवा, अर्चन, उत्तरार्चन याची देखील शिस्त त्यानीच घालतेली आहे मूर्तीच्या नित्य स्नानासाठीही काही नियम आहेत 'आनदें दत्तात्रेय देवदेव' हा दासोपतपरपरेतील जयघोष आहे' (दासोपताची पासोडी न शे पोहनेरकर, प्रस्तावना, पृष्ठ १७)

दासोपतानी वरीलप्रमाणे दत्तोपासना दृढ चालावी म्हणून दत्तात्रेयावर अनेक प्रकारची स्फुट व प्रकरणात्मक रचना केली आहे अवधूतराज, दत्तात्रेयमाहात्म्य (सस्कृत), *अवधूतगीता, दत्तात्रेयसहस्रनामस्तोत्र, दत्तात्रेयदशनाम*-स्तोत्र, दत्तात्रेयषोडशनामस्तोत्र, शतनामस्तोत्र, द्वादशनामस्तोत्र, सिद्ध दत्तात्रेयस्तोत्र, गुरुस्तोत्र, दत्तात्रेय नामावळी, षोडशअवतारस्तोत्र, षोडशअवतार प्रादुर्भावस्तोत्र, षोडशअवतारध्यानस्तोत्र इत्यादी प्रकरणे दासोपताच्या परपरेत नित्य म्हटली जातात दासोपताची दत्तात्रेयावरील पदे अतिशय नादमधुर व भक्तिरसपूर्ण आहेत दत्ताविषयी दासोपताना वाटणारी करुणा, आशा, भक्ती याचे मूर्तिमत दर्शन दासोपताच्या पदातून व्यक्त होते 'तुम्ही जा, जा वो झडकरुनी त्यासी येईं जा घेऊनी', 'चालता बोलता तुझें रूप ध्याईन !', 'बोलविता न बोलसी, ऐसें म्या वो काय केलें ?' 'जपुतपु तीर्थाटण माझें हेंचि ब्रह्मज्ञान' इत्यादी ओळीतून दासोपताच्या

हृदयातील आर्तता जाणवण्यासारखी आहे दासोपंताची दत्तविषयक काही पदे येथे नमुन्यासाठी देत आहे

(१) प्रतिदिनी प्रतिक्षिणी भासतासि, व्रत करणी आणिता विसरु नये, न गमे विपयो मनी ॥ १ ॥ ध्रु० ॥

आता, मजसी भुलली माये ! चित्त विपरीत बोधन बोधासी न ये, न कळे हीत विहीत ॥छ॥

आशका नुरे भावे बोधली येणें जीवे । दिगबरु आत्मा सैये ! जीविचा जिवनु जिवे ॥ २ ॥

(२) बहु दिवस क्रमले, सखिये ! मी काये करु भेटी न ये अवधूत, याचे पाये धरू ॥ १ ॥ ध्रु ॥

भेटीचे आरत माझा परिपूर्ण करा।

मन माझा उतावीळ पाहिन महियेरा ॥ छ ॥

वाट पाहता कुठली गति, मति आठवण।

दिगबराचे भेटणे मनी मारूनि मन ॥ २ ॥

(३) लोक बोलती ते मी साहीन, जनाचे अपवाद साहीन ॥ ० ॥

अवधूतपथ मी जायीन, करू नये, ते मी करीन ॥ ■ ॥

बोलो नये ऐसे करीन, देवोचि स्वय होयीन ॥ १ ॥ ध्रु ॥

अरे मना ! अरे मना ।

मना रे ! मना रे ! अरे ! अरे ! मना रे तुजवीण मना नाही दुसरे ॥ छ ॥

क्रिया कर्म त साडीन, गुणाचे व्यापार निरसीन, न करणे कर्म करीन, दिगबर मी ऐसे ध्यायीन, आत्मा अवधूत उमजेन, भेटूचि वळि तेथ देयीन ॥ २ ॥

(४) चद्र वो ! चादिणे चदन आगी न साहे वियोग-तापु तपे, तपिया तापनु सुमन सेज, करू काये ? ॥१॥ ध्रु ॥

सखिये ! सावळया सुदरा ! वेधले माझें मन वो ! गुपल अतःकरण देह गेह सुख साडुनि सर्वही -लागल अखड ध्यान ॥ छ ॥

दीपक निर्दीप, गायन खोचती बाण वो ! शब्द खरतर बाण !

दिगवरेविण शरीर आपुले साडीन, हे मीपण ॥२॥

(५) आपुला तू कैसा होसी ? चरण झाडीन केसी अवधूता ! साग माते तें पद देसी ॥ १ ॥ध्रु॥

बापा ! तुझे ध्यान कयी अनुश्रुत लागेल हृदयी ? ॥छ॥ दिगबरा ! तुझी माया, सूर मोहले जीया, न तरवे, जाण, आत्मा साधन-क्रीया ॥२॥

(६) दत्ते धेनूचे मी वत्स धाकुले वो ! वत्स धाकुलें वो !

मागुताहु येकु पान्हा वो ! कैसी देउ निपाली ! लागो नेदी मज थाना वो ! कैसे ल्लाट माझें ! बोलु मी ठेउ हा कवणा ? वो ! मी पोटिचे वाळ आहे नाही कळेना वो ! ॥ १ ॥ ध्रु ॥

अवो ! अवो ! सुदरे ! अवो ! सुदरे ! वो !

अवो ! सुदरे ! वो ! अवो ! सुदरे ! वो !

हृदय उल्लताहे माझें वो !

दुःख कवणासि सागो ? आहारु दूजा नेणिजे वो ! नवमास पोटी होतिय कैसी वो ! होतिये कैसी वो ! तुझेनि स्वरस घाली वो ! जन्मु का मज दियला उपेक्षा कासया केली ? वो ! आता येथूनि तन्ही जेथिची तेथें मज घाली वो !

दिगवरे ! माये ! भारी होती आस केली वो !

## ८. मुक्तेश्वर

### (इ. स. चे सतरावे शतक)

एकनाथाचा हा नातू म्हणजे मुलीचा मुलगा आपल्या आजोबाप्रमाणेच दत्ताचा उपासक होता याच्या वडिलाचे नाव चितामणी, आईचे सासरचे गोदावरी व माहेरचे गगाबाई होते याचा कुलदेव सोनारीचा भैरव असून कुलस्वामिनी कोल्हापूरची महालक्ष्मी होती मुक्तेश्वराच्या कुळात दत्तात्रेयाची उपासना त्याच्या 'लीला विश्वभर' या अवताराची होती 'ॐ नमोजी विश्वभरू । तो देव दत्तात्रेय जगद्गुरू ', 'पुराण पुरुषेश्वरा गुरुमूर्ती

दातारा लीला विश्वभरा दत्तात्रेया ' असे याने म्हटले आहे कोणी लीलाविश्वभर हे मुक्तेश्वराचे गुरुही मानतात महाभारताची आदी, सभा,वन, विराट आणि सौप्तिक ही पर्वे, रामायण, गरुडगर्वपरिहार, हरिश्चद्राख्यान एकनाथचरित्र अशी काही वाङ्मयसपदा मुक्तेश्वराची उपलब्ध आहे काही आरत्या, पदेही मुक्तेश्वराच्या नावावर मिळतात भाषासौदर्य, वर्णनशैली, निसर्गवर्णन इत्यादी बाबतीत मुक्तेश्वराचा हात धरणारा कवी प्राचीन काळात कोणी दुसरा नाही

याला रामायणरचनेची स्फूर्ती नरसोबाच्या वाडीस झाली असावी 'पवित्र सरिता कृष्णवेणी पचगगा समस्थानी । नृसिंहसरस्वतीचे चरणी । प्रथमप्रसाद लाधला ।।' असे याने म्हटले आहे तेरवाड येथे मुक्तेश्वराचे दत्तमदिर असून तेथे त्याच्या पूजेतील दत्तात्रेयाच्या पादुका आहेत ' विश्वेश लीलाविश्वभरु । दत्तात्रय जगद्‌गुरु । तत्प्रसादे मुक्तेश्वरु । निरोपी ते परिसावे ।। चिन्मूर्ति लीलाविश्वभरु । दत्तात्रय जगद्‌गुरू । त्याचेनि नामे मुक्तेश्वरू । कथा बोले भारती ।।' अशा अनेक ठिकाणी त्याने उल्लेख केलेले आढळतात

मुक्तेश्वर हा शिवाचा उपासक असल्यामुळे त्याने शिवरूप दत्ताची आराधना केलेली दिसते 'का नाभिपादात कमळासनु । मध्यकठात रमारमणु । स्वधावरुता त्रिलोचनु । अत्रतयी जो येकु ' अशी त्रिमूर्ति शिवाची म्हणजे दत्तात्रेयाची कल्पना त्याने केलेली आहे

## ९. महिपतिदास योगी

### (सन १६११–१६९८)

सतराव्या शतकात बागलकोटहून येऊन विजापूरला स्थायिक झालेल्या रामभट कायवटे याचे हे नातू हा मोठा योगी होईल असे भविष्य प्रल्हाद कृष्णाचार्यांनी वर्तविले होते लहानपणीच सर्व शास्त्रात पारगत झाले गोलघुमटाचा निर्माता महमद आदिलशहा गादीवर असताना यानी विजापूर येथील नृसिंहमदिरात प्रवचने करून लौकिक सपादन केला बादशहा व त्याचे सरदार यानाही याच्या प्रवचनाची गोडी असे अनेकाना दीक्षा दिल्यानतर ते काखडकोस येऊन स्थायिक झाले त्याना मराठी, कन्नड, तेलगू सस्कृत उर्दू, पारशी इत्यादी भाषा येत असत विविध भाषातून त्याची पदरचनाही आहे गृहस्थाश्रमी महिपतीदासानी आपल्या वडिलाकडूनच उपदेश घेतला होता याचे आठवे वशज श्रीपतय्या सोमय्या हरिदास यानी याची माहिती प्रथम उजेडात आणली याचे एक मराठी पद देण्यासारखे आहे

दत्तदिगबरु तूचि माझा गुरु ।
जाणा तो निर्धारु स्वामी माझा ।। ध्रु ।।
दत्त द्वित्ताक्षर नाममत्र थोर ।
दत्त हो सचार तारीयेला ।।१ ।।
दत्त दत्त म्हणता अदत्तपण गेला ।
दत्त हे लाधला दत्तपण ।। २ ।।
दत्त आत्माराम दत्त देवोत्तम ।
दत्त भवश्रम निरसियेला ।। ३ ।।
दत्त पाहता जेथ, आहेच तो तेथ ।
दत्तावीण रिता ठाव नाही ।। ४ ।।
दत्त माझा प्राण सद्‌गति साधन ।
बाह्यातर परिपूर्ण देव माझा ।। ५ ।।
दत्त माझी माता दत्त माझा पिता ।
महिपतीचा दाता दत्त एकु ।। ६ ।।

## १०. किनाराम अघोरी

### (सन १६२०–१७७२)

एक प्रसिद्ध दत्तोपासक म्हणून बाबा किनाराम अघोरी याचे नाव उत्तर भारतात प्रसिद्ध आहे काशीला याचा मठ असून भाद्रपदात याच्या भक्तगणाचा मेळावा भरत असतो वाराणशी-

जिल्ह्यातील चंदौली तहसीलमधील रामगढ नावाच्या गावात एका रघुवंशीय क्षत्रिय घराण्यात सन १६०० ते १६२० च्या दरम्यान केव्हा तरी किनाराम यांचा जन्म झाला. हे घराणे धार्मिक वृत्तीचे होते. लहानपणीच बालकाच्या अंगावर महापुरुषाची लक्षणे दिसत होती. वटवृक्षाखाली बसून ध्यानधारणा करण्याची सवय त्याला बालपणीच लागली. त्याला लग्न करण्याची इच्छा नसतानाच घरातील वडील मंडळींनी त्याचे लग्न ठरविले. घरात नवरी मुलगी येण्यापूर्वीच ती मरण पावली. लोकांना फार वाईट वाटले. पण विरक्त किनारामच्या मनात चक्र सुरू झाले. घरातून गुपचुपपणे बाहेर पडून त्याने गुरूचा शोध केला. गाजीपुर जिल्ह्यातील कारो गावी तो पोचला. तेथे श्रीशिवरामजी नावाचे एक रामानुज संप्रदायी सत्पुरुष होते. तेथे किनाराम त्यांची सेवा करण्यासाठी थांबला.

एकदा शिवरामजी किनारामला घेऊन गंगा नदीवर स्नानासाठी गेले. गंगेच्या काठावर उभे राहून तिची स्तुती करीत असताना गंगेच्या पाण्याच्या एका लाटेने किनारामच्या पायाना स्पर्श केला. हा पुरुष पुढे मोठा साधू होणार असल्याची खात्री शिवरामजींना पटली. दरम्यान शिवरामजींची पत्नी मरण पावली. त्यांनी दुसऱ्या लग्नाचा विचार केला. 'तुम्ही दुसरे लग्न कराल तर मी दुसरा गुरू करीन' असे किनारामने सांगितले तरी त्यांनी दुसरे लग्न केले. तेव्हा किनाराम नैगडही नावाच्या गावी आला या ठिकाणी त्याने एक चमत्कार केला. तेथील एका म्हातारीच्या मुलाचे जमीनदाराचे पैसे चुकते करण्यासाठी किनारामने जमीनदारास मुलाच्या पायाखालील जमीन खणण्यास सांगितले. खणल्यानंतर सुवर्णमुद्रांनी भरलेला कलश निघाला. म्हातारीचा मुलगा किनारामचा शिष्य झाला. याचे नाव विजाराम ठेवून हे दोघे गुरु-शिष्य गिरनार पर्वताच्या यात्रेकडे निघाले. अम्बामाता, गोरक्षनाथाची धुनी इत्यादींचे दर्शन किनाराम यांनी घेतले. गुरुदत्तशिखरावरील पादुकास्थानी एकट्या किनारामांनी सात दिवस उपास केला. गोरक्षनाथांनी त्यांना उपदेश दिला.

अवधूतश्रेष्ठ श्रीदत्तात्रेय यांचा निवास याच गिरनारवर असल्याने त्यांच्याही भेटीची आस किनारामांना होतीच. गिरनार पर्वतास प्रदक्षिणा घालण्यासाठी किनारामनी जंगलात प्रवेश केला. घनदाट अरण्यात त्यांचा रस्ता चुकला. अंधार पडल्यावर वाट सुधारेनाशी झाली. 'गिरनारी, तेरा भरोसा भारी' असा तीन वेळा उच्चार करून किनारामजींनी समोर पाहिले. दूर एक पेटलेली धुनी त्यांना दिसली. धुनीच्या समोर एक पिंगल जटाधारी अंगावर मृगाजिन पाघरून तपस्वी बसलेला त्यांनी पाहिला. या तपस्व्यास त्यांनी मनोभावे नमस्कार केला. तपस्व्याने चिमट्याने धुनीतून तीनचार कंदमुळे बाहेर काढून ती किनारामांना खायला दिली. किनारामची तहानभूक हरपली. एका नव्या दिव्यशक्तीचा संचार त्यांच्या अंगी झाला. तपस्व्याने किनारामास विचारले, 'इतक्या रात्री तू या जंगलात का आलास?' त्यावर किनाराम म्हणाले,

'पुरी द्वारिका गोमती गंगासागरतीर।<br>
दत्तात्रय मोहि कहँ मिले हरन महाभव पीर॥'

किनारामची ही निष्ठा पाहून तपस्व्याच्या रूपात असलेल्या दत्तप्रभूंनी आपले शिवस्वरुपाचे दर्शन घडविले. किनारामांना जवळ बसवून त्यांच्या उजव्या कानात अघोरमंत्राची दीक्षा दिली. मस्तकावर हात ठेवून त्यांच्यांत दिव्य शक्तिपात घडवून आणला. 'विवेकसार' नावाच्या आपल्या काव्यात किनाराम या प्रसंगासंबंधी म्हणतात,

अति दयाल मम सीसपर कर परस्यो मुनिराय।<br>
ज्ञान विज्ञाभ भक्तिदृढ, दीन्हो हृदय लखाय॥

दत्तप्रभूंच्या साक्षात्काराची दिव्य अनुभूती वर्णन करताना किनारामजींनी म्हटले आहे,

सतगुरु निरखत शिष्यको, भयो परम उत्साह।
चरनबंदी बोलत भयो, लह्यो, सर्वे कोलाहू॥

यानंतर किनाराम यांनी अवधूतस्वरूप, तत्त्वज्ञान, अवस्था इत्यादीचे ज्ञान दत्तगुरूंकडून घेतले. रात्रभर प्रभूपाशी वार्तालाप करून किनाराम यांनी स्वानंदाची लयलूट अनुभवली. या अनुभवाचे सार सांगताना ते म्हणतात,

कृपा करयौ अनुभव कह्यौ, काया कमल प्रकास।
अलखरूपको ज्ञान कहि, दिया मोहि विश्वास॥
अति अगाध अतिसय अगम, व्यापक सर्व समान।
बिनु गुरूकृपा कोउल है, रामकिना निरवान॥

रात्र संपताच दत्तप्रभूंनी किनाराम यांना गिरनारची प्रदक्षिणा पूर्ण करण्यास सांगितले. हिमालयाची यात्रा करून काशीस वास्तव्य करण्याचा आदेश मिळाला. यानंतर दत्तप्रभू अदृश्य झाले. किनारामांना एक नवी शक्ती अंगात संचारलीसे वाटले. किनाराम गिरनारप्रदक्षिणा पूर्ण करून जुनागढला आले. तेथे त्यांचा शिष्य बिजाराम राहिला होता. तेथील राजाने त्याच्यासकट साधूना पकडून तुरुंगात टाकले होते. किनारामांना तुरुंगात जावे लागले. नबाबास अद्दल घडवावी म्हणून किनारामांनी एक चमत्कार केला. तुरुंगातील सर्व जाती आपोआप फिरू लागली. नबाबास आपली चूक समजून आली. त्याने किनारामांचा आदरपूर्वक सत्कार केला. नबाबाने गिरनारच्या यात्रेकरूंसाठी एक अन्नछत्र सुरू केले.

यानंतर किनाराम-बिजाराम या जोडीने हिमालयाची यात्रा केली. चारी धाम, जमनोत्री, गंगोत्री, केदारनाथ, बदरीनाथ करून ते काशीस आले. तेथेही त्यांनी अनेक प्रकारचे चमत्कार करून लोकांना दिपविले. काळूराम नावाच्या एका अघोरी अवलियाच्या रूपात दत्तप्रभूंनी किनारामांची वारंवार परीक्षा घेऊन सिद्धींचा व्यर्थपणा पटवून दिला. यासंबंधी किनारामांनी म्हटले आहे,

कीना कीना सब कहै, काळू कहै न कोय।
कालू कीना एक भये, राम करे सो होय॥

येथून पुढे किनारामजींचे वास्तव्य कृमीकुंडाजवळच चिंचेच्या झाडाखाली दत्तांच्या आज्ञेने होऊ लागले. त्यांच्या शरीरस्पर्शाची चिंचेची पाने गोड लागत. त्यांच्या शरीरातून कधी कधी सुगंध बाहेर पडे. त्यांना हुक्का पिण्याचा व संगीताचा मोठा षोक होता. या स्वामी असतानाही त्यांनी अद्भुत लीला दाखवून आपले सामर्थ्य प्रकट केले. किनाराम अघोरी हे संत तुलसीदासांच्या काळातच काशीत नावारूपास आले. शिवस्वरूपी अघोरी किनारामने काशीच्या एका श्रीमंत व्यापाऱ्याची पुत्रप्राप्तीची इच्छा पूर्ण केली. तुलसीदासांनी व त्यांच्या रामाने या व्यापाऱ्यास दहा जन्मांत पुत्रयोग नसल्याचे सांगितले होते. यावरून त्या वेळी एक म्हणही प्रसिद्ध झाली ती अशी, 'जो न करे राम, सो करे किनाराम.'

अशा रीतीने किनारामबाबांचा महिमा वाढत होता. त्यांनी आपल्या शिष्यांना आपल्या निर्वाणाचा दिवस वेळेसहित अगोदर सहा महिने सांगितला होता. त्यानुसार सन १७७२ मध्ये ते योग्य वेळी सिद्धासन घालून बसले. गुरुदत्ताचे ध्यान त्यांनी सुरू केले. तीन वेळ प्रणवाचा उच्चार करून त्यांनी आपल्या रूपास निरंजनरूपात सामावून टाकले. निर्वाणसमयी त्यांचे वय षोडशेहून अधिक होते. कृमीकुंडपाशी त्यांना विधिपूर्वक समाधी त्यांच्या शिष्यांनी दिली. आजही त्यांचे शिष्य सांगतात की, विशिष्ट दिवशी समाधीतून सुगंध बाहेर पडून आसमंतात दरवळतो. रात्रीच्या वेळी वाद्ये ऐकू येतात. मधुर संगीताच्या लकेरी ऐकू येतात. कोणाकोणास किनारामबाबांचे दर्शनही होते.

## ११. सिद्धेश्वर महाराज

### (सुमारे सतरावे शतक)

बिदर जिल्ह्यातील बिदर गावापासून सुमारे आठ मैलांवर सिद्धपूर (साधोघाट) हे कर्नाटकातील प्रतिपंढरपूर म्हणून प्रसिद्ध क्षेत्र आहे. येथे आजही निबिड अरण्य असून सुमारे तीनशे वर्षांपूर्वी एका गरीब कुटुंबात शंकराच्या कृपाप्रसादाने एक बालक जन्मास आले. या बालकाने वयाच्या आठव्या वर्षापासूनच तपश्चर्येस आरंभ केला. त्याने विठ्ठलाचा साक्षात्कार झाल्यानंतर विठ्ठलाच्या मृण्मयी मूर्तीची उपासना चालू केली. येथील विठ्ठलाच्या गर्भगृहाच्या मागे एक विहीर असून तेथे दत्तात्रेयांचा गुप्त वास आहे, असे सांगतात की, या स्थानातील केरकचरा पहाटे तीन ते पाचच्या वेळात आपोआप गोळा होतो. पांडुरंगाच्या नजीक असलेल्या दत्तप्रभावामुळे चमत्कार होत असल्याच्या हकीकतीही मिळतात.

## १२. निपटनिरंजन

### (सन १६२३–१७३८)

हे एक संतकवी असून यांचा जन्म बुंदेलखंडातील चंदेरी गावी चिझौतिया जातीच्या गौड ब्राह्मण कुळात झाला. लहानपणापासून यांच्या मनावर धार्मिक संस्कार होते. संत दादू दयालाची भजने हे आवडीने गात. सन १६६२ च्या सुमारास आपल्या वृद्ध मातेला घेऊन हे बऱ्हाणपूरमार्गे औरंगाबादेस आले आणि तेथेच राहू लागले. औरंगपुऱ्यात एकनाथमंदिराजवळ चिलखते वगैरे बनविण्याचा यांचा छोटा व्यवसाय असे. परंतु धंद्यात अपयश आल्याने हे निराश झाले. वृद्ध आई मृत्यू पावली तेव्हा गरिबीमुळे त्यांना तिचा अंत्यसंस्कारही नीटसा करता आला नाही. आईच्याच चितेवरची राख अंगाला फासून हे पूर्ण वैरागी बनले., ध्यानधारणा व योगसाधनांत त्यांचा काळ जाऊ लागला. काही दिवसांनी मठाच्या बागेतच यांना दत्तदर्शन झाले. कोणा चर्पटनाथ नामक साधुपुरुषाकडून यांनी देवगिरीवर गुरुपदेश घेतला. अष्टमहासिद्धी त्यांना प्राप्त झाल्या. प्रत्यक्ष औरंगजेबावरही या योगी पुरुषाच्या सामर्थ्याचा प्रभाव पडला. त्यांची काही पदे व दोहे प्रसिद्ध आहेत.

## १३. विरूपाक्षबुवा नागनाथ

बेळगाव जिल्ह्यातील तालुका चिक्कोडीपैकी हत्तरवाट हा गाव चिक्कोडी, निप्पाणी व संकेश्वर या त्रिकोणात २८०७ फूट उंचीवर आहे. तेथील दरीत श्रीविरूपाक्षबुवा नागनाथ स्वामी महाराज या महान् सत्पुरुषांच्या पुरातन जिवंत समाध्या आहेत.

योगाभ्यासाकरता जागा कशी असावी याचे वर्णन ज्ञानेश्वरी अध्याय सहावा ओव्या १६४ ते १८० मध्ये केले आहे.

हे वर्णन हत्तरवाट येथील श्रीसद्गुरूंच्या समाधिस्थानास अगदी योग्यपणे लागू पडते. या दोनही समाध्या चोहोंबाजूंनी वेष्टिलेल्या हिरवळदरडीच्या मध्यभागी असून त्यांच्या लगत अगदी जवळून वाहणाऱ्या दोन ओढ्यांचा मनोहर संगम झाला असून तेथे बारमहा पाणी असते. गाईवासरांचे कळप चरताना दिसतात. समोर वटवृक्ष असून त्याच्या पारंब्यांची झाडे मनुष्याच्या मिठीत मावत नाहीत. त्या वृक्षशाखांची शीतल छाया श्रीसमाधीवर असून समाधीपुढे हजारो जनसमुदाय ह्या रम्य छायेत बसू शकतो. बाजूस औदुंबर, अश्वत्थ, चिंच वगैरे वृक्ष आहेत. या वृक्षावर मोर, कोकिळ, सारस, पोपट वगैरे अनेक पक्षी विहार करतात. मधुमक्षिकांची पोळी तेथे दिसतात. त्या जागेपासून थोड्याच अंतरावर पूर्वेस श्रीसिद्धेश्वराचे पुरातन शिवालय, पश्चिमेस

श्रीलक्ष्मी डोंगर व शिवालय व उत्तरेस श्रीमरगाईदेवालय आहे. मधून मधून गाई चारवणाऱ्या गोपालांच्या मुरलीचे नाद व त्याच्या गायनाचे आलाप ऐकू येतात. श्रीसमाधीपुढे बसल्यावर सर्व तहानभूक हरते व संसाराचाही विसर पडतो. श्रीच्या समाधी म्हणजे दोन तुलसीवृंदावने होत. तोंडाची समाधी श्रीनागनाथस्वामी महाराजाची असून दुसरी श्रीविरूपाक्षबुवा याची समाधी आहे. समोरील बाजूस शंकराची पिंडी असलेली श्रीशिष्य सखारामबुवा याची समाधी असून अंदाजे शे-दोनशे हातावर श्रीचे शिष्य कासार याची समाधी आहे. श्रीविरूपाक्षबुवा नागनाथ स्वामीमहाराज यांच्या समाधीवर शिलापादुका आहेत. हे स्थान हत्तर गावापासून तीन-चार फर्लांगावर डोंगराच्या घळीत आहे. समाधीच्या बाजूसच श्रीविरूपाक्षबुवांच्या कुटुंबाची सती गेल्याची जागा म्हणून परंपरेने दाखविण्यात येते.

प्रतिवर्षी भाद्रपद वद्य सप्तमी, अष्टमी व नवमी या तीन दिवशी श्रीचा (नागनाथस्वामी महाराज) यांचा पुण्यतिथीचा उत्सव आजवर श्रीच्या पुण्याईने चालत आला असून दशमीस ललित होऊन सकाळी उत्सवसमाप्ती होते. बराच समाज जमतो. उत्सवात वेदपारायण, ज्ञानेश्वरी, श्रीगुरुचरित्र, दासबोध आदी धर्मग्रंथांचे पारायण, श्रीसमाधीना रुद्राभिषेक, रात्री भजन-कीर्तन वगैरे कार्यक्रम होत असतो. पूर्वी हा उत्सव डोंगरातच श्रीसमाधीपुढे होत असे. तेथे गोडया पाण्याची विहीर हल्लीही असून स्वयंपाकगृह समाधीच्या मागच्या बाजूस पडित अवस्थेत आजही दिसते. अलीकडे कालमानानुसार उत्सव गावात होतो. पण अभिषेक रोज समाधीस खाली होऊन नैवेद्यही रोज तेथे जातो. नवमीस मात्र दिंडी समाधीस जाऊन तेथे भजन व काल्याचे खेळ व दहीकाला होऊन मंडळी गावात परततात.

श्रीनागनाथ स्वामी हे कोठचे व हत्तरवाटला केव्हा आले व त्यांनी समाधी कधी घेतली याबाबत कागदोपत्री अशी माहिती महात्मा गांधींच्या वधानंतर झालेल्या सार्वत्रिक जाळपोळीत नाश झाली. त्यामुळे ती आता उपलब्ध होणे अशक्य आहे. परंपरेने ऐकून माहिती असलेली हकीकत अशी . श्रीगुरुचरित्रकार सरस्वती गंगाधर याचे पूर्वज व श्रीनरसिंहसरस्वतीचे शिष्य श्रीसायदेव याचे ज्येष्ठ सुत म्हणून जे नागनाथ तेच हे, असा पूर्वीपासूनचा समज आहे. हा केवळ समज. कागदोपत्री आधार सध्या उपलब्ध नाही हे वर दिलेच आहे. श्रीविरुपाक्षबुवा हे आमचे पूर्वज असून ते भाग्यनगर अथवा हैद्राबादकडे मामलतीच्या हुद्यावर असताना श्रीनागनाथस्वामी यांचेशी त्यांचा संबंध आला व नोकरी सोडून ते श्रीनागनाथस्वामींचे शिष्य झाले. पुढे ही गुरुशिष्यांची जोडी फिरत फिरत आपल्या मूळ गावी म्हणजे हत्तरवाट येथे आली व शेवटी त्या उभयतांनी जिवंत समाधी वरील जागी घेतली. भक्ताचे माहात्म्य वाढवणे देवास प्रिय, शिष्याचे माहात्म्य वाढवणे गुरूस प्रिय.पुंडलीक वरदा हरि-विठ्ठल, राधाकृष्ण, याचप्रमाणे श्रीविरूपाक्षबुवा नागनाथ स्वामीमहाराज असे गुरुशिष्यांचे नाव रूढ झाले व तेच प्रचारात आजही आहे. पुण्यतिथीच्या वेळी म्हटले जात असलेले एक पद पुढीलप्रमाणे आहे—

गुरुसमर्था । नागनाथा । अवधूता पाहि मा ।।धृ०।।  
हरि गुरुभक्त परायण । विरुपाक्ष पत शिष्य ।  
कुलकर्णी ग्रामकर्ता ।। १ ।।  
शिवमेव सखाराम बुवा । जित समाधीचा ठेवा ।  
कापायार भक्त चौथा ।। २ ।।  
पंचशत वर्षाणि चालु ज्याचि कीर्ति करणी ।  
समाधी संजिवनता ।। ३ ।।  
ब्रिद हल्ली लगत अगदी । हत्तवाट कामीमध्यें ।  
एकाती वास असता ।। ४ ।।  
शुष्क काष्ठी पल्लव फुटले । वटवृक्ष विस्तारले ।  
अश्वत्था द्वितीयपंथा ।। ५ ।।

भाद्रपद वद्य सप्तमि अष्टमी नवमि दिने ।
पुण्यतिथी हरिकथा ॥ ६ ॥
वरदी पुरुष श्रीपाद प्रास्ताविक । नरसिंह विठूचा ।
दुरित हरिता ॥ ७ ॥ (अवधूतमहिमा)

नेहमी म्हटली जाणारी श्रीची आरती पुढील-प्रमाणे आहे–

हत्तरवाट ग्रामी प्रतिवर्षी नियमी ।
उत्सव होतो देखा वृंदावनधामी ।
भाद्रपदासित सप्तमी ते नवमी ।
श्रीनागनाथ गुरूची पुण्यतिथी नामी ॥
जयदेवा जयदेवा गुरु नागनाथा ।
ओवाळित आरति मी प्रेमभरे आता ।
जयदेव जयदेव ॥ १ ॥
तुमचे स्थान मनोहर या खोऱ्यामाजी ।
वाहे ओहळ युतीही सत्जल पूरित जी ।
अश्वत्था सह वट हा शोभति तरुराजी ।
देवा वसला ऐशा रम्य वनामाजी ॥२॥ जयदेव०
शिष्यामध्ये तुमच्या विरुपाक्षचि थोर ।
सत्शिष्य सखारामहि वाणिक कासार ।
भावे पुजुनी तुम्हा तरले संसार ।
सर्वहि गमता आम्हा ब्रह्मचि साकार ॥३॥जय०
उत्सवकाली होतो वेदाचा गजर ।
कीर्तन भजनी डुलती वैष्णव जन थोर ।
दहिकाला मोदभरे करितो नारिनर ।
या परि मुनि हे गमती सकला सौख्य कर
॥ ४ ॥ जयदेव० ॥

शके १८५६ मध्ये प्रस्तुत लेखकानेही श्रीविरुपाक्षबुवा नागनाथस्वामी महाराजस्तवन या नावाने अजनीवृत्तात पहिलेच केलेले काव्य खालीलप्रमाणे–

हिरवळ दरडी चोहिं बाजुनी ।
ओहळ युती ती वाहे मधुनी ।
अश्वत्थाच्या वृक्षावरुनी । पक्षी किलबिलती ॥१॥
वटवृक्षाच्या विस्तृत शाखा ।
रोखुनि धरिली मित्रमयुखा ।
शुक मोरादिक नाचति तोखा । धेनू हुबरती ॥ २ ॥
सुरम्य ऐसे स्थान पाहुनी ।
नागनाथ गुरू जाती मोहुनी ।
ध्यान लाविती मग्न होउनी । ब्रह्मचिंतनात ॥३॥
गाव नजिक जें एक चिमुकलें ।
नामें हत्तरवाट तेथलें ।
कुलकरणी ते शिष्य जाहले । पत विरूपाक्ष ॥ ४ ॥
नागनाथ श्रीसद्गुरु नमले ।
सखाराम ते भक्तचि झाले ।
कामारादिक चेलें बनलें । पूर्ण गुरुभक्त ॥ ५ ॥
शिष्य त्रयही आणि ते मुनी ।
ब्रह्मानदी जाति रंगुनी ।
अखड जागृति समाधि लावुनि ।
वृंदावनि जागी ॥ ६ ॥
गुरुवियोगें दुःखित होती ।
भक्तमडळी विचार करिती ।
गुरुशिष्याच्या स्मृती राखिती ।
समाधि उभवोनी ॥ ७ ॥
समाधि पहिली गुरुरायाची ।
वाम बाजुची विरुपाक्षाची ।
सन्मुख सखाराम लावची ।
तावचि कासार ॥ ८ ॥
होतो हत्तरवाटा माजी ।
उत्सव वार्षिक समाधि कुंजी ।
वद्य भाद्रपद पुण्यतिथी जी सप्तमि ते नवमी ॥९॥
कीर्तन भजनी वैष्णव डुलती ।
ब्रह्मवृंद ते वेद घोषिती ।
ज्ञानेश्वरीचे पाठ चालती । पुण्यतिथीकाली ॥१०॥
दहीकाल्याचा थाट नवमिला ।
हरुष न मावे त्या समयाला ।
गोपालाच्या उत्साहाला । सीमा मुळिं नाही ॥११॥
आदर चरणी सद्गुरुस्वामी ।
करनाजलिही अर्पूनि प्रेमी ।
विश्वनाथ हा राधेय नमी । वशज विरुपाक्ष ॥१२॥

— वि के कुलकर्णी, हत्तरवाटकर

# १४. नारायणस्वामी

## (समाधी सन – १८०५)

श्रीनारायणस्वामी-पूर्वाश्रमात विसापूर ग्रामनिवासी गार्ग्यगोत्री ऋग्वेदी देशस्थ महाराष्ट्र ब्राह्मण उपनाव जोशी पूर्ववयात विद्या व सदाचारसपन्न असल्याने त्या प्रातात विद्वन्मान्य होते. पहिली पत्नी परलोकवासी झाल्यावर कोल्हापूर प्रातातील तारळे गावातील श्री रामदीक्षित गुळवणी याच्या कन्येबरोबर त्याचा दुसरा विवाह झाला व त्याना विश्वभर नावाचा पुत्र झाला. याप्रमाणे सुखाने त्याचा ससार चालला होता. एकदा पुण्यात विद्वत्सभेत शास्त्रार्थात त्याचा पराभव झाल्याने त्याना अत्यत खिन्नता प्राप्त झाली. पुन शास्त्रात असा पराभव न व्हावा म्हणून अधिक अध्ययन करण्याकरता घरदार सोडून ते काशीला गेले व त्या ठिकाणी चागल्या गुरूच्या जवळ राहून गुरुची उत्तम सेवा करुन सर्व शास्त्रात पारगत झाले

श्रीनारायणस्वामींचा शास्त्राध्ययन करण्याचा उद्देश गुरुनी ओळखून त्याच्याजवळ 'वादामध्ये कोणाचाही पराभव करणार नाही' अशी गुरुदक्षिणा मागितली. ती आज्ञा मान्य करून श्रीनारायणस्वामी आपल्या गावी परत आले. त्यानतर त्याना दोन मुली झाल्या व काही वर्षांनी पत्नी स्वर्गवासी झाली पुत्राला विद्याभ्यासासाठी पुण्याला ठेवून आपल्या दोन मुलीसह कोल्हापूरला श्रीजगदबेच्या सेवेला ते राहिले भगवतीने सतुष्ट होऊन त्याना नरसोबाच्या वाडीला जाऊन श्रीदत्ताची आराधना करण्याची आज्ञा केली त्या आज्ञेप्रमाणे श्रीकृष्णपचगगेच्या सगमावरील श्रीक्षेत्र नरसोबाच्या वाडीत मुलीसह राहून श्रीदत्ताची उपासना करू लागले.

'ईश्वरप्रणिधानाद्वा' या भगवान् पतजलीच्या वचनाला सत्य करण्याला भगवान् दत्तात्रेयानी त्याच्यावर अनुग्रह केला व त्याना समाधिसिद्धी प्राप्त झाली. निरतर ईश्वरचिंतन केल्याने ईश्वर सतुष्ट होतो व त्याच्या अनुग्रहाने समाधी सिद्धी होते.

याप्रमाणे नित्य श्रीनारायणस्वामींचा समाधिअभ्यास चालला असता एके दिवशी पहाटे श्रीनारायणस्वामी नित्याप्रमाणे समाधी लावून बसले असता मुलीना रोजच्या वेळेच्या पूर्वी जाग आली व शौचाला जाण्याकरता मुली वडिलाना हाका मारु लागल्या श्रीनारायणस्वामींचा समाधिभग होईल म्हणून श्रीदत्तानी श्रीनारायण स्वामींचे रूप घेऊन, मुलींना बाहेर नेऊन त्याचा विधी उरकून, त्याचे हातपाय धुऊन, त्याना अथरुणावर झोपवून, श्रीनारायणस्वामी समाधीतून उठण्यापूर्वी श्रीदत्तात्रेय अदृश्य झाले

नित्याप्रमाणे समाधीतून उठल्यावर श्रीनारायणस्वामींनी मुलींना शौचाला जाण्याकरता उठविले तेव्हा मुली म्हणाल्या, 'तुम्ही आम्हाला आताच शौचाला नेऊन आणले आणि पुन कशाला जागे केले?' मुलींनी शौचाला गेलेली ती जागा दाखविल्यावर ती गोष्ट सत्य असल्याची त्याची खात्री झाली व आपली समाधी भग होऊ नये म्हणून प्रभूनीच हे कृत्य केले असे समजून त्याना अत्यत दु ख झाले देवाकडून अशी सेवा घेणे अनुचित समजून एका मुलीला कोल्हापूर प्रातातील सोळाकूर या गावी व दुसऱ्या मुलीला त्याच प्रातातील कापसी या गावी योग्य वराना देऊन आपण विरक्त होऊन पुन पूर्वीप्रमाणे ते उपासना करू लागले

देवाजवळ सन्यास घेण्याची इच्छा प्रकट केल्यावर योग्य वेळी सन्यास होईल असे देवाचे सागणे झाले. श्रीनारायणस्वामी नित्य पहाटे सगमावर स्नानाला जात असत एके दिवशी नित्याप्रमाणे स्नानाला गेले असता पाय घसरुन पाण्यात गेले त्या ठिकाणी श्रीदत्त भगवान् श्रीनृसिंह सरस्वती स्वामी असून सन्यासाची सर्व तयारी पाहून चकित झाले. श्रीनृसिह सरस्वतींनी

स्वत प्रैषोच्चारपूर्वक सर्व सन्यासविधी यथाशास्त्र करून त्याना दड दिला व श्रीनारायण सरस्वती असे नाव ठेवले हा सर्व विधी झाल्यावर ज्या ठिकाणी ते पाण्यात गेले होते तेथूनच दड-कमडलूसह सन्याशीवेषात बाहेर आले

त्याना सन्यासीवेषात पाहून तेथील मठातील महताना वाटल की, गुरुशिवाय याने स्वत च सन्यास घेतला आहे हा भ्रष्ट आहे असे समजून त्याच्यावर बहिष्कार घातला

श्रीनारायणस्वामी आपल्या खोलीचे दार बद करून बसत असत बाहेरून कोणी भक्ताने नमस्कार केल्यास आतून नारायण' असा शब्द येत असे ते पाहून हा काय प्रकार आहे हे पाहण्याकरता एके दिवशी रात्री मठाधिपती नारायणस्वामीच्या खोलीच्या दाराच्या छिद्रातून पाहू लागले त्या दिवशी शनिवार असल्याने श्रीनारायणस्वामी डोळे मिटून प्रेमाने नृसिंहाचे भजन करीत होते, व एक मोठा सिंह त्याच्या समोर बसलेला आहे असे त्याना दिसले

ते पाहून श्रीनारायणस्वामीचा अधिकार फार मोठा आहे असे वाटून ते नारायणस्वामीना शरण गेले व 'आपला अधिकार न समजल्यामुळे मी आपणाला भ्रष्ट समजलो' असे म्हणाले, तेव्हा नारायणस्वामीनी आपल्या सन्यासाची सर्व हकीगत त्याना सागितली मठाधिपती त्याचे शिष्य झाले व कृतकृत्य झाले श्रीनारायणस्वामी शालिवाहन शके १७२७ चैत्र वद्य अमावास्येला नरसोबाच्या वाडीत समाधिस्थ झाले त्याच्या पुण्यतिथीचा उत्सव चैत्र महिन्यात अद्याप त्याचे वशज नरसोबाच्या वाडीला येऊन करीत असतात

परमेश्वराच्या सगुणरूपाची उपासना करून हल्लीच्या काळात ही ईश्वरप्रसादाने उपासकाला ब्रह्मसाक्षात्कार होऊन तो जीवन्मुक्त होतो हे सागण्याकरता श्रीवासुदेवानदसरस्वतीनी आपल्या युवशिक्षेच्या शेवटी श्रीनारायणस्वामीचे सक्षिप्त चरित्र वर्णन केले आहे

—वा द गुळवणी

## १५. साधुमहाराज कंधारकर

**(समाधी, सन–१८१२ )**

मराठवाड्यातील कधारचे साधुमहाराज हे एक मोठे दत्तोपासक अठराव्या शतकात होऊन गेले परभणी जिल्ह्यात पूर्णा स्टेशनजवळील कानडखेड या गावी एक अश्वलायन शाखेचा ब्राह्मण राहात असे त्याचे नाव रामजीपत व त्याच्या पत्नीचे नाव रमा असे होते प्रपच आणि परमार्थ यात दोघाची गती चागली होती हरि-भजनात दोघाना प्रीती होती पण पोटी पुत्र-सतान नसल्यामुळे उभयता कष्टी असत काही कृपा सपादन करावी म्हणून रामजीपत रमाबाई-सह माहुरास येण्यास निघाले मनात दत्ताचे ध्यान सतत होते तीर्थावर स्नान करून दोघानी दत्तात्रेयाचे दर्शन घेतले मनोभावे प्रार्थना करून मध्यरात्रीच्या वेळी दत्तात्रेय वटुवेषाने प्रगटले आणि त्यानी रमाबाईस श्रीफलाचा प्रसाद दिला आणि 'या प्रसादे होईल सुत । तो माझा परम भक्त ।' असा आशीर्वाद दिला 'भजनमार्ग वाढवील । मुक्तीची गवादी घालील । मुमुक्षु पाथीक येतील । धावुनी तृप्त व्हावया ।। एकनाथ भक्तजेठी । अवतरेल तुम्हा पोटी ।।' असे सागून दत्तप्रभू गुप्त झाले

या कृपाप्रसादेकरून रमाबाई गर्भवती होऊन तिला यथासमयी पुत्र झाला त्याचे नाव हनुमत ठेवण्यात आले त्या काळास अनुसरून विद्यार्जनास प्रारभ झाला घराण्यातील दत्तभक्तीचा छद त्याला लहानपणापासूनच होता दत्तभेटीसाठी तो उत्सुक बनला 'कै हे ससारबिरडें फिटेल । कै तो स्वामी मज भेटेल । युगाहूनीया वडील । नि-मिषोनिमिष मानीतसे ।।' अशी दत्तभेटीची मनात तळमळ असताना तो आपल्या आईवडिलाची सेवा मात्र चुकत नसे त्याच्या या सेवारत वृत्तीने

दत्तप्रभू संतुष्ट झाले आणि यतिवेष धारण करून ते त्याच्या अंगणी एकदा आले. यतीने हनुमंताची विचारपूस केली आणि त्याला गोदातटाकी सिद्धेश्वर लिंगापाशी येण्यास सांगितले. ठरल्याप्रमाणे हनुमंताची व दत्तात्रेयांची भेट झाली. हनुमंताने दत्तप्रभूंना साष्टांग नमस्कार करून विनविले, 'आतां योगीवर्य कृपावंते अनसुयात्मजे माझी माते। भावें शरण आलों तूंतें। सनाथ पंथें मिरवी का?' यतिरूपधारी दत्तात्रेयांनी त्याला कृपाशीर्वाद दिला आणि स्वरूप प्रकट केले. 'तीन शिरें सहा कर। माथां मिरवे जटाभार। अंगीं शोभे भस्म सुंदर। काषाय वस्त्र मेखळा॥ अरिदर कमंडलू माला। त्रिशूल डमरू करीं धरिला। ऐसिया देखतां स्वरूपाला आनंदला हनुमंत॥' या दत्तभेटीने हनुमंताचे जीवित कृतार्थ होऊन गेले.

यानंतर हनुमंतास माहुरास जाण्याची इच्छा झाली. श्रीदत्तचरणांशी एकांत करून 'जैसी दत्तमूर्ती पाहिली। तैसीच हृदयीं आठविली.' येथे तप करीत असतानाच शेषफणीच्या सावलीत ध्यानस्थ बसलेली याची मूर्ती जोतसिंह नृपनाथाने पाहून त्याला आपल्या नगरीत नेले. पांचाळपुराहून हनुमंत तथा साधुराज पंढरपुरास गेले. काशी, प्रयाग, गया, नागपूर, पंढरी इत्यादी क्षेत्रांच्या त्यांनी यात्रा केल्या. नामस्मरण, हरिकीर्तन, भजनपूजन यांत रंगून गेलेल्या साधुमहाराजांनी संताचार्यांसारखे शिष्य तयार केले. नामस्मरणाचा सुकाळ केला. अनेक जीवांचा उद्धार करून साधुमहाराजांनी दत्त व विठ्ठल यांच्या ऐक्यावर आधारलेला आपला एक विशिष्ट संप्रदाय उभा केला. भास्कर-रुक्मांगद-मशवंत-हनुमंत-धुंडिराज-सीताराम-शंकरमहाराज आणि श्रीसंताचार्य बापूमहाराज-बाबूमहाराज अशी विरसणीची परंपरा साधुमहाराजांची आहे.

साधुमहाराजांना नाथांचा अवतार मानतात. त्यांना दत्तदर्शनाची ओढ नेहमीच असे. असेच एकदा माहुरास जाण्यास ते निघाले. पत्नीला बरोबर घ्यावे असे त्यांना वाटले. पण 'गर्भवती कन्या ठेवुनी घरीं। आपण कैसें जावें माहुरीं। तरी प्राणेश्वरा अवधारी। जावें तुम्हांसी न वर्जी' असे तिने सांगितले. साधुमहाराज शिष्यांना बरोबर घेऊन माहुरास निघाले. अरुणावतीस म्हणजे वाडवण्यास येऊन त्यांनी हरिहरात्मक परमेश्वराचे दर्शन घेतले. नंतर ते उंबरखेड म्हणजे उमरखेडास आले. तेथे त्यांना बरे वाटेनासे झाले. संताचार्यास ते म्हणाले, 'आम्हांसी दर्शन दत्तात्रेय। देईल ऐसें दिसेना॥' ना पंढरी ना माहुर अशी स्थिती असताना त्यांना तेथील आईनाथांनी दृष्टान्त दिला की, 'माझिया वामभागीं। निश्चित। सखया समाधिस्थ पैं व्हावें॥' साधुराजांनी दत्तप्रभूंची प्रार्थना केली. पांडुरंगाला आळविले. वत्सासाठी धेनू धावत येते तसे साधुमहाराजांसाठी दत्त व पांडुरंग धावत आले. श्री दत्तात्रेयांच्या सांगण्यावरून त्यांनी संन्यास घेतला आणि 'चैत्र शुद्ध एकादशीस। शके सतराशे चौतीस' या मुहूर्तावर साधुमहाराजांनी समाधी घेतली. दत्त व पांडुरंग यांची ऐक्यभावाने उपासना करणाऱ्या साधुमहाराजांचे ओवीबद्ध चरित्र दासमारुतींनी लिहिलेले प्रसिद्ध आहे.

## १६. चिदंबर दीक्षित
### (सन १७५८–१८१५)

यांचे घराणे विजापूर जिल्ह्यातील गोठे गावचे. यांचे कुलदैवत खंडोबा असून यांच्या वडिलांनी, मार्तंड जोशी यांनी सोमयाग केला म्हणून यांचे नाव दीक्षित असे पडले. हे शुक्लयजुर्वेदाच्या काण्व शाखेचे ब्राह्मण होत. कर्नाटकातील मुरगोड गावी यांचा जन्म झाला. वर्णाश्रमधर्मभ्रष्ट झाला, त्याचे नीट पालन व्हावे म्हणून यांचा अवतार झाला. हे गृहस्थाश्रमी असून सर-

स्वती व सावित्री या नावाच्या दोन बायका याना होत्या सहा मुलगे, एक मुलगी, अशी सात अपत्ये याना होती मुरगोड येथे पाठशाळा स्थापन करून यानी धर्मसेवा केली या गावी एक ब्रह्महत्या झाली म्हणून यानी हे गाव सोडून देवलापूर, हुबळी, हिपरगी, कुदगोळ, नवलगुद इत्यादी गावी भ्रमण केले यानी सन १८०७ साली नवलगुद येथे एक यज्ञ केला दुसरे बाजीराव पेशवे, रास्ते, गोखले, निपाणीकर सरदार इत्यादींची याच्यावर श्रद्धा होती याची दीड लाखावर अभगरचना आहे गुर्लहोसूर येथे याची समाधी आहे

चिदवर दीक्षित हे दत्तावतारी म्हणून प्रसिद्ध असून कवी मोरोपताचे नातू सखाराम त्र्यबक ऊर्फ अबूनाना गर्दे यानी 'श्रीमच्चरित्र' नावाच्या अनेक वृत्तात्मक चरित्रात याचा जीवनवृत्तान्त दिला आहे बाभूळगावचे पाटील राजाराम महाराज हे याचे पट्टशिष्य असून त्यानीही सुमारे एक लक्ष अभगात याचे चरित्र सागितले आहे शिवशास्त्री या एका तेलगी ब्राह्मणानेही सस्कृत श्लोकात याचे चरित्र गाइले आहे गोणगरास असताना यानीही सोमयाग केल्याचा उल्लेख याचे चरित्रकार करतात या अवताराने सनातन-धर्माचा उद्धार करून भक्तिज्ञानाचा प्रसार केला पाठशाळा, अन्नदान, अध्यापन, निरूपण, पुराण-कीर्तन यात ते रगून गेले होते 'शुभ ब्रूयात्। मगल ब्रूयात्। शुभ ब्रूयात्' अशा शब्दोच्चारानी ते आसनावर विराजमान होत 'आम्ही ब्राह्मणानी, ब्रह्मस्वरूपीयानी, सर्व जगाचे सर्वस्वदान दुसऱ्यास करता येण्याजोगे दानशूर व्हावे, हात पसरण्यातच स्वधर्म मानू नये' असे ते शिष्याना सागत दान देण्यात धन्यता वाटावी, घेण्यात आनद मानू नये, अशी त्याची शिकवण होती स्वतःच्या मुलाने एक लाखाचा निधी आपल्या नावावर गोळा केलेला पाहून याना मनस्वी वाईट वाटले त्यानी तो सर्व निधी गोरगरिबाना वाटून टाकला याच्या राजाराम महाराज नावाच्या शिष्याने 'स्वारी चाले चिदबर। विप्रमडलीके भार ॥ १ ॥ झाज ढोलकी मजिरे। प्रेमभजन लागतप्यारे ॥ २ ॥ विना सतार मुरली। भजन करत स्वारी चली ॥ ३ ॥ दास कहे चिदबर। लीला बतावे अपार ॥' असे याचे वर्णन केले आहे

चिदबर दीक्षिताच्या भक्तगणात सर्व जातीचे, पथाचे, वृत्तीचे लोक होते गृहस्थ, यती, ब्राह्मण, ब्राह्मणेतर असे सर्वजण त्याच्या परिवारात असत 'श्रीमच्चरित्रा' त अबूनाना गर्दे यानी चिदबराना दत्तात्रेयस्वरूप मानले आहे कविवर्य मोरोपताची मुलगी आनदीबाई ही म्हैसाळचे त्र्यबकराव गर्दे याना दिली होती या दापत्याचा वडील मुलगा म्हणजे सखाराम ऊर्फ अबूनाना असून तो मोठा दत्तभक्त होता श्रीपादवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वतीनी आपल्या भक्ताना 'मुर्गोडी वसतो चिदबररूपें तू तेथ जा लौकरी' असे सागितल्याची माहिती चरित्रकार देतात "यद्व्याजें शिव हा चिदबर गुरू त्रैमूर्तीचा पुतळा। दत्तात्रेय सगूण होवनि अता हा पातला भूतला ॥' अशी अबूनानाची श्रद्धा होती पूर्वीचे दोन दत्तावतार म्हणजे श्रीपादयती व श्रीनृसिंहसरस्वती आणि 'आता दत्तचि तो चिदबर गुरु झाला गृहस्थाश्रमी' असे त्यानी म्हटले आहे 'श्रीमत्स्वामिचिदबरा नरहरी याते नसे भेद हा' असे कवी वारवार सागत आहे श्रीपादयती, नृसिंहसरस्वती व चिदबर दीक्षित याचे ऐक्य भक्ताना प्रतीत होई राजाराम महाराजानी चिदबराचे वर्णन मोठ्या रेखीव पद्धतीने केले आहे

सगुण सावळा ब्रम्हीचा पुतळा। देखियेला डोळा। चिदबर ॥ १ ॥

चद्रकाति ऐसा चिरा साजे शिरी। भाळी हे कस्तुरीटिलक शोभा ॥ २ ॥

स्वती व सावित्री या नावाच्या दोन बायका याना होत्या सहा मुलगे, एक मुलगी, अशी सात अपत्ये याना होती मुरगोड येथे पाठशाळा स्थापन करून यानी धर्मसेवा केली या गावी एक ब्रह्महत्या झाली म्हणून यानी हे गाव सोडून देवलापूर, हुबळी, हिपरगी, कुदगोळ, नवलगुद इत्यादी गावी भ्रमण केले यानी सन १८०७ साली नवलगुद येथे एक यज्ञ केला दुसरे बाजीराव पेशवे, रास्ते, गोखले, निपाणीकर सरदार इत्यादीची याच्यावर श्रद्धा होती याची दीड लाखावर अभगरचना आहे गुलेहोसूर येथे याची समाधी आहे

चिदवर दीक्षित हे दत्तावतारी म्हणून प्रसिद्ध असून कवी मोरोपताचे नातू सखाराम त्र्यबक ऊर्फ अबूनाना गर्दे यानी 'श्रीमच्चरित्र' नावाच्या अनेक वृत्तात्मक चरित्रात याचा जीवनवृत्तान्त दिला आहे बाभूळगावचे पाटील राजाराम महाराज हे याचे पट्टशिष्य असून त्यानीही सुमारे एक लक्ष अभगात याचे चरित्र सागितले आहे शिवशास्त्री या एका तेलगी ब्राह्मणानेही सस्कृत श्लोकात याचे चरित्र गाइले आहे गोष्णगरास असताना यानीही सोमयाग केल्याचा उल्लेख याचे चरित्रकार करतात या अवताराने सनातन-धर्माचा उद्धार करून भक्तिज्ञानाचा प्रसार केला पाठशाळा, अन्नदान, अध्यापन, निरूपण, पुराण-कीर्तन यात ते रगून गेले होते 'शुभ बूयात्। मगल भूयात्। शुभ भूयात्' अशा शब्दोच्चारानी ते आसनावर विराजमान होत 'आम्ही ब्राह्मणानी, ब्रह्मस्वरूपीयानी, सर्व जगाचे सर्वस्वदान दुसऱ्यास करता येण्याजोगे दानशूर व्हावे, हात पसरण्यातच स्वधर्म मानू नये' असे ते शिष्याना सागत दान देण्यात धन्यता वाटावी, घेण्यात आनद मानू नये, अशी त्याची शिकवण होती स्वत च्या मुलाने एक लाखाचा निधी आपल्या नावावर गोळा केलेला पाहून याना मनस्वी वाईट वाटले. त्यानी तो सर्व निधी गोरगरिबाना वाटून टाकला याच्या राजाराम महाराज नावाच्या शिष्याने 'स्वारी चाले चिदवर। विप्रमडलीके भार ॥ १ ॥ झाज ढोलकी मजिरे। प्रेमभजन लागतप्यारे ॥ २ ॥ विना सतार मुरली। भजन करत स्वारी चली ॥ ३ ॥ दास कहे चिदवर। लीला यताये अपार ॥' असे याचे वर्णन केले आहे

चिदवर दीक्षिताच्या भक्तगणात सर्व जातीचे, पथाचे, वृत्तीचे लोक होते गृहस्थ, यती, ब्राह्मण, ब्राह्मणेतर असे सर्वजण त्याच्या परिवारात असत 'श्रीमच्चरित्रा' त अबूनाना गर्दे यानी चिदवराना दत्तात्रेयस्वरूप मानले आहे कविवर्य मोरोपताची मुलगी आनदीबाई ही म्हैसाळचे त्र्यबकराव गर्दे याना दिली होती या दापत्याचा वडील मुलगा म्हणजे सखाराम ऊर्फ अबूनाना असून तो मोठा दत्तभक्त होता श्रीपादवल्लभ व श्रीनृसिहसरस्वतीनी आपल्या भक्ताना 'मुगोंडी वसतो चिदवररूपें तू तेथ जा लौकरी' असे सागितल्याची माहिती चरित्रकार देतात 'यद्व्याजें शिव हा चिदवर गुरू त्रैमूर्तीचा पूतळा। दत्तात्रेय सगुण होउनि अता हा पातला भूतला ॥' अशी अबूनानाची श्रद्धा होती पूर्वीचे दोन दत्तावतार म्हणजे श्रीपादयती व श्रीनृसिहसरस्वती आणि 'आता दत्तचि तो चिदवर गुरु झाला गृहस्थाश्रमी' असे त्यानी म्हटले आहे 'श्रीमत्स्वामि-चिदवरा नरहरी याते नसे भेद हा' असे कवी वारवार सागत आहे श्रीपादयती, नृसिहसरस्वती व चिदवर दीक्षित याचे ऐक्य भक्ताना प्रतीत होई राजाराम महाराजानी चिदवराचे वर्णन मोठ्या रेखीव पद्धतीने केले आहे

सगुण सावळा ब्रम्हीचा पुतळा। देखियेला डोळा। चिदवर ॥ १ ॥

चद्रकाति ऐसा चिरा साजे शिरी। भाळी हे कस्तुरीटिळक शोभा ॥ २ ॥



आळंदीचे श्रीनृसिंहसरस्वती



श्रीरामानंद बीडकर महाराज



श्रीमाणिकप्रभू



श्री श्रीधरस्वामी



श्रीस्वामीसमर्थ व ब्रह्मनिष्ठ वामनबुवा वामोरीकर
' शके १७९८ धातानाम संवत्सरे चैत्र शु १३ गुरुवार '



उपासनानाम
वामनबुवा वामोरीकर



श्रीगंगाधरमहाराज
अक्कलकोट



श्रीनारायणदास महाराज, श्रीस्वामीसमर्थ, श्रीध्यानगीर महाराज



श्रीसाधुमहाराज कथारकर



श्रीचिदंबर दीक्षित, मुरगोड



श्रीभैरवअवधूत ज्ञानसागर



श्रीनारायण महाराज कावडीबोवा मंदिर, बडोदा



श्रीवासुदेवानंदसरस्वती



श्रीयोगानंदसरस्वती (गांडा महा.)



श्रीदीक्षितस्वामी



श्रीदत्तमहाराज अष्टेकर



श्रीसाईबाबा



श्रीउपासनी महाराज



श्रीमती गोदामाता



श्रीनारायण महाराज, केडगावकर



श्रीविष्णुदास माहुरकर



श्रीरामचन्द्र कृष्ण कामत



मातृश्रपांति सरद्धीकरशास्त्री



पतमहाराज बाळेकुंद्रीकर



औदुंबर कट्टा



पंतांची गावातील समाधी



समाधि मंदिराचा गाभारा



श्रीरंग अवधूत महाराज



श्रीअनंत सुत विठ्ठल उर्फ कावडी महाराज



वि. वा. साठे, रत्नागिरी दत्तमंदिर



योगिराज गुळवणी महाराज

धोत्र शुभ्रकाठी कासेसी कसोटी । अंगी शोभे उटी मैलगिरी ।। ३ ।।
त्यावरी हो साजे यज्ञोपवीत शोभा । विद्युल्लता नभामाजी जैसी ।। ४ ।।
क्षीरार्णव जैसा अंगीचा दुशाला । मेळा भोवताला ब्राह्मणाचा ।। ५ ।।
दास म्हणे चाले त्रैलोक्याचा राणा । बरोबरी नाना यात्रा दाटी ।। ६ ।।

## १७. भैरवअवधूत ज्ञानसागर

**(समाधी, सन – १८४३)**

सांगली जिल्ह्यात खानापूर तालुक्यात विटे हे गाव आहे तेथे सुमारे १५० वर्षांपूर्वी हे सत्पुरुष कवी होऊन गेले कवींचे चिरंजीव दिगंबर चैतन्य यानी याचे आर्यात्मक चरित्र लिहले आहे त्यावरून प्रस्तुत चरित्र-लेख लिहीत आहे

सुमारे ३०० वर्षापूर्वी 'उद्धव चिद्घन' नामक प्रसिद्ध सत्पुरुष होऊन गेले त्याचे गुरु चिद्घनस्वामी त्याच्या भगिनीच्या वंशात भैरव अवधूत हे जन्म पावले भैरवास अप्पाजीबुवा असेही म्हणत असत त्याच्या वडिलाचे नाव ज्योतिपत व आईचे यमुना यास गोविंद व गोपाल असे दोन बंधू होते भैरवबुवाच्या आजोबाचे नाव मुकुदपत व आजीचे नाव नीराबाई ही नीराबाई अद्वैत चैतन्य नामक सत्पुरुषाची कन्या होती व चिद्घनस्वामी हे तिचे बंधू होत भैरवस्वामीचे पूर्वज विटे येथील वतनदार जोशी व कुलकर्णी होते भैरवबुवाचे पितामह मुकुदपत व चुलते शिवाजीपत हे विरक्त सत्पुरुष होते शिवाजीपतास मुलगा नव्हता म्हणून त्यानी भैरवबुवास पित्याचे आज्ञेवरून दत्तक घतले होते आणि हेच त्याचे दीक्षागुरू होते पैठण येथे राहणारे लक्ष्मीनाथ नावाचे नाथपंथी साधू भैरवअवधूताचे मित्र होते त्याच्या प्रेरणेने भैरवानी पैठणास दत्तोपासना आचरली या उपासनेचे आत्मिक फळ प्राप्त झाल्यावर पैठणहून दत्तमूर्ती घेऊन ते स्वग्रामी परत आले विट्यास मूर्ती आणल्यानतर (श १७३३) त्यानी दत्तमदिर बाधले आणि श १७४५ पासून दत्तजयतीचा महोत्सव सुरू केला

शके १७३३ प्रजापती संवत्सर आषाढ शुद्ध सप्तमी, शुक्रवारी, उत्तरानक्षत्री दत्तमूर्ती विटे येथे आली, असे त्याचे चिरंजीव दिगंबरबुवानी लिहिले आहे त्यानी काही काळ आळदीस ज्ञानेश्वराच्या चरणाजवळ निवास केला होता श १७६२ मध्ये अगदी उतारवयात त्यानी सन्यास स्वीकारला आणि त्यानतर तीनच वर्षांनी ( श १७६५ मार्गशीर्ष कृ १३ ) ते समाधिस्थ झाले विटे येथे अद्याप त्याचा वंश नादत आहे त्याचे चिरंजीव दिगंबरचैतन्य यानी त्याचे आर्यात्मक चरित्र लिहिले आहे

आपल्या वृद्धपणी भैरवबुवा काशीयात्रेस गेले होते भैरवबुवाचे आडनाव ज्ञानसागर होते व ह्या उपनावाप्रमाणे ते खरोखर ज्ञानसागर होते त्याचे चिरंजीव ह्यानी त्यास वेदान्तवक्ते व परमब्रह्मनिष्ठ असे म्हटले आहे व त्याची कविता पाहिली म्हणजे ही विशेषणे त्याच्या ठायी अगदी अन्वर्थक होती असे वाटल्यावाचून राहात नाही मागे सागितलेप्रमाणे भैरवबुवानी शके १७६२ प्लव संवत्सर कार्तिक शु ।। एकादशी या दिवशी सन्यास घेतला त्यावेळी ते फार तेजस्वी दिसू लागले व चिमण्या वगैरे पक्षी त्याच्या अगावर येऊन बसू लागले 'सर्वं खल्विद ब्रह्म' या महावाक्याचा उपदेश भैरवस्वामी करीत असत तो उपदेश स्वत च्या ठायी कितपत ठसला आहे हे सामान्य जनास दाखविण्यासाठी स्वामीनी हा चमत्कार करून दाखविला त्या चिमण्या भैरवस्वामीच्या अगावर किती निर्भयपणे बसल्या होत्या, हे पुढील आर्येवरून समजेल

'द्विज उडविता न उडती,
अद्वय प्रत्यय जनास दाखविला ।

स्वामिमहाराजानी ब्रह्मार्पणें
ब्रह्मरसचि चाखविला ॥'

भैरवस्वामीनी सन्यासदीक्षा ग्रहण केल्यावर श्रीवासुदेव स्वामी यानी त्याचे नाव ज्ञानसागरेंद्र-स्वामी असे ठेवले स्वामीच्या पुण्यतिथीचा उत्सव विटे येथे त्याच्या वशजाकडून प्रतिवर्षी साजरा केला जातो भैरवबुवाची गुरुपरपरा येणेप्रमाणे –

दक्षिणामूर्ति
|
दत्तात्रेय (चैतन्यसप्रदायस्थापक)
|
शिवचैतन्य
|
गोपाळचैतन्य
|
आत्मारामचैतन्य
|
कृष्णचैतन्य
|
अद्वयचैतन्य

पुत्र व शिष्य चिद्घन (शिष्य उद्धव चिद्घन) | कन्या निरावाई (भैरव बुआची आजी)

पुत्र नागेश चैतन्य
शिष्य शिव चैतन्य
दत्तक पुत्र व शिष्य भैरव
अवधूत उर्फ अप्पाजीबुआ
ज्ञानसागर

भैरवबुवानी विटे येथे दत्तमदिर बाधून मठ-स्थापना केली या मठास धार व देवास येथील श्री. पोवार याजकडून मठाच्या खर्चासाठी दरसाल ३०० रुपये मिळतात ते अद्याप चालू आहेत, याशिवाय काही इनाम जमिनी आहेत त्याच्या उत्पन्नातून मठाचा व उत्सवाचा खर्च चालतो

ज्ञानसागर हे आश्वलायन शाखेचे देशस्थ ब्राह्मण याचे गोत्र विश्वामित्र भैरव अवधूत यास दिगंबर नामक एक पुत्र होता तो रूपाने फार सुदर असून अप्रतिम वक्ता, उत्कृष्ट कीर्तनकार व सगीतकलेत केवळ प्रतिगधर्व होता

भैरवअवधूत ह्याची एकदर कविता हजाराच्या आत आहे त्याचा 'ज्ञानसागर' ह्या नावाचा एक अध्यात्मपर ग्रथ आहे त्याच्या १४ रेपा असून, ओवीसख्या ३१५ आहे या-शिवाय त्याची अभग व पदे मिळून सुमारे ३०० कविता आहेत भैरवअवधूत याची वाणी प्राय शुद्ध, गभीर, सुसस्कृत, स्वानुभवयुक्त, अधिकार-वती व प्रासादिक अशी आहे यानी हिंदुस्थानी भाषेत पण पदे लिहिली आहेत त्याची बहुतेक कविता वेदातपर, भक्तिपर, उपदेशपर व अध्यात्मपर असल्यामुळे, खऱ्या कवित्वास त्यात वाव सापडला नाही तथापि क्वचित् स्थळी हे कवित्व अत्यत उज्ज्वलतेने चमकत असल्याचे दृष्टोत्पत्तीस आल्याशिवाय राहात नाही भैरव-बुवानी आपल्या कवितेत 'ज्ञानसागर शिवगुरु अवधूत' या शब्दानी आपला व आपल्या गुरूचा उल्लेख सर्वत्र केला आहे, आता भैरवअवधूत यानी केलेले काही अभग येथे देता येण्यासारखे आहेत

(१) दत्त परब्रह्म केवळ। नित्य पवित्र निर्मळ॥
सरुप रूप हें चागले। ध्यानी मानस रगले॥
भव्य प्रसन्न वदन। पाहता निवाले लोचन॥
जटा मुकुट आणि गगा। भस्म लावियेले अगा॥
अनुहात निगम ध्वनी। श्रुती कुडले श्रवणी॥
रुळे वैजयती कठी। केशर कस्तुरी ललाटी॥
कासे पीताबर पिवळा। उभा षड्भुज सावळा॥
चरणी पादुका शोभती। सुरवर त्रिकाळी वदिती॥

ज्ञानसागर शिवगुरू स्मरणी।
अवधूत प्रकटे अत करणी॥

(२) निर्मळासी मळ शुद्धी ।
नाहीं मुळीच उपाधी ॥
पारा खावोनियां सोनें । राही आपुल्या वजनें ॥
तैसा देव तेजोराशी । नाही मळमूत्र त्यासी ॥
प्रेम भक्तीचा भुकेला । निराकार आकारला ॥
ज्ञानसागर निवासी । शिवगुरु अवधूत अविनाशी ॥

(३) पायीं ठेविता कपाळ । नयनीं वाहे प्रेमजळ ।
तेणें चरण प्रक्षाळिले । अंगी रोमांच उठले ॥
मनी मनचि विराले । चंद्रामृत तें चांगलें ॥
तेंचि घेऊनिया करीं । मुख प्रक्षालन करी ॥
धूप संशय जाळीला । ज्ञानदीप उजळीला ॥
दूध नैवेद्य साखर । भक्षी नवनीत सार ॥
भक्त प्रसाद सेविती । गाती आनंदें नाचती ॥
शिवगुरु ज्ञानाचा सागर । बोले अवधूत जयजयकार ॥

(४) विश्वपट परिधान ।
करी अनसूयानंदन ॥ १ ॥
दिगंबराचें अंबर ।
बरवें शोभे चराचर ॥ २ ॥
नाना रत्नें वसुंधरा ।
घेऊनी आली अलंकारा ॥ ३ ॥
लेवविले अंगोअंगी ।
रंग रंगले निजरंगीं ॥ ४ ॥
ज्ञानसागराची शोभा ॥
शिवगुरु अवधूत उभा ॥ ५ ॥

(५) प्रेमभावें संतोपलें ।
दत्त स्वमुखें बोलिले ॥ १ ॥
अत्री अनसूयेचे पोटीं ।
जन्मा आलों तुम्हांसाठी ॥ २ ॥
चिंता न करावे सर्वथा ।
तुमचा भार माझे माथां ॥ ३ ॥
स्वस्थ साम्राज्य ते करा ।
पिटा भक्तीचा डांगोरा ॥ ४ ॥
ज्ञानसागराच्या कुळा ।
मीच प्रेमाचा जिव्हाळा ॥ ५ ॥

परमवरद वाणी ।
शिवगुरु अवधूत तारणी ॥ ६ ॥
– विष्णुपंत ज्ञानसागर

## १८ दत्तनाथ उज्जयिनीकर

**( समाधी, सन १७१३–१८४९ )**

अनेक मठ, मंदिरे, गुफा, घाट यांसाठी उज्ज-यिनी क्षेत्र प्राचीन कालापासून प्रसिद्ध आहे. येथे सिंहपुरीत श्रीदत्तात्रेयाचे मंदिर असून तोच दत्तनाथाचा मठ म्हणून समजला जातो. हे दत्त-नाथ मोठे योगी व सत्पुरुष म्हणून प्रसिद्ध असून ग्वाल्हेरचे ढोलीबुवा श्रीमहिपतीनाथ यांचे मित्र होत. दत्तनाथ हे मूळचे राक्षसभुवनाचे असून यांचे उपनाव कापसे. वडिलांचे नाव नारायण व आईचे लक्ष्मीबाई. अनंतनाथ हे यांचे गुरू. निरं-जन–विष्णू–हंस कमलासन अत्री–दत्त–गोपाळ नागनाथ–निवराज–नरहरी–गिरीधारी–जनार्दन एकनाथ – दत्तभाऊ – केशवाबा – अंतोबाबाबा-दत्तात्रेय; अशी यांची गुरुपरंपरा आहे. हे दत्तनाथ महादजी शिंदे यांच्याबरोबर उत्तर हिंदुस्थानात आले. पाथरगडच्या लढाईत यांनी शिंद्यांच्या बरो-बर भागही घेतला. यांना ज्योतिषशास्त्रही चांगले येत होते. पुढे हे उज्जयिनीस आल्यावर यांना योगधारणा, परमार्थ, वैराग्य इत्यादीची गोडी लागली. यांनी तीर्थयात्राही केली. यांनी शके १७७१ मध्ये देह ठेविला. त्यांच्या पादुकांची पूजा नित्य उज्जयिनीच्या मठात होत असून तेथेच दत्तमंदिरही आहे.

यांची स्फुट काव्यरचना विविध प्रकारची आहे. पदे, पोवाडे, लावण्या, गौळणी, धावे, आरत्या, अष्टके, श्लोक इत्यादींतून त्यांची गुरु-भक्ती व वैराग्यवृत्ती प्रकट होते. 'घनानंद वृत्ती' व *'आनंदवृत्तकथासार'* अशी यांची काही प्रकरणे आहेत. यांच्या संग्रहात नसलेल्या हस्त-लिखित पोथ्याही पुष्कळ आहेत. यांची [illegible] येथे देण्यासारखी आहेत.

(१) पाहिले गुरुरूप ऐसे ॥ धृ ॥
तनमनधन सर्वही आर्पून ।
जालो शरणागत ऐसे ॥ १ ॥

आभय हस्ते वैसुनि सन्मुखि ।
मावळित शशि सूर्यनभा ऐसे ॥ २ ॥

कोटी भानुप्रभा फाकली त्या काळी ।
मी तू पण हारले ऐसें ॥ ३ ॥

आनतोकित षड्कर्मातित ।
दत्तस्वरूपचि ऐसें ॥ ४ ॥

(२) नका पाहू मार्गे पुढें ।
सावळें रूपी दृष्टी गडे ॥ १ ॥

शास्त्र पुराणाचे वीज ।
तुझे हाती असे निज ॥ २ ॥

लक्ष लावि त्या स्मरणिं ।
आनुभव हो तैचि क्षणिं ॥ ३ ॥

नको पाहू मतातरे ।
सर्वठायी येक विच्यार ॥ ४ ॥

विचार विवेकसिंधु प्राप्ती ।
दत्त म्हणे गुरू प्रतिती ॥ ५ ॥

(३) नको पुसो वारवार ।
धरि नामाचा उचार ॥ १ ॥

न करि आणिक काहि ।
भ्रुकुटिमध्यें लक्ष लावि ॥ २ ॥

धरू नको खटपटी ।
आद्यस्फुरण हे घोटी ॥ ३ ॥

नको आन्य साधन पाहि ।
गगनी रव ब्रह्ममनी ध्याई ॥ ४ ॥

आणुरेणु अतर गर्भ ।
आनत ब्रह्मांडें व्याप्त नभ ॥५॥

सर्व आगता सर्व नाहि ।
दत्त आर्षि लक्ष तेही ॥ ६ ॥

## १९. रघुनाथभटजी नाशिककर

### ( सतरावे शतक )

वदेऽद्वैतेश्वर देव गोदातीरनिवासिनम् ॥
प्रत्यक्ष भृगुरूप वै रघुनाथाभिध गुरुम् ॥ १ ॥
ज्ञानसिंधु कृपासिंधु सौख्यसिंधु च शाश्वतम् ॥
शिव शिवकर शात शातिद शुभद भजे ॥ २ ॥
अद्वय द्वयहतार दैन्यदु खनिवारकम् ॥
महासिद्ध महात्मान चिदात्मान नमाम्यहम् ॥३॥

श्रीअद्वैतेश्वर ऊर्फ श्रीरघुनाथभटजी महाराज याच्या चरणकमलास, त्यानीच प्रेरिलेल्या श्लोकत्रयाने अनन्य नमन करून, त्याच्याच अगाध व महान् चरित्रातील काही महत्त्वाचा भाग वाचकवर्गापुढे ठेवण्याची सुसधी मला श्रीअद्वैतेश्वर कृपेनें प्राप्त झाली, म्हणून मला आनद वाटत आहे याचे चरित्र फारच थोडयास माहीत आहे. ते अत्यत अद्भुत व उद्बोधकर असे आहे सवध चरित्र या लहानशा लेखात देणे अशक्य आहे वाचकवर्गास या साधुवर्याची थोडीशी तरी कल्पना यावी म्हणून त्याच्या जीवनातील काही भाग मी येथे देत आहे

पूर्वपीठिका —पूर्वी कृतयुगात रेवातीरी (नर्मदातीरी) एका रम्यस्थली भृगुऋषी अनुष्ठानास बसले होते, त्यानी भगवताचे ध्यान करून समाधी लावली ती समाधी बहुकाळपर्यंत टिकली कृत, त्रेता व द्वापर तीन्ही युगे सपली, तरी समाधि-उत्थान झाले नाही पुढे कलियुग आले, बरीच वर्षे लोटली, एके दिवशी मुनी समाधीतून अकस्मात जागे झाले व शिष्यास हाक मारून विचारू लागले की, ' हे युग कोणते चालू आहे ?' त्या शिष्यानी सागितले की, ' कृत, त्रेता, द्वापर, अशी तिन्ही युगे जाऊन साप्रत कलियुग प्राप्त झाले आहे ' तीन युगापर्यंत समाधि-अवस्थेत काल गेला, हे पाहून भृगुमुनीस आश्चर्य वाटले

रेवातीरी त्या वेळी इतरही काही मुनी तप करीत बसले होते एके दिवशी भृगुमुनींनी गोदावरीचे माहात्म्य ऐकले व तेव्हापासून गोदातटाकी वास करावा अशी इच्छा त्यास झाली मुनीच्या बरोबर जे इतर ( ऋषी ) शिष्य होते त्यास मुनी म्हणाले की, एकाद्या शुचिष्मत ब्राह्मणाच्या पोटी मी जन्म घेऊन गोदातटाकी वास करतो व तुम्हीही अशाच प्रकारे जन्म घेऊन मजकडे या मी तुम्हास बोध देऊन मुक्त करीन, ससार-बधात पडू देणार नाही याप्रमाणे सागताच, सर्व शिष्यास आनद झाला व मुनीबरोबर आपणही जन्म घ्यावा असे त्यानी ठरविले

ठरल्याप्रमाणे भृगुमुनी शिष्यासह रेवातीरी ( सौराष्ट्रात ) एका रम्य उपवनी आले व तेथे एक सुदर मठ करून भगवच्चिंतन वगैरे करु लागले त्या स्थानास भृगुक्षेत्र म्हणतात जेथे नर्मदा समुद्रास मिळाली आहे त्याच्या निकटच हे स्थान आहे

त्या भृगुक्षेत्रात 'ज्ञानवर्धन' नावाचा एक सदाचारी ब्राह्मण रहात असे त्यास पुत्र नव्हता. त्याची पत्नी व तो मोठे शिवभक्त असत नित्य पार्थिव पूजा करून, 'हे शकरा, भृगुसमान मला उत्तम पुत्र दे' अशी प्रार्थना ते पतिपत्नी दोघे नित्य करीत असत, एके दिवशी त्या दापत्याने वरील प्रार्थना करून नर्मदेच्या डोहात दोघानी देहत्याग केला ही वार्ता शकरास कळताच शकर स्वत उमेसह रेवातीरी जेथे भृगु ऋषी आपल्या शिष्यासह अनुष्ठानी बसले होते, तेथे आले त्याच्याबरोबर दत्तात्रेय, याज्ञवल्क्य, वसिष्ठ, व्यास, अत्री वगैरे ऋषिमडळीही आली साक्षात् शकर उमेसह आपल्या आश्रमात आले आहेत असे पाहताच भृगुमुनींनी आनदित होऊन उमा-शिवास साष्टाग वदन करून त्यास आदराने आसनावर बसविले व 'काय आज्ञा !' म्हणून विचारले शकर म्हणाले – 'हे भृगो ! शिवभक्त ज्ञानवर्धन द्विज पत्नीसह माझे स्मरण करीत पुत्रार्थ या नर्मदेत देहत्याग करिता झाला हे मला कळले, म्हणून मी येथे त्वरित आलो आहे म्हणून त्याच्या उदरी तुम्हाला व आम्हा-लाही जाणे जरूर आहे व त्या भक्ताचे मनोरथ पूर्ण करणे प्राप्त आहे ' या शिवाच्या बोलण्यास पार्वतीनेही समती दिली तिचे व शिवाचे बोलणे ऐकताच, दत्तात्रेय, वसिष्ठ वगैरे मुनिमडळीही आनदाने म्हणाली की, 'हे भृगो ! हे सर्वश्रेष्ठा सर्वज्ञा ! तू त्या द्विजाच्या पोटी जन्म घेणार, तसेच उमा व शिवही घेणार हे ऐकून आम्हास आनद झाला आम्ही सर्व आपल्या सगतीचा व दर्शनाचा लाभ घेण्यासाठी अवश्य गोदातटाकी येऊ ' असे म्हणून ती ऋषिमडळी अदृश्य झाली व उमा–शकरही अतर्धान पावले शिवाचीच आज्ञा झाली असल्याने त्या द्विज-दापत्याच्या पोटी जन्म घेणे प्राप्त आहे असा विचार भृगुमुनींनी केला, आणि आपल्या शिष्य-गणास सागितले की 'तुम्हीही निरनिराळ्या द्विजाच्या उदरी जन्म घ्याल व माझ्याकडे पुन्हा येऊन पुनीत व्हाल व मी तुमचा मोहपाश छेदीन ' ' बरे आहे, ' असे म्हणून सर्वांनी भृगु-मुनीचा जयजयकार केला व बरीच वर्षे रेवा-तीरी तपाचरण केल्यावर ठरल्या वेळी देहत्याग सर्वांनी केला शिव-पार्वतींनी भृगूबरोबर आपणही त्या द्विजाच्या उदरी जन्म घेऊ असा विचार केला

**पूर्वजवृत्तात** –पुढे, कर्नाटक प्रातातील मलप्रभा नावाच्या नदीच्या तीरी अशोक नावाचे एक क्षेत्र आहे, तेथे विश्वनाथ भट अळवणी-कर नावाचा सत्त्वस्थ ब्राह्मण राहत असे त्याची पत्नी गरोदर होती तिच्या उदरी तो ज्ञानवर्धन विप्र आला त्याचे जन्मप्रसगी मलप्रभेच्या जलात साक्षात् भागीरथी तीन दिवस-पर्यंत राहिली होती दरवर्षी त्या दिवसात तेथे भागीरथी येते अशी साक्ष अद्याप आहे असे म्हणतात या दिवसात तेथे स्नान केले की,

भागीरथीस्नानाचे पुण्य लाभते, अशी आख्यायिका आहे

बालक जन्मल्यावर तेरावे दिवशी विश्वनाथभटास रात्री स्वप्न पडले ते असे, स्वप्नात साक्षात् गणपती आले व म्हणाले, 'विश्वनाथ ! तुझ्या पोटी जो मुलगा जन्मला आहे, तो सामान्य जीव नसून तो मोठा पूर्वीचा तपस्वी ब्राह्मण आहे त्याचे नाव गणपती ठेव त्याचे पोटी भृगुऋषी, शकर व पार्वती असे जन्म घेऊन जगाचा उद्धार करतील म्हणून तू त्या तिघाचा साभाळ चागला कर' असे सागून गणपती अदृश्य झाले सकाळी उठल्यावर विश्वनाथ भटजीनी पत्नीस ते सर्व स्वप्न सागितले तिला अत्यत आनद झाला तिने अनेक सुवासिनीस बोलावून त्या मुलाचे नाव 'गणपती' ठेविले तो आठ वर्षांचा झाल्यावर त्याची मुज केली. त्याच क्षेत्रात काशीनाथभट श्रोत्री यास एक कन्या झाली तिचे नाव त्यानी चिमाबाई ठेविले त्या श्रोत्रीच्या स्वप्नात गणपती गेले, व त्याला सागितले की, 'तुझी मुलगी विश्वनाभटाचा मुलगा गणपती यास दे' नतर काशीनाथभटजीनी आपल्या पत्नीची समती घेऊन विश्वनाथ भटजीची गाठ घेऊन गणपतीला चिमा द्यावयाची हे निश्चित केले, आणि सुमुहूर्त पाहून लग्नही लावून दिले लग्नसोहळाही चार दिवस उत्तम झाला

लग्न झाल्यावर एक चमत्कार झाला. गणपती हा लहान वयाचा होता, तरी नित्य स्नान, सध्या व शिवपूजा यथाविधी करीत असे तो शिवरात्र, एकादशी वगैरे व्रतेही करीत असे माघ व॥ एकादशीस सोमवार होता, त्यामुळे तो महापर्वकाळ होता दुपारी ऊन कडक पडले होते, जमीन अगदी तापली होती अशा वेळी गणपती मलप्रभेत स्नानास गेला व त्याने तेथील डोहात बुडी दिली. त्याच वेळी जलदेवता तेथे त्या डोहात जलक्रीडा करण्यासाठी आल्या होत्या गणपती दिसण्यात सुदर होता त्या देवतानी गणपतीस नेले व आपल्या एका उत्तम जलमदिरात ठेविले

इकडे काठावरील सर्व लोक 'गणपती बुडाला बुडाला' असे म्हणू लागले व त्याचा शोध करू लागले तो कोठेच सापडेना व अखेर तो बुडाला, ही वार्ता त्या लोकानी विश्वनाथभटास सागितली गणपतीचे मातापिता फार शोक करू लागले नदीतीरी जाऊन त्यानी टाहो फोडला व शकराचा धावा केला व स्वप्न खोटे का ठरले म्हणून रडू लागले त्या दोघास शोक अनावर झाला व आपणही डोहात देहत्याग करावा असे दोघाच्या मनात आले तीन दिवस ते दोघे अन्नपाणी वर्ज्य करून त्या डोहावर शकराची प्रार्थना करीत बसले त्याची हाक मृडानीपतीच्या कानी गेली व तो तेथे हातात शूळ घेऊन धावत आला, आणि जळदेवताच्या जलमदिरात स्वत जाऊन त्याना दड देऊन गणपतीस जिवत स्थितीत वर आणून त्याने मातापितराच्या स्वाधीन केले तो दिवस शिवरात्रीचा होता त्याची शिवोपासना फलद्रूप झाली मृत्युशय्येवर पडलेल्यास अमृत मिळावे, किंवा दरिद्र्यास द्रव्यकुभाचा अवचित लाभ व्हावा, तसे त्या मातापितरास झाले पुत्रास प्रेमाने आलिगन देऊन, ते सर्व शकराची स्तुती करते झाले ज्या ठिकाणी पुत्र बुडाला व जेथे त्याची पुन्हा प्राप्ती झाली, त्या मलप्रभेच्या तीरी त्यानी ब्राह्मणाकरवी स्वयभू शिवलिंगाची स्थापना केली आणि अनेक प्रकारे त्याचे पूजन करून ब्राह्मणसतर्पणही केले

त्यानतर गणपती ऊर्फ गणेशभट व त्याची पत्नी चिमाबाई मोठ्या आनदाने नादत असत चिमाबाई महान पतिव्रता व लावण्यखणी होती दोघेही परमशिवभक्त होते एके दिवशी कर्पूरगौरानी चिमाबाईच्या उदरात प्रवेश केला व ९ महिने होताच एक सुदर पुत्ररत्न झाले त्याचे नाव 'नारायण' ठेविले दुसरे वर्षी चिमाबाईस एक मुलगी झाली ती साक्षात् पार्वतीच तिच्या

पोटी आली होती. तिचे नाव 'जीऊबाई' असे ठेविले.

**रघुनाथाचा जन्म.**— इकडे रेवातीरी भृगु-मुनीस अंतर्ज्ञानाने कळले की, शिवपार्वतींनी चिमाबाईच्या पोटी जन्म घेतला आहे; तेव्हा आपल्यालाही जन्म घेण्यास गेले पाहिजे. नंतर त्यांनी आपल्या सर्व शिष्यगणास बोलाविले व सांगितले की, मी चिमाबाईच्या उदरी जन्म घेतो. तुम्हीही स्वेच्छेने या कलीत अवतरण करावे व मला गोदातटाकी भेटण्यास यावे असे सांगून आपण एका गुहेत गेले.

एके दिवशी गणेशभटाची बायको निद्रिस्त असता तिच्या नेत्राद्वारे भृगू मुनींनी तिच्या उदरात प्रवेश केला. नऊ महिने झाल्यावर ती प्रसूत झाली. ही प्रसूती अति विचित्र होती. गणेशभटाची बायको तिसऱ्या मजल्यावर निद्रिस्त असता तिला स्वप्न पडले की, आपल्याला पुत्र झाला व तो नऊ महिन्याचा असतानाच रांगू लागला व तो फार सुंदर आहे. जागी होऊन पाहते, तो खरोखरीच लावण्यवंत पुत्र आपल्या जवळ तिला दिसला. बाळंतपणाचा कोणत्याही प्रकारे तिला त्रास झाला नाही. 'दर्शनें प्रशस्तीसी ठावो' या श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या वचनाप्रमाणे त्या मुलास पाहताच निदेहावीत होऊन ती स्वरूपी निमग्न झाली. आपपर भेद सर्व मावळला; इतक्यात समाचारार्थ गणेशभट तेथे आले ते हसत असलेले बालक पाहताच त्यांचे देहभान गेले व मन उन्मन झाले. याप्रमाणे पुनास पाहताच आईबापास समाधी लागली. सात दिवसपर्यंत उत्थान नाही अशी स्थिती झाली. त्यांची ती तशी स्थिती पाहून कोणी म्हणू लागले की, यांना भुताने झडपले; कोणी म्हणाले, अहो, ही मातापितरे वेडी झाली सात दिवसपर्यंत त्या बालकाचा सांभाळ, त्याचे लालनपालन घरातील इतर मंडळींनी केले. त्या मातेला शुद्धच नाही. आठवे दिवशी त्या दोघांची समाधी उतरली व ते इतरांस म्हणाले, 'काय आम्ही आनंदसागरात होतो! आम्हास आमच्या समाधीतून का उठविले?'

नंतर गणेशभटजींनी द्विजवृंदास पाचारण केले व त्यांना वस्त्रभूषणे देऊन संतोषविले. बाराव्या दिवशी सुवासिनींचा मेळा जमला व त्या सुंदर बालकाचे नाव सुमुहूर्त पाहून 'रघुनाथ' असे ठेविले. हाच बालक पुढे रघुनाथभटजी महाराज म्हणून प्रसिद्ध झाला.

**रघुनाथांचे बालपण :**— शुक्लेन्दुवत् रघुनाथ वाढू लागला. एके दिवशी रघुनाथाला पाठीशी घालून माता निजली होती. तीन प्रहर रात्र झाल्यावर माता उठून पाहते तो ते लेकरू देवघरात मांडी घालून ध्यानस्थ बसले आहे. रघुनाथाच्या जवळ जाऊन त्याला मानेने हलवले; पण तो शुद्धीवर आलाच नाही. बऱ्याच वेळाने तो देहावर आला व याप्रमाणे दररोज पहाटे होऊ लागले. तेव्हा गणेशभटजीस भार्या म्हणाली की, हा मुलगा पूर्वीचा कोणी योगिराज असावा. या मुलास झोप मुळीच नाही. आसन घालून नेहमी ध्यानस्थ बसतो. भार्येचे ते बोलणे ऐकून गणेशभटास आठवण झाली की, आपल्या वडिलांच्या स्वप्नात गणपती आला होता व त्याने सांगितले होते की, 'शंकर, पार्वती व भृगू हे तुमच्या मुलाच्या पोटी येतील' ते स्वप्न खरे ठरले व आपले पूर्वपुण्य आज उदयाला आले. परंतु ही मुले कार्तिकस्वामीप्रमाणे केव्हाच उठून निघून जातील, म्हणून जपले पाहिजे. गणेशभटजींचे लक्ष चुकवून ही दोन्ही मुले अगदी पहाटेस उठून अरण्यात जात व पुन्हा परत दोन प्रहरी येत

**गृहत्याग :**— पुढे त्या दोघांही मुलांचे उपनयन केले व जीऊबाईचे लग्न करून दिले आणि नारायण व रघुनाथ या दोघासही मुली सांगून येऊ लागल्या. दोन मुली दोघासाठी पसंत करून निरनिराळ्या तिथी लग्नाच्या ठरविल्या. प्रथम

तिथीला नारायणाचे लग्न लावले. आता दुसऱ्या तिथीस रघुनाथाचे लग्न व्हावयाचे. ही गोष्ट रघुनाथास कळताच, रात्रीच्या वेळी, माता-पित्याचा त्याग करून रघुनाथ गिरिकंदरे ओलांडून पुढे जाऊ लागला. तेथे अनेक हिंस्र पशूंची गाठ झाली. परंतु ते हिंस्र पशू त्याजकडे नुसते पाहत व पुढे मुकाट्याने निघून जात. 'चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्रही न खाती सर्प तया ॥' या श्रीतुकाराममहाराजांच्या वचनाप्रमाणे अरण्यातील सिंह-व्याघ्रांच्या गाठी पडूनही ते रघुनाथास काही करीत नसत.

**नाशकास आगमन :—** प्रवास करीत करीत रघुनाथ एका उपवनात आला. पाच दिवस सारखा पायी, अनवाणी व एका वस्त्रानिशी, काही न खाता प्रवास झाला. अत्यंत क्षीण आला म्हणून एका झाडाखाली त्याने थोडा विसावा घेतला. तेथे काही फळे पडलेली होती, ती त्याने भक्षण केली, व जवळील एका झऱ्याचे जल प्राशन केले व स्वस्थ बसला. जाणारे येणारे मार्गस्थ लोक त्याजकडे पाहत व त्यांस असे वाटे की, हा कोणी योगिराज आहे. त्या वेळी रघुनाथाचे वय अवघे बारा वर्षांचे होते. त्यांनी त्यास नम्रपणे विचारले की 'महाराज ! आपण कोण ? कोठे जावयाचे ?' रघुनाथाने आपले नाव सांगून 'मला नाशकास जावयाचे आहे' असे सांगितले. ते मार्गस्थही म्हणाले, 'आम्हांसही तिकडेच जावयाचे आहे.' मग रघुनाथ त्यांच्या बरोबर जावयास निघाला. जाता जाता दोन प्रहर झाले. लोक म्हणाले, 'महाराज ! आम्ही थोडा फराळ करतो; आपण आमच्या बरोबर थोडे खाल काय ?' रघुनाथ म्हणाला,'गोदातटाकी गेल्यावाचून मी निराहारी राहणार आहे' नाशिक येथे गेल्यावर ते सर्व वाटेला लागले व दरकूच दरमजल करीत नाशकास आले. नाशकास ती पावन (गंगा) गोदावरी पाहताच रघुनाथास अत्यंत आनंद झाला व त्याने तिला सादर प्रणाम केला. गोदावरीसही हा महात्मा मला पवित्र करण्यासाठी येथे आला आहे हे पाहून तिनें तरंगित होऊन आपला आदर व आनंद व्यक्त केला. साधुपुरुषांच्या दृष्टिक्षेपानेही तीर्थांस तीर्थत्व येते; मग त्या जलात स्नान केल्यावर का येणार नाही ? तीर्थे पाप्यांचे पाप घेतात व ते पाप पुण्यवंतांच्या दर्शन-स्पर्शाने नाहीसे करतात.

**मातापितरांचा शोक व अंत :—** इकडे कर्नाटकात अशोक क्षेत्रात रघुनाथाचा असा दररोजचा कार्यक्रम असे की, सकाळी पहाटेच उठून गावाबाहेर अरण्यात जावयाचे व तेथे ध्यानधारणेस बसावयाचे व दोन प्रहरी गावात घरी यावयाचे व मग भोजन करावयाचे. एके दिवशी नेहमीप्रमाणे रघुनाथ घरी दुपारी आला नाही; त्यामुळे गणेशभट व चिमाबाई या उभयतांस फार काळजी वाटली व ते त्याचा शोध करू लागले. नारायणाचे लग्न झाल्यावर दुसऱ्या तिथीस चारपाच दिवसांनी रघुनाथाचे लग्न व्हावयाचे होते; त्याप्रमाणे सर्व तयारीही वधूपक्ष, वरपक्ष यांची झालेली होती. रघुनाथ कोणासही कुठे जातो वगैरे काहीही न कळविता कोठे निघून गेला याचा कोणास पत्ता लागेना. गणेशभटजींनी रघुनाथाच्या शोधार्थ अरण्यात व इतरत्र माणसे पाठविली, पण त्यांसही त्याचा पत्ता लागला नाही. रघुनाथाचा शोध लागत नाही असे होताच त्या मातापितरांस परमावधीचे दुःख झाले व ती दोघे शोक करू लागली. चिमाबाई तर धरणीवर अंग टाकून रडू लागली. दोघांनी अन्नपाणी वर्ज्य केले. 'रघुनाथ ! रघुनाथ ! तू आम्हास कधी भेटशील ?' असा दोघांनी टाहो फोडला. लोकांनी त्यांचे सांत्वन करण्याचा बराच प्रयत्न केला. परंतु त्यांचा शोक कमी होईना. अखेर त्या दोघांनी असा निश्चय केला की, रघुनाथाच्या शोधार्थ काशीस जावयाचे व तेथे तो सापडला तर ठीक, नाही तर गंगेत देह समर्पण करावयाचा. याप्रमाणे निश्चय करून ते दोघे काशीस गेले व

तेथे रघुनाथाचा शोध केला. तो आढळून आला नाही म्हणून दोघांनी श्रीकाशीविश्वेश्वराचे दर्शन घेऊन भागीरथीत आपआपले देह समर्पण केले.

**रघुनाथ भटजींचा फडके यांचेकडे वास :–** रघुनाथ नाशकास आल्यावर गोदावरीच्या दक्षिण तीरी, तीराच्या अगदी निकट जागेवरच बसून राहिला. काही वेळ विश्रांती घेतल्यावर त्याने गंगेत स्नान केले. संध्यावंदन व ध्यानधारणा झाल्यावर भूक लागली होती तरी कोणाकडेही अन्नाची याचना त्याने केली नाही. गोदावरीचे जलपान करूनच तो राहिला. याप्रमाणे सात दिवसपर्यंत रघुनाथाने काहीच खाल्ले नाही. नुसते जलपानच करून राहिला. कोणी विचारलेच तर त्यास तो काहीच उत्तर देत नसे. मौन धरले होते. त्या वेळी नाशकात बाजीराव बळवंत फडके या नावाचे सदाचारी गृहस्थ राहत असत. ते एके दिवशी सहजच गंगेवर आले असता त्यांना रघुनाथ दिसला. त्यास पाहताच एक प्रकारचे आकर्षण वाटले. वय सुमारे बारातेरा दिसत असून योग्याप्रमाणे निस्पृह वृत्ती त्याचे ठिकाणी दिसत होती. हा सामान्य मुलगा नसावा असे त्यास वाटले म्हणून त्यांनी त्याच्याजवळ जाऊन विचारपूस केली; पण रघुनाथ काहीच बोलेना. अखेर फडके यांनी फारच आग्रह धरल्यावर, नाव सांगितले; नंतर फडके म्हणाले, 'माझ्या घरी चल.' प्रथम तो तयार नव्हता; परंतु फडके यांचा फारच प्रेमळपणाचा आग्रह दिसल्यावर रघुनाथाने घरी येण्याचे कबूल केले व तो फडके यांच्याबरोबर त्यांच्या घरी गेला. तेथे त्यांनी त्यास जेऊ घातले व सांगितले की, 'तू आता आमच्याच घरी राहा. आमच्या घरी देवघरात देव आहेत, त्यांची पूजा करीत जा व संस्कृत वगैरे शिकण्यास जोगळेकरशास्त्री यांचेकडे जात जा.' याप्रमाणे रघुनाथाने कबूल केले व फडके यांच्या घरची पूजा वगैरे झाल्यावर तो नित्य रघुनाथ दीक्षित जोगळेकर यांचेकडे शिकण्यास जाऊ लागला. त्या वेळी जोगळेकर हे मोठे प्रकांड पंडित म्हणून गणले जात असत. त्यांच्याजवळ रघुनाथाने दशग्रंथ समग्र थोडक्या दिवसांतच मुखोद्गत केले. ते पाहून जोगळेकर व इतर सर्व शास्त्री मंडळीस आश्चर्य वाटले व रघुनाथाची त्यांनी फार प्रशंसा केली. रघुनाथ हा ज्या वेळी जोगळेकर यांजकडे पढण्यास जात असे त्यावेळी त्यास जर उशीर झाला तर तो भूमीवर पाऊल न लागता अधांतरी त्वरेने जात असे हे काही विद्यार्थ्यांनी पाहिले व गुरुजीस सांगितले. पण त्यास ते खरे वाटेना.

एके दिवशी फडके यांच्या घरी त्यांच्या देवघरात रघुनाथ पूजेस बसला होता. पूजा आटोपल्यावर त्याची ध्यानधारणा सुरू झाली. ती सुरू होताच रघुनाथ एकाएकी गुप्त झाला. फडके यांनी बराच शोध केला. तो दिसला नाही म्हणून त्यांनी देवघराचे दार बाहेरून लावून घेतले. काही वेळाने देवघरात दाराच्या फटीतून फडके यांनी पाहिले तो त्यास रघुनाथ आसनावर दोन हात उंच अधांतरी ध्यानस्थ बसलेला दिसला. हे पाहताच फडके यास अत्यंत आश्चर्य वाटले. हा कोणी तरी महायोगी आहे, सामान्य मुलगा नाही, ही त्यांची पक्की खात्री झाली. देवघराची कडी हळूच त्यांनी उघडली व रघुनाथाची ध्यानधारणा संपून तो बाहेर आल्यावर त्यांनी रघुनाथाच्या पायावर डोके ठेवले व सांगितले की, 'आजपासून तू आमच्या येथे पुजारी नसून आम्ही तुझे पुजारी आहोत. रघुनाथा! तुला आम्ही ओळखले नव्हते, म्हणून तुझ्यापासून ही देवपूजेची सेवा घेतली याबद्दल क्षमा कर. रघुनाथा! तुला 'अरे! तुरे!' असे आम्ही आजपर्यंत एकेरी बोललो; पण तू योगीराज आहेस व आजपासून आम्ही तुला महाराज म्हणूनच म्हणणार.' तेव्हापासून फडके यांनी देवपूजेचे काम त्यास सांगितले नाही. उलट एक महान् साधू पुरुष योगेश्वर असे समजून ते

तिथीला नारायणाचे लग्न लावले. आता दुसऱ्या तिथीस रघुनाथाचे लग्न व्हावयाचे. ही गोष्ट रघुनाथास कळताच, रात्रीच्या वेळी, माता-पित्याचा त्याग करून रघुनाथ गिरिकंदरे ओलांडून पुढे जाऊ लागला. तेथे अनेक हिंस्र पशूंची गाठ झाली. परंतु ते हिंस्र पशू त्याजकडे नुसते पाहत व पुढे मुकाट्याने निघून जात. 'चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्रही न खाती सर्प तया ॥' या श्रीतुकाराममहाराजांच्या वचनाप्रमाणे अरण्यातील सिंह-व्याघ्राच्या गाठी पडूनही ते रघुनाथास काही करीत नसत.

**नाशकास आगमन :–** प्रवास करीत करीत रघुनाथ एका उपवनात आला. पाच दिवस सारखा पायी, अनवाणी व एका वस्त्रानिशी, काही न खाता प्रवास झाला. अत्यंत क्षीण झाला म्हणून एका झाडाखाली त्याने थोडा विसावा घेतला. तेथे काही फळे पडलेली होती, ती त्याने भक्षण केली, व जवळील एका झऱ्याचे जल प्राशन केले व स्वस्थ बसला. जाणारे येणारे मार्गस्थ लोक त्याजकडे पाहत व त्यांस असे वाटे की, हा कोणी योगिराज आहे. त्या वेळी रघुनाथाचे वय अवघे बारा वर्षांचे होते. त्यांनी त्यास नम्रपणे विचारले की 'महाराज ! आपण कोण ? कोठे जावयाचे ?' रघुनाथाने आपले नाव सांगून 'मला नाशकास जावयाचे आहे' असे सांगितले. ते मार्गस्थही म्हणाले, 'आम्हांसही तिकडेच जावयाचे आहे.' मग रघुनाथ त्यांच्या बरोबर जावयास निघाला. जाता जाता दोन प्रहर झाले. लोक म्हणाले, 'महाराज ! आम्ही थोडा फराळ करतो; आपण आमच्या बरोबर थोडे खाल काय ?' रघुनाथ म्हणाला,'गोदातटाकी गेल्यावाचून मी निराहारी राहणार आहे' नाशिक येथे गेल्यावर ते सर्व वाटेला लागले व दरकूच दरमजल करीत नाशकास आले. नाशकास ती पावन (गंगा)गोदावरी पाहताच रघुनाथास अत्यंत आनंद झाला व त्याने तिला सादर प्रणाम केला. गोदावरीसही हा महात्मा मला पवित्र करण्यासाठी येथे आला आहे हे पाहून तिने तरंगित होऊन आपला आदर व आनंद व्यक्त केला. साधुपुरुषांच्या दृष्टिक्षेपानेही तीर्थास तीर्थत्व येते; मग त्या जलात स्नान केल्यावर का येणार नाही ? तीर्थे पाप्याचे पाप घेतात व ते पाप पुण्यवंतांच्या दर्शन-स्पर्शाने नाहीसे करतात.

**मातापितरांचा शोक व अंत :–** इकडे कर्नाटकात अशोक क्षेत्रात रघुनाथाचा असा दररोजचा कार्यक्रम असे की, सकाळी पहाटेच उठून गावाबाहेर अरण्यात जावयाचे व तेथे ध्यानधारणेस बसावयाचे व दोन प्रहरी गावात घरी यावयाचे व मग भोजन करावयाचे. एके दिवशी नेहमीप्रमाणे रघुनाथ घरी दुपारी आला नाही; त्यामुळे गणेशभट व चिमाबाई या उभयतांस फार काळजी वाटली व ते त्याचा शोध करू लागले. नारायणाचे लग्न झाल्यावर दुसऱ्या तिथीस चारपाच दिवसांनी रघुनाथाचे लग्न व्हावयाचे होते; त्याप्रमाणे सर्व तयारीही वधूपक्ष, वरपक्ष यांची झालेली होती. रघुनाथ कोणासही कुठे जातो वगैरे काहीही न कळविता कोठे निघून गेला याचा कोणास पत्ता लागेना. गणेशभटजींनी रघुनाथाच्या शोधार्थ अरण्यात व इतरत्र माणसे पाठविली, पण त्यांसही त्याचा पत्ता लागला नाही. रघुनाथाचा शोध लागत नाही असे होताच त्या मातापितरांस परमावधीचे दुःख झाले व ती दोघे शोक करू लागली. चिमाबाई तर धरणीवर अंग टाकून रडू लागली. दोघांनी अन्नपाणी वर्ज्य केले. 'रघुनाथ ! रघुनाथ ! तू आम्हास कधी भेटशील ?' असा दोघांनी टाहो फोडला. लोकांनी त्यांचे सांत्वन करण्याचा बराच प्रयत्न केला. परंतु त्यांचा शोक कमी होईना. अखेर त्या दोघांनी असा निश्चय केला की, रघुनाथाच्या शोधार्थ काशीस जावयाचे व तेथे तो सापडला तर ठीक, नाही तर गंगेत देह समर्पण करावयाचा. याप्रमाणे निश्चय करून ते दोघे काशीस गेले व

तेथे रघुनाथाचा शोध केला. तो आढळून आला नाही म्हणून दोघांनी श्रीकाशीविश्वेश्वराचे दर्शन घेऊन भागीरथीत आपआपले देह समर्पण केले.

**रघुनाथ भटजींचा फडके यांचेकडे वास :—** रघुनाथ नाशकास आल्यावर गोदावरीच्या दक्षिण तीरी, तीराच्या अगदी निकट जागेवरच बसून राहिला. काही वेळ विश्रांती घेतल्यावर त्याने गंगेत स्नान केले. संध्यावंदन व ध्यानधारणा झाल्यावर भूक लागली होती तरी कोणाकडेही अन्नाची याचना त्याने केली नाही. गोदावरीचे जलपान करूनच तो राहिला. याप्रमाणे सात दिवसपर्यंत रघुनाथाने काहीच खाल्ले नाही. नुसते जलपानच करून राहिला. कोणी विचारलेच तर त्यास तो काहीच उत्तर देत नसे. मौन धरले होते. त्या वेळी नाशकात बाजीराव बळवंत फडके या नावाचे सदाचारी गृहस्थ राहत असत. ते एके दिवशी सहजच गंगेवर आले असता त्यांना रघुनाथ दिसला. त्यास पाहताच एक प्रकारचे आकर्षण वाटले. वय सुमारे बारातेरा दिसत असून योग्याप्रमाणे निस्पृह वृत्ती त्याचे ठिकाणी दिसत होती. हा सामान्य मुलगा नसावा असे त्यास वाटले म्हणून त्यांनी त्याच्याजवळ जाऊन विचारपूस केली; पण रघुनाथ काहीच बोलेना. अखेर फडके यांनी फारच आग्रह धरल्यावर, नाव सांगितले; नंतर फडके म्हणाले, 'माझ्या घरी चल.' प्रथम तो तयार नव्हता; परंतु फडके यांचा फारच प्रेमळपणाचा आग्रह दिसल्यावर रघुनाथाने घरी येण्याचे कबूल केले व तो फडके यांच्यावरोबर त्यांच्या घरी गेला. तेथे त्यांनी त्यास जेऊ घातले व सांगितले की, "तू आता आमच्याच घरी राहा. आमच्या घरी देवघरात देव आहेत, त्यांची पूजा करीत जा व संस्कृत वगैरे शिकण्यास जोगळेकरशास्त्री यांचेकडे जात जा.' याप्रमाणे रघुनाथाने कबूल केले व फडके यांच्या घरची पूजा वगैरे झाल्यावर तो नित्य रघुनाथ दीक्षित जोगळेकर यांचेकडे शिकण्यास जाऊ लागला. त्या वेळी जोगळेकर हे मोठे प्रकांड पंडित म्हणून गणले जात असत. त्यांच्याजवळ रघुनाथाने दशग्रंथ समग्र थोडक्या दिवसांतच मुखोद्गत केले. ते पाहून जोगळेकर व इतर सर्व शास्त्री मंडळीस आश्चर्य वाटले व रघुनाथाची त्यांनी फार प्रशंसा केली. रघुनाथ हा ज्या वेळी जोगळेकर यांजकडे पढण्यास जात असे त्यावेळी त्यास जर उशीर झाला तर तो भूमीवर पाऊल न लागता अधांतरी त्वरेने जात असे हे काही विद्यार्थ्यांनी पाहिले व गुरुजीस सांगितले. पण त्यास ते खरे वाटेना.

एके दिवशी फडके यांच्या घरी त्यांच्या देवघरात रघुनाथ पूजेस बसला होता. पूजा आटोपल्यावर त्याची ध्यानधारणा सुरू झाली. ती सुरु होताच रघुनाथ एकाएकी गुप्त झाला. फडके यांनी बराच शोध केला. तो दिसला नाही म्हणून त्यांनी देवघराचे दार बाहेरून लावून घेतले. काही वेळाने देवघरात दाराच्या फटीतून फडके यांनी पाहिले तो त्यास रघुनाथ आसनावर दोन हात उंच अधांतरी ध्यानस्थ बसलेला दिसला. हे पाहताच फडके यास अत्यंत आश्चर्य वाटले. हा कोणी तरी महायोगी आहे, सामान्य मुलगा नाही, ही त्यांची पक्की खात्री झाली. देवघराची कडी हळूच त्यांनी उघडली व रघुनाथाची ध्यानधारणा संपून तो बाहेर आल्यावर त्यांनी रघुनाथाच्या पायांवर डोके ठेवले व सांगितले की, 'आजपासून तू आमच्या येथे पुजारी नसून आम्ही तुझे पुजारी आहोत. रघुनाथा ! तुला आम्ही ओळखले नव्हते, म्हणून तुझ्यापासून ही देवपूजेची सेवा घेतली याबद्दल क्षमा कर. रघुनाथा ! तुला 'अरे! तुरे!' असे आम्ही आजपर्यंत एकेरी बोललो; पण तू योगीराज आहेस व आजपासून आम्ही तुला महाराज म्हणूनच म्हणणार.' तेव्हापासून फडके यांनी देवपूजेचे काम त्यास सांगितले नाही. उलट एक महान् साधू पुरुष योगेश्वर असे समजून ते

श्रीदत्त वेगळे नाहीत, ते एकरूप आहेत, हा अनुभव त्यास आला महाराज स्वतः अत्यंत विरक्त होते. एकदा एक तरुण स्त्री महाराजांची परीक्षा पाहण्याकरिता एकांत पाहून महाराजांजवळ गेली व कामचेष्टा करू लागली परंतु महाराजांचे मन निर्विकार असल्याने, तीच लाजली व तिने महाराजांचे पाय धरले व क्षमेची याचना केली

आजही श्रीरघुनाथभटजींचे भक्त नाशकात व अन्यत्र पुष्कळ आहेत. ते त्यांची अनन्य भावाने नित्य सेवा करीत असतात श्रीरघुनाथभटजींनी ज्या ठिकाणी जिवंत समाधी घेतली त्या ठिकाणी शिवलिंग स्थापिलेले असून त्यासच 'अद्वैतेश्वर' असे म्हणतात दर शिवरात्रीस महाराजांचे भक्तगण त्या मंदिरात येऊन अहोरात्र उपासना करतात त्यांच्या भक्तांपैकी अनेकांस महाराजांचे प्रत्यक्ष दर्शन झालेले आहे, तसेच अनेकांस त्यांचे अनुभवही आलेले आहेत रघुनाथभटजी महाराजांचे ओवीबद्ध चरित्र त्यांचेच शिष्य प्रख्यात दत्तभक्त श्रीनिरंजन रघुनाथ यांनी लिहिले आहे

— रा व खाडिलकर

## २०. श्रीनिरंजन रघुनाथ
### (सन १७८२–१८५५)

'देवाच्या सख्यत्वासाठी । पडाव्या जिवलगाच्या तुटी । सर्व अर्पावे शेवटी । प्राण तोही वेचावा॥'

या श्रीसमर्थ रामदासांच्या वचनाप्रमाणे श्रीदत्तप्रीत्यर्थ घरादाराचा प्रत्यक्ष त्याग करून, दत्तदर्शनार्थ आपला प्राणही अर्पण करण्यास जे तयार झाले, ते हे सत्पुरुष म्हणजेच 'नाशिकचे श्रीरघुनाथभटजी ऊर्फ अद्वैतेश्वर' यांचे शिष्य निरंजनस्वामी होत यांचे चरित्र अत्यंत मननीय आहे परमेश्वरदर्शन म्हणजे सहज प्राप्त होणारी गोष्ट नाही एक वेळ आत्मानात्मविवेक प्राप्त होऊन ब्रह्मज्ञानही होईल, परंतु सगुणदर्शन दुर्लभ आहे, ते सुलभ नाही ते नुसत्या ज्ञानाने, दानाने, श्रुतींच्या अभ्यासाने वा यज्ञाने प्राप्त होणार नाही

ज्याच्या अंतरात पराकोटीची भक्ती असेल, तीव्रतम तळमळ असेल, त्यासच सगुणदर्शनाचा लाभ होतो सगुणदर्शन होण्यासाठी रात्रंदिवस सावधानता, अखंड साक्षेप, एवढेच नव्हे तर स्वतःचा प्राणही अर्पण करण्याची तयारी पाहिजे ज्याप्रमाणे खरा वीर हातावर शीर घेऊनच लढण्यास जातो, त्याप्रमाणे खरा भक्त देहाची पर्वा न करता प्राणार्पण करण्यास सिद्ध असतो. तो मरण्यास भीत नाही तो खरा मृत्युंजय असतो

घरादाराचा त्याग करून केवळ ईश्वरप्राप्त्यर्थ वनवास पत्करून जिवावर उदार होणारे समर्थ श्रीरामदासांसारखे किंवा श्रीतुकाराममहाराजांसारखे भगवद्‌भक्त क्वचित् असतात 'ऐसे भक्त बहुवस नाही' अशा भगवद्‌भक्तांपैकीच प्रस्तुतचे सत्पुरुष श्रीनिरंजनस्वामी होत त्यांनी श्रीदत्तदर्शन होण्यासाठी कशी खडतर साधना केली हे पहा —

निरंजनस्वामींचा जन्म कार्तिक शु॥ ८ रा शके १७०४ साली दक्षिण हैद्राबादकडे ता धारूर गाव कळंब येथे झाला त्यांच्या वडिलांचे नाव श्रीधरपंत असून आडनाव थोरी होते निरंजनस्वामींचे पूर्वाश्रमीचे नाव 'अवधूत' होते नाशिकचे सुप्रसिद्ध सिद्धपुरुष श्रीरघुनाथभटजी (ऊर्फ अद्वैतेश्वर) हे त्यांचे सद्‌गुरू होत व त्यांनीच त्यांचे नाव 'निरंजन' असे ठेविले

नाशिक येथे 'व्हिक्टोरिया' पुलाजवळ गोदातटाच्या दक्षिणतीरावर श्रीरघुनाथभटजी यांची जिवंत समाधी आहे याच समाधीवर 'अद्वैतेश्वर' नावाच्या सुंदर शिवलिंगाची स्थापना केलेली असून मंदिर छोटेसेच पण फार सुंदर बांधले आहे श्रीअद्वैतेश्वर हे जागते दैवत असून येथील काही सद्‌भक्तांस त्यांचा साक्षात्कार झालेला आहे

रघुनाथभटजीशी वागत असत.

**श्रीदत्तात्रेय यांची भेट :–** भटजी महाराजांचा नित्य क्रम असा असे की, पहाटेस उठून गोदावरीचे स्नान करावयाचे; तेथे सध्या,जप वगैरे सूर्योदयापर्यंत केल्यावर फडके याच्या घरी यावयाचे; तेथे मानसपूजा, ध्यानधारणा करीत दुपारपर्यंत बसावयाचे, नंतर भोजन व नंतर कोणी आल्यास त्याचेशी प्रेमळ संभाषण, चर्चा अगर शंकानिरसन करणे, हे करावयाचे व सध्याकाळी सध्येसाठी गंगेवर गेल्यावर तिच्या दक्षिणतीरी सुंदरनारायणाच्या समोरच एक पडकीशी माडी असे, तेथे ध्यानास बसावयाचे, रात्रभर तेथे राहून पहाटेस पुन्हा गंगेचे स्नान वगैरे करून फडके याच्या घरी जावयाचे. कधी कधी रात्री ध्यानासाठी गावाबाहेर लांब वनातही ते जात असत. एके दिवशी ते रात्री वनात ध्यानासाठी गेले असता वाटेतच त्यास श्रीदत्तात्रेयाची स्वारी दिसली. त्यास पाहताच भटजी महाराजानी त्यास साष्टांग नमस्कार केला. भटजीस पाहताच श्रीदत्तानी हा भृगु अवतार रघुनाथ आहे हे ओळखले व आपल्या निकट बसविले. दोघाचे प्रेमळ संभाषण सुरू झाले. बोलता बोलता 'रात्रिरेव व्यरंसीत्' या उक्तीप्रमाणे रात्र केव्हाच निघून गेली. मग श्रीदत्तानी भटजीस विचारले की, तुम्ही ध्यानास रात्री कुठे बसता? भटजी महाराजानी लगेच श्रीदत्ताच्या हातात हात घालून त्यास गोदावरीच्या प्रवाहाच्या अगदी निकट असलेली ती माडी दाखविली; 'येथे आपण येत जावे,' अशी श्रीदत्तास महाराजानी विनंती केली. पुढे भटजी महाराज व श्रीदत्त हे दररोज रात्री त्या माडीत येऊ लागले व त्या दोघाचे परस्पर अध्यात्मपर संभाषण होऊ लागले व दोघेही ब्रह्मरसात निमग्न होऊ लागले.

**कचेश्वर मंदिरातील चमत्कार :–** नाशिक क्षेत्राच्या पूर्व बाजूस सुमारे सातआठ मैल लांब तपोवन आहे. त्या तपोवनात पूर्वी त्या वेळी श्रीकचेश्वराचे मंदिर होते. ते मंदिर फार रम्य व गोदेच्या काठीच असे होते. त्या मंदिरात देवदर्शनासाठी भटजी महाराज गेले होते. देवदर्शन घेतल्यावर थोडा वेळ ते ध्यानस्थ बसले. ध्यान झाल्यावर भटजी महाराज त्या देवास मंदिराभोवती प्रदक्षिणा वऱ्याच घालू लागले. मध्यान्हसमय झाला. त्याचे पाय उन्हाने पोळू लागले व वरून खूप ऊन लागू लागले. असे नित्य होऊ लागले. महाराजास ऊन लागे, पाय पोळत तरी ते प्रदक्षिणा घालण्याचे सोडीनात. तेव्हा श्रीकचेश्वर देवास करुणा उत्पन्न झाली. श्रीकचेश्वरमूर्ती फडके याच्या स्वप्नात गेली व म्हणाली, 'ऊठ! निजलास काय? मला ऊन लागत आहे व रघुनाथ कष्टी होत आहे म्हणून मंदिराभोवती छाया करून दे.' हे स्वप्न पडताच फडके जागे झाले व कचेश्वरी जाऊन पाहतात तो भटजीमहाराज उन्हात प्रदक्षिणा घालीत आहेत व त्याचे पाय पोळताहेत. हे पाहून तावडतोब त्यानी प्रदक्षिणेच्या वाटेवर छाया करून दिली.

सदर मंदिरात अनुष्ठानासाठी अनेक ब्राह्मण येत असत. त्या ब्राह्मणांच्या स्वप्नात कचेश्वर प्रभू गेले व म्हणाले की, 'रघुनाथ सर्व तपस्व्यात श्रेष्ठ आहे; त्याला माझे ठिकाणी माना व त्याच्या आज्ञेत राहा. तुमचे त्यायोगे कल्याण होईल.' ब्राह्मणाना असा दृष्टान्त होताच ते सर्व भटजीमहाराजाच्या पाया पडले व महाराजांची सेवा करू लागले. नंतर महाराजानी सांगितले की, 'जा, तुमचे मनोरथ पूर्ण होतील.' या आशीर्वादाप्रमाणे प्रत्येकाचे मनोरथ पूर्ण झाले.

**भटजीविषयी श्रीनिरंजनांचा अनुभव :–** निरंजनस्वामी या नावाचे भटजींचे शिष्य होते. ग्रंथलेखनाची आज्ञा जेव्हा निरंजनांना झाली त्या वेळी भटजी महाराजांचा व श्रीदत्ताचा संवाद रात्री होत असे. तो पाहण्याचे व ऐकण्याचे भाग्य त्यांनाच एकट्याला लाभले. भटजीमहाराज व

श्रीदत्त वेगळे नाहीत, ते एकरूप आहेत, हा अनुभव त्यास आला. महाराज स्वतः अत्यंत विरक्त होते. एकदा एक तरुण स्त्री महाराजांची परीक्षा पाहण्याकरिता एकांत पाहून महाराजांजवळ गेली व कामचेष्टा करू लागली. परंतु महाराजांचे मन निर्विकार असल्याने, तीच लाजली व तिने महाराजांचे पाय धरले व क्षमेची याचना केली.

आजही श्रीरघुनाथभटजींचे भक्त नाशकात व अन्यत्र पुष्कळ आहेत. ते त्यांची अनन्य भावाने नित्य सेवा करीत असतात. श्रीरघुनाथभटजींनी ज्या ठिकाणी जिवंत समाधी घेतली त्या ठिकाणी शिवलिंग स्थापिलेले असून त्यास 'अद्वैतेश्वर' असे म्हणतात. दर शिवरात्रीस महाराजांचे भक्तगण त्या मंदिरात येऊन अहोरात्र उपासना करतात. त्यांच्या भक्तांपैकी अनेकांस महाराजांचे प्रत्यक्ष दर्शन झालेले आहे; तसेच अनेकांस त्यांचे अनुभवही आलेले आहेत. रघुनाथभटजी महाराजांचे ओवीबद्ध चरित्र त्यांचेच शिष्य प्रख्यात दत्तभक्त श्रीनिरंजन रघुनाथ यांनी लिहिले आहे.

— रा. व. खाडिलकर

# २०. श्रीनिरंजन रघुनाथ

## (सन १७८२–१८५५)

'देवाच्या सख्यत्वासाठी । पडाव्या जिवलगाच्या तुटी । सर्व अर्पावें शेवटीं । प्राण तोही वेचावा॥'

या श्रीसमर्थ रामदासांच्या वचनाप्रमाणे श्रीदत्तप्रीत्यर्थ घरादाराचा प्रत्यक्ष त्याग करून, दत्तदर्शनार्थ आपला प्राणही अर्पण करण्यास जे तयार झाले, ते हे सत्पुरुष म्हणजेच 'नाशिकचे श्रीरघुनाथभटजी ऊर्फ अद्वैतेश्वर' यांचे शिष्य निरंजनस्वामी होत. यांचे चरित्र अत्यंत मननीय आहे. परमेश्वरदर्शन म्हणजे सहज प्राप्त होणारी गोष्ट नाही. एक वेळ आत्मानात्मविवेक प्राप्त होऊन ब्रह्मज्ञानही होईल; परंतु सगुणदर्शन दुर्लभ आहे; ते सुलभ नाही. ते नुसत्या ज्ञानाने, दानाने, श्रुतीच्या अभ्यासाने वा यज्ञाने प्राप्त होणार नाही.

ज्याच्या अंतरात पराकोटीची भक्ती असेल, तीव्रतम तळमळ असेल, त्यासच सगुणदर्शनाचा लाभ होतो. सगुणदर्शन होण्यासाठी रात्रंदिवस सावधानता, अखंड साक्षेप, एवढेच नव्हे तर स्वतःचा प्राणही अर्पण करण्याची तयारी पाहिजे. ज्याप्रमाणे खरा वीर हातावर शीर घेऊनच लढण्यास जातो, त्याप्रमाणे खरा भक्त देहाची पर्वा न करता प्राणार्पण करण्यास सिद्ध असतो. तो मरण्यास भीत नाही. तो खरा मृत्युंजय असतो.

घरादाराचा त्याग करून केवळ ईश्वरप्राप्त्यर्थ वनवास पत्करून जिवावर उदार होणारे समर्थ श्रीरामदासासारखे किंवा श्रीतुकाराममहाराजांसारखे भगवद्भक्त क्वचित् असतात. 'ऐसे भक्त बहुवस नाही.' अशा भगवद्भक्तांपैकीच प्रस्तुतचे सत्पुरुष श्रीनिरंजनस्वामी होत. त्यांनी श्रीदत्तदर्शन होण्यासाठी कशी खडतर साधना केली हे पहा —

निरंजनस्वामींचा जन्म कार्तिक शु॥ ८ स शके १७०४ साली दक्षिण हैद्राबादकडे ता. धारूर गाव कळंब येथे झाला. त्यांच्या वडिलांचे नाव श्रीधरपंत असून आडनाव श्रोत्री होते. निरंजनस्वामींचे पूर्वाश्रमीचे नाव 'अवधूत' होते. नाशिकचे सुप्रसिद्ध सिद्धपुरुष श्रीरघुनाथभटजी (ऊर्फ अद्वैतेश्वर) हे त्यांचे सद्गुरू होत व त्यांनीच त्यांचे नाव 'निरंजन' असे ठेविले.

नाशिक येथे 'व्हिक्टोरिया' पुलाजवळ गोदातटाच्या दक्षिणतीरावर श्रीरघुनाथभटजी यांची जिवंत समाधी आहे. याच समाधीवर 'अद्वैतेश्वर' नावाच्या सुंदर शिवलिंगाची स्थापना केलेली असून मंदिर छोटेसेच पण फार सुंदर बांधले आहे. श्रीअद्वैतेश्वर हे जागते दैवत असून येथील काही सद्भक्तांस त्यांचा साक्षात्कार झालेला आहे.

निरजनाची लहानपणापासून वृत्ती भावनामय अशी होती त्याचे शिक्षण बेताचेच झाले होते घरची गरीबी होती त्यानी काही दिवस खाजगी नोकरी केली व नतर त्याचे मन ससाराची नश्वरता पटून घरादाराविषयी विटले व साक्षात् श्रीदत्तप्रभूचे सगुणदर्शन केव्हा व कसे होईल हा एकच ध्यास त्याना लागला नतर त्यानी कळव गावाहून कोणास न कळत प्रयाण केल, ते देहू गावी आले तेथे आल्यावर त्याच्या डोळ्यापुढे श्रीतुकारामचरित्रच उभे राहिले श्रीतुकाराम-महाराजास सगुणदर्शन कसे झाले ? तसेच आपणासही झाले पाहिजे हा विचार त्याच्या मनात आला

श्रीदत्तदर्शनोत्सुकता अधिकच वाढली व एके दिवशी म्हणजे भाद्रपद व॥ ४ शके १७३३ रोजी इद्रायणीचे पाणी हातात घेऊन प्रतिज्ञा केली की, ‘आजपासून एक वर्ष सात दिवसात श्रीदत्ताचे सगुणदर्शन न झाल्यास मी प्राणत्याग करीन’ अशी घोर प्रतिज्ञा करून श्रीदत्तप्रभूचे नामस्मरण करीत करीत त्यानी देहू गाव सोडले पुढे दरकूच दरमजल करीत ते नाशकास आले

नाशिक यथे आल्यावर त्याची व रघुनाथ-भटजीची गाठ झाली ‘दर्शनें प्रशस्तीसी ठावो’ या श्रीज्ञानेश्वराच्या वचनाप्रमाणे, श्रीरघुनाथ-भटजीस पाहताच निरजनाच्या मनात प्रसन्नता उत्पन्न झाली त्यास अशी खात्री वाटली की, माझे आध्यात्मिक समाधान येथेच होईल निर-जनाचे तीव्र मुमुक्षुत्व व विरक्ती पाहून श्रीरघुनाथ भटजीस परम सतोष वाटला व त्यानी शके १७३३ कार्तिक व॥ ३० रात्री निरजनास निर्गुण-स्वरूपाचा साक्षात्कार करून दिला तेव्हापासून निरजनास कवित्वाची स्फूर्ती झाली व पाचसहा अभग त्यानी त्या वेळी करून सद्गुरुचरणी अर्पण केले

श्रीरघुनाथभटजीच्या कृपादृष्टीने व सगतीने आत्मस्वरूपज्ञानाविषयीचा यत्किंचित्ही सशय निरजनाच्या चित्तात उरला नव्हता परतु श्रीदत्ताच्या सगुणदर्शनाची जी तीव्र इच्छा ती मात्र पुरी झाली नव्हती, म्हणून त्यानी श्रीरघुनाथ भटजीस विचारले की, ‘महाराज ! मला श्रीदत्ताचे सगुणदर्शन कधी व कसे होईल ? मी तर अशी प्रतिज्ञा केली आहे की, अमुक मुदतीत दर्शन न झाल्यास प्राणत्याग करीन माझी प्रतिज्ञापूर्ती होणार ना ?’ तेव्हा महाराजानी निरजनास गिरनार पर्वतावर जाण्यास आज्ञा केली व तेथ दर्शन होईल असे सागितले तसेच श्रीदत्तात्रेयाच्या षड्भुज सुदर मूर्तीचे ध्यान रात्र-दिवस करण्यास सागितले

अतरी चिंतोनिया ध्यान। मुखी कीजे नामस्मरण।
विषयभोगावेगळें मन। व्रतस्थपणें ठेवावे ॥

गुरूची आज्ञा शिरसावद्य मानून व त्याचा उपदेश चित्तात ठेवून, निरजनस्वामी प्रथम त्र्यबकेश्वरी आले तेथे देवाचे दर्शन घेऊन काही दिवस तेथे राहून ते कोकणात उतरले रानावना तून काट्याकुट्यातून मार्ग काढीत श्रीदत्तावर पूर्ण श्रद्धा ठेवून सर्व प्रकारचे कष्ट सोशीत गुजराथेतील धर्मपुर नावाच्या गावी येऊन पोहोचले तेथून मग ते सुरतेस गेले, तेथून ते श्रीमनाथाच्या शिवलिंगाचे दर्शन घेऊन गिरनार-पर्वताजवळ येऊन पोहोचले

केलेली प्रतिज्ञा पूर्ण करण्यास बराच अवकाश आहे असे जाणून त्यानी त्या गिरनारपर्वतास प्रदक्षिणा घालण्यास सुरुवात केली प्रतिज्ञापूर्तीस तीन दिवसाचा अवधी ठेवून ते गिरनारपर्वत चढावयास लागले ‘दिगबरा ! ये रे दयाळा ! मला भेट दे रे दत्ता ॥’ हे भजन म्हणत पर्वत चढू लागले श्रीदत्तदर्शन अजून झाले नाही म्हणून त्यास फार वाईट वाटावे, काही वेळ स्तब्ध उभे राहून ‘श्रीदत्त ! श्रीदत्त !’ या नामाने मोठ्याने आक्रोश करून रडावे ! हे तीन दिवस म्हणजे तीन युगाप्रमाणे त्यास वाटले.

शके १७३४ च्या भाद्रपद व॥ ८ स निरंजनस्वामी श्रीदत्त देवाच्या पादुकाप्रत जाऊन पोहोचले. पादुकांस सप्रेम साष्टांग नमस्कार करून निरंजनाने प्रेमाश्रूंचे त्यास स्नान घातले व ते म्हणाले, 'दत्ता! प्रतिज्ञापूर्तीस आता फक्त तीनच रात्री राहिल्या! महाराज, ठरलेल्या मुदतीत जर आपले दर्शन झाले नाही तर हा दास या पादुकांच्या पुढे मस्तक आपटून प्राण देणार! तरी दयाळा! कृपा करून दर्शन द्यावे!' अशी श्रीदत्तप्रभूंची करुणा भाकून त्या पादुकासमोर धरणे धरून बसले.

भगवद्दर्शनार्थ धरणे धरून बसणे ही सामान्य गोष्ट नाही. ज्ञानेश्वर महाराज लिहितात की, 'धरणें धरूनि बैसे, ऐसा के जोडे?' श्रीतुकाराममहाराजांनी धरणे धरले म्हणून त्यास पांडुरंगाचे दर्शन झाले व बुडविलेल्या सर्व वह्या त्यास परत मिळाल्या. धरणे धरून बसण्यास मनाची फार तयारी लागते. पराकाष्ठेची उत्कंठा व तीव्र तळमळ असेल तरच या गोष्टी घडून येतात. दर्शनाची तीव्रतम तळमळ हीच खरी महत्त्वाची साधना आहे.

निरंजनस्वामींनी याप्रमाणे धरणे घेतल्यावर पहिल्या रात्री सोसाट्याचा वारा सुटून मुसळधार पाऊस पडू लागला. त्यामुळे स्वामींची दातखीळ बसली व त्यास मूर्च्छा आली. मूर्च्छेत एक सुवासिनी आली व तिने त्यांना एक मूठभर खिचडी दिली. जागे होऊन पाहतात तो तेथे कोणी नाही. पुन्हा त्यांनी दत्तनामस्मरण सुरू केले. दुसऱ्या रात्री त्यांना एक स्वप्न पडले. स्वप्नात एक पिवळे वस्त्र व एक रुमाल मिळाला. जागे होऊन पाहतात तो स्वप्नात मिळालेली वस्त्रे आपणापाशी खरोखरीच असल्याचे दिसले. दोन दिवस झाले, अजून दर्शन नाही; म्हणून स्वामी फारच खिन्न झाले. पुन्हा सप्रेम दत्तभजन सुरू केले. नंतर तिसऱ्या रात्री स्वप्नात एक ब्राह्मण आला. त्याने स्वामीस एक खडावाचा जोड दिला व तेथून जा असे सांगितले. जागे होऊन पाहतात तो खडावाचा जोड दिसला. पण दर्शन नाही. तिन्ही रात्री निघून गेल्या; प्रतिज्ञेची मुदत संपली असे पाहताच निरंजन स्वामी हताश झाले.

जवळच एक मोठा दगड पडला होता, तो जवळ घेतला व त्या दगडावर, श्रीदत्तपादुकांसमोर नारळासारखे ताडकन् आपले कपाळ आपटले. पहिला प्रयत्न चांगला साधला नाही. म्हणून दुसऱ्यांदा पुन्हा जोराने मस्तक आपटले. त्याबरोबर मस्तक छिन्नविच्छिन्न झाले व स्वामी तेथेच बेशुद्ध होऊन पडले. ते बेशुद्ध अवस्थेत असतानाच, आपल्या तोंडात कोणीतरी कमंडलूने पाणी घालीत आहे, असा त्यांस भास झाला आणि ते सावध होऊन पाहतात तो आपणापुढे साक्षात् श्रीदत्तमहाराज सगुणरूपाने उभे आहेत असे दिसून आले. श्रीदत्तगुरूंनी स्वामींच्या मस्तकावरून आपल्या अमृतकराचा स्पर्श करताच फुटलेले मस्तक जडून गेले; निरंजनाकडे श्रीदत्तांनी कृपादृष्टीने अवलोकन केले व सांगितले की, 'नाशिकचे रघुनाथभटजी व मी दोन नाही; त्यांनी जो बोध केला त्याचे मनन कर.' याप्रमाणे बोलून श्रीदत्त अंतर्धान पावले.

झाले! श्रीनिरंजनस्वामींच्या खडतर साधनेचे सार्थक झाले! त्यांच्या चित्तास अवर्णनीय असे परम समाधान झाले. प्रतिज्ञेप्रमाणे श्रीदत्तगुरूंचा सगुणसाक्षात्कार झाला. 'याजसाठी केला होता अट्टहास, शेवटचा दीस गोड व्हावा।' या श्रीतुकाराम महाराजांच्या वचनाप्रमाणे, निरंजनस्वामींच्या अट्टहासास सुंदर फल प्राप्त झाले. निरंजनस्वामीस हा जो सगुणसाक्षात्कार झाला, त्याची प्रत्यक्ष खूण म्हणून स्वामींच्या कपाळावर भिवयांपासून केसापर्यंत एक व्रण अखेरपर्यंत राहिला होता.

निरंजनस्वामींनी स्वतःच 'आत्म-प्रचीति' व 'साक्षात्कार' अशी दोन प्रकरणे ओवीबद्ध, रसाळ

व उद्बोधक अशी लिहिली आहेत त्यावरूनच वरील चरित्रकथा लिहिली आहे त्याची काही पदे येथे दिली आहेत

— रा ब खाडिलकर

(१) दिगंबरा स्वामि अगा दयाघना।
येऊ दे करुणा अनाथाची ॥ १ ॥
मायामोहजाल टाकावे छेदून।
करावे धावणे दीनबंधू ॥ २ ॥
अनाथासि आम्हा तुजवीण आता।
कोण आहे त्राता सर्वांपरी ॥ ३ ॥
निरंजन म्हणे देई आता भेटी।
नको करू कष्टी देवराया ॥ ४ ॥

(२) येई येई दत्तानाथा।
माझ्या कीर्तनाच्या ठाया ॥ १ ॥
रंगदेवता आमुची।
तूची सर्वांपरी साची ॥ २ ॥
गावे तूझे कीर्तिगुण।
असे इच्छी माझें मन ॥ ३ ॥
निरंजन म्हणे देवा।
येई आता माझी सेवा ॥ ४ ॥

(३) दत्तात्रय चतुराक्षरि मंत्र वाचे उच्चारा।
निशिदिनि हृदयी ध्याता चुकवी जन्म-
मरणफेरा ॥ ध्रु ॥

दशदिशाप्रति अगमन ज्याचे अेकट निर्द्वंद्व।
दश-अवतारा वरुते विष्णुस्वरूपाचा कंद।
दत्तचित ज्या हृदयी ध्याता करि ब्रह्मानंद॥१॥
तापसियाचा तापशमन जो सर्वांचा त्राता।
तरितसे भवसागरि जडमूढ नाम वदनि गाता।
तातडिनें अुडि घालित ज्यापरि बाळकासि
माता ॥ २ ॥
त्रै देवाचे स्वरूप ते हे जाणें एकत्र।
त्रैलोक्याचा चालक म्हणवी अत्रीचा पुत्र।
त्रैअवस्था स्वरूप प्रगटवी जेवि का मित्र॥३॥
अेकचि स्वरूप सर्वान्तरि तो आहे अद्वय।
यशकीर्ति तुम्ही गा रे त्याची होअुनि तन्मय।
यमाचे भय नाही निरंजन जाला निर्भय ॥४॥

## २१. कृष्णेन्द्रगुरु
### (सन १८०६-१८५५)

तेलंगण व कर्नाटक यांच्या सीमेवर अनंतपूर नावाच्या एका गावी रामशास्त्री व रमाबाई याना एकदा श्रीदत्तात्रेयांचा साक्षात्कार झाला 'आम्हीच तुमच्या पोटी अवतार घेत आहोत' अशी प्रेरणा या दांपत्यास झाली याना लहानपणापासून ईश्वरभक्तीचा नाद असे अनेक चमत्कारिक लीलाही यानी करून दाखविल्या एकदा एका वांझ गाईच्या कासेला कृष्णसर्पाचे मुख लावून यानी त्याला स्तनपान घडविले वैराग्यसुंदरीशी आपण विवाह केला असल्याचे यानी आपल्या आईवडिलाना सांगितले त्यानी तीर्थयात्रा आरंभिली काशी येथे स्वयंप्रकाशयतींच्याकडून यानी अनुग्रह घेतला 'तू श्रीकृष्णरूपी अनंतप्रसादाने जन्मला असून त्रैमूर्ती श्रीदत्तात्रेयाचा प्रत्यक्ष अवतार आहेस. तुम्ही श्रीकृष्णेन्द्रगुरू म्हणून प्रसिद्धी होईल. धारवाड जिल्ह्यातील सावणूर भागात कार्य करून अमर व्हा' असा त्याना आशीर्वाद मिळाला काशीतही यांच्या भक्तानी यांच्या नावे एक मठ बांधून त्यात श्रीकृष्णेश्वरलिंगाची स्थापना केली बंगाली व बिहारी या ठिकाणी प्रतिवर्षी उत्सव करतात प्रयाग, हरिद्वार, गंगोत्री, बदरी करून ते हुबळीस आले येथे एका जुन्या पडीक किल्ल्यात एक पुरातन श्रीदत्तमंदिर असून तेथे दत्तपादुकांची स्थापना वे मू नरसिंहभट अग्निहोत्री यानी केलेली होती गर्भमंदिरावर चक्राकार शिखर आहे मागील बाजूस औदुंबर व अश्वत्थ वृक्ष आहे कृष्णेन्द्रगुरूंचे हे कायमचे निवासस्थान झाले.

रोज ते तीन ते पाच घरी भिक्षा मागत यानी अनेक चमत्कार केले मोठा परिवार जमा केला ओसाड तलावात योगदंड आपटून पाणी आणणे, सर्पविषापासून गुराचे प्राण वाचविणे,

शिरसगी देसायाचा उदररोग बरा करणे, कोणास पुत्र देणे, कोणासाठी सुवर्ण देणे, असे अनेक चमत्कार यानी केले गोकर्णास जाताना शिरसी येथे देवीच्या दर्शनास हे आले तेव्हा देवालयाच्या दाराची कुलपे आपोआप निखळून पडली! देवीने याना दर्शन दिले रेणुका डोगराजवळ एका गुराखिणीचा नवरा झाडावरून पडून मरण पावला असता यानी त्याला जीवदान दिले सर्व लोकाना मायची पाखर देऊन, सर्वांना ज्ञानोपदेश देऊन यानी शके १७७७ मध्ये कार्तिक शु १३ रोजी आपल्या वयाच्या एकोणपन्नासाव्या वर्षी अवतार संपविला श्रीदत्तमदिरातील सच्चिदानद स्वामींच्या समाधीच्या डाव्या बाजूस याची समाधी असून तीवर शिवलिंगाची स्थापना करण्यात आली आहे त्याच्यापुढेच त्याचे शिष्य श्रीधरस्वामी ( नरसिंहभट अग्निहोत्री ) याची समाधी आहे यांच्या पुण्यतिथीचा उत्सव मोठ्या प्रमाणावर साजरा होत असतो समाधीवर श्रीदत्तप्रभूच्या रूपातील मोठी प्रेक्षणीय अशी दहीभाताची पूजा बाधतात

## २२. अनंतसुत कावडीबोवा

**( सन १७७६–१८६३ )**

श्रीअनतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबोवा हे मूळ जिल्हा नगर तालुके पारनेरमधील हागा नदीतीरावरील पिसा पिंपळगावचे राहणारे होते त्याचा जन्म शके १७१९ चैत्र शुक्ल १५ बुधवार, दिनाक ११-४-१७९७ चा आहे ते ऋग्वेदी आश्वलायन शाखीय देशस्थ ब्राह्मण होत त्याचे गोत्र भारद्वाज होय ते पिसा पिंपळगावचे वतनदार कुळकर्णी होते याशिवाय इतर तीन गावचे कुळकर्णीपणही त्याचेकडे होते [त्याचे संपूर्ण नाव विठ्ठल अनत पिंपळगावकर] असे होत ईश्वरभजनात व देवसेवेत राहून ते कुळकर्णीपणाचे कामही पहात होते ते पुडलिक व श्रावणासारखे मातृपितृभक्त होते मातापित्याचा वृद्धापकाळ झाला, त्या वेळी पित्याने स्वत स कावडीत बसवून काशीयात्रस नेण्यास आज्ञा केली आज्ञा शिरसावद्य मानून विठ्ठलबोवानी आपल वडील अनतराम व मातोश्री सौ राधाबाई याना कावडीत बसवून बरोबर एक रामा नावाचा गडी व सामानासाठी एक घोडा यासह ते काशीयात्रेस निघाले मातापित्यास कावडीत बसवून यात्रा करविल्या म्हणून त्याचे नाव कावडीबोवा असे पडले

यात्रा करीत असता त्याच्या मातोश्री सौ राधाबाई याना विष्णुपदी दवाज्ञा झाली, ते पाहून आपण आता ससारमुक्त झाल्याने अनतरावानी प्रयागात यऊन ब्रह्मावर्तात आल्यावर सन्यास ग्रहण केला व समाधी ब्रह्मावर्तात ज्येष्ठ वद्य ५ स घेऊन ते नारायणस्वरूपी लीन झाले त्याना तेथे जलसमाधी देण्यात आली तेथ त्याचे और्ध्वदेहिक कार्य आटोपल्यावर त्या रिकाम्या कावडीत आता श्रीविठ्ठलरखुमाईच्या मूर्ती ठेवून कावडीसह विठ्ठलबोवानी पुढील यात्रा सुरू केली

याप्रमाणे यात्रा सुरू असताना गालव क्षेत्री मुक्काम होता व त्या दिवशी श्रीदत्तजयतीचीही पर्वणी होती गावात दत्तजन्मासाठी कोणी कीर्तनकार मिळेना, म्हणून गावकऱ्यानी बुवास कीर्तन करण्यास विनती केली पण आपणास कसे जमेल म्हणून ते मडळीशी बोलत असता श्रीदत्तात्रय विप्ररूपाने येवून त्याना कीर्तन करण्यास व ग्रथ लिहिण्यास त्यानी आज्ञा केली व प्रसाद खाण्यास दिला व मी तुजबरोबर आहे, काळजी करू नये असे सागितले कीर्तन आटोपले व पुढील यात्रा सुरू झाली कीर्तन सर्वास फारच आवडले होते ग्रथरचना कशी होईल या विवचनेत त्यानी लेखनास सुरुवात केली नव्हती हे पाहून पुन्हा

श्रीदत्तात्रेयांनी ब्राह्मणवेषाने येऊन ग्रंथ लिहिण्यास सांगितले व वरप्रदान दिले व मीच सर्वोपरी सहाय्य होईन असा आशीर्वादही दिला. याप्रमाणे वरप्राप्तीनंतर प्रवास चालू असताच त्यांचा मुक्काम उज्जैन क्षेत्री झाला. तेथे त्यांनी 'श्रीदत्तप्रबोध' या ग्रथाचे चाळीस अध्याय लिहिले व पुढे द्वारावती (द्वारका) यात्रेस जाण्याच्या विचाराने यात्रा करून सन १८५६ च्या सुमारास बडोद्यास आले. प्रथम त्यांचा मुक्काम वाडीतील श्रीमत राजे पांढरे यांच्या श्रीराममंदिरात झाला. वडोद्यातील त्या वेळच्या महान् संत-महतांच्या भेटी झाल्याने त्याना अतिशय आनद वाटला. वडोद्यास या महान् मातृपितृभक्तशिरोमणी श्रीकावडीबुवांचे तत्कालीक अनेक शिष्यसमुदायही,त्याचा उपदेश घेऊन झाला होता. त्यापैकी एका शिष्याने त्यांना वऱ्हाणपुरा चौखडी रस्त्यावर एक श्रीराममंदीर बाधून देऊन त्यांना कायम राहण्याचा आग्रह करून ठेवून घेतले. याच श्रीरामाच्या मंदिरात कावडीत वसून आणलेल्या श्रीविठ्ठलराई-रखुमाईच्या मूर्तींची त्यांनी स्थापना केली व संवत १९१५ मध्ये तेथे मुक्कामास आले. याच मंदिरात वास्तव्य केल्यानंतर श्रीदत्तप्रबोध ग्रंथाचे उरलेले २१ अध्याय त्यांनी लिहिले. असा हा ६१ अध्यायांचा ग्रंथ त्यांनी संवत १९१६ प्रजापती नाम संवत्सरी शके १७८२ चैत्र शुद्ध प्रतिपदा भृगुवारी इ. सन १८६० मध्ये लिहून पूर्ण केला.

याप्रमाणे वडोदे येथे श्रीसेवेत व चिंतनात काळ घालवीत असता, श्रीविठ्ठल–अनंतसुत ऊर्फ कावडीबोवा हे संवत १९१९ आषाढ शुक्ल अष्टमीस वैकुंठवासी झाले. तरी ते ग्रंथरूपाने अमर असून श्रीदत्तभक्तांस त्यांच्या साक्षित्वाचे अनुभवही येतात.

श्रीदत्तप्रबोध ग्रंथाचे प्रथम प्रकाशन श्रीदामोदर सावळाराम यंदे यांनी सन १९०० मध्ये केले. श्रीगुरुचरित्र व श्रीगुरुलीलामृत-प्रमाणेच हा महान् प्रासादिक ग्रंथ श्रीदत्तप्रसादे लिहिलेला आहे. श्रीगुरुचरित्रात श्रीगुरूंचे वर्णन आहे, तसेच श्रीगुरुलीलामृतात श्रीअक्कलकोटस्वामींचे वर्णन आहे. श्रीदत्तप्रबोध ग्रंथात श्रीदत्तात्रेयांनी आपले मातोश्री सती अनसूयेस केलेला अध्यात्मपर असा उपदेश आहे. हा प्रासादिक ग्रंथ असून श्रीदत्तात्रेयांनीच वदविलेली अशी ही श्रीदत्तस्वरूप वाङ्मयमूर्तीच आहे. म्हणून तो सांप्रदायिक दत्तभक्तांना अत्यंत पूजनीय व सग्राह्य असा आहे. भाषा अत्यंत प्रेमळ व हृदय-स्पर्शी अशी आहे. हा वरद ग्रंथ असल्याने वाचन, पाठ व सप्ताहरूपे अनुष्ठान करण्याने मनःकामना पूर्ण होतात, असा अनेकांचा अनुभव आहे.

वडोद्यास श्रीकावडीबुवांचे श्रीराम व श्रीविठ्ठल-राही-रखुमाईचे असे मंदिर आहे. तेथे दरसाल श्रीदत्तप्रबोधकार अनंतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबोवा महाराज यांच्या पुण्यतिथीचा उत्सव आषाढ शु. १ ते ८ पावेतो होतो. पुण्यतिथी आषाढ शु. ८ स असते. या उत्सवात अखंड नामसप्ताह, श्रीदत्तप्रबोधपारायण, निरनिराळी संतमंडळीची कीर्तने, प्रवचने व भजने, श्रीगुरुचरित्र, सप्तशतीपारायणे, वेदपारायणे आदी विविध कार्यक्रम होत असतात. उत्सवसमाप्तीस अन्नसंतर्पण, महानुभाव अनेक रूपांची पाद्यपूजा, 'संतपूजा' होऊन संतांचे स्तवन व महाप्रसाद होत असतो. पौर्णिमेस गोपालकाला होऊन हा उत्सव पूर्ण होतो. तसेच चैत्रात श्रीरामजन्मोत्सवही होतो.

श्रीअनंतसुत विठ्ठलबोवांनी श्रीदत्तप्रबोध ग्रंथाशिवाय स्फुट अभंग, करुणा-शतक अभंग, सांप्रदायिक सद्गुरुनमस्कारश्लोक व अभंग वगैरे वाङ्मय लिहिलेले असून बरेचसे अप्रसिद्ध आहे. ते जनार्दन–एकनाथ–निंबराज संप्रदायी असून त्यांचा आनंद सांप्रदाय होय.

श्रीअनंतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबोवांनी वडोद्याच्या मंदिराची सेवा, पूजन, भजन व संप्रदाय

चालविण्यासाठी आपले आते बंधू श्रीगोपाळबुवा यांना सहकुटुंब आपले गावाहून बोलावून आणून त्यांस प्रसाद व वरदहस्त ठेवून सर्व व्यवस्था सोपविली होती. श्रीगोपाळबुवाही अत्यंत लीन, प्रेमळ व निस्सीम भगवद्भक्त असे होते. भजन व देवसेवेत राहून त्यांनी चारी धाम यात्रा केल्या होत्या व शेवटी चतुर्थाश्रम घेऊन फाल्गुन शुद्ध ३ दिनांक १५-३-१९१८ वय ७५ ला समाधिस्थ झाले. त्यांची समाधी कावडीबोवांच्या समाधि-मंदिरात आहे. हे गोपाळकाला उत्तम करीत असत.

त्यांच्या नंतर त्यांचे चिरंजीव श्रीशंकरबोवा हेही भजन व देवसेवा करून उत्सव—महोत्सव करीत असत. ते सुप्रसिद्ध कीर्तनकारही होते. श्रीमंत गायकवाड सरकारतर्फे बडोद्यास दर श्रावण मासात होणाऱ्या कीर्तनपरीक्षेचे ते परीक्षक म्हणूनही होते. कै. श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांचे धाकटे बंधू श्रीमंत संपतराव महाराज गायकवाड यांचे ते गुरू होते. श्रीमंत संपतरावांना त्यांनी भजन शिकविले होते.

ग्वाल्हेरचे सरकार श्रीमंत माधवराव महाराज शिंदे यांच्या येथे प्रतिवर्षी श्रीगणेशउत्सवात नाम-सप्ताह होत असे. त्या वेळी श्रीमंत संपतराव महाराजांचा एक भजनाचा पहारा असे. त्या मेळ्याचे अध्यक्ष श्रीशंकरबोवाच होते.

पुत्रवत् पालन केलेले त्यांचे भाचे श्री. सुंदरनाथ व जगन्नाथ राजापूरकर या उभय बंधूस मंदिराचे पुढील कार्य एकविचारे चाल-विण्यास सोपवून व वरदहस्त ठेवून सन १९५० शके १८७२ संवत २००६ कार्तिक शुद्ध पंचमीस सोमवारी उपवास सोडून श्रीशंकरबोवा हृदय-विकाराने वैकुंठवासी झाले.

त्यांचे आज्ञेप्रमाणे हे उभय बंधू हल्ली एक-विचारे श्रींची पूजासेवा, आषाढी उत्सव, राम-नवमी उत्सव आदी नित्य-नैमित्तिक कार्यक्रम पार पाडीत असतात.



## २३. माणिकप्रभू

### (सन १८१७–१८६५)

मोगलाईत निजाम हैदराबाद राज्यात ( आजच्या म्हैसूर राज्यात ) कल्याण गावी मनोहर नाईक नावाचे परम भगवद्भक्त रहात होते. त्यांच्या धर्मपत्नीचे नाव बायजाबाई होते. हे दांपत्य दत्तोपासक असून अहोरात्र दत्तसेवा करण्यात निमग्न असे. श्रीदत्त भगवानाच्या आशीर्वादाने त्यांना तीन पुत्र झाले. पहिला मुलगा हणमंत (दादासाहेब), दुसरा माणिकप्रभू व तिसरा नरसिंह (तात्यासाहेब).

मनोहर नाईकांना दृष्टान्त झाल्याप्रमाणे श्रीदत्तप्रभूंनी माणिकप्रभूंच्या रूपाने या धर्मपरायण दांपत्याच्या पोटी शके १७३९ (सन १८१७)मध्ये अवतार घेतला. बारशाच्या दिवशी मुलाचे नाव 'माणिकप्रभू' असे ठेविण्यात आले. बाळप्रभूंचे अनुपम तेज पाहून कल्याण गावातील लोक आकृष्ट झाले. गावातील व आसपासच्या खेड्यातील लोक या दत्तावतारी प्रभूंच्या दर्शनास येऊ लागले.

कल्याण गावातील अधिकारी नवाबसाहेबांची मनोहरपंतांच्या कुटुंबावर पूर्ण कृपादृष्टी होती. त्यामुळे माणिकप्रभूंची सर्व व्यवस्था लहानपणा-पासूनच राजयोग्याप्रमाणे होती. त्यांच्या अंगावर हजारो रुपयांचे हिरे, मोती व सोन्याचे दागिने आणि भरजरी उंची वस्त्रे होती. या वस्तू सांभाळण्यासाठी त्यांचे सभोवती नेहमी पाचसहा अरब, रोहिले शिपाई नवाबाने ठेविले होते. माणिकप्रभूंस पाचवे वर्ष लागल्यानंतर त्यांची वृत्ती फारच खेळकर होत गेली. गावातील मुलांबरोबर ते नाना प्रकारचे खेळ खेळू लागले.

कल्याण गावात माणिकप्रभू या नावाचा श्रीदत्तावतार झाला आहे, अशी बातमी सर्वत्र पसरल्यामुळे दर गुरुवारी आसपासचे लोक दर्शनास जमू लागले.

पुढे सातव्या वर्षी मौंजिबंधनाचा समारंभ मोठ्या थाटात झाला. गायत्री मंत्राचा उपदेश होताच सर्व ब्रह्मकर्म आपोआप स्वमुखाने हे म्हणू लागले. हा चमत्कार पाहून जमलेले सर्व शास्त्री, पंडित, वैदिक, याज्ञिक वगैरे थक्कच होऊन गेले. हे कोणी महापुरुष असावेत असे सर्वांना वाटू लागले.

प्रभू कधी शाळेत गेले नाहीत; परंतु त्यास बाळपणापासूनच तेलगी, कानडी, फारशी, उर्दू, संस्कृत आणि मराठी इतक्या भाषा लिहिता-वाचता व बोलता येऊ लागल्या.शिकल्याशिवायच त्यांना स्वयंस्फूर्तीने संपूर्ण ब्रह्मकर्म व वेद-शास्त्रातील सर्व विषय अगदी मुखोद्गत येत होते चार वेद व सहा शास्त्रात पारंगत असलेल्या पंडितांचीही त्यांच्यासमोर बोलण्याची प्राज्ञा नव्हती

प्रभूस आठवे वर्ष लागल्यावर त्यांची वृत्ती फारच चपळ व चंचल होत गेली. ते गावातील मुले जमवून गावात व अरण्यात जाऊन नेहमी खेळत असत. एकदा घराबाहेर पडले की, दोन-दोन दिवस घरी येत नसत. घरची मंडळी त्यांचा पुष्कळ शोध करीत, परंतु प्रभू सापडतच नसत अशा परिस्थितीत प्रभूंच्या अंगावर दाग-दागिने राहिले नाहीत. त्यांनी काही दागिने लोकांना वाटून टाकले. मग नवाबाचा अरब, रोहिले शिपायांचा पहारा जागचे जागी राहिला.

प्रभूंची दया आभाळेपागळे लोकांवर फार असे. तसेच हिंदू व मुसलमान यांच्यावर त्यांची कृपादृष्टी सारखी असे. त्यामुळे मुसलमान लोकही त्यांना भजू लागले प्रभूंचा हा ,लौकिक निजाम सरकारचे कानापर्यंत जाऊन पोचला होता.

प्रभू आता घराबाहेर पडण्याचा विचार करू लागले. प्रभूंचे थोरले बंधू दादासाहेब आता सोळा वर्षांचे झाले होते. ते एकांतात राहून अहोरात्र ईश्वरचिंतनात मग्न असत. धाकटे बंधू तात्यासाहेब हे चार वर्षांचे झाले होते. अशा वेळी प्रभू एके दिवशी कोणासही न विचारता घरा-बाहेर पडले व हुमणाबादेपासून वीस कोस असलेल्या मंठाळ गावास जाऊन पोचले. बाहेर-गावचे हजारो लोक प्रभूंच्या दर्शनास येत; परंतु प्रभू तेथे नाहीत असे पाहून ते दादासाहे-बांच्या दर्शनावर समाधान मानून नवस वगैरे अर्पण करीत.

प्रभू मंठाळ गावात आहेत असे कळताच प्रभूंचे वडील व मातोश्री तात्यासाहेबास बरोबर घेऊन मंठाळ गावी जाऊन प्रभूंना भेटले. तेव्हा प्रभू त्यांना म्हणाले, 'श्री दत्तात्रेयाच्या साक्षा-त्काराप्रमाणे आम्ही तुमच्या पोटी जन्म घेतला, तुमचे मनोरथ पूर्ण केले. व्रतबंध होईपावेतो तुमचेजवळ राहिलो. आता आम्हांस सर्वत्र संचार करून भक्तजनांचा उद्धार करून अवता-रिक कृत्ये केली पाहिजेत. म्हणून यापुढे तुम्ही आमच्याविषयी दुःख व क्लेश करू नयेत. घरी जाऊन दत्तसेवा करून कालक्रमणा करावी. तुमचा आग्रहच आहे तर आम्ही लवकरच येऊन तुम्हांस भेटतो.' असे म्हणून त्यांना निरोप दिला.नंतर प्रभू एक वर्षपर्यंत मंठाळच्या अरण्यात अंबील कुंडाजवळील एका गुहेत गुप्त राहिले कधीमधी प्रभू मंठाळच्या लोकास दर्शन देत ही गुहा अद्याप तेथे असून ती 'माणिकप्रभूंची गुहा' या नावाने प्रसिद्ध आहे

एक वर्षानंतर प्रभू एकाएकी कल्याणास घरी दत्त म्हणून येऊन उभे राहिले. लोकांना ही वातमी कळताच हजारो लोक दर्शनास येऊ लागले. हजारो रुपये प्रभूपुढे जमा होऊ लागले प्रभू ते सर्व रुपये रोजच्या रोज गोरगरिबास खैरात करू लागले. रोज कथा, कीर्तने, पुराणे, भजने व गाण्यांचा कार्यक्रम प्रभूपुढे होत असे. असा कार्यक्रम चारपाच वर्षपर्यंत चालू होता.

तात्यासाहेबांची मुंज झाल्यावर काही महि-न्यांनी प्रभूंचे वडील मनोहरपंत यांची समाधी

झाली त्या वेळी त्यांच्या मातोश्री बयाबाई यांना अत्यंत दु:ख झाले. प्रभूंनी आपल्या ज्ञानसामर्थ्याने मातोश्रींचे नाना प्रकारे समाधान करून वडील बंधू दादासाहेब यांजकडून वडिलांचे उत्तरकार्य यथासांग करविले आणि हजारो रुपये दानधर्म केला.

नंतर प्रभू कल्याणहून निघाले ते सहा कोसांवर असलेल्या पांचाळ गावी पांचाळेश्वर मारुतीच्या देवळात येऊन राहिले. तेथे समाराधना वगैरे करून एक अष्टक करून त्यांनी मारुतीची प्रार्थना केली.

नंतर प्रभू मैलार गावी आपले कुलदैवत श्रीखंडोबाच्या दर्शनासाठी चंपाषष्ठीस जमणाऱ्या यात्रेस गेले. श्रीखंडोबाची महापूजा बांधून हजारो रुपयांचे वस्त्रालंकार देवास अर्पण केले, व गोरगरीबांस हजारो रुपये दानधर्म केला. त्यानंतर श्रीदत्तजयंतीचा उत्सव तेथे मोठ्या थाटात साजरा केला. हैदराबादचे राजे वसीधर यांनी श्रीदत्तजयंतीचा सर्व खर्च केला.

मैलारहून प्रभू पुन्हा आपल्या घरी कल्याणास आले. तेथे आल्यावर प्रभूंनी मुलगी पाहून आपले धाकटे बंधू तात्यासाहेब यांचे लग्न ठरविले. कल्याणच्या नबाबसाहेबांनी दहा हजार रुपये खर्च करून लग्नसमारंभ मोठ्या थाटाने केला. ब्राह्मणभोजने, दानधर्म व सर्व जातींस भोजने वगैरे उत्तम प्रकारे पार पडली. यामुळे प्रभूंची कीर्ती सर्वत्र पसरून शेकडो कोसांवरून नित्य नवी यात्रा दर्शनास येऊ लागली. पुष्कळ पर्यटन करून व अनेक अतर्क्य चमत्कार दाखवून नंतर मुधोळ गावाच्या पहाडातील एका गुहेत प्रभू समाधी लावून बसले. पुढे ते मुधोळ संस्थानात फिरत असता एका वडाऱ्यास सर्पदंश होऊन तो मृत्यू पावला असता त्यास उठविले. त्यामुळे त्यांची कीर्ती होऊन यात्रा भरण्यास आरंभ झाला. मुधोळच्या आसपास प्रभूंच्या दहापाच गाद्या स्थापन झाल्या.

हुमणाबाद आणि गडवती यांच्या दरम्यान निबिड अरण्यात असलेल्या एका जुन्या शिवालयात एका ब्राह्मणाच्या कुटुंबास ते श्रीप्रभूंच्या दर्शनासाठी येत असता हत्यारबंद लुटारू चोरांनी त्यांच्यावर हल्ला करून त्यांचे सर्व वित्त लुटून त्यांचा प्राण घेण्यासाठी शस्त्रे उगारली. तेव्हा सर्व मंडळींनी प्रभूंचा धावा केला. त्याच वेळी भक्तवत्सल श्रीप्रभू तेथे प्रगट झाले. श्रीसद्गुरु माणिकप्रभूंच्या दिव्य शक्तीने चोरांनी मारण्यासाठी वर केलेले हात जागच्या जागी थिजून गेले व पाय लुळे पडले. तेव्हा चोर श्रीप्रभूंना शरण गेले व त्यांनी त्यांची पश्चात्तापाने माफी मागितली. तेव्हा प्रभूंना त्यांची दया येऊन त्यांचे थिजलेले हात व लुळे पडलेले पाय नीट झाले. तेव्हा प्रभूंना वंदन करून ते चोर आनंदाने तेथून निघून गेले. श्रीप्रभूंनी त्या ब्राह्मण कुटुंबाचे कोटकल्याण केले.

त्या दिवसापासून प्रभूंनी आपले राहण्याचे ठिकाण तेथेच करून पुढे समाधीकालपर्यंत भक्तजनांचा उद्धार करीत तेथेच राहिले.

प्रभू अरण्यात शिवालयाजवळ येऊन राहिल्याची खबर लागताच हुमणाबादेहून सरकारी अमलदार नायब प्रभूंच्या दर्शनास आले व जुन्या शिवालयाची साफसुफी करून देवास रुद्राभिषेक करण्यात आला. पाच दिवस तेथे मोठा समारंभ झाला. ब्राह्मणांस व इतर सर्व जातींचे लोकांस भोजने देण्यात आली. ब्राह्मणांना पात्री एकेक रुपया प्रभूंनी दक्षिणा दिली व गोरगरीबांस दानधर्म पुष्कळ केला. प्रभूंच्या दर्शनास हजारो लोक नित्य येऊ लागले. प्रभू एका जुनाट बेलाच्या झाडाखाली उघड्यातच बसत. यात्रेसाठी येणारे लोक कोणी झाडाखाली व कोणी पाल्याचे पडदे लावून राहू लागले.

हुमणाबादच्या सरकारी नायब व कामदार मंडळींनी साहित्य सरंजामाची कोठी तेथे लावून दिली आणि सेवेसाठी व इतर व्यवस्थेसाठी चाकर माणसे ठेविली.

कल्याणहून तात्यासाहेब व मातोश्रीसह भक्त-मंडळी राहण्यासाठी प्रभूजवळ आली; परंतु प्रभूंनी त्यांना दादासाहेबांजवळ राहण्याची व आठवड्यातून एक वेळ गुरुवारी अथवा शनिवारी येथे येण्याची आज्ञा केली. इतर ब्राह्मण, यात्रेकरू, आंधळे, पांगळे आणि सेवेकरिता राहिलेले रोगी यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था भंडारखान्यातून होत असे.

पुढे श्रीदत्तजयंतीचा उत्सव फारच थाटात झाला. याच वेळी तात्यासाहेबांनी प्रभूची आज्ञा घेऊन विद्वान ब्राह्मणाकडून श्रीदत्ताच्या गादीची स्थापना केली.

तात्यासाहेब, देशमुख व नायब वगैरे मंडळींनी प्रभूच्या आज्ञेने बऱ्याच झोपड्या बांधून त्या जागेस गावाची रचना आणिली. श्रीदत्ताची गादी व प्रभूंसाठी वर छापरी घालून व खाली पक्की चिरेबंदी इमारत बांधून जागा सुशोभित केली. पुढे चार-पाच वर्षांनी सर्व जागा व्यवस्थित करून या पुण्य स्थळास 'श्रीमाणिकनगर' असे नाव ठेवले. भक्तजनांनी पुढे माणिकप्रभूकरिता गादी तयार केली आणि भक्तांचे मनोरथ पूर्ण करण्यासाठी प्रभू त्यावर आनंदाने बसू लागले. श्रीदत्ताच्या गादीजवळ नित्य भजन, पूजन व आरत्यांचा थाट होऊ लागला.

अरब व रोहिले लोकांत प्रभूंची कीर्ती होऊन ते प्रभूंच्या दर्शनास येऊ लागले. पुढे पुढे तर मुसलमान लोकाचे मेळे व मोठमोठे पीरजादे प्रभूच्या दर्शनास येऊ लागले. प्रभु हिंदू व मुसलमान भक्तांच्या सर्व मागण्या पुऱ्या करीत; कोणाची पोटदुखी बरी करणे, कोणास मुले देणे, महारोग बरे करणे, पिशाच्च काढणे इत्यादी हजारो मागण्या प्रभूच्या जवळ येत. यात्रेकरू, व्यापारी, शेठसावकार, सरकारी कामगार इत्यादी लोकांचे प्रभूंपुढे लाखो रुपये भेट म्हणून जमत असत. हिंदू व मुसलमान यांचे मिळून वर्षातून चार मेळे प्रभूजवळ जमत असत. मोहरम व ग्यारवी या दोन महिन्यांत मुसलमानांचे, संक्रांतीस जंगमांचा व श्रीदत्तजयंतीस हिंदूंचा मेळा जमत असे. प्रभू सर्वांना एक रुपयापासून हजार रुपयेपर्यंत बिदागी देत असत. जो जे मागेल ते त्याला बहुधा प्रभूंकडून मिळावयाचेच! नाही कोणास म्हणत नसत व रिक्त हाताने कोणाला जाऊ देत नसत. दरवर्षी एकंदर तीस लाख रुपये खर्च होत असे. याप्रमाणे माणिकनगरात श्रीमाणिकप्रभूंची दिनचर्या नित्य आनंदात व उत्सवात चालत असे.

प्रभूंच्या मनात राजकीय थाट वाढविण्याचा मुळीच हेतू नव्हता. फक्त परोपकार व दानधर्म यांशिवाय त्याचा कोणताही हेतू नव्हता. परंतु तात्यासाहेबांनी आपल्या हौशीने चारपाच वर्षांत माणिकनगरास व प्रभूंच्या दरबारास फारच शोभा आणिली. सर्व प्रकारच्या जिनसा मिळण्यासाठी लहानशी बाजारपेठही वसविली गेली. माणिकनगरास पूर्व व पश्चिम अशा दोन मोठ्या वेशी बांधल्या, आणि प्रत्येक वेशीवर जमादार व रोहिले अरब शिपायांचा बंदोबस्त ठेविला. तसेच नगारखान्याची संस्थापना करण्यात आली.

वडील बंधू दादासाहेब व मातोश्री बयाबाई यांची निर्याणाची वेळ जवळ येताच श्रीप्रभूंनी ब्रह्मज्ञानाचा बोध केला. तात्यासाहेबांनी समाधी घेतली व मातोश्री श्रीदत्तस्मरण करीत ब्रह्मरूपी लीन झाल्या. पुढे सर्व विधी धर्मशास्त्राप्रमाणे श्रीप्रभूच्या व तात्यासाहेबांच्या हाताने झाले. प्रभूंनी हजारो रुपये दोघांप्रीत्यर्थ दानधर्म केला.

पुढे शृंगेरीचे जगद्गुरू श्रीशंकराचार्य श्रीमाणिकप्रभूच्या भेटीस आले. श्रीप्रभूंची स्वारी मोठ्या थाटाने श्रीजगद्गुरूंस सामोरी गेली होती. जगद्गुरूंना सिंहासनावर बसवून त्यांची तात्यासाहेबाकडून यथासांग पाद्यपूजा करवून त्यांना वस्त्रे, भूषणे, हत्ती, घोडे, पालख्या सर्व अर्पण केले. भोजनसमारंभ मोठ्या थाटाने झाला.

प्रभूचा आदरसत्कार पाहून जगद्गुरूची स्वारी फारच खूप झाली जगद्गुरूची स्वारी जाण्यास निघाली तेव्हा प्रभू त्याना पोचविण्यासाठी दोन कोसपर्यंत गेले होते

काही दिवसानतर पुढे तात्यासाहेबाची प्रकृती बिघडल्याने व त्याचा समाधिकाळ जवळ येत आहे असे भविष्य पाहून प्रभूनी तात्यासाहेबाचे ज्येष्ठ चिरजीव मनोहर (अप्पासाहेब) याच्या मुजीचा बेत ठरवून मुज मोठ्या समारभाने उरकून घेतली पुढे तात्यासाहेबानी स्वत गुरुचरित्राचे पारायण करून पुष्कळ दानधर्म केला भजन, पूजनादी सर्व सत्कर्मे साधून नियमित दिवशी आनदाने बोलणेचालणे करून सर्वाचा निरोप घेऊन प्रभूच्या चरणावर मस्तक ठेविले आणि मग योगासन घालून समाधी घेतली प्रभूनी त्याचे चिरजीव अप्पासाहेबाकडून सर्व उत्तरविधी शास्त्रोक्त करविला आणि हजारो रुपये दानधर्म करून तात्यासाहेबाचे नाव प्रभूनी अजरामर करून ठेविले

श्रीसमर्थ अक्कलकोटचे स्वामी महाराज एकदा प्रभूच्या भेटीस आले होते प्रभूची व त्याची एकातात भेट झाली होती

यानतर प्रभूनी समाधी घेण्याचा निश्चय केला समाधीचा दिवस मार्गशीर्ष शुद्ध एकादशी मुक्रर केला समाधी घेतल्यानतर पुढे चार दिवसापर्यंत ही गोष्ट गुप्त ठेविण्याविषयी आपल्या विश्वासू तीन चार भक्तास सागितले प्रभू त्याना म्हणाले, 'तसे जर न केले तर मायामोहामुळे मध्येच हा बेत उघड झाल्यास अनर्थ होईल कारण मुसलमान जातीचे भक्त अज्ञानी व अडदाड आहेत ते येथे येऊन दगा करतील व मग समाधीस विघ्न येईल म्हणून ही गोष्ट गुप्त ठेवाची आणि समाधी घेतल्यानतर चार दिवसानी लोकास दर्शनास सोडावे समाधी झाल्यावर सोळावे दिवशी अप्पासाहेबास गादीवर बसवून सर्व व्यवस्था पूर्ववत् चालू ठेवावी' असे सागून समाधी तयार करण्याची सर्व व्यवस्था त्याच्याकडून गुप्त रीतीने करविली

मार्गशीर्ष शुद्ध एकादशीस सूर्योदयापूर्वी स्नान करून मग अप्पासाहेबाकडून प्रभूनी पूजा-अर्चा करवून गळयात पुष्पाचे हार घातले घातले व पचारती करून घेतली. सर्वास प्रसाद दिले नतर आपल्या गळयातील हार काढून अप्पासाहेबाच्या गळयात प्रसाद म्हणून घातला आणि सर्वास आशीर्वाद देऊन प्रभू आत समाधीत बसले मग 'अवधूत चिंतन श्रीगुरुदेव दत्त' अशी सर्वांनी गर्जना करून एका हाताने नेत्राचे अश्रू पुशीत व दुसऱ्या हाताने द्वारास सर्वांनी चिरा लावून बदोबस्त केला नतर सर्व मडळी मनातल्या मनात खिन्न होऊन आपल्या घरी गेली अशा रीतीने शके १७८७ मार्गशीर्ष शुद्ध एकादशी सन १८६५ मध्ये श्री सद्गुरु माणिकप्रभू समाधिस्थ झाले पुढे सोळाव्या दिवशी अप्पासाहेबाना त्याच्या गादीवर बसविले.

प्रभू मोठे वक्ते आणि अनेक भाषाभिज्ञ होते. त्यानी विपुल काव्यरचना केली आहे त्याच्या कविता मोगलाईत व इतर ठिकाणी प्रसिद्ध आहेत त्यानी 'कल्पतरु' नावाचा ग्रथ लिहिला आहे श्रीमाणिकप्रभूची पुण्यतिथी दरवर्षी मार्गशीर्ष शुद्ध एकादशीस मोठ्या थाटाने साजरी होते याशिवाय दरवर्षी बरेच उत्सव उजविण्यात येतात परतु मुख्य उत्सव श्रीदत्तजयतीचा मार्गशीर्ष शुद्ध एकादशी ते पौर्णिमेपावेतो पाच दिवसपर्यंत थाटामाटाने साजरा करण्यात येतो. या उत्सवात व पुण्यतिथीस जातपातीचा कोणताही भेद ठेविल्याशिवाय अखिल भारतातील लोक येऊन भाग घेतात लाखो लोकाची यात्रा जमते प्रभूच्या नतर श्रीमनोहर माणिकप्रभू व श्रीमार्तंड माणिकप्रभू यानी हा सप्रदाय वाढविला

— श्री ग गडकरी

श्रीमाणिकप्रभूंच्या पदाची थोडी ओळख खालील पद्यांवरून होण्यासारखी आहे.

(१) श्रीगुरु माझा दत्त दयाघन रे ॥ ध्रु ॥ अंतर चालक त्रिभुवनपालक ॥ सकलांसी जीवन रे ॥ १ ॥ अखंड अगोचर व्याप्तचराचर ॥ शाश्वत चिद्घन रे ॥ २ ॥ माणिकदासासी मेळविलें स्वरुपासी ॥ देखुनि उन्मन रे ॥ ३ ॥

(२) श्रीपाद श्रीवल्लभा मा पाहि ॥ यतिवर्या दीन करुणा शब्दे करुनि वाही ॥ ध्रु. ॥ नगर पीठ पुर पूर्व दिशेसि राज पीता सुमतिच्या कुशी ॥ दत्तात्रय त्वा आपस्तंभ वंशी अरूपरूप परि देह धरिलासी ॥ १ ॥ मुंज लागली सप्तम वरुषी लग्न लाविता न लगे म्हणसी ॥ देखुनि दोन पुत्र मातेसी बद्रिकाश्रम पाहू गेलासी ॥ २ ॥ गोकर्णी तीन वर्षे वास श्रीगिरी चातुर्मास ॥ निवृत्ति सगमाहुनि कुर्वपुरासी ॥ कृष्णा गंगा वाहे ग्रामास ॥ ३ ॥ अंबिका पुत्र त्या मतिमंदासी ॥ कृपादृष्टीनें पडित करिसी ॥ पुत्र ज्ञानि होय पुढील जन्मासी व्रत दिधले तिसी शनिप्रदोषी ॥ ४ ॥ वर दिधला त्वां रजकालागी विदुर नगरीचें राज्यसुख भोगी ॥ नरसिंह सरस्वती होऊनि योगी दर्शन देइन मी तुजलागी ॥ ५ ॥ गंगेमधें गुप्तचि झाला कुर्वपुरामधे वासचि केला ॥ ६ ॥ पाहि पाहि श्रीसद्गुरुनाथा कृपा करूनी दर्शन दे आतां ॥ तुजवीण कोण असे मज दाता ॥ माणिकदास तारि दिनानाथा ॥ ७ ॥

(३) राखी लाज माझी अवधूता ॥ ध्रु. ॥ तुझें नाम घेऊनि हिंडे जगीं मी। वागवूनि पंचभूतां ॥ १ ॥ माणिकदासाचें विघ्न दूर करी ॥ दत्त अत्रेयाच्या सुता ॥ राखी लाज० ॥ २ ॥

## २४. नारायण महाराज जालवणकर

( सन १८०७–१८६७ )

श्रीनारायणमहाराज जालवणकर याचा जन्म झाशीनजीक जालवण म्हणून गाव आहे तेथे झाला. यांचे वडील दात्या पुराणीक यांनी सत्पुत्रप्राप्तीच्या वासनेने श्रीमद्भागवताची शंभर पारायणे केली व त्या तपाच्या प्रभावानेच ह्या पुरुषाने त्याच्या पोटी जन्म घेतला. हे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. श्रीनारायणमहाराज एक वर्षाचे असतानाच त्यांची माता ब्रह्मरूप झाली व त्यानंतर त्यांच्या आजीने त्यांचा प्रतिपाळ केला. वडिलांनी त्यांच्या वयाच्या ८ व्या वर्षी त्यांची मौंज केली व १० व्या वर्षी लग्न करून दिले. परमार्थाची परमप्रीती हा याचा उपजत धर्म होता. अनेक जन्मससिद्ध अशा महापुरुषांच्या उदयात भगवत्प्रीती स्वभावसिद्ध असते, ती त्याना बाहेरून शिकावी लागत नाही.

पूर्वसंस्कारबलाने नारायणास बालपणापासूनच देवाचे वेड लागले. नारायण पाच वर्षांचा होताच तासचे तास फडताळात जाऊन डोळे मिटून बसे, व 'येथे बसून काय करितोस ?' असे आजीने विचारले म्हणजे मी 'देव पहात होतो' असे उत्तर तो देत असे ! विवाहोत्तर वैराग्यलाभ होऊन हे घराबाहेर पडले. मथुरेस गोवर्धनबाबा नावाचे हठयोगी होते, त्यांजपाशी ते हठयोग शिकले, व त्यांनीच यांना ध्यानोपासनादी मार्ग दाखवून दिला. चार वर्षे तेथे राहिल्यावर व अभ्यास यथासाग केल्यावरही 'समाधान झाले नाही' असे त्यांनी गोवर्धनबाबास निर्भयपणे सांगितले, तेव्हा 'श्रीदत्त दर्शन होईल तेव्हाच तुझे समाधान होईल' असे त्यांनी उत्तर केले.

यानंतर बापाच्या बोलण्यावरून हे दोन वर्षे पुन्हा घरी जालवणास गेले. तेथे त्यास एक पुत्र झाला. पण पुत्र व त्याची माता दोघेंही आठ दिवसांतच निवर्तल्यामुळे ते संसारपाशातून मोकळे झाले. नारायणमहाराज यानंतर गिरनार पर्वतावर गेले व तेथें त्यांनी श्रीदत्ताची उपासना मनोभावें केली. त्यांचे कडक अनुष्ठान व तीव्र भक्ती पाहून श्रीदत्त प्रसन्न झाले. त्यांनी १४

दिवस अन्नपाणी वर्ज्य करून श्रीदत्तदर्शनासाठी ते धरणे धरून बसले, व धावे करून दत्तदेवास पुष्कळ आळविले शेवटी दत्तदर्शन होत नाही असे पाहून ते निराश झाले व १४ व्या दिवशी पर्वताच्या कड्यावर उभे राहून देहत्यागाचा त्यानी सकल्प केला इतक्यात श्रीदत्त साक्षात् प्रगट झाले 'मुला ! हे काय करितोस ?' या प्रश्नास 'श्रीदत्तात्रेय भेटत नाहीत म्हणून देहत्याग करितो ' असे त्यानी उत्तर केले 'नुसत्या स्थूल देहाच्या त्यागाने दत्त भेटतील काय ?' या प्रश्नास 'मला काही कळत नाही, पण दत्तभेटीवाचून मला हा देह नकोसा झाला आहे ' असे त्यानी उत्तर केले मग श्रीदत्तानीही हात धरून त्यास गुफेत नेले व निजरूप दाखवून समाधान केले चारी देहाचे निरसन होऊन नारायण नारायणरूप झाले साक्षात् श्रीदत्तानी त्यास ब्रह्मविद्येचा बोध केला तेव्हा ते कृतकृत्य झाले गिरनारपर्वतावर निरजनस्वामी म्हणून एक दत्तभक्त होते त्याचाही त्यास सहवास झाला तेथे चार वर्षे राहून श्रीदत्ताज्ञेने ते लोकोद्धारार्थ बाहेर पडले

त्यानी दक्षिणोत्तर सर्व तीर्थक्षेत्राच्या यात्रा केल्या व जेथे जेथे ससारतप्त जीव शरण आले तेथे तेथे त्यानी ब्रह्मोपदेश करून त्याचा उद्धार केला काही सन्यासीही शरण आल्यामुळे त्याच्यासाठी त्यानी परमहसदीक्षा घेतली काही काळ ते ब्रह्मावर्तास राहिले, हरिद्वार, ग्वाल्हेर, काशी येथेही राहिले त्याचे शिष्य धार, देवास, इदोर बडोदा, झाशी, काशी इकडेच अधिक होते

महाराजाचे काही चमत्कारही प्रसिद्ध आहेत ते ब्रह्मावर्तास असताना तेथे शिष्यमडळी पुष्कळ झाली नित्य श्रवणास इतर लोकही जमत तेथे महादेव आपटे नावाचा एक कुतर्की ब्राह्मण महाराजाची पाठीमागे खूप निंदा करीत असे एके दिवशी तो महाराजाचा पोशाख अगावर घालून आरशात तोंड पहात बसला होता, तोच महाराज तेथे आले ते म्हणाले,' 'महादेवा ! तू उन्मत्तपणाने निंदा करितोस, पण मुका होशील व तुझा हा देह निरुपयोगी होईल ! ' सत्पुरुषाची वाचासिद्धी अमोघ असते महादेव लगेच मुका झाला पुढे तो शरण आला व पुनरपी कोणाचीच निंदा न करिता वाणी नामस्मरणाला वाहीन असे त्याने कबूल केले तेव्हा त्याला पुन्हा वाचा आली महाराज रात्री गगातीरावर चौरगावर बसून ध्यानस्थ होत ते दर मार्गशीर्षपौर्णिमेस श्रीदत्तजयतीचा उत्सव करीत, त्यावेळी दहापाच हजार पान होत असे महाराजाची शिष्यीण बाळाबाई एकनिष्ठ उपासक होती तिला महाराजानी हरिद्वारास जातेवेळी पादुका दिल्या त्या ग्वाल्हेरीस त्याच्या घरी (आप्पा कानड्याच्या बाजारात बक्षी याचे शेजारी) आहेत महाराज धौम्यारण्यात बारा वर्षे एकातात राहिले तेथे असताना ते जेवीत नसत धारच्या राजाने महाराजाचा उपदेश घेतला राजाची भक्ती पाहून त्यानी त्यास बोधामृत पाजले राजाने महाराजाची पूजा केली व त्यावर मोहोराचा अभिषेक केला व पुष्कळ जवाहीर अर्पण केले महाराजानी नतर ते शिष्यमडळीस देऊन टाकले महाराजास काशीस 'चिमटेबोवा ' म्हणत अगावर भगवे वस्त्र, पायात पादुका, पायापर्यंत लोंबणारे रेशमी वस्त्र, हातात चिमटा, ओठात आगठ्या, कपाळास केशरी गध व मधे दोन लाल टिळे, लहानशी दाढी, असा त्याचा थाट असे त्याच्या शिष्यात रत्नागिरी येथील नारायणबाबा, कल्याण येथील सखारामबाबा, मुबई येथील राधाकृष्ण तोरणे, इदूर येथील लक्ष्मणबाबा, इ मडळी कृतकार्य झालेली होती लक्ष्मण महाराजाचा मठ इदूर येथे आहे त्याचे शिष्य वल्लभीमबोवा साडेकर हे पुढे प्रसिद्धीस आले

याचे ग्रथ अलीकडेच त्याच्या योग्यतेच्या मानाने प्रसिद्धीस आलेले आहेत याची वाणी

अत्यंत प्रासादिक आहे हे काही सांगावयास नको याची अष्टके पंचके व श्लोक बरेच प्रसिद्ध आहेत याची दहाबारा अस्सल पदे मुमुक्षुत प्रसिद्ध झाली आहेत 'विसरू कसा मी गुरुपादुकाना' हे याचे 'गुरुपादुकाष्टक' व 'सुविचारमाला' याची ओळख महाराष्ट्राला झालीच आहे सुविचारमालेतली

(१) संसारी असता प्रवाहपतितवृद्धदासी नासू नको।

(२) भूलोकात महाप्रसंग पडता तू सत्त्व सोडू नको।

इ मौक्तिके विनमोल आहेत अभंगापैकी एक दोन देतो –

१ संतचरणतीर्थी करीन आंघोळी ।
असे वनमाळी करी मज ॥ १ ॥
संतचरणजामाजी मी लोळेन।
असे नारायणा करी मज ॥ २ ॥
म्हणे नारायण गुरु निरंजन।
दास म्हणवीन संताचा मी ॥ ३ ॥

२ तुझे हाती दिले हात ।
नको करू माझा घात ॥ १ ॥
तुझे पायी माथा ।
ठेवियेला सद्गुरुनाथा ॥ २ ॥
कैसा तरी तुझा । अंगीकार करी माझा॥३॥
भेट देई नारायणा। दत्तदेवा निरंजना॥४॥

'बोधाष्टका'त महाराज उपदेश करितात–
तूतें देह नसे शुभाशुभ वदा तत्कर्म तेही नसे।
ऐसें हे निजमानसीं समजता प्रारब्धरेषा पुसे॥
शुद्धात्मा विलसे सदा त्रिभुवनी अद्वैत ते पाहणे।
ब्रह्मानंद अगाध चिन्मय सुधासाम्राज्य
ते भोगणें ॥ ५ ॥

'निर्वाणपंचका'त ते सांगतात –
निर्वाणबोधरवि हृत्कमली उदेला
मायांधकार सविकार विकल्प गेला।
दुर्द्वैत दुःसहिण अंतरिचा निवाला
आरण्य घोर गृह थोर समान त्याला ॥ १ ॥

सिद्धयोगाष्टकात ते म्हणतात –
वैराग्य भाग्य तरि श्लाघ्य म्हणू तयाला
भोक्ता न भोग्य गुरु योग्य वदे जयाला।
जो का निरंजनपदीच अखंड राहे
आनंदमग्न सम चिन्मय डोलताहे ॥ २ ॥

महाराजाची १६९ ओव्याची 'परमार्थदीपिका' व 'अभंगचाळिसी' सुंदर आहेत

याचे मुख्य ग्रंथ सात आहेत व ते 'सप्तसागर' या नावानें प्रसिद्ध आहेत १ ज्ञानसागर-यात मनुष्याचे चार वर्ग अधिकारपरत्वे सांगून त्याचे कर्तव्याचा विचार केला आहे २ विज्ञान सागर–यात कर्म व ज्ञान ही साधने भगवत्प्राप्तीस अवघड आहेत व भक्ती हेच साधन सुलभ आहे ३ बोधसागर–यात सद्गुरूने मुमुक्षूस केलेला बोध दिला आहे ४ कैवल्यसागर–यात तोच बोध जास्त विस्ताराने व आधार दाखवून केला आहे या ग्रंथासारखा आत्मस्वरूपबोध करून देणारा सुलभ दुसरा ग्रंथ मराठी भाषेत मिळणे कठीण आहे असे मला वाटते ५ आनंदसागर-यात स्वरूपानंदाचे वर्णन आहे ६ शांतिसागर यात अपरोक्षज्ञाननिष्ठ व शांत पुरुषाची लक्षणे सांगितली आहेत ७ करुणासागर–यात शेवटी भगवद्भक्ताने भगवंताची करुणा भाकली आहे हा ग्रंथ मोठा चित्तवेधक आहे याचे दोन खंड असून पूर्वार्धात १८९६ व उत्तरार्धात १५७७६ मिळून १७६७२ ओव्या आहेत पूर्वार्धाच्या शेवटी

निरंजनाचे चरण। भावे वंदी नारायण।
पूर्वार्ध झाला संपूर्ण। भाविकाचा हितवर्ता॥
जे का भावे वाचिती।
त्याचे मनोरथ ऐसेचि पुरती।
जैसे माझे श्रीपती।
पुरविता झाला निजांगे ॥

अशा दोन ओव्या आहेत या ग्रंथाची एकच प्रत वडोदास श्री कृष्णराव रघुनाथ धारकर याचे घरी आहे याचे तीर्थरूप श्री रा रघुनाथ

बापूजी उर्फ भाऊसाहेब धारकर महाराजांचे थोर अधिकारी शिष्य होते. अलीकडे मुंबई येथील जोगेश्वरीच्या ट्रिनिटी पब्लिसिटी सोसायटीने श्रीनारायण महाराज जालवणकर उर्फ चिमटेबाबा यांचे समग्र ग्रंथ लोकांना उपलब्ध करून दिले आहेत.

—ल. रा. पांगारकर

# २५. विष्णुबावा ब्रह्मचारी

## ( सन १८२५–१८७१ )

अव्वल इंग्रजीच्या काळात ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या विरुद्ध चळवळ उभारून हिंदू धर्माची बाजू मांडणाऱ्या विष्णू भिकाजी गोखले यांच्या कार्यामागे श्रीदत्तात्रेयांची प्रेरणा होती. यांचा जन्म कुलाबा जिल्ह्यातील शिरवली गावी झाला. घरच्या गरिबीमुळे यांना शिक्षण फारसे घेता आले नाही. तालुका कचेरीत, भुसार मालाच्या दुकानात, कस्टम खात्यात यांना नोकरी करावी लागली. वयाच्या तेविसाव्या वर्षी हे आत्मसाक्षात्कारासाठी घराबाहेर पडून सप्तशृंगीच्या डोंगरावर तपश्चर्या करीत राहिले. यांनी आपल्या संक्षिप्त आत्मवृत्तात लिहिले आहे, 'मी लग्न केले नाही, या कारणावरून व माझ्या वर्तणुकीवरून मला ब्रह्मचारीबावा म्हणतात. ....लहानपणापासून मला वेदोक्त धर्माचा विचार करण्याची सवय होती. पुढे माझ्या वयाचे विसावे वर्षी मला ईश्वराकडून साक्षात्कारद्वारा सूचना झाली. नंतर मी आपले वयाची तेवीस वर्षे, आठ महिने, तेवीस दिवस झाल्यावर कौपीन धारण करून एकान्तविचार करण्याकरिता सप्तशृंगीच्या डोंगरावर व आजूबाजूच्या अरण्यात वगैरे गेलो. त्या ठिकाणी निर्मनुष्य स्थलावर काही वर्षे मास दिवस भक्ती करून निवास केला.'



यानंतर आपणांस आत्मसाक्षात्कार कसा झाला, दत्तात्रेयांचा वर कसा मिळाला, हे सांगताना विष्णुबावांनी म्हटले आहे, 'मला आत्मप्राप्तीच्या उत्कंठतेमुळे व विचारामुळे, ईश्वराचे साक्षात्कार होऊन आत्मज्ञानप्राप्ती झाली. पहा, मला ईश्वरावाचून सद्‌गुरू कोणी मिळाला नाही.' विष्णुबावांची चांगल्या गुरुशी भेटच झाली नाही. बहुतेक सर्व अज्ञानी व ढोंगी भेटले. कोणी जादूच्या, कोणी किमयेच्या, कोणी विषयाच्या छंदात होते, तर कोणी द्रव्यलोभी होते. म्हणून त्यांनी सप्तशृंगीच्या डोंगरावरील एकान्तवास पत्करला. 'ईश्वरावर भरंवसा ठेवून अरण्यासंबंधी कंदमूलभक्षण करून, निर्झरोदकपान करून, गुहेत वगैरे ठिकाणी निर्मनुष्य स्थळी नग्न राहून अवधूत राहिलो आणि वेदान्तविचार, ध्यानधारणा अतिशय केली. तेणेकरून ईश्वराने दयाळूपणाने मला अनुभविक आत्मज्ञानी करून उपदेश करण्याची आज्ञा केली. म्हणून मी उपदेश करीत फिरत आहे.'

विष्णुबावांनी नाना प्रकारचे भलेबुरे अनुभव घेतले. नाना मतमतांतरे तपासली. परंतु त्यांत त्यांचे मन रमले नाही. त्यांना साक्षात् ईश्वरी कृपेचे वरदान मिळाल्याची हकीकत ऐकण्यासारखी आहे. ते म्हणतात, 'मला हजारो मनुष्यांच्या सभेत ज्या ज्या इसमास जे जे पाहिजे, तेच सुचते. हाच काय तो माझ्यात गुण आहे. तो मला दत्तात्रेयाचा वर आहे. मला प्रश्नाबरोबर तत्काळ आणि जलद उत्तर देऊन समाधान करता येते....मला दत्तात्रेयाचा वर आहे; त्यामुळे बोलण्यात मला कोणी जिंकील असे नाहीच नाही.' ज्या दत्तात्रेयांनी त्यांना वर दिला त्याला उद्देशून ते आपल्या आत्मवृत्तात म्हणतात;

'हे ईश्वरा, तू मला अरण्यात शंकर-पार्वतीरूपाने अनेक वेळा दर्शन देऊन आज्ञा दिलीस की, माझ्या वेदोक्त विषयात ज्या तारक गोष्टी आहेत त्या लोकांच्या मनात ठसवून दे; कारण

की त्या गोष्टींचा लोप झाला आहे. त्या तू सांगितलेल्या गोष्टी मी जगात प्रकट केल्या आणि ह्या वेदोक्त धर्मप्रकाश ग्रंथात व भावार्थसिंधू ग्रंथात लिहून सर्वांस दिल्या. या गोष्टी ऐकून सर्वांचे अंत.करणात ज्ञान उद्‌भूत व्हावे याविषयी तुझी कृपारूपी दृष्टी सर्वांकडे व्हावी. हे ईश्वरा, बापा, तू दत्तात्रेय अवताररूपाने दर्शन देऊन बोललास की, तू जगात तारक उपदेश कर. पण त्या वेळेस मी बोललो की, मला संस्कृत भाषा येत नाही. मग तू हास्यवदन करून बोललास की जा, विष्णू, तू सहज भाषण करशील तोच वेदगर्भीचा परमसिद्धांत होईल. त्याप्रमाणे या जगात मी बोलतो आणि सर्व पोकळीत तुझे ज्ञानरूपी कान आहेत म्हणून तू ऐकतोस.'

याप्रमाणे परमतखंडण करून वैदिक धर्माची स्थापना करण्यासाठी दत्तात्रेयांकडून विष्णुबावांना प्रेरणा मिळाली. पंढरपूर, सांगली, मिरज, वाई, सातारा, पुणे, नगर, मुंबई इत्यादी ठिकाणी त्यांचे प्रचारकार्य चाले. भावार्थसिंधू, वेदोक्त धर्मप्रकाश, सुखदायक राज्यप्रकरणी निबंध, चतुःश्लोकी भागवत याचा अर्थ, सहजस्थितीचा निबंध, सेतुबंधनी टीका इत्यादी त्यांच्या ग्रंथांतून त्या काळच्या मानाने खूपच प्रगत व क्रांतिकारक विचार आहेत. 'सर्व प्रजा एक कुटुंब आहे' अशा विचाराचा विस्तार त्यांनी केला. फारसा शास्त्रीय आधार नसला तरी बावांचे साम्यवादी विचार आजही चकित करणारे आहेत.

## २६. बालमुकुंद

### (समाधी, सन १८७७)

श्रीबालमुकुंद अथवा बालावधूत हे प्रख्यात दत्तोपासक श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रीकरांचे गुरू होत. बेळगाव जिल्ह्यातील खानापूर तालुक्यातील मलप्रभा नदीच्या काठी पार्श्ववाड नावाच्या गावी १८५० च्या सुमारास बाळाजी अनंत कुलकर्णी ऊर्फ बळप्पा नावाचे एक ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण रहात असत. बाळप्पांचे पूर्वज वाईकडील असून ते स्मार्त होते. पार्श्ववाडकडे राहू लागल्यावर त्यांनी वैष्णव पंथाची दीक्षा घेतली. अंगी वैराग्य बाणल्यामुळे त्यांचे संसारातील व व्यवसायातील मन उतरले व त्यांनी तपाचरणास आरंभ केला. निर्जन वनात योगधारणेचा अभ्यास केल्यानंतर त्यांना श्रीरामचैतन्य नावाच्या एका अवधूताचे दर्शन झाले. या श्रीरामावधूतावर श्रीदत्तात्रेयांचा अनुग्रह झाला होता. हेच बाळप्पा पुढे बालावधूत अथवा बालमुकुंद या नावाने प्रसिद्धीस आले. पुढे कवरीवनात त्यांनी आणखी योगसाधना आरंभिली. पार्श्ववाड गावातील मल्लिकार्जुनांच्या देवालयात ते एकतारीवर सुरेख भजन करीत. 'सुकुमार गात्र मनोहर । उटी सुंदर । भस्माची वरुती । निजशांति झाली । मोहित पाहुनी मूर्ति ॥ मस्तकी जटाचा भार । भाळी केशर मुद्रा सुंदर । अनुपम कांति । आरक्त नेत्र उन्मीलित कृपेची दीप्ती ॥ कौपीन कासें दंडकमंडलू करी । हो करी । शिव धन्य शिवशिव गर्जतसे वैखरी । वैखरी । उन्मत्त बालपिशाचस्थिति स्वीकरी ।' असे यांचे वर्णन श्रीपंतांनी केले आहे.

यांच्या पिशाचवृत्तीमुळे यांना लोकांकडून त्रास होत राहिला; म्हणून हे पार्श्ववाड गाव सोडून बेळगावजवळच्या कडेगुद्दीच्या डोंगरावरील दाट झाडीत असलेल्या गडदलक्ष्मीच्या देवळात राहू लागले. या स्थानात अस्वलांचा उपद्रव फार असल्याने जंबुनगर, रीसपुरी असेही याचे नाव आहे. कडेगुद्दी येथील रामप्पा गोपाळ कुलकर्णी व शंकरप्पा तळकलकर यांनी यांचा अनुग्रह घेतला. बालमुकुंद ही शुद्ध प्रेमाची मूर्ती असून सदा आत्मरंगात रंगलेली असे. एकतारीवरील यांची साठ एक कन्नड पदे उपलब्ध आहेत. 'मूकनाग बेकू । जनरोळ जाणा गिरबेकु' या त्यांच्या कन्नड पदावर श्रीपंतांनी ' श्रीबालबोधामृतसार ' नावाचा एक विस्तृत निबंध लिहिलेला

आहे. श्रीपंतांचे यांच्याविषयी प्रथमतः फारसे अनुकूल मत नसले तरी पुढे त्यांचे बालमुकुंदावर विलक्षण मन जडले. बालमुकुंदांनी त्यांच्यावर अनुग्रह करून अवधूत पंथाची दीक्षा दिली. शके १७९७ मध्ये आश्विन वद्य १२ च्या दिवशी झालेल्या अनुग्रहाचे मोठे रेखीव व प्रत्ययकारी वर्णन श्रीपंतांनी 'ब्रह्मानंद परमाद्वैत शुद्ध बद्ध सद्गुरु' या पदात केले आहे. 'बालावधूत सद्गुरु जनी आगळा । अद्वैत बोधामृत पाजुनी । चुकविलो भवघाला । पिसेपण मिरवीत आपण । खेळवी भक्तमेळा ॥ पूर्णरूपे निज खूण दावुनी । प्रकटवी दत्तकळा ॥' अशी निष्ठा श्रीपंतांची याच्याविषयी होती. आपला अवधूतमार्ग चालविण्यास श्रीपंत समर्थ असल्याची खात्री बालमुकुंदांना होती. सन १८७७ च्या अखेरीस बालमुकुंद श्रीशैल्ययात्रेस जाण्यासाठी निघाले; आणि नंतर ते कोणासच देहरूपाने दिसले नाहीत. श्रीपंतांनी म्हटल्याप्रमाणें 'वेणुनगरीं ब्रह्मज्ञानाचें कोठार। उघडुनियां थोर ख्याति केली ॥ श्रीशैल्य यात्रेचें करुनियां मीस । दत्तहृदयी वास गुप्त केला ॥'

## २७. अक्कलकोटचे स्वामी

### (समाधी, सन १८७८)

श्रीअक्कलकोटच्या स्वामींचे भक्त त्यांस श्रीदत्ताचा चवथा अवतार असे मानतात. पण स्वामींचा जन्म केव्हा, कोठे झाला? त्यांचे आईबाप कोण? त्यांचे पूर्वाश्रमीचे वृत्त काय? त्यांनी साधन कोणते केले? त्यांचे गुरु कोण? दीक्षा कधी व कोणापासून घेतली? त्याम इतके वैराग्य कशाने प्राप्त झाले? वगैरेसंबंधी काहीच पत्ता कोणासही लागला नाही. ते जेव्हा प्रकट झाले, तेव्हा त्यांचे वय किती असावे, यावद्दल्ही विलक्षण समजुती होत्या. त्यांचे वय चारशे किंवा पाचशे वर्षांचे आहे, असे लोक म्हणत. ते बाराव्या शतकाचे आरंभी जन्मले असा एका भक्ताला दृष्टांत झाल्याचे ऐकिवात आहे.

एकदा कलकत्त्याचे एक इंग्रज बॅरिस्टर व एक पारशी गृहस्थ त्यांच्या दर्शनास आले असता "आपण येथे कोठून आलात?" असा साहेबानी भीत भीत त्यास प्रश्न विचारला. तेव्हा स्वामींनी उत्तर दिले ते असे :— "प्रथम आम्ही कर्दलीवनातून (हिमालय) निघालो पुढे फिरत फिरत कलकत्ता वगैरे शहरे पाहिली. बगाला देश हिंडून कालीदेवीचे दर्शन घेतले. नतर गगातटाकाने फिरत फिरत हरिद्वार व केदारेश्वर पाहिले. (पुढे स्वामींनी गावाची व तीर्थक्षेत्राची शेकडो नावे घेतली.) पुढे गोदातटाक हिंडत हिंडत दक्षिण हैद्राबादेस गेलो. तेथून मंगळवेढे, पढरपूर, बेगमपूर, मोहोळ, सोलापूर अशा गावी रहात रहात अक्कलकोटास आलो."

"अक्कलसे खुदा पछानना" ह्या बोधवचनाची लोकाना स्मृती रहावी म्हणून की काय स्वामी अक्कलकोटास येऊन प्रगट झाले, असा कोटीक्रम कोणी करतात व त्यास त्यांच्या चरित्रातील एका गोष्टीचा दाखला देतात. एकदा कोणी एक मोगलाईतील श्रेष्ठ दर्जाच्या सय्यदाने स्वामींच्या मठाशी येऊन "क्यौं जी, ये अक्कलकोटके स्वामी कहाँ है?" असे विचारले. तेव्हा त्यास स्वामींनी नेहमीच्या फटकळ भाषेत उत्तर केले "स्वामी बैठे XXX पर, स्वामी तो अक्कलकोटमें है, ह्या क्या देखता है?" या स्वामींच्या उत्तराने तो सैय्यद समजावयाचे ते समजून एकदम तटस्थ झाला! घटकाभर त्याची उभ्या उभ्याच समाधी लागल्याप्रमाणे दिसून आले त्यातून तो पूर्वस्थितीवर आल्यावर त्याने मुक्तकंठाने स्वामींचे स्तोत्र गायले व व आजपर्यंत अनेक साधने केली; पण हा आनदानुभव मिळाला नाही. अनेक अवलियांस यापूर्वीही पाहिले, पण आज साक्षात् खुदाचेच दर्शन झाले. "और उसी लिये अक्कलके अंदर हरदेमें साहेबकू

सच्चा देख लिया, सब जनमका सार्थक हुआ, पलखमें दरया माफक हो गया. किस्मतकी बात है मैं आपका बंदा हूँ." इत्यादी धन्योद्‌गार काढले. यावरून श्रीगुरुचे निवासस्थान अक्कलकोट किंवा प्रज्ञापुरी हेच योग्य असे स्वामींचे भक्त म्हणू लागले.

अक्कलकोटास राहण्यास येण्याच्या पूर्वी गावाबाहेरील एका माळावर काही दिवस स्वामी रहात असत. तेथे येणाऱ्या एका गुराख्याच्या पोराला तुझ्या गावात येऊ का ? असे स्वामी विचारीत. दोन दिवस त्याने काहीच उत्तर दिले नाही. तिसरे दिवशी हो या म्हणाला तसे स्वामी गावात गेले याप्रमाणे अक्कलकोटात श्रीगुरूची प्रथम ओळख गुराख्याच्या मुलाशी झाली. अक्कलकोटास आल्यानंतरचेच स्वामींचे चरित्र उपलब्ध आहे. त्यापूर्वीचे विशेष उपलब्ध नाही. एकदा स्वामी अक्कलकोटास त्यांचे एक आद्य भक्त चिंतोपंत टोळ यांच्या घरी असता वसंतऋतूतील एका मध्यरात्री आंगणात पडलेले होते. तेव्हा स्वामींची गाण्याची लहर लागली. व "गोरे रूप तुझे तुजला पाहिले सात ताल माडीवर ॥" ही जुनी लावणी स्वामींनी संबंध म्हटली. ती ऐकून पंताना नवल वाटून ते म्हणाले, "महाराज, आपण पूर्वाश्रमात गृहस्थ होता असे वाटते. आपली जात कोण, आईबाप कोण ?" स्वामींनी चटकन् उत्तर केले की, "आमची जात घाभार, आई महारीण व बाप महार आहे." असे म्हणून महाराज पोट धरधरून मोठ्याने हसू लागले.

अक्कलकोटास एक म्हातारी सोनारीण वेडसर दिसे. पण तिला स्वामींची भाषा इतरापेक्षा जास्त कळे. एकदा तिच्या देखत महाराजांस एका कलापाने प्रश्न विचारला, "स्वामिन्, आपण कोण आहा ?" त्यावेळी श्रीसमर्थ म्हणाले 'मूळ पुरुष वडाचे झाड दत्तनगर.' हे ऐकून ती म्हातारी म्हणाली– "वटपत्र शयनी मूळ पुरुष दत्तात्रेयरूपाने अवतरले आहेत." नंतर कोणी एक कर्वे यांनी विचारले, "हे महाराजाचे सत्यार्थरूपवचन आहे काय ? परंतु आपली ज्ञाती कोण ?" समर्थ म्हणाले– "आम्ही यजुर्वेदी ब्राह्मण, आमचे नाव नृसिंहभान, काश्यप गोत्र, आमची मीन राशी; पुन्हा विचारल्यास टाळक्यात पायपोस ! पण काय रे, तुझी फक्कड मुलगी पुण्यास रात्रदिवस‌ ‌फिरते. तिची ज्ञाती कोण ?" हे ऐकून प्रश्न विचारणारा गृहस्थ ढेकळासारखा विरघळला !

रावसाहेब मुळेकर यांनी लिहिलेल्या चरित्रात पुढील हकीकत दिली आहे :- "उत्तर हिंदुस्थानात श्रीभागीरथीचे उत्तरेस मोठे अरण्य आहे; तेथे योगी लोक तपश्चर्या करितात. त्या वनातील एका वारुळात स्वामी महाराज तपश्चर्या करीत असता एक लाकूडतोड्या लाकडे तोडीत तोडीत महाराजाच्या वारुळाजवळ आला. त्याने लाकूड तोडण्याच्या हेतूने कुऱ्हाडीचे घाव वारुळावर घातले. ते महाराजांच्या मांडीस लागले. ते वण पुढे स्वामींच्या मांडीवर दिसत व ते श्रीवत्सलाछनाप्रमाणे महाराजांस शोभा देत. लाकूडतोड्याने एका अर्थी जगावर उपकारच केला. कारण श्रीस्वामीमहाराजांसारखे अमोल रत्न त्याने जगास दृग्गोचर करून दिले. असो. तेथून महाराज निघाले, ते श्रीकाशीक्षेत्री जाऊन पूर्वदेशी प्रगट झाले. पुढे महाराज गंगोत्रीस जाऊन काही दिवस राहिले. नंतर यतिराज देवलग्रामास जाऊन तेथे त्यांनी आपल्या पादुका स्थापन केल्या. ब्रह्महत्यादी पापे पादुकांच्या दर्शनाने नाहीशी होतात, असा त्या स्थानाचा महिमा आहे. तदनंतर महाराज हे मोगलाईत जाऊन राहिले. तेथे राजूरगावी मठ स्थापन करून त्यास आठ गावची जहागीर सरकारातून मिळवून शिष्याकडे मठ सोपवून देऊन महाराज पुढे चालते झाले. त्यावेळी महाराज चंचलभारती नावाने प्रसिद्ध होते. महाराज अक्कलकोटास आल्यावर मोगलाईतील संस्थाना-

पैकी काही बैरागी (लालभारती) महाराजांजवळ आले होते. ते जहागिरीसंबंधी काही लढा पडल्यामुळे मूळ संपादक जे स्वामीमहाराज 'चंचलभारती' त्यांची आज्ञा घेण्यास आले होते. सरकारातून असा हुकूम झाला होता की, मूळ संपादकाच्या सहीचा लेख बैराग्यांनी आणावा; म्हणजे त्याप्रमाणे तक्रारीचा निकाल होईल. महाराजांनी त्यास आपल्या सहीचा लेख दिला नाही. स्वामी लालभारतीस म्हणाले— 'कोणी गुरु नसे आणि चेला। अहंब्रह्मात्मा सनातन संपूर्ण एकला ॥' (गुरुलीला) पुढे महाराज रामेश्वरास गेले. तेथून उडुपी क्षेत्रास जाऊन त्यांनी श्रीकृष्णाचे दर्शन घेतले. पुढे ते पंढरपुरास आले व श्रीविठ्ठलाचे व पुंडलिकाचे दर्शन घेऊन दामाजीच्या मंगळवेढ्यास प्रसिद्ध झाले. श्रीविठ्ठल आपला सखा आहे, असे स्वामी अक्कलकोटास आल्यावर हमेशा म्हणत असत." पंढरीचे लोकां। किती मारूं हाका। तेथें माझा सखा पांडुरंग ॥ याप्रमाणे अभंग स्वामी हमेशा म्हणत असत."

स्वामींचे परम निःसीम भक्त मुंबईचे हरिभाऊ ऊर्फ स्वामीसुत यांचे म्हणणे स्वामींचा जन्म हस्तिनापुराजवळ छेलीखेडी ग्रामी चैत्र शुद्ध द्वितीयेस झाला; त्याप्रमाणे सदर मितीस मुंबईच्या मठात महाराजांचा उत्सव होतो.

दुसरे एक स्वामिभक्त माधवशास्त्री हे आपल्या संस्कृत चरित्रात असे म्हणतात की, मच्छ कच्छ आदिकरुन अवतारांचे जन्मनिर्याण आपणांस ठाऊक आहेत. पण श्रीगुरू कोठून आले, कोठे जन्मले, हे काहीच कळत नाही. तथापि स्वामिभक्ताचा एकंदर अभिप्राय असा दिसतो की, गुरुचरित्राच्या एकावन्नाव्या अध्यायात श्रीनृसिंहसरस्वती हे गाणगापुराहून निघून कर्दलीवनात जाऊन गुप्त झाले, तेच पुढे अक्कलकोटास येऊन प्रगट झाले.'दत्तात्रेय श्रीगुरु गिरिनारीं ॥ जगतांसि भरंवसा सर्वदा भारी ॥ ते परमात्मा ध्वजाधारी ॥ प्रज्ञापुरीं वसताती ॥ ३५ ॥' असे ब्रह्मनिष्ठ वामनबोवा—स्वामींचे एक पट्टशिष्य म्हणतात. स्वामी अक्कलकोटास शके १७७९ आश्विन शु. ५ बुधवार रोजी आले. ते प्रथम आले ते बुधवारपेठेत खंडेरायाच्या देवळाच्या ओट्यावर येऊन बसले. पुढे अक्कलकोटचे श्रीमालोजी राजे दर्शनास आले, तेव्हा आपल्या भगव्या वस्त्रांचा बोळा करून स्वामींनी त्यांच्या अंगावर फेकला. हा कोण वेडा आला ? म्हणून त्यांची चेष्टा करण्याच्या हेतूने अहमदअल्ली नामक एका रिसालदाराने त्यांना न पेटवलेलीच चिलीम ओढण्यास दिली. स्वामींनी पहिल्या दमछाटीत चिलीम पेटविली ! अशा रीतीने लोकांचे लक्ष त्यांचेकडे वेधत गेले. पुढे चोळाप्पा नामक एका गरीब कुटुंबवत्सल गृहस्थाच्या घरी ते गेले. बहुत काळची ओळख असावी, अशा रीतीने त्यांनी त्यास आलिंगन दिले. धर्मसंस्थापनेसाठी व तुझे ऋण फेडण्यासाठी आलो आहे, असे ते त्यास म्हणाले, व पुढे अखेरपर्यंत त्याच्या येथेच राहिले.

स्वामी अक्कलकोटास प्रगट होण्यापूर्वी त्यांस अनेकांनी अनेक ठिकाणी पाहिलेले असल्याचे आढळून आले. ते अक्कलकोटास येऊन राहिल्यावरही त्यांचा संचार एकाच वेळी अनेक ठिकाणी होत असे.

जेवण दुसऱ्यांनीच घालावे, परंतु जेवावे अशी महाराजांची लहर लागल्यास. महाराजांच्या अंगावर पांघरूण दुसऱ्यानीच घालावे. परंतु ते अंगावर असावे असे त्यांस वाटल्यास. महाराजांनी चाहील त्या ठिकाणी जावे, ती जागा मग राजाचा रंगमहाल असो, अगर स्मशानभूमी असो, वाळवंट असो किंवा निवडुंगाची जागा असो. महाराजास प्रतिबंध करणारा कोणी नसे. महाराज चाहील त्याच्या हातचे अन्न खात असत. परंतु महाराज अधर्मी होते, अशी कल्पनाही कोणास करवत नसे. महाराज कधी कधी दिवसातून दोन दोनदा स्नाने करीत केशराच्या व चंदनाच्या उटया अंगाला लावून घेत आणि आरती करून घेत. कधी कधी आठ आठ दिवस स्नानच करीत नसत. कोणास न कळत एखाद्या बागेत अगर स्मशानात अगर जगलात जाऊन रहात. महाराज चालू लागले म्हणजे त्यांच्याबरोबर कोणाच्यानेही चालवत नसे. ते बोलू लागले म्हणजे एकसारखे काहीतरी बोलत असत. हुक्का ओढू लागले, म्हणजे एकसारखा हुक्काच ओढीत बसत. लहान मुलांजवळ खेळू लागले म्हणजे एकसारखा खेळच चालावा. एखादे वेळी स्वारी रागावली, म्हणजे सात सात दिवस त्यांचा रागच हालू नये. आनंदात स्वारी असली, म्हणजे सर्वाजवळ मधुर वाणीने बोलावे. अशा प्रकारची महाराजांची दर घटकेस वृत्ती बदलणारी असल्याने त्यांच्याविषयी खरी परीक्षा खऱ्या पारख्यावाचून कोणालाच झाली नाही."

सिद्धपुरुष वर्णाश्रमधर्मातीत असतात, त्याची वृत्ती बालोन्मत्तपिशाचवत् असते, असे म्हणतात. ते स्वामीच्या ठिकाणी हरघडी दिसून येई. स्वामीस खेळण्याकरता गहू, हरभरे, राळे, लाख, वाटाणे, मसूर वगैरे सर्व प्रकारची धान्ये लागत. तसेच अक्रोड, बदाम, खारका हेही पदार्थ ठेवावे लागत. विनवुडाची मापटी किंवा देवांच्या पितळी पोकळ मूर्ती घेऊन त्यांत धान्य भरावे व ओतावे असे त्यांचे काहीतरी चाळे चालत. तसेच एखाद्या लहान मुलाप्रमाणे त्यांस त्यांची एक सेवेकरीण सुंदराबाई हिने भरवावे, न्हाऊ घालावे, नेसवावे, इतकेच काय पण बहिर्दिशेसही न्यावे, अशी त्याची बालवृत्ती असे.

त्यांच्या ठिकाणी लोष्ट आणि कांचन, राव आणि पाक, मंगल आणि अमंगल, सोवळे आणि ओवळे, जात आणि पात, विटाळ आणि चांडाळ हा जरी भेद नव्हता, तरी ते काही एखाद्या अघोरी पयातील किळस उत्पन्न करणारे अशुची असे पुरुष नव्हते. त्यांचे नित्य कर्म दुसऱ्यांना दिसण्यासारखे नव्हते. ते दोनच आचमने काय ती घेत. पण काहीच करीत नसत म्हणावे तर ते रात्रीही फारसे निजत नसत. रात्रीचे भजनही करीत. सर्व कर्मांत स्नानाची एखाद्या गजराजाप्रमाणे त्यास विशेष आवड दिसे. त्यांची कांती अत्यंत तेज.पुंज असे. भागवत लिहितात की, "चर्मचक्षूंना सहन न होण्यासारखे जरी महाराजांचे तेज होते, तरी भक्तांचे मनोरथ पूर्ण करण्याकरता ते सौम्य तेज प्रगट करीत असत. अशी सौम्य व तेज:पुंज मूर्ती पहाण्याबरोबर कोणाचेही मन ह्या मूर्तीला सोडून जाण्याविषयी प्रवृत्त होत नसे. चेहरा मोठा भव्य, आकर्ण नेत्र, सरळ नाक, विशाल कपाळ, आजानुबाहू व कांती लिंबासारखी सतेज असून फारच नाजुक असे. हे शरीरावयव व त्यांचा तो नाजुक आणि भव्यपणा पहाण्याबरोबरच समाधान वाटण्यासारखे होते. अशी अवयवरचना व तेज.पुंज कांती अन्य ठिकाणी दृष्टीस पडत नाही." वामनबोवा स्वामीच्या ध्यानाचे वर्णन करतात-'रक्तशामलांग प्रसन्नवदन । वक्ष विशाल कंबुग्रीवासम शोभायमान ॥ चंपकवत् नासा कमलदलनयन ॥ आजानुबाहु सरल शोभतो ॥७४॥ सुकुमार जन्म जरारहित॥ सुपाद स्वंगुली सुजंघ विराजित॥ सुनाभी शुभ ऊरू शुभलिंग सहित ॥ आच्छादित कौपीन वस्त्रे ॥७५॥ सुपार्श्व जघनोत्तम

विशाल ॥ महास्कंद शोभती कोमल ॥ दीर्घ पृष्ठोरथ सर्वदा निश्चल ॥ सुहस्तरेखा लक्ष्मीवान् साजती ॥ ७६ ॥ बिंबोष्ठ स्वच्छ शुभदंत झळकती ॥ विद्युज्जिव्ह मुतालक शोभती ॥ दीर्घ चंपक नासा सतेज ती ॥ प्रकाशती सुकपोल सुकर्ण ते ॥ ७७ ॥ मीलिलोन्मीलित नेत्र शुभ्र विशाल । सुभ्रूमध्य कोमल ॥ सुंदर दिव्य प्रकाशित भाल ॥ भस्म सुगंधयुक्त तें ॥ ७८ ॥ कंठी रुद्राक्ष तुळसी माला स्फटिक ॥ विलसतसे हेमयुक्त मुक्त प्रवाळक ॥ कर्णी चार चार कुंडलरूप अमोलिक ॥ ऐसें अलौकिक ध्यान पाहुनि ॥७९॥'

तात्पर्य, महाराजांच्या ठिकाणी सारी द्वंद्वे सामावलेली दिसत. ते कधी मसणवटीत, तर कधी खासबागेत, कधी म्हारवड्यात, तर कधी राजवाड्यात, कधी निवडुंगाच्या काट्यांवर, तर कधी पलंगावर, कधी मंदिरात, तर कधी मठात, यांप्रमाणे सारख्याच भावनेने वावरत असत. " सहज स्वारी बाहेर निघाली की सर्व राजचिन्हांनी मंडित दिसावी. छत्रचामरे, पालख्या, म्याने, घोडे,गाड्या, गाई, म्हशी इत्यादी खिल्लारे, तंबू, कनाती, नगारखाने, वाजंत्री, रणवाद्ये व सेवेकरी व यात्रेकरी लोकांच्या फलटणी, त्याचप्रमाणे पुराणिक, हरिदास, गवय्ये, कलावंतिणी, तमासगीर, नाटकवाले, त्याप्रमाणे फुलवाले, फुलारी, मिठाईवाले व सर्व प्रकारचे दुकानदार बरोबर आहेतच. मग महाराज एखादे वेळी जंगलात का वस्तीला जात ना, बरोबर हा इतका सरंजाम असावयाचाच."

अशा या लोकोत्तर पुरुषाची खरी योग्यता जाणण्यास अंगी तशीच पात्रता पाहिजे. एऱ्हवी लक्षावधी लोक स्वामींच्या दर्शनास येत असत. हिंदुस्थानाच्या चारी टोकांकडील व साऱ्या धर्मांतील लोक स्वामींच्या दर्शनास येत असत. शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले असे संस्थानिक त्यांच्या भजनी होते. युरोपियन वंडगार्डन, पारशी नवरोजी शेट, मुसलमान सय्यद आणि अहमदअल्ली रिसालदार, त्याचप्रमाणे जैन, लिंगायत, वैष्णव, वारकरी, संन्यासी, सुधारक, सनातनी, शास्त्री, हरिदास अशा अनेकांनी त्यांच्या पायी आपले मस्तक नमविले. वारंवार होणाऱ्या चमत्कारांनी महाराज सर्वज्ञ आहेत व ते सर्वशक्तिमान आहेत, अशीही आर्त जीवांची खात्री झाली. आपद्ग्रस्त लोकांनी तर त्यांची पाठ पुरविली व आपआपली संकटे निवारण करून घेतली. पण हे जरी सारे घडले तरी त्यांची खरी पारख फारच थोड्यांना झाली असेल असेच त्यांचे चरित्रकार म्हणतात.

एकीकडे त्यांच्या सेवेत तत्पर असलेले चोळाप्पा आणि बाळाप्पा, सुंदराबाई आणि काकुबाई, मालोजी आणि दादाजी, भोसले, सबनीसबावा आणि मराठेबावा, बाळकृष्ण आणि कृष्णाप्पा, टोळ आणि कानफाटे, तसेच एकीकडे स्वामींच्या सर्वज्ञतेची अंतरी चुणूक मिळाल्यामुळे हतगर्व झालेले माटेबुवा आणि विष्णुबावा (ब्रह्मचारी), रामशास्त्री आणि माधवशास्त्री. त्यांनी स्वामींचे अनेक चमत्कार पाहिल्यामुळे त्यांना सर्वज्ञ दत्तावतार असेही त्यांनी मानले असेल. पण त्यांची *खरी योग्यता ज्यांनी जाणली ते आळंदीचे नृसिंह*-सरस्वती व यशवंतराव भोसेकर देवमामलेदार, मंगळवेढ्याचे बाळकृष्णबोवा आणि हुमणाबादचे माणिकप्रभू, असे संतच खरे होते.

त्यांच्या दर्शनास येणारे लोकांत अत्यज आणि मुसलमान, साळी आणि कोळी, वेश्या आणि जारिणी, मुके आणि शब्दपंडित, अडाणी आणि षड्शास्त्री असे सर्व दर्जाचे लोक येत असत. तथापि कोणी मनुष्य कोणत्याही विषयात किती निष्णात असला तरी आपणापेक्षा स्वामी किती तरी श्रेष्ठ आहेत, अशी छाप त्यांच्या मनावर प्रथमच बसून जाई. मग स्वामींनी किती कठोर भाषण केले, चारचौघांत आपले भलतेच बिंग फोडून छी: थू केली, तरी ती छाप दूर होत नसे आणि अशा त्यांच्या जाळ्यात सापडलेल्या

माणसात कोणी कितीही पापी असला, तरी तो पश्चात्तापपूर्वक शरण आल्यास, त्यावर दया करून ते सुधारणेच्या मार्गास लावीत कोणामध्ये कितीही अवगुण असेना, त्याच्यामध्ये जर एखादा गुणही असेल, तर तोही स्वामीच्या कृपेस पात्र होई.

स्वामींनी चोळाप्याचे दारिद्र्य दूर करून त्यास परमार्थास लावले तसेच त्यांनी गुरुमन्त्राची नौबत अक्कलकोटासच काय पण मुंबई, पुणे, अशा मोठमोठ्या शहरी वाजती केली मुंबईच्या ठाकूरद्वारचे हरिभाऊ ऊर्फ स्वामीसुत, पुण्याचे काळेबोवा व बडोद्याचे वामनबोवा या त्यांच्या सच्छिष्यानी त्यांची परंपरा चालू ठेवली ब्रह्मनिष्ठ वामनबोवा एकदा प्रकृतीच्या अस्वास्थ्याने वैतागून बडोद्याचे सुरसागरात प्राणत्याग करण्यास तयार झाले होते पण ते उडी टाकणार इतक्यात सर्वसाक्षी श्रीस्वामीमहाराजानी तेथे प्रगट होऊन त्यांचा हात धरला व त्यांच्या श्रीमुखात लगावून सांगितले की, देहारब्ध कर्माचा क्षय होईपर्यंत जातोस कोठे ? "मूर्खा सहजसमाधि सोडून । जलसमाधि घेतोसि त्रासून ॥ हेंच कळले काय ब्रह्मज्ञान । प्राणत्याग करावा मन्देशानें ।"

शास्त्रीमंडळीस बोलावून संकल्पपूर्वक त्यांच्याकडून प्रायश्चित्ते करविली त्यावेळी महाराजांनी मोठ्या उत्साहाने प्रत्येक संकल्प स्वमुखाने उच्चारून दानधर्म केला. आणि वेदोक्त मंत्र म्हणण्याविषयी शास्त्रीमंडळीस महाराजांनी आज्ञा केली. नंतर त्यांनी आपल्या अंगावरील बहुमोल जरीची शाल तिचा एक पदर भिजवून संकल्पपूर्वक रामाचार्य यास दिली. शके १८०० चैत्र वद्य त्रयोदशीच्या दिवशी दुपारी महाराजांचे आश्रमातील सर्व गुरे व घोडी महाराजांनी आपल्या पुढे आणविली व त्यास त्या दिवशी आलेले सर्व नैवेद्य खावयास दिले । आपली सर्व वस्त्रे जनावराच्या अंगावर घालण्यास सांगितली. त्यांचा आवाज खोल जात चालला असे पाहून एका सच्छिष्याने आम्हास आता आज्ञा काय म्हणून विचारता स्वामींनी 'अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते ॥ तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥' असे म्हणून दाखविले. ते डाव्या कुशीवर कलंडले होते, ते उजव्या कुशीवर वळले व आपल्याला बसवा अशी त्यांनी सूचना केली. सेवकांनी त्यास बसते केले महाराज बसले आणि निजानंदी निमग्न झाले. ह्याप्रमाणे स्वामींनी कर्जाळकराच्या वाड्यात वडाखाली

फडके यांच्या घराण्याकडे होती. लहानपणापासूनच वासुदेव हूड व बंडखोर वृत्तीचा होता. कल्याण, मुंबई, पुणे येथे थोडेफार शिक्षण झाल्यावर वासुदेवाने त्या वेळच्या जी. आय्. पी. रेल्वेकंपनी, ग्रँट मेडिकल कॉलेज इत्यादी ठिकाणी नोकरी करणाऱ्या वासुदेवाच्या मनात इंग्रजी राजवटीविषयी तिरस्कार उत्पन्न होत होता. सत्तावनच्या युद्धाची प्रेरणा त्याच्या मनास होतीच. पुण्याच्या फायनान्स ऑफिसात नोकरी करीत असताना त्यांच्या मनातील वैराग्यवृत्ती उसळून वर आली. मंत्रतंत्र, सत्पुरुषांच्या गाठीभेटी यांत त्यांना गोडी वाटे. अक्कलकोटच्या स्वामी समर्थांनाही ते भेटले होते. वासुदेव बळवंतांचे आराध्य दैवत श्रीदत्त हेच होते. श्रीपादवल्लभ नामक ध्यानाचे एक चित्र त्यांनी एका चित्रकाराकडून मुद्दाम काढवून घेतले होते. दत्ताचे हे रौद्र दर्शन त्यांच्या बंडखोर मनाला प्रेरणा देई. त्याची नित्य ते पूजा करीत. रोज श्रीगुरुचरित्राच्या पोथीचा अध्याय वाचीत. दत्तांच्या आराधनेचा व उपासनेचा एक ग्रंथ 'दत्तमाहात्म्य' नावाचा प्रसिद्ध करण्याचा त्यांचा मानस होता. गंगाधरशास्त्री दातार यांच्याकडून 'दत्तलहरी' या स्तोत्राचे भाषांतर करवून वासुदेव बळवंतांनी प्रसिद्ध केले होते. राजद्रोहाखाली याना हद्दपारीची शिक्षा झाली. एडन येथेच जन्मठेप भोगीत असताना त्यांचे निधन झाले. 'दधीचि ऋषींनी आपल्या अस्थीही देवासासाठी दिल्या. हिंदवासियांनो, मी आपला प्राण तुमच्यासाठी का देऊ नये?' अशी त्यांची वृत्ती होती.

## २९. आळंदीचे नृसिंहसरस्वती

**( समाधी, सन १८८६ )**

आळंदी येथील श्रीनृसिंहसरस्वतीस्वामी महाराजांची ख्याती दत्तावतारी म्हणूनच मोठी होती. स्वामींचे पूर्वचरित्र फारसे कोणाला माहीत नाही. ते शके १७९६ च्या सुमारास आळंदीस आले व लोकांना भजनानंदाचे प्रेम त्यांनी लावले. ज्ञानेश्वरी, नाथभागवतावर ते नित्य प्रवचने करीत. 'हे ब्राह्मण आश्वलायन। गोत्र तयांचें 'कौंडिण्य।' असे श्रीदासगणूंनी म्हटले असले तरी निकटवर्तीयांना ही माहिती बरोबर वाटत नाही. स्वामी साक्षात् दत्तावतारी, गुरुचरित्रातील नृसिंहसरस्वतीच अशी त्यांच्या भक्तांची श्रद्धा आहे. 'असो याच आळंदीत। झाले नरसिंह विख्यात। जे साक्षात् श्रीदत्त। नमन माझें तयासी॥' असे दासगणूही म्हणतात. लोणारच्या सच्चिदाश्रमस्वामींना आळंदीच्या स्वामींनी योगाभ्यास शिकविला. या सच्चिदाश्रमांनी 'माझा गुरू तोचि दत्त जाण। नरसिंहसरस्वती नामाभिधान। पूर्ण ब्रह्म' अशी श्रद्धा आपल्या 'अंतरानुभव' नावाच्या ओवीबद्ध ग्रंथात प्रकट केली आहे. 'तारावयां जडमूढां। रुप श्रीपाद धरी। अवतीर्ण दत्तराणा। झाला अलंकापुरीं॥' असा एक उल्लेख नागपूरचे राजयोगी श्रीअण्णामहाराज आपदेव यांनी आरतीमध्ये केला आहे. 'सद्गुरु ज्ञानाचा सागर। दत्ताचाहि तो अवतार' अशी श्रद्धा धुळ्याच्या भिकुबाई पुरंदरे यांनी व्यक्त केली आहे. दत्तात्रेय हेच श्रीपादवल्लभ व श्रीपादवल्लभ हेच श्रीनृसिंहसरस्वती व हेच नृसिंहसरस्वती म्हणजे आळंदीचे स्वामी होत! यांचे आयुर्मान सुमारे पाचशे वर्षांवर असावे!

श्रीगुरुचरित्राचे कथानायक श्रीनृसिंहसरस्वती हेच देहत्याग न करता आळंदीत प्रकट झाले. कर्दळीवन, हिमालय, वऱ्हाड, खानदेश, मालेगाव, पिंपळगाव करीत करीत स्वामी आळंदीस आले. कर्नाटकातही त्यांचे वास्तव्य असावे. गुर्लहोसूरच्या श्रीचिदंबर दीक्षिताच्या यज्ञात ते हजर होते. अनेक ठिकाणी यांनी अद्भुत चमत्कार करून लोकांना चकित केले. आळंदीत ते एक तपभर

होते. तेथे त्यांनी लोकांना भजनप्रेमाचा अनुभव दिला. गोपाळपुऱ्यातील विठ्ठलरखुमाईमंदिर, इंद्रायणीचा घाट, ज्ञानेश्वरांचा रथ, मुक्ताबाईचे मंदिर इत्यादी कामे यांच्याच प्रेरणेने झाली. शके १८०३ पासून स्वामींनी आळंदीत रथोत्सव सुरू केला. एकदा ज्ञानेश्वर माऊलीचा रथ इंद्रायणीच्या वाळूत रुतून बसला. रथ हालत नाही असे समजताच हे भावसमाधीतून जागे झाले व 'पूर्वी कृष्णावतारी आमचे (अर्जुनाचे) सारथ्य करून दमून गेल्यामुळे आपण रुसलेले दिसता. भगवन् ! आपले मनोगत समजतो. हे पाहा आता आम्ही आपले सारथी' म्हणून महाराजांनी रथाचे चालकत्व स्वीकारले आणि रथ चालू झाला. स्वामी सर्वसाक्षी व त्रिकालदर्शी होते. स्वामींनी शके १८०७ मध्ये जिवंत समाधी घेतली. प्रतिवर्षी पौष शु. पौर्णिमेस त्यांच्या पुण्यतिथीचा उत्सव होत असतो. दर गुरुवारी त्यांच्या समाधीवर त्रैमूर्तींचा रजत मुखवटा बसवून नित्यक्रमात दुपारत्यांचे वेळी दत्तप्रभूची आरती म्हटली जाते. त्यांच्या 'श्रीस्वात्मसौख्य', 'अतरानुभव', इत्यादी ग्रंथांचा परिचय आपण मागेच करून घेतला आहे. अण्णासाहेब पटवर्धन, यशवंत महाराज (देव मामलेदार), श्रीपादस्वामी, सच्चिदानंदस्वामी, आपदेव महाराज इत्यादी श्रेष्ठ विभूती त्यांच्या प्रभावळीत होत्या. श्रीपाददेवांना महाराजांनी करून दिलेले पाच अभंग 'लखोटघाचे अभंग' म्हणून प्रसिद्ध आहेत. यांच्या पत्रांतील निवडक उतारे दि. का. गर्दे यांनी संपादित करून प्रसिद्ध केले आहेत. श्रीपादबुवा गांधी यांनी यांच्या आठवणी प्रसिद्ध केल्या असून बाळ पाळेकर यांनी 'श्रीआळंदीचे स्वामी' या नावाने यांचे विश्वसनीय चरित्र लिहून भक्तांच्या हाती दिलेले आहे.

## ३०. नारायण गुरुदत्त महाराज

### (समाधी, सन १८९१)

बडोदे येथे सुमारे ९० वर्षांपूर्वी श्रीदत्तप्रबोधकार अनंतसुत विठ्ठल उर्फ कावडीबाबा महाराज यांच्या समाधि मंदिरात श्री. प. पू. ब्रह्मचारी नारायण गुरुदत्त महाराज या नावाचे एक महान सिद्ध सत्पुरुष वास्तव्य करून राहात होते.

परम पावन ब्रह्मचारी नारायण गुरुदत्त महाराज हे मूळचे कर्नाटक प्रांतातील जिल्हा कदामळी, तालुका बदामीपैकी, मुधोळ गावचे राहणारे होत. ते ऋग्वेदी ब्राह्मण असून त्यांचे गोत्र कश्यप होते. यांचे मूळ पुरुष गोविंद नाईक हे होत. यांचेपासून सहाव्या पिढीस दारा अप्पा नावाचे विद्वान व सदाचारी भगवद्‌भक्ताच्या घरी जो मुलगा झाला तेच प्रस्तुतचे नारायण महाराज होत.

त्यांचे त्या वेळी कृष्णअप्पा असे नाव ठेवण्यात आले होते. वयाच्या आठव्या वर्षी त्यांचा व्रतबंध करण्यात आला होता. मातापिता निवर्तल्यानंतर त्यांचेवरच एकाकी जीवन कंठण्याचा प्रसंग आल्याने व कोणी मायेचे जवळ नसल्याने त्यांना अतिशय दुःख झाले व त्यांनी कंटाळून घराचा त्याग केला.

मनात देहाचे सार्थक व्हावे ही तळमळ असल्याने, त्या दृष्टीने त्यांनी शोध सुरू केला. या वेळी त्यांचे वय १२–१४ वर्षांचे असावे. याप्रमाणे विचारात असताना त्यांना एक विचार आला की, बल्लारी जिल्ह्यातील आदवी तालुक्यातील मचली गावी आपल्याच वंशजांपैकी एक महान् योगाभ्यासी दत्तउपासक, श्रीदत्तात्रेयांची नित्य पूजासेवा करून स्वात्मरंगी रंगलेले महान् सिद्धपुरुष श्रीराघवेंद्र स्वामी

होऊन गेले होते. त्यांना आपल्या उपासनेमुळे वारंवार श्रीदत्तात्रेयांचे साक्षात्कार होत; तसेच सगुणरूपातही प्रत्यक्ष दत्तदर्शन झालेले होते. ते नित्य समाधियोग साधीत. त्यांनी त्याच गावात जिवंत समाधी घेतली होती. हे आपल्याच वंशातील महान साक्षात्कारी पुरुष असल्याने, त्यांच्या समाधिमंदिरात कृष्णाअप्पा येवून राहिले. समाधीची नित्य नेमाने सेवाअर्चा करावी, गावातून भिक्षा आणावी, त्यापैकी ब्राह्मणास भाग द्यावा व गोसेवा करावी, श्रीचिंतनात बाकीचा काल घालवावा.

याप्रमाणे सेवा करीत असता बारा वर्षे झाली तरी प्रभुकृपा होईना; म्हणून त्यांना वाईट वाटले व तशा विपण्ण अंतःकरणाने अत्यंत कळवळ्याने, त्यांनी एके दिवशी समाधीपाशी बसून, श्रीराघवेंद्रस्वामींना आपणांवर कृपा करण्याविषयी प्रार्थना केली. त्या दिवशी त्यांनी पूर्ण उपवासच केला होता. विनम्रपणे चिंतनात निमग्न असतानाच त्यांना तेथेच समाधीजवळ निद्रा येवून, ते तसेच तेथे पडून राहिले. त्याच रात्री स्वामींनी दृष्टांत दिला की,

तू आता श्रीशैल पर्वतावर माझे शिष्य 'लक्ष्मणदास' या नावाचे आहेत, त्यांच्याकडे जाऊन त्यांचा उपदेश घ्यावा. त्याचप्रमाणे— श्रीशैलपर्वतावर सतत प्रभुभजनात व योगाभ्यासात निरामय एकान्तस्थळी राहात असलेले आपले शिष्य 'लक्ष्मणदास' यानाही त्याच दिवशी दृष्टांत दिला की, 'तुम्हांकडे येत असलेल्या कृष्णअप्पास तुम्ही उपदेश द्यावा व वरदहस्त ठेवून पावन करावे.'

याप्रमाणे उभयतांस स्वामींचा दृष्टांत झाला. कृष्णअप्पानी आपले भावी गुरू श्रीलक्ष्मणदासमहाराज याची भेट श्रीशैलपर्वतावर जाऊन घेतली व मी अनन्य शरण आहे, उपदेश व्हावा, मला दृष्टांत झाला आहे.' अशी विनंती विनम्र भावाने हात जोडून केली.

श्रीलक्ष्मणदास यांना गुर्वाज्ञा झालेलीच होती. त्यांनी त्याप्रमाणे गुरुवार अभिजित मुहूर्त पाहून कृष्णअप्पास तारक मंत्रोपदेश केला व वरदहस्त मस्तकी ठेवून कृतार्थ केले. त्यांनी त्यास योगासंबंधी माहिती देऊन प्रत्यक्षात साधना करवून घेतली. उपदेश झाला त्या दिवसापासून कृष्णाअप्पाचे नाव बदलून 'नारायण' असे ठेविले; तेच हे ब्रह्मचारी नारायण गुरुदत्त महाराज होत.

याप्रमाणे उपदेशप्राप्तीनंतर काही काळाने गुर्वाज्ञेने 'नारायण' आता चार धाम यात्रेस निघाले. सर्व यात्रा पूर्ण करून 'नारायण' हे परत श्रीशैलपर्वतावर गुरूजवळ येऊन राहिले. तेथे गुरुशिष्यांनी श्रीदत्तात्रेयांची उपासना केली. तप सुरू केले. ध्यानधारणा व योगाची प्रक्रिया व साधनाही चालू होतीच.

याप्रमाणे तपाचरणात काही काळ लोटल्यावर श्रावण वद्य ३ गुरुवारी श्रीलक्ष्मणदास समाधिस्थ झाले. त्यांची समाधी बांधून ब्रह्मचारी नारायण महाराजांनी पुण्यतिथिमहोत्सव, अन्नसंतर्पण वगैरे तेथे पुष्कळ केले. तेथे अद्यापही श्रावण वद्य ३ रोजी लक्ष्मणमहाराजपुण्यतिथिउत्सव साजरा होत असतो, तो त्यांचे पारंपारिक शिष्यमंडळी साजरा करीत असत.

पुण्यतिथिउत्सव संपल्यावर नारायण महाराज ब्रह्मचारी पुन्हा यात्रेस निघाले. श्रीब्रह्मचारी नारायण गुरुदत्त महाराज यांचेवर श्रीदत्तात्रेयांची पूर्ण कृपा होती. त्यांनी आता नर्मदा व गोदावरीची प्रदक्षणा करून नरनारायणाची यात्रा करावी असा विचार केला. त्याप्रमाणे कृष्णामाईची प्रदक्षणा करून ते बदरिकाश्रमी गेले. तेथे त्यांनी महान् तपश्चर्या केली. नंतर स्वर्गद्वारी नरनारायणाचे दर्शन घेतले. दर्शनाने अत्यंत आनंद वाटला.

तेथील यात्रा संपवून ते गोदातीरी श्रीत्र्यंबकेश्वरी येऊन प्राप्त झाले. लोकांना या

व महान् योग्यास पाहून आनद वाटला लोक त्याची तेथे सेवा करू लागले याप्रमाणे तेथे मुक्काम असताना त्याच्या शिष्यापैकी काहीनी या महान् सत्पुरुषास 'वीरक्षेत्री' आणले बडोद्यास पूर्वी वीरक्षेत्र असे नाव होते

महाराजाचे बडोद्यास आगमन झाल्याने तेथे त्याचा उपदेश घेऊन पुष्कळ शिष्य आले तसेच अनेकाना त्यानी भक्तिमार्गास लावले महाराज अखड 'दत्त दत्त' नामस्मरण करीत असत, म्हणून त्याना सर्व 'ब्रह्मचारी नारायण गुरुदत्त महाराज' असे सबोधीत असत त्याची कीर्ती ऐकून ठिकठिकाणचे लोक नित्य दर्शनास येत असत व आपली दु खे सागून त्या परिहारार्थ उपाय विचारीत महाराज त्याना योग्य मार्गदर्शन करून त्याची दु खे दूर करीत येथे पुष्कळ त्याचे अनुयायी व शिष्यही झाले होते

ठिकठिकाणी नित्य नवे श्रीदत्तकृपेने चमत्कार करीत असता महाराज चद्रपुरी गेले तेथे त्यानी काही दिवस मुक्कामही केला व पुष्कळास भक्तिमार्गास लाविले असे चालू असता श्रावण शुद्ध ८ गुरुवार शके १८१३ रोजी महाराजानी आपल्या देहास श्रीदत्तात्रेयात विलीन केले

श्रीब्रह्मचारी नारायण गुरुदत्त महाराज याचे बडोद्यास, तसेच अन्यत्र ठिकठिकाणी पुष्कळ शिष्यसमुदाय होता त्याचा मुक्काम बडोद्यास श्रीकावडीबाबा महाराज याच्या चौखडी रोड बडोद, येथील मदिरात, तसेच त्याच्या समाधि-मदिरात होत असे

त्याच्या मुख्य शिष्यगणात श्रीमाधवराव बेहरे, लक्ष्मीबाई व सरस्वतीबाई पुराणीक, ग लक्ष्मीबाई जेजूरकरबाई व श्रीगणपतराव अप्पाजी पुणेकर हे होत श्रीपुणेकर माजी सुधराई कामदार या हुद्यावर होते, त्यानी सतचरित्रे' या नावाचा काव्यमय ग्रथ लिहिला असून त्यात प्रथमच आपले गुरू नारायण महाराज याचे काव्यमय चरित्र लिहिलेले आहे.

श्रीब्रह्मचारी नारायण गुरुदत्त महाराज याची गुरपरपरा खालीलप्रमाणे आहे

आदिनाथ– हरिमाय – भगवान – ब्रह्मदेव–वशिष्ट– पराशर – व्यास – शुक – गरुडपाद–गोविदाचार्य – शकराचार्य–ज्ञानबोध (गिरी)–सिद्धगिरी–नृसिहतीर्थ–विद्यातीर्थ–मालीयानदल-कृष्णसरस्वती–राघवेद्रसरस्वती–उपेंद्रसरस्वती–नृसिहसरस्वती – राघवेद्र– बाबा लक्ष्मणबाबा–सद्गुरू नारायण गुरुदत्त महाराज

– सु मा राजापूरकर

## ३१. गुरुकृष्णसरस्वती

(सन १८३५–१९००)

कोल्हापूर शहराच्या आसपास बरीच तीर्थक्षेत्रे आहेत. त्या तीर्थक्षेत्रात नृसिहवाडीचा समावेश केला जातो वाडी हे दत्तमहाराजाचे स्थान आहे हे तीर्थक्षेत्र कोल्हापूर शहराच्या पूर्वेस अदमासे तीस मैलावर आहे व या तीर्थक्षेत्राच्या पश्चिम बाजूस सुमारे दोन मैलावर नादणी नावाचे एक छोटेसे गाव वसलेले आहे

या गावात अप्पाभट नावाचा एक ब्राह्मण रहात होता त्याला अन्नपूर्णा नावाची पत्नी होती हा ब्राह्मण भारद्वाज गोत्रातील असून पचागाच्या आधारे लोकाच्या अडीअडचणी दूर करून गावातील पूजाअर्चा वगैरे पुरोहिताचे काम करून आपला उदरनिर्वाह करीत असे या दोघाना देवाधर्माच्या कार्यात नेहमी गोडी वाटत असे दर पौर्णिमेला व शनिवारी ब्राह्मण आपल्या पत्नीसह दत्ताच्या दर्शनासाठी वाडीस अगदी नियमाने जात असे व दोन दिवस राहून परत गावी येत असे त्याना कशाचीही कमतरता नव्हती, परतु घरी सतान नसल्यामुळे अन्नपूर्णेस घर ओस वाटत असे त्यामुळे तिने एकदा पतीस सागितले की, "आपल्या घरात पैसा, अडका व धान्य मुबलक असले तरी आपणास सतान

नसल्यामुळे ते सर्व काही व्यर्थ आहे. तरी श्रीदत्त-चरणी प्रार्थना करून माझी ही इच्छा पुरी करावी. तेव्हा शनिवारी श्रीदत्तगावी जाऊन त्या भक्तांच्या कैवान्यास विनंती करा. तो त्रिभुवनीचा राजा आपल्याला निश्चित पुत्र देईल व आपल्या संसारात सुख व आनंद निर्माण करील." परंतु त्या ब्राह्मणाने तिचे बोलणे मनावर घेतले नाही.

या गोष्टीला बरेच दिवस लोटले. एके दिवशी तो ब्राह्मण वाडीस गेला असताना दर्शनाच्या वेळी त्याने आपल्या पत्नीची इच्छा ईशचरणी ठेवली. तसेच देवाचे गुणगान गाऊन व स्तोत्र म्हणून तो भोजन करून झोपी गेला. त्या रात्री त्याने स्वप्नात साधूच्या वेषात एका पुरुषारा पाहिले. तो साधू त्यास म्हणाला, "हे ब्राह्मणा, सावध हो. तू उगाच मनाला काळजी लावून घेत आहेस. तू सर्व चिंता सोडून निष्काळजी रहा. मी स्वतःच तुझा पुत्र म्हणून तुझ्या घरी येईन." ते स्वप्न पाहून तो ब्राह्मण जागा झाला व संगमात स्नान-संध्या आटोपून तो आपल्या गावी परत आला. त्याने स्वप्नात पाहिलेला सारा वृत्तांत आपल्या पत्नीस सांगितला. ते ऐकून त्याच्या पत्नीस संतोष झाला.

या गोष्टीला तीन महिने उलटून गेले. अन्न-पूर्णास आपण गरोदर असल्याची चिन्हे दिसू लागली. त्यामुळे तिला फारच उल्हास वाटू लागला. तिला सारखे बलभीमाचे दर्शनाला जावे, एवढेच नव्हे तर सारखे देवळातच बसून रहावे असे डोहाळे लागले. तसेच एखाद्या शोभिवंत सिंहासनावर बसून संसारात गांजलेल्यांची सोड-वणूक करावी, पालखीत बसावे असे वाटू लागले. याप्रमाणे दिवसामागून दिवस, आठवड्यामागून आठवडे व महिन्यामागून महिने लोटू लागले आणि शके सतराशे सत्तावन्नच्या माघ महिन्यात कृष्ण पक्षाच्या पाचव्या दिवशी मकर लग्न व पावन नक्षत्र असताना रविवारी प्रातःकाळी अन्नपूर्णा प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. ती गौरवर्णीय देहाची सावळी मूर्ती पूर्वजन्मीची सर्व पुण्ये घेऊन घरी आली. जन्मवेळी आईस जरा-देखील प्रसूतीचा त्रास भगवंताने दिला नाही व अशा तऱ्हेने पुराण-पुरुषाने मानवावतार घेतला. त्याचे नाव श्रीकृष्ण ठेवण्यात आले.

मुलगा थोडा मोठा झाल्यावर तो एके दिवशी आईस म्हणाला की, "आमचे कुलदैवत म्हाळ-सापती. याचे दर्शन घेण्यासाठी मी मगसोळीस जावे असे म्हणतो. तरी माझी एवढी इच्छा पूर्ण करण्यासाठी मला परवानगी द्यावी." परंतु आईचे मन एकट्या मुलाला पाठवून देण्यास धजेना; परंतु अप्पाभटजीने तिची समजूत घातल्यावर ती त्यास पाठवून देण्यास राजी झाली. दुसऱ्या दिवशी सूर्य उगवताच कृष्ण मंगसोळीस जाण्यासाठी निघाला. बरोबर थोडीशी शिदोरी देऊन अन्नपूर्णा कृष्णाला गावाच्या वेशीपर्यंत पोचविण्यास गेली व 'लवकर परतून ये' असे मुलाला विनवून ती घरी परतली.

श्रीकृष्ण मगसोळीस पोहचला. कुलस्वामीचे दर्शन होताच त्याने साष्टांग नमस्कार केला. देवाचे स्तुतिस्तोत्र गाइले व तो म्हणाला, "तुझ्या साक्षात् दर्शनाची हाव धरून मी येथे धाव घेतली आहे. तू माझा कुलस्वामी व मी तुझा अज्ञानी नोकर. तेव्हा तुझ्यावर दृष्टी ठेवून मी लिंबाच्या झाडा-खाली तू जोपर्यंत भेट देत नाहीस तोपर्यंत जेवण-खाण सर्व सोडून बसून राहीन." या बालकाची ती प्रार्थना ऐकून तेथे एक ब्राह्मण आला. थोड्याच वेळात त्या ब्राह्मणाचा देह पालटला व कपाळावर चंद्राची कोर असलेला भोळा शिव-शंकर पार्वतीसह प्रगट झाला. जो नंदीवर आरूढ-लेला आहे असा तो कैलासनाथ डोक्यावर वरदहस्त ठेवून कृष्णास म्हणाला, "तू माझाच अंश असताना उगाच हे अज्ञान का दाखवतोस? दीनगरिबांचा उद्धार करण्यासाठी तू हा अवतार घेतला आहेस. तेव्हा हे स्तोत्र पुरे करून सत्वर

स्वतःचे घरी जावे. प्रथम अक्कलकोटी गावी सूर्याप्रमाणे तेजस्वी नृसिंहभान नावाचे प्रसिद्ध स्वामी आहेत, त्याच्या पायाला वंदन करावे. भक्तासाठी वारंवार त्रैमूर्तीच देह धारण करतात, तरी बुद्धी स्थिर करून श्रीगुरुमहती वाढवावी." बालक तेथपर्यंत जातो तोच इतके सांगून चटकन् भगवान अदृश्य झाले. आधीच त्रिमूर्तींचा अंश, त्यात त्र्यंबकेश भेटल्यावर सर्वच रहस्य कळून आले व कृष्ण मंदहास्य करू लागला. नंतर तो गावी गेला व आईस दर्शन देऊन सुखी केले. मुलाला पाहून आईला अत्यानंद झाला.

आईचा निरोप घेऊन श्रीकृष्ण जो घरातून निघाला तो थेट अक्कलकोटला जाण्यासाठी. कारण त्याला श्रीगुरूंच्या दर्शनाचा ध्यास लागला होता. तीन दिवस मार्ग आक्रमण केल्यावर तो अक्कलकोट गावी आला व त्याने बऱ्याच लोकांना विचारले की, "श्रीगुरू कोठे आहेत ?" त्यावर लोकांनी सांगितले की, "अक्कलकोटीचे प्रसिद्ध साधू, ज्यांची कीर्ती सर्वत्र पसरलेली आहे व ज्यांना नृसिंहभान म्हणतात, तेच श्रीगुरूची मूर्ती आहेत. आजच अरुणोदयी ते म्हणाले की, "कृष्ण धावून आला आहे. त्याला एकांतस्थळी नेऊ व उचित कार्य साधून घेऊ" इतक्यात स्वतः महाराज जवळ येऊन म्हणाले, "काय काम साधावयास आला आहेस ? क्षणभर लोकांची संगत सोड. चल, आपण एकांती जाऊ" असे म्हणून त्यांनी कृष्णाचा हात स्वतः धरला व 'चल, लवकर धाव धाव' असे म्हणून पळू लागले व क्षणात सर्व लोकांना मागे टाकून दूर गेले. निर्जन अरण्य पाहून व एका वृक्षाच्या बुंध्याजवळ घनदाट छाया पाहून 'हीच जागा चांगली आहे' असे म्हणाले. 'हा दगड आमचे आसन आहे' असे म्हणून त्यावर श्रीगुरुराय बसले.

त्यांचे तेज म्हणजे जसा अपार सूर्यच. ते तेज पाहून कृष्णाचे मन आनंदमय झाले व त्याने सद्भावाने पाय वंदिले. दोन्ही हात जोडून ते नानापरीनें स्तोत्र गाऊ लागले. ते सर्व ऐकून श्रीगुरू स्मितहास्य करीत म्हणाले, "हे पूजा, स्तोत्र वगैरे सारे पुरे कर व एक विचार सांगतो तो ऐक. कसला गुरू व कसला सेवक ? अवघा एकच विचार कर की, जगाचा उद्धार करण्यासाठी आता आम्हांला व तुम्हाला अवतार घ्यावा लागला आहे. नीतिमत्तेची सीमा न ओलांडता मनाला एक मर्यादा आणून जगात संचार करावयाचा आहे व लोकांची संगत करून जगाला मूर्खता दाखवून आपला हेतू साधावयाचा आहे. तेव्हा तुम्ही करवीरक्षेत्री जावे व तुमच्या अवताराचे कार्य साधावे; जे भक्त पुण्यभावाने भक्ती करतील त्यांना तारावे." एवढे बोलून आपला कृपेचा हात श्रीगुरूंनी मस्तकी ठेवला. दोघांनाही फार आनंद झाला. ते दोघेही देहाचा व्यापार विसरून गेले.

याप्रमाणे सात दिवस लोटले. नंतर आनंदाची ऊर्मी जिरवून नृसिंहभान सावध झाले व त्यांनी समोर कृष्णाला पाहिले. त्याच्या पाठीवर हात फिरवून ते म्हणाले, "बाळा, सावध हो. अजून खूप कार्य करावयाचे आहे. तेव्हा आत्ताच हे उचित नाही. आजपासून आम्ही तुमचे श्रीगुरुकृष्ण असे नाव ठेवले. आता आमचे वसतिस्थान गाणगापुरी राहिले. आम्ही तेथे तीन महिने राहू. तुमच्याकडे एक सांगाती येईल. त्याला बरोबर घेऊन करवीर नगरीत जावे. तोपर्यंत येथेच रहावे." साष्टांग नमस्कार करून कृष्ण म्हणाला, "तुमची आज्ञा ती प्रमाण." नंतर ती जागा सोडून दोघेजण गावात आले. यानंतर थोड्याच दिवसांनी सलग रात्रदिवस याप्रमाणे दोन दिवस रस्ता क्रमीत श्रीगुरुनाथ करवीरक्षेत्रात आले व राममंदिरात त्यांनी वस्ती केली. अद्याप हे राममंदिर करवीरक्षेत्री आहे. तेथे त्यांनी एका स्त्रीची समंध-बाधा दूर केल्याने फडणवीस नावाच्या एका गृहस्थाची भक्ती महाराजाचेवर बसली व त्याने स्वामींना आपल्या घरी नेले.

श्रीगुरुराया सहा महिने फडणविसांच्या घरी राहिले. तिन्ही त्रिकाळ लोक दर्शनासाठी येत. थोडी प्रसिद्धि होताच 'आता फडणविसाचे घर सोडू' असे श्रीकृष्ण म्हणू लागले. तेथून ते महिसाळकर नावाच्या भक्ताच्या घरी आले. एके दिवशी ते फिरत फिरत चालले. महिसाळकर त्यांचे मागून चाललेच होते. श्रीकृष्ण झटकन कुंभारगल्लीत आले व 'हेच माझे स्थान' असे म्हणाले. तेथे ताराबाई नावाची एक स्त्री रहात होती. तिला दत्तसेवेचे फार प्रेम होते. ती दर पौर्णिमेच्या दिवशी वाडीला जात असे. तसा तिचा नियम होता. पूर्वजन्मीचे चांगले कृत्य तिच्या पदरी असल्यामुळे श्रीगुरू स्वतः तिच्या घरी महिसाळकराचे बरोबर आले व त्यांनी 'आई' म्हणून हाक मारली. श्रीगुरुमूर्ती तिच्या घरी महिसाळकरांचेबरोबर आले त्या वेळी दोन प्रहर दिवस आलेला होता. सूर्यकिरणांचा मारा असह्य होत होता. श्रीगुरुवर ताराबाईस म्हणाले, "लवकर जेवण दे." त्यावर ताराबाई म्हणाली, "ब्राह्मण दिसता, तेव्हा शूद्रान्न कसे खायचे? तुम्हांला शिधा, सामान देईन; तुम्ही शिजवून खावा." श्रीकृष्ण म्हणाले, "हिला संशय आहे, पण तो सगळा दूर होईल" असे म्हणून ते महिसाळकरांचा हात धरून तत्काळ घरी परत आले आणि जेवणखाण आटोपून सुखाने मार्ग क्रमू लागले. अशा प्रकारे गुरूंनी करवीरनगरी सोडली.

एके दिवशी ताराबाई वाडीक्षेत्रास जाण्यासाठी निघाली. यथाप्रकारे देवदर्शन घेऊन व आपल्या शक्तीनुसार अन्नदान करून नंतर श्रीगुरुस्तोत्र गाऊ लागली. ती म्हणाली, "देवा, दिवसेंदिवस मनस्ताप फारच वाढत आहे. आता या शरीरात काही अर्थ नाही. तेव्हा एकदा पैलतीरी पोचव." यावर श्रीपादयती स्वप्नात आले व म्हणाले, "आम्ही स्वतः सिद्धान्न मागत असता तुला का भ्रांत पडली? तू असे कसे केलेस-? तुला चिंता कशाची पडली होती? आज तुझी व्यथा संपली. त्यामुळे आता येथे येऊ नको. घरीच श्रीकृष्णनाथाला आणून त्याच्या सेवेशी एकनिष्ठ व्हावे. तू त्वरित महिसाळ गावी गेल्यास तुला तेथे श्रीगुरु भेटतील. गेलेला क्षण पुन्हा येणार नाही. गुरूला घेऊन ये व या लोकी सौख्यसाधनाचा लाभ घे." ताराबाई जागी झाली. ती लगेच करवीरी आली व घोड्याचा रथ बरोबर घेऊन विलंब न करता गुरूकडे गेली.

महिसाळकरांच्या घरी येऊन गुरुमाऊलीला साष्टांग वंदन केले व म्हणाली, "हे करुणाघन गुरुराया, तू घरी चालून आला असताना देखील मी तुला ओळखले नाही. मी किती हीन स्त्री आहे व कसल्या मायेला भुलले होते कोण जाणे की, तुला ओळखले नाही. तरी हा अन्याय पोटी घालून श्रीगुरुराया घरी चलावे." तिचा हात धरून श्रीकृष्ण म्हणाले, "रथ तयार कर" ते ऐकून तिला फार आनंद झाला व ती म्हणाली, "मी कृतकृत्य झाले." परंतु महिसाळकराला फार दुःख झाले. चरणावर मस्तक ठेवून तो विनवू लागला, "किती विचित्र कर्माची गती आहे की, मला फारच थोडा संगतिसुखाचा लाभ मिळाला. सुखदुःखाच्या साठ्याचा हा देह केवळ क्षणभंगुर आहे. म्हणून तुमचा आधार धरला होता. परंतु तो आशेचा अंकुर सुकला." श्रीगुरू म्हणाले, "पुरे, पुरे. रोज हिच्या मंदिरी ये व मनात पूर्ण भावना ठेव. मग आम्ही कधीही दूर जाणार नाही." श्रीगुरुराज रथात स्थानापन्न झाले. बाई म्हणाली, "मी आज धन्य झाले. माझे शरीर श्रीगुरु-संगतीचे औषध मिळताच निरोगी झाले. अनन्य भावाने मी याची सेवा करीन. माझा मुलगा शिष्य होईल. हे सारे रहस्य मी त्याला शिकवीन. श्रीगुरुसेवा हाच एक उद्योग. यापेक्षा उत्तम साधन नाही. तोच योगक्षेम चालवील. आता हृदयाचा सारा भ्रम नाहीसा झाला."

अशा तऱ्हेचा विचार करीत ती सायंकाळी घरी आली. पलंगावर बैठक घालून त्यावर श्रीगुरुरायाला बसविले बाईला श्रीगुरूंची सेवा करण्याचे व्यसनच लागले व सेवा करणे आवडू लागले. याप्रमाणे श्रीगुरूंनी ताराबाईच्या घरी २५ ते ३० वर्षेपर्यंत वास्तव्य केले. या अवधीत कृष्णा लाड, ऐतवडयाचे देवगोंडा, कामलचे हरिपंत, मिरजेचे मल्लभट जोशी, सिदनेर्लीकर, वासुदेव दळवी, दादा पंडित, व्यास शास्त्री, रामभाऊ पुजारी, नामदेव चव्हाण, वालकृष्ण राशिवडेकर वगैरे बरीच मंडळी महाराजाची परमभक्त बनली व त्याची सेवा करू लागली मध्यंतरीच्या काळात एकादोघानी श्रीगुरूना ताराबाईच्या घरातून काढून दुसरीकडे ठेवावे असा कट रचला, परंतु श्रीगुरूंनी त्याना स्वप्नात येऊन सांगितले की," ताराबाईनी श्रीहनुमानाची फार भक्ती केली आहे की, त्यामुळे श्रीहनुमान ताराबाईपुढे भक्तीमुळे जखडला गेला आहे व मी हनुमंताचा अंश असलेने येथे राहून तिच्या भक्तीच्या रुपयातील पंचवीस पैसे देखील देणे भागवले जात नाही." या दृष्टांतामुळे महाराजाना कुंभारगल्लीतील ताराबाईच्या घरातून हलविण्याचा विचार त्या लोकानी रद्द केला

महाराजानी पंचवीस-तीस वर्षाच्या अवधीत बऱ्याच लीला जगताला व भक्ताना दाखवून चकित केले त्याचे चरित्र 'श्रीकृष्णविजय-चरित्र' नावाचे एक पुस्तक प्राकृत भाषेत श्री मुजुमदार यानी तीस अध्यायात ओवीबद्ध केलेले आहे. महाराजाना बऱ्याच मदांध लोकानी त्रास दिला, पण त्यानादेखील स्वामींनी चमत्कार दाखवून दिला व श्रीगुरू याच्याही कसोटीला उतरले. महाराज असेतोपर्यंत परमपूज्य ताराबाईनी त्याची मनोभावे सेवा केली रोज काकडआरती, धूपारती, शेजारती अशा आरत्या करायच्या, भोजन झाल्यावर सुवासिक विडा वगैरे सारे सोहाळे व्यवस्थित करीत असत.

श्रीगुरु शके अठराशे बावीस या वर्षी श्रावण वद्य दशमी या दिवशी नश्वर देहाचा त्याग करून कुंभारगल्लीत समाधिस्त झाले. सदर गल्लीला सध्या श्रीदत्तमहाराज गल्ली असे नाव आहे. या समाधीचा पत्ता 'श्रीदत्त मंदिर, १४७ डी वॉर्ड, कोल्हापूर' असा आहे सदरची समाधी अद्यापी वरील रस्त्यावर पहावयास मिळते. श्रीगुरूनी समाधी घेतल्यानतरही बऱ्याच भक्ताना दृष्टान्त दिलेला आहे व देत आहेत

— बा. रा. शिर्के

# ३२. वामनराव वैद्य बामोरीकर

(सन१८४८–१९०१)

हे यजुर्वेदी ब्राह्मण. शिक्षण बामोरी व धुळे येथे; अनेक सत्पुरुषाच्या सहवासात आले. परंतु नि:शंक समाधान पूर्ण दत्तावतारी अक्कलकोट-स्वामी समर्थांच्या कृपाप्रसादाने झाले. स्वामी समर्थांनी पयोनदी संगमावर त्याना 'ब्रह्मनिष्ठ होशील बाळा । न भिणे कळि–काळा' असा आशीर्वाद व मंत्रोपदेश देऊन त्याचे जीवन कृतार्थ केले. (दि.१७–१२–१८६३) परिणामस्वरूपी ते 'ब्रह्मनिष्ठ' म्हणून शिष्यास ज्ञात आहेत. दि. २७–४–१८७६ रोजी असाध्य रोगाने जर्जर झालेले वामनबुवा बडोदे येथील सुरसागरावर आत्महत्या करण्यासाठी गेले असता परमकृपाळू भक्तवत्सल श्रीस्वामी समर्थांनी तेथे प्रगट होऊन वामनबुवाना स्वहस्ते घरी आणून पोहो-चविले. त्या वेळी त्याच्या मातोश्री अहिल्याबाई व वधू वेणीमाधव हृयानाही श्रीस्वामी समर्थांच्या दर्शनाचा लाभ घडला आणि ते कृतार्थ झाले

ब्रह्मचर्यपूर्ण जीवन, साधेपणा, सत्यप्रीती, नियमितपणा, स्वकार्य आणि श्रीस्वामी समर्थ-चरणी असीम श्रद्धा व प्रेमभाव हे त्याचे व्यक्ति-विशेष.

त्यांनी श्रीस्वामी समर्थांचे ओवीबद्ध चरित्र वर्णन करणारा पंचावन्न अध्यायाचा सुमारे दहा हजार ओव्यांचा 'श्रीगुरुलीलामृत' नावाचा अलौकिक ग्रंथ लिहिला आहे. ह्यात व्याकरण, न्याय, वेदांत, वैद्यक, ज्योतिष वगैरे शास्त्रांची सविस्तर चर्चा आहे, तसेच 'प्रपंचात परमार्थ कसा साधता येईल' याची शिकवण साध्या, सोप्या, शैलीदार भाषेत कर्तृत्वाहंकाररहित होऊन दिली आहे. याचा परिचय पूर्वीच करून घेतला आहे.

या अलौकिक ग्रंथांच्या लेखनानंतर दि. २५-३-१९०१ रोजी सन्यास ग्रहण करून 'अद्वैतानंद' नाम धारण करून हे समाधिस्थ झाले. ह्यांची समाधी बडोदे येथे प्रतापनगर रोडवरील ऋणमुक्तेश्वर महादेवाच्या मागचे बाजूस असलेल्या इदगा मैदानाच्या उत्तरेस आहे. ब्रह्मनिष्ठ वामनबुवाना श्रीस्वामी समर्थांनी स्वहस्ते दिलेल्या चरणपादुका, दत्तमूर्ती, महावस्त्र (छाटी), पंचायतन वगैरे श्रीदत्तमंदिर, स्वामी विवेकानंद-मार्ग, बडोदे येथे आहेत.

— भा. शं. पट्टणकर

# ३३. पंतमहाराज बाळेकुंद्रीकर

(सन १८५५-१९०५)

बेळगावच्या पूर्वेस सुमारे आठ मैलावर बेळगाव-कलादगी रस्त्यावर पूर्वीच्या सांगली संस्थानापैकी बाळेकुंद्री-बुद्रुक या नावाचे एक खेडे आहे. हा गाव त्या वेळच्या सदर्न मराठा रेल्वे स्टेशन सुळेभावीपासून दोन मैलावर आहे. या गावी एक पुरातन श्रीरामेश्वराचे जागृत देवस्थान आहे. येथे दोन चार तलाव असून, अजमासे पाच सात फूट खोलीवर मुबलक अमृततुल्य पाणी लागत असल्याने, या गावी गुप्त गंगा आहे अशी आख्यायिका आहे. या गावी



रामाजीपंत म्हणून एक ऋग्वेदी भारद्वाजगोत्री देशस्थ ब्राह्मण रहात असत. त्यांचे कुलदैवत अंबाबाई असून आराध्य-दैवत श्रीदत्तात्रेय होते. हे या गावचे वतनदार कुलकर्णी असून श्रीमंत पेशवे सरकारच्या लष्करात एक लहानसे हुद्देदार होते. याचा शेवट स्वामीकार्यार्थ लढाईत झाला, त्या वेळी त्यांचे पोटी बाळकृष्ण या नावाचा एकुलता एक मुलगा फक्त सहा महिन्याचा होता.

बाळकृष्णपंत वयात आल्यावर त्यांनीही वडिलाप्रमाणे कीर्ती संपादिली. हे शरीराने भव्य असून करारी बाण्याचे व व्यवहारदक्ष होते. वृद्धापकाळी चतुर्थाश्रम घेऊन, आपल्या वयाच्या ९० व्या वर्षी आषाढ वद्य त्रयोदशी शके १८१६ (३०-७-९४) सोमवारी ते समाधिस्थ झाले. त्यांची समाधी बाळेकुंद्री येथे त्यांच्या राहत्या घराच्या परसात आहे. बाळकृष्णपंतांच्या पोटी रामचंद्रपंत, देवजीपंत, जिवाजीपंत व चिंतोपंत असे चार पुत्र झाले. हे सर्व वडिलांप्रमाणे करारी बाण्याचे, सात्त्विक वृत्तीचे व ईश्वरनिष्ठ होते. रामचंद्रपंत यांचा विवाह बेळगाव जिल्ह्यातील दड्डी येथील कुलकर्णी नरसिंहपंत याची कन्या गोदूबाई (सीताबाई) यांच्याशी झाला. या सत्वशील दंपत्याच्या पोटी सहा मुलगे (दत्तात्रेय, गोविंद, गोपाळ, वामन, नरसिंह व शंकर) व सहा मुली (अंबा, गंगा, यमुना, तुंगा तुळसा व अहल्या) अशी अपत्ये झाली. त्यांत दत्तोपंत हे ज्येष्ठ होत व हेच पुढे 'श्रीपंतमहाराज' या नावाने प्रसिद्धीस आले.

श्रीपंतांचा जन्म दड्डी येथे मातुलगृही श्रावण वद्य ८ सोमवार शके १७७७ म्हणजे तारीख ३ सप्टेंबर १८५५ इसवी रोजी, दिवसा तिसरे प्रहरी रोहिणी नक्षत्रावर झाला. यांचे बालपण बहुतेक मातुलगृहीच गेले. यांचे मातुल श्रीपाद[illegible] यानी त्यांचे पालनपोषण पोटच्या मोठ्या प्रेमाने करून, तेथेच त्या[illegible] अभ्यास करविला. श्रीपंत आपल[illegible]

चवदाव्या वर्षी बेळगावास इंग्रजी शिकण्यासाठी येऊन राहिले त्या वेळी त्यांची घरची स्थिती फारच खालावलेली असल्याने त्यांना विद्याभ्यासाच्या कामी फारच कष्ट सोसावे लागले तरी ते सहनशील व दृढनिश्चयी असल्याने, त्यांनी सर्व प्रकारचे हाल मोठ्या धैर्याने व शांतपणाने सहन करून, आपला अभ्यास चालू ठेविला, व इंग्रजी पब्लिक सर्व्हिस व मॅट्रिक्युलेशन परीक्षा ते पास झाले यानंतर त्यांनी बेळगाव येथील एका इंग्रजी शाळेत शिक्षकाची नोकरी धरिली व क्रमाक्रमाने आपल्या बंधुवर्गास आपल्याजवळ ठेऊन घेऊन शिक्षण देण्यास आरंभ केला

त्यांचे मातुल श्रीपादपंत यांची द्वितीय कन्या यमुनाबाई (लक्ष्मीबाई) हिच्याबरोबर यांचा विवाह वैशाख वद्य १ शके १८०४ (ता ४ ५-८२) दिवशी झाला पुढे काही वर्षांनी म्हणजे वैशाख वद्य चतुर्थी शके १८०७ (३-५-८५) रविवारी श्रीपतांचे वडील रामचंद्रपंत हे वारले व प्रपंचाचा सर्व बोजा श्रीपतांवर पडला तथापि न डगमगता श्रीपतांनी आपणास मिळत असलेल्या थोड्या पगारावर गरीबीने प्रपंच चालवून आप्त, इष्ट, स्नेही इत्यादिकांची मुले आपल्याजवळ ठेऊन घेऊन त्यांचे शिक्षण चालविले ते गोरगरिबांच्या मुलांसही शिक्षणाचे कामी मदत करीत असत मुलांच्या शिक्षणाकडे त्यांचे जितके लक्ष असे, तितकेच किंबहुना जास्त त्यांची नीतिमत्ता, नियमितपणा व सद्वर्तन याकडे असे म्हणून त्यांच्या देखरेखीखाली ज्यांना ज्यांना म्हणून शिक्षण मिळाले, ते सर्व बहुतेक चांगलेच निपजले

सन १८९० पासून श्रीपतांचे एक बंधू प्रपंचास हातभार लावू लागले, व यानंतर श्रीपतांचा प्रपंच सुखाने चालला त्यांची पत्नी कुलीन, सुशील व सुस्वभावाची व बंधू आज्ञाधारक व वर्तेसवर्ते असे असल्याने त्यांना प्रपंचात कोणत्याही प्रकारची कमतरता वाटली नाही. या वेळचा त्यांचा नित्यक्रम म्हटला म्हणजे शाळेतून घरी आल्यानंतर भेटीस येतील त्यांच्याबरोबर वेदांतचर्चा चालविणे व रात्रौ सद्गुरुभजनानंदात निमग्न असणे हा होय याप्रमाणे सन १९०३ पर्यंत नोकरी करून त्यांनी आपले कामाचा राजीनामा दिला व शेवटची दोन वर्षे शांतपणाने आत्मचिंतनात घालविली

पुढे फाल्गुन वद्य सप्तमी शके १८२५ (८-३-१९०४) मंगळवारी श्रीपतांचे कुटुंब निवर्तले, त्या वेळी "अनुभव पूर्ण व्हावा म्हणून मला लग्न करून घेण्यास गुरूंनी आज्ञा केली, आता त्यांनीच सोडविले" असे त्यांनी उद्गार काढिले यावरून व त्या सुमारास झालेले पद नंबर २५६७ यावरून त्यांची प्रपंचाविषयी दृष्टी कशी होती हे दिसून येते अन्नदान हेच गृहस्थाश्रमीचे मुख्य कर्तव्य आहे, असे ते म्हणत, व त्याप्रमाणे त्यांच्या घरी येणारा अतिथी कधीही विन्मुख जात नसे त्यांची रहाणी अगदी साधी असून ते प्रेमळ व निःस्पृह होते त्यांनी आपल्या प्रेमाने व सौजन्याने संसार प्रेममय बनवून, आपले अवतारकाज संपताच वयाच्या ५१ व्या वर्षी आश्विन वद्य ३ शके १८२७ (१६-१०-०५) सोमवारी अरुणोदयास बेळगाव मुक्कामी आपला देह ठेविला तेथून त्यांचा देह त्यांच्या हजारो शिष्यांनी मोठ्या समारंभाने बाळेकुंद्रीस नेऊन तेथील त्यांच्या आमराईत अग्निनारायणास अर्पण केला त्या ठिकाणी एक औदुंबर वृक्ष लाविला असून, त्याच्या सभोवती षट्कोनी पार बांधिला आहे व जवळच, विहीर, धर्मशाळा, फुलबाग वगैरे तयार केली आहेत शिवाय खुद्द श्रीपतांच्या परसात त्यांच्या आजाच्या समाधीशेजारी, त्यांच्या स्मरणार्थ एक लहानसे देवालय बांधून त्यात दत्ताच्या पादुका स्थापन केल्या आहेत तेथे व आमराईत भाविक लोक नित्य भजनपूजन करीत असतात

येथवर श्रीपताचा संक्षिप्त जीवनवृत्तांत दिला आहे आता त्यांना परमार्थाकडे ओढा कसा लागला, त्यास सद्गुरुप्राप्ती कशी झाली, वगैरे-बद्दलची थोडी हकिकत देतो

श्रीपतांचे मातृकुळातील सगळी माणसे फार कोमल अंतःकरणाची, धर्मशील व आस्तिक्य-बुद्धीची अशी होती व पितृकुलातील पुरुष सत्य-प्रतिज्ञ, ईश्वरनिष्ठ व अढळ सात्त्विक धैर्याचे असून श्रीदत्ताचे निःसीम भक्त होते. उभय कुळींचे उच्च गुण श्रीपतांचे ठिकाणी जन्मत.च एकवटले. मातुलगृही लहानपणापासूनच देवभक्ती, सन्मार्ग-प्रीती, दुर्जनाचा तिरस्कार, सज्जनाचा आदर, नीतीची योग्यता, सत्याचा जय वगैरे गोष्टींची अनेक पुराणांतील उदाहरणे देऊन माहिती करून दिली. श्रीपतास लहानपणापासून पुराणकथा ऐकण्याचा नाद असे. यामुळे त्यांच्या नैसर्गिक सात्त्विक वृत्तीला पोषण मिळाले दड्डी हा गाव घटप्रभा नदीच्या काठी वसला असून, त्याच्या आसपास उंच डोंगर व दाट जंगल आहे. यामुळे सृष्टिदेवीचे ते एक क्रीडास्थानच बनले आहे. श्रीपतांना नदीकाठी व जंगलात हिंडणे फार आवडत असे त्यायोगे त्यांच्या लहान वयात त्यांना निसर्गदेवतेचा सहवास घडून, त्यांची कल्पनाशक्ती वाढली व उदात्त विचारांचे बाळकडू अनायासे मिळाले बेळगावी शिकण्याकरिता आल्यानंतर त्यांच्या वडिलांनी त्यांजकडून, श्रीगुरुचरित्र व दत्तमाहात्म्य वगैरे ग्रंथ वाचवून, अनन्यभक्तीचे महत्त्व व तिचा सुखकर परिणाम उत्तम रीतीने समजावून दिला तेव्हापासून श्रीदत्तावर श्रीपतांची दृढ भक्ती बसली अशा प्रकारे लहान-पणापासूनच पारमार्थिक विषयात त्यांचे मन रमू लागले, तत्त्वज्ञानाकडे ओढा लागला व क्रमाक्रमाने सर्व प्रकारे परिपूर्ण असे मुमुक्षुत्व अंगी बाणले.

बेळगाव जिल्ह्यापैकी खानापूर तालुक्यात मलप्रभातटाकी पार्श्वाड या नावाचा एक गाव आहे तेथील कुलकर्णी घराण्यातील बाळप्पा या नावाचे शुद्धाद्वैतमार्गी महायोगी सर्वसंग-परित्याग करून वाळेकुंद्रीजवळ असलेल्या कर्डी-गुट्टीच्या डोंगरात येऊन राहिले होते. या महापुरुषास श्रीपतांनी आपल्या पदांत श्रीबाल-मुकुंद किंवा बालावधूत असे म्हटले आहे त्यांनी श्रीपतांचे मावसबंधू गणपतराव व चुलते चिंतोपंत यांजवर अनुग्रह केला होता, व त्यांच्याच योगाने श्रीपतास त्या सत्पुरुषाची गाठ पडली, व त्यांनी शके १९९७ आश्विन वद्य १२ च्या दिवशी श्रीपतां-वर अनुग्रह केला. पुढे श्रीपतांची सत्पात्रता पाहून, आपला संप्रदाय चालविण्यास आज्ञा देऊन, आपण श्रीमल्लिकार्जुनास जातो म्हणून जे गेले, ते परत आले नाहीत.

अनुग्रह झाल्यानंतर श्रीपतांनी काही काळ योगसाधनात घालविला नंतर ते आपला विश्रांतीचा वेळ आध्यात्मिक ग्रंथांचे परिशीलन करण्यात व वेदांतचर्चा करण्यात घालवीत असत. त्यांना मराठी, कानडी, इंग्रजी, हिन्दुस्थानी, संस्कृत वगैरे भाषा चांगल्या अवगत असून अभिरुची फार असल्यामुळे, त्यांनी वरील भाषांतील बहुतेक आध्यात्मिक व तत्त्वज्ञान-विषयक प्राचीन व अर्वाचीन ग्रंथांचे परिशीलन केले होते म्हणून कोणीही कोणत्याही बुद्धीने कसाही प्रश्न केला तरी, ते समर्पक असे अनेक तऱ्हेचे दृष्टांत देऊन, त्यांचे शांतपणाने पूर्ण समाधान करीत, यामुळे दूरदूरचे शास्त्री, पंडित वगैरे लोकांचा जमाव नेहमी त्यांच्या जवळ असे त्यांचा शिष्यसमुदाय मोठा व बहुतेक ज्ञातींचा असून सर्वांवर त्यांची सारखीच प्रीती होती हे परम शांत असून बोलल्याप्रमाणे चालत होते ते अद्वैतसिद्धांत सांगत, व त्याप्रमाणे आपल्या वर्तनात भेद करीत नसत पूर्वापार चालत आलेले श्रीगुरुद्वादशी, दत्तजयंती, गुरु-प्रतिपदा, हे उत्सव मोठ्या थाटाने व उत्साहाने करीत असत, शिवाय अलीकडे श्रीगोकुळ-

अष्टमीचा उत्सवही करीत असत त्याप्रमाणे त्याच्या पश्चातही हे उत्सव चालू आहेत.

श्रीपताच्या कविता 'श्रीदत्तप्रेमलहरी' नावाच्या ग्रथात समाविष्ट आहेत श्रीपतास भजनाची गोडी फार असे व ते नेहमी श्रीदत्ताचे भजन करीत असत त्या वेळी उत्सवप्रसगी सहज स्फूर्तीने त्याच्या मुखातून जी पदे निघत, ती कोणी तरी टिपून ठेवीत, म्हणूनच अशा शुद्ध अत करणरूपी प्रेमोदधीतून सहजी निघालेल्या पदरूपी लहरीला 'श्रीदत्तप्रेमलहरी' असे नाव दिले आहे

श्रीपताच्या पदात स्वरूपवर्णन, कोठे श्रीत्रैमूर्ती दत्तात्रेयाचे, तर कोठे श्रीसद्गुरूचे आहे तरी श्रीपताना श्रीदत्तात्रेय व श्रीसद्गुरू हे यत्किंचितही भिन्न दिसले नाहीत, हें (पद नबर १६२४ व २४१२) यावरून व दुसऱ्या पदावरूनही दिसून येईल जागोजाग त्यानी "सद्गुरुवीण दैवत नाही, कल्पित देवा पुजू नको" असा उपदेश केलेला आढळतो. सद्गुरूइतकी जगात त्याना कोणतीच वस्तू प्रिय नव्हती. सद्गुरूच्या ठायी त्याच्यासारखी दृढ निष्ठा व गाढ प्रेम क्वचितच आढळतील "सद्गुरूच सर्वेश्वर, सद्गुरुपायीच दृढ प्रीती, सद्गुरुपदीच जगणे, सद्गुरुपदी सर्वस्व अर्पण, सद्गुरूच प्रेमळ माय, सद्गुरुसेवाच स्वधर्म, सद्गुरुस्वरूपीच समरस होणे" असे त्याचे उद्गार पदातून ठिकठिकाणी आढळून येतात त्याना ज्या स्वरूपाचा ईशसाक्षात्कार होई, त्याचे वर्णन ते करीत असत प्रेमभरित अत करणाने ते भजन करीत असता एके वेळी त्याना सद्गुरूचा साक्षात्कार झाला, तो त्यानी "दिव्य सद्गुरु दत्तमूर्ति देखुनी डोळेभरी" (पद नबर १९४४) या पद्यरूपाने प्रगट केला आहे.

करुणापर पदे प्रेमाने नुसती ओथवली आहेत. काही ठिकाणी करुणा भाकिली आहे, कोठे उपकारस्मरण आहे, कोठे धन्यवाद गाइला आहे, कोठे विनोद, तर कोठे सलगीचे भाषण आहे काही पदे इतकी हृदयद्रावक आहेत की, ती वाचताना वाचणाऱ्याचे नेत्र अश्रुपूर्ण झाल्याखेरीज राहणार नाहीत! उदाहरणार्थ पद २१ पहा यात शेवटी जेव्हा निर्वाण झाला, तेव्हा गुरुमाय भेटली, अशी हकीकत आहे सलगीचे उदाहरण "मत्सरी किती तू दत्ता॥" (पद १६८३). उपदेशपर पदातून सर्वत्र अद्वैत मत स्थापन केले आहे ते जसे सगुण तसेच निर्गुण ब्रह्मोपासक, व जसे परम भगवद्भक्त, तसेच अद्वैतमतवादी होते. द्वैत, विशिष्टाद्वैत व अद्वैत ही तिन्ही वास्तविक भिन्न नसून, त्याचे पर्यवसान एकच आहे, असा त्याचा लोकास बोध असे हे त्याचे मत पद १६९० "द्वैत दिसूनी अद्वैतासी हानि किमपि नाही" तसेच "एकत्वी न भोग म्हणुनी द्वैत जाहले" (पद २४३१) त्याचप्रमाणे "वाङ्मानसासी वारुनि निजशाति भोगिली" (पद १४६५) यावरून दिसून येते वस्तुत ही तीन भिन्न मते निव्वळ बाह्यदृष्टीने पाहणाऱ्यात आढळतात खऱ्या भगवद्भक्ताच्या गावी त्याचा वाराही नसतो तुकारामाप्रमाणे काही पदातून ढोंगी लोकावर कोरडे ओढलेले आढळतात कर्म, उपासना ही कोणत्या दृष्टीने करावीत, याबद्दल काही ठिकाणी उपदेश केलेला आहे "सद्गुरुकृपे ब्राह्मण होता सध्या केली ऐका" (पद १५६) इतर ठिकाणी "घडीघडी काळ गिळतो तुजला" (६०६) असा इशारा देऊन सद्गुरूस शरण जाण्यास कळकळीने सागितले आहे

अनुभवपर पदात कोठे योगाचा अनुभव, कोठे आत्मसाक्षात्कार, व कोठे श्रुतिवचनाचा अनुभव हीही आढळतात श्रीपत जरी योगशास्त्र पूर्णपणे जाणत होते, तरी भक्ती व ज्ञान याच्यापुढे योगास त्यानी कधीही महत्त्व दिले नाही, म्हणून पदात त्याजबद्दल फारसा उल्लेख नाही, "शुन्य

धारा निशिता दुरत्यया" (१७६७) यात श्रुति-वचनाचा अनुभवपर अर्थ सांगितला आहे. बऱ्याच ठिकाणी गुरुप्रेमातिशयाचे अनुभव आहेत. "गुरुसवे धरिली आजी कुस्ती रे"(पद ४०८)

श्रीपंताचे समग्र वाङमय आज निष्ठावंत दत्तोपासकांना उपलब्ध आहे. श्रीदत्तप्रेमलहरी-भजनगाथा, भक्तातापं, बाळबोधामृतसार, प्रेम-तरंग, श्रीबालमुकुंद बोधानंदगुटिका, आत्म-ज्योती, परमानुभवप्रकाश, अनुभववल्ली (भाग १ व २), ब्रह्मोपदेश, स्फुटलेख, श्रीदत्तप्रेमलहरी पुष्प ७ व ८, पंतांची पत्रे, भक्तोद्‌गार किंवा प्रेमभेट इत्यादी पंतवाङ्मय दत्तप्रेमिकांना मार्ग-दर्शक व प्रेरक होणारे आहे.

## ३४ वासुदेवानंदसरस्वती
### (सन १८५४–१९१४)

कोकण प्रांती पूर्वीच्या सावंतवाडी संस्थान-नजीक माणगाव नावाच्या एका खेडेगावात गणेशभट्ट टेंब्ये नावाचे एक अग्निहोत्री कऱ्हाडे जातीचे ब्राह्मण गृहस्थ राहत असत. त्यांच्या पत्नीचे नावरमाबाई होते. ही उभयता पतिपत्नी श्रीदत्तोपासक होती. गणेशभट्ट गाणगापुरी श्रीदत्ताची उपासना करीत असता वैराग्य उत्पन्न होऊन त्यांनी संन्यास घेण्याचा विचार केला. त्या वेळी त्यांना दृष्टांत होऊन प्रथम घरी जाऊन गृहस्थाश्रम पुरा करण्याबद्दल श्रीदत्ताची आज्ञा झाली त्याप्रमाणे ते पुन्हा घरी आले. काही कालानंतर त्यांच्या उपासनेवर संतुष्ट होऊन स्वतः श्रीदत्तभगवान गर्भरूपाने रमाबाईंच्या पोटी अवतीर्ण झाले, असे म्हणतात. शके १७७६ आनंदनाम संवत्सरी श्रावण वद्य ५ या दिवशी सूर्योदयानंतर घटी २६ या वेळी रमाबाईंना पुत्ररत्न झाले; तेच या चरित्राचे नायक होत.

'शुद्धबीजापोटी । फळे रसाळ गोमटी ॥' या तुकारामाच्या उक्तीप्रमाणे गणेशभट्ट व रमाबाई यांसारख्या भाविक उपासकांच्या पोटी वासुदेवासारखे रत्न निपजणे हे स्वाभाविक होय हे पूर्वजन्मीचे सूर्योपासक होते, असे पुढे त्यांच्या बोलण्यावरून कळून आले.

श्रीवासुदेवानंदांचे बालपणचे नाव वासुदेव हेच होते. वासुदेव पाच वर्षांचा झाल्यावर त्यांचे पितामह हरिभट्ट यांनी त्यांच्या शिक्षणास आरंभ केला. त्यांची बुद्धी लहानपणापासून फार तीव्र होती. ते एकपाठी होते. आठव्या वर्षी व्रतबंध-संस्कार होऊन बाराव्या वर्षीच त्यांचे ऋग्वेद-संहितादिकांचे अध्ययन झाले होते. अध्ययनाच्या वेळी ते नेहमी सोवळ्याने राहात असत. त्यांनी रघूचे १।२ सर्ग म्हटले होते आणि पाचसहा महिने ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला होता. त्यांचे शिक्षण म्हटल्यास एवढेच. एवढ्या लहान वयातच ते मंत्रप्रयोगाचे चमत्कार करू लागले होते. परोपकारबुद्धी, अतिथींबद्दल पूज्यभाव इत्यादी सद्‌गुण त्यांच्या अंगी लहानपणापासून वसत होते. तसेच लहानपणापासूनच ते विरक्त होते. वयाच्या आठव्या वर्षापासून त्रिकाल स्नानसंध्या करावयाची, नेहमी पायाने प्रवास करावयाचा, छत्री, जोडा, खडावा वगैरे काही वापरावयाचे नाही; इत्यादी नियमानुसार ते वागत असत. तसेच त्यांनी विधिपुरःसर चांद्रायणव्रत पाळून गायत्री पुरश्चरण केले.

शके १७९७ साली अर्थात् त्यांच्या वयाच्या २१ व्या वर्षी त्यांचा विवाह सावंतवाडीचे बाबाजीपंत गोडे यांच्या कन्येबरोबर झाला. त्यांच्या पत्नीचे नाव अन्नपूर्णाबाई होते. त्या स्वभावाने अत्यंत सुशील असून पतीची एकनिष्ठ-पणे सेवा करीत असत. पुढे एके समयी पत्नीच्या विनंतीवरून त्यांनी तिला स्त्रीधर्माचा उपदेश केला आहे, तो सर्वांनी अवश्य वाचण्यासारखा आहे. स्त्रीधर्म सांगण्याच्या मिषाने त्यांनी साऱ्या नित्यनैमित्तिक आचारधर्मावर व्याख्यान केले आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. श्री. गांडाबुवा

ब्रह्मचारी यानी श्रीवासुदेवानंदसरस्वतीचे चरित्र लिहिले आहे, त्यात ते संग्रहित केले आहे. श्रीदत्तगुरूंनी आपल्या मातोश्रीस उपदेश केला, तसा वासुदेवशास्त्री यानी आपली आई रमाबाई यासही उपदेश केला. तसाच कांतोपदेश हाही एक नमुना आहे. अन्नपूर्णाबाई (शास्त्रीबोवाचे कुटुंब) याचा अधिकारही फार मोठा होता त्या जशा सुशील तशाच वैराग्यशील होत्या. त्याचा आध्यात्मिक दर्जाही फार श्रेष्ठ दर्जाचा होता. कोणतेही शिक्षण नसता व पूर्वाभ्यास नसता त्याची समाधी लागत असे. शास्त्रीबोवास पुढे एक मुलगाही झाला. पण तो लवकरच कालवश झाला या वेळीही त्याच्या कुटुंबास झालेला पुत्रशोक दूर करण्याकरता वासुदेवशास्त्री यानी आपल्या पत्नीस उपदेश केला, तोही गाडावा-विरचित चरित्रभाग वाचनीय आहे.

असो. मूळच्या वासुदेवाचे वासुदेवभटजी झाले. पुढे वासुदेवशास्त्री झाले व अखेर वासुदेवानंद-सरस्वती या नावाने त्यांची अक्षय्य कीर्ती राहिली. ह्या स्थित्यंतराचे मूळ कारण त्याच्या अंतरातील विरक्ती होय. त्याना प्रथम तीव्र विरक्ती उत्पन्न होण्याचे कारण असे सागतात की, त्याच्या मातुश्रीचा स्वभाव थोडा रागीट होता. एकदा श्रीगणेशचतुर्थीच्या दुसऱ्या दिवशी पूजेच्या साहित्यात निष्काळजीपणा आढळल्यामुळे ते आपल्या पत्नीस उद्देशून काही बोलले त्यावरून त्याच्या मातोश्रीना राग येऊन त्या अपशब्द बोलू लागल्या. त्यामुळे महाराजाचे चित्त अस्वस्थ होऊन पूजेकडे लक्ष लागेना. पाच दिवस गणपती ठेवण्याचा बेत रद्द करून त्यानी त्याच दिवशी त्याचे विसर्जन केले. 'न मातु: परदैवतम्' या धर्मोक्तिप्रमाणे योग्य ती काळजी घेऊन वागत असताही त्याचा व्हावा तसा उपयोग होत नाही, तेव्हा प्रपचात राहणे फार कठीण आहे, असे त्याच्या मनाने घेतले. शुद्ध भावाने ईश्वरचिंतन करणे, हेच खऱ्या सुखाचे साधन आहे, असे त्याना वाटू लागले. पूर्वपापाचे क्षालन होण्यासाठी त्या वेळी त्यानी चांद्रायण प्रायश्चित्तही घेतले. एके रात्री स्वप्नात एका ब्राह्मणाकडून त्याना नरसोबाच्या वाडीस येण्याबद्दल आदेश मिळाला. परंतु तेथे जाण्याला त्याचेजवळ वाटखर्चापुरतेही पैसे नव्हते. पण इतक्यात त्यानी एकाची जन्मपत्रिका करून दिली होती, त्याचे अडीच रुपये त्यास मिळाले ह्या-प्रमाणे घरातून बाहेर पडल्याबरोबर मार्गातील सर्व अडचणी हळूहळू दूर होऊन ते वाडीस जाऊन पोहोचले. यावेळी त्याचे वय २६।२७ वर्षांचे होते या वयात संसाराविषयी विरक्त असणारे पुरुष विरळाच.

वाडीस या वेळी श्रीमत गोविंदस्वामी नामक एक फार योग्यतेचे महात्मे होते. त्याचेकडून वासुदेवशास्त्री याची सर्व व्यवस्था झाली एके दिवशी त्यानी गोविंदस्वामीना मंत्रोपदेश देण्याबद्दल विनंती केली, पण तुम्हाला उपदेश करण्याचा माझा अधिकार नाही; ज्याना जरूर असेल ते तुम्हाला मंत्र देतील, असे गोविंद-स्वामींनी सांगितले. त्याच दिवशी रात्री मध्य-रात्रीच्या सुमारास कृष्णातीरी जाऊन हातपाय धुऊन थोडा जप करण्याचा विचार करून शास्त्री-बुवा तेथे आले. पण दार बंद असलेले पाहून देवानजिक वसणे चागले नाही, असा विचार करून प्रदक्षिणा घालण्यासाठी दक्षिण द्वारी जाताच भगवी वस्त्रे परिधान केलेली आहेत असा एक तेजस्वी पुरुष पाहून त्याला शास्त्री-बुवानी नमस्कार केला त्याना पाहून त्या पुरुषाने विचारले, 'तू कोण आहेस ? ह्या वेळी तू का आलास ? शयनारति झाल्यावर येथे कोणीही येऊ नये असा नियम आहे, हे तुला ठाऊक नाही काय ?' हे ऐकून शास्त्रीबुवा म्हणाले, 'महाराज, मी या स्थळी प्रथमच आलो आहे त्यामुळे मला येथील नियम माहीत नाहीत. अत पर येणार नाही' असे म्हणून नमस्कार केला, तोच ते स्वरूप नाहीसे झाले ! तेव्हा ते दत्तभगवानच

असले पाहिजेत, असे वाटून त्याना न ओळखल्या-बद्दल शास्त्रीबुवा फार खिन्न झाले ! व त्याच्या मनाला तळमळ लागून राहिली

नतर श्रीदत्ताला प्रार्थनापूर्वक नमस्कार करून ते परत मठात येऊन निजावयास गेले पहाटेच्या सुमारास त्याच्या स्वप्नात दत्तभगवानाची मूर्ती सन्या स्वरूपात प्रगट झाली ! व त्यानी शास्त्री-बुवाना पहिल्या भेटीची आठवण देऊन मनोपदेश केला मग दत्ताची पूजा व ध्यान करावे आणि उपनिषद्‌भाष्याचा विचार करावा, असा त्याचा दिनक्रम सुरू झाला यानतर महाराजाना वेळोवेळी श्रीदत्ताचे साक्षात्कार होत असत एकदा श्रीदत्तानी त्यास आज्ञा केली की योगावाचून सर्वज्ञता येत नाही यासाठी आता योगाभ्यास करून आत्मज्ञानाची प्राप्ती करून घे त्याकरिता एका ब्राह्मणाजवळील योगाचे पुस्तक घे, असे सागून या ब्राह्मणाचा पत्ताही सागितला वासुदेव शास्त्री यानी ते पुस्तक आणविले ते कबिराचे दोहऱ्याचे पुस्तक होते मनोपदेश झाल्यानतर लवकरच महाराज माणगावास परत आले व तेथे श्रीदत्तमूर्तीची स्थापना करून देवालय बाधून तेथेच भजन-पूजन करीत कालक्रमणा करू लागले ते शुष्क भिक्षेवर निर्वाह करीत, मीठ-मिरची, गूळ वगैरे कोणताही चविष्ट पदार्थ न घेता नुसत्या भाताचा ते देवाला नैवेद्य दाखवीत. स्वत च स्वयपाक करीत ! दीड वर्ष त्यानी मौनव्रत धारण केले होते यानतर सुमारे ७ वर्षे महाराज माणगावात होते त्या काळात दर्शना-साठी लोकाची ये जा सुरू असे येथे असताना त्यानी एक दिवस श्रीदत्ताला डोळे झाकून नैवेद्य दाखविला ते डोळे उघडतात तो वाटीत दूध नाही तेव्हा त्यानी नैवेद्य दाखविल्यावर घुमटीचे दार बद करून ठेवण्याची पद्धत ठेवली ते स्वत जेवण्यास बसत तेव्हा ते एकटे असले तर बधी बधी उदीर त्याच्या पानाजवळ येऊन भात खात असत. अरण्यात योगाभ्यासाकरता जात तेथे भयकर व्याघ्र व सर्प त्यास भेटत ! पण त्याना कोणापासून त्रास झाला नाही

हळूहळू त्या ठिकाणाला यात्रेचे स्वरूप येऊ लागले. तेथे लहानसा बाजार बसला त्या ठिकाणी असताना वासुदेवानद यानी आपल्या हाताने एक सहितेचा स्वाहाकार केला व रुद्रस्वाहाकारही दोन केले येथे त्यास ईश्वरी प्रेरणेने काव्यस्फूर्ती झाली व सस्कृत अध्ययन अगदीच बेताचे असताही श्रीदत्ताचे प्रेरणेने, हिंदुस्थानात चोहोकडे उपयोगी पडावे म्हणून, त्यानी गुरुचरित्राचे सस्कृतात रूपातर केले शके १८११ मध्ये महाराज माणगाव सोडून कायमचे वरघाटी गेले एके दिवशी सकाळी माणगाव सोडण्याबद्दल त्यास श्रीदत्ताची आज्ञा झाली. त्याप्रमाणे महाराज आपल्या पत्नीसह बरोबर श्रीदत्तमूर्ती, एक तांब्या, एक धोतर व एक लुगडे एवढ्याच वस्तू घेऊन तेथून निघाले

यानतर दोन वर्षांनी म्हणजे शके १८१३ या वर्षी गगाखेड मुक्कामी सौ अन्नपूर्णाबाईस देवाज्ञा झाली देवाचे विमान त्यास नेण्यास येणार असा दृष्टात चार दिवस अगोदरच झाला होता ! असे म्हणतात की, दोघेही त्याच वेळी जावयाची, पण मी चतुर्थाश्रम घेतल्याशिवाय येणार नाही, असा शास्त्रीबोवानी आग्रह धरल्यामुळे एकट्या अन्नपूर्णाबाईनी सौभाग्यवती स्त्रियाना वायने देऊन पतिचरणावर शातपणे मस्तक ठेवून हरहर गुरुदेवदत्त असे म्हणून प्राण सोडला ! त्यानतर तेराव्याच दिवशी महाराजानी सन्यासदीक्षा घेतली त्याच दिवशी रात्री गोविंदस्वामीच्या रूपाने येऊन श्रीदत्तानी महाराजाना प्रेष्योच्चार दिला व सागितले की, ' आजपासून तुमचे नाव वासुदेवानदसरस्वती ठेविले आहे आजपासून तुम्ही नित्य मधुकरी मागत जावे. '

महाराज अनेक चमत्कार करून दाखवीत असत त्यासबधी कित्येक गोष्टी प्रसिद्ध आहेत वेळोवेळी महाराजानी अमुक रीतीने वागावे

अशाबद्दल श्रीदत्ताची आज्ञा होत असे, व त्याप्रमाणे वर्तन न घडल्यास त्यानाही प्रायश्चित्त भोगावे लागत असे !

देहरक्षणाला ते फारसे महत्त्व देत नसत. ते आलीया भोगासी नेहमी सादर असत. क्षुल्लक सकटानीच आपण डळमळू लागलो, तर शतवृश्चिकदश झाल्याप्रमाणे वेदना होतात, अशा अतकाळी परमेश्वराचे स्मरण आपल्या हातून कसे घडेल ? असे ते म्हणत असत पूर्वेस राजमहेद्री, दक्षिणेस रामेश्वर, उत्तरेस काशी वगैरे पुष्कळ ठिकाणी त्याचे जाणे झाले होते. सर्व प्रवास ते पायीच करीत. त्याना एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जायला वेळच लागत नसे, असे सागतात. नवीन तन्हेने सुधारलेल्या मुबई-पुण्यासारख्या शहरात ते कधीच जात नसत.

उज्जयनी, ब्रह्मावर्त, हिमालयातील पहाडी मुलुख (बदरीकेदार, गगोत्री), हरिद्वार, पेटलाद, तिलकवाडा, द्वारका, चिखलदा, मेहतपूर, नरसी, वढवाणी, तजावर, मुक्त्याला, पवनी, हावनूर, कुरुगड्डी, गरुडेश्वर अशा ठिकाणी त्याचे चातुर्मास झालेले आहेत. यावरून त्याच्या सचाराचे क्षेत्र लक्षात येईल. माणगाव, वाडी, ब्रह्मावर्त, गरुडेश्वर येथे त्याचा मुक्काम जास्त दिवस होता. त्याचा सर्व प्रवास २ छाट्या, २ लगोट्या व एक कमडलू एवढ्याच साहित्याने होत असे. त्याची वृत्ती नेहमी विरक्तिपूर्ण व शात असे. अतकालापूर्वी काही दिवस ते गरुडेश्वरी राहात असत. त्याच ठिकाणी शके १८३६ आनद नाम सवत्सरी ज्येष्ठ वद्य अमावास्येस रात्री श्रीदत्ताच्या समोर उत्तराभिमुख बसून ते कैवल्यपदास गेले ! व नतर देह नर्मदेच्या प्रवाहात सोडून दिला !

त्याच्या अखेरच्या दुखण्याच्या वेळी त्यानी प्रकृती सुधारण्यासाठी काही औषध घ्यावे असे इतरानी त्याना सुचविले. पण ते स्वामीनी मनावर घेतले नाही. ते म्हणाले—" या शरीराला उत्पन्न होऊन साठ वर्षे तर झाली. आता यास ठेवून तरी काय करायचे आहे ! श्रीशकराचार्य भगवान स्वत. शकराचे अवतार असूनही बत्तीस वर्षेच राहिले. श्रीकृष्ण परमात्मा वैकुठासकट येऊन एकशे पस्तीस वर्षे राहिला. त्या मानाने हे शरीर फार राहिले बाबानो ! पूर्वी या शरीरास दोन वेळा सर्पदश, तीन वेळा कॉलरा, एक वेळ सन्निपात, दोन वेळ महाव्याधी व एकदा कोड इतके रोग झाले ! त्या वेळी औषध देण्यास कोण आले होते ? जन्मापासून ज्या वैद्याला मी शरण आलो आहे तोच पण ह्या वेळीही आहे." असे म्हणून भीष्माचार्य शरपजरी असताना शेवटी जे श्लोक बोलले होते, तेच श्लोक स्वामीनी बोलून दाखविले.

गरुडेश्वरी वासुदेवानदाच्या पादुका स्थापून मोठे देवालय बाधले आहे व तेथे नित्यनैमित्तिक पूजाअर्चा व उत्सव होत असतात. त्याचप्रमाणे सावतवाडी येथेही श्रीदत्तदास नारायण गोविद ठकिडवे प्रभृती साप्रदायिकाच्या खटपटीने श्रीवासुदेवालयात पूजाअर्चा, उत्सव सुरू असतात.

श्रीवासुदेवानद सरस्वतीच्या क्षेत्रमाहात्म्याचा सर्वांसच लाभ घेता येणार नाही. तरी त्याचे सस्कृत गुरुचरित्र, दत्तपुराण, मराठी दत्तमाहात्म्य, त्रिशती गुरुचरित्रकाव्य, कुमारशिक्षा इत्यादी ग्रथ, तसेच त्याची कित्येक स्तोत्रे व पदे ही सर्वांस सुलभ व पावनकारक होतील यात शका नाही. त्याचे दत्तपुराण हा तर एक आर्यसस्कृतीचा कोशच आहे योगीराज गुळवणी महाराजानी त्याचे सर्व वाड्मय प्रकाशित केले आहे.

—स कृ. फडके

## ३५. विष्णुदास माहुरकर

(सन १८४४–१९१८)

माहुरगडावरील श्रीरेणुकामातेने व श्रीदत्तात्रेयाने आजपर्यंत अनेकाची चित्ते स्वत.कडे आकर्षित करून घेतली आहेत. अनेकाची ही

देवी कुलस्वामिनी आहे. अनेकांना येथील श्रीदत्ताने वेध लावलेला आहे. परंतु या सर्वांत अधिक वेध या दोनही देवताचा लागला तो श्रीविष्णुदासाना. श्रीदत्त व श्रीरेणुका याचा साक्षात्कार श्रीविष्णुदासाना वारवार होत असे. विष्णुदासानी आपल्या रसाळ व प्रत्ययकारी कवितेत हे अलौकिक भेटीचे क्षण शब्दबद्ध करून ठेविलेले असल्यामुळे त्याचा स्वाद आजही चाखता येण्यासारखा आहे. श्रीमत्परमहस परिव्राजकाचार्य श्रीसद्गुरु पुरुषोत्तमानद सरस्वती ऊर्फ श्रीविष्णुदास महाराज असे त्याचे नाव असले, तरी सबध विदर्भ व मराठवाडा त्याना विष्णुकवी अथवा विष्णुदास याच नावाने ओळखतो शत्रूना भयानक वाटणारी देवी किती वत्सल व कनवाळू असू शकते हे विष्णुदासाच्या कवितेवरून प्रतीत होईल. विष्णुदासानी या जगन्मातेला आई म्हणून हाक मारावी व 'आले हु बाळ' म्हणून आईने साद द्यावी, असे या अलौकिक मायलेकराचे नाते होते.

या विष्णुदासानी प्रथम खडतर उपासना केली ती दत्तात्रेयाची. दत्त हे आणखी एक आधारस्थान त्याना प्रथमपासून वाटे. विष्णुदासाचा जन्म तसा या परिसरातील नाही. इकडे पुण्या-साताऱ्यासच त्याचे घराणे प्रसिद्ध होते. नगरजवळील धादरफळ या गावचे हे धादरफळे. नशीब काढण्यासाठी धादरफळे सातारा येथे आले. येथेच शके १७६६ मध्ये विष्णुदासाचा जन्म झाला. लहानपणापासून हरिभक्तीचा, सत्सगाचा, कीर्तन-प्रवचनाचा नाद याना विलक्षण प्रकारचा होता. हा नाद फारसा बळावू नये म्हणून त्याचे लग्न करून देण्यात आले. रहिमतपूर येथील सातपुते याच्या घराण्यातील राधाबाई ही विष्णुदासाची पत्नी त्याना प्रपचात मदत करू लागली परंतु विष्णुदासाचे मन प्रपचात रमेना त्याना नाद संतसगतीचा, तीर्थक्षेत्राचा, हरिभजनाचा. साताऱ्याजवळील त्रिपुटी नावाच्या क्षेत्रामधील पाडुरंगबुवा दगडे नावाच्या सत्पुरुषापासून विष्णुदासांनी गुरुमंत्र घेतला. दत्तात्रेयांची व आपली भेट व्हावी अशी भावना वारवार मनातून उसळ्या मारी. ससारात मन रमत नसे. शेवटी व्हायचे तेच झाले. घरातील सर्व मडळीचा लोभ सोडून विष्णुदास घरातून एका रात्री बाहेर पडले.



कुठे जायचे हे माहीत नव्हते. देव भेटावा, दत्तात्रेयानी पोटाशी धरावे, त्याच्याशी हितगुज करावे, हीच एक मोठी ओढ मनास होती. विष्णुदासानी लहानपणीच श्रीगुरुचरित्राची पारायणे केल्यामुळे गुरुकृपेच्या अकुरासाठी मनोभूमी तयार होती. दत्तभक्तीत तल्लीन होऊन सुरेल आवाजात ते पदे म्हणत असत. घरातून निघून जाण्यापूर्वीच कोल्हापूर व नरसोबावाडी या क्षेत्राचे दर्शन विष्णुदासाना झाले होते. याच क्षेत्रानी पुन. त्याना मौन निमत्रण दिले. कृष्णेचे स्नान, श्रीदत्तपादुकाचे दर्शन व गणेशशास्त्री कवीश्वर याचा यज्ञ याची आठवण याच्या मनास सतत होत असे. दत्ताच्या समोर बसून पदे व अष्टके म्हणण्यातील अवीट सुख त्याना पुन.पुनः अनुभवायचे होते. याच ओढीने श्रीविष्णुदासाची तीर्थयात्रा सुरू झाली. चिचणेर, रगनाथ महाराजाची निगडी, जयरामस्वामीचे वडगाव, पढरपूर, तुळजापूर, अक्कलकोट अशी गावे घेत घेत विष्णुदास दत्तात्रेयाच्या शोधार्थ निघाले. अक्कलकोट येथील श्रीस्वामी समर्थांचे दर्शनही त्यानी मनोभावे घेतले येथेच त्याना आज्ञा झाली, 'यहाँ रहनेमें क्या मतलब ? माहुरमे जाओ, वहाँ अन्याश्रममें श्रीदत्तात्रेयजीका दर्शन एक सालके बाद हो जाएगा।' स्वामीच्या आशीर्वादाने त्याना हुरूप आला. विजापूर, धारवाड, हुबळी, हपी विरुपाक्ष, श्रीशैल, भागानगर इत्यादी पवित्र ठिकाणे करून ते प्रसिद्ध क्षेत्र बासर येथे आले. येथील जागृत सरस्वतीने त्याच्या मुखात वास्तव्य करण्याची कबुली केली. येथून श्रीविष्णुदासाची कवित्वशक्ती प्रकट होऊ लागली. सरस्वतीची

अशाबद्दल श्रीदत्ताची आज्ञा होत असे, व त्याप्रमाणे वर्तन न घडल्यास त्यानाही प्रायश्चित्त भोगावे लागत असे।

देहरक्षणाला ते फारसे महत्त्व देत नसत. ते आलीया भोगासी नेहमी सादर असत. क्षुल्लक संकटानीच आपण डळमळू लागलो, तर शतवृश्चिकदंश झाल्याप्रमाणे वेदना होतात, अशा अतकाळी परमेश्वराचे स्मरण आपल्या हातून कसे घडेल ? असे ते म्हणत असत पूर्वेस राजमहेंद्री, दक्षिणेस रामेश्वर, उत्तरेस काशी वगैरे पुष्कळ ठिकाणी त्याचे जाणे झाले होते. सर्व प्रवास ते पायीच करीत. त्याना एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जायला वेळच लागत नसे, असे सागतात नवीन तऱ्हेने सुधारलेल्या मुबई-पुण्यासारख्या शहरात ते कधीच जात नसत.

उज्जयनी, ब्रह्मावर्त, हिमालयातील पहाडी मुलुख (बदरीकेदार, गंगोत्री), हरिद्वार, पेटलाद, तिलकवाडा, द्वारका, चिखलदा, मेहतपूर, नरसी, वडवाणी, तजावर, मुक्त्याला, पवनी, हावनूर, कुरुगड्डी, गरुडेश्वर अशा ठिकाणी त्याचे चातुर्मास झालेले आहेत. यावरुन त्याच्या सचाराचे क्षेत्र लक्षात येईल. माणगाव, वाडी, ब्रह्मावर्त, गरुडेश्वर येथे त्याचा मुक्काम जास्त दिवस होता. त्याचा सर्व प्रवास २ छाटया, २ लगोटया व एक कमडलू एवढयाच साहित्याने होत असे. त्याची वृत्ती नेहमी विरक्तिपूर्ण व शात असे. अंतकालापूर्वी काही दिवस ते गरुडेश्वरी राहात असत. त्याच ठिकाणी शके १८३६ आनद नाम सवत्सरी ज्येष्ठ वद्य अमावास्येस रात्री श्रीदत्ताच्या समोर उत्तराभिमुख बसून ते कैवल्यपदास गेले। व नतर देह नर्मदेच्या प्रवाहात सोडून दिला !

त्याच्या असरच्या दुखण्याच्या वेळी त्यानी प्रकृती सुधारण्यासाठी काही औषध घ्यावे असे इतरानी त्याना सुचविले. पण ते स्वामीनी मनावर घेतले नाही ते म्हणाले–" या शरीराला उत्पन्न होऊन साठ वर्षे तर झाली. आता यास ठेवून तरी काय करायचे आहे ! श्रीशकराचार्य भगवान स्वत शकराचे अवतार असूनही बत्तीस वर्षेच राहिले.श्रीकृष्ण परमात्मा वैकुठासकट येऊन एकशे पस्तीस वर्षे राहिला. त्या मानाने हे शरीर फार राहिले बाबानो ! पूर्वी या शरीरास दोन वेळा सर्पदंश,तीन वेळा कॉलरा, एक वेळ सन्निपात, दोन वेळ महाव्याधी व एकदा कोड इतके रोग झाले ! त्या वेळी औषध देण्यास कोण आले होते ? जन्मापासून ज्या वैद्याला मी शरण आलो आहे तोच पण ह्या वेळीही आहे." असे म्हणून भीष्माचार्य शरपजरी असताना शेवटी जे श्लोक बोलले होते, तेच श्लोक स्वामीनी बोलून दाखविले.

गरुडेश्वरी वासुदेवानदाच्या पादुका स्थापून मोठे देवालय बाधले आहे व तेथे नित्यनैमित्तिक पूजाअर्चा व उत्सव होत असतात. त्याचप्रमाणे सावतवाडी येथेही श्रीदत्तदास नारायण गोविंद चकिडवे प्रभृती साप्रदायिकाच्या खटपटीने श्रीवासुदेवालयात पूजाअर्चा, उत्सव सुरू असतात.

श्रीवासुदेवानद सरस्वतीच्या क्षेत्रमाहात्म्याचा सर्वांसच लाभ घेता येणार नाही. तरी त्याचे सस्कृत गुरुचरित्र, दत्तपुराण, मराठी दत्तमाहात्म्य, त्रिशती गुरुचरित्रकाव्य, कुमारशिक्षा इत्यादी ग्रंथ, तसेच त्याची कित्येक स्तोत्रे व पदे ही सर्वांस सुलभ व पावनकारक होतील यात शका नाही. त्याचे दत्तपुराण हा तर एक आर्यसस्कृतीचा कोशच आहे. योगीराज गुळवणी महाराजानी त्याचे सर्व वाङ्मय प्रकाशित् केले आहे.

–स कृ फडके

## ३५. विष्णुदास माहुरकर

(सन १८४४–१९१८)

माहुरगडावरील श्रीरेणुकामातेने व श्रीदत्तात्रेयाने आजपर्यंत अनेकाची चित्ते स्वत कडे आकर्षित करून घेतली आहेत. अनेकाची ही

देवी कुलस्वामिनी आहे अनेकाना येथील श्रीदत्ताने वेध लावलेला आहे परतु या सर्वांत अधिक वेध या दोनही देवताचा लागला तो श्रीविष्णुदासाना श्रीदत्त व श्रीरेणुका याचा साक्षात्कार श्रीविष्णुदासाना वारवार होत असे विष्णुदासानी आपल्या रसाळ व प्रत्ययकारी कवितेत हे अलौकिक भेटीचे क्षण शब्दबद्ध करून ठेविलेले असल्यामुळे त्याचा स्वाद आजही चाखता येण्यासारखा आहे श्रीमत्परमहस परिव्राजकाचार्य श्रीसद्गुरु पुरुषोत्तमानद सरस्वती ऊर्फ श्रीविष्णुदास महाराज असे त्याचे नाव असले, तरी सबध विदर्भ व मराठवाडा त्याना विष्णुकवी अथवा विष्णुदास याच नावाने ओळखतो शत्रूना भयानक वाटणारी देवी किती वत्सल व कनवाळू असू शकते हे विष्णुदासाच्या कवितेवरून प्रतीत होईल विष्णुदासानी या जगन्मातेला आई म्हणून हाक मारावी व 'आले हू बाळ' म्हणून आईने साद द्यावी, असे या अलौकिक मायलेकराचे नाते होते.

या विष्णुदासानी प्रथम खडतर उपासना केली ती दत्तात्रेयाची दत्त हे आणखी एक आधारस्थान त्याना प्रथमपासून वाटे विष्णुदासाचा जन्म तसा या परिसरातील नाही इकडे पुण्या-साताऱ्यासच त्याचे घराणे प्रसिद्ध होते नगरजवळील धावरफळ या गावचे हे धादरफळे नशीब काढण्यासाठी धादरफळे सातारा येथे आले येथेच शके १७६६ मध्ये विष्णुदासाचा जन्म झाला लहानपणापासून हरिभक्तीचा, सत्सगाचा, कीर्तन-प्रवचनाचा नाद याना विलक्षण प्रकारचा होता हा नाद फारसा वळावू नये म्हणून त्याचे लग्न करून देण्यात आले रहिमतपूर येथील सातपुते याच्या घराण्यातील राधाबाई ही विष्णुदासाची पत्नी त्याना प्रपचात मदत करू लागली परतु विष्णुदासाचे मन प्रपचात रमेना त्याना नाद सतसगतीचा, तीर्थक्षेत्राचा, हरिभजनाचा साताऱ्याजवळील निपुटी नावाच्या क्षेत्रामधील पाडुरगबुवा दगडे नावाच्या सत्पुरुषापासून विष्णुदासानी गुरुमत्र घेतला दत्तात्रेयाची व आपली भेट व्हावी अशी भावना वारवार मनातून उसळल्या मारी ससारात मन रमत नसे शेवटी व्हायचे तेच झाले घरातील सर्व मडळीचा लोभ सोडून विष्णुदास घरातून एका रात्री बाहेर पडले

कुठे जायचे हे माहीत नव्हते देव भेटावा, दत्तात्रेयानी पोटाशी धरावे, त्याच्याशी हितगुज करावे, हीच एक मोठी ओढ मनास होती विष्णुदासानी लहानपणीच श्रीगुरुचरित्राची पारायणे केल्यामुळे गुरुकृपेच्या अकुरासाठी मनोभूमी तयार होती दत्तभक्तीत तल्लीन होऊन सुरेल आवाजात ते पदे म्हणत असत घरातून निघून जाण्यापूर्वीच कोल्हापूर व नरसोबावाडी या क्षेत्राचे दर्शन विष्णुदासाना झाले होते याच क्षेत्रानी पुन्हा त्याना मौन निमत्रण दिले कृष्णेचे स्नान, श्रीदत्तपादुकाचे दर्शन व गणेशशास्त्री कवीश्वर याचा यश याची आठवण याच्या मनास सतत होत असे दत्ताच्या समोर बसून पदे व अष्टके म्हणण्यातील अवीट सुख त्याना पुन पुन अनुभवायचे होते याच ओढीने श्रीविष्णुदासाची तीर्थयात्रा सुरू झाली चिचणेर, रगनाथ महाराजाची निगडी, जयरामस्वामीचे वडगाव, पढरपूर, तुळजापूर, अक्कलकोट अशी गावे घेत घेत विष्णुदास दत्तात्रेयाच्या शोधार्थ निघाले अक्कलकोट येथील श्रीस्वामी समर्थांचे दर्शनही त्यानी मनोभावे घेतले येथेच त्याना आज्ञा झाली, 'यहाँ रहनेमें क्या मतलब ? माहुरमें जाओ, वहाँ अत्र्याश्रममें श्रीदत्तात्रेयजीका दर्शन एक सालके बाद हो जाएगा।' स्वामीच्या आशीर्वादाने त्याना हुरूप आला विजापूर, धारवाड, हुबळी, हपी विरुपाक्ष, श्रीशैल, भागानगर इत्यादी पवित्र ठिकाण करून त प्रसिद्ध क्षेत्र बासर यथे आले येथील जागृत सरस्वतीने त्याच्या मुखात वास्तव्य करण्याची कबुली केली येथून श्रीविष्णुदासाची कवित्वशक्ती प्रकट होऊ लागली सरस्वतीची

आरती येथेच त्यांनी तयार केली.

शेवटी विष्णुदास माहुरास येऊन स्थिरावले तेथील वनश्री, तेथील एकांत आणि मुख्य म्हणजे श्रीदत्तात्रेय व श्रीरेणुका यांचा निवास त्यांना तेथेच गुतवून घेण्यास पुरेसा होता महानुभावाच्या देवदेवेश्वराचा आधार घेऊन विष्णुदास दत्तचिंतनात मग्न झाले रोज दत्तशिखरावर जाऊन दत्ताचे, अनसूयामातेचे, श्रीरेणुकामातेचे दर्शन घेण्याचा त्यांचा क्रम झाला दत्ताच्या प्रत्यक्ष भेटीची लालसा फार लहानपणापासून त्याना होती त्याच एका प्राप्तीसाठी त्यांच्या मनाची तळमळ होती तहानभूक, विश्रांती यापैकी काहीच सुचेनासे झाले दत्ता, दत्ता, दत्तात्रेया, असाच ध्यास त्यांच्या मनाला एकसारखा होता स्वत च्या मनाची विव्हलता, तगमग, बेचैनी यांनी विष्णुदासाची कविता आर्द्र बनलेली आहे दत्त हा न मागता भक्ताना देणारा मग आपणासच का असे दूर ठेवतो ? आपणास त्याची भेट का होत नाही ? एकदा तर त्यांनी स्पष्टपणेच दत्तात्रेयाना विचारले,

" तू तो समर्थ दत्त दाता ।
नाम सोडिले का आता ? ॥
जगन्माते, लेकुरवाळे ।
काय निघाले दिवाळे ॥
कृपासिंधु झाला रिता ।
कोण्या अगस्तीकरिता ॥
सुकीर्तीची साठवण ।
काय नाही आठवण ? ॥
भागीरथी का आटली ।
कामधेनू का आटली ? ॥
चद्र थडीनें पोळला ।
कल्पवृक्ष का वाळला ॥
विष्णूदास म्हणे कनका ।
दग लाऊ नका नका ॥ "

दत्तात्रेय म्हणजे खरे कृपासिंधू कामधेनूप्रमाणे, कल्पवृक्षाप्रमाणे इच्छित वस्तू पुरविणारे पण आपल्याविषयी काय झाले त्यांना ? ही कामधेनू आटली की काय ? चद्र थडीने पोळून निघाला की काय ? कल्पवृक्ष वाळून गेला ? लेकुरवाळ्या जगन्मातेचे दिवाळे निघाले की काय ? अशा शंका विष्णुदासानी या अभगात घेतल्या आहेत कधी कधी स्वत चे दोषही विष्णुदासाना दिसतात ' गुरु दत्तात्रेय अवधूता। ऐक अनसूयेच्या सुता।' या एका अभगात त्यांनी स्वत ची उणीव स्पष्टपणे माडली आहे मी वाणीने दत्तात्रेय म्हणतो, पण तापनयात मात्र गुरफटून जातो प्रसादाची आशा मनात असली तरी ' विषयी होइना निराश।' दत्तात्रेया, 'तुझा म्हणवितो किंकर। तुला लाविता करकर ॥ तुझा म्हणविता अकित। बसतो अफू, गाजा फुकित ॥' अशी स्वत च्या मनाची, अपराधाची कबुली देऊन त्यांनी शेवटी विनवणी केली आहे, ' विष्णुदासाच्या हृदयस्था। याची वसवावी व्यवस्था ॥ '

आणि ही व्यवस्था लौकर बसावी म्हणून विष्णुदासाचे अत करण तळमळत होते कधी ध्यानधारणा करावी, कधी कडूनिंबाचा पाला भक्षून राहावे, कधी उपासतापास करावेत, कधी एक वेळच्या माधुकरीवर भागवावे, देहधारणेपुरती सोय झाली की इतर काही नको होते परतु या माहुरगडावरील शिखरावर असलेल्या श्रीदत्तात्रेयानी आपणास दर्शन द्यावे ही लालसा मनातून वारवार उफाळून येई ' जय नमोस्तुते श्रीदिगवरा ' या एका अप्रतिम अष्टकात ' करू विनती दत्तात्रया किती ' या ओळीच्या आवर्तनाने स्वत च्या चित्ताची तगमग फार चागल्या रीतीने त्यांनी प्रगट केली आहे चागल्या कुळात जन्म लाभूनही दत्त भेटले नाहीत, तर काय फायदा त्याचा ? आपली स्वत ची काही चूक झाली म्हणून दत्ताने भेट न देण्याचे ठरवावे काय ? मध्येच अगतिक होऊन ते म्हणतात, 'परि तुझ्या सुरी, मानही हती। करू विनति दत्तात्रया

किती ?' या दत्तासाठी प्रपंच, कनक, कामिनी याचा लोभ सोडला.

कधी एखाद्या अष्टकात आपल्या हातून झालेल्या न झालेल्या अपराधाची कबुली विष्णुदास देत असतात कधी प्राचीन काळातील अपराधी लोकाचा तुम्ही कसा उद्धार केला हो ? म्हणून प्रश्न करीत. परंतु मी एक गरीब, हीन, अपराधी, म्हणून का इतका दत्ताने त्याग करावा ? एका अष्टकात त्यानी म्हटले आहे, 'गरीबाचा माथा सतत पदि घासूनि झिजला। दयाळा, श्रीदत्ता! जय अवधुता! पाव मजला।' दीनानाथा दत्ता, आम्हाला तुझ्याशिवाय दुसरा कुठला रे आसरा ? 'पिता माता बंधू सुजविण नसे देव दुसरा।' अशी माझ्या मनाची धारणा आहे. देवा, मला मोक्ष नको, तुमची वैकुंठपुरी नको. त्यानी दत्ताला म्हटले आहे.

'सुदाम्याला द्या जा, उचित न अम्हा कांचनपुरी। करी इच्छा ते विजयदशमिचे कांचन पुरी।' दत्तात्रेया, तुझ्याशिवाय दुसरा कोण दाता मला आहे रे? कधी कधी विष्णुदास दत्तात्रेयांच्या स्वभावातील वर्मही सौम्यपणे हुडकून काढतात. याच अष्टकात त्यानी म्हटले आहे,

तुझ्या आतिथ्याला, सति अनसुया साच निभली।
बहु त्वाही केली, वसुनि तिजला जाचणि भली॥
छळावे दात्याला, विबुधजनधारा समजला।
दयाळा श्रीदत्ता! जय अवधुता पाव मजला॥

आणि पुन्हा ते दत्तात्रेयाना 'नुपेक्षीता देसी म्हणुनि जगती 'दत्त' म्हणती। कृपेने तारीले जड मूट किती नाहि गणती।' अशी आठवणही करून देतात याच वृत्तीची, तळमळीची अनेक पदे विष्णुदासानी केली आहेत 'तारि तारि दत्तात्रया गुरूराया। लागलो ससारडोही मराया॥' या एका पदात त्यानी दत्तात्रेयाना विनती केली आहे, 'तू दीनवत्सल दीन मी म्हणुनि। निर्वाणी उमजलो पाय स्मराया॥ विष्णुदास म्हणे काय द्या! अवघड। येवढें साझें दुःख हराया?॥' या समर्थ व दात्या दत्ताला खरेच काही अवघड वाटू नये; पण तो काय आपल्या भक्ताची परीक्षा पाहिल्याखेरीज राहील ? आणि भक्त विष्णुदासही त्याची कळवळून प्रार्थना करीत, स्वतःची कमतरता वर्णन करीत. आपली लाचारी पदर पसरून त्याच्या पुढे मांडीत. त्याच्या ब्रीदाची त्यानाच आठवण करून देत. 'स्वामी दत्त दयाघना अवधुता श्रीअत्रिच्या नंदना' या ओळीचे आवर्तन असलेल्या एका अष्टकात त्यांच्या *मनातील सर्व कोमल भाव अनुतापयुक्ततेने प्रकट* झाले आहेत.

आपण एवढे कासावीस का झालो ? मनाची एवढी उतावीळ अवस्था का आहे ? याचे स्पष्टीकरण विष्णुदासानी याच अष्टकात करताना म्हटले आहे, 'सतापें तुम्हिही म्हणाल इतुका, का बाद तो आगळा। शत्रूचा क्षणमात्र नेम न कळे, कापील केव्हा गळा॥ थोराची मरजी पटे न अरजी, फिर्यादिची दाद ना। स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना॥' याच अष्टकात विष्णुदासानी वेदाच्या, उपनिषदाच्या व पुराणाच्या साक्षी काढल्या आहेत. साधूसंताचे पुरावे दिले आहेत. भक्तीने वश होणाऱ्या या दत्ताच्या स्वभावाच्या साऱ्या खाणाखुणा विष्णुदासाना माहीत होत्या. त्याना दुसरे काहीही नको होते. लौकिकाची आस त्यानी केव्हाच सोडली होती. ते म्हणतात,

'कांता कांचन राज्य वैभव नको,
कैवल्यही राहु द्या।
होऊ द्या अपदा, शरीर अथवा
काळासि होराउ द्या॥
पाहू द्या रुप एक वेळ नयनी,
हो माझि आराधना॥
स्वामी दत्त, दयाघना अवधुता,
श्रीअत्रिच्या नदना॥'

आपण या भवसागरात वाहून जाऊ की काय ? *याची चिंता त्यांच्या मनास सतत होती घड*

ना प्रपंच, ना परमार्थ, अशा आयुष्याचा काय उपयोग ? आणि दत्तभेटीशिवाय देह जाईल तर साराच डाव वाया गेल्यासारखे होईल. म्हणून त्यांच्या मनाची विलक्षण तळमळ होई. आता काळवेळ उरलेला नाही, मी फार दीन व लाचार झालो आहे, अशा अर्थाचा निर्वाणीचा भाव होत राहिला.

या निर्वाणीच्या व करुणेच्या प्रार्थनेनंतर विष्णुदासांचा मनोदय सफल झाला. माहुरगडावरील दत्तात्रेयांनी त्यांना दर्शन दिले. त्यांच्या तप्त चित्ताची सांत्वना केली. आपल्या एका आर्त भक्तास भेटल्याने दत्तात्रेयही संतुष्ट झाले. साऱ्या भौतिक सुखाची मागणी करणाऱ्या गोतावळ्यात हा एक विष्णुदास फक्त दर्शनाची, भेटीची, निरंतर सहवासाची इच्छा करीत असल्याचे जाणून दत्तात्रेयही संतोष पावले. त्यांनाही एवढा कळवळ्याचा भक्त फार दिवसांनी मिळाला. विष्णुदासांनाही पराकोटीचा आनंद झाला. या आनंदाची घनदाट छाया 'तो अनाथनाथ दत्त माहुरात पाहिला।' या एका भक्तिरसपूर्ण अष्टकावर पडलेली आहे. दत्तसंप्रदायाचे सारे रहस्य एका श्लोकात आणताना त्यांनी म्हटले आहे, 'धर्म अर्थ काम मोक्ष ग्राम गाणगापुर। श्रीगुरु चरित्रनाम, हेंचि गाण गा पुर ।। नारसिंह श्रीसरस्वती स्वरूप जाहला। तो अनाथनाथ दत्त माहुरात पाहिला ।।' फार दिवसांची इच्छा पूर्ण झाली. मनाची सारी तगमग दूर झाली. वृत्ती शांत बनली. याच दत्तांची कथा गाता गाता विष्णुदास तल्लीन होऊन गेले.

या दत्तांची त्यांना वारंवार दर्शने होत राहिली. कारण 'राहें सामोरा। अता नको होऊं पाठमोरा ।। परम उदारा। येवढी विनंति अवधारा ।।' अशी त्यांची विनंती प्रत्येक वेळी असे. स्वतः स झालेली दत्तदर्शने विष्णुदासांनी आपल्या कवनातून अमर करून ठेवली आहेत. दत्तजन्म, दत्तस्तवन, दत्तांची व अनसूयेची आरती, विविध अष्टके यातून दत्तात्रेयांची विविध रूपे व भक्तीच्या अनेक छटा यांची दर्शने दत्तभक्तांना घडविली आहेत. 'उठि उठि गा दत्तात्रया। तू सुखदायक लोकत्रया।' ही एक भक्तिरसपूर्ण भूपाळी माहुरगडात त्यानंतर घुमू लागली. 'माझ्या हरिणीच्या पाडसा। ळळ राजसा अवधूता' अशी कोवळीक माता अनसूया व्यक्त करू लागली. 'तू विश्वेश्वर प्रतिपाळक। तूंचि विश्वाचा मालक ।। माझा म्हणविसी बालक। तू चालक प्राणाचा।' हेही रहस्य अनसूयामातेने ओळखले आहे. ही थोर माता आपल्या मुलास कोणत्या प्रेमाने जागवीत आहे ? 'वा, तुझें मंजूळ बोलणें। वा, तुझें चपल चालणें। वा, तुझें स्वानंदें डोलणें। जग सम पाहणें अवधूता ।।' ईश्वराविषयी अशी वृत्ती विष्णुदासांच्या कवनातून प्रकट होत राहिली. 'श्रीगुरु दत्तात्रय माऊली। विष्णुस्वामी म्हणे पावली। स्मरता अविलंबे धावली। सामावली मजमाजीं ।।' अशी प्रचीती त्यांना वारंवार येत राहिली.

सबंध आयुष्यभर विष्णुदासांनी दत्तात्रेय व रेणुका यांचेच चिंतन केले. माहुरगडचा परिसर जगन्माता रेणुका व दत्तात्रेय अवधूत यांच्या गजराने दुमदुमून निघाला. अनेक सत्पुरुषांचा सहवास, आत्मचिंतन, मातृदर्शन, दत्तकृपा यातील सौख्यास तुलना कुठली ? त्या वेळचे प्रसिद्ध अवतारी पुरुष श्रीवासुदेवानंदसरस्वती तथा टेंबेस्वामी हेही एकदा माहुरास आले होते. त्यांची व विष्णुदासांची भेट झाली होती. तीन दिवस त्यांचा मुक्काम विष्णुदासांच्या आश्रमातच होता. या दोन थोर उपासकांची चर्चा तेथील दगडाफुलांवरही उमटली असेल. श्रीविष्णुदासांनी या हितगुजाचा सारांश आपल्या एका भाच्याला व शिष्याला कळविला होता. मातृकृपांकित व दत्तोपासक खरशीकरशास्त्री हे विष्णुदासांचे भाचे व शिष्य प्रस्तुत लेखकाचे तीर्थरूप यांना

लिहिलेल्या पत्रात विष्णुदास लिहितात, 'आपल्या मठात श्रीदत्तावतारी श्रीवासुदेवानंदसरस्वती, टेंबेस्वामी महाराज यांचा तीन दिवस मुक्काम होता. तीन दिवसांत आम्हांस फारच आनंद उपभोगण्यास मिळाला. कर्म-ज्ञान-भक्ती यांचे एकत्व उत्तम दिसत होते.'

अशा या संवादाची विष्णुदासांना वारंवार आठवण होत राही. अनेक साधुसंत आणि दत्त-रेणुकेचे ध्यान व चिंतन यांतच विष्णुदासांचे आयुष्य मोठ्या सुखाने व्यतीत झाले. विष्णु-दासांनी उमरखेडचे नित्यानंदसरस्वती यांच्या-कडून संन्यासदीक्षा घेतली होती. या श्रेष्ठ दत्तभक्ताने शके १८३९ मध्ये माहूरास श्रीरेणुका व श्रीदत्तात्रेय यांच्या चरणी अखेरची विश्रांती घेतली. श्रीविष्णुदासांचे समग्र चरित्र मातृकृपांकित खरशीकरशास्त्री यांनी तीन खंडांत लिहून प्रसिद्ध केले आहे.

## ३६. साईबाबा

### (सन १८३८–१९१८)

शिर्डीचे नाव साऱ्या भारतात प्रसिद्ध करणाऱ्या श्रीसाईबाबांचे स्थान दत्तपंथीयांत महत्त्वाचे आहे. तसे पाहिले तर बाबा रामाचे उपासक. शिर्डीस दत्तात्रेयांचे मंदिरही नाही. ज्या पादुका आहेत त्या बाबांच्या गुरूंच्या आहेत. बाबांनी स्वतः दत्तोपासनेचा प्रचारही केलेला दिसत नाही. श्रीसाईबाबांची जात कोणती, त्यांचा जन्म केव्हा व कोठे झाला, ते शिर्डीस केव्हा व कसे आले, इत्यादींची फारशी माहिती कोणासही नाही. श्रीबाबा हे थोर दैवी व साक्षात्कारी पुरुष लोकांची दुःखे नाना मार्गांनी दूर करतात, एवढीच त्यांची कीर्ती. ते कोणाचे अवतार आहेत? याही प्रश्नाचे नेमके एकच उत्तर नाही. राम, कृष्ण, हनुमान, शंकर, गणपती, गुरु, दत्तात्रेय, स्वामी समर्थ अक्कलकोटकर, माणिकप्रभू, इत्यादींचा संबंध श्रीबाबांच्या अवतारलीलांशी पोचतो. दासगणूसारख्या श्रेष्ठ भक्तास ते पंढरीच्या विठ्ठलासारखे दिसतात. 'शिर्डी माझें पंढरपूर। साईबाबा रमावर' असे त्यांचे वचन आहे. साईबाबांची धुनी, उदी, त्यांचा हिंदु-मुसलमान भक्तपरिवार, त्यांचे लोकविलक्षण वागणे, त्यांची आर्तांबद्दलची करुणा ध्यानात घेऊन अनेकांनी त्यांना दत्तावतारीही मानले आहे.

माणिकनगरप्रमाणेच शिर्डीसही हिंदू व मुसलमान यांना पंथीयात सारखाच मान आहे. साईबाबा हे नाथपंथीय दत्तात्रेयाचे अवतार असल्याचे अनेकांना मान्य आहे. ज्ञात असलेल्या त्यांच्या जीवनक्रमाचा प्रारंभ थोडक्यात असा. औरंगाबाद जिल्ह्यातील धूप नावाच्या एका गावालगतच्या जंगलात चांदभाई नावाचा एक सधन व्यापारी आपली लाडकी घोडी शोधीत होता. या घोडीचा तपास एका मुसलमानी वेषातील तरुण वैराग्याने करून दिला. चांद-भाईची निष्ठा या तरुण फकिरावर जडली. त्याने चिमटा जमिनीवर आपटून चिलमीसाठी निखारे तयार केले, तेव्हा तर या तरुणाच्या दैवी शक्ती-बद्दल चांदभाईची खात्रीच पटली. चांदभाईने या फकीरास आपल्या घरी आणले. चांदभाईच्या घरी एक लग्न निघाले. त्या वऱ्हाडाबरोबर हा तरुण फकीर शिर्डीला येऊन शिवेवरील खंडोबाच्या देवळात आला. पण या मुसलमानाला पुजाऱ्याने आत येऊ दिले नाही, तेव्हा तो देवळाबाहेर एका वडाच्या झाडाखाली चिलीम फुंकत बसला. याच वेळी खंडोबाच्या देवळाचे मालक म्हाळसापती सोनार हे तेथे आले. झाडाखाली बसलेल्या फकिरास ते म्हणाले, 'आवो, साईबाबा!' तेव्हापासून हा फकीर साईबाबा म्हणून ओळखला जाऊ लागला.

म्हाळसापतीबरोबर श्रीसाईबाबा शिर्डीतच राहू लागले. काशिराम शिंपी, आप्पा जागले

अशा काही लोकांची बाबावर श्रद्धा जडली. ज्या निंबाच्या वृक्षाखाली बसून बाबा चर्चा करीत त्याच्या खाली त्यांच्या गुरूच्या पादुका असल्याचे आढळून आले. येथूनच जवळ असलेल्या एका पडीक जागेत बाबांनी फुलबाग तयार केली. बाबांचे वागणे, बोलणे वरवर पाहाता वेड्यासारखे होते हातात पत्र्याचे टमरेल, मळकट कापडाची झोळी, अंगावर एखादी कफनी, अशा वेषात बाबा भिक्षा मागत असत. खाण्यापिण्याचीही नीट शुद्ध त्यांना नसे. काही दिवसांनी ते गावातील एका पडक्या मशिदीत राहू लागले त्यांच्या वास्तव्याने पुनीत झालेली हीच जागा पुढे द्वारका माई म्हणून प्रसिद्धीस आली. रामनामाचा जप येथे सुरू झाला. अक्षय जागृत असणारी धुनी तयार झाली व हजारो, लाखो भक्तांना उदीभस्म मिळत राहिले.

बाबांनी अनेक चमत्कार केले दुकानदारांनी तेल दिले नाही म्हणून त्यांनी पाण्याच्या पणत्या पेटवून लोकांना चकित केले. बाबांनी अनेकांची शारीरिक व्याधी दूर केली, पिशाचबाधा दूर केली; अनेकांना धनाचा, यशाचा मार्ग दाखविला. पुणतांबे येथील संत गंगागीर महाराज व स्वामी अक्कलकोटकरांचे शिष्य महंत आनंदनाथ यांनी बाबांचे दर्शन घेऊन कृतार्थता व्यक्त केली. वासुदेवानंदसरस्वती हे बाबांचे गुरुबंधू असल्याचे सांगतात. साईबाबांच्या अंगुळातून गंगायमुनांचा झरा वाहात असतानाची साक्ष दासगणूंची आहे. योगविद्येतही श्रीबाबा तत्पर होते संसारग्रस्त जीवांना सुखी व समाधानी करण्यासाठी बाबा या योगसामर्थ्याचा उपयोग करीत त्यांच्या उदीचा प्रभाव अनेकांच्या अनुभवातला होता उमरावतीचे दादासाहेब खापर्डे यांची श्रीबाबावर नितान्त श्रद्धा होती. श्रीबाबांच्या वास्तव्याने लौकरच शिर्डी हे एक क्षेत्र बनले. भक्तांच्या निवासासाठी तेथे नवीन इमारती झाल्या पाण्याची, विजेची सोय झाली साठे, दीक्षित नागपूरचे बुटी यांच्या इमारतींनी शिर्डीस एक नवे वैभव प्राप्त करून दिले.

श्रीबाबांचे चमत्कार व त्यांचा उपदेश यांनी सर्वसामान्य लोकही भारावून गेले. बाबा म्हणत असत, 'कधीही न मिळणारा हा मनुष्यजन्म विषयभोगाच्या नादाने फुकट घालवू नका. तुम्हाला जे समजणार नाही ते मला विचारा. तुमच्या सेवेसाठी मला परमेश्वराने येथे पाठविले आहे. तुमच्यासाठी माझा जीव तळमळत आहे. तुमचा उद्धार करणे हे या अल्लाच्या सेवकाचे पहिले कर्तव्य आहे. या जगात अमर कोणीही नाही. प्रत्येकाला एक दिवस मरावयाचे आहे हे मरणाचे भूत नित्य डोळ्यासमोर ठेवा, म्हणजे त्या भीतीने तरी तुम्हास परमेश्वराची आठवण होईल' असा त्यांचा साधा व सरळ उपदेश असे. त्यांना फारसे कर्मकांडही नको होते. विशिष्ट देवाचा वा देवतेचाही त्यांचा आग्रह नव्हता. मनातील अहंकार सोडून आपल्याला आवडेल त्या देवाची अढळ विश्वासाने आराधना करण्यास ते सांगत. सांसारिक लोकांना परमार्थाची गोडी श्रीसाईबाबांनी लावली.

श्रीबाबांनी अशा रीतीने कधी कनवाळूपणाने, कधी रागावून, कधी लोभावून, कधी नीट समजूत काढून लाखो लोकांची पीडा दूर केली त्यांना परमार्थाचे मार्गदर्शन केले. कसल्याही प्रकारचा भेदभाव न ठेवता ते अन्नदान करीत हजारो लोकांच्या शारीरिक व मानसिक व्याधी दूर करणारा हा अवतारी पुरुष १५ ऑक्टोबर १९१८ रोजी समाधिस्थ झाला अखेरच्या प्रसंगी त्यांना बुटीच्या वाड्यात आणले होते. येथेच त्यांचे समाधिस्थान निर्माण झाले. श्रीबाबांनी कोणासही मंत्र देऊन शिष्य केले नसले तरी आजही लाखो भक्तांचे डोळे शिर्डीकडे लागलेले असतात शिर्डीच्या जवळचे साकुरी येथील उपासनी महाराजांचे दत्तस्थान साईबाबांच्या प्रेरणेनेच निर्माण झाले. आजचे सत्य-

साईबाबा शिर्डीच्या या श्रीसाईबाबांचे अवतार असल्याची अनेकांना खात्री आहे.

## ३७. दत्तमहाराज अष्टेकर
### (सन १८९४–१९२५)

जन्म : आश्विन शुद्ध १, शके १८१६ रविवार रात्री १ वा. २१ मि. चित्रा नक्षत्र, कर्क लग्न, तूल राशी. पूर्व आश्रमातील नाव नरहरी; वडिलांचे नाव वासुदेवराव दिवाण, आईचे नाव सौ. मुक्ताबाई रा. दुधाचे वठार, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर. या नरहरींस पुढे दत्तमहाराज म्हणू लागले. यांची समाधी अष्टे येथे असल्याने श्रीदत्तमहाराज अष्टेकर या सत्पुरुषाची पावन-कथा ऐका.

दिवाण घराणे ऋग्वेदी देशस्थ गौतम गोत्र. दुधाचे वठार येथे श्रीएकनाथ महाराजांचे नातू उद्धवस्वामी यांची समाधी आहे. त्या एकनाथांचे वंशातील सौ. मुक्ताबाई. 'शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ।' अशा पुण्यवंत मातेच्या पोटी नरहरीचा (श्रीदत्तमहाराजांचा) जन्म झाला. मुक्ताबाईचे हे तिसरे अपत्य.

महाराज ११ वर्षांचे असता त्यांचे वडील वासुदेवराव दिवाण मृत्यू पावले. महाराजांचे शिक्षण पुढे शिराळे येथे मराठी ५ इयत्तेपर्यंत झाले. शके १८२९ साली वयाचे १३ वे वर्षी नोकरीचे निमित्ताने 'सांगलीस जातो' म्हणून शिराळयाहून बाहेर पडले, ते थेट श्रीक्षेत्र नृसिंह-वाडीस जाऊन श्रीवासुदेवानंदसरस्वती, टेंबे स्वामींचे दर्शन घेतले. त्या वेळी त्यांचे अंतःकर-णात काही स्फुरत आहे असे वाटले.

टेंबे स्वामींचे दर्शनसुख थोडे दिवस घेतल्यावर महाराजांस श्रीक्षेत्र गाणगापुरास जाण्याची प्रेरणा झाली. त्याप्रमाणे ते गाणगापुरास गेले व तेथे गावामध्ये मधुकरी मागून सेवा करीत राहिले. तो त्यांना तेथे कॉलरा झाला व पंचप्राण व्याकुळ होऊन मृत्यूचे दारात पडले. तशा स्थितीत त्यांना श्रीदत्तप्रभूंचा दर्शनलाभ घडला. श्री म्हणाले, 'भिऊ नकोस, हे तीर्थ घे' असे म्हणून श्रींनी स्वहस्ते महाराजांस तीर्थ पाजले आणि म्हटले, 'तू बरा झाल्यावर घरी जा' असे सांगून श्रीदत्तमहाराज अंतर्धान पावले.

भगवान् दत्तात्रेयांनी केलेला हा अनुग्रह शरीर-रक्षणापुरता नसून त्यांनी पूर्ण कृपाच केली व अंतःकरणवृत्ती अंतर्मुख केली. दत्तप्रभूंचे आदेशा-प्रमाणे महाराज दुधाचे वठार येथे परत येऊन तेथे उद्धवस्वामींच्या समाधीची सेवा करीत राहिले व पुढे ते पंढरपुरास गेले; त्या ठिकाणी श्रीहरिहर महाराज या थोर विभूतीची भेट झाली.

श्रीहरिहर महाराज फार तेजःपुंज, ब्रह्मचारी व धिप्पाड होते. त्यांनी दत्तमहाराजास मंत्रोपदेश दिला. पुढे ही गुरुशिष्य जोडी परळी–वैजनाथ, दौलताबाद, वेरूळ, उज्जयिनी, ॐकारममलेश्वर वगैरे ज्योतिर्लिंगांच्या यात्रेस जाऊन गिरनारास गेले व तेथे त्या दोघांस श्रीदत्तप्रभूंचे दर्शन झाले. पुढे श्रीहरिहरमहाराजांनी दत्तमहाराजास श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबे स्वामींकडे प्राणा-यामादी अष्टांग शिकण्यास पाठविले. तेथे ही योगविद्या शिकत असता ते एकनाथी भागवत वाचीत असत. तेथे महाराजांस शास्त्रोक्त व आत्मप्रचीतीची माहिती मिळाली व त्यामुळे परब्रह्म आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाला व ब्रह्मनिष्ठता मिळविली.

शके १८४० साली श्रीदत्तमहाराजांना श्रीकृष्णा नदीची पायी प्रदक्षिणा करण्याचा आदेश मिळाला. कृष्णानदी सह्याद्री पर्वतावरील महाबळेश्वरावर उगम पावून मच्छलीपट्टणाजवळ बंगालचे उपसागरास मिळते. नित्य कृष्णास्नान करावयाचे व नदीच्या काठापासून फार तर पाच मैलांच्या बाहेर जावयाचे नाही असा निर्बंध आहे. श्रीशैल्यापर्यंत कृष्णाकाठी गावे असून वाट तरी आहे; पण पुढे कित्येक मैल घनदाट अरण्य व

भिल्ल व हिंस्र पशूंची वस्ती. दऱ्याखोऱ्यांमधून जावे लागते; प्राणसंकटच ते. या प्रवासात मित्र म्हणजे सर्वव्यापी ईश्वर व त्याच्याशी समरस होण्याचा अभ्यास. या प्रवासात महाराजांस अनेक प्रकारे ईश्वरी सहाय्य झाले. उगमापासून निघून परत उगमापर्यंत जावयाचे अशी ही श्रीकृष्णा प्रदक्षिणा १६०० मैलाची आहे. ती महाराजानी केली. ती पुरी झाल्यावर त्यांना कृतार्थता वाटली व ईश्वरी इच्छेचे कौतुक वाटले. पुढे ते पुन्हा गाणगापुरी गेले व तेथे त्याना श्रीदत्तात्रेयाचे सगुण दर्शन झाले. पुढे ते सात दिवस समाधिसुखात होते.

पुढे श्रीमहाराजानी दक्षिणेतील यात्रा केल्या. मांधारगुडी (दक्षिण द्वारका), कन्याकुमारी, रामेश्वर, धनुष्यकोटी, जबुकेश्वर, चिदबर गिरी, उडुप्पी कार्तिकस्वामी, गोकर्ण वगैरे करून महाराज कावेरी तटी तंजावरास आले (शके १८४२) व तेथे सध्या मठात वास्तव्य केले. तेथे त्याना एक जुनी पोथी वाचताना आत्मानुभवाची प्रचीती येऊ लागली. दशोपनिषदे व तत्रशास्त्र वाचले. 'आत्मज्ञान झाले म्हणजे सर्व जाणले' याची प्रचीती आली. तंजावरास लोक जमू लागले; त्याना उपासना सांगितली व सन्मार्गास लावले; व त्याच्या शका निवारण केल्या. पुढे त्याची एका विदेही सत्पुरुषाशी भेट झाली. त्याच्या समागमात महाराजाना वाटले की, आपण आनंदसुखसागरात पोहत आहो. त्याच्या चित्ताची एकाग्रता इतकी वाढली की, बाह्यवस्तू व कालाचे ज्ञान त्याना मुळीच राहिले नाही.

शके १८४५ मध्ये महाराज आपली जन्मभूमी सुखाने वठार येथे परत आले देहयष्टी कृश झाली होती. ब्रह्मचर्यानुसार दाढी व जटाकलाप शोभत असे. डोळे शात व प्रेमदृष्टी, कमरेस लगोटी व त्यावर एक वस्त्र व पाघरण्यास एक वस्त्र आणि कमडलू. ते माध्यान्हकालास आश्रमधर्मानुरूप मधुकरी मागत. प्रात.स्नान व सध्या आटोपल्यावर ते तीन तास समाधीत रहात आणि त्या आसनावर मधून मधून दीड वीतभर अंतराळी होत होते. ते नित्य श्रीदत्तमाहात्म्य वाचीत. पुढे ते अप्टे येथे गेले. तेथे त्यानी अनेक साधकांना उपदेश केला. अप्टे येथे असताना औदुबरास वारवार जाऊन श्रीदत्त महाराजांचे दर्शन घेत. दक्षिणकाशी करवीरास गेलेवेळी त्याना षड्भुज दत्तदर्शन झाले.

महाराजाच्या चरित्रामध्ये अनेक चमत्कार आहेत ते किती म्हणून वर्णन करावेत? मन थक्क होते. महाराजानी कोणास शिष्य केले नाही. त्याच्या सहवासात एखाद्याचा संबंध आला म्हणजे तो अधिकारी जीव आहे अगर नाही हे अंतर्ज्ञानाने जाणत व आपण होऊन त्यावर कृपा करीत. महाराजानी त्याचेवर एक वेळ प्रेमळ कटाक्ष टाकिला की त्याचे अंत.करण ओढ घेत असे.

अप्टे मुक्कामी असताना शके १८४७ फाल्गुन शु. ६ गुरुवारी सध्याकाळी श्रीदत्ताची आरती व मत्रपुष्प आटोपल्यावर महाराज सर्व मडळीस दूर करून समाधीचे आसन घालून बसले. आचमन करून प्राणायाम केला व लगेच समाधी लावली. लोकाना ही नित्य समाधी अगर महासमाधी आहे हे कळेना. तीन तासपर्यंत ते त्या अवस्थेमध्ये होते. नंतर मान कलली व ब्रह्मरंध्रभेदन करून विदेह मुक्ती घेतली. टाळुस्थानामधून केसासारखी रक्ताची धार निघाली होती. (समाधीकाल रात्री ११॥) समाधीस सरकारी परवानगी मिळण्यास १७ तास लागले. तोपर्यंत महाराजाचे सर्वांग मऊ होते. स्नानानतर कफनी, रुद्राक्षमाळा व हार घालण्यात आले. तीर्थासाठी कोण घडपड! मंगल स्नानाचे पाट वाहू लागले व शेवटी तेथील माती चिखल लोकानी अगास लावून घेतला. समाधीचे जागी कमडलू व दत्तमाहात्म्य पोथी ठेवली. सर्वांनी जड अंत.करणाने समाधीचे द्वार

बंद केले. त्या वेळी सर्व जातीचे लोक जमले होते. सर्व आटोपण्यास रात्री ११ वाजले; तोपर्यंत अष्टे गावातील चूल बंद होती. या निर्वाणामुळे अनेक लोक कष्टी झाले.

— भा. का. चंदूरकर

## ३८. नारायणमहाराज केडगावकर

### (सन १८८५–१९४५)

कर्नाटकातील शिंदगी गावच्या एका दत्तभक्तिसंपन्न अशा घराण्यात भीमराव व लक्ष्मी यांच्या पोटी एका तेजस्वी मुलाचा जन्म शके १८०७ मध्ये झाला. विजापूर जिल्ह्यातील बागलकोट हे त्याचे जन्मस्थान होय. या बालकाचे नाव नारायण ठेवण्यात आले. लहानपणीच नारायणाचा पिता व नंतर लौकरच त्याची माता यांचे निधन झाले. नरगुंद येथे आजीच्या देखरेखीखाली नारायण वाढू लागला. व्यंकटेशाच्या देवळात बसून ध्यान करावे, भजन–कीर्तनात रंगून जावे, डोंगरावरील गुहेत ध्यानस्थ बसावे, असा नारायणाचा छंद होता. नरगुंद येथील दरेकर यांच्या घरी नारायण असताना श्रीधरभट घाटे यांच्या सहवासात त्याला उपासनेची गोडी लागली. नित्य स्नानसंध्या, सूर्यनमस्कार, गुरुचरित्रपठण, गायत्रीमंत्राचा जप यांत तो रमून जायचा. घरगुती कटकटीमुळे नारायणास अल्पवयातच आजीचे घर सोडावे लागले.

वयाच्या दहाव्या वर्षापासूनच नारायणाची भ्रमंती सुरू झाली. कुंदगोळ, यल्लमा डोंगर, सोगर, विजापूर, उगुरगोळ, गुलेहसूर, हुबळी इत्यादी ठिकाणचा त्याने प्रवास केला. हुबळीस सिद्धारूढ स्वामींचा आशीर्वाद घेऊन नारायण बेळगाव शहराकडे आला. बेलापूरचे श्रीविद्यानंद महाराज हे त्या वेळी शहापुरास होते. याच श्रीविद्यानंदस्वामींची परंपरा बालनारायणाने चालवावी असा संकेत होता. नृसिंहवाडी, औदुंबर, पलुस, सज्जनगड येथील प्रवास संपवून नारायण पुण्यास आला. त्यानंतर तो दौंडजवळच्या आर्वी मुद्गलेश्वर नावाच्या क्षेत्रास गेला. या वेळी त्याच्याजवळ कोपरगावचे त्र्यंबकराव अत्रे, कुलकर्णी होते. त्यांच्या पत्नीस पिशाचबाधा होती, ती दूर व्हावी म्हणून ते आर्वीस उपासना करीत होते. येथेच नारायणास गाणगापुरास जाण्याचा दृष्टान्त झाला. दत्तकृपेकरून पारेवाडीच्या जहागीरदाराने मदत केल्याने नारायणास गाणगापुरास येणे सुलभ झाले. नारायणाच्या दैवी सामर्थ्याचा प्रत्यय आता लोकांना येत राहिला. गुरुचरित्रपारायण, ध्यानधारणा, उपासना यांत नारायण रंगून गेला असताना त्याचे चुलतबंधू शंकरदेव संती गाणगापुरास आले. त्यानाही नारायणाचे सामर्थ्य पटले. नारायण हा साक्षात् दत्तावतार असल्याची साक्ष अनेकांना पटत गेली. श्रीदत्ताच्या आज्ञेवरून नारायण पुनः आर्वीस आला. बालनारायण हा वाळूच्या खड्यांची खडीसाखर करतो, हे पाहून लोकांना नवल वाटत राहिले. पुढे सुप्याचे सदाशिव गणेश देशपांडे, वढाणकर यांच्याबरोबर नारायण सुप्यास आला. सदाशिव ऊर्फ नानासाहेब व त्यांच्या पत्नी उमाबाई यांची श्रद्धा नारायणावर होती. जवळच्याच जुन्या बेटात झोपडी बांधून नारायणाची उपासना सुरू झाली. त्याच्या दैवी प्रभावामुळे लोक त्याला नारायणमहाराज म्हणून ओळखू लागले.

याच जुन्या बेटात औदुंबर वृक्षाखाली दत्तपादुका त्यांना सापडल्या. सांजसकाळ पादुकांची पूजाअर्चा होत राहिली. दत्तप्रभूच्या नावाची गर्जना करताच नारायण महाराजाच्या हातातून गंगेची धार निघत असे. नारायण महाराजांच्या जुन्या बेटास जाण्यासाठी केडगाव येथे उतरावे लागे. नाना गावचे लोक त्यांना नारायणमहाराज केडगावकर या नावानेच ओळखू लागले. मुंबईच्या

विख्यात गायिका अजनी मालपेकर या एक थोर गायिका व नर्तकी होत्या त्याचा आवाज बसला. कोणत्याही इलाजाने गुण येईना. नारायण महाराजाच्या कृपाशीर्वादाने त्याना गुण आल्यावर अजनीबाईंनी त्याना गुरुस्थानी मानले. मुबईस त्याच्या 'श्रीनारायणआश्रम'मध्येच महाराजाचा मुक्काम असे. पुण्याच्या डेक्कन कॉलेजचे प्रिन्सिपल वुडहाऊस एकदा बेटास शिकारीसाठी आले त्याना हवे होते त्या ठिकाणी महाराजानी पाणी काढून दिल्यामुळे महाराजाचा लौकिक साऱ्या भारतात वाढला वुडहाऊसनी हा चमत्कार वृत्तपत्रात प्रसिद्ध केल्यामुळे बेटाकडे लोक सतत येत राहिले अनेक थोर लोक नारायण–महाराजाच्या परिवारात येत राहिले अनेकानी महाराजाच्या सहवासासाठी बेटावर बगले बाधले

नव्या बेटावर आता दत्तसस्थान नावारूपास येत राहिले निवडुग व खाचखळगे यानी भरलेली नऊ दहा एकराची जमीन नारायण महाराजाना मिळाली खानदेश, मुबई, पुणे, नागपूर इत्यादी ठिकाणाहून सपत्तीचा पूर लोटला, इमारतीसाठी सामानसुमान आले. बेट नारायण महाराज या नावाने एक ब्रँच पोस्ट ऑफिस सुरू झाले अत्यत शोभिवत अशा सगमरवरी दगडाचे दत्तमदिर उभे राहिले. कोठी, स्वयपाकगृह, अन्नपूर्णागृह, निवासस्थान याची निर्मिती झपाट्याने होत गेली मुबईच्या गणपतराव म्हात्रेकडून सुदरशी दत्तमूर्ती लाभली दत्तस्थापनेचा दिवस वैशाख शु. ५ शके १८३५ (सन १९१३) हा ठरला. काशी, म्हैसूर, काठेवाड इत्यादी ठिकाणाहून वैदिक ब्राह्मण जमा झाले आणि मोठ्या थाटाने नव्या दत्तमदिरात दत्तमूर्तीची स्थापना झाली. जुन्या बेटातील मूर्ती पुण्यास अर्काटकर यानी आपल्या 'श्रीपाद-आश्रम' या निवासस्थानी बनविली. यानतर महाराजानी काशी, गया, प्रयाग, नेपाळ येथील प्रवास केला नेपाळनरेशानी महाराजाचा गौरव करून विविध वस्तू देणग्या म्हणून दिल्या. महाराजाच्या वैभवात अशीच देणग्याची नित्य भर पडत होती. सोन्याची दत्तमूर्ती, चादीचे सिंहासन, चादीची पालखी, भरजरी गालिचे इत्यादी वस्तूच्या देणग्या सतत मिळत गेल्या सन १९३२ मध्ये दत्तमदिरापुढे भव्य मडप बाधून तयार झाला. सन १९३६ साली बेटावरील लिंबाच्या झाडीत भव्य मडप टाकून ११०८ सत्यनारायणाच्या पूजा मोठ्या थाटाने झाल्या बेटावर जणू एक नवे शहरच वसले होते

यानतर नारायण महाराजानी दोनशे भक्ताना बरोबर घेऊन मोठ्या ऐश्वर्याने तीर्थयात्रा केली इदूरजवळील ओकारमाधाता, उज्जयनी, मदुरा, श्रीरगम्, चिदबरम, शिवकाची, विष्णुकाची, मद्रास, तिरुपती, जगन्नाथपुरी, कलकत्ता, नवद्वीप, गया, बद्रीनारायण, दिल्ली इत्यादी ठिकाणी महाराजाची तीर्थयात्रा मोठ्या थाटाने व ऐश्वर्याने झाली. सन १९४२ साली द्वारका, प्रभासपट्टण, सोरटी सोमनाथ, पोरबदर, डाकोर, अशा ठिकाणचा प्रवास महाराजानी केला. अनेक राजे-महाराजे नारायणमहाराजापुढे लीन असत बेट केडगावचे वैभव वाढत होते भजन, नामस्मरण आणि दैवी चमत्कार यामुळे त्याचा लौकिक एकसारखा वाढत होता.अजनी मालपेकर, विष्णु दिगबर पलुस्कर, नेपाळ, ग्वाल्हेर, इदूर, बासदा, पोरबदर, म्हैसूर, भोर इत्यादी ठिकाणचे सस्थानिक, डॉ. बेलसरे, आबासाहेब मुजुमदार, हिराचद शेठ इत्यादीची नारायणमहाराजावर मोठी श्रद्धा असे. त्याच्या प्रेरणेतून अनेकाना दत्तभक्तीची दीक्षा मिळाली.

सन १९४२–४३ च्या दुसऱ्या महायुद्धाच्या काळात महाराजाची प्रकृती खालावली ॲनिमियामुळे ते अशक्त बनले होते. सन १९४५ मध्ये त्याचा एकसष्टावा वाढदिवस थाटाने साजरा झाल्यानतर त्यानी हवापालट म्हणून उटकमड व निलगिरी येथे जाण्याचा बेत केला.

गुंटकलवरून ते बंगलोरला निघाले. बंगलोर, म्हैसूर, उटकमंड येथील वास्तव्याने महाराजांची प्रकृती सुधारली नाही. म्हैसूरहून परत ते बंगलोरला आले. तेथील ग्रामदेवता श्रीमल्लिकार्जुनास महाराजांनी अतिरुद्राचा अभिषेक केला. सोन्याची एकशे अकरा कमळे देवास वाहण्यात आली. महाराज अतिशय थकून गेले होते. पूर्णाहुती झाल्यावर ब्राह्मण भोजनास बसले असल्याचे कळताच संकल्प पूर्ण झाला असे समजून महाराजांनी आपला आत्मा दत्तस्वरूपात विलीन करून टाकला. त्याच गावी त्यांच्या देहावर अंत्यसंस्कार झाले. लाखो लोकांनी त्यांचे अंतिम दर्शन घेऊन त्यांना अखेरचे वंदन केले. केडगाव बेटात ज्या ठिकाणी महाराज निवासस्थानी वसत, त्या ठिकाणी अस्थींचा कलश स्थापन करण्यात आला. काही दिवसांनंतर रीतसर समाधिस्थान तयार करवून तेथे पादुकांची स्थापना झाली.

## ३९. रंग अवधूत

### ( सन १८९८–१९६८ )

प. प. श्रीमत् वासुदेवानंद सरस्वती टेंबेस्वामी गुजरातेत दत्तभक्तीची गोडी निर्माण करून श्रीक्षेत्र गरुडेश्वरी ब्रह्मस्वरूपी लीन झाले. ही दत्तभक्तीची परंपरा त्यांचे शिष्य प. पू. श्रीरंग अवधूत महाराजांनी वाढीला लावून गुजराती जनतेच्या हृदयात अढळ स्थान मिळविले. " दिगंबरा दिगंबरा, श्रीपाद वल्लभ दिगंबरा " भजनाने अवघा गुजरात घुमू लागला. दत्तभक्तीचा सुगंध जिकडेतिकडे दरवळू लागला. पैसा, मान, कीर्ती यापलीकडे देखील एक आनंददायी विश्व आहे, याची जाण अधिकाधिक गुजराती जनतेला होऊ लागली.

त्या श्रीरंग अवधूत महाराजांचे पूर्वाश्रमीचे नाव पांडुरंग विठ्ठल वळामे. श्रीमहाराजांचे वडील विठ्ठलपंत हे धर्मपरायण, वेदपरायण व दशग्रंथी विद्वान् ब्राह्मण. गुजरातेतील गोधरा या शहरात श्री. सखारामपंत सरपोतदार यांच्या विठ्ठलमंदिरात देवपूजेसाठी रत्नागिरी जिल्ह्यातील संगमेश्वर तालुक्यातील 'देवळे' या गावाहून आले. विठ्ठल व रुक्मिणी या भाग्यशाली मातापित्यांच्या पोटी श्रीरंग अवधूत महाराज कार्तिक शुद्ध अष्टमीला गोपाष्टमीला जन्मले. (विक्रम-संवत १९५५)

बालपणापासूनच श्रीमहाराजांना जिज्ञासावृत्ती स्वस्थ बसू देईना. एकदा दारावरून प्रेत चालले होते. वडिलांना त्यांनी अनेक प्रश्न विचारले. शेवटचा प्रश्न होता, ही जन्ममरणाची उपाधी दूर होण्यास उपाय कोणता? वडिलांनी सांगितले, श्रीरामनामामुळे उपाधी दूर होते. श्रीमहाराजांनी मनाशी खूणगाठ बांधिली. श्रीरंग अवधूत महाराज गुजरातीत लिहितात–

'नाममंत्र मोटो छे जगमा, जनम-मरण
भूत जाय;
मुक्ति सुदरी दौडी आवे आकर्पण एवूं थाय।
हरिना नामनो सौथी मोरो छे आधार।'

दिव्य, तेजस्वी अशा या योगभ्रष्ट आत्म्याला पूर्वजन्माची अपूर्ण साधना पूर्ण करण्याची तीव्र तळमळ लागली; ईश्वराच्या भेटीची उत्कंठा साधनेच्या पायऱ्या भराभर चढू लागली.

पांडुरंग ५ वर्षांचे व धाकटे नारायण २॥ वर्षांचे असतानाच माता रुक्मिणीबाईंच्या पदरात ही दोन लहान बालके टाकून विठ्ठलपंत प्लेगला बळी पडून विठ्ठलचरणी विलीन झाले.

पांडुरंग ८ वर्षांचे झाले. देवळे गावी व्रतबंध झाला. उपनयनविधीनंतर श्रीनृसिंहवाडीला प. प. श्री. वासुदेवानंदसरस्वती महाराजांच्या दर्शनाला आले. श्रीटेंबेस्वामी म्हणाले, " हा बाळ तर आमचाच आहे." हे शब्द ऐकताच पांडुरंगांनी कपड्यासकट श्रीचरणांवर मस्तक अर्पण केले. मार्ग स्पष्ट झाला. साधनेला धार चढू

लागली 'धाव धाव दत्ता किती वाहू आता। चैन नसे चित्ता येई वेगी॥' असे आर्त स्वर निघू लागले 'धेनु जेवी वत्सा धाव दत्ता तैसा। तुजविण कैसा राहू जगी?॥' म्हणून डोळ्यातून प्रेमाश्रू येत आणि त्या करुणानिधान परमात्म्याला करुणा आली. यानी शब्द पडले 'पोथी पहा!' मामाच्याकडे श्रीगुरुचरित्राची पोथी होती त्याची अखंड पारायणे सुरू केली मन शांत झाले

श्रीरंग अवधूत महाराजाची बुद्धी तेजस्वी, स्मरणशक्ती तीव्र होती. मराठी, गुजराती, इंग्रजी, हिंदी व संस्कृत या भाषावर प्रभुत्व होते. पदरी लहान भाऊ विधवा माता याच्या पालनपोषणाची जबाबदारी होती म्हणून बी ए ची परीक्षा दिली. काही काळ शिक्षकाची नोकरी पत्करली पण मन रमेना मूळची वृत्ती फकिरी

धाकटा बधू नारायण आता मातेचे पोषण करण्यास समर्थ झाला हे पाहून रुक्मिणीमातेची आज्ञा घेऊन श्रीपांडुरंग आध्यात्मिक तपाकरिता घराबाहेर पडले

तपसी छोड दिया ससार।
जैसी सूकर विष्ठा भाई।
तैसे भवसुख भुजमन आई।
दत्त दिगबर मन लुभाई।
तपसी छोड दिया ससार॥

(अवधूती आनंद)

वैराग्याने संतप्त झालेल्याना शांत करणाऱ्या नगाधिराज हिमालयाच्या कुशीत विसावण्याकरिता स्वारी निघाली पण ईश्वरेच्छा बलीयसी! कानावर शब्द आले, 'मागे फीर, मागे फीर' अर्थ कळेना पण श्रीसद्गुरू वासुदेवानंदसरस्वतीची इच्छाच 'मागे फिर' म्हणत होती गुजरातेत अपूर्ण राहिलेले दत्तसंप्रदायाचे नाम पूर्ण कर, हाच आदेश तो होता, आणि म्हणून साधक-मुमुक्षूची माता नर्मदामाई जिच्या दोन्ही तटावर असंख्य तीर्थक्षेत्रे आहेत, अशा एका तीरी श्रीगणेशानी जेथे श्रीशिवलिंग स्थापन केले आहे, अशा श्रीनारेश्वर क्षेत्री त्यानी निवास केला

विक्रम संवत १९८१ च्या मार्गशीर्ष महिन्याच्या हेमंत ऋतूचे दिवस, कडाक्याची थंडी, कृष्णपक्षाची अंधारी रात्र, अशा वेळी मियागामकडून कोरलकडे जाणाऱ्या गाडीतून मालोद स्टेशनवर (हल्लीचे नारेश्वर रोड) श्रीमहाराज उतरले नारेश्वर शिवालयाची वाट चालू लागले नारेश्वर शिवालयाचे समोर कडूनिंबाच्या झाडाखाली थांबले नजर टाकली काय होते तेथे? जेथे आज हजारो लोक उत्तम धर्मशाळात राहतात, भोजनगृहात भोजन घेतात, नर्मदामाईच्या घाटावर स्नान करितात, रात्री विद्युतदीपानी आसमंत उजळून जातो, अशा आजच्या नारेश्वरी ४५ वर्षापूर्वी होते एक निबिड अरण्य! जेथे दिवसा लोक जावयास भीत, ते होते आजूबाजूच्या गावाचे स्मशान! मोठमोठी वारुळ, विषारी सर्प, विंचू, हिंस्र पशू याचा वास असे! नर्मदामाईच्या किनाऱ्यावर जावयास साधी पायवाट देखील नव्हती अशा निवासाचा लोभ त्याना जडला

जीर्ण शिवालयासमोरील निंबवृक्षाखालची भूमी हेच निवासस्थान! अनुष्ठानाला सुरवात झाली खाण्यापिण्याची काळजी त्या भगवताला "तन की सुधि न जिसको, मनकी कहाँसे प्यारें?" परमसद्गुरू श्रीवासुदेवानंदसरस्वती महाराजाच्या "श्रीदत्तपुराणाची" अष्टोत्तरशत पारायणे पूर्ण झाली उद्यापनास द्रव्य नाही सद्गुरूची आज्ञा झाली, १०८ दिवसात नर्मदाप्रदक्षिणा पुरी कर, म्हणजे तप प्रधान उद्यापन होईल

नर्मदाप्रदक्षिणेचा निश्चय ठरला पण कानात शब्द घुमू लागले, 'ब्रह्मचारी, तू दक्षिणेकडे जा' गुरुमहाराजाची आज्ञा मानून चालू

लागले. इकडे श्रीवासुदेवानंदसरस्वतीचे मराठी चरित्र 'गुरुमूर्तिचरित्र' गुजराती शिष्य श्रीगांडामहाराज यांनी लिहिले होते. त्यांना सांगितले, "तू काळजी करू नको; एक ब्रह्मचारी तुझ्याकडे येत आहे." दोघांना अंतरीची ओळख पटली. मराठी प्रत शुद्ध करण्याचे काम अंगावर घेतले.

बारा ज्योतिर्लिंग ओंकारेश्वर येथून नर्मदा-प्रदक्षिणेस सुरुवात झाली. रोज २५–३० मैल चाल होत असे. एकदा तर एका दिवसात ५६ मैल चालून गेले.

तेरो नाम ही गावत जाऊँ, धाऊँ रूप विशाल;
कानोंमें तेरी ही चर्चा, और न शब्द विचार!
मुर्दा बन के फिरूँ जगत में, सार खराब निहार!
निर्विकार सदा निःसंगी, डरूँ न देखत काल!

कशाची भीती, कशाची पर्वा, ना तहान, ना भूक! गूळपाणी हाच पोटाला आधार! बरोबरीचे लोक म्हणत, महाराज, कशाला हा कष्टप्रद प्रवास करता आहात? महाराज म्हणत, मला तर कष्ट वाटतच नाहीत; जिकडे तिकडे आनंदच आनंद भरून राहिलेला दिसतो.

नर्मदाप्रदक्षिणा म्हणजे दिव्यच आहे. एकदा बरोबरीच्या लोकांबरोबर चालले असताना लोक म्हणाले, 'महाराज अस्वल आले.' लोक घाबरले. महाराजांनी 'गुरुदेव दत्त' ही आरोळी ठोकल्याबरोबर अस्वल उड्या मारीत निघून गेले.

पूर्वसंकल्पित श्रीगुरुआज्ञेप्रमाणे १०८ व्या दिवशी नर्मदाप्रदक्षिणा पूर्ण करून उद्यापनाची सांगता केली. यानंतर पूर्वी ठरल्याप्रमाणे श्रीगांडामहाराजांनी लिहिलेला 'श्रीगुरुमूर्ति-चरित्रग्रंथ' संशोधन करून भडोच शहरी छापवून घेतला, आणि तेथेच १०८ श्लोक असलेले 'वासुदेवनामसुधा' हे श्रीटेंबेस्वामींचे जीवन-चरित्र संक्षिप्त रूपाने लिहिले.

नारेश्वरी श्रीमहाराजांचा कीर्तिसुगंध दरवळू लागला. आर्त, मुमुक्षू यांची रीघ लागली. जंगलचे मंगल झाले. श्रीदत्तजयंतीकरिता हजारो लोक येऊ लागले. पण नारेश्वरला खरे माहात्म्य प्राप्त झाले ते श्रीरंग अवधूत महाराजांच्या पूज्य मातोश्रीच्या करिता! संवत् १९९२ मध्ये पू. मातोश्री नारेश्वरी राहण्यास आल्या. धाकटे बंधू नारायणराव हेही आजारी अवस्थेत नारेश्वरी आले. परंतु प्रभूची इच्छा निराळीच होती. नारायणरावाचा नश्वरदेह श्रीदत्तचरणी विलीन झाला.

नारेश्वरी दत्तकुटी तयार झाल्यावर बरेच आश्रम, धर्मशाळा बांधून तयार झाल्या. महाराजाचे गुजराती भक्त त्यांना राजैश्वर्यात ठेवते होते. पण महाराजाची वृत्ती अत्यंत विरागी! फक्त एक लंगोट हेच वस्त्र. द्रव्यस्पर्श सहन होत नसे.

प्रतिवर्षी आषाढ शुद्ध पौर्णिमा–गुरुपौर्णिमा साजरी केली जाते. गुरुद्वादशी, गुरुप्रतिपदा, दत्तजयंती तर फारच थाटात होत असे. पुढे पुढे दरवर्षी महाराज एखाद्या गावी जाऊन तेथे दत्तजयंती साजरी करीत. यामुळे अनेक गावांतील लोकांना त्यांच्या दर्शनाचा लाभ मिळे.

कार्तिक शुद्ध नवमी (कूष्मांडनवमी) हा महाराजांचा जन्मदिवस. रंगजयंती या नावाने गुजरातमध्ये हा दिवस प्रसिद्ध आहे. दरवर्षी निरनिराळ्या गावी हा होत असतो.

डाकोर, द्वारका व नारेश्वर येथील ६० वी रंगजयंती तर फारच थाटाची झाली. हजारो भक्त या रंगजयंतीत सामील होत. मोठ्या प्रमाणावर अन्नदान होते. महाराजाना फुलाचे निरनिराळे पोषाख करून घालणे हा तर गुजराती भक्ताचा आवडता छंद! श्रीकृष्णाकडे जसे व्रजवासी आकर्षित होतात, तसे सर्व गुर्जर बंधु-भगिनी श्रीमहाराजाकडे आकर्षित होत असत. महाराज कधी प्रवचन करीत नसत.

अनेक वेळा तर त्यांचे मौनव्रत असे. पण सहज बोलता बोलता भक्तांना मार्गदर्शन होई

महाराजांच्या मातोश्रींची तब्येत बरी नसे अनेक भक्त प्रवासासाठी त्यांना विचारत आमच्या गावी या, हा लकडा लागे पण 'मातृदेवो भव' हा भाव मनी असल्यामुळे आईची परवानगी घेतल्याखेरीज ते कोठेही जात नसत

महाराजांनी काही गुजराती भक्तांबरोबर १९५० साली गाणगापूर, नृसिंहवाडी, औदुंबर, पंढरपूर, अक्कलकोट वगैरे तीर्थक्षेत्री यात्रा केली यानंतर त्यांनी तर माणगावी श्रीटेंबेस्वामींच्या जन्मग्रामी मोठ्या प्रमाणात श्रीदत्तजयंती साजरी केली श्रीटेंबेस्वामींच्या समाधीस्थानी–गरुडेश्वरी–तर दर आषाढ शुद्ध प्रतिपदेला उत्सवासाठी ते जात श्रीमहाराज ज्या दिवशी हरिद्वारला समाधिस्थ झाले त्याच दिवशी पहाटे गरुडेश्वरी सद्‌गुरूंच्या समाधीच्या दर्शनासाठी आलले तेथील एका सेवकाने पाहिले श्रीमहाराज भक्तांची कामना पूर्ण करण्यासाठी गुजरातेतील अनेक गावी जात मुंबईला १९६५ साली मोठा दत्तयाग माधवबागेत झाला, त्या वेळेस ते तेथेच उपस्थित होते १९६७ साली श्रीमहाराज आफ्रिकेतील भक्तांच्या करिता नैरोबी, कपाला या ठिकाणी ४–६ महिने जाऊन आले

महाराजांनी गुजराती, मराठी व हिंदी भाषात विपुल साहित्य निर्माण केले मराठीत गुरुचरित्रग्रंथ आहे त्याचप्रमाणे गुजरातेत त्यांनी 'गुरुलीलामृत' ग्रंथ लिहिला यामध्ये श्रीगुरुचरित्र, (सरस्वती गंगाधर) श्रीगुरुमूर्तिचरित्र, (गांडा महाराज) यांचा समावेश आहे हा ग्रंथ ज्ञान, कर्म व उपासनाकांड या तीन भागात आहे गुजराती भक्त याची अखंड पारायणे करतात दत्तबावनी– श्रीगुरुचरित्राची ५२ श्लोकांची ही गुजराती दत्तबावनी फक्त तीन मिनिटांत म्हणून होते लाखो गुजराती भक्त दररोज ही दत्तबावनी म्हणतात एका भक्ताचे संकट निवारण्यासाठी श्रीमहाराजांनी ही दत्तबावनी लिहिली भक्ताचे संकट दूर झाले व तीच दत्तबावनी संकटकालात लाखो श्रद्धावान् भक्तांचा आज आधार बनली आहे या दत्तबावनीच्या जोरावर भक्तांमध्ये अपूर्व आत्मविश्वास निर्माण होऊन कोणत्याही संकटातून पार पाडण्याचे सामर्थ्य अंगी येते जेथे जेथे गुजराती दत्तभक्त आहेत तेथे तेथे दत्तबावनी आहेच महाराजांनी अनेक गुजराती भजने प्रासादिक भाषेत लिहिली आहेत हजारो भक्त दररोज ती म्हणतात अवधूती आनंद, अवधूती मस्ती, ग्राम अवधूत, ऊभो अवधूत, बठो अवधूत, त्याचप्रमाणे हिंदी अवधूती मौज हे भजनाचे पुस्तक प्रसिद्ध आहे दत्तनाम संकीर्तन, श्रीदत्तपंचपदी, उप प्रार्थना, या छोट्या पुस्तिका नित्य उपासनेसाठी आहेत उपनिषदांनी वातो, पत्रगीता, संगीतगीता, आत्मचिंतन, दत्तउपासना, अबुध अवधूत, नित्यस्तवन, अष्ट गरबी, डाकोरमाहात्म्य, हालरडा वगैरे पुस्तके प्रसिद्ध आहेत

महाराजांनी मराठीत श्रीवासुदेवसप्तशती ही ७०० श्लोकांची पोथी लिहिली आहे रंगतरंग हे भजनाचे पुस्तक आहे अभंग तर अत्यंत रसाळ आहेत आर्त भाव व्यक्त होतो देवापाशी मागणे हेच की, 'न मिळो अन्न, वस्त्र प्रावरण। परी दत्त जाण अंतरी ना ॥ कवडीमोल धन होवो नि संतान। न राहो निशाण कोण रडे ॥ हेंचि मागो देवा दे गा संतसेवा। अंतरी केशवा ठाण देई ॥' संस्कृत भाषेत त्यांनी अनेक स्तोत्रे लिहिली आहेत रंगहृदयम् या सुप्रसिद्ध ग्रंथात त्यांनी अनेक स्तोत्रे लिहिली आहेत श्रीवासुदेवनामसुधा, दत्तनामसंकीर्तन, सद्बोधशतकम्, बोधमालिका, दत्तनामस्मरणम्, स्तोत्रषट्कम् वगैरे पुस्तके संस्कृतमध्ये आहेत

श्रीमहाराजांविषयीही अनेक भक्तांनी ग्रंथ लिहिले आहेत सौ भागिरथीबाई रूपी यांनी

मराठीत व डॉ. वाणी यांनी गुजराथीत चरित्र लिहिले आहे. मराठी-गुजरातीत रंगबावनी आहे. रंगस्तवन, नारेश्वरनो संत, अवधूतदर्शन, अवधूत-स्मरण, अलौकिक अवधूत, रंगचिंतामणी, श्रद्धानु फळ, श्रीअवधूतप्रशस्ती, रंगप्रशस्ती, रंग-मंगलमालिका व सरतेशेवटची श्रद्धांजली वगैरे पुस्तके प्रसिद्ध आहेत. यांशिवाय प्रवासी अवधूत, सप्ताहमायो, सप्ततीर्थी वगैरे प्रवासविषयक माहितीने परिपूर्ण अशी पुस्तके आहेत. श्रीमहाराजांची ६० वी रंगजयंती नारेश्वरला साजरी झाली होती, त्यासंबंधी तसेच डाकोरची रंगजयंती, यांसबंधी माहितीपूर्ण पुस्तके निघाली आहेत.

श्रीमहाराजांनी काळाची पावले ओळखून अनेक लोकोपयोगी कार्यक्रम नारेश्वरी घडवून आणले. त्यांपैकी एक म्हणजे १९६५ साली पाकिस्तानशी युद्ध सुरु झाल्यावर रायफल क्लब चालू करुन एक शिबीर भरविले. दुसरे शिबीर म्हणजे, शस्त्रक्रिया-शिबीर. गुजरातमधील नामांकित शस्त्रवैद्याकडून गोरगरीबांच्या अनेक शस्त्रक्रिया मोफत करविल्या.

मातोश्रींच्या प्रकृतीला आराम पडेना. अनेक उपाय झाले. 'न मातुः परदैवतम्' म्हणून अनेक प्रकारे त्यांनी सेवा केली. आईसाठी म्हणून श्रीमहाराज नारेश्वरपासून फारसे दूर कधी गेलेच नाहीत. अखेर निर्जळा एकादशीच्या दिवशी पू. मातोश्री श्रीविठ्ठलचरणी लीन झाल्या. महाराजांनी सर्व विधी यथासांग केले.

मानंतर भक्तांच्या इच्छेप्रमाणे आफ्रिकेला जाऊन परत आल्यानंतर त्यांनी मातोश्रींचे प्रथम वर्षश्राद्ध केले. पू. मातोश्रींच्या मुळे गुजरातला श्रीरंगअवधूत महाराजांचा लाभ झाला म्हणून पू. मातोश्रींना भक्त फार मान देत. प्रथम वर्षश्राद्धदिनी २०-२५ हजार भक्तांनी महाप्रसाद घेतला.

श्रीमहाराजांचे सर्व लौकिक पाश तुटले. 'हम सदा नि:संगी है' म्हणणारे महाराज निर्वाणीची भाषा काढू लागले. १९६८ मधील ऑक्टोबर महिन्यात त्यांनी नारेश्वर सोडले ते कायमचेच. हरिद्वारला जावयाचे म्हणून महाराज निघाले.

अवधूतआश्रमाचे ट्रस्टी श्री. मोदीकाका, एक महान् भक्त, कार्यरत सेवक यांना काय कल्पना की महाराजांचा पार्थिव देह येथे नोव्हेंबरमध्ये चिरशांती घेण्याकरिता हरिद्वारहून परत येणार आहे. नारेश्वर सोडताना महाराज म्हणाले, मी नारेश्वरी आलो तेव्हा एक लंगोटी अंगावर होती. आता जातानाही फक्त लंगोटी अंगावर आहे. सर्व वैभव, राजविलासी ऐश्वर्य सोडून ममत्व न ठेवता महाराज निघाले अनंतात विलीन व्हावयाला! नारेश्वरनंतर अनेक गावी भक्तांना दर्शन देत देत गुरुद्वादशीला ते अरेरा गावी आले. नडियादजवळ हे गाव आहे. नंतर कापडवंज वगैरे गुजरातेतील गावांनंतर जमपूरला आले. एक भक्त म्हणाला, मी हरिद्वारला तुमच्याबरोबर येतो. महाराज म्हणाले, हरीच्या दारी गेलेला परत येत नाही. यावयाचे असेल तर या! हरिद्वारला फक्त ४-५ भक्त बरोबर होते. सर्व तीर्थे बघितली. सकाळी साधूंना भोजन दिले. १९ नोव्हेंबर, मंगळवारी १९६८ ला रात्री ९ वाजता भक्तांना सांगितले, मनात काही-तरी होत आहे. भक्त मंडळींना कल्पना येण्याच्या आधीच श्रीमहाराज श्रीदत्तचरणी विलीन झाले. लाखो भक्तांचा लाडका संत समाधिस्थ झाला. बडोदा, अहमदाबाद, नारेश्वरला ट्रंका लागले. त्याच दिवशी दिल्ली, अहमदाबाद, बडोदा रेडिओने बातमी दिली. अवघा गुजरात ढसढसा रडावयास लागला. रात्रभर भक्तांना चैन पडेना. श्रीमहाराजांचे अंतिम दर्शन कसे व्हावयाचे याची चिंता लागून राहिली. हरिद्वार शेकडो मैल दूर! ट्रस्टींनी ठरविले की, महाराजांचा पार्थिव देह नारेश्वरी आणावयाचा! काही मंडळी हरिद्वारला विमानाने गेली. दिल्लीहून अहमदाबादपर्यंत विमानाने आणले व अहमदाबाद ते

नारेश्वर शृंगारलेल्या ट्रकवर आणून लाखो भक्तांना दर्शन दिले. अहमदाबाद, बडोदा, सुरत, नडियाद, आणंदकडून दिवसभर २५ हजार भक्त आले. रात्री १२ ला नर्मदामाईच्या स्नानानंतर चंदनकाष्ठावर देह ठेवून अग्निसंस्कार केला. थडक थडी, पण भक्तांचा महापूर लोटला होता. भक्तांना अंतिम दर्शन मिळाले. १२–१३ दिवसां पर्यंत लाखो भक्त नारेश्वरी येऊन श्रद्धांजली वाहून गेले.

श्रीमहाराजांच्या प्रथम वर्षश्राद्धदिनी भक्तांनी सुंदर मंदिर बांधले आहे. मातृमंदिरासमोरच मातृभक्त पुनाचे मंदिर ! श्रीमहाराज लौकिक अर्थाने समाधिस्थ झाले. पण भक्तांच्या हृदयात ते आहेत.

हजारो गुजराती बांधवांच्या तोंडी रंग अवधूत खालील धूनच्या स्वरूपात आहेत.

रंग अवधूत रे, रंग अवधूत रे।
नारेश्वरनो नाथ मारो रंग अवधूत रे॥
गाणगापूरमा वसे मारा नरसिंह सरस्वती रे
अक्कलकोटमा वसे मारा स्वामी श्रीसमर्थ रे॥
गरुडेश्वरमा वसे मारा वासुदेवानंद रे।
शिरडीमा वसे मारा साईनाथबाबा रे॥
रंग अवधूत रे, रंग अवधूत रे।
नारेश्वरनो नाथ रंग अवधूत रे॥

## ४०. गुळवणी महाराज
### (सन १८८६–१९७४)

वामनरावांचे पिताजी दत्तभट गुळवणी हे नारायणभटजींचे चिरंजीव. गुळवणी हे कोल्हापूर भागातील कौल्वगावचे एक सदाचारसंपन्न मध्यमवर्गीय कुटुंब. वामनरावांच्या मातुश्री उमाबाई या जवळच्या पंचक्रोशीतल्या श्री मारुतीपंत कुलकर्णी यांच्या कन्या. वामनरावजींचे मातापिता दोघेही विरक्त आणि महान् भगवद्-भक्त होते. बाडीची वारी करण्याचा त्यांचा प्रघात होता.

वामनरावांचा जन्म २३ डिसेंबर १८८६ गुरुवार रोजी कुडुत्री येथे झाला. 'शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते' या भगवद्-दुक्तीप्रमाणे सदाचारसंपन्न वैराग्यशील कुटुंबात त्यांचा जन्म झाला.

वयाचे आठवे वर्षी उपनयनसंस्कार झाल्यावर वडील बंधूंनी संध्या, पूजा, वैश्वदेव, पुरुषसूक्त वगैरे धार्मिक आचाराचे शिक्षण दिले. कोल्हापुरात प. आत्मारामशास्त्री पित्रे यांचकडे रुपावली, समासचक्र, अमरकोश, रघुवंश ८ वा सर्ग, अज-विलाप, पंचतंत्र वगैरे संस्कृत ग्रंथांचे अध्ययन झाले.

वामनरावांना उपजतच चित्रे काढण्याचा नाद असे. १९०६–७ साली त्यांनी ड्रॉइंगच्या दोन्ही परीक्षा दिल्या आणि थर्ड ग्रेड परीक्षेसाठी ते मुंबईस जे. जे. स्कूल ऑफ् आर्ट या कलासंस्थेत गेले. वामनरावांनी विवाह करून प्रपंच थाटावा या हेतूने वडील बंधू व मातोश्रींनी वामनरावांना सांगून पाहिले. पण विवाहसंस्कार व्हावा, सामान्याप्रमाणे ते संसारी–प्रापंचिक गृहस्थ व्हावे असा विधिसंकेत नव्हता. अशाच काही दैवी घटना या तरुण २१ वर्षाच्या वामनरावांच्या जीवनात घडून आल्या.

१९०७ साली गुरुद्वादशीस स्वामी महाराजांचा मुक्काम नरसोबाचे वाडीस होता. महाराजांनी या उत्सवात भाग घेऊन प्रसाद ग्रहण केला. या वेळी वामनराव कोल्हापूर मुक्कामी होते. 'दत्ताचा एक फोटो व एक हार तयार करून वाडीस ये' असा वडील बंधूंकडून वामनरावास निरोप आला. त्याप्रमाणे ते फोटो व हार घेऊन आले. स्वामींचे दर्शन झाले. महाराजांना फोटो पाहून समाधान वाटले. त्या प्रसंगी वामनरावांना महा-राजांचे हस्ते प्रसादयुक्त असो एक हातात बांधण्यासाठी पेटी मिळाली. ती वामनरावांचे हातात सतत असते. गुरूचा हा प्रथमदर्शनी

मिळालेला प्रसाद एक शुभचिन्हच होते वामनरावजींच्या सर्व जीवनास त्यामुळे कलाटणी मिळावी असा हा अभूतपूर्व योगायोग होता

मध्यंतरी प्लेगचा प्रादुर्भाव झाला. प्लेगने वामनरावाना झपाटले ते दहा दिवस बेशुद्धावस्थेत होते प्लेगची गाठ तशीच होती श्रीगुरुचरित्राची पारायणे सुरू केल्यावर गाठ फुटली व बरे वाटले वामनरावाचा पुनर्जन्म झाला श्रद्धा दृढ झाली नतर वाडीस येऊन माधुकरी मागून वामनरावजींनी श्रीगुरुचरित्राचे सात सप्ताह केले श्रीगुरुकृपा फळाला आली श्रीगुरुदत्तात्रेयाचे ते निस्सीम उपासक झाले

या सुमारास पवनी या गावी श्रीवासुदेवानदसरस्वती महाराजाचा चातुर्मास झाला वडील बधूनी वामनरावास मातोश्रीना घेऊन येण्याविषयी सांगितले वामनराव पवनीस आले आणि योगायोग असा की महाराजाकडून अनतचतुर्दशीच्या पुण्य दिवशी त्याना अनुग्रह मिळाला वामनरावजींच्या जीवनातला हा सुवर्णमगल दिवस !

वामनरावजींनी मुबईस नोकरीनिमित्त काही खटपट केली, पण जमले नाही मग उपरती झाली अगावरील फक्त दोन वस्त्रे व लोटा घेऊन ते गाणगापुरास जाण्यास निघाले वाटेत अत्यत त्रास झाला दौंडला कडक उपवास घडला तो एकादशीचा दिवस होता त्या दिवसापासून वामनरावाचे नित्याचे एकादशीव्रत सुरू झाले

गाणगापूर क्षेत्री श्रीगुरुचरित्र सप्ताह सुरू झाले सातवे पारायण एक दिवसात केले सात पारायणे सपवून सागता केली जवळ काही नव्हते, म्हणून जवळची छत्री व वस्त्रे पुजाऱ्यास देऊन सप्ताहाची सागता केली दृढभक्ती कशी बाणली म्हणजे मनाचा ताबा शरीरावर केवढा बसतो व केवढे कार्य घडते याचे हे मूर्तिमत उदाहरण आहे



गाणगापुरी श्रीगुरुचरित्राचे सप्ताह पुरे झाल्यावर गुरुदर्शनाची ओढ लागली महाराज त्या वेळी हावनूर या भागात सचार करीत होते, असे समजल्यावरून वामनराव पायीच शोधार्थ निघाले गाणगापुराहून पायीच हुटगी–विजापूर सतीमनी गाठले धारवाडजवळील मथिहाळ दत्तमदिरात महाराजाचा मुक्काम आहे ही बातमी मिळताच ते गदगहून धारवाडला गेले जवळ तिकिट काढायला पैसे नव्हते, म्हणून घोगडी होती ती विकून दोन रुपये मिळाले, ते तिकिटासाठी खर्च झाले

ते धारवाडला पोचले आणि स्वामीमहाराज तेथून पुढे सचारास गेले होते असे समजले ! मग पुढे पदयात्रा सुरू झाली गुरूचा शोध ही अतरीची तळमळ प्रेरक ठरली व त्यापुढे कोणत्याही अडचणी आल्या तरी त्याना न जुमानता पुढील मार्ग सुरू झाला मुदग, हरिहर, तुगभद्रा–सगमावरील कुडलीमठ, पुन्हा हरिहर, हुबळी, गदग, आवेगिरी या गावी आले प्रत्येक ठिकाणी महाराज येथे होते, पण येथून ते पुढे गेले अशी बातमी मिळे मग ते मल्लापूर, बागलकोट, हावनूर या गावी गेले हावनूर गावी महाराजाचा मुक्काम गावाबाहेर त्रिकूटेश्वरमदिरात होता महाराजाच्या दर्शनार्थ इतके दिवस तळमळणारे वामनराव या गावी आले आणि तडक मदिरात जाऊन त्यानी महाराजाचे दर्शन घेतले 'मी येथे आपली सेवा करून राहणार' असा आग्रह वामनरावानी धरला एकभुक्त राहायचे, माधुकरी मागून उदरनिर्वाह करावयाचा व सदासर्वकाळ गुरुसेवेत घालवावयाचा, असा कार्यक्रम सुरू झाला रोज तुगभद्रेचे स्नान घडे महाराजाच्या तोडून गीतापाठ व ब्रह्मसूत्रवृत्ती ऐकायला मिळे महाराजानी वामनरावाना गीता व विष्णुसहस्रनाम याची सथा स्वत दिली गुरूचा अनुग्रह मिळाल्याने वामनरावाचे भाग्य दुणावले आपले गुरू हे साक्षात् दत्तावतार आहेत

अशी साक्ष याच वेळी वामनरावाना पटली होती.

महाराजानी वामनरावाना या मुक्कामात आसन, प्राणायाम व अजपाजप या मंत्राची दीक्षा दिली 'माझ्या आयुष्यातला हा सहवास परम-भाग्याचा व आनंददायक' असे वामनरावजी अजूनही सांगत असतात.

वामनरावानी या मुक्कामात तुंगभद्रेचे एक सुंदर चित्र तयार केले. महाराजानी त्रिपुरान्तकेश्वरावर एक सुंदर काव्य रचिले होते. वामनरावानी श्लोक हारबद्ध करून देवीच्या चित्राच्या गळ्यात तो हार घातला महाराजाना फार समाधान झाले. वामनरावानाही आपल्या कलेचे चीज झाले असे वाटले

त्यानंतर महाराज जेथे जेथे संचारास जातील तेथे तेथे त्यांचे समवेत वामनराव जात. सेवा कधी चुकली नाही—कधी अंतर पडले नाही.

मधूनमधून वामनराव गाणगापूर, नरसोबावाडी, औदुंबरास जात. औदुंबरास सन १९१२ साली त्यानी श्रीमालामंत्राचे पुरश्चरण केले. मातुश्री बरोबर होत्या.

श्रीक्षेत्र गरुडेश्वरी महाराजाचा मुक्काम असताना तेथे त्यानी ब्रह्मसूत्रवृत्ती, दशोपनिषदे, श्वेताश्वेतर, कैवल्यमौक्तिक ही उपनिषदे समजावून मागितली. या मुक्कामात वामनरावाना महाराजाकडून 'धोती' ची पद्धती शिकून घेता आली व दीक्षा मिळाली

टेंबेस्वामी यानी एकमुखी दत्ताचे स्तवन केले होते

ते असे—

> मालाकमंडलुरध.करपद्मयुग्मे ।
> मध्यस्थपाणियुगुले डमरुत्रिशूले ।
> यस्य स्त ऊर्ध्वकरयो. शुभशंखचक्रे ।
> वन्दे तमत्रिवरद भुजषट्कयुक्तम् ॥

या ध्यानाप्रमाणे वामनरावानी एकमुखी दत्ताचे सुंदर चित्र तयार केले, त्याप्रमाणे षोडश अवतारांपैकी सिद्धराज, अत्रिवरद, कालाग्निशमन, अवधूत, आदिगुरू लक्ष्मीनरसिंह, अशी सुंदर चित्रे तयार करून दिली. दत्तात्रेयाचे चित्र इतके सुंदर, भावपूर्ण, प्रसन्न आहे की, त्याच्या लक्षावधी प्रती आता घरोघरी दिसतात. दत्तात्रेयाचे चित्र काढण्यास सुरुवात करण्यापूर्वी वामनरावजीना स्वप्नात दत्तात्रेयाचे साक्षात् दर्शन झाले होते व त्याच भावावस्थेत हे प्रासादिक दत्तचित्र तयार झाले! चित्रकलेची सार्थकता झाली!

महाराजाच्या कृपेने महाराजाचे परमभक्त श्रीगोडबुवा महाराज, श्रीगोविंदमहाराज पंडित, श्रीसीताराम महाराज यांचेशी वामनरावाचा सहवास घडला.

वामनरावानी १९१७ ते १९२६ पर्यंत १० वर्षे बार्शी येथे म्युनिसिपल शाळेत व १९२६ ते १९४२ पर्यंत पुणे येथे नू. म. वि. हायस्कुलात ड्रॉइंग शिक्षक म्हणून काम केले.

वामनराव हे एक उत्तम चित्रकार होते. पण कलेचा त्यानी कधी व्यापार—बाजार केला नाही. साधुसंताचे, देवादिकाचे, सद्गुरुमहाराजाचे अनेक फोटो त्यानी काढले, चित्रे रंगविली पडदा तयार करून दिला. क्रेपची फुले तयार केली व ती कला अनेकाना शिकविली. चक्रांकित कुंडलिनीचे एक सुंदर चित्र तयार करून त्यानी उडुपीचे महाराजाना अर्पण केले.

वामनरावानी आसेतुहिमाचल अनेक ठिकाणच्या सर्व महत्त्वाच्या तीर्थयात्रा केल्या. श्रीकाशीक्षेत्री अनेक वेळा जाऊन तेथे नित्य गंगास्नान व साधना केली. श्रीशंकराचार्य वाडीकर जेरेस्वामीचे समवेत बद्रीनारायणाचीही यात्रा यथासांग झाली.

सद्गुरू टेंबेस्वामीच्या महासमाधीनंतर वामनरावाना फार तळमळ लागली. योगमार्गातले पुढचे ज्ञान देणारा आता कोण गुरू भेटणार अशी

तळमळ वाटू लागली. श्रीक्षेत्र पुष्कर येथे ब्रह्मानंद स्वामी एक मोठे अधिकारी व साक्षात्कारी योगी आहेत असे समजले. वामनराव त्यांचेकडे गेले व महिनाभर वास्तव्य करून ब्रह्मानंद स्वामी यांचे कृपेने त्यांनी योगाभ्यासाचे महत्त्वाचे पुढचे टप्पे साध्य केले.

वामनराव सन १९२२ साली श्रीगोविंद महाराजांकडे योगाभ्यासासाठी येऊन राहिले. श्रीगोविंदमहाराजाच्या देखरेखीखाली वामनरावाची अभ्यासाची तयारी उत्तम झाली होती. ब्रह्मचर्य, उपासना, सदाचार वगैरे सर्व अनुकूल होते. कुंडलिनीशक्ती जागृत करण्यासाठी हठयोगातील श्रेष्ठ दर्जाचा प्राणायाम व इतर कष्टसाध्य क्रिया त्यांनी आत्मसात केल्या.

पुढे योगायोगाने हुशंगाबाद येथे प. पू. चिन्मयानद सरस्वती बंगाली स्वामी महाराज यांचे आगमन झाले. ते तेथील मंगळवार घाटावर उतरले होते. त्यांनी तंत्रशास्त्राचा उत्तम अभ्यास केला होता. वामनराव त्यांच्या दर्शनास गेले. पुढे त्यांचा सहवास नित्य होऊ लागला. वामनरावजींच्या आग्रहास्तव स्वामीजी त्यांचे निवासस्थानी येऊन राहिले.

वामनरावजींची तयारी, निष्ठा व अभ्यास पाहून त्याची पूर्ण परीक्षा घेऊन स्वामींनी एके दिवशी प्रसन्न होऊन वामनरावजींना दीक्षा देऊन कृतार्थ केले. कुंडलिनीशक्ती जागृत झाली, ही एक अत्यंत भाग्याची घटना घडली. पुढे या बंगाली स्वामींचे आणि वामनरावजींचे संबंध दृढावले. स्वामी वामनरावजींच्या आग्रहावरून तीन वेळा बार्शीस आले. स्वामींचा मुक्काम बार्शीच्या सुप्रसिद्ध श्रीभगवंतमंदिरात होता.

तेथून जाताना ही शक्ती जागृत करण्याचा अधिकार श्री. वामनरावजींना स्वामींनी प्रसन्न होऊन दिला व त्यांना दीक्षाधिकारी केले. श्रीवामनरावजींच्या जीवनातील हा एक अमृतसिद्धी योगच ! वामनरावजींनी ही शक्ती जागृत करण्याचे कार्य अनंतचतुर्दशीच्या पुण्यपावन दिवशी सुरू केले व पहिली दीक्षा सौ. गोपिकाबाई नावाच्या एका सुवासिनीला दिली. दुसरी व तिसरी दीक्षा त्र्यंकोबा कुलकर्णी व बापू कुकडे यांना दिली. अशा रीतीने या शक्तीचा प्रसार सुरू झाला. दीक्षा देणारे सद्गुरू आता श्रीवामनरावजी हे होते. या दीक्षादानामुळे सर्व लोक त्यांना आता सद्गुरू म्हणून आदराने संबोधू लागले. योगीराज गुळवणीमहाराज, दत्तयोगी गुळवणीमहाराज, या बहुमानाने सर्व लोक त्यांना आदराने मान देऊ लागले.

वामनरावजी दीक्षा देतात, कुंडलिनी शक्ती जागृत करतात याची वार्ता सर्वत्र पसरली. वास्तविकपणे प्रसिद्धिपराङ्मुख वामनराव यांनी याबाबत फार दक्षता घेतली होती; पण त्यांच्या शक्तिरूपी कीर्तीचा सुगंध दरवळायचा थोडाच राहणार ? वेधदीक्षेचे प्रणेते म्हणून त्यांच्यासंबंधी कल्याण मासिकात लेख आले. साधकांची रीघ लागली.

सन १९२६ साली वामनरावजी पुणे येथे वास्तव्यास आले आणि नारायण पेठेत बिऱ्हाड करून राहू लागले. या ठिकाणी तळमजल्यावरील दोन खोल्यांत वामनरावजींची साधना सुरू झाली. या ठिकाणी दत्तोपासना, पूजाअर्चा, अनुष्ठाने नित्य होत. शेकडो लोक साधक म्हणून मार्गदर्शनासाठी, दीक्षेसाठी येत असत. प्रत्येकाची निष्ठा, अधिकार याची पूर्ण परीक्षा घेऊन महाराज त्या त्या व्यक्तीला दीक्षा देत.

वामनरावजींचे योगमार्गातील सद्गुरू स्वामी चिन्मयानंद यांनी गुरूंच्या आज्ञेने दंडग्रहण केला. त्यांना लोकनाथतीर्थ असे नाव दिले. ते तीनचार वेळा पुणे येथे आले. स्वामींनी आपल्या मुक्कामात अनेकांना दीक्षा दिली. त्यातच श्रीबापूसाहेब मिटकर हे एक गृहस्थ होते. स्वामींच्या कृपेने यांना 'दूरदर्शन ही सिद्धी प्राप्त झाली असे म्हणतात. पुढे हे स्वामी-लोकनाथतीर्थ काशीस

जाऊन राहिले त्याच्या महानिर्याणसमयी प पू वामनरावजी गुरुमहाराज त्याच्या जवळ होते गुरु-शिष्याचे अन्योन्य प्रेम व भक्ती अपूर्व होती

गुरुमहाराजाच्या आयुष्यातील सर्वात मोठी, महत्त्वाची व चिरकाल टिकणारी कामगिरी म्हणजे टेंबेस्वामी महाराजाच्या वाङ्मयाचे प्रकाशन या कामी त्याना प दत्तात्रयशास्त्री कवीश्वर याचे सहाय्य लाभले सन १९४५ साली भागानगर मुक्कामी टबेस्वामी महाराजाचा जन्म-शताब्दी महोत्सव साजरा झाला त्या प्रसगी हा ग्रथप्रकाशन समारभ मोठ्या उत्साहाने साजरा झाला अनेक थोर थोर व अधिकारी मडळी या उत्सवात सहभागी झाली होती

गुरुमहाराजाच्या वयाच्या ७५ व्या वर्षी पुणे मुक्कामी हा अमृत-महोत्सव फार थाटात साजरा झाला पुणे येथील टिळक स्मारक मदिरात सत्कारसमारभ साजरा झाला त्या वळी लोक-नायक बापूजी अणे, प सातवळेकर प्रभृती मोठ-मोठी मडळी उपस्थित होती श्रीगुरुदत्तयोग हा ग्रथही प्रकाशित झाला

अमृतमहोत्सवानतर गुरुमहाराजाची प्रकृती ढासळली निसर्गोपचार झाले आमदार विष्णु-पत चितळे यानीही चिकित्सा करून उपचार केले शरीराला अत्यत क्लेश होत असतानाही गुरुमहाराजाची शाती ढळली नाही एके दिवशी फार अस्वस्थ झाल त्या प्रसगी सर्व मडळी काळजी करीत होती, पण गुरुमहाराजानी शातपणे सागितले 'मी इतक्यात जात नाही, काळजी करू नका ' त्या आजारातूनही ते बरे झाले

गुरुमहाराज प्रतिवर्षी तुळजापुरास जाऊन त्रिरात्र मुक्काम करून देवीची-तुळजाभवानीची महावस्त्रे वगैरे अर्पण करून शास्त्रोक्त महापूजा करीत अन्नदानही होते

पानशेतच्या प्रलयाचे प्रसगी १२ जुलै १९६१ रोजी श्रीटेंबेस्वामी महाराजाच्या पुण्यतिथि उत्सवाची तयारी गुरुमहाराजाच्या निवासस्थानी नारायण पेठेत सुरू होती. सप्ताह सपला होता नैवेद्य दाखवला, आरती सुरू झाली इतक्यात नदीचे पाणी अगणात आले घरात शिरले प्रलय झाला क्षणार्धात नदीची ओटी भरुन गुरु-महाराज एका वस्त्रानिशी बाहेर पडले आणि सिद्धमातामदिरात आश्रयासाठी गेले पुण्य तिथीची सागता सिद्धमातामदिरात झाली आता पुढे काय ? जायचे कुठे ?

पण सत्यसकल्पाचा दाता श्रीभगवान नेहमीच धावून येतो कोणत्या तरी अकल्पित योगायोगाने गोष्टी घडून येतात तसेच या वेळी घडले महा-राजाचे काही शिष्य वैद्य इजिनियर, वैद्यमास्तर याचे मनात एक योगाश्रम स्थापन करावा व तेथे गुरुपादुकाची स्थापना व्हावी व तेथे गुरुमहा-राजाचे नित्य वास्तव्यस्थान असावे, असे वेत मोळू लागले हीच योजना पुढे अनेक शिष्याना व कार्यकर्त्याना पसत पडली द्रव्यसाहाय्य मिळू लागले एरडवणे पार्कजवळ—कर्वे रोडवर एक जागा घेऊन वासुदेवाश्रमाची सुदर इमारत अल्पावधीत उभारली गेली ही एक दैवी घटनाच समजली पाहिजे

२७ जानेवारी, १९६५ रोजी श्रीकृपेने इमारतीची वास्तुशाती, उद्घाटन व समर्पण-समारभ यथासाग पार पडले वै सोनोपत दाडेकर या प्रसगी उपस्थित होते श्रीशकराचार्य एरडेस्वामी याच्या शुभाशीर्वादाने आश्रमवास्तु समर्पणसमारभ झाला आश्रमाला सद्गुरुस्मारक वासुदेवनिवास योगाश्रम हे नाव दिले आश्रम-समर्पण व नामाभिधान झाल्यावर पहिली महत्त्वाची योजना गुरुमहाराजानी केली ती म्हणजे आश्रमाचा ट्रस्ट करून सर्व मालमत्ता ट्रस्टीच्या ताब्यात दिली वासुदेवाश्रम ही आज एक पवित्र व नमुनेदार सस्था उभारली गेली असून या ठिकाणी हजारो भक्त सेवेसाठी

दर्शनासाठी व साधनेसाठी येत असतात श्रीवासुदेवाश्रमात नित्य काही ना काही धार्मिक कार्यक्रम, प्रवचने-कीर्तने, अनुष्ठाने, नामसंकीर्तन सुरू असतात येथे होणाऱ्या बहुतेक सर्व कार्यक्रमाना गुरुमहाराज उपस्थित असत त्याचे वास्तव्यही वासुदेवाश्रमात नित्य असल्याने या आश्रमाला व तेथील परिसराला एक दैवी मांगल्य व पावित्र्य लाभले आहे भाविक स्त्रीपुरुषाचे ते एक श्रद्धास्थान झाले आहे,

गुरुमहाराजाच्या आयुष्यास ८० वर्षे पूर्ण झाली व त्यानी ८१ व्या वर्षात पदार्पण केले, त्यानिमित्त सहस्रचद्रदर्शनशाती व सत्कार-समारभ एप्रिल १९६७ मध्ये प पू १००८ विष्णुतीर्थजी महाराज याच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला या प्रसगी गुरुमहाराजाचे हजारो भक्तगण, पडित, वैदिक मडळी दूरदूर ठिकाणाहून आली होती या प्रसगी सहस्रचद्रदर्शनशाती, दत्तयाग, श्रीसप्तशतीचडीहवन, श्रीगणपति-अथर्वशीर्षहवन व श्रीरुद्रस्वाहाकार वगैरे सर्व धार्मिक कार्यक्रम यथासाग पार पडले ३० एप्रिल, १९६७ रोजी एम् इ एस कॉलेजच्या असेंब्ली हॉलमध्ये श्रीगुरुमहाराजाचा सत्कारसमारभ फार थाटाने साजरा झाला लोकनायक बापूजी अणे, म म द वा पोतदार, प सातवळेकर व त्याच्या पत्नी इत्यादी समारभास उपस्थित होते

श्रीगुरुमहाराजाच्या गुणवर्णनपर अनेकाची भाषणे झाली योगचूडामणी ही बहुमोल पदवी गुरुमहाराजाना शाल–श्रीफल देऊन हार घालून अर्पण करण्यात आली वैदिक ब्रह्मवृदाची सभावना योग्य प्रकारे करून त्याना दक्षिणा देण्यात आली समारभात दानधर्म व अन्नसतर्पण मोठ्या प्रमाणात झाले दत्तभक्तीचा व योगमार्गाचा प्रसार करून योगीराज गुळवणी महाराजानी हजारो साधकाना मार्गदर्शन केले १५ जानेवारी १९७४ या दिवशी ते दत्तचरणी विलीन झाले

— ना स करदीकर

# आणखी काही दत्तभक्त

ज्या दत्तावतारी पुरुषानी वा दत्तभक्तानी आपली एक विशिष्ट अशी परपरा निर्माण केली, वाढविली, त्याचा ओझरता परिचय आतापर्यंत आपण करून घेतला अजूनही ज्ञात अथवा अज्ञात असे अनेक सत्पुरुष असतील दत्तदैवताचे वा पथाचे सर्वसग्राहक रूप लक्षात घेता नाना जातीचे वा धर्मांचे लोकही दत्ताचे उपासक दिसतात या सर्वांची नोंदही येथे अशक्य असले तरी येथे आणखी काही थोड्या भक्ताचा निर्देश करू दत्तात्रेयानी आपल्या भक्ताना मलग वा फकीररूपात दर्शन दिल्याचे आपणास माहीत आहे दत्तोपासनेत एक विशिष्ट परपरा निर्माण करणाऱ्या शहादत्त अलमा प्रभूच्या प्रेरणेची ऐतिहासिक चिकित्सा व्हावयास हवी माणिकप्रभूच्या परिवारात अनेक मुसलमान दत्तभक्त असल्याचे आपण पाहिले आहेच **नूरी महाराज** (सन १८६९–१९२३) हा एक थोर दत्तभक्त मुसलमानी धर्माचा होता इस्लामी परपरा त्याला दत्ताचा अवतारच मानते आशियामायनर अथवा बगदादकडून याचे घराणे भारतात आले उत्तर प्रदेशात या घराण्यास चागला मानही होता याचे वडील शिपाई म्हणून ब्रिटिश सैन्यात अहमदाबाद येथे चाकरीस लागले याना स्वत च्या उतारवयात निजामउद्दिन अवलियाच्या कृपेने पुत्र झाला, तोच नूरीबाबा होय कोणा एका फकीराने या पोरामधील दैवीशक्ती जाणून त्याचा विकास केला याच्या कविता हिंदी भाषेत आहेत यालाही हिंदू व मुसलमान शिष्य होते मुबईजवळ ठाण्यास नूरीबाबाचे वास्तव्य असे आजही तेथे त्याचा दर्गा प्रसिद्ध आहे

श्रीवासुदेवानदसरस्वतीच्या शिष्यपरपरेत अनेक नावे चमकदार दिसतात त्यात **श्रीयोगानदसरस्वती ऊर्फ गाडा महाराज** ( सन १८६९–१९३८ ) या नावास विशेष महत्त्व आहे याचा

जन्म सुरतेजवळ तेलगपूर येथील याचे नाव कल्याण असले तरी वृत्तीच्या लहरीमुळे 'गाडा' म्हणजे वेडसर अशा नावानेच हे प्रसिद्ध झाले सन १८९७ मध्ये वासुदेवानंदानी त्याना दीक्षा दिली गुरुभक्तीचा एक आदर्श गाडामहाराजानी उभा केला 'गाडा सम गुरुभक्त ना दीठो बीजो क्याय' असे याच्या सबधाने म्हटले जाते गुजराती व मराठी भाषात याची काही पुस्तके आहेत 'श्रीगुरुमूर्तिचरित्र', 'स्त्रीधर्मनिरूपण' 'श्रींचे चरित्र' अशा काही पुस्तकाचा उल्लेख करता येण्यासारखा आहे वासुदेवानंदाच्या समाधीनंतर श्रीगाडामहाराज गोदावरीतीरी गुजग्राम गावी स्थायिक झाले त्याची समाधी येथेच आहे वासुदेवानंदसरस्वतीनी आणखी एका थोर भक्तावर कृपा केलेली दिसते नरसिंहसरस्वती अथवा दीक्षित स्वामी ( सन १८६६–१९२७ ) या एका वैराग्यशील दत्तभक्ताने दत्तसंप्रदायाची चागली जोपासना केलेली दिसते घराण्यातील दत्तोपासनेचे व्रत वासुदेवानंदाच्या प्रेरणेने वाढीस लागले 'जे एकमेवाद्वितीय परब्रह्म भक्तोद्धारार्थ भूतली अवतरले, ज्याला श्रीदत्त नरसिंहसरस्वती हे नाम आहे, तेच नरसिंहसरस्वती तुम्ही व्हावा' असा आशीर्वाद वासुदेवानंदाचा याना होता याची काही संस्कृत स्तोत्रे, गुरुशिष्यसंवाद नावाचे मराठी गद्य प्रकरण अशी थोडीफार वाङ्मयसेवाही आहे.

अक्कलकोटच्या स्वामी समर्थांनी अनेकाना प्रेरणा दिल्याचे आपण पाहिले आहेच आळंदीचे स्वामी, हरिभाऊ (स्वामीसुत), कृष्णसरस्वती दत्तमहाराज, आनंदनाथ महाराज, बाळबुवा, वामनबुवा वामोरीकर, तातमहाराज, सच्चिदानंदस्वामीमहाराज (गिरनार), देव मामलेदार, सीतारामहाराज मगळवेढेकर, बाळप्पा महाराज, गंगाधर महाराज, हा सर्व परिवार स्वामीसमर्थांचाच पुण्याचे श्रीरामानंदमहाराज व इतर ( सन १८३८–१९१० ) हे स्वामींचे आणखी एक शिष्य लहानपणापासून याना देवभक्तीचे वेड व्यवसाय सुगध्याचा हाती पैसा भरपूर, म्हणून व्यसनाधीनता परतु स्वामीसमर्थांच्या प्रेरणेतून मूळची सत्प्रवृत्ती पल्लवित झाली स्वामींच्या सागण्यानुसार नर्मदापरिक्रमा घडली काशी, प्रयाग, ओंदुबर, नरसिहवाडी अशी तीर्थयात्रा झाली प्रपच व परमार्थ या दोनही अगाचे विविध अनुभव घेऊन हे शके १८३४ मध्ये समाधिस्थ झाले पुण्यात शनिवारपेठेत नदीकाठी याचा मठ आहे याच्या शिष्यात रावसाहेब ऊर्फ बाबा सहस्रबुद्धे ( सन १८८३–१९५४ ) हे एक नाव महत्त्वाचे असून परमार्थवृत्तीत रगून जाणारे याचे व्यक्तित्व होते याचाही आश्रम पुण्यास मॉडेल कॉलनीत आहे

मुबईस राहून गिरणी कामगाराची दु खे दूर करून, त्याना जागृत करून दत्तोपासनेचे वेड लावणाऱ्या श्रीपद्मनाभस्वामी महाराज (सन १८४९–१९१२) याचाही निर्देश येथेच करायला हवा याचा जन्म तुगभद्रा नदीच्या तीरावरील अजारपेट येथे झाला घराण्यात दत्तोपासना होती मातेच्या कृपाछत्राखाली हे ऐन वयातच मुबईस आले व अनेक नोकऱ्याचे अनुभव घेऊन शेवटी त्यानी गिरणीत नोकरी धरली ससारबधन लौकरच सपल्यामुळे त्यानी आपल्या पारमार्थिक धाग्याची जोपासना दत्तकृपेसाठी व दीन दुबळ्या मजुराच्या उद्धारासाठी केली नाशिकचे श्रेष्ठ सतपुरुष श्रीदेव मामलेदार (श्री यशवतराव महाराज) यानी त्याच्यावर कृपा केली आणि 'गोविंद' नावाचा हा सत्पुरुष श्रीपद्मनाभस्वामी म्हणून ओळखला जाऊ लागला त्यानी आपले कार्यक्षेत्र करी रोड स्टेशननजीकचे ठरविले श्रमजीवी लोकाना सन्मार्ग दाखवून त्यानी त्याच्या विसाव्यासाठी एक दत्तमदिरही उभारले कामगाराच्या सेवेत राहून व त्याना आत्मोन्नतीचा मार्ग दाखवून स्वामीजी २६ जानेवारी १९१२ रोजी दत्तचरणी विलीन झाले त्याची

समाधी पालघरनजीक टेंभवडे गावी आहे. का म ताम्हनकर यानी श्रीपद्मनाभस्वामींचे चरित्रही लिहिले आहे. याच पद्नाभस्वामींच्या परपरेत चिचखरीस (रत्नागिरी जिल्हा) भडारी समाजातील वोरकर नावाच्या एका घराण्यातील **श्रीगजाननमहाराज** ( समाधी, सन, १९६० ) यानी दत्तभक्तीचे रोपटे रुजविले, वाढविले चिचखरीस गाणगापुराचे महत्त्व श्रीगजानन महाराज वोरकर याच्यामुळेच आले गुरुचरित्राची पारायणे, अखड नामसप्ताह, कीर्तने व प्रवचने यानी हा परिसर जागृत झाला श्रीपद्मनाभसप्रदायी श्रीगजानन महाराज वोरकर याची दत्तोपासनेची परपरा **श्री अवधूत-स्वामी** ऊर्फ मोरेश्वर वासुदेव लिमये हे मुबईस दादर येथे निष्ठेने चालवीत आहेत

अशा प्रकारे आणखी कितीतरी भक्ताची ओळख करून देता येण्यासारखी आहे विश्वनाथ महाराज केसकर (सन १८८०–१९६१), औदुबर येथे श्रीगुरु शिवशकरानदआश्रम स्थापून तथेच सन १९६८ मध्ये समाधिस्थ झालेले श्रीनारायणानदतीर्थ स्वामी महाराज, नुकतेच म्हणजे १९ एप्रिल १९७३ या दिवशी कर्नाटकात वद्दहळ्ळी (वरदपूर) येथे समाधिस्थ झालेले श्रीधरस्वामी, नृसिंहवाडीचे श्रीशातानदस्वामी, ( समाधी सन, १९२४ ) स्वामी अच्युतानदतीर्थ ऊर्फ भागवतस्वामी ( सन १८७१–१९४५ ), कोल्हापूरकडील दत्तगडगा येथील श्रीदादामहाराज पाटगावकर (सन १८८७–१९४१), अरविंदाना योगदीक्षा देणारे विष्णु भास्कर लेले (समाधी सन १९३८), कोल्हापूर येथील दत्तावतारी श्रीबाल अवधूत वालमुकुद (सन १९०७–१९६७), नरसिंगगडी समाधिस्थ झालेले वलभीमबोवा साडेकर (सन १८५३–१९०९), सन १९१३ साली अवतार समाप्त करणारे श्रीचिदानदसरस्वती ऊर्फ ईटगास्वामी, गुरुचरित्राची सशोधित आवृत्ती तयार करणारे रा कृ कामत व त्याचे बधू दिगबरदास, पुणे-सातारा रस्त्यावरील पद्मावती येथे सन १९४७ मध्ये समाधिस्थ झालेले अवतारी पुरुष श्रीशकरमहाराज, १५-३-७२ रोजी समाधिस्थ झालेले श्रीओम्‌काका गडणीसमहाराज, अशा कितीतरी दत्तभक्ताची व अवतारी पुरुषाची नामावली वाढवण्यासारखी आहे श्रीरामचद्रयोगी तिकोटेकर, श्रीकृष्णानदसरस्वती (समाधी सन, १९४० ? ), अशा आणखी काही भक्ताची भर घालता येण्यासारखी आहे अगडीचे श्रीनारायणभगवान स्वामी (सन १८९४–१९३४), कैवल्याश्रम थोर्ले स्वामी (सन १८७५–१९११), वजीरबाबा इत्यादी दाक्षिणात्य दत्तभक्ताचाही उल्लेख करणे अगत्याचे आहे

आणखी दोन दत्तभक्ताची थोडी ओळख करून घेऊ शिर्डीच्या साईबाबाच्या कृपेने प्रसिद्धीस आलेल्या उपासनी महाराजानी ( सन १८७०–१९४१ ) साकुरी या दत्त-स्थानाची महती वाढविली याचे सपूर्ण नाव काशिनाथ गोविंद उपासनी असून हे सन १९१० मध्ये उन्मादअवस्थेतच शिर्डी येथे आले अनेक चमत्कारिक गोष्टींच्या आचरणामुळे लोकाची याच्यावर श्रद्धा बसली थोरामोठ्यानी भक्ति-युक्त अत करणाने याना देणग्या दिल्या त्याच्या परिवारातील अनेक कन्याना वेदाचा अधिकार प्राप्त झाला साईवाक्सुधा, उपासनीवाक्सुधा, सतीचरित्र, अशी याची काही पुस्तकेही आहेत 'उपासनीलीलामृत' नावाचा एक चरित्र-ग्रथही आहे याच्यानतर साकुरी येथील उपासना-सप्रदाय पू सती गोदावरीमाताजींनी वाढविला. श्रीपतमहाराज बाळेकुद्रीकराच्या परपरेतील **श्रीअवधूतमहाराज कुरुदवाडकराचा** उल्लेख मागे आलेलाच आहे हे मोरेश्वर केशव दातार ( सन १८७३–१९३९ ) मूळचे मुरुडकडील दानत, चारित्र्य व औदार्य या गुणानी युक्त असे

हे घराणे असून पुढे हे कुरुदवाडकराच्या आश्रयास आले मोरोपताना दत्तभक्तीचा छद बालपणापासून होता भजनाचा व नामस्मरणाचा नादही वाढता होता सन १९०५ मध्ये मोरोपतानी श्रीपताचा अनुग्रह घेतला स्वत च्या अगावरील कफनी पतानी त्याच्या अगावर चढविली मोरोपतानी तीर्थयात्रा व कीर्तन करीत भ्रमण केले त्याची अवधूतमहाराज म्हणून प्रसिद्धी झाली चाळीसगाव–भडगावच्या बाजूस त्यानी कीर्तनसेवेने अवधूतमार्गाचा प्रचार केला भडगाव येथील दत्तमठात उत्सव सुरु केले याची समाधी भडगावला गिरणानदीतीरी आहे याच्या सुपुत्रानी, श्रीदत्तमहाराजानी पुढे सप्रदाय चालविला. श्रीअवधूतमहाराजाचे विस्तृत चरित्र का म ताम्हनकर यानी लिहिले आहे.

बेळगावनिवासी श्री श्रीपादराव काणे महाराज (जन्म २३ जानेवारी, १८९७) यानी राम व दत्तात्रेय याची ऐक्यभावाने उपासना केली आहे नामस्मरणावर याचा भर असून सद्गुरू श्रीतुकाराममहाराज येळेगावकर, सद्गुरू श्रीब्रह्मचैतन्यमहाराज गोंदवलेकर, श्रीदामोदरबुवा घुरोलीकर अशी याची गुरुपरपरा आहे. सत्पुरुषाच्या गाठीभेटी घेण्याचा छद याना एव्हानपणापासूनचा चिदबर दीक्षिताचे नातू पाडुरगबुवा, रामभाऊ थेवडे ऊर्फ टोपिनवट्टी, श्रीनारायणमहाराज केडगावकर, श्रीयोगानदजी (मलवडीकर), शाडिल्यमहाराज, अबूराव महाराज, रामभाऊ रानडे, बाळासाहेब सहस्रबुद्धे, बेळगावचे परमहस, दादामहाराज आवेकर, योगीराज गुळवणी, गोविंदबुवा उपळेकर, श्रीरगाअवधूत, स्वरूपानद, भाऊसाहेब परोट महाराज, श्रीनित्यानदजी इत्यादी सत्पुरुषाची गाठभेट त्याची झालेली आहे याना एकदा तेव्हाच्या राजसत्तेस अनुसरून साहेबी थाटात दत्तदर्शन झाले होते एकदा पहाटेस श्रीपादवल्लभरूपी दत्तात्रेयानी याना एकमुखी षड्भुज स्वरुपात दर्शन दिले. अनेक प्रकारची तीर्थयात्रा व अनुष्ठाने करून यानी नामजपाचा सप्रदाय वाढविला आहे याची काव्यरचनाही उपलब्ध आहे याचे 'श्रीगुरुचरित्राचे अभग' प्रासादिक व रसाळ आहेत. 'दत्त मनोहर। दिसतसे उभा। हिरण्याचा गाभा। प्रकटला' अशी सोपी रचना या अभगाची आहे 'आरती दत्तराज गुरुची। जय जय नत्तोद्धारकाची॥' ही दत्तात्रेयाची आरतीही रूप व तत्त्व याचा बोध करणारी आहे याचा पत्रव्यवहार, प्रवचने, मनाच्या श्लोकावरील विवरण इत्यादीसहित याचे विस्तृत चरित्र श्री वसतराव गोखले यानी लिहिले आहे.



# नृसिंहवाडी दर्शन



कृष्णाकाठ, नृसिंहवाडी



वासुदेवानंदसरस्वती, स्मृतिमंदिर



मनोहर पादुकामंदिर



श्रीदत्तमूर्तीची मंगलारती, नृसिंहवाडी



दत्तपादुकांवरील मूळमंदिर, औदुंबर

हे घराणे असून पुढे हे कुरुंदवाडकराच्या आश्रयास आले मोरोपताना दत्तभक्तीचा छंद बालपणापासून होता भजनाचा व नामस्मरणाचा नादही वाढता होता सन १९०५ मध्ये मोरोपतानी श्रीपताचा अनुग्रह घेतला स्वत च्या अंगावरील कफनी पतानी त्याच्या अंगावर चढविली मोरोपतानी तीर्थयात्रा व कीर्तन करीत भ्रमण केले त्याची अवधूतमहाराज म्हणून प्रसिद्धी झाली चाळीसगाव–भडगावच्या बाजूस त्यानी कीर्तनसेवेने अवधूतमार्गाचा प्रचार केला भडगाव येथील दत्तमठात उत्सव सुरू केले याची समाधी भडगावला गिरणानदीतीरी आहे याच्या सुपुत्रानी, श्रीदत्तमहाराजानी पुढे सप्रदाय चालविला. श्रीअवधूतमहाराजाचे विस्तृत चरित्र भा म ताम्हनकर यानी लिहिले आहे

बेळगावनिवासी श्री श्रीपादराव काणे महाराज (जन्म २३ जानेवारी, १८९७) यानी राम व दत्तात्रेय याची ऐक्यभावाने उपासना केली आहे नामस्मरणावर याचा भर असून सद्गुरू श्रीतुकाराममहाराज येळेगावकर, सद्गुरू श्रीब्रह्मचैतन्यमहाराज गोदवलेकर, श्रीदामोदरबुवा कुरोलीकर अशी याची गुरुपरपरा आहे सत्पुरुषाच्या गाठीभेटी घेण्याचा छद याना ल्हानपणापासूनचा चिदबर दीक्षिताचे नातू पाडुरगबुवा, रामभाऊ शेवडे उर्फ टोपिनकट्टी, श्रीनारायणमहाराज केडगावकर, श्रीयोगानदजी (मलवडीकर), शाडिल्यमहाराज, अबूराव महाराज, रामभाऊ रानडे, बाळासाहेब सहस्रबुद्धे, बेळगावचे परमहस, दादामहाराज आवेकर, योगीराज गुळवणी, गोविंदबुवा उपळेकर, श्रीरगाअवधूत, स्वरूपानद, भाऊसाहेब परीट महाराज, श्रीनित्यानदजी इत्यादी सत्पुरुषाची गाठभेट त्याची झालेली आहे याना एकदा तेव्हाच्या राजसत्तेस अनुसरून साहेबी थाटात दत्तदर्शन झाले होते एकदा पहाटेस श्रीपादवल्लभरूपी दत्तात्रेयानी याना एकमुखी षड्भुज स्वरूपात दर्शन दिले अनेक प्रकारची तीर्थयात्रा व अनुष्ठाने करून यानी नामजपाचा सप्रदाय वाढविला आहे याची काव्यरचनाही उपलब्ध आहे याचे 'श्रीगुरुचरित्राचे अभग' प्रासादिक व रसाळ आहेत 'दत्त मनोहर। दिसतसे उभा। हिरण्याचा गाभा। प्रकटला' अशी सोपी रचना या अभगाची आहे 'आरती दत्तराज गुरुची। जय जय नतोद्धारकाची॥' ही दत्तात्रेयाची आरतीही रूप व तत्त्व याचा बोध करणारी आहे याचा पत्रव्यवहार, प्रवचने, मनाच्या श्लोकावरील विवरण इत्यादीसहित याचे विस्तृत चरित्र श्री वसतराव गोखले यानी लिहिले आहे



# नृसिंहवाडी दर्शन



कृष्णाकाठ, नृसिंहवाडी



वासुदेवानंदसरस्वती, स्मृतिमंदिर



मनोहर पादुकामंदिर



श्रीदत्तमूर्तींची मंगळारती, नृसिंहवाडी



दत्तपादुकांवरील मूळमंदिर, औदुंबर

# गाणगापूरदर्शन



श्रीगुरुमठाचे प्रवेशद्वार, गाणगापूर



संगममंदिरातील मूर्ती व पादुका, गाणगापूर



कल्लेश्वरादी मंदिरे, गाणगापूर



श्रीचक्रतीर्थ, गाणगापूर



केशवमंदिर, गाणगापूर



संगमेश्वरमंदिर, गाणगापूर

# गाणगापूरदर्शन



विश्रांति कट्टा, गाणगापूर



भस्माचा डोंगर, गाणगापूर



पापविनाशी तीर्थ, गाणगापूर



भीमाअमरजासंगम, गाणगापूर



श्रीकल्लेश्वरलिंग, गाणगापूर



कोटीतीर्थ, गाणगापूर



रुद्रपादतीर्थ, गाणगापूर



संगमावरील गुरुमंदिर, गाणगापूर



औदुंबर येथील दत्तपादुकास्थान



औदुंबर येथील श्रीमूर्ती

# कारंजादर्शन



श्रीगुरुनृसिंहसरस्वती, कारंजा



श्रीगुरूंचे जन्मस्थान, कारंजा



श्रीगुरूंच्या निर्गुण पादुका, कारंजा



श्रीगुरुमंदिराचा घुमट, कारंजा

# कुरवपूरदर्शन



श्रीपादवल्लभमंदिर



श्रीपादवल्लभ



श्रीपादवल्लभोपदिष्ट शनिप्रदोषभजनस्थान



दासोपंतांची समाधी : अंबेजोगाई



तेरवाड येथील मुक्तेश्वराच्या पूजेतील दत्तपादुका



श्रीदत्तमंदिर, डिग्रज



श्रीसमाधिमंदिर, गरुडेश्वर



श्रीदत्तमंदिर गरुडेश्वर



अवधूतनिवास, नारेश्वर



श्रीरंगसिद्धमंदिर, विजापूर



प्रार्थनाभवन, नारेश्वर



शुचिन्द्रम्





श्रीदत्तमंदिर (आतील भाग)
साखळी ( गोमंतक )



यज्ञमंडप - साकुरी



श्रीदत्तमंदिर - साखळी
( गोमंतक )



श्रीदत्तमंदिर - साकुरी

# ११ प्रमुख दत्तक्षेत्रे

## अशी क्षेत्रमाला

पौराणिक अथवा ऐतिहासिक काळात ज्या ज्या ठिकाणी दत्तप्रभूंचे वास्तव्य झाले, त्यांच्या लीला झाल्या, त्यांच्या अवताराची व भक्ताची कार्ये वाढली, त्यांचा निर्देश प्रसंगानुसार यापूर्वी अनेकदा आलेलाच आहे. आता या प्रकरणात दत्तात्रेयांच्या काही प्रमुख स्थानाचा संक्षेपाने परिचय करून घेऊ. सपूर्ण भारतात अनेक ठिकाणी दत्त व अनसूया आणि त्यांचे भक्त यांचा संबंध झालेला दिसतो.-अवतारी पुरुषांच्या निमित्ताने काही नवी दत्तक्षेत्रे निर्माण झालेली दिसतात. दत्तांचा जन्म, त्यांची क्रीडा, त्यांचे स्नान, त्यांचे भस्मलेपन, त्यांचे भोजन, त्यांची निद्रा इत्यादी-साठीही विविध स्थाने प्रसिद्ध असल्याचे आपण पाहिले आहेच. दत्तभक्तांच्या आवडीनुसार दत्ताच्या अनेक सुबक मूर्ती अथवा पादुका यांचीही स्थापना अनेक ठिकाणी झालेली दिसते. अली-कडेही नित्य नवी सार्वजनिक अथवा खाजगी दत्तस्थाने निर्माण झालेली आहेत. त्या सर्वांचा आढावा घेऊन त्यांची सविस्तर माहिती देणे कितीही आवश्यक असले, तरी येथील जागेची मर्यादा लक्षात घेता काही महत्त्वाच्या दत्त-क्षेत्राचाच परिचय करून देणे शक्य होणार आहे. ज्यांची परंपरा फार मोठी व ज्यांना पौराणिक वा ऐतिहासिक महत्त्व अधिक आहे, त्यांची ओळख आधी करून घेऊ व नंतर काही नावाजलेल्या दत्तस्थानाचा निर्देश करू. गावोगाव स्थापन झालेल्या दत्तस्थानांची, दत्तप्रेमी मंडळांची, दत्त-भक्तिकेंद्रांची माहिती कोणा तरी अभ्यासू साधकाने जमवून ठेवणे अगत्याचे आहे.

# १. कुरवपूर

आज कुरुगड्डी या नावाने प्रसिद्ध असलेले हे एक प्राचीन दत्तक्षेत्र आंध्र राज्यात कृष्णा स्टेशन-पासून १८ मैलांवर असून हे एका बेटावरच वसलेले आहे. श्रीपादवल्लभ या दत्तावताराचे हे तप:स्थान असून येथील एका गुहेत त्यांच्या पादुका व शिवलिंग आहे. गुरुद्वादशीला येथे मोठी यात्रा भरते. श्रीवासुदेवानंदसरस्वतींनी आपला एक चातुर्मास येथे केला होता.

हे कुरवपूर म्हणजे २ मैल रुंद अशा कृष्णेच्या प्रवाहामध्ये एक बेट एक मैल लांब, अर्धा मैल रुंद असून एका टोकास श्रीपाददत्तमंदिर व दुसऱ्या टोकास गाव व मध्ये शेते आहेत. वल्लभेश ब्राह्मणाने सहस्र ब्राह्मणांना इच्छाभोजन देण्याचा आपला नवस श्रीपादअवतारसमाप्ती-नंतरही केला; यावरून हा गाव बराच मोठा होता नि:संशय. हल्लीच्या आंध्र राज्यांतर्गत रायचूर जिल्हा व तालुक्यातील हे एक खेडे आहे. अग्रहार नावाच्या नाममात्र उरलेल्या गावात कुरवपूर आहे. श्रीपादकाली ही दोनही गावे सुस्थितीत होती. श्रीपादमंदिरभागाची सरकारी दप्तरात हल्लीही 'अग्रहार गाव' म्हणून नोंद आहे. गेल्या खानेसुमारीत येथील जनसंख्येची नोंद पंधरा झाली आहे! अग्रहार बेचिराख होऊन मधून मधून इमारतींचे अवशेष दिसतात. कायम वास्तव्य म्हणजे मूलदेवता श्रीपादश्रीवल्लभ व त्यांच्या पुजाऱ्याचे घराणे व एका शूद्राचे घर अग्रहार गाव म्हणजे हल्ली एवढेच कुरवपूरचे!

येथे काहीही सामान मिळत नाही. प्रत्येक वस्तू १७-१८ मैल दूर असलेल्या रायचूरहून उन्हाळयात कृष्णेस उतार असल्यावेळी आणविली जाते. तेथे हल्ली केशव भटजी नावचे पुजारी आपले दोन चिरंजीव व पत्नी व सून यांचेसह असतात. आलेल्या भक्तयात्रेकरूंची सर्व मनपसंत व्यवस्था अत्यंत आस्थेवाईकपणे पूजा, रुद्राभिषेक, पालखीसेवा, भोजनादिसह त्यांच्याकडून होत असते. त्यांना मराठी लिहिता, वाचता व बोलता येते. अर्थात् त्यात कानडीची झाक असते. मुक्काम कुरवपूर, पोष्ट अतकूर व्हाया देवसुगूर, जिल्हा रायचूर हा पत्ता इंग्रजीत लिहून पत्रद्वारे वे. केशवभटजी पुजारी यांच्याशी संपर्क साधता येतो. बहुता दिसांचे दुसरे ब्राह्मण सेवेकरी म्हणजे रामराव हेजीब धारवाडचे सत्तावीस वर्षे श्रीसेवेत निमग्न आहेत. बी. ए झाले असून ब्रह्मचारी आहेत. पहाटेच्या काकडारतीपासून रात्रीच्या शेजारतीच्या अखेरपर्यंत प्रत्येक सेवा ते श्रींना अर्पण करतात. 'श्रीक्षेत्र कुरवपूर—कुरुडिया परिचय' या कानडी ग्रंथाचे लेखक रामराव हेजीब ते हेच! ते कानडी कवीही आहेत. मराठीही त्यांना येते. त्यांच्याखेरीज आणखी दोन सेवेकरी व तेही ब्राह्मणच आहेत. येथे रोज पहाटे, दुपारी व रात्री नौबत व चौघडा झडत असून तो नौबतखाना इंदूरच्या माजी महाराणी सौ. इंदिराबाईसाहेब यांनी बांधवला असून त्याच्या कायम खर्चाची व्यवस्थाही त्यांनीच केली आहे.

येथे एक ग्रंथालय असून श्री. वामनराव गुळवणी महाराजांनी आपण प्रकाशित केलेले श्रीटेंबे-स्वामी महाराजांचे सर्व ग्रंथ ग्रंथालयास भेट दिलेले आहेत. इतरही ग्रंथकारांनी प्रसिद्ध केलेले काही ग्रंथ या ग्रंथालयास भेट दिलेले आहेत. 'श्रीपाद-श्रीवल्लभ ग्रंथालय' असे त्याचे नाव आहे.

(१) श्रीपाद श्रीवल्लभजयंती (भाद्रपद शु. ४) (२) गुरुपौर्णिमा (भाद्रपद शु १५) (३) विजया दशमी (४) गुरुद्वादशी (आश्विन व १२ श्रीपादश्रीवल्लभअवतारसमाप्ती) (५) दीपाराधना (कार्तिक शु १) (६) श्रीदत्तजयंती (मार्गशीर्ष शु. १५) (७) श्रीनृसिंहसरस्वती जयंती (पौष शु २) (८) महाशिवरात्र (९) वसंतपूजा (चैत्र-वैशाख) (१०) श्रावणी वगैरे उत्सव श्रींच्या मंदिरात होत असतात.

पहाटे पाच वाजता गर्भागाराचे द्वार उघडते. नतर भूपाळया, काकडा होऊन देवाची वस्त्रे काढतात व स्नान, पूजा, सकाळी ९ ला अभिषेक, दुपारी १२ ला महापूजा, आरती, नैवेद्य, रात्री ७॥–९॥ आरती शेजारती

येथील कृष्णेचे पात्र अत्यत खडकाळ व हत्ती-एवढ्या शिलानी परिपूर्ण असल्याने येथे नावा चालू शकत नाहीत त्यामुळे पावसाळ्यात सहसा कोणी येऊ शकत नाहीत. येणेच आवश्यक झाल्याचे दिसल्यास किनाऱ्यावरील ठराविक व सराईत पोहणाऱ्याचे सहाय्य घेणे आवश्यक असते. सागड भोपळ्याची जोडी बाधून त्यावर सायकल-स्वाराप्रमाणे बसविले जाते व त्या सागाडघास व प्रवाशास एक दोरी बाधून ती दोरी पोहणारा आपल्या कमरेस बाधून घेऊन पोहत पोहत प्रवाशास मदिरात आणून सोडतो अशक्त व स्त्रियांना असे नेता येत नाही, तेव्हा बाज उलटी करून त्यात प्रवासी बसविला जातो व बाजेच्या चारी खुराना सागडभोपळे बाधून त्याच्या दोऱ्या चौघे पोहणारे आपल्या कबराना बाधून घेऊन दोन मैल रुदीची पूर आलेली नदी पोहून प्रवाशास मदिरात सोडतात इतके दिव्य करून तेथे जाणारे भक्त विरळाच ! प्रत्येक माणसी यासाठी एक रुपया व बाज असल्यास पाच रुपये किमान द्यावे लागत. पूर्वी अडवून हवे तेवढे घेतले जात; पण श्रीटेंबेस्वामीनी वरील दर ठरवून दिलेले हल्ली प्रचारात आहेत नदीत मोठाले व अणकुची-दार दगड असल्याने नदीस उतार असला तरी वाटाड्याच्या मदतीविना सुरक्षित मदिर गाठणे महाकर्म कठीणच अशा वेळी अगावरचे सर्व कपडे डोईस गुडाळून व सामान वाटाड्याकडे देऊन त्याचा हात धरूनच जावे लागे; तेव्हाही माणसी एक रुपयाच द्यावा लागतो. ही पावसाळा वा हिवाळ्यातील अडचण उन्हाळ्यात जावे तर हा सर्व भाग शिलामय असल्याने तो तापून सतत उन्हाच्या वाफा निघत असतात व येथे तेव्हा येणाऱ्यास तपाग्नीसाधनाचे तप अनुभवावे लागते ! एतावता येथे येणे म्हणजे अग्निदिव्यच करणे होय ज्याचे पूर्वसुकृत बळकट असते त्यासच ही यात्रा घडते हेच खरे ! त्यामुळे यात्रेकरू येथे येणारे फारच कमी, स्थान मात्र अत्यत जागृत आहे येथे येण्याचे मार्गही फारसे माहीत नाहीत. श्रीगुरुचरित्रात श्रीपादश्रीवल्लभ कुरवपूर याची माहिती येते तेवढीच.

येथे येण्याचे एकूण मार्ग तीन.

पहिला– सोलापूर– गुटकल ब्रॉडगेज रेल्वेने रायचूर स्टेशन गाठावे. रायचूर जिल्ह्याचे ठिकाण आहे. तेथे उतरून गावच्या गाजगार या शेवटच्या गल्लीनी फकीरया छावणी याच्या धर्मशाळेत यावे. कुरुगड्डीस जाण्यास बसेस येथून जवळूनच सुटतात. बैलगाड्याही येथे मिळतात स्टेशन-पासून ही धर्मशाळा अडीच मैल असून टागा, रिक्षावाले एक रुपया भाडे घेतात येथून कृष्णा-काठ अठरा मैल आहे. रायचूर ते गद्वालची बस रायचूर सिटी सिनेमाजवळून सुटते माणसी भाडे सव्वा रुपया या बसने यापलदिन्नी गावालगत उतरावे. तेथून चालत वा छकडी गाडीने अतकूर खेड्यास यावे. तेथे पूर्वीच्या उत्तरादी मठाच्या स्वामीच्या समाधी आहेत. मठही होता. तो पडून गेला कुलकर्णी कर्ण व जोशी दोनच ब्राह्मणाची घरे आहेत. अवेळी येथे आल्यास उतरण्याची सोय येथे आहे. येथून चार फर्लांगावर कृष्णाकाठ असून नदीपार करविणारे लोक येथेही आहेत. कृष्णेचे दोन प्रवाह येथून पार व्हावे लागतात. मात्र उन्हाळ्यातच हे लोक उपयोगाचे. पाव-साळ्यात उपयोगी येणारे फक्त कुरुगड्डीचे लोक आधी पूजा–यात्रा कळविल्यास ते या लोकाना पाठवतात अथवा नदीकाठाने मोठी आरोळी ठोकल्यास ते लोक येतात

दुसरा मार्ग– सोलापूर-गुटकल या ब्रॉड गेजने रेल्वेने रायचूरच्या अलीकडे कृष्णा नावाचे स्टेशन आहे तेथे उतरल्यास १) भागी गुडप्पा शेट्टी

आदवामी २) रायचूर विश्वनाथ शेट्टी ३) रायचूर फकीरप्पा छावणी व ४) हैदरावाद गोविंद नाईक अशा चौघांच्या धर्मशाळा असून त्यात शेवटची प्रशस्त आहे. यांखेरीज कृष्णाकाठी एक शिवालय व नजीकच दत्तमंदिरही आहे. सन्याशांना ही जागा चांगली आहे. येथील वस्ती बरीच असून वैदिक ब्राह्मणही पुष्कळ आहेत. दिनकर्मे करण्याकरता फार पुरातन लोक येथे येत असतात.

येथे उतरल्यास येथून १५-१६ मैलावर वसुपल्ली नावाचे खेडे कृष्णाकाठी आहे. तेथे मोटार सर्व्हिस नाही व बैलगाड्याही मिळणे मुष्कीलच. वाटेत एक मोठा ओढा असल्याने पावसाळ्यात हा मार्ग निरुपयोगीच इतर वेळी वसुपल्ली गाठल्यास तेथील अंबी प्रवाशास कृष्णा पार करून अग्रहार मंदिरास पोचवितात.

उत्तरेकडून येणाऱ्या प्रवाशाचे वरील दोन मार्ग झाले.

दक्षिणेकडील हैदराबादकडून येणाऱ्याना हैदराबाद-कर्नूल-गुंटकल मीटर गेज रेल्वेने देवरकदर स्टेशनला उतरावे लागते. तेथून मुख्यल या महबूबनगर जिल्ह्यातील तालुक्याच्या ठिकाणापर्यंत बस सर्व्हिस आहे. येथून दहा मैलावर असलेल्या पंचदेव-पाट अथवा पंचपाड या खेड्यास छकडीने पावे लागते. सहासात रुपये भाडे पडते व येथून नावाडी कृष्णापार करून प्रवाशास कुरवपुरास नेतात.

मात मख्यल गावापासून दहा मैलांवर मधनगोंद नावाचे खेडे आहे. या खेड्यापासून अर्ध्या मैलावर श्रीपादगुड म्हणून नावाने ओळखली जाणारी एक मोठी शिळा आहे. येथे या शिळेस पानचट्टल असून तेथे पादुका आहेत. यासभोवती सुन्दर मंदिर बांधलेले असून पुढे सभामंडप आहे. वल्लभेश ब्राह्मणाला चोरानी ठार केलेले व श्रीपादश्रीवल्लभानी प्रगट होऊन चोराना मारून वल्लभ ब्राह्मणास जिवंत केले; तेच हे ठिकाण म्हणून दाखवले जाते.

— वि. के. कुलकर्णी, हत्तरवाटकर

## २. नृसिंहवाडी

हे स्थान कृष्णापंचगंगेच्या संगमावर असून निसर्गरमणीय आहे. याची परमपवित्रता प्रसिद्ध आहे. या ठिकाणी श्रीनृसिंहसरस्वती दत्तमहाराज येणार आहेत हे पूर्वीच योगसामर्थ्याने जाणून श्रीरामचंद्र योगीप्रभृती सत्पुरुषानी या स्थानामध्ये येऊन तप करण्यास सुरुवात केली होती. अशा रमणीय व परमपवित्र स्थानामध्ये महाराज येऊन त्यांनीही हे स्थान आपली तपोभूमी बनविले. या ठिकाणी १२ वर्षे श्रीनृसिंहसरस्वतीस्वामी महाराजांनी तप केले. यामुळे हे स्थान सिद्धक्षेत्र म्हणून प्रसिद्धीस आले.

येथे कृष्णेच्या प्रवाहामध्ये शुक्ल, पापविनाशी, काम्य, सिद्ध, अमर, कोटितीर्थ शक्ती आणि प्रयाग अशी प्रख्यात अष्टतीर्थे आहेत. त्यांचा महिमा फार मोठा आहे. कृष्णेचा महिमा 'कृष्णा विष्णु तनुः साक्षात्' अशा वचनाने वेदव्यासाने प्रकट केला आहे. साक्षात् विष्णूचे शरीररूप असलेली कृष्णा आणि शिवा, भद्रा, भोगावती, कुंभी व सरस्वती मिळून पंचगंगा अशा दोन पुण्यनद्यांचा येथे संगम आहे. हा संगम सर्व संगमामध्ये श्रेष्ठ आहे. येथे औदुंबराच्या वृक्षाखाली श्रीनृसिंहसरस्वती स्वामीमहाराजांनी वास्तव्य केले म्हणूनच

'औदुंबरः कल्पवृक्षः कामधेनुश्च संगमः ।
चिंतामणी गुरोः पादौ दुर्लभौ भुवनत्रये ॥'

अशी या स्थानाची अपूर्व महती गायली आहे. येथे पूर्वेस अमरेश्वरादी देवतांचे वास्तव्य, पश्चिमेस श्रीरामचंद्र स्वामी प्रभृती योगीजनांचे वास्तव्य, याप्रमाणे येथे दिव्यतेची सिद्धता आहे. या स्थानावर श्रीनृसिंहसरस्वती महाराज यांचे

पूर्ण प्रेम आहे. येथेच कायम रहावे अशी त्यांची इच्छा होती; पण भक्तजनांच्या उद्धाराकरता प्रकट रूपाने गाणगापुरास जावे म्हणून गाणगापुरास जाण्यास महाराज तयार झाले; हे वृत्त येथील योगिनींना समजले. तेव्हा त्यांनी आम्हांस सोडून आपण जाऊ नये, येथेच रहावे, अशी कळकळीची प्रार्थना केली. त्यांना महाराजांनी आपले हृद्गत सांगून त्यांचे समाधान केले.

' हे स्थान प्रसिद्ध होईल. अखिल लोक याचे पूजन करतील. त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तुम्ही त्यांना सहाय्य करा. मी येथेच रहातो. माझ्या मनोहर पादुका येथे मी स्थापन करतो. त्या पादुकांचे, तुमचे व औदुंबराचे पूजन जे करतील त्यांच्या सर्व कामना पूर्ण होतील ' असा वर त्यांनी योगिनींना दिला. याप्रमाणे येथे पादुका स्थापन केल्या व त्यांची निरंतर पूजा चालावी अशी व्यवस्था महाराजांनी स्वतः केली.

कलियुगामध्ये अन्य देव निद्रिस्ताप्रमाणे असतात, परंतु श्रीनृसिंहसरस्वती दत्तमहाराज हे सतत जागरूक आहेत. याप्रमाणे भाविकांना आज तसा अनुभव येत आहे व अनेक भक्तांचे मनोरथ पूर्ण होत आहेत. शिवाय ज्यांच्या कृपाप्रसादाच्या सुदर फळाचा लाभ अनेकांना झालेला आहे व सध्या विशेष सज्जनांना ज्यांच्या प्रभावाची प्रचीती येत आहे, असे सर्वविश्रुत महामहिमशाली महात्मे श्रीनारायणस्वामी, गोविंदस्वामी, गोपाळस्वामी, मौनिस्वामी, ब्रह्मानंदस्वामी व टेंबेस्वामी प्रभृती सर्वसंगपरित्याग करून या ठिकाणी रममाण झाले व येथेच राहिले. त्यांचे पूजनही येथे नित्य होत आहे असे या स्थानाचे विशेष महत्त्व आहे.

श्रीनृसिंहसरस्वती स्वामीमहाराज या पुण्यमय तपोभूमीमध्ये वास्तव्य करीत असताना या सिद्धस्थानामध्ये आपले स्वरूप स्थापन करावे व त्या द्वारा असंख्य भक्तजनाचे कल्याण व्हावे असे त्यांच्या मनात आले. भगवान् सत्यसंकल्प असल्यामुळे तेथे विलंब कशाचा ? त्याच वेळी आळास येथील षट्कर्मनिरत सदाचारसंपन्न ब्राह्मण म्हणजे पुजाऱ्यांचे पूर्वज वे. शा. सं. वहिरंभट हे दर्शनास आले. ते शिरोळास वृत्तीकरता जात येत असता श्रीनृसिंहसरस्वती स्वामीमहाराजांना जाता येता नमस्कार करावा असा त्यांचा क्रम वरेच दिवस चालला होता. याप्रमाणे वे. शा. सं. वहिरंभट आले असता श्रीमहाराजानी आपली इच्छा त्याना सांगितली. आम्ही येथे आमच्या मनोहर पादुका स्थापन करतो आणि आपण त्यांचे अर्चन करावे. यापासून आपले व जगाचे कल्याण होणार आहे असे सांगितले.

त्या वेळी वहिरंभटजींना होय ' किंवा नाही असे काहीच उत्तर देता येईना. कारण होय म्हणावे तर आपले वय ८० वर्षांचे, आमच्या कुटुंबाचे वय ६० वर्षांचे, यांशिवाय आपणांस मूलबाळ नाही; अशा परिस्थितीत हे अर्चनाचे कार्य व तेही अरण्यात, तेव्हा ते न स्वीकारणे बरे असे त्यांना वाटले. पण श्रीमहाराजांचे तेजस्वी स्वरूप आणि प्रभाव पाहून व त्यांच्या मुखातून निघालेले कल्याणाचे उद्‌गार ऐकून नाही असे म्हणवेना. शेवटी आपल्या कुटुंबाची संमती घेऊन काय ते चरणी निवेदन करतो असे त्यांनी सांगितले. या गोष्टीस महाराजानीही संमती दिली. पण त्या दिवशी रात्री श्रीमहाराजानी आपल्या सन्निध त्यांना ठेवून घेतले. उद्या सकाळी आपण जावे अशी आज्ञा त्याना झाली; त्याप्रमाणे ते राहिले. पण त्यांच्या भार्येस रोजच्या क्रमाप्रमाणे पती न आल्यामुळे विशेष चिंता निर्माण झाली. तिने त्या वेळी आपली कुलदेवता जी एकवीरा तिची अनन्यभावाने प्रार्थना केली. नंतर ती निजली असता देवीने स्वप्नात येऊन तुझा पती श्रीनृसिंहसरस्वती स्वामीमहाराजांचे जवळ सुखरूप आहे, काही

चिंता करू नको असे सांगितले. थोड्या वेळाने स्वप्नात संगमावर श्रीनृसिंहसरस्वती महाराजांचे सन्निध आपला पती असल्याचे तिला दिसले.

दुसऱ्या दिवशी सकाळी पतिराज गृही आले. रोजच्या क्रमाप्रमाणे पूजा वगैरे होऊन वैश्वदेव झाला. त्या वेळी अतिथी म्हणून एक योगी त्यांचे घरी आले. त्यांचे आदरातिथ्य त्यांनी केले. भोजन झाल्यावर योगीमहाराजांनी थोडी विश्राती घेतली. त्या वेळी काल रात्री घरी न येण्याचे कारण सतीने विचारले. त्या वेळी तिला सर्व वृत्तांत त्यांनी सांगितला आणि काय करावे असा प्रश्न केला. त्या वेळी त्या साध्वीने योगी सांगतील त्याप्रमाणे करावे असे उत्तर दिले. याप्रमाणे दोघांचे ठरले. योगीराज विश्रांती घेऊन उठल्यावर प्रश्न केला. योगिराज म्हणाले, 'महाराज, दत्तावतार श्रीनृसिंहसरस्वती आहेत. त्यांची आज्ञा आपण शिरसावंद्य मानावी. त्यातच आपले खरे कल्याण आहे.' इतके सांगून योगीराज निघून गेले. दुसरे दिवशी पतिपत्नी दोघेही दत्तगुरूंच्या दर्शनास आले.

गुरूमहाराजांनी पूर्वीचाच प्रश्न केला. आपण या स्थानाचे अर्चन केल्यास आपले कल्याण होणार आहे; तरी आपण काय ते सांगा, असे महाराजांनी विचारले. तथापि ते अरण्यातील स्थान पाहून होय नाही यांपैकी स्पष्ट असे काहीच उत्तर येईना. त्यावेळी परमकृपाळू महाराजांनी आपले दिव्य असे त्रिमूर्तिस्वरूप त्यांना दाखविले. त्याबरोबर मात्र त्यांची विलक्षण श्रद्धा त्यांचेवर बसली व त्यांच्या म्हणण्याप्रमाणे अर्चनाचे कार्य मोठ्या आनंदाने त्यांनी स्वीकारले. तेथे महाराजांनी आपल्या मनोहर पादुकांची स्थापना केली. महाराजांच्या समक्ष वहिरंभटजींनी त्या पादुकांची मनोभावाने पूजा केली. ती पाहून श्रीगुरूंना समाधान झाले. पूजेचे सर्व नियम श्रीगुरूमहाराजांनी त्यांना सांगितले. आपणास एक मुलगा होईल व त्यास चार मुलगे होतील व त्यांचा वंश या औदुंबरवृक्षाच्या फळाप्रमाणे विस्तार पावेल असा आशीर्वाद दिला. आपणांस संतती झाल्यावर येथे राहून पूजा करावी. तो-पर्यंत आपण आपल्या गावात राहावे व पूजेच्या वेळी येऊन पूजा करावी, असे सांगितले. थोड्याच दिवसांत महाराजांच्या आशीर्वादाप्रमाणे वहिरंभटजीस मुलगा झाला. त्याचे नाव महाराजांच्या अनुज्ञेने श्रीपाद असे ठेवले. काही काळाने महाराज गाणगापुरास गेले. त्यांच्या आशीर्वचनाप्रमाणे त्यास चार पुत्र झाले. महा-राजांच्या आज्ञेप्रमाणे ते कुटुंब येथे येऊन राहिले व नियमाने मंत्रपूर्वक, भक्तिपूर्वक पूजन करण्याचा क्रम त्याने सुरू केला. त्यामुळे भगवान् प्रसन्न झाले. या स्थानाचे ऐश्वर्य सर्व प्रकारांनी वाढत गेले. त्या चार पुत्रांचा वंश म्हणजे हल्लीच्या पुजाऱ्यांचे चार फड होत. त्यांच्याकडून पूजेचा क्रम अव्याहत चालू आहे. येथे नेहमीच यात्रेचे स्वरूप असते. अनेक भाविक दर्शनास प्रत्यही येत असतात. असंख्य लोकांचे मनोरथ येथे पूर्ण होतात. येथे आश्विन वद्य १२ स गुरुद्वा-दशीचा मोठा उत्सव होतो. त्याप्रमाणे मार्गशीर्ष पौर्णिमेस दत्तजयंतीचा उत्सव होतो. मार्गशीर्ष कृष्ण दशमीपासून पौष शुद्ध द्वितीयेपर्यंत ७ दिवस श्रीनृसिंहसरस्वती महाराजांचा जयंती-महोत्सव होत असतो. माघ शु॥ ७ मीपासून १० दिवस श्रीकृष्णवेणीचा उत्सव होतो. माघ पौर्णिमेपासून माघ व॥ पंचमीपर्यंत गोपाळ-काल्याचा उत्सव होतो. याप्रमाणे येथील उत्सवाचे दिवस असतात. प्रत्येक शनिवारी पंचक्रोशीतील भक्त दर्शनास येतात. त्याहीपेक्षा अधिक लोक प्रत्येक पौर्णिमेस येऊन पूजा पालखी वगैरे पाहून संतुष्ट होतात. आजही श्रींच्या पूजनादिकांनी आपले मनोरथ पूर्ण करून घेतात, असे हे जागरूक स्थान आहे.

— श्रीपादशास्त्री जेरे

# ३. औदुंबर

हे एक प्रसिद्ध दत्तक्षेत्र मिरजेच्या अलीकडील भिलवडी स्टेशनपासून चार मैलावर आहे

श्रीनरसिंहसरस्वतीचे वैराग्य आणि विद्वत्ता पाहून अनेक साधु सन्यासी साधक त्यांच्याकडे येत व त्यांच्या सहवासाने सदुपदेशाने कृतार्थ होत नरसिंहसरस्वतींनी भारतातील सर्व यात्रा केल्या अनेकांचा उद्धार केला पुढे त्यांनी तपश्चर्येसाठी निवडली ती तीन स्थाने औदुबर, नरसिंहवाडी आणि गाणगापूर औदुबरी प्रशांत कृष्णाप्रवाहात असलेले सिद्धस्थान पैलतीरी आद्य शक्तिपीठ श्रीभुवनेश्वरीचे वास्तव्य आणि औदुंबर वृक्षाची राई, यामुळे श्रीगुरूचे प्रथम आगमन झाले

'आले भिल्लवडी ग्रामासी । भुवनेश्वरी सन्निधेसी ॥ कृष्णा पश्चिम तटाकेसी । औदुबर छायी परियेसा ॥ '

कृष्णाकाठी औदुबरवृक्षाच्या घनदाट छायेत श्रीगुरूंनी गुप्तपणे वास्तव्य केले पण कस्तुरीचा सौरभ लपून थोडाच राहणार! श्रीगुरूंचा गुप्त वास प्रगट केला भिलवाडीच्या भुवनेश्वरीने

हे स्थान अकलखोप गावाखाली असलेले, अकलखोप जोशी मंडळी—दररोज येथे येऊन—श्रीगुरूपादुकांची पूजा करीत असत नंतर ही मंडळी गुरूपादुकासंनिधच राहून पूजाअर्चा करू लागली हीच येथील पुजारी मंडळी श्रीगुरुपादुकांची उपासना—सेवा या योगे हजारो भाविक दु खमुक्त होत आहेत

अशा पावन स्थळी साधुसंत आले नाहीत तरच नवल संतकाळी जनार्दनस्वामी व एकनाथ महाराज हे या ठिकाणी येऊन गेले त्यांना येथे श्रीदत्तगुरूंचे दर्शन झाले

इ स १८२६ च्या सुमारास गिरनार पर्वतावरून महान तपस्वी ब्रह्मानंदस्वामी औदुबरी आले होते त्यांनी येथे तपश्चर्या केली त्यांचा मठ व समाधी येथे आहे त्यांची शिष्यपरंपराही येथे असून सध्या मठाधिकारी म्हणून श्रीपूर्णानंदमहाराज येथें असतात

सन १९५२ साली कर्नाटकातील एक अग्निहोत्री साधक येथे आले. त्यांनी औदुबरीच सन्यासदीक्षा घेतली नाव घेतले श्रीनारायणानंदतीर्थ दत्तगुरूंच्या आज्ञेने त्यांनी औदुबरीच कायमचे वास्तव्य केले तिन्ही त्रिकाळ स्नान, जप, योगसाधना असा त्यांचा काळ जाई औदुबरी त्यांच्या तपश्चर्येसाठी त्यांच्या भक्तमडळींनी एक नवीन मठ उभारला आहे महाराजाना योगसाधनेसाठी गुहाही बनविली आहे

त्यांचे गुरू श्रीशिवानद यती यांच्या पादुकांची नित्य पूजा ते करीत असत सन १९६७ च्या दत्तजयंतीस भक्तमंडळींच्याकडून मठाच्या आवारातच मंदिर बांधवून तेथे गुरुपादुकांची स्थापना त्यांनी करविली आणि पुढे दोनच महिन्यांनी माघ वद्य प्रतिपदेस श्रीनरसिंहसरस्वतींच्या निर्वाणदिनी श्रीनारायणानंदतीर्थ स्वामींनीही येथे महानिर्वाण केले, समाधी घेतली मठात गुरुपादुकांच्या मंदिरासमोरच नारायण महाराजांचीही समाधी आता बांधली आहे महाराजांच्या आज्ञेवरून या मठास त्यांचे मोक्षगुरू श्रीशिवानंद आणि सन्यासदीक्षागुरू श्रीशंकरानंद यांचे नाव म्हणजे श्रीशिवशंकरानंदआश्रम असे नाव मठास दिले आहे श्रीनारायणानंदतीर्थ स्वामींच्या मुळे या स्थानास पुन्हा महत्त्व आले

औदुंबरी खालीलप्रमाणे उत्सव होत असतात

(१) चैत्र शु १ ते ज्येष्ठ शु १० पर्यंत सत्तर दिवस श्रीनरसिंहसरस्वतींच्या पादुकांवर गंधलेपन व पंचपक्वान्नाचा नैवेद्य असतो

(२) चैत्र व १ ते ५ मी अखेर पाच दिवस कृष्णाबाईचा उत्सव होतो

(३) आश्विन व १२ ( गुरुद्वादशी ) श्रीपादश्रीवल्लभाचा उत्सव व भंडारा होतो

(४) मार्गशीर्ष शु. १५ ( दत्तजयंती ) या दिवशी श्रीदत्तजन्मोत्सव होतो. दुसरे दिवशी भंडारा होतो.

(५) पौष शु. २ श्रीनरसिंहसरस्वती जन्मोत्सव साजरा होतो. भंडारा होतो.

(६) माघ व. १ ते पचमीपर्यंत श्रीनरसिंहसरस्वतिउत्सव मोठ्या थाटाचा होतो. माघ व. ५ मीस मोठी यात्रा भरते–भंडारा होतो.

(७) महाशिवरात्रीस मोठी यात्रा भरते.

(८) दर शनिवारी व पौर्णिमेस श्रीची पालखीतून मिरवणूक निघते.

पहाटे ५ वाजता मंगलप्रभाती पक्षी गाऊ लागतात, मंजुळ घंटानाद होतो. दत्तगुरूंना जागृत करण्यासाठी भक्तजन भूपाळ्या गातात. मग काकडआरती होते. अशा रीतीने दर दिवशी कार्यक्रमास गोड प्रारभ होतो.

सूर्योदयी मंगल आरती होते.

दुपारी १२ वाजता श्रीपादुकांची षोडशोपचार महापूजा व महानैवेद्य होतो.

दररोज संध्याकाळी सायंपूजेनंतर धूप पडतो व नित्याच्या आरत्यांच्या कार्यक्रमास प्रारंभ होतो.

दर शनिवारी व पौर्णिमेस पालखीचा सोहळा असतो. पालखी नसेल त्या दिवशी इंदुकोटि अष्टक म्हणून तीन प्रदक्षिणा करतात. रोज या वेळी तीर्थप्रसाद वाटतात. संध्याकाळी २॥३ तास असा कार्यक्रम चालतो. नतर शेजारती होते.

## ४. गाणगापूर

श्रीनृसिंहसरस्वतीची अनुष्ठानभूमी म्हणून प्रसिद्ध असलेल्या गाणगापूर क्षेत्राची ओढ दत्तभक्ताना अनेकदा असते. हे दत्तक्षेत्र मध्यरेल्वेच्या मुंबई–मद्रास मार्गावर मुंबईपासून ५०० किलोमीटर अंतरावर आहे. सोलापूर व गुलबर्गा या दोन स्टेशनाच्या मध्ये गाणगापूररोड नावाचे एक स्टेशन आहे. येथून क्षेत्र गाणगापूर सुमारे चौदा मैलांवर आहे. भीमा-अमरजा या नद्यांच्या संगमावर वसलेल्या या क्षेत्राचा उल्लेख पुराणातून 'गंधर्वपूर' म्हणून येतो. या क्षेत्रात नृसिंहसरस्वतीचा निवास सुमारे दोन तपांपर्यंत असल्याने दत्तपंथीयांत याला फारच महत्त्व आहे. 'म्हणे सरस्वती गंगाधर। क्षेत्र थोर गाणगापूर। तीर्थे असती अपरंपार। आचरा तुम्ही भक्तीनें ॥' असा या क्षेत्राचा महिमा गुरुचरित्रकारानेंही वर्णन केला आहे.

गाणगापूर येथील भक्तांना अत्यंत प्रिय स्थान म्हणजे श्रीगुरूंचा मठ अथवा निर्गुण पादुकामंदिर हे होय. या मठाचे स्वरूप मदिरासारखे नसून मोठ्या धाब्याच्या घरासारखे आहे. पूर्वेस व पश्चिमेस मठास महाद्वारे आहेत. पश्चिमद्वारावर नगारखाना आहे. मठाच्या पूर्वेस महादेव, दक्षिणेस औदुंबर, त्याखाली गणपती, महादेव व पार्वती यांच्या मूर्ती आहेत. पश्चिमेस अश्वत्थ वृक्ष आहे. या वृक्षाच्या भोवती नागनाथ, मारुती व तुळशीवृंदावन आहे. मठाभोवतीच्या ओवऱ्यांत सेवेकरी व साधक अनुष्ठानास बसतात. मठाच्या दक्षिणभागात उत्तराभिमुख असा श्रीगुरुपादुकांचा गाभारा असून त्याच्या समोर उत्तम फरशी केलेला सभामंडप आहे. गाभाऱ्याच्या उजव्या हाताला दरवाजा आहे. येथून आत गेल्यावर गाभारा पश्चिमाभिमुख असल्याचे ध्यानात येते. तेथेच एका कोनाड्यात चिंतामणीची वालुकामय मूर्ती स्वतः नृसिंहसरस्वतींनी स्थापन केलेली आहे. या गणेशाच्या बाजूस पश्चिमाभिमुख अशा दारातून ओणवे होऊन प्रवेश करता येतो. लहानशा झरोक्यातून डोकावल्यावर पश्चिमाभिमुख अवस्थेत आसनस्थ अशा त्रिमूर्तीचे मनोहर दर्शन घडते. या आसनावरच श्रीगुरूंच्या पादुका ठेवलेल्या असून त्याना 'निर्गुण पादुका' अशी सज्ञा आहे. या पादुका शिळेवर कोरलेल्या नसून सुट्या आहेत. या निर्गुण पादुका चांदीच्या पत्र्याने मढविलेल्या

पेटीत बंद करून ठेवलेल्या असतात. दर्शनासाठी ठेविलेल्या या पादुका चांदीच्या पत्र्याच्या वेष्टनातच असतात. कोणासही त्यांना स्पर्श करता येत नाही. श्रीगुरूंच्या पूजेतील बाण, दहा शाळीग्राम, तीन स्फटिकांचे लिंग यांचाही निवास येथे आहे. निर्गुण पादुकांत दत्तात्रेयांचे वास्तव्य असते. अनेकांना यासंबंधीचा साक्षात्कार झालेला आहे. श्रीगुरु देहातीत, गुणरूपातीत होऊन निर्गुणस्वरुप बनले म्हणून या पादुकांना 'निर्गुणपादुका' असे नाव मिळाले आहे.

गाणगापूरच्या नैर्ऋत्य दिशेला दीड मैलावर भीमा व अमरजा यांचे संगमस्थान आहे. भागीरथीकुंडापासून दोन फर्लांगावर श्रीगुरूंचे विश्रांतिस्थान आहे. शूद्र भक्त पर्वतेश्वर याच्या शेतात हे स्थान असून या शूद्र शेतकऱ्याची कथा गुरुचरित्राच्या ४७ व्या अध्यायात आलेली आहे. संगमाजवळच भस्माचा डोंगर आहे. श्रीगुरूंच्या अनुष्ठानस्थानाच्या पूर्वेस उत्तरवाहिनी भीमा व दक्षिणेस पूर्ववाहिनी अमरजा या दोन नद्यांचा संगम आग्नेय दिशेस झाला आहे. पश्चिमेस अनादी संगमेश्वराचे देवालय आहे. श्रीगुरूंच्या अनुष्ठानस्थानावर बाळासाहेब रास्ते यांनी एक मंदिर बांधून तेथील अश्वत्थ वृक्षाखाली पादुकांची स्थापना केली आहे. भीमातीरावर नरहरी ब्राह्मणास कुष्ठरोगपरिहारासाठी औदुंबराचे शुष्क काष्ठ पल्लवित होईपर्यंत सेवा करण्याची आज्ञा श्रीगुरूंनी त्याला केली होती. तो औदुंबरवृक्ष आज तेथे नसला तरी तेथील पादुका अश्वत्थ-वृक्षाखाली स्थापन झाल्या आहेत.

पादुकामंदिर व संगम यांखेरीज यात्रेकरूंना सर्व तीर्थांचे पुण्य प्राप्त करून देणारी आणखी आठ तीर्थे महत्त्वाची वाटतात. १) प्रत्यक्ष संगमात असलेल्या षट्कुलतीर्थाचा महिमा प्रयागासारखा आहे. २) नृसिंह उर्फ मनोरथतीर्थ. संगमावरील मंदिरासमोर असून येथे स्नान करून संगमेश्वराची पूजा केल्यास श्रीशैल्यमल्लिकार्जुनाची पूजा केल्याचे श्रेय मिळते. ३) भागीरथी ऊर्फ वाराणसीतीर्थात स्नान केल्याने काशीच्या मणिकर्णिकेत स्नान केल्याचे पुण्य लाभते. ४) पापविनाशी तीर्थात स्नान केल्यास मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो श्रीगुरूंची बहीण रत्नाबाई हिला कुष्ठरोग झाला होता. या तीर्थात स्नान केल्याने ती मुक्त झाल्याची कथा गुरुचरित्रात आहे. 'सिद्ध म्हणे नामधारकासी। आम्ही देखिलें दृष्टीसी। स्नान करिता भिराश्रीसी। कुष्ठ तिचें परिहारिलें॥ ऐसें प्रख्यात तीर्थ देखा। नाम पापविनाशी ऐका। जे स्नान करिती भाविका। सप्त जन्म पापें जाती॥ तीर्थमहिमा देखोन। रत्नाबाई संतोषोन। राहिली मग मठी बांधोन। तीर्थी सन्निध अवधारा॥' असा या तीर्थाचा महिमा आहे. ५) कोटीतीर्थात स्नान केल्यास सर्व तीर्थांत स्नान केल्याचे श्रेय मिळते. ६) रुद्रपादतीर्थात स्नान केल्याने गयातीर्थात स्नान केल्याचे पुण्य मिळते. ७) चक्रतीर्थात स्नान केल्यावर तेथील केशवदेवाची पूजा केल्यावर द्वारकेच्या यात्रेचे पुण्य पदरी पडते. 'तया तीर्थी स्नान करिता। पतित होती ज्ञानवंता॥ अस्थि होती चक्रांकिता। द्वारावती समान देखा॥' अशी याची महती आहे. गावाच्या पूर्वेस दोन फर्लांगावर श्रीकल्लेश्वराच्या मंदिरासमोर ८) मन्मथतीर्थ असून तेथे स्नान करून कल्लेश्वराची पूजा केल्यास गोकर्णमहाबळेश्वराची पूजा केल्याचे श्रेय मिळते.

गाणगापूरच्या पूर्वेसच दोन मैलांवर कल्लेश्वर नावाचे एक शिवस्थान आहे. उत्तरेस तंतुकेश्वराचे स्थान आहे. नरहरी कवीश्वराचा कल्लेश्वराशी व तंतिकाचा तंतुकेश्वराशी असलेला संबंध गुरुचरित्रात स्पष्टपणे वर्णन केला आहे. अलीकडच्या काळात श्रीसच्चिदानंदसरस्वती ऊर्फ इटगा स्वामी यांनी गाणगापुराजवळ इटगापुरी येथे समाधी घेतली होती. त्यांची धर्मशाळा गाणगापुरातच आहे. वासुदेवानंदसरस्वती,

वासुदेव बळवंत फडके अशा काही दत्तभक्तांचा संबंध गाणगापुराशी होता. अनेकांना येथे साक्षात्कार झाला आहे. अनेकांच्या व्याधी येथे राहून, अनुष्ठान करून दूर झाल्या आहेत. दर गुरुवारी पालखीचा दिवस असतो. वर्षप्रतिपदा, नृसिंहजयंती, भीमापूजन, यतिपूजन, गणेशचतुर्थी, विजयादशमी, रामचंद्रमहाराज गोबुरकर पुण्यतिथी, गुरुद्वादशी, नरकचतुर्दशी, दत्तजयंती, नृसिंहसरस्वतिजन्मोत्सव, माघी नवरात्र, शिवरात्र इत्यादी उत्सवसमारंभ गाणगापुरास होत असतात.

## ५. अक्कलकोट

गाणगापूरच्या जवळच आणखी एक प्रसिद्ध दत्तस्थान म्हणजे अक्कलकोट हे होय. सद्गुरु-स्वामी समर्थांच्या मुळे अक्कलकोटची महती सर्वत्र झाली. स्वामी समर्थ हेही दत्ताचे अवतार म्हणून प्रसिद्ध आहेत. सोलापूर- गुलबर्गा या रेल्वेमार्गावर हे स्टेशन असून येथून पाच मैलां-वर अक्कलकोट आहे. सोलापूरहून दोन तासांत बसने जाता येते. सन १८५७ च्या सुमारास स्वामी समर्थ हे अक्कलकोटास आल्यापासून त्याचा लौकिक सर्वत्र पसरला. साक्षात् श्रीनृसिंह-सरस्वती स्वामी म्हणजेच स्वामी समर्थ असल्याचा अनुभव असल्याने व स्वामींच्या विविध लीलामुळे दत्तभक्तांना या स्थानाचे महत्त्व विशेष वाटते. अक्कलकोटास स्वामींचे वास्तव्य सुमारे दोन तपे होते. या अवधीत त्यांनी अनेक चमत्कार करून अनेकांच्या व्याधी दूर केल्या. अनेकांना सन्मार्गास लावले.

स्वामींच्या दर्शनास हिंदू, मुसलमान, पार्शी, ख्रिश्चन अशा साऱ्या धर्मांचे लोक येत असल्याने स्वामींना दत्तपंथीयांत एक आगळेच महत्त्व प्राप्त झाले होते. मुंबई, बडोदे, पुणे अशा विविध ठिकाणी अक्कलकोटकरांच्या पादुका स्थापन होऊन मठविस्तार झालेला दिसतो. खुद्द अक्कल-कोटातही स्वामींच्या वास्तव्याच्या व प्रभा-वाच्या खुणा जागोजागी दृष्टीस पडतात. पेठे-तील समाधीमठ हा स्वामींच्या अवतारकाळीच बांधण्यात आला त्या वेळी अक्कलकोट हे संस्थान होते. तेथील एका अधिकाऱ्याची व्याधी दूर होण्यासाठी स्वामींची कृपा प्रकट झाली. त्या अधिकाऱ्याने आपल्या हातातील हिऱ्याची अंगठी स्वामींपुढे ठेविली. चोळप्पांनी ती उचलली व ती विकून आलेल्या पैशांत हा मठ समाधीच्या गुहेसहित बांधला. या मठाच्या गर्भागारात गण-पती, देवी, शिवलिंग इत्यादी दैवते आहेत. वडाखालच्या मठाच्या जागी श्रीस्वामींचे कायमचे स्थान असायचे. सन १९२०-२१ साली हा मठ पंचकमिटीने बांधला. या मठातील खाऱ्या पाण्याची विहीर स्वामींच्या कृपेने गोड्या पाण्याची झाली. श्रीबाळप्पामहाराजमठ हाही गावातच आहे. स्वामींनी बाळप्पांना पादुका दिल्या व मठ बांधून आपली परंपरा चालविण्यास सांगितले. बाळप्पांनी या मठाची व्यवस्था उत्तम ठेवून चांगली परंपराही निर्माण केली. श्रीगंगाधरमहाराज व त्यांच्या नंतर श्रीगजाननमहाराज मठाची परंपरा समर्थपणे सांभाळीत आहेत.

अक्कलकोट येथील आणखी एक मठ जोशी-बुवांचा म्हणून प्रसिद्ध आहे. स्टेटचे कारभारी चिंतोपंत टोळ यांचे सहस्रतुलसीदल वाहण्याचे कार्य अखंड चालावे म्हणून समर्थांनी आपली पावले एका पाटावर उमटविली व तो पाट त्या पादुकांसह भक्तांच्या स्वाधीन केला. हा पाट व त्यावर उमटलेली पावले या मठात आहेत. राजे रायरायन हे हैद्राबाद येथील एक मोठे जहागिर-दार होत. त्यांचा क्षयरोग स्वामींच्या कृपेने बरा झाला. त्यांना मुलगाही झाला. स्वामींच्या लाभाप्रीत्यर्थ त्यांनी एक मठ बांधून तेथे स्वामींच्या पादुका स्थापन केल्या. गावाच्या

बाजारभागात रस्त्यावर एकमुखी दत्ताचे एक स्थान आहे. गावात विनायकाचेही एक प्राचीन मंदिर आहे. अक्कलकोटची महती गाताना प्रसिद्ध अंध विभूती गुलाबरावमहाराज यांनी म्हटले आहे, ' अक्कलकोट ग्राम कलियुगी काशी । जिवंत कैलासी लोक सारे ॥ स्वामी विश्वेश्वर दत्तात्रेयरूप । महिमा अमूप वर्णवेना ॥ '

## ६. कारंजा

थोर दत्तावतारी नृसिंहसरस्वतींचे जन्मस्थान म्हणून करंजनगरी वा करंजा या शहराची प्रसिद्धी आहे. श्रीवासुदेवानंदसरस्वती व श्रीब्रह्मानंदसरस्वतीस्वामी यांच्या प्रयत्नाने श्रीगुरूंच्या या जन्मस्थानाची महती सर्व दत्तभक्तांना पटलेली दिसते. विदर्भातील अकोला जिल्ह्यातील मूर्तिजापूर-यवतमाळ या रेल्वेरस्त्यावर कारंजा हे स्टेशन आहे. तीस पस्तीस हजार लोकसंख्येच्या या गावी चांगली बाजारपेठ असून गुरुमंदिरामुळे दत्तभक्तानाही ते प्रिय झाले आहे. प्राचीन काळातही या क्षेत्राचे महत्त्व वर्णन केले आहे. करंजमुनींनी या ठिकाणी पाण्यासाठी तलाव खणण्यास सुरुवात केल्याची कथा आहे. या क्षेत्रात गंगा व यमुना यांचे वास्तव्य विंदुमती नावाच्या कुंडात असून येथून पुढे वेबळा नदी वाहते. याच क्षेत्रात यक्षमाता यक्षिणीदेवीचेही वास्तव्य असल्याचे सांगतात. करंजमुनीच्या प्रभावाने गरुडापासून शेषनागास संरक्षण येथेच मिळाल्यामुळे या क्षेत्रास ' शेषांकित क्षेत्र ' असेही नाव आहे. येथील नागेश्वराच्या पूजनामुळे कधीही विषबाधा होत नाही असे सांगतात.

याच कारंजनगरीत श्रीनृसिंहसरस्वती शके १३०० च्या सुमारास जन्मास आले. श्रीगुरूंच्या जन्मस्थानाचा शोध अलीकडेच लागला. सन १९०५ मध्ये वासुदेवानंदसरस्वतींनी या नगरीत वास्तव्य श्रीराममंदिरात केले होते. सध्याच्या गुरुमंदिराशेजारी घुडे यांचा वाडा आहे. बाळकृष्ण श्रीधर घुडे यांनी नगरनाईक काळे यांच्याकडून हा वाडा सन १८८० च्या सुमारास विकत घेतला. काळे यांचे वंशज सध्या काशीस असतात. यांपैकी कोणालाच श्रीगुरूंच्या जन्मस्थानाची कल्पना नव्हती. हा वाडा चार मजली, भव्य व प्रेक्षणीय आहे. जमिनीखाली तीन मजली भुयार आहे. भिंतीची रुंदी चार फुटांपासून सहा फुटांपर्यंत आहे. दुसऱ्या मजल्यावर श्रीगुरूंच्या जन्मस्थानाची जागा आहे. या वाड्याच्या शेजारच्या जुन्या माडीवर एक रात्र राहण्याचा योग आला असता श्रीवासुदेवानंदांना श्रीगुरूंच्या वास्तव्याचा अंदाज आला. बापूसाहेब घुडे यांच्या वाड्यातील भिंतीत एक नृसिंहस्थान असून तेथे संन्यासीवेषातल्या व्यक्तीचा अदृश्य निवास असल्याचे त्यांच्या कानी आले. काहीजणांना या यतीचे दर्शन झाले होते. ' माझे वास्तव्य येथेच आहे ' असा दृष्टांतही त्यांना झाला. अण्णासाहेब पटवर्धन यानीही या कामी लक्ष घातले.

सन १९२०-२१ मध्ये श्रीलीलादत्त ऊर्फ ब्रह्मीभूत ब्रह्मानंदसरस्वती यांनाही या स्थानाची ओढ लागून येथे गुरुमंदिर उभारावे अशी प्रेरणा झाली. त्याना तेथे स्थापन करण्यासाठी निर्गुण पादुकाही मिळाल्या. श्रीगुरूंचे मंदिर, त्यांची मूर्ती, त्यांच्या पादुका यांची सिद्धता होऊन सन १९३४ च्या सुमारास आणखी एका या जुन्या दत्तक्षेत्राची नव्याने निर्मिती झाली. श्रीदीक्षितस्वामींनीही या कामी बरेच लक्ष घातले. दत्तात्रेय, चिंतामणी गणपती, काशीविश्वेश्वर, गुरुपादुका इत्यादींच्या दर्शनाची सोय झाली. गुरुमंदिरातील मूर्ती अतिशय रम्य व बालसंन्यासी रूपातली आहे. येथेही नृसिंहसरस्वतींचा वा दत्तात्रेयांचा साक्षात्कार अनेकदा साधकांना झालेला आहे.

श्रीगुरूंच्या मंदिरापासून जवळच कामाक्षी व एकवीरा यांची मंदिरे आहेत. गावाच्या दक्षिणेस एक मैलाच्या परिसरात ऋषितलाव असून

कमळांनी व ऑस्ट्रेलियन पानकोंबड्यांनी हा शोभिवंत दिसतो. कामाक्षी देवीच्या कृपाप्रसादामुळे करंज ऋषींनी या तलावाची निर्मिती केल्याची कथा 'करंज-माहात्म्य' नावाच्या प्राकृत ग्रंथात आहे. याच ठिकाणी बेंबळा नदीचा उगम दत्तमंदिराजवळ आहे. गरूड एकदा गंगा व यमुना यांना स्वर्गातून घेऊन येत असताना त्यातला एक बिंदू जेथे पडला, त्या जागेस बिंदुतीर्थ असे नाव असून तेथूनच बिंदुमती अथवा बेंबळा नदी प्रवाहित होते. या तीर्थापासून जवळच बालसमुद्र अथवा चंद्रतलाव आहे. चंद्राने गुरुपत्नीशी व्यभिचार केल्याने त्याच्या अंगाचा दाह होत राहिला. त्याने तपाचरण करून कामाक्षीची व महादेवाची प्रार्थना केली. ज्या डबक्यात त्याने स्नान करून आपल्या अंगाचा दाह शमविला, त्यास चंद्रतलाव असे नाव मिळाले. याच्या काठावरील महादेवास चंद्रेश्वर म्हणतात.

श्रीगुरुंच्या जन्मस्थानाला लागूनच रोकडा रामाचा मठ आहे. बाळकाराम नावाच्या एका माणसाने श्रीगुरुंची मनोभावे सेवा केली. त्याची पत्नी साळुकाबाई ही सुद्धा भाविक होती. तिने मारुतीची सेवा केली. तिला मारुतीच्या कृपेने पुत्र झाला. त्या मुलाचा चेहरा मारुतीप्रमाणे असून त्याला लहानसे शेपूटही होते. या मुलाचे नाव रोकडा मारुती. याने आपल्या हाताने लिहिलेला दासबोध या मठात आहे. श्रीगुरुंच्या स्थानापासून उत्तरेस सिद्धेश्वराचे देऊळ आहे. त्याला लागून प्रभुस्वामींचा मठ आहे. औरंगजेबाच्या सरदाराने आपल्या स्वारीत कारंजनगरीच्या प्रभुस्वामींस त्रास दिला तेव्हा त्याच्या अंगाचा दाह झाला. त्याने महाराजांची क्षमा मागून मंदिर बांधून दिले. तोच हा प्रभुस्वामींचा मठ होय. कारंजाची श्रीमंती दर्शविणाऱ्या एका ऐतिहासिक कथेची साक्ष देणारी कस्तुरीची हवेली श्रीगुरुंच्या जन्मस्थानाच्या मागे पंधरावीस घरे सोडून आहे. अत्यंत जागृत व साक्षात्कारी असे हे दत्तस्थान लाडाचे कारंजा म्हणूनही प्रसिद्ध आहे.

## ७. माहूर

मराठवाड्यातील नांदेड जिल्हा, किनवट तालुका येथील माहुरगडावर श्रीदत्तात्रेय, श्रीरेणुका, अनसूया इत्यादींचा निवास असल्याने दत्तभक्तांना माहूरची ओढ नेहमीच असते. माहूरगड हा सह्याद्रीचा भाग असून येथे दत्तात्रेय निद्रेसाठी येतात असा समज आहे. स्कंदपुराणातील सह्याद्रिखंडात रेणुकामाहात्म्य आणि कालिकाखंडात आमली (माहूर) माहात्म्य अशा दोन कथा आल्या आहेत. ब्रह्मदेवास सृष्टीची रचना करण्यास सोयीचे व्हावे म्हणून विष्णूंनी एक नमुना म्हणून सृष्टीच्या अगोदर हे क्षेत्र सात कोस लांब व सात कोस रुंद अशा विस्तृत प्रमाणावर निर्माण केले. या क्षेत्राला चार दरवाजे आहेत. १) पूर्वेकडील हाटकेश्वर असून येथे बंजरा नदीवर धबधबा आहे. २) दक्षिणेस पैनगंगेच्या काठी फुलसावंगी गावाजवळ एका टेकडीवर विमलेश्वराचे स्थान आहे. ३) पश्चिमेस इझळी गावाजवळच्या पहाडात दर्दरेश्वर आहे. ४) उत्तरेकडे सिद्धेश्वर व कापेश्वर अशी स्थाने आहेत.

माहूर अथवा मातापूर या क्षेत्राच्या तीनही बाजूंनी पैनगंगा नदी वाहते. नदी ओलांडून गेल्यावर दोनचार मैलांवर पहाडाच्या पायथ्याशी माहूरक्षेत्र हे गाव आहे. रेणुकामाता, दत्तात्रेय व अनसूया यांची शिखरे गावाच्या पार्श्वभूमीस लागून स्वतंत्रपणे आहेत. पैनगंगा नदीलाही पौराणिक पार्श्वभूमी आहे. विदर्भातील लोणारक्षेत्रात लवणासुरास विष्णूंनी मारले. म्हणून ब्रह्मदेवाने श्रीविष्णूचे पाय कमंडलूतील पाण्याने धुतले. भगवंताच्या चरणतीर्थातून पावन होणारी जी नदी ती पैनगंगा झाली. हिलाच पुढे प्रणिता अथवा प्राणहिता असे नाव मिळाले. 'प्रणिता

प्रदक्षिणा वाहते। दुजे वैकुंठ महीवरते' असा महिमा या क्षेत्राचा विष्णुदासांनी वर्णन केला आहे. आमलीग्राम, सिद्धपूर, देवनगर, मातापूर अशी विविध नावे निरनिराळ्या युगात या क्षेत्रास मिळालेली दिसतात काशीक्षेत्रापेक्षाही याचे माहात्म्य मोठे असल्याने 'जवा आगळी काशी' असे माहूरसवधाने म्हटले जाते. काशी क्षेत्रास जसा कालभैरव तसा या क्षेत्रास झपटनाथ हा क्षेत्रपाल कोतवाल आहे.

या माहूर क्षेत्रात जगदवा रेणुका, दत्तात्रेय व देवदेवेश्वर या प्रमुख दैवताचा वास असल्याने सर्वच भाविकाना याची ओढ नित्य असते. जमदग्नी, रेणुका, परशुराम याची स्थाने येथेच आहेत. जमदग्नीच्या चितेवर रेणुका सती गेली ती येथेच दत्तात्रेय या प्रसगी उपस्थित होते. चितेतून गळ्यापर्यंतच निघालेली रेणुका आज येथील रम्य शिखरावर निवास करून आहे. शिखराच्या पायथ्याशी मोवाळा नावाचा एक तलाव असून त्याला मातृतीर्थ म्हणतात. या तीर्थात स्नान केल्याने सर्व पातकाचा नाश होतो. रेणुकाशिखरापासून तीन मैलावर दत्तात्रेयाचे शिखर आहे. हे सस्थान गोसावी महताच्या ताब्यात होते. सध्या तेथील व्यवस्था सरकार पाहाते. येथील मदिरात दत्ताच्या पादुका व महादेवाची पिंड आहे. दत्तस्थानापासून खालच्या बाजूस सर्वतीर्थ आहे जवळच अमृतकुड असून येथेच प्रथम परशुराम व दत्तात्रेय याची भेट झाल्याचे सागतात दत्तशिखराच्या दक्षिणेस मैल दीड मैलावर अनसूयेचे शिखर असून तेथे अत्री ऋषीचा आश्रम होता. दत्तात्रेय व अनसूया याच्या मूर्ती या शिखरावर आहेत दत्तात्रेयाच्या चरित्रातील अनेक सुरस कथा याच भागात घडल्याचे सागतात.

दत्तशिखर व अनसूयाशिखर येथून मोवतालचा प्रदेश फारच रमणीय दिसतो. दत्तशिखरावरही अनसूया, विठ्ठलरखुमाई याच्या मूर्ती आहेत. दत्त-मंदिराबाहेर लक्ष्मीनारायण व धुनीधर दत्त अशी दोन मदिरे आहेत. धुनीतील दत्ताचे भस्म प्रासादिक मानले जाते. दरवाज्याबाहेर पश्चिमेस उजव्या सोंडेचा गणपती आहे. जवळच कामाक्षीचे लहानसे मदिर आहे. आसपास गोसावी महताच्या अनेक समाध्या आहेत. अनसूयापहाडावर अनसूया व दत्तात्रेय याच्या मूर्तीखेरीज अत्रि-ऋषीच्या पादुका आहेत.

माहूर गावालगतच पायथ्याशी महानुभावाच्या ताब्यात असलेले सुप्रसिद्ध देवदेवेश्वर हे दत्तस्थान आहे. रेणुका व दत्तात्रेय याच्या आज्ञेने एकदा ब्रह्मदेव क्षीरसमुद्रावर गेले आणि त्यानी विष्णूला माहूरात आणले. विष्णूनी येताना आवळीचे झाड बरोबर आणले. विष्णू दत्तात्रेयाच्या आश्रमात आल्यावर परशुरामाने रेणुकेच्या सागण्यावरून विष्णूच्या पोटात शिरून शकराची प्रार्थना केली. परशुराम दत्तात्रेयाच्या आश्रमात जगाचे रक्षण करण्यासाठी म्हणून तीन देवाच्या रूपाने राहू लागला. हाच देवदेवेश्वर म्हणून प्रसिद्धीस आला. दत्तात्रेयाचेही मन येथे रमले व ते आवळीच्या झाडाखाली ध्यानधारणा करू लागले. पिंगलनाग नावाचे ऋषीही या ठिकाणी दत्तात्रेय याच्या कृपेने महादेवाच्या रूपात राहिले. देवदेवेश्वर याप्रमाणे महादेव व विष्णू याचे स्थान असून महानुभाव दत्तप्रभूच्या रूपात या स्थानास महत्त्व देतात. रोज सायकाळची आरती येथे पाहाण्यासारखी असते. दत्तप्रभूना आळविताना अनेकाच्या अगातील पिशाचबाधा दूर होते. देवदेवेश्वराच्या खालच्या बाजूस पद्मतीर्थ आहे. शखतीर्थ, वह्नितीर्थ अशी काही स्थाने येथून जवळच आहेत.

माहुरगडावरील किल्ल्यात एक ब्रह्मतीर्थ असून त्यास विझाळे म्हणतात. याच गडावर महाकालिकेचीही मूर्ती आहे. जम नावाच्या

एका रजपूत राजाने हा किल्ला सहाव्या शतकात बांधला असल्याचे सांगतात. याचे स्मारक म्हणून 'जमठाकरी' नावाचा एक सण नागपचमी-सारखा आषाढ शु. ५ मीस साजरा करतात. किल्ल्यात गौतम झरा आहे. माहूरच्या वायव्य दिशेस पहाडात कोरलेले पांडवलेणे आहे. तेथील तीर्थास पांडवतीर्थ म्हणतात. रेणुकाशिखरापासून चार मैलांवर कैलासटेकडी आहे. येथे एक शिवलिंग आहे. रेणुकेपासून अर्ध्या मैलावर औदुंबरझरा आहे. अग्निकुंड, चरणतीर्थ, आत्मबोधतीर्थ, कमंडलुतीर्थ, कज्जलतीर्थ, मूलझरी, रामतीर्थ अशी आणखीही काही पवित्र स्थाने माहुरगडावर आहेत. जमदग्नीच्या खोरीत सूर्यतीर्थ, चंद्रतीर्थ, पापमोचन, केदार, मुद्गलेश्वर, ऋणमोचन, काशी, प्रयाग, कपिला, भानू, परशू, गदा, राममया इत्यादी नावांची क्षेत्रे आहेत.

याच माहुरगडावर दासोपंत, साधुमहाराज, विष्णुदास इत्यादींना दत्तप्रभूंचा साक्षात्कार झाला. मातृतीर्थाजवळच श्री विष्णुदासांचा मठ आहे. विष्णुदासाचे बंधू श्रीगुरुदासमहाराज यांचीही समाधी येथेच आहे. दत्तप्रभू, अत्री, अनसूया यांची भक्तिपर स्तवने विष्णुदासांनी अतिशय लडिवाळ व वात्सल्यपूर्ण भाषेत केली आहेत. रेणुका व दत्तात्रेय यांची वाङ्मयीन पूजा श्रीविष्णुदासांनी केलेली आपण पाहिली आहेच. दत्त, रेणुका, अनसूया, देवदेवेश्वर, परशुराम, अत्री इत्यादींच्या वास्तव्यामुळे अनेक भाविकांचे चित्त माहुरगडाशी निगडित झालेले दिसते. येथील पहाडावरील दाट झाडी व एकांत याचा लोभ अनेकांना झाला असल्यास नवल नाही. अलीकडे धनोडे येथे पैनगंगेवर मोठा पूल झाल्याकारणाने रेणुकामाता व दत्तप्रभू यांच्या दर्शनार्थ येणाऱ्यांची संख्या वाढली आहे. चैत्री पौर्णिमा, नवरात्र, दत्तजयंती अशा प्रसंगी येथे मोठीच यात्रा भरत असते.

# ८. माणिकनगर

हुमणाबादच्या माणिकनगर या दत्तस्थानाची महती श्रीमाणिकप्रभूंच्या मुळेच लोकांच्या ध्यानात आली. गुलबर्गा, कल्याण व बेदर या शहराच्या त्रिकोणी भूभागास पूर्वी मणिचूलपर्वत असे नाव होते. 'मणिगिरी' असा उल्लेख या भागाचा गुरुचरित्रकार करतात. 'वृषभाद्रि' असेही नाव या प्रदेशाचे कोठे कोठे आढळते. वीरशैव अथवा लिंगायत धर्मपंथाचे संस्थापक बसवेश्वर याच भागातले. इतिहासप्रसिद्ध चंद्रसेन जाधवाने वसविलेली जयसिंहपेठ पुढे हुमणाबाद या नावाने ओळखली गेली. सदानंद, पूर्णानंद, शिवरामस्वामी याच बसवकल्याणच्या परंपरेतील. याच पावनभूमीत श्रीमाणिकप्रभूंचे अवतारकार्य झाले. माणिकप्रभू हे दत्तावतारी म्हणून प्रसिद्ध असून संगीतादी कला आणि भौतिक ऐश्वर्य यांनी शोभणारा त्यांचा सकलमत संप्रदाय असल्याचे आपण मागे पाहिले आहेच.

अनेक तीर्थक्षेत्रांची दर्शने घेतघेत प्रभू कल्याणहून मणिचूल पर्वताकडे आले. गोट्टमगोट्टीचे जंगल, करतनकल्लीच्या वक्क प्रभूंची समाधी, रेकुळीचा केतकीसंगम, अशी काही स्थाने प्रभूंना तेथील एकांतामुळे आवडली. बेदर, झरणीनृसिंह ही स्थानेही प्रभूंना आवडली. बेदरहून प्रभू कल्याणकडे जात असताना हुमणाबादेच्या ओढ्यावरून गडवलीच्या वाटेस लागले. बाभळीच्या काटेरी झाडीत त्यांचा मेणा अडकला. त्यामुळे त्यांना हुमणाबादच्या जवळ संगमावरच राहावे लागले. कर्नाटकातील एक सत्पुरुष सर्वज्ञ याने पावणेतीनशे वर्षांपूर्वी भाकित केले होते, 'बराबाच्या ओढ्यावर नवीन नगर होईल; माणिकप्रभू या नावाचे योगी येथे येतील. नंतर मोगलाईस नवीन वळण मिळेल.' प्रभू ओढ्याच्या काठी आहेत असे समजताच सर्व

बाजूनी लोक त्याच्या दर्शनास येऊ लागले ओसाड व निर्जन प्रदेश गजबजून गेला तेथे इमारती तयार झाल्या आणि माणिकनगरची उभारणी झाली प्रभूनी चोराना उपदेश केला, अनेकाच्या व्याधी दूर केल्या गुरुगगा व विरजा (वृषजा) या दोन नद्याच्या परिसरात माणिकनगरची वाढ होत राहिली

नगरात प्रभू वास्तव्य करून राहिले आणि एका नव्या दत्तपथाची निर्मिती झाली सकल-सप्रदायात हिंदू, मुसलमान, जैन, लिंगायत याना स्थान मिळून दत्तभक्तीचा विस्तार झाला अव-धूत दत्तास ऐश्वर्याचे जोड मिळाली रामनवमी, गोकुळअष्टमी, गणेशचतुर्थी, दत्तजयती इत्यादी उत्सव थाटाने होत राहिले प्रभूसाठी, दत्तासाठी झोपडी होती, तेथे आता नव्या इमारती दिसू लागल्या व्यापारपेठ वाढली भडारखाना तयार झाला, पाण्याची व्यवस्था झाली, चौक्या, पहारे, शिपाई याची शिस्त वाढली गणेश, मारुती, सर्वेश्वर याचे माहात्म्य दत्ताबरोबरच वाढीस लागले प्रभूच्या दरबाराचे ऐश्वर्य दृष्ट लाग-ण्यासारखे वाढून माणिकनगर हे एक नवे केद्र दत्तभक्ताना आकर्षित करून राहिले माणिक-नगरचे क्षेत्रमाहात्म्य भवताना पटत राहिले काळभैरवरूपी कालाग्निरुद्र (मारुती), वडपाणी-सर्वेश्वर, काशिकारूपी महादेवी, निरालब गुहेतील महालिंग, मधुमती व्यकम्मादेवी, विरजा-गुरुगगा-सगमाचे मणिकर्णिका स्थान, कैलासमडप, वीरभद्र, भुवनेश्वरी भवानी, सगमेश्वर श्रीम्हा-ळसा, मार्तण्डभैरव, श्रीचक्रेश (दादा महाराजाची समाधी), महामाया (श्रीबयाबा), अखडेश्वर, श्रीविठ्ठल, श्रीनागनाथ, श्रीप्रभूचे मदिर अशा अनेक देवदेवतानी हे स्थान समृद्ध बनले आहे

## ९. बेट केडगाव

पुण्यापासून सुमारे चाळीस मैलावर बेट केडगाव असून तेथील श्रीनारायणमहाराजाच्या वास्तव्यामुळे त्या स्थानास क्षेत्राचे महत्त्व प्राप्त झाले आहे जुन्या बेटातच नारायणमहाराजाना एका औदुबर वृक्षाखाली दत्ताच्या पादुका सापडल्या सन १९०४ चा हा सुमार असावा पादुकाची पूजाअर्चा सुरू झाली दहा दिशाकडून नारायणमहाराजाच्या दर्शनासाठी गर्दी लोटली सिद्धीच्या नाना चमत्कारानी लोक दिपून गेले. भक्ताना नाना प्रकारचे अनुभव येत राहिले गुरुपौर्णिमा व दत्तजयतीस बेटावर भक्ताची गर्दी होत राहिली लोकाची सोय व्हावी म्हणून बेटावर निवासस्थाने बाधावीत, दत्तमदिर उभारावे, अशी महाराजाच्या मनात इच्छा उत्पन्न झाली

नाशिकचे मुनसब श्री. गोगटे व पुण्याचे कलेक्टर मि ब्रँडन याच्याबरोबर महाराज नव्या बेटावर हिंडत असताना खडकावरील पिंगळे पक्षी बोलत असताना त्यानी पाहिले पक्षी म्हणत होते, 'राम, लक्ष्मण व सीता वनवासात असताना याच बेटावर एक रात्र राहिले होते ' महाराजाचा निश्चय झाला याच स्थानावर नवे देवस्थान उभे करायचे आसपास खाचखळगे भरपूर निवडुगाची झाडे पुष्कळ जमिनीचा मालक बिठोबा शितोळेकडून जागेची खरेदी झाली खाचखळगे सपले निवडुग सपला सन १९१० सालापासून या जागेचा भाग्योदय झाला सर्व बाजूनी पैशाचा पाऊस पडत राहिला दत्त-मदिर, महाराजाचे निवासस्थान, पाण्याची सोय, धर्मशाळा, अन्नपूर्णाभवन अशा इमारतीची योजना सिद्ध झाली

दत्तमदिराचे काम मोठ्या उत्साहाने सुरू झाले पोरबदरहून पाढरे स्वच्छ दगड रोज रेल्वे-वॅगनने येत राहिले सुमारे वर्षभर मदिराचे काम चालू होते रचना मोठ्या कौशल्याची व शास्त्र-शुद्ध असून मदिराचे रूप मोठे देखणे झाले दत्त-मदिराचा कलापूर्ण व सुन्दर गाभारा २५ फूट लाब, १६ फूट रुद व २० फूट उच आहे मडप

चारखणी असून आठ खांबावर दशावताराची सुबक शिल्पे रंगलेली आहेत श्रीदत्तात्रेय, चतुर्भुज शंखचक्रधारी विष्णू, श्रीगजानन, श्रीलक्ष्मी, जय-विजय, श्रीहनुमान यांच्या मूर्ती नजरेत भरणाऱ्या आहेत मुख्य गाभारा ८–१० फुटाचा असून मध्यभागी सिंहासन ४ फूट उंचीचे आहे एकूण मंदिराची उंची ८० फूट आहे। या मंदिरा-बरोबरच एक धर्मशाळा, त्याला लागून कोठी, स्वयंपाकगृह, अन्नपूर्णागृह, महाराजांच्या वास्तव्यासाठी निवासस्थान इत्यादी इमारतींची निर्मिती सन १९११ च्या सुमारास झाली. मुंबईचे विख्यात शिल्पकार गणपतराव म्हात्रे यांच्या-कडून मोठ्या योगायोगाने श्रीदत्तात्रेयाची मोठी सुरेख व देखणी मूर्ती प्राप्त झाली

सन १९१३ च्या वैशाख शु ५ रोजी मूर्तीची प्राणप्रतिष्ठा बेटातील मंदिरात मोठ्या थाटाने झाली धारवाडचे प श्रीकृष्णशास्त्री उपिन-बेटीगिरी यांच्या देखरेखीखाली मोठाच उत्सव झाला कामटीकर, कोठारी, काळे, जयराम सावजी, बाजीराव वाडेकर, गोपाळराव पेंडसे, रानडे, आपटे, वसनजी शेठ दासानी, रागोळे, जस्टिस जांभेकर, कुसुमावती, बाजीराव तुळपुळे, बाबुभाई चव्हाण, गुढ, देशपांडे, रंगनाथ हलवाई, धाकरसिपी, दगडूशेठ मारवाडी इत्यादी भक्तांची निवासस्थाने या ओसाड बेटावर झाली दत्त-प्रभूंच्या कृपेने बेटावर एक ल्हानसे शहरच उभारले गेले महाराजांचे ऐश्वर्य वाढत होते उत्सवाच्या निमित्ताने हजारो लोक या बेटावर जमत असत वीज, पाणी, भोजन इत्यादी व्यवस्था एखाद्या संस्थानाप्रमाणे उत्तम असायची अनेक मौल्यवान वस्तू बेटावर शोभू लागल्या सोन्याची दत्तमूर्ती, चांदीचे सिंहासन चांदीची पालखी, भरजरी गालीचे, चौरंग इत्यादी वस्तूंची भर पडली सन १९२८ साली दत्तमंदिरात अति-रुद्राचे अनुष्ठान झाले सन १९३२ साली दत्त-मंदिरापुढे विस्तृत असा सभामंडप झाल्याने मंदिराची शोभा वाढली. जन्मोत्सवासाठी दत्ता-करता चांदीचा पाळणा आला सन १९३६ मध्ये बेटावर ११०८ सत्यनारायणाचा अपूर्व सोहळा होऊन नारायणमहाराजांच्या बरोबरच बेटाचे नाव साऱ्या भारतात गाजले

महाराजांच्या वास्तव्यामुळे बेट केडगाव हे एक प्रसिद्ध दत्तक्षेत्र म्हणून उदयास आले स्वत महाराजच दत्तावतार आहेत, अशीही लोकांची श्रद्धा होती नामस्मरण व भजन यांनी बेटाचा परिसर शुद्ध बनलेला असे मकरसंक्रात, रंगपंचमी, दिवाळी, पाडवा, दत्तजयंती इत्यादी उत्सव वा सण थाटाने व्हायचे कथाकीर्तन यांची लयलूट असायची आज बेटावर नारायण महाराज नसले तरी त्यांचे अस्तित्व असल्याच्या अनेक खुणा भक्तांना जाणवतात महाराजांनी घालून दिलेली शिस्त व उत्सवाची पद्धत कायम राखावी म्हणून भक्तांचे प्रयत्न आहेत सद्‌गुरू नारायणमहा-राजांचा जयजयकार आजही भक्तमंडळी विशेष निमित्तानी बेटावर करताना दिसतात 'आरती नारायण गुरूची, आरती नारायण प्रभूची' असा निनाद आजही बेटावर घुमताना दिसतो बेटा-वरचे सृष्टिसौंदर्य तेथील आत्मिक शांततेबरोबर लोकांना आजही खुणावते

## १०. साकुरी

श्रीसाईबाबांमुळे जसे शिरडीस महत्त्व प्राप्त झाले तसेच श्रीउपासनीबाबांमुळे साकुरी प्रसि-द्धीस पावली श्रीउपासनीमहाराज हे विसाव्या शतकात महाराष्ट्रात एक प्रसिद्ध सत्पुरुष होऊन गेले त्यांनी महाराष्ट्राच्याच नव्हे तर भारताच्या इतिहासावर दीप्ती चढवली व देशाचे मुखमण्डल उजळ केले, अध्यात्मिक तत्त्वावर साचलेली काजळी दूर केली व सनातन वैदिक धर्माची ध्वजा जगात फडकत ठेवली

श्रीउपासनी महाराज मूळचे नाशिक जिल्ह्या-तील सटाण्याचे १५ मे १८७० रोजी ते जन्मास

आले, बालपणापासूनच त्यांना ईश्वरी साक्षात्काराची ओढ होती, व तत्त्वचिंतनाचे वेड होते. सद्‌गुरूंच्या शोधार्थ भ्रमण करताना त्यांची शिर्डीच्या साईबाबांची भेट पडली. त्यांच्या कृपेने सिद्धावस्था प्राप्त झाल्यावर त्यांनी शिरडी सोडली. त्यानंतर खडगपूर वगैरे ठिकाणी भ्रमंती केल्यावर नगर जिल्ह्यातील साकुरी या खेड्यात या सिद्धपुरुषाचे पाय विसावले. महाराजांनी गावाबाहेर स्मशानभूमीत वास्तव्य केले, परंतु या महापुरुषाच्या चरणस्पर्शाने स्मशानाचे वैकुंठ-कैलासात रूपांतर झाले. महाराजांच्या लोकोत्तर विभूतिमत्वाच्या अद्‌भुत आकर्षणामुळे असंख्य लोक त्यांच्याकडे आकर्षिले गेले. महाराज अक्षरश: दिगंबर अवस्थेत होते. छोटेसे गोणपाट हेच काय ते त्यांच्या कायेचे भूषण होते. सुरुवातीस थंडीगारठ्यापासून त्यांना कशाचाच निवारा नव्हता म्हणून गावकऱ्यांनी त्यांच्यासाठी पाचटाचे एक झोपडे बांधले. जसजशी दर्शनार्थ येणाऱ्या यात्रेकरूंची गर्दी वाढू लागली तसतसे त्यांच्या सोयीसाठी हलके-हलके राहाण्यास निवासस्थाने व धर्मशाळा बांधण्यात आल्या, प्रार्थनेसाठी मंदिरांची उभारणी झाली, आणि शून्यातून एका महान् तीर्थक्षेत्राची, उपासना-केंद्राची आणि धर्मपीठाची निर्मिती झाली.

साकुरीस्थानात झोपडी आणि मंदिरे यांचा समावेश होतो. ज्या भागात महाराजांची झोपडी आहे, तो भाग झोपडी म्हणून ओळखला जातो. पूर्वी ज्या ठिकाणी झोपडी होती, तिथे आता सिमेंटकॉंक्रीटचा हॉल बांधण्यात आला आहे. पूर्वीच्या झोपडीचे छप्पर स्मृतिदाखल तसेच राखण्यात आले आहे. या झोपडीतच महाराजांची समाधी आहे. १९४१ साली पौष शु. सप्तमीस महाराज समाधिस्थ झाल्यावर येथे त्यांची समाधी बांधण्यात आली. महाराजांच्या समाधी शेजारीच त्यांचा बाबूचा पिंजरा आहे. या पिंजऱ्यात त्यांनी १९२२ मध्ये स्वत:स लोककल्याणासाठी बंद करून घेतले होते. या पिंजऱ्यात असतानाच महाराजांच्या प्रवचनास प्रारंभ झाला. त्यांच्या ज्ञानाची गंगोत्री येथेच उगम पावली. त्यांची सारी प्रवचने उपासनीवाक्सुधा या ग्रंथामधून समाविष्ट करण्यात आली आहेत. त्यांची प्रवचने म्हणजे ज्ञानाचे अमोलीक भांडार असून त्याची विचारतत्त्वे जागोजाग विखुरली आहेत.



महाराजांच्या झोपडीपासून समोरच मातृमंदिर आहे. महाराजांच्या मातोश्रींचे हे समाधिमंदिर आहे. येथून लगतच सभामंडप आहे. तेथून थोड्याशा अंतरावर कन्याकुमारीमंदिर आहे. कन्याकुमारीचे ते चिरंतनचे स्मारक आहे. तेथून जवळच यज्ञमंडप आहे. येथे वर्षातून सात यज्ञ होतात. श्रीमाताजींचे नेतृत्वाखाली कन्यांच्या द्वारा हे यज्ञ होतात.

झोपडीपासून काहीशा अंतरावर बापूसाहेब जोग यांची समाधी आहे. तेथून समीपच मंदिरे आहेत. त्यामध्ये श्रीदत्तमंदिर हे प्रामुख्याने आपल्या नजरेत भरते.त्याच्या सभोवतीच श्रीमारुतीराय, श्रीगणेश, श्रीखंडोबाराय, श्रीमहादेव आणि श्रीशनिदेव यांची छोटीशी पण सुबक राउळे असून ती तेथील सनातन वैदिक धर्माच्या वातावरणाची ग्वाही देतात.

स्थानातील कार्यक्रमाची अशा रीतीने माण्डणी करण्यात आली आहे की, पहाटे उजाडल्यापासून रात्री निद्राधीन होईपर्यंत साधकाचा दरेक क्षण भगवच्चिंतनात जावा. त्रिकाळ आरती, भजन, पूजन इत्यादी सत्कर्मांनी साऱ्या दिवसाचा कार्यक्रम भरगच्च भरलेला असतो. त्यामुळे येथील वातावरण भगवंताच्या नामघोषाने निरंतर दुमदुमत असते. याशिवाय प्रसंगोपात् हिंदूंचे लहान-मोठे सण आणि उत्सव साजरे होतात व यज्ञयाग होतात.

कन्याकुमारीस्थान आणि यज्ञसंस्था ही या स्थानाची लोकोत्तर वैशिष्ट्ये होत. भारतात ब्रह्म-

वादिनी स्त्रियांच्या फारच थोड्या संस्था असून त्यामध्ये ही अग्रगण्य आहे येथील ब्रह्मचारी कन्यांनी आध्यात्मिक तत्त्वासाठी आपले जीवन समर्पित केले आहे श्रीगोदावरीमाताजी स्थानाच्या प्रमुख असून महाराजांच्या पश्चात् स्थानाचे धर्मजागृतीचे कार्य त्यांनी पुढे चालविले आहे

यज्ञसंस्थेचे पुनरुज्जीवन करणे ही देखील महाराजांच्या कार्याची अपूर्वाई आहे कन्याकुमारी यज्ञकार्यात निष्णात बनल्या असून त्यापैकी काही घनपाठी आहेत साकुरीखेरीज श्रीमाताजींनी कन्यांसह आजवर पुणे, मुंबई नागपूर, कटणी जबलपूर, हैदराबाद, सुरत इत्यादी भारतातील प्रमुख ठिकाणी यज्ञ करून यज्ञसंस्थेचे कार्य दूरवर पोचविले आहे

सध्या जे टोलेजंग मंदिर आपल्या दृष्टीस पडते ते बांधून होण्यापूर्वी त्याच जागी श्रीदत्तात्रेयाचे छोटेसेच मंदिर उभे होते इ स १९२२ सालाच्या सुमारास ते बांधले गेले व तेथे सद्गुरूंच्या पादुकांची स्थापना करण्यात आली आणि तेव्हापासूनच मंदिरात पूजा-अर्चा व त्रिकाळ आरती सुरू झाली

१९२९ सालामध्ये त्याच जागी हल्लीचे भव्य मंदिर बांधण्यात आले. ग्वाल्हेर संस्थानच्या राजघराण्यातील एका बाईंनी उदार मनाने दिलेल्या देणगीतून मंदिराचे बांधकाम करण्यात आले घराण्यात दत्तक घेण्याच्या प्रश्नाच्या विवंचनेत असताना त्यांनी अनेक साधु-संतांची स्थाने धुंडाळली सरतेशेवटी श्रीमहाराजांचा लौकिक ऐकून साकुरीस त्या दर्शनार्थ आल्या महाराजांच्या आज्ञेनुसार साकुरीस काही महिने त्यांनी वास्तव्य केले, व त्या सेवाभावाने राहिल्या अखेर दत्तकाचा प्रश्न त्यांच्या मनासारखा समाधानकारक सुटला गेला महाराजांच्या कृपेचे हे फळ मानून कृतज्ञता व्यक्त करण्याच्या हेतूने त्यांनी दत्तमंदिर नव्याने बांधून काढले मंदिराचा दर्शनी भाग अवलोकन केला की, उत्तर हिंदुस्थानी शिल्पसौंदर्याचा साक्षात्कार घडतो या मंदिराच्या बांधकामासाठी खास ग्वाल्हेरहून कॉंट्रॅक्टर-इंजिनियर आणण्यात आले इंजिनियर वाळिंबे या तज्ञ स्थापत्यविशारदाच्या मार्गदर्शनाखाली मंदिराचे बांधकाम करण्यात आले सुमारे १२ वर्षेपर्यंत मंदिराचे बांधकाम चालू होते मंदिराचे बांधकाम पूर्ण झाल्यावर १९२९ मध्ये श्रीदत्तपादुकांची स्थापना करण्यात आली आणि इ स १९४२ साली मंदिरामध्ये श्रीदत्तमूर्तीची विधिपूर्वक प्राणप्रतिष्ठा करण्यात आली

श्रीदत्तात्रेयाची मूर्ती इटालियन मार्बलची असून मुंबईचे प्रसिद्ध शिल्पकार श्री तालीम यांनी घडविली आहे जरी १९४२ साली मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करण्यात आली, तरी ही मूर्ती महाराजांनी आपल्यासमोर १९३० मध्येच घडवून घेतली होती श्रीदत्तात्रेयाची मूर्ती एकमुखी आहे

एके काळी श्रीपादुकांवर रात्र-दिवस अभिषेकाचे पहारे चालत कालान्तराने ते बंद झाले असून हल्ली प्रसंगाविशेषीच पादुकांवर अभिषेक करण्यात येतो

श्रीदत्तमंदिरात रात्र-दिवस अखंड टाळ-पहारा असतो १९२२ च्या सुमारास महाराजांनी स्वतः स पिंजऱ्यात बंद करून घेतल्यावर या पहाऱ्यास प्रारंभ झाला, तेव्हापासून आजगायत तो अखंडपणे चालू आहे पुरुष आणि स्त्रिया दोघेही पहाऱ्यात भाग घेतात दिवसाचे पहारे स्त्रिया सांभाळतात, तर रात्रीचे पहारे पुरुष सांभाळतात दरेक तासागणिक पहारेकरी बदलतो पहारा करताना टाळ वाजवावा लागतो व मुखाने नामसंकीर्तन करावे लागते अशा प्रकारे पन्नासहून अधिक वर्षे नामसंकीर्तन चालू असून रात्र दिवस भगवन्नामाच्या घोषाने हे मंदिर दुमदुमत आहे

दर गुरुवारी श्रीदत्तात्रेयांची पालखी निघते. लाकडी रथामध्ये श्रीसाईबाबा, श्रीउपासनीबाबा आणि श्रीउपासनीबाबांच्या मातोश्री यांच्या प्रतिमा असून श्रींच्या पादुका ठेवतात. दर गुरुवारी मंदिरासभोतील चौकात तासभर भजन होते, त्यावेळी तीनदा रथासह मंदिराची प्रदक्षिणा होते.

देवळातील शेजारतीनंतर रथासह दिण्डी,टाळ मृदुंगाच्या घोषात निघते आणि झोपडीत जाते. झोपडीतील शेजारती झाल्यानंतर दिण्डी मंदिरात परत जाते. महाशिवरात्री, जन्माष्टमी वगैरे महत्त्वाचे सण आणि उत्सव असले की, पालखी काढतात. छत्र, चामर, अब्दागिरी, पताका अशा सर्व साजासह पालखी निघते. प्रतिवर्षी मार्गशीर्ष महिन्यात श्रीदत्तजयंती साजरी केली जाते.

— शां. ना. टिपणीस

## ११. सटाणे

श्रीउपासनीमहाराजांच्या आश्रमाच्या हैद्राबाद, नागपूर,सुरत, सटाणे, धरमपूर या ठिकाणी शाखा आहेत. सटाण्याच्या आश्रमात श्रीकोटिलिंगेश्वर मंदिर, श्रीहनुमानमंदिर आणि श्रीदत्तमंदिर आहे. महाराजांच्या वडिलोपार्जित घरातील ज्या खोलीत त्यांचा जन्म झाला, त्याच ठिकाणी बारा ज्योतिर्लिंगांची स्थापना करण्यात आली आहे. समाधी घेण्याच्या आदल्या दिवशीच महाराजांनी स्वहस्ते त्यांची स्थापना केली. ज्योतिर्लिंगे शुभ्र स्फटिकाची असून तळघरात आहेत.

कोटिलिंगेश्वराच्या मंदिरावर श्रीहनुमानमंदिर आहे. श्रीमारुतीरायाने श्रीराम, लक्ष्मण आणि सीतामाई यांच्या मूर्ती स्कंधावर धारण केल्या आहेत. मंदिरात पूजा-अर्चा व त्रिकाळ आरती चालते.

तेथून थोड्याशा अंतरावर आराम नदीच्या काठी श्रीदत्तमंदिर वसलेले आहे. संत देव मामलेदारांच्या स्मारकापासून जवळच महाराजांच्या आजोबांची समाधी असून त्या समाधीवरच श्रीदत्तमंदिराची उभारणी करण्यात आली आहे. सुमारे १९२९ च्या सुमारास हे मंदिर बांधण्यात आले. दत्तात्रेयांची मूर्ती तीन मुखी आहे. मंदिरात नियमितपणे पूजा-अर्चा व त्रिकाळ आरती होते. प्रतिवर्षी श्रीदत्तजयंतीचा उत्सव साजरा होतो.

— शां. ना. टिपणीस

## १२. बाळेकुंद्री

श्रीपंतमहाराज समाधिस्थ झाल्यावर त्यांच्या असंख्य भक्तगणांचे सूचनेवरून बाळेकुंद्री येथे पौष शु. १ शके १८२७ म्हणजे दि.२७-१२-१९०५ या दिवशी सर्व ठिकाणची भक्तमंडळींनी जमून ' श्रीदत्त संस्थान बाळेकुंद्री बु॥ ' या संस्थेची स्थापना केली व पुढे २५–२६ वर्षांच्या कालात श्रीपंतबंधूंच्या हयातीतच श्रीदत्तसंस्थानचा पसारा वाढत गेला आणि त्याचा कारभार सुरळीत चालण्यासाठी त्यांनी भक्तमंडळीशी विचारविनिमय करून व अत्यंत निःस्वार्थीपणे पण दूरदृष्टी ठेवून एक कायदेशीर ट्रस्ट करून मि. ज्येष्ठ शु. ८ शके १८५५ दि. १–६–१९३३ रोजी तो रजिस्टर केला आणि योजनाबद्ध ' घटना व नियम ' तयार करून श्रीदत्तसंस्थानाच्या कार्यास एक प्रकारची सूत्रबद्ध गती दिली व सन १९५२ मध्ये 'बाँबे पब्लिक ट्रस्ट अॅक्ट ' प्रमाणे श्रीदत्तसंस्थानची सरकारात रीतसर नोंद होऊन त्याप्रमाणे सध्या संस्थेचे कामकाज चालू आहे संस्थेचा कारभार लोकशाही तत्त्वावर चालतो

श्रीपंतमहाराजांच्या पार्थिव देहास श्रीक्षेत्री जेथे अग्निसंस्कार झाला, त्या ठिकाणी लावलेल्या औदुंबराच्या रोपासभोवती एक चिरेबंदी पट्कोनी पार इ. स. १९०६ मध्ये बांधण्यात आला. पुढे २४ वर्षांनी म्हणजे दि. ६ जानेवारी सन १९३० रोजी, त्या पारास लागूनच पूर्वेस,

गोविंदरावदादा यांचे हस्ते श्रीपतमंदिराचा पाया घातला गेला या चौथऱ्याचे बांधकाम पूर्ण होताच त्यावर मिति आश्विन वद्य २ शके १८५२ (ता ९-१०-१९३०) गुरुवार रोजी दुपारी बारा वाजता, शुभ मुहूर्तावर श्रीपतबंधु-श्रीगोविंदराव, श्रीगोपाळराव व श्रीशंकरराव यांचे अमृतहस्ते श्रींच्या पादुका व फोटो यांची मोठ्या समारंभाने शास्त्रोक्त विधियुक्त स्थापना करण्यात आली आणि त्यावर एक तात्पुरती पत्र्याची शेड उभारली जाऊन त्या स्थितीतच मंदिराचे बांधकाम स्थगित राहिले या कालावधीत 'श्रीदत्ततीर्थ' धर्मशाळा, (यांतच हल्ली श्रीसंस्थानची कचेरी आहे) श्रीनरसिंहमंदिर, श्रीसीतारामम‍ंदिर, श्रीपतमातोश्री-तुळशीवृंदावन, श्रींच्या कट्ट्यासमोरील प्रशस्त भजनमंडप, तसेच इतर भक्तमंडळींनी बांधलेल्या धर्मशाळा इत्यादी इमारती झाल्या पुढें 'श्रीपतमंदिरनिधी' श्रीभक्ताकडून उत्स्फूर्त जमा होऊन संस्थानने सन १९५३ मध्ये सध्याचें टुमदार व शोभिवंत असे मंदिर बांधले

श्रीपतांनी एक नवीन प्रकारची भजन-पद्धती रूढ केली व त्या भजनाला पुरेल इतका प्रचंड, पूर्णाद्वैतबोधाने प्रकाशित, भक्तिप्रेमरसाने थबथबणारा व आत्मानुभवाच्या भक्कम पायावर आधारलेला सुमारे तीन हजार पदांचा दिव्य व उत्स्फूर्त अमर भक्तिकाव्याचा ( पदसंग्रहाचा ) ठेवा भक्तांचे हाती देऊन ठेविला आहे आपापल्या गावांत अनेक श्रीपतभक्तांनी श्रीपतमंदिरें स्थापून श्रीदत्तप्रेमलहरी भजनमंडळे स्थापन केली आहेत कोल्हापूर, इचलकरंजी, अक्कोळ, कुरुंदवाड, गारगोटी, पुणे, मुंबई, जळगाव, नाशिक, संकेश्वर, सांगली, पोयनाड (कुलाबा), पाली (जि सातारा), विसूर, भडगाव, गोहे, श्रीक्षेत्र डोंगरदे, कुनूर, खेड, वडगाव, आवळी, चरण, कोगे, दड्डी, घोगनोळी इ ठिकाणी भजनमंडळें आहेत श्रीपतांच्या अवधूतमार्गाचा, भजनाचा व तत्त्वज्ञानाचा प्रचार करणाऱ्या शिष्यमंडळींपैकी भडगावचे मोरेश्वर केशव दातार ऊर्फ 'अवधूतबुवा,' कोल्हापूरचे रामानंदबुवा, विसुरचे श्रीविष्णुबुवा, शिंत्रेबुवा, सांगलीचे विनायकराव ताम्हणकर ऊर्फ 'साई,' इंदुरचे श्री वापटबुवा इत्यादींचा विशेष उल्लेख केला पाहिजे या मंडळींनी श्रीपतमंदिरे स्थापन केली असून तेथें उत्सवादी कार्यक्रम मोठ्या प्रमाणात साजरे होतात

श्रीपतमहाराजांचे जन्मस्थान दड्डी येथे इ स १९२१ मध्ये गावचे भक्तमंडळींनी पुढाकार घेऊन श्रीपतमंदिर बांधले त्यासाठी मुंबईचे एक भक्त कै सदाशिवराव साहानी यांनी संगमरवरी पादुका अर्पण केल्या, त्यांची स्थापना झाली आहे मंदिराचे नामकरण करण्याचे वेळी श्रीपतबंधूंनी त्यांना परमप्रिय व पूज्य असलेले त्यांचे मातुल श्रीपादपंत यांचेही नांव रहावे या उद्देशाने मंदिराचे नांव 'श्रीपाद-श्रीपतमंदिर' असे ठेवले श्रीपत ज्या स्थानी जन्मले ती जागा या मंदिराचे जवळच असून ती श्रीपतबंधू नरसिंहराव यांनी मिळवून त्या ठिकाणी श्रीपतमहाराजांचा फोटो वगैरे विधियुक्त ठेवून त्याची कायमची पूजेची व्यवस्था केली आहे श्रीपतजन्मोत्सव या ठिकाणी दरसाल दड्डीग्रामस्थ मोठ्या थाटात साजरा करतात व पालखीसेवा वगैरे होऊन महाप्रसादही होतो

श्रीक्षेत्री श्रीपतमंदिराखेरीज आणखी जी पवित्र व वंदनीय स्थानें आहेत त्यांची थोडक्यात माहिती पुढीलप्रमाणे

श्रीपतमातोश्री – तुळशीवृंदावन–श्रीपतांच्या मातोश्री प पू ग भा सीताबाई या श्रावण शु १५ शके १८५० ( ३१-८-१९२८ ) रोजी देवाधीन झाल्या त्यांचा देह मोठ्या समारंभानें बाळेकुंद्रीस नेऊन श्रीपतांच्या औदुंबरकट्ट्यासमोर थोड्या अंतरावर त्याला अग्निसंस्कार करण्यात आला आणि मातोश्रींचे स्मारक म्हणून त्या दहनभूमीवर एक सुंदर संगमरवरी तुळशी-वृंदावन

बांधण्यात आले. अशा रीतीने ज्या माउलीने श्रीपंतांना जन्म दिला त्या प. पू. मातोश्रींच्या पुण्यस्थानाचेही दर्शन घेण्याची भक्तमंडळीची सोय झाली आहे. हे संगमरवरी वृंदावन बिकानेरहून करवून आणले आहे.

श्रीपंतबंधू गोविंदरावदादा-प्रेमध्वज-कट्टा : श्रीपंतबंधू गोविंदरावदादा हे श्रावण शु. ३ शके १८५७ (२-८-१९३५) रोजी श्रीपंतस्वरूपी विलीन झाले. त्यांचा देह बाळेकुंद्रीस नेऊन श्रीकट्ट्यासमोरील मातोश्रींचे तुळशी-वृंदावनाच्या पूर्वेस अगदी जवळच त्यास अग्निसंस्कार करण्यात आला. त्या ठिकाणी त्यांचे स्मारक म्हणून एक सुंदर संगमरवरी दगडाचा चबुतरा बांधून त्यावर पादुका व त्यामागे श्रींचा प्रेमध्वज उभा करण्यात आला आहे. हा संगमरवरी चबुतराही राजस्थानमधून करवून आणला असून थोड्याच अंतरावर 'श्रीगोविंदभुवन' नावाची एक लोखंडी, भव्य व प्रशस्त अशी एक धर्मशाळा बांधलेली आहे.

श्रीपंतमंदिराजवळ श्रीदत्ततीर्थ ही विहीर असून यात श्रीपंत-मातोश्रींनी श्रीपंतांचे मामा श्रीपादपंत यांनी काशीक्षेत्राहून पाठविलेले पवित्र गंगाजल घातले आहे. श्रीक्षेत्रातील सर्व मंडळी याच विहिरीचे पाणी वापरतात व येणारे भाविक यात्रेकरू तीर्थ म्हणून ते ग्रहण करतात.

श्रीपंतमंदिराच्या मागचे बाजूस लागूनच श्रीऔदुंबरकट्टा हे पवित्र स्थान आहे. या ठिकाणी श्रीपंतमहाराजांचा पार्थिव देह अग्निनारायणाचे स्वाधीन केला होता व त्या ठिकाणी श्रीपंतबंधू गोविंदरावदादा यांनी लावलेला औदुंबराचा रोप आता पुष्कळच मोठा झाला असून त्यासभोवती चिरेबंदी पट्कोनी कट्टा बांधलेला आहे व त्यावर कॉंक्रीटची छत्री बांधलेली आहे. औदुंबरवृक्षाजवळ श्रींच्या पादुका ठेविल्या आहेत त्या ठिकाणी भक्तमंडळी अनुष्ठान वगैरे करतात.

श्रीपंतांच्या मातोश्री 'श्रीसीताबाई' व वडील 'श्रीरामचंद्रपंत' यांचे स्मरणार्थ हे 'सीताराममंदिर' इ.स. १९३७ मध्ये मुंबईचे एक धनिक श्रीपंतभक्त कै. मुकुंदराव दादाजी राणे यांनी बांधविले. या मंदिरात श्रीपंतांच्या पूजेतील श्रीदत्तात्रेयांचा फोटो, श्रीपंतबंधू गोविंदरावदादा यांच्या पादुका, श्रींचा पालखीसेवेसाठी पूजेतील फोटो वगैरे पूज्य वस्तू ठेवल्या असून प्रत्येक पालखीसेवेस या मंदिरापासून आरंभ होण्याचा प्रघात आहे.

श्रीपंतमंदिराचे पिछाडीस दक्षिणबाजूस टुमदार चिरेबंदी असे श्रीनरसिंहमंदिर असून ते श्रीपंतांचे भाचे कै. शंकरविरूपाक्ष ऊर्फ आप्पाण्णा पत्तीहाल व उचगाव येथील श्रीपंतशिष्य कै. लक्ष्मणराव गणपतराव पावशे यांनी इ. स. १९२७ मध्ये बांधले. या ठिकाणी श्रीपंतांसह सर्व बंधूंच्या पवित्र अस्थि एकत्र ठेवल्या असून त्यांची योग्यता व यानिमित्त बंधूप्रेमाची महती दर्शवणारा शिलालेख तेथे बसविला आहे. त्यावरील मजकूर पुढीलप्रमाणे आहे.

॥ श्री दत्त ॥

"ज्या महात्म्यांनी आपले वडील बंधू श्रीदत्तावतारी श्रीपंतमहाराज यांची अत्यंत मनोभावे सेवा केली, त्यांच्या अवधूतवृत्तीला आळा घालून भक्तप्रेमपाशात त्यांना बद्ध करून ठेविले व हजारो भक्तांना भक्तिप्रेमात खेळविले त्या श्रीगोविंद, श्रीगोपाळ, श्रीवामन, श्रीनरसिंह व श्रीशंकर या बधूंनी आपल्या वर्तनाने जगाला उज्वल बंधुप्रीतीचा जो धडा घालून दिला, त्याचे अखंड स्मरण व्हावे म्हणून त्यांचे अस्थिरूपी अवशेषही समरस होऊन या पूज्यस्थानी एकत्र वसत आहेत."

वरील शिलालेखाखेरीज श्रीपंतांचा नेहमी बसण्याचा कोच, त्यांची एकतारी, श्रीगोविंदरावदादांच्या बोटांचे ठसे, श्रीपंत व सौ. यमुनाक्का यांचा, तसेच श्रीपंतबंधू व मातोश्री यांचे फोटो वगैरे वस्तू दर्शनाकरिता ठेविल्या आहेत.

या ठिकाणी नित्यपूजा व सांजसकाळ आरती होते.

श्रीपतमहाराजाचा पार्थिव देह ज्या पवित्र अग्निनारायणाच्या स्वाधीन होता, त्याचा प्रज्वलित शेष अवधूतमठीत कायम प्रदीप्त असून भक्तमंडळी येथील पवित्र विभूती सदैव घेऊन जातात. या ठिकाणी श्रीपताचा कफनी घातलेला मोठा फोटो ठेवला असून कमंडलू, व्याघ्राजिन वगैरे अवधूत संप्रदाय-पूजेत वापरण्याच्या काही पवित्र वस्तू ठेविल्या आहेत व येथेही नित्य पूजाअर्चा होत असते. या मठीचे बांधकामास मुंबईचे श्री विश्वनाथ तुकाराम नार्वेकर, सराफ यांनी आर्थिक साहय दिले.

श्रीपतमंदिराचे पश्चिमेस थोड्या अंतरावर आमराईचे शेवटी एक सभागृह असून ते श्रीपतबंधू गोपाळराव यांचे स्मृतिप्रीत्यर्थ बांधले आहे. या ठिकाणी त्यांच्या पवित्र अस्थी ठेविल्या असून श्रीपतपुण्यतिथीउत्सवात या ठिकाणी संगीत भजन-कार्यक्रम, कीर्तने, प्रवचन, व्याख्यान वगैरे कार्यक्रम होतात, तसेच सर्व भक्तमंडळींची सभा भरून त्यांत संस्थानचा वार्षिक अहवाल वगैरेवर चर्चा होते.

बाळेकुंद्री गावातील श्रीपताच्या वडिलोपार्जित वाड्याचे परसात श्रीपताचे आजोबा श्रीबाळकृष्णमहाराज यांची व श्रीपतमहाराजाची अशा दोन समाध्या आहेत व श्रीपतपुण्यतिथीउत्सवात प्रथम दिवशी 'श्रीप्रेमध्वजा'ची मिरवणूक येथूनच सुरू होते आणि दुसरे दिवशी सकाळी श्रींच्या पालखीची मिरवणूक वाड्यातून निघते. वाड्याचे जवळच श्रीरामेश्वराचे पुरातन व जागृत देवस्थान आहे.

दररोज पहाटे ४ वाजता श्रीक्षेत्री नगारा होतो. सूर्योदयापूर्वी एक तास भजन-सेवा चालते व श्रींची षोडशोपचार-पूजा व आरती होऊन तीर्थप्रसाद वाटला जातो. दोन प्रहरी भक्तांच्या मतीने असलेल्या शाश्वतदिन, विशिष्टदिन, व नित्यनैमित्तिक-पूजा म्हणजे पंचामृतासह रुद्राभिषेक व इतर अभिषेकसूक्तासह षोडशोपचार पूजा होऊन सायंकाळी सूर्यास्तापूर्वी नगारा होतो व सकाळप्रमाणेच एक तास भजनसेवा होते. 'ॐ नमः शिवाय' असा अखंड घोष येथे सुरू असतो.

## १३. विजापूरचे नृसिंह-मंदिर

विजापूरची ग्रामदेवता 'नरसोबा' याचा शतसांवत्सरिक पालखी सोहळा काही वर्षांपूर्वी पार पडला. या निमित्ताने नृसिंहमंदिराचा थोडासा इतिहास जनतेपुढे ठेविला. अस्सल कागदपत्राच्या ऐवजी इतर आनुषंगिक गोष्टींनाच विचारात घेणे भाग पडले व जो निष्कर्ष वाटला तो जनतेच्या पुढे ठेविला आहे.

नरसोबाच्या वाडीस श्रीनृसिंहसरस्वतींनी बारा वर्षे तपाचरण केले व त्यामुळे त्या वाडीस दत्तसंप्रदायात एक विशिष्ट महत्त्व प्राप्त झाले. येथून नरसिंहसरस्वतींनी आपला मुक्काम हलविला व ते शके १३५६-५७ च्या सुमारास गाणगापुरास आले. नरसोबाची वाडी ते गाणगापूर या प्रवासमार्गाचे आमच्या दृष्टीने विशेष महत्त्व आहे कारण या मार्गावरच विजापूर आहे. नरसोबाच्या वाडीहून गाणगापुरास जाताना वाटेतच ककमरी रामतीर्थ लागते. हे क्षेत्र पुरातन असून तेथील स्वयंभू रामेश्वराची पिंडी रामाने दंडकारण्यातील प्रवासात स्थापन केली अशी आख्यायिका आहे. नरसिंहसरस्वती हे शिवभक्त होते, हे आपणास माहीत आहेच. त्यांनी यात्रा केल्या त्या विशेषत: शिवस्थानाच्या हेही प्रसिद्ध आहे. तेव्हा त्यांनी या पुरातन क्षेत्रास जे त्यांच्या मार्गावरच होते ते डावलणे शक्य नाही. त्यांच्या त्या भेटीचे स्मारकच की काय त्या देवळात आजही नरसिंहाची भग्न मूर्ती

आहे ती मुसलमानानी भग्न केली हे न सागता कळण्याजोगे आहे शकराच्या देवळात नरसिंहाची मूर्ती असणे याला काहीतरी विशेष कारणच असणार व त्याची गाणगापुरास जाताना ही दिलेली भेट हेच कारण असणार शिवाय नरसिंहसरस्वतीना नरसिंहाचा मत्रोपदेश होता हेही विसरता येत नाही गुरुचरित्रात या गोष्टीचा स्पष्ट उल्लेख आहे 'या कारणे श्रीगुरु मूर्ती। नरसिंह मत्रें उपासना करिती।' ( अ १९, ओवी २७ )

ककमरी रामतीर्थानतर विजापूर लागते वाटेत तोरवी हे क्षेत्र आहे या ठिकाणी नरसिंहाचे पुरातन मदिर आहे वास्तविक ते मुळात शिवमदिरच होते परतु काही घटनामुळे त्याचे रूपातर नरसिंहमदिरात झाले मूळ सावाची पिंडी त्या देवळात वाजूला काढून ठेविलेली अद्याप तेथे आहे नरसिंहसरस्वती विजापुरास येण्याच्या अगोदर या मदिरात थोडा वेळ थावून सावाचे अथवा दोन्ही देवाचे दर्शन घेऊन विजापुरास आले असणे सभवते त्याची कारणें दोन एक काही काल विश्राती आणि दुसरे व महत्त्वाचे कारण म्हणजे तोरवी येथे जी नरसिंहाची मूर्ती आता आहे, तिच्या मूलस्थानाचे दर्शन

विजापुरातील सध्याच्या नरसोबाच्या मदिराच्या जागी एक अश्वत्थ वृक्ष आहे त्या वृक्षाखालीच नरसिंहसरस्वती उतरले असावेत या वृक्षापासून एक फर्लांगाच्या अतरावर चालुक्यकालीन देवाल्याचे अवशेष दिसतात त्या ठिकाणीच नरसिंहाचे मदिर होते या मदिरास चालुक्य व यादव राजाच्या सरदारानी देणग्या दिल्याचे शिलालेख, जुन्या कानडी भाषेत आजही पहावयास सापडतात शके १२२७ च्या सुमारास मलिक काफूरने दक्षिणेत जी झझावाती स्वारी केली व अनेक देवालय नष्ट केली त्यात हे देवालय नष्ट केले गेले असावे असे सागण्यात येते की, मुसलमानाच्या मूर्तिभजनाच्या अत्याचारापासून ही मूर्ती वाचविण्याकरिता चिम्मलगी गावी नेण्यात येऊन तेथे एका शेतात पुरून ठेवण्यात आली पुढे काही कालाने कोणास दृष्टात झाल्याने ती तेथून काढून तोरवी येथील सध्याच्या देवळात स्थापन करण्यात आली शके १४४० च्या सुमारास या नरसिंहमदिरात (तोरवीत) कुमार वाल्मीकीने सुप्रसिद्ध तोरवी रामायण लिहिले त्या अर्थी त्याचे अगोदर २१० वर्षे ती मूर्ती, इतका महिमा वाढण्यास, तेथे प्रतिष्ठापिली गेली असली पाहिजे ही शक्यता मान्य केल्यास नरसिंहसरस्वतीनी तोरवी मुक्कामी जुनी शिवमूर्ती व नव्याने बसविलेली नरसिंहमूर्ती दोन्हींचेही दर्शन घेतले असणे शक्य आहे, व या नरसिंहाच्या मूलस्थानाचे दर्शन घेण्याकरिता ते विजापुरास काही काल थावणे शक्य आहे ते सन्यासी असल्याने अश्वत्थाखाली रहाणे यतिधर्मानुसार योग्यच होते नतर ते तेथून गाणगापुरास गले

श्रीनरसिंहसरस्वतीचा गाणगापूरक्षेत्री अजमासे २३–२४ वर्षे वास होता या कालात त्याना बरेच शिष्य मिळाले त्यानी केलेल्या चमत्कारामुळे, अथवा सहज घडलेल्या चमत्कारामुळे असे म्हणणे जास्त योग्य होईल, त्याची फार प्रसिद्धी झाली याच कालात बेदरचा बहामनी राजा अल्लाउद्दीन दुसरा राज्य करीत होता याच्या अगोदरचा राजा अहमदशहा पहिला हा फार क्रूर व हिंदुद्वेष्टा होता त्याच्या अत्याचारामुळे हिंदू प्रजा हवालदील झाली होती त्याना नरसिंहसरस्वतीचा मोठा आधार वाटू लागणे स्वाभाविक होते अल्लाउद्दिनास या वदलत्या परिस्थितीची जाणीव झाली होती त्यामुळेही कदाचित असेल, त्यास हिंदू साधुसताचे महत्त्व जाणवू लागले होते नरसिंहसरस्वतीची कीर्ती त्याचे कानावर गेली होती याच वेळी तो व्याधिग्रस्त झाला हकीमाच्या औषधाचा

काही उपयोग होईना, तेव्हा तो नरसिंहसरस्वतीच्याकडे, त्याची कृपादृष्टी होऊन आपण व्याधिमुक्त व्हावे या इच्छेने आला. गुरुचरित्राच्या वाचकांना हे माहीतच आहे की, पहिले दत्तावतार श्रीपादश्रीवल्लभ यांनी आपल्या रजकास पुढील जन्मी तू राजा होशील व सर्व राजवैभव भोगशील, असा आशीर्वाद दिला होता.

नरसिंहसरस्वती हेच पूर्वजन्मीचे श्रीपादश्रीवल्लभ अल्लाउद्दीन स्वामीच्याकडे येताना दिसताच स्वामींनी त्यास उद्देशून म्हटले, ' या रे रजका कोठें असशी। बहुत दिवसा भेटलासी।' स्वामींची भेट झाल्यावर अल्लाउद्दीन रोगमुक्त झाला व त्याने स्वामींना बेदरास नेऊन सिंहासनावर बसवून त्याची पूजा केली वगैरे कथाभाग सर्वपरिचित आहे. या वेळी महाराष्ट्राच्या इतिहासातील श्रीछत्रपतींनी श्रीरामदासांना आपले राज्य अर्पण केल्याच्या प्रसंगाची आठवण झाल्याशिवाय रहात नाही असो. बेदरचा मुसलमान राजा व नरसिंहसरस्वतींच्या या कथेचा विजापूरच्या आदिलशाही राजाशी व नरसिंहसरस्वतींशी संबंध विपरीत रीतीने म्हणजे विजापूरचा इब्राहीम अदीलशहा (दुसरा) हाच पूर्वजन्मीचा रजक व त्याची व स्वामींची प्रत्यक्ष भेट झाली असा जोडला जातो. पण ही गोष्ट कालदृष्ट्या जमत नाही हे स्पष्ट आहे. नरसिंहसरस्वती शके १३८० मध्ये कदलीवनास गेले व अदृश्य झाले तर इब्राहिम अदिलशहा दुसरा हा शके १५०२ मध्ये गादीवर आला. आदिलशाहीची स्थापनाच मुळी शके १४१२ मध्ये झाली. बेदरचा बहामनी राजा अल्लाउद्दीन दुसरा यास एक जीवघेणा फोड झाला होता, यास इतिहासाची साक्ष आहे. तेव्हा रजकाच्या कथेशी विजापूरच्या बादशहाचा संबंध नाही हे अगदी स्पष्ट आहे. इब्राहिम दुसरा व नरसिंहसरस्वती यांचा कशा प्रकारचा संबंध आला ते आता पाहू.

बहामनी राज्य मोडून त्याच्या पाच शाह्या झाल्या. त्यातील आदिलशाही ही एक होय. ही शके १४१२ चे सुमारास स्थापन झाली, या वेळी श्रीनरसिंहसरस्वतींना श्रीशैल्यगमन करून ३२ वर्षे झाली होती. या आदिलशाहीतील सहावा राजा इब्राहिम दुसरा. याची कारकीर्द शके १५०२ मध्ये सुरू झाली. श्रीनरसिंहसरस्वतींना निजानंदी बसून आता १२२ वर्षे झाली होती. हा राजा हिंदूंचा चाहता होता व याच्या मंत्र्यांमध्ये ब्राह्मण व मराठे बरेच होते. या इब्राहिम आदिलशहास त्याची हिंदू व मुसलमान प्रजा सारखीच मानत होती. वाडीच्या नरसोबाच्या देवळाच्या कागदपत्रांवरून तेथील पुजारी वे. शा. सं. वामन गोविंद पुजारी यांनी बरीच माहिती पुरविली आहे; त्या माहितीवरूनच पुढील माहिती देत आहे.

या इब्राहिम आदिलशहास एक मुलगी होती. तिची दृष्टी गेली होती. हकीमांनी व मुस्लीम अवलियांनी बरेच उपाय करून पाहिले, पण त्यांचा उपयोग होईना. राजाने ब्राह्मणांना उपाय विचारला. त्यांनी त्यास नरसोबाचे वाडीस नरसिंहसरस्वतींचे जागृत स्थान आहे; तेथे मुलीसह जाऊन सेवा केल्यास उपयोग होईल असे सांगितले. राजा नरसोबाचे वाडीस गेला व तेथे त्याने श्रीनरसिंहसरस्वतींच्या पादुकांची मनोभावे सेवा केली. थोड्या दिवसांतच मुलीस दिसू लागले. राजाने त्या देवस्थानास औरवाड व गौरवाड ही दोन गावे इनाम दिली, जी अद्याप चालू आहेत. पादुकांवर घालण्यास पाने वगैरे असलेले मुसलमानी पद्धतीचे वस्त्र दिले. या वेळपावेतो औदुंबराखाली पादुका उघड्या होत्या. त्यावर मुसलमानी पद्धतीची पण घुमट नसलेली इमारतही यानेच बांधून दिली असे तेथील लोकांच्या सांगण्यावरून कळते. औरवाड व गौरवाड या गावांची इनामे पुढे शिवछत्रपती, पेशवे व औंधचे पंतप्रतिनिधी यांनी सनदा देऊन चालविली; त्यांत आदिलशाहीने दिलेल्या

इनामाचा उल्लेख आहे येथवर पुजाऱ्यानी दिलेली माहिती झाली

मुलीस दृष्टी आल्यावर इब्राहिम आदिलशहा विजापुरास परत आला त्याला स्वामीची सेवा विजापुरात राहून घडावी असे वाटणे साहजिकच होते ती कशी साध्य होईल या विवचनेत तो असता त्यास स्वप्नात दृष्टात झाला की, आर्किल्यात तीन खदकाच्या मध्ये जो अश्वत्थ आहे, तेथे मी मूर्त स्वरूपात आहे, असे समजून तू तेथेच पूजाअर्चा करीत जा ती मला पावेल त्याप्रमाणे इब्राहिमने या अश्वत्थाची पूजाअर्चा करण्यास सुरुवात केली त्या जागी मुसलमानी पद्धतीची लहानशी कमान बाधली व आज जो गाभारा आहे तो बाधला व त्याचे पुढे सभागृह व त्याना कमानी असे विशिष्ट स्वरूपाचे देवालय बाधले गाभाऱ्यावर जे शिखर आज दिसते ते अलीकडे बाधलेले आहे नरसोबाच्या वाडीप्रमाणे घुमट अथवा शिखर काहीही नसलेले देऊळच येथेही बाधले इब्राहिम आदिलशहा आपल्या फर्मानावर 'श्रीसरस्वती' असे लिहीत असे असे दिसते ते तो सरस्वती या देवतेकरिता की नरसिंहसरस्वतीच्या विषयीच्या पूज्य भावनेने, याचा शोध घेणे योग्य ठरावे

असे दिसते की, देऊळ जरी राजाने स्वत - करिता बाधले होते तरी ते सर्वांना खुले होते कारण काखडकीचे सुप्रसिद्ध सत महिपतिस्वामी येथे कीर्तने करीत असत त्याना दत्तानेयावरील पदे रचण्याचे या देवळातच स्फुरले असेल काय ? सहज विचार येऊन जातो या देवळाशी सबधित इकडील काही मठही आहेत असे दिसत या देवळात तप साधना करणारे काही सत दिसतात महिपतीचे गुरू भास्करस्वामी व त्याचे गुरू शानुग पीर याचा या देवळाशी अत्यत निकटचा सबध होता असे समजण्यास बराच आधार दिसतो शानुग पीराची समाधी ( कबर ) या देवळानजिक खदकाबाहेरच आहे रायचूरजवळच यादगिरी हे एक प्रसिद्ध शहर आहे तेथे विश्वब्राह्मणसमाजाचा एक मठ आहे. या मठाचे मुख्याधिपतीचा सर्व विश्वब्राह्मणसमाजावर गुरू म्हणून अधिकार चाले. दुसऱ्या अलीआदिलशहाच्या वेळी एक चमत्कार घडला तो सर्व येथे देण्याचे कारण नाही, पण त्या वेळी त्या मठात असलेल्या बारा वर्षांच्या गुरुनाथाना विजापूरच्या विश्वब्राह्मणसमाजाच्या आग्रहाच्या निमत्रणावरून येणे भाग पडले होते ते स्वामी या नरसोबाच्या देवळातच अनुष्ठानाला बसले होते या देवळाजवळील अश्वत्थावर एक ब्रह्मराक्षस होता, त्यास त्यानी वठणीवर आणिले तो ब्रह्मराक्षस गुरुस्वामीना शरण गेला व त्याच्या आज्ञेत त्याने रहाण्याचे कबूल केले. तेव्हा त्यानी त्या ब्रह्मराक्षसास अदृश्यरूपाने त्याची पालखी पुढील बाजूने वहावयाची आज्ञा केली ती त्याने मान्य केली. विजापुराहून गुरुनाथस्वामी जेव्हा पालखीतून परत यादगिरीस निघाले, तेव्हा पालखीच्या पुढच्या दाड्यास हार घालण्यात आला व मागील दाड्यास तीन भोई उचलण्यास लागले, पालखी व्यवस्थित चालू लागली पालखीच्या एका दाड्याकडेच भोई लागू लागले व एका दाड्याला मनुष्यविरहित—अदृश्य शक्ती लागू लागली, म्हणून तेव्हापासून या मठासच 'एक दडगी मठ' हे नाव पडले या नरसोबाच्या देवळातील अश्वत्थवृक्षाची एक मोठी फादी—जिच्यावर तो ब्रह्मराक्षस बसे—पडली व तीच पुढे यादगिरीस नेण्यात आली व तिचा खाब करून मठात उभा करण्यात आला तो खाब त्या मठात आजही तसाच आहे या दिवसाचे निमित्ताने प्रतिवर्षी या मठात उत्सव साजरा होत असतो याप्रमाणे इतरही काही सस्थाचा या देवळाशी सबध आला होता काय, हा एक सशोधनाचा विषयच आ

इकडील भागात नरसोबाची वाडी व गाणगापूर याचे खालोखाल या स्थानाचे दत्तसांप्रदायिकात महत्त्व आहे. हे एक जागृत स्थान असल्याने भूतबाधा वगैरे असलेले लोक येथे सेवेस येतात. येथेच सेवा करण्याबद्दल अनेकाना दृष्टांत होतात. सेवा केल्यानतर काही ठीक होत असल्याचा अनेकाना अनुभव आहे.

या देवळात मूळात मूर्ती वगैरे काही नाही. अश्वत्थाच्या बुध्यासच शेंदूर चर्चिला असून त्याला लागूनच एक लहानशी कमान बाधलेली आहे. बुध्याच्या त्या आकारामध्ये आज जवळ जवळ चारशे वर्षांत काही फरक पडलेला नाही आज देवळात ज्या इतर मूर्ती दिसतात त्या सर्व बऱ्याच नतरच्या आहेत या देवतेस विजापूरची ग्रामदेवता मानली जाते या देवाच्या दर्शनास हिंदूप्रमाणे मुसलमानही येतात व नवस फेडतात. मुसलमानाच्या लग्नात पूर्वी त्यांच्या वराती येथे येत असत व देवास सव्वा रुपया देण्याची रुढी होती ही रुढी मुस्लिमलीग चळवळ करीपर्यंत चालू होती; ती आता कमी झाली असली तरी अजून अनेक मुसलमान घराणी आपले कुलदैवत म्हणून प्रसाद करुन जातात. लग्नकार्यात सव्वा रुपया दक्षणाही देऊन जातात. फक्त वरात येणे बंद आहे.

या देवळास आदिलशाही बादशहाचेकडून नक्त नेमणूक होती, तीच इनाम कमिशनने येथील वे. शा. स. कै. पाडुरंग दीक्षित बिन बापू दीक्षित यांचे नावे दिनाक २६-१०-१८७४ च्या सनदेने चालू ठेविली. त्या सनदेत म्हटले आहे, " माजी राजाचे वेळेपासून सालीना नक्त नेमणूक श्रीनृसिंहदेव आर्किल्ला कसबे विजापूर तालुका विजापूर जिल्हा कलादगी या देवस्थानाबद्दल पावत आहे. ऐसियास असे ठरविले आहे की सरकारी २७ रुपयांची नेमणूक सरकारी खजिन्यातून चालवून अदा करण्यात येईल." मूळ कागदपत्रे कमिशनने नेली.

या नक्त नेमणुकीशिवाय सरकारातून येथील नगरशेट कै. भगवानदास गोकुळदास दरबार यांचेकडे नरसिंहजयंतिउत्सवानिमित्त ८० रुपये येत असत, ते आता श्रीठाकुरदास दरबार यांचेकडे येतात, त्या पैशाचा विनियोग पूर्वापार चालत आलेल्या उत्सवाकरिताच केला जातो. तसेच श्रींचे पुजाऱ्याचेकडे सरकारातून १३ रुपये नदादीपाकरिता येतात ते त्या कामाकरिताच खर्च होतात.

येथील सुप्रसिद्ध वकील कै. रा. ब. राघवेंद्रराव केभावी यानी मृत्युपत्राने तोरवीजवळील एका शेताचे उत्पन्न या व तोरवीच्या नरसिंहमदिरास सारखे वाटून देण्याकरिता ठेविले होते; पण शेताचे उत्पन्न वेळेवर व योग्य येईनाने झाल्यामुळे ते शेत विकून ती रक्कम बँकेकडे ठेविली आहे व तिचे येणारे व्याज मृत्युपत्रातील इच्छेनुसार खर्च होत आहे.

विजापूरचे एक जुने रहिवासी कै. चिंतामण गणेश टोळ यानी इ. स. १८८९ मध्ये महाल बागायतपैकी रि. स. न. १५० व १५१ अशा दोन माळजमिनी फक्त २५ रुपये प्रसादार्थ घेऊन श्रीस दिल्या. हा कागद त्यावेळचे दत्तफड-कमिटीचे अध्यक्ष कै. बाळाजी मोरेश्वर जोशी यांचे नावे करुन दिला आहे. या उत्पन्नाचा विनियोग दत्तजयंती, गुरुप्रतिपदा, गणेशोत्सव वगैरेकरिता केला जातो. या देणग्या (स्थावर)- शिवाय दत्तफडातून एक मळा नवबागेजवळ विकत घेण्यात आला. वरील दोन्ही स्थावर मिळकती आता चॅरिटी कमिशनरच्या परवानगीने विकण्यात आल्या असून त्याची रक्कम बारा हजार रुपये बँकेत कायम ठेव ठेविली आहे. व्याजाची रक्कम अर्थात् वर नमूद केलेल्या उत्सवाप्रीत्यर्थच खर्च होते.

या देवळाचे पुजारी कै. पाडुरंग दीक्षित बिन बापू दीक्षित हे होते; पण पुढे त्यानी अथवा त्यांच्या वंशजानी हे काम करण्याचे का बंद केले

फळत नाही. त्यांनी ते काम करण्याचे सोडल्यावर बापू रामबकस मामलेदारांनी एका लिंगायताची पुजारी म्हणून नेमणूक केली. त्याचे वंशजच अद्याप ते काम करीत आहेत.

या देवळाची व्यवस्था नीट चालावी या उद्देशाने विजापूर हे इ. स. १८८४ मध्ये जिल्ह्याचे ठिकाण झाल्यानंतर एका व्यवस्थापकमंडळा-मार्फत सर्व कारभार चालविला जात आहे. असे मंडळ १८८७–८८ साली सुरू करण्यात आले असे दिसते. या मंडळाचे पहिले अध्यक्ष कै. बाळाजी मोरेश्वर जोशी हे होते. त्यांच्या मृत्यूनंतर इ. स. १९०१ अखेर श्री. शेगगीर नरहर केंभावी हे अध्यक्ष झाले. अध्यक्षाशिवाय त्यांच्या मदतीस एक कार्यकारी मंडळही असे. आजही ती पद्धत चालू आहे. या देवाच्या दर्शनार्थ अनेक थोर थोर मंडळी येऊन गेली व प्रत्यही येत आहेत.

इनामकमिशनच्या सनदेप्रमाणे नक्त नेमणूक रु. २७ मिळू लागल्याचा कागद आहे. त्याच्या अगोदरचा कागदोपत्री पुरावा आता मिळू शकत नाही. अशा परिस्थितीत इ. स. १८७४ च्या अगोदर ८–१० वर्षे पालखीसोहळा नियमितपणे चालला असणार हे गृहीत धरून १९६५ चे साल शंभरावे मानून शतसांवत्सरिक पालखी सोहळा उत्सव करण्यात आला.

या देवळास नरसोबाचे देऊळ, दत्ताचे देऊळ व हिरोड्या अशी तीन नावे आढळतात. पैकी पहिले नाव श्रीनरसिंहसरस्वतीच्या या स्थानाच्या संबंधामुळे पडले आहे. नरसिंहसरस्वती दत्ताचे दुसरे अवतार मानले गेले असल्याने या स्थानास दत्तमंदिरही म्हणण्यात येते. पण तिसरे नाव हिरोड्या हे कसे पडले याची कल्पना नीट होत नाही. मी फक्त कल्पना येथे नमूद करून ठेवतो. कानडीत हिरे म्हणजे मोठा देवरु म्हणजे देव हे सर्वांना माहीत आहेच. हिरेदेवरु या कानडी शब्दाचा मराठीत हिरोड्या असा अपभ्रंश झाला असण्याची शक्यता आहे. हा देव या विजापूर शहराची ग्रामदेवता आहे हे सर्वमान्य आहेच. या देवळाच्या वृत्तांतात काही अंदाज प्रकट केले आहेत. कागदपत्रांचा व ग्रंथांचा पुरावा मिळत नसल्याने अंदाज करण्यावाचून गत्यंतर उरत नाही. नीट विचार केल्यास मी केलेले तर्क अगदी चुकीचे ठरणार नाहीत असा भरवसा वाटतो. गुरुचरित्राचा हेतू इतिहास सांगणे हा नसल्याने त्यात सर्व गोष्टी सुव्यवस्थित लिहिलेल्या नाहीत. अशा परिस्थितीत काही अंदाज करण्या-वाचून दुसरा मार्ग नाही. पुढील संशोधकास अस्पष्ट का होईना वाट दाखविली गेली तरी माझा कार्यभाग झाला असे समजतो.

– ना. ब. जोशी, विजापूर

# १४. दत्तवाडी, सांखळी

गोमंतकातील अतिशय प्रसिद्ध असे हे दत्तस्थान तेथील निसर्गवैभवानेही दत्तभक्तांना आकर्षित करून घेते. मार्शेल, सांवई व सांखळी ही गोमंत-कातील दत्तभक्तांची त्रिस्थळी आहे. गोमंतकाच्या सांस्कृतिक इतिहासात दत्ताचाही उल्लेख सापडतो. 'केळोशी या साष्टीतील गावात 'आवसेत' नामक एक शेत आहे. ते म्हाळू शेणवी याने दत्तात्रेयाच्या देवालयास दिले होते' अशी १ सप्टेंबर १५८३ ची नोंद पोर्तुगीजांच्या पणजी येथील ऐतिहासिक दप्तरात सापडते. 'योगराज टिळक' हा ग्रंथ दत्तात्रेयाचा असून तो गोमंतकातीलच होय. सन १८८१–८२ या काळात सांखळी येथील दत्तमंदिर तयार होऊन चैत्र व. २ शके १८०४, ५ एप्रिल १८८२ या दिवशी मोठ्या थाटाने मंदिरात दत्तमूर्तीची स्थापनाही झाली.

पणजीपासून सुमारे २०-२५ मैलांवर सत्तग्राम (डिचोली) तालुक्यात हे सांखळी नावाचे टुमदार गाव वसलेले आहे. सन १८७८ च्या सुमारास सांखळीत म्हाळू कामत नावाचा एक अत्यंत भाविक असा विठ्ठलभक्त राहात होता. त्याचा

मुलगा लक्ष्मण हाही विठ्ठल व दत्त याचा भक्त होता नरसोबाच्या वाडीस जाऊन तो मनोभावाने गुरुचरित्राची पारायणे करीत असे परंतु ते गौड सारस्वत असल्यामुळे वाडीचे पुजारी त्याना त्रास देत अशाच एका प्रसगी वडील कामत वाडीस गुरुचरित्र वाचीत असताना त्याना त्रास झाला त्याचे मन खिन्न झाले डोळयातून अश्रू ओसरू लागले त्याच रात्री भगवान् दत्तात्रेयानी त्याना दृष्टात दिला ' भक्ता, तू काळजी करू नकोस आम्हीच तुझ्या गावी येऊ '

कामताच्या मनास कमालीचा हर्ष झाला साखळीच्या येसू शेणवी वोडके याच्या पत्नीस, मथुराबाईस सत्कृत्य करण्याची प्रेरणा झाली नदीच्या अलीकडे, गावठाणात अतिशय निर्जन व निरुपयोगी अशा जागेत एक औदुबराचे झाड लावण्यात आले झाड टवटवीत होत आल्यावर पार बाधण्याचे काम कामतानी सुरू केले ही जागा मुसलमानाची दफनभूमी होती खोद-कामात एक सोन्याचा छोटा नाग, रुप्याच्या पादुकाचा जोड, मारुतीची व गणपतीची पाषाण-मूर्ती इत्यादी वस्तू सापडल्या सन १८७९ मध्ये पाराचे बाधकाम पूर्ण होऊन साखळीच्या दत्त-स्थानाचा प्रारभ झाला

श्रीगोकर्ण पर्तगाळी मठाधीश श्रीमत पूर्णप्रज्ञ-तीर्थस्वामी महाराज याचा दौरा यावेळी गोमत-कात होता त्याची प्रेरणा मिळून दत्तमदिराच्या बाधकामास सुरुवात झाली लक्ष्मण म्हाळू कामत, वासू म्हाळू कामत, गोविंद पै कुचेलकर, यशवत प्रभू आसगावकर, विष्णू शेणवी शेटये, मुकुद शेणवी वोडके इत्यादी मडळीनी पाराशेजारीच गर्भागार बाधले बोरी येथील शिल्पकाराकडून काळ्या पाषाणाची एकमुखी दत्ताची मूर्तीही आणण्यात आली मोठ्या मदिराचे उभारणीचे कार्य सुरू झाले याच सुमारास वासू म्हाळू कामत यास दृष्टात झाला की, ' मी सह्यपर्वत आलाडून आलो असल्यामुळे फार थकलो आहे. विश्रातीसाठी जागा हवी ' एका सन्याशाने हे उद्गार काढून औदुबराच्या पाराकडे बोट दाखविले साक्षात् दत्तप्रभू साखळीच्या दत्त-स्थानात येत असल्याची खात्री सर्वांना पटली साखळीकराच्या दुर्दम्य उत्साहामुळे दत्तमदिर मोठ्या प्रमाणात तयार झाले विशेष म्हणजे गावातील एका जुन्या किल्ल्याचेच सामान या मदिरास उपयोगी पडले.

बोरी येथील शिल्पकाराकडून आलेली काळ्या पाषाणाची मूर्ती देवळामागील औदुबरापाशी ठेवण्यात आली नवी मूर्ती काश्मीरी पाषाणाची आणावी असे ठरले पिंगेशास्त्री व कामत या कामासाठी मुबईस आले एका शिल्पकाराने नेपाळनरेशाच्या सागण्यावरून एक दत्तमूर्ती सुरेखशी तयार केली होती, ती साखळीकराना योगायोगाने मिळाली पादुकाचा सुदर जोडही प्राप्त झाला नवी मूर्ती वाजतगाजत साखळीस येऊन पोचली शास्त्रीमडळीच्या सल्ल्याने मूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेचा विचार ठरला शके १८०४ च्या चैत्री पौर्णिमेपासून वद्य द्वितीयेपर्यत प्राणप्रतिष्ठेचा सोहळा चालू होता गणपती, मारुती, अन्नपूर्णादेवी, बाण, शालिग्राम, नर्मदा, पाषाणनदी असे काही इतर देवही दत्ताच्या सह-वासात येऊन स्थिरावले सर्व गोमतकातून सात-आठ हजार दत्तभक्ताचा समुदाय जमला होता

म्हापसा डिचोली रस्त्यावरील साखळी गावा-लगत असलेल्या या दत्तस्थानाची महती दिवसें-दिवस वाढत गेली सृष्टिसौंदर्याची तर अवीट गोडी या स्थानाभोवती आहे एकान्त व स्वच्छता, टापटीप व भावसघनता याचा अनुभव येथे आजही दत्तभक्ताना येतो देवालयाच्या पार्श्व-भागी नारळी-पोफळीची झाडे असून तेथे सिद्ध-पुरुषाचे स्थान आहे अनेक शिवलिंगेही या भागात दिसतात जवळच प्रसिद्ध असे विठ्ठल-मदिर आहे साखळीची दत्तवाडी म्हणजे गोमत-कातील गाणगापूर समजतात दत्तमदिराच्या

पाठीमागची जमीनही दत्तवाडी संस्थानास योगायोगाने मिळाली. शांताराम दाभोळकर या नावाच्या एका दत्तभक्ताने मंदिराच्या बाजूस दगडी तट, विहीर, मंदिरात काश्मिरी पाषाणाची फरशी अशी कामे केली.

मंदिराचा मंडप हंड्या-झुंबरे यांनी शोभिवंत दिसतो. स्वच्छता व टापटीप गोमंतकी परंपरेस शोभणारी आहे. गर्भागारात 'तीन शिरें सहा हात' अशी दत्तमूर्ती भक्ताची वाट पाहात उभी असते. मूर्तीच्या मागे रुप्याची प्रभावळ आहे. वर रुप्याचा मंडपही आहे. औदुंबराचा पार, अग्रशाळा, विहिरी, स्वयंपाकगृह, पोफळीची बाग इत्यादींमुळे दत्तवाडीच्या सौंदर्यास सीमा उरलेली नाही. नेहमी उत्सव-समारंभ चालू असतात. भक्तांच्या देणग्यांतून पूजाअर्चा सुरू असते. शिविकोत्सव, गुरुचरित्रपारायण, दत्तजयंती अथवा काही प्रसंगी उत्साहाला भरते येते. दर गुरुवारी मोठी पूजा, दीपाराधना, पुराण, कीर्तन, भजन असे कार्यक्रम असतात. पहाटे रोज काकड-आरती होते. देवळाच्या परिसरात पाळावयाचे नियम शुचित्वाला पोषक असेच आहेत. अश्वत्थपार, तुलसीवृंदावन, औदुंबरपार, अग्रशाळा, फुलांची बाग, शमीचा पार, वीजबत्तीची व्यवस्था, दगडी तटबंदी, महादरवाजा, नगारखाना, दीपस्तंभ, हंड्या, झुंबरे, सोन्याचे दागिने, रुप्याची भांडीकुंडी इत्यादी नाना वस्तूंची भर भक्तांनी घातलेली दिसते.

दत्तवाडी या सांखळीच्या देवस्थानाशी संबंधित असलेल्या काही थोर सत्पुरुषांचा उल्लेखही येथे करावयास हवा. साधू सुवाण्णा तोडर या कारवार जिल्ह्यातील चित्रापूरच्या साधकाने येथे सेवा केली आहे. जगन्नाथबुवा थोरोकरांनी मंदिरात गुरुचरित्राचे अनेक सप्ताह केले असून शांताराम नारायण दाभोळकर यांनी या दत्तस्थानात खूपच सुधारणा केल्या. 'दत्तपदगुच्छ' व 'दत्तभजनमाला' अशी त्यांची काही पुस्तके प्रसिद्ध आहेत. त्यांच्या प्रथम पत्नीच्या नावाने एक 'शांतापार' येथेच आहे. विष्णू गिरिधर शेणवी, घैसे, भागीरथीबाई कायकीणी अशा आणखी काही दत्तभक्तांचा संबंध सांखळीच्या दत्तवाडीशी होता.

## १५. बडोद्याचे स्वामीसमर्थ संस्थान

बडोद्यातील सुरसागर, पश्चिम घाटावर श्रीस्वामीसमर्थ यांच्या एका लहानशा घुमटीत पादुका आज कित्येक वर्षांपासून स्थापन केलेल्या आहेत.

अक्कलकोट स्वामीमहाराजांचे एक निस्सीम भक्त-ब्रह्मनिष्ठ वामनबुवा वामोरीकर (बडोदेकर) हे बडोद्यास सुरसागराचे काठी सुवाम्याचे घरात रहात होते.

एकाच वेळी अनेक व्याधींनी त्यांची प्रकृती फार बिघडली. वाचण्याची आशा नसल्यामुळे श्रीस्वामीचरणी विनंतिपत्रे उत्तर येण्याचे पूर्ण आशेने पाठविली होती. परंतु पत्राचे उत्तर १०-१२ दिवसांत न आल्यामुळे प्राणायाम करून जलसमाधी घ्यावी, असा विचार करून रात्री १२ वाजता सगळे निजलेले पाहून सुरसागरातील एरंड्याचे काठी जाऊन एरंड्यात उतरू लागले.

वामनराव एरंड्यात उतरतात, इतक्यात चमत्कार असा झाला की, दीनदयाळ अक्कलकोट स्वामीमहाराज त्या ठिकाणी प्रत्यक्ष प्रगट होऊन त्यांनी वामनबुवांचा हात धरून त्यांना वर ओढले. अतिशय रागाने त्यांना दोन थापड्या मारून महाराज म्हणाले, "शहाण्या गाढवा, आयुष्य असून का मरतोस ? तुझे भोग भोगल्याशिवाय तुला गती नाही. आम्हांवर त्रागा करतोस काय ? सहजसमाधी सोडून प्राणत्यागरूप जलसमाधी कसली घेतोस ?" असे म्हणून त्यांना घरी आणून सोडले व महाराज वामनबुवांचे अंगावर

हात फिरवून म्हणाले, "बरे होईल. उगाच घाबरू नकोस." असे बोलून स्वामी महाराज अदृश्य झाले. दत्तात्रेय समर्थस्वामीमहाराजांचा अभय वरद-हस्त अंगावर फिरल्यावर मग काय विचारता? त्यांना रात्रौ चांगली गाढ निद्रा लागली. प्रात-काळी जागृत झाल्यावर पहातात तो शरीर शांत व मन प्रफुल्लित झाले. बहुतेक व्याधी नाहीशा झाल्या व त्यांना आरोग्य प्राप्त झाले. प्रस्तुत हकीकत शके १७९८ च्या वैशाख शुद्धातली आहे.

श्रीस्वामीसमर्थमहाराजांच्या प्रागट्याच्या स्मरणार्थ प्रतीक म्हणून वामनबुवा यांनी सुर-सागराच्या पश्चिम घाटावर एका लहानशा घुमटीत श्रीस्वामीसमर्थांच्या पादुका स्थापन केल्या.

या गोष्टीला बरीच वर्षे लोटल्यानंतर स्वामीभक्त हल्लीचे संस्थानचे संचालक श्री. वासुदेव रावजी कडुस्कर यास श्रीसमर्थांची प्रेरणा होऊन त्यांनी सन १९५८ सालच्या श्रीदत्तजयं-तीचे दिवशी या पादुकांच्या जोडीला श्रीसमर्थांची मनोहर संगमरवरी मूर्ती स्थापन करावी अशी चालना जोराने सुरू केली. एक गृहस्थ अचानक येऊन त्यांनी श्रींची संगमरवरी मूर्ती देण्याचे आश्वासन दिले.

## १६. बडोद्याचे तारकेश्वर स्थान

अक्कलकोट राजेसाहेब यांचे मानकरी विश्वासराव ऊर्फ आप्पासाहेब हे रहिमतपूर, जिल्हा साताऱ्याचे रहाणारे असून नोकरी-निमित्त अक्कलकोटास रहात होते. त्यांची कन्या जमनाबाई अप्रतिम लावण्यवती होती. आपले योग्यतेप्रमाणे व मुलीचे रूपाप्रमाणे तिला वर कसा मिळतो, याची आप्पा-साहेबांचे मनात काळजी लागली होती. एके दिवशी श्रीस्वामीसमर्थांकडे जाऊन, चरणी मस्तक ठेवून, आप्पासाहेबांनी महाराजांस विनंती केली, "मुलीस चांगले स्थळ मिळण्याची महाराजांनी कृपा करावी." यावर महाराज म्हणाले, "काळजी का करतोस? आम्ही तिला बडोद्याचा खंडेराव नेमला आहे." आप्पासाहेब यास आज्ञेचा अर्थ कळेना. पण महाराजांवर विश्वास ठेवून ते स्वस्थ राहिले. थोड्याच दिवसात बडोदे संस्था-नचे एक प्रतिनिधिमंडळ कन्या पहाण्यासाठी अक्कलकोटास आले व त्यांनी बडोद्याचे महाराज श्रीमंत खंडेराव गायकवाड यांचेसाठी कन्या पसंत केली. आप्पासाहेब मानें साधारण मानकरी असून बडोद्याचे खंडेराव महाराजांचे बरोबर कन्येचे मोठ्या थाटात लग्न झाले. जमनाबाई बडोद्याच्या महाराणी झाल्या. समर्थांच्या आशीर्वादाने आपली कन्या महाराणी झाली म्हणून त्यांना परमानंद झाला. तेव्हापासून अप्पासाहेब व श्रीमंत जमना-बाई महाराणीसाहेब महाराजांचे निस्सीम भक्त बनले.

श्रीमंत जमनाबाई महाराणीसाहेब यांनी आपल्या ताराराजे या कन्येचे नावाने बडोद्यास 'तारकेश्वर' या नावाचे एक शिवालय बांधलेले आहे. त्या शिवालयाच्या प्रवेशद्वाराचे मंदिरावर दर्शनी अशा दोन्ही बाजूस श्रीस्वामीसमर्थांच्या संगमरवरी दोन मूर्ती ठेविलेल्या होत्या. त्या शिवालयात एक गृहस्थ दर्शनास जात असता त्यांनी या मूर्तीतून "मी येथे आहे" असा दोन वेळा आवाज ऐकला होता. त्या गृहस्थाने या मूर्तीबद्दल माहिती श्री कडुस्कर यांना दिली.

हल्लीचे बडोद्याचे महाराज श्रीमंत फत्ते-सिंहराव गायकवाड यांच्या ताब्यात हे 'तार-केश्वर' मंदिर असल्याने मंदिरासाठी मूर्ती देण्याबद्दल श्रीमंतांना विनंती करण्यात आली. श्रीमंतांनी कृपावंत होऊन सन १९६० साली ती मूर्ती दिली. ही मूर्ती संगमरवरी दगडाची लहान असून फारच सुंदर आहे.

नंतर ब्रह्मनिष्ठ प. पू. श्रीरंग अवधूत महाराज नारेश्वर यांच्या शुभ हस्ते मार्गशीर्ष शुद्ध चतुर्दशी (सह पौर्णिमा) गुरुवार श्रीदत्तजयंतीच्या दिवशी तारीख १।१२।१९६० रोजी या मूर्तीची स्थापना व पादुकाचा जीर्णोद्धार करण्यात आला.

सन १९६५ साली बडोद्यातील म्युनिसिपालिटीने एक सभामंडप बांधून दिला असून आजूबाजूची विशाल जागा मंदिरासाठी दिली आहे.

ब्र. नि. प. पू. श्रीरंग अवधूत महाराज यांचे सूचनेबरहुकूम मंदिराचे विश्वस्त (ट्रस्ट) करण्यात आले आहे व मंदिराचा सर्व व्यवहार विश्वस्तामार्फत चालत आहे.

ज्या भक्तास अभिषेकयुक्त महापूजा करावयाची असेल त्याने संस्थानात रु. १०१।–भरावे व एक तिथी निश्चित करुन घ्यावी. त्याप्रमाणे संस्थानकडून दरवर्षी त्या तिथीस भक्ताच्या नावाने संकल्प सोडून अभिषेकयुक्त महापूजा करण्यात येते. संस्थानने हा खर्च त्या रकमेच्या व्याजातून करावयाचा आहे. याप्रमाणे अभिनव योजना सन १९६५ पासून दाखल करण्यात आली आहे. सध्या या योजनेत १३६ भक्तांनी लाभ घेतलेला आहे.

कोणत्याही भक्तास रु. ७–५० भरुन महापूजा करता येते.

श्रींची त्रिकालपूजा होत असते व दर गुरुवारी रात्री ८-३० ते १० पावेतो आरतीचा कार्यक्रम होत असतो. श्री स्वामी महाराजांची 'पुण्यतिथी' व 'श्रीदत्तजयंती' असे वार्षिक दोन कार्यक्रम संस्थानमार्फत होत असतात. या उपरान्त 'गुरुद्वादशी', 'गुरुप्रतिपदा', 'श्रीरंगजयंती' इत्यादी दिवशी भजन वगैरेचा कार्यक्रम होत असतो.

सन १९६१ सालात श्रीदत्तजयंतीचा उत्सव सुरु असता एकादशीचे दिवशी सकाळी ६–३० वाजता श्रींची आरती होत असता श्रीचे मूर्तीने आपले मस्तक डोलवून आशीर्वाद दिलेला आहे. तेव्हापासून संस्थानचा दिवसेंदिवस उत्कर्ष होत आहे.

ब्र. नि. प. पू. श्रीरंग अवधूत महाराज यांनी आपल्या पादुका सन १९६५ सालात गुरुद्वादशीचे दिवशी दिल्या आहेत व त्या श्रीचे मूर्तीसन्निध ठेविण्यात आल्या आहेत.

पूज्य श्रींनी खर्चाचा आकडा नक्की करुन दिला आहे व त्याप्रमाणे सर्व व्यवस्था पंचामार्फत होत असते.

पूज्यश्री ब्रह्मभूत होण्यापूर्वी म्हणजे तारीख २८ माहे ऑगस्ट १९६८ रोजी शेवटी संस्थानात येऊन संस्थानची उत्तरोत्तर भरभराट होईल असा आशीर्वाद दिलेला आहे.

श्रीसद्गुरू बाळाप्पा महाराज यांच्या गादीवर सांप्रत विद्यमान असलेले प. पू. श्री गजानन महाराज यांचे दोन वेळा संस्थानमध्ये आगमन झाले आहे व "आम्ही येथे आहोत" असे सांगितले आहे.

श्रीसद्गुरु शंकराचार्य, श्रीकरपात्रीजी वगैरेंसारख्या थोर विभूतींनी पण या संस्थानचा महिमा गाइला आहे.

स्वामीकृपेने संस्थानची दिवसेंदिवस भरभराट व उत्कर्ष होत आहे.

संस्थानचे कीर्तीचा सुगंध सर्वत्र दरवळला असून दररोज व दर गुरुवारी असंख्य भक्तमंडळी श्रीस्वामीसमर्थांच्या दर्शनास येऊन आपली मनःकामना पूर्ण करुन घेत आहेत. तसेच बाहेरगावाहूनही अनेक भक्तमंडळी खास दर्शनासाठी व नवस फेडण्यासाठी येत असतात.

श्रीस्वामीसमर्थांची लीला अगाध आहे व त्यांच्या कृपाप्रसादानेच आज या संस्थानला तीर्थक्षेत्राचे स्वरूप प्राप्त झाले आहे.

— श्री. ग. गडकरी

## १७. बडोद्याचे नीलकंठेश्वर

बावजीपुरा (शिवाजी रोड) दांडिया बाजारात श्रीनीलकंठेश्वर महादेवाचे प्रसिद्ध मंदिर आहे त्याच्या विस्तीर्ण आवारात उत्तरेच्या बाजूस हे 'श्रीदत्तस्थान' आहे देवस्थान विस्तीर्ण अशा औदुंबराच्या वृक्षछायेखाली आहे पूर्वी प्रसिद्ध श्रीनीलकंठेश्वर महादेवाचे विस्तीर्ण आवारात एक औदुंबराचा वृक्ष होता

प पू श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराज (गरुडेश्वर) यांचे एकनिष्ठ परम शिष्य सदाशिव रामचंद्र पुराणिक हे शिनोर (चांदोद नर्मदातीरी) येथे रहात असत त्या वेळी श्रीवासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराजांचा मुक्काम मार्कंडेश्वर महादेवाच्या मंदिरात होता स्वामीमहाराज सदाशिव रामचंद्र पुराणिक यांच्या येथे भिक्षेस येत असत स्वामी महाराजांनी त्यांना गुरुमंत्र दिला होता त्यांचे चिरंजीव गजानन सदाशिव पुराणिक हे बडोद्यास रहात होते पुढे त्यांनी वडिलांच्या स्मरणार्थ वरील 'औदुंबर' वृक्षास सन १९५२ साली पार बांधला

सन १९५६ साली त्या 'औदुंबर' वृक्षाखाली श्री लक्ष्मणराव भावुरकर यांनी देऊळ बांधले व माघ शुद्ध रथसप्तमीच्या शुभमुहूर्तावर त्या मंदिरात श्रीगुरु दत्तात्रेय यांचे सुंदर मूर्तीची स्थापना करण्यात आली व उत्सवास सुरुवात झाली सात दिवस अखंड 'श्रीगुरुचरित्र' व अखंड 'नामसप्ताह' वार्षिक होऊ लागले शेवटच्या दिवशी भंडारा (समाराधना) होतो श्रींची पालखीतून मिरवणूक काढण्यात येते

या संस्थानास प पू रंग अवधूत महाराज (नारेश्वर) यांनी भेट दिली असता त्यांनीच 'श्रीगुरुचरित्र–सप्ताह' व 'नामसप्ताह' हे करण्याबद्दलची प्रथा घालून दिली आहे

सन १९६० साली बडोद्यातील सुप्रसिद्ध लोकप्रिय श्रीमद्भागवतसप्ताहविशारद प पू श्री रामचंद्र केशव डोंगरेशास्त्री यांनी औदुंबराचा पार मोठा करून सुंदर सभामंडप उभारून दिला आहे येथे दर गुरुवारी आरती, दत्तबावनी-पठन व भजन होते त्या दिवशी दत्तोपासक मंडळींची दर्शनासाठी फारच गर्दी होते मंदिराजवळच श्रीनीलकंठेश्वर महादेवाचे, श्रीगणपतीचे व दिंडोरकरांचे श्रीराममंदिर आहे तेव्हा सर्व भक्तमंडळी एकत्र जमून दर गुरुवारी सुंदर यात्रा भरते गुरुद्वादशी, गुरुप्रतिपदा, प पू श्रीवासुदेवानंदस्वामी महाराजांची पुण्यतिथी, श्रीदत्तजयंती, गुरुपौर्णिमा वगैरे उत्सव समारंभाने साजरे होतात

— श्री ग गडकरी

## १८. बडोद्याचे कुबेरेश्वर

पूर्वी बडोदा शहराच्या मध्यभागी मांडवीच्या उंच मनोऱ्यावर भगवा झेंडा फडकत असे जवळच्या सरकारवाड्यात राजकुटुंबाचा निवास असे मनोऱ्याच्या खालील राजमार्गावर एक वेडसर मनुष्य भटकत असे वेडा कुबेर म्हणून लोक त्याला ओळखत एकदा एक पिसाळलेला हत्ती त्याने आवरून धरल्यामुळे त्याच्या दैवी सामर्थ्यावर महाराणीसाहेब खूष झाल्या श्रीजमनाबाईनी त्याला आपल्या गुरुस्थानी मानले त्याच्या नावे महादेवाचे मंदिर उभारले त्याच्या समोरच असलेले दत्तमंदिर कुबेरेश्वराचे दत्तमंदिर म्हणून प्रसिद्ध असून अनेक दत्तभक्तांची या दत्तावर निष्ठा आहे दत्तबावनीचे पाठ येथे दर गुरुवारी म्हटले जातात

## १९. डभोई

प प वासुदेवानंदसरस्वतीस्वामी (टेंबे) गरुडेश्वर, यांचे प्रेरणेने डभोई, जिल्हा बडोदे येथे

श्रीदत्तमंदिर दत्तभक्त रामचंद्र दत्तात्रय पेडगावकर यांनी स्थापन केले. सन १९४८ साली प्रथम फोटोवरून श्रीदत्तजयंती उत्सव केला व सन १९४९ साली दत्तमूर्तीची स्थापना डभोई येथील एक ब्राह्मण गं. रतुकाना बेन अंबालाल धनसुखलाल दवे यांनी त्यांचे घरात जागा दिली व तेथें श्रींची स्थापना केली.

दत्तभक्त रामचंद्र दत्तात्रय पेडगावकर हे लहानपणापासून गरुडेश्वर येथे स्वामींचे उत्सवास जात असत. श्रीगुरुचरित्रपारायणे नेहमी करीत असता त्यांना स्वामींचा गाणगापूरला जाण्याचा दृष्टांत झाला; त्याप्रमाणे गाणगापुरीही श्रीगुरुचरित्रपारायणे केली, तेव्हा मूळ स्थळी डभोई येथे जाऊन पारायणे करणेची आज्ञा झाली. त्याप्रमाणे ११०० पारायणे केली व त्यानंतर स्वामींचे आदेशानुसार डभोई जिल्हा बडोदे येथें दत्तमंदिर स्थापन केले.

श्रीगुरुचरित्र, नवनाथभक्तिसार आदी ग्रंथांची यांनी पुष्कळ पारायणे केली; तसेच श्रीदत्तप्रबोध ग्रंथाचीही पारायणे केली.

गुजरात राज्यात प. पू. वासुदेवानंदसरस्वती स्वामी ( टेंबे स्वामी ) यांचे प्रेरणेने स्थापन झालेले हेच एक दत्तमंदिर आहे.

## २०. गेंडीगेट दत्तमंदिर, बडोदे

हे खाजगी देवस्थान प्राचीन असून मुख्य मूर्ती श्रीमहाविष्णूची आहे. कै. शंकरराव लक्ष्मणराव पट्टणकर ह्यांना त्यांचे गुरू ब्रह्मनिष्ठ वामनबुवा वामोरीकर ( पूर्ण दत्तावतारी श्रीअक्कलकोटस्वामीसमर्थांचे शिष्य ) ह्यांनी स्वत:च्या पूजेतील देव, अक्कलकोटस्वामींच्या प्रतिमा, चरणपादुका, महावस्त्र ( छाटी ), पंचायतन, श्रीदत्तमूर्ती—वगैरे नित्य पूजेसाठी दिल्याने ते वरील मंदिरात आहेत. शिवाय कै. सौ. उमाबाई ( कै. श्री. शंकररावांच्या पत्नी ) ह्यांच्या अंगात दर गुरुवारी आरतीच्या वेळी श्रीस्वामीसमर्थांचा संचार होत असे व जिज्ञासूंना मार्गदर्शन मिळत असल्यामुळे हे 'दत्तमंदिर' म्हणून ओळखले जाते. गुरुपौर्णिमा, श्रीदत्तजयंती, ब्र. वामनबुवा व अक्कलकोटस्वामीसमर्थांची पुण्यतिथी वगैरे उत्सव यथाशक्ती साजरे केले जातात.



## २१. अबूवरील गुरुशिखर

अरवली हा भारतातील सर्वांत प्राचीन पर्वत आहे. तो राजस्थानात नैर्ऋत्य-ईशान्य पसरलेला आहे.

नैर्ऋत्य भागात 'माउंट अबू' ( अबू पहाड, अबूपर्वत ) हे या पर्वतातील सर्वांत उंच शिखर आहे. त्याची उंची सुमारे १,७०० मीटर आहे. त्याला "गुरुशिखर" असे म्हणतात. हे शिखर अबूपासून सात मैलांवर आहे. अबूपासून पाच मैलांवर व ५०० फूट अधिक उंचीवर 'ओरिया' या नावाचे गाव आहे. हे 'गुरुशिखराच्या' मुख्य टोकाखाली स्थित झालेले आहे. या गावापासून गुरुशिखर तीन मैलांवर आहे. अबूपेक्षा हे अधिक थंड असून या ठिकाणी हिंदू व जैनांची मंदिरे आहेत. या ठिकाणी 'कंखलेश्वर' महादेवाचे प्रसिद्ध मंदिर आहे.

ओरियापासून थोड्या अंतरापर्यंत सडक आहे. परंतु त्यापुढे अरुंद अशी पाऊलवाट ( पगदंडी ) सुरू होते. ती पर्वतावरून आणि नाल्यातून 'गुरुशिखर'पर्यंत जाते. चढाव जरा जास्त आणि अवघड आहे. परंतु दृढभक्तीने येणाऱ्या मानवास तो कठीण वाटत नाही.

श्रीभगवान दत्तात्रेयांनी या स्थानी निवास केला होता. त्या स्मरणार्थ खडकाचे शिळेवर कोरलेल्या पादुका या शिखरावर एका लहानशा मंदिरात स्थापण्यात आल्या आहेत.

या ठिकाणी मोठ्यात मोठी अशी घटा (घाट) आहे तिचा आवाज फार दूरपर्यंत ऐकू येतो

या शिखरावर महान योगी तपश्चर्या करण्यास राहिलेले आहेत.

या ठिकाणी हिंसक प्राणी पण आहेत

या ठिकाणाहून फार दूरची स्थळे नजरेस पडतात दूरचे घनदाट जंगल, हिरवळ तसेच वृक्षराजी व शीतल वाऱ्याच्या मंद मंद लहरी मनाला आनंदित करतात

या ठिकाणी अनेक यात्रेकरू येतात रस्ता जरा भीतिजनक असल्याने यात्रेकरूंच्या रक्षणासाठी एक पोलीसशिपाई सकाळसायंकाळ ओरिया गावापर्यंत येतो ओरियापासून मार्गदर्शक घेणे अधिक हितावह आहे

या ठिकाणी यात्रेकरूंसाठी धर्मशाळा आहे तसेच कित्येक गुहा (गुफा) पण आहेत या ठिकाणी रहात असलेले संत-साधू यात्रेकरूंच्या व्यवस्थेची पूर्ण काळजी घेतात

येथे साधु-सन्याशांना, तसेच गरीब माणसांना मोफत भोजन देण्यात येते येथे एक सुंदर कुवा व बाग आहे

हिंदू धर्माचा उद्धारक रामानंद यांच्या पण पादुका येथे आहेत

या ठिकाणी श्रीमंत तुकोजी महाराज होळकर यांना श्रीस्वामीसमर्थ ( अक्कलकोट ) यांनी दर्शन दिले आहे

— श्री. ग गडकरी

## २२. गिरनारवरील पादुका

अरवली पर्वताच्या नैर्ऋत्येस गुजरात ( सौराष्ट्र ) गिरनारचे डोंगर आहेत या डोंगरावरील रानीव जंगलात भारतातील प्रसिद्ध सिंह आहेत ते पाहण्यासाठी दूरदूरचे लोक येतात. जुनागड शहरापासून दोन मैलावर प्रसिद्ध 'गिरनार पर्वत' फार विस्तीर्ण व उंच आहे

पुराणकालापासून गिरनार पर्वत फार प्रसिद्ध आहे पुराणांनी या पर्वताचा महिमा गर्जून सांगितला आहे या पर्वताच्या भोवती एखाद्या कोटाप्रमाणे सात शिखरे उभी आहेत सभोवतालील असलेले डोंगर पाढऱ्या रंगाचे असून मधला पर्वत निळ्या रंगाचा आहे पारिजातक, मंदार, जाई, मोगरा, इत्यादी फुलांचे ताटवेच्या ताटवे या पर्वतावर उगवल्यामुळे हा पर्वत शोभिवंत दिसतो वड, पिंपळ, औदुंबर, चिंच, जांभूळ, आंबा इत्यादी फलभारसपन्न वृक्ष पर्वतावर ठिकठिकाणी आहेत. करवंदीच्या जाळ्या, सीताफळाची झाडे यासारख्या नाना प्रकारच्या वनस्पतीची पर्वतावर गर्दी झालेली दिसून येते. मयूर ( मोर ), कोकिळा इत्यादी पक्षिगणांच्या आवाजाने पर्वताचा परिसर निनादून जात असतो शिखरावर वारा अत्यंत जोराचा वाहतो

वाघ, चित्ते, अस्वल, सांबर, हरीण, गेंडे यांचीही पर्वतावर वस्ती आहे अनेक वानरे तेथे राहतात

पर्वतावर स्थळोस्थळी वृक्ष, वनश्री, हिरवळ, देवस्थाने, कुंडे व स्वच्छ जलमय पवित्र तीर्थे आहेत

हरकेश्वराचे मंदिर, अंबादेवीचे मंदिर, दामोदर कुंड, मृगीकुंड, भीमकुंडतीर्थ, कमंडलुतीर्थ, भुवनेश्वरमंदिर, नरसिंह मेहताचे स्मृतिस्थान इत्यादी दर्शनीय स्थळे आहेत.

मुचुकुंदाची गुहा आहे दुसऱ्या अनेक गुहा आहेत गुहेत योगीश्वर ध्यानस्थ असतात साधू व सिद्धयोगी अनुष्ठानाला व योगसाधनाला रमतात अनेक साधू अशा गुप्तस्थळी राहतात त्यांना युगायुगाचे ध्यान नसते कोणी गुप्त, कोणी प्रसिद्ध असे हजारो योगी, तपस्वी, व सत्पुरुष या पर्वतावर वस्ती करून राहिले आहेत

पांडवांनी तेथे उग्र तपश्चर्या केली होती, वृकोदराने ( भीमाने ) हिडिंबेचे तेथेच पाणि-

ग्रहण केले. गौतमऋषींनीसुद्धा याच पर्वतावर तपश्चर्या केली होती.

त्याचप्रमाणे शंकराचार्य, रामानंद, गोरक्ष, अवघडनाथ आदी प्रसिद्ध सत्पुरुषांनी याच ठिकाणी तपश्चर्या केली. एवढेच नव्हे तर श्रीगुरू दत्तात्रेय तेथे अजूनही तपश्चर्या करीत असतात.

पर्वतावर सुंदरशा मंदिरात अत्यंत तेजस्वी, दैदिप्यमान व परमसुखदायक अशा 'गुरुपादुका' आहेत.

श्रीसद्‌गुरू दत्तात्रेयस्वामींचे प्रमुख असे हे उत्तम वस्तीस्थान आहे. त्यामुळे अनेक दत्त-भक्त ( दत्तोपासक ) तेथे सेवार्थ राहातात. नेहमी लक्षावधी भाविक लोक दर्शनास येतात. येथे शिवरात्रीचा मेळा भरतो.

"दत्तगुरु गिरनारी भरोसा भारी" अशी अखंड गर्जना चालत असते. श्रीसमर्थ अक्कलकोटस्वामीमहाराज शके १७७५ साली गिरनारपर्वतावर गोमुख तीर्थाजवळ सेवादास नावाचे योगी पुरुष राहात होते त्यांना भेटले होते. त्यांनी योगमार्गातील काही शंका-कुशंकाचे समाधान त्यांचेकडून करवून घेतले होते. रघुनाथभटजी, निरंजनरघुनाथ, जालवणकर, किनाराम इत्यादी दत्तभक्तांचा गिरनारशी असलेला संबंध प्रसिद्ध आहे.

—श्री. ग. गडकरी

# २३. अनसूयातीर्थ

प्रतापनगर (बडोदे) वेस्टर्न रेल्वेलाईनवरून डभोईमार्गे दहा मैलावर चादोद ( गुजरात ) नावाचे क्षेत्र आहे. त्या ठिकाणी नर्मदा नदीचे विस्तीर्ण पात्र आहे. समोरच पूर्वबाजूस 'करनाळी क्षेत्र' आहे. कर्नाळी व नर्मदेचे मधून 'ओर' नदी वाहते, त्या ठिकाणी ओरसंगम आहे. हा संगम पवित्र असल्याने तेथे मृत माणसाच्या अस्थी विसर्जन करतात.

चांदोदक्षेत्राचे पश्चिम दिशेस सुमारे दोन मैलांवर नर्मदा नदीचे तीरावर शिनोर नावाचे गांव आहे. शिनोरपासून 'अनसूयातीर्थ-क्षेत्र दत्तस्थान' पाच मैलावर नर्मदेच्या तीरावरच आहे. त्या ठिकाणी महासती साध्वी दत्तात्रेय-माता अनसूया यांचे मंदिर आहे. मंदिरासमोरच श्रीदत्तात्रेय यांचे मंदिर आहे. तेथील पुजाऱ्याचे नाव जनार्दन साने असे आहे.

हे स्थान अत्यंत पवित्र, निसर्गसुंदर व रमणीय आहे. अनसूयामंदिराजवळची माती निष्ठापूर्वक लाविली असता मोठमोठे रोग बरे होतात; असे कित्येक भाविक भक्ताचे अनुभव आहेत. तसेच अनसूया देवी नवसास पावते अशी भाविक लोकाची श्रद्धा आहे ! गंगासमाप्तीला अनसूया-क्षेत्री मोठा मेळा भरतो. दर रविवार, मंगळवार, शुक्रवार या दिवशी दर्शनासाठी लोकांची अतिशय गर्दी होते.

येथे रक्तपिती लोकांचा प्रसिद्ध दवाखाना आहे. अनेक रोगी येथे बरे होतात. त्याचेसाठी मोफत औषधोपचार करण्यात येतात !

# २४. नारेश्वर

गुजराथमध्ये बडोद्याजवळ मियागाम स्टेशन-मार्गे मोठी कोरळ रेल्वेलाईनवर नर्मदा नदीच्या काठी, नारेश्वर रोड स्टेशनपासून थोड्या अंतरा-वर, 'नारेश्वर' नावाचे क्षेत्र आहे. त्या ठिकाणी ब्रह्मनिष्ठ प. पू. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामीमहाराज ( गरुडेश्वर ) यांचे सद्‌शिष्य श्रीदत्तभक्त प. पू. श्रीसद्‌गुरू रंग अवधूत महाराज यांचा 'अवधूतनिवास' हा आश्रम आहे. प्रार्थनाभवन, मातृकुटिर, मातृमंदिर, बोधिवृक्षा-सारखा लिंबाचा वृक्ष इत्यादी स्थाने येथे दर्शनीय आहेत. श्रीरंगअवधूतांच्या भक्तपरि-वाराने साठावी रंगजयंती साजरी करून त्या स्थानास आगळेच महत्त्व प्राप्त करून दिले आहे. गुजरायेत महाराजांनी श्रीदत्तभक्तीचा चांगलाच

# श्रीगुरुचरित्राची अवतरणिका

## श्रीगुरुचरित्र–अध्याय बावन्नावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुदेवदत्तात्रेयचरणारविंदाभ्यां नमः ॥ गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः । गुरुरेव परं ब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ॐ ॥ श्रोते व्हावें सावधान । श्रीगुरुचरित्राध्याय एकावन्न । ऐकोनि नामधारकाचें मन । ब्रह्मानंदीं निमग्न पैं ॥ १ ॥ सेवूनि गुरुचरित्रामृत । नामधारक तटस्थ होत । अंगीं घर्म-पुलकांकित । रोमांचही ऊठती ॥ २ ॥ कंठ झाला सद्‌गदित । गात्रें झालीं सकंपित । विवर्ण भासे लोकांत । नेत्रीं वहाती प्रेमधारा ॥ ३ ॥ समाधिसुखें न बोले । देह अणुमात्र न हाले । सात्त्विक अष्टभाव उदेले । नामधारक-शिष्याचे ॥ ४ ॥ देखोनि सिद्ध सुखावती । समाधि लागली यासी म्हणती । सावध करावा मागुती । लोकोपकाराकारणें ॥ ५ ॥ म्हणोनि हस्तें कुरवाळिती । प्रेमभावें आलिंगिती । देहावरी ये ये म्हणती । ऐक बाळा शिष्योत्तमा ॥ ६ ॥ तूं तरलासि भवसागरीं । रहासी ऐसा समाधिस्थ जरी । ज्ञान राहील तुझ्या उदरीं । लोक तरती कैसे मग ॥ ७ ॥ याकारणें अंतःकरणीं । दृढता असावी श्रीगुरुचरणीं । बाह्य देहाची रहाटणी । शास्त्राधारें करावी ॥ ८ ॥ तुवां विचारिलें म्हणोनि । आम्हां आठवली अमृताची वाणी । तापत्रयातें करी हानि । ऐशी अनुपम्या प्रगटली ॥ ९ ॥ तुजमुळें आम्हां आठवलें । तुवां आम्हां चरवें केलें । त्वांही एकाग्रत्वें ऐकिलें । आतां हेंच विस्तारीं ॥ १० ॥ नामधारका ऐशियापरी । सिद्ध सांगती परोपरी । मग तो नेत्रोन्मीलन करी । कर जोडोनि उभा ठाके ॥ ११ ॥ म्हणे कृपेचें तारूं । तूंचि या विश्वास आधारु । भवसागर पैलपारु । तूंचि करिसी श्रीगुरुराया ॥ १२ ॥ ऐसें नामधारक विनवीत । सिद्धाचे चरणीं लागत । म्हणे श्रीगुरुचरित्रामृत । अवतारणिका मज सांगा ॥ १३ ॥ या श्रीगुरुचरित्रामृतीं । अमृताहूनी परमामृतीं । भक्तजनांची मनोवृत्ति । बुडी देवोनि स्थिरावली ॥ १४ ॥ मी अतृप्त आहें अजूनि । हेचि कथा पुनः सुचवोनि । अक्षयामृत पाजूनि । आनंदसागरीं मज ठेवा ॥ १५ ॥ बहु औषधींचें सार काढोन । 'त्रैलोक्यचिंतामणी'–रसायण । संग्रह करिती विचक्षण । तैसें सार मज सांगा ॥ १६ ॥ ऐकोनि शिष्याची प्रार्थना । आनंद सिद्धाचिया मना । म्हणती बाळका तुझी वासना । अखंड राहो श्रीगुरुचरित्रीं ॥ १७ ॥ श्रीगुरुचरित्राची ऐका । सांगेन आतां अवतरणिका ।

प्रथमापासूनि सारांश निका । एकावन्नाध्यायपर्यंत ॥ १८ ॥ प्रथमाध्यायीं मंगलाचरण । मुख्य देवतांचे असे स्मरण । श्रीगुरुमूर्तीचें दर्शन । भक्ताप्रती जाहलें ॥ १९ ॥ द्वितीयाध्यायीं ब्रह्मोत्पत्ती । चारी युगांचे भाव कथिती । श्रीगुरुसेवा दीपकाप्रती । घडली ऐसें कथियेलें ॥ २० ॥ नामधारका अमरजासंगमा । श्रीगुरु नेती आपुले धामा । अंबरीष दुर्वास यांचा महिमा । तृतियाध्यायीं कथियेला ॥ २१ ॥ चतुर्थाध्यायीं अनसूयेप्रति । छळावया त्रैमूर्ति येती । परी तियेचे पुत्र होती । स्तनपान करिती आनंदें ॥ २२ ॥ पंचमीं श्रीदत्तात्रेय धरी । स्वयें अवतार पीठापुरीं । 'श्रीपाद–श्रीवल्लभ' नामधारी । तीर्थयात्रेसी निघाले ॥ २३ ॥ सह्याद्रींत लिंग घेऊनि । रावण जातां गोकर्णी । विघ्नेश्वरें विघ्न करूनि । स्थापना केली तयाची ॥ २४ ॥ गोकर्णमहिमा असंख्यात । रायाप्रती गौतम सांगत । चांडाळी उद्धरिली अकस्मात । सातव्या अध्यायीं वर्णिती ॥ २५ ॥ माता पुत्र जीव देत होतीं । तयांप्रती गुरु कथा सांगती । शनिप्रदोष व्रत देती । ज्ञानी करिती अष्टमीं ॥ २६ ॥ नवमाध्यायीं रजकाप्रती । कृपाळू गुरु राज्य देती । दर्शन देऊं म्हणती पुढती । गुप्त झाले मग तेथें ॥ २७ ॥ तस्करीं मारिला भक्त ब्राह्मण । तस्करां वधिती श्रीगुरु येऊन । ब्राह्मणाला प्राणदान । देती दशमाध्यायांत ॥ २८ ॥ 'माधव' ब्राह्मण करंजपुरीं । 'अंबा' नामें त्याची नारी । 'नरसिंह–सरस्वती' तिचे उदरीं । एकादशीं अवतरले ॥ २९ ॥ द्वादशाध्यायीं मातेप्रति । ज्ञान कथूनि पुत्र देती । काशीक्षेत्रीं संन्यास घेती । यात्रा करिती उत्तरेची ॥ ३० ॥ माता-पित्यातें करंजपुरीं । भेटोनि येती गोदातीरीं । कुक्षिव्यथेच्या विप्रावरी । कृपा करिती त्रयोदशीं ॥ ३१ ॥ क्रूर यवनाचें करूनि शासन । सायंदेवास वरदान । देती श्रीगुरु कृपा करून । चौदाविया अध्यायीं ॥ ३२ ॥ पंचदशीं श्रीगुरुमूर्ति । तीर्थे सांगती शिष्यांप्रती । यात्रे दवडूनि गुप्त होती । वैजनाथीं श्रीगुरु ॥ ३३ ॥ षोडशीं ब्राह्मणा गुरुभक्ति । कथूनि दिधली ज्ञानशक्ति । श्रीगुरु आले भिल्लवडीप्रती । भुवनेश्वरी-संनिध ॥ ३४ ॥ भुवनेश्वरीला मूर्ख ब्राह्मण । जिव्हा छेदोनि करी अर्पण । त्यास श्रीगुरूंनीं विद्या देऊन । धन्य केला सप्तदशीं ॥ ३५ ॥ घेवडा उपटूनि दरिद्रियाचा । कुंभ दिधला हेमाचा । वर्णिला प्रताप श्रीगुरूचा । अष्टादशाध्यायांत ॥ ३६ ॥ औदुंबराचें करूनि वर्णन । योगिनींस देऊनि वरदान । गाणगापुरास आपण । एकुणविशीं श्रीगुरु गेले ॥ ३७ ॥ स्त्रियेचा समंध दवडून । पुत्र दिधले तिजला दोन । एक मरतां कथिती ज्ञान । सिद्धरूपें विसाव्यांत ॥ ३८ ॥ तेचि कथा एकविशीं । प्रेत आणिलें औदुंबरापाशीं । श्रीगुरु येऊनि तेथें निशीं । पुत्र

उठविती कृपाळू ॥ ३९ ॥ भिक्षा दरिद्र्याचा घरीं घेती । त्याची वंध्या महिषी होती । तीस करून दुग्धवती । वेविसाव्यांत वर दिधला ॥ ४० ॥ तेविसाव्यांत श्रीगुरूस । राजा नेई गाणगापुरास । तेथें उद्धरती राक्षस । त्रिविक्रम करी गुरुनिंदा ॥ ४१ ॥ भेटों जाती त्रिविक्रमा । दाविती विश्वरूपमहिमा । विप्र लागे गुरुपादपद्मा । चोविसाव्यांत वर देती ॥ ४२ ॥ म्लेंच्छापुढें वेद म्हणती । विप्र ते त्रिविक्रमा छळती । त्याला घेऊनि सांगातीं । गुरूपाशीं आला पंचविशीं ॥ ४३ ॥ सव्विसाव्यांत तया ब्राह्मणा । श्रीगुरु सांगती वेदरचना । त्यागा म्हणती वादकल्पना । परी ते उन्मत्त नायकती ॥ ४४ ॥ सत्ताविशीं आणूनि पतिता । विप्रासीं वेदवाद करितां । कुंठित करोनि शापग्रस्ता । ब्रह्मराक्षस त्यां केलें ॥ ४५ ॥ अष्टाविशीं तया पतिता । धर्माधर्म सांगोनि कथा । पुनरपि देऊनि पतितावस्था । गृहाप्रती दवडिला ॥ ४६ ॥ एकोनत्रिंशीं भस्मप्रभाव । त्रिविक्रमा कथिती गुरुराव । राक्षसा उद्धरी वामदेव । हा इतिहास तयांतचि ॥ ४७ ॥ त्रिंशाध्यायीं पति मरतां । तयाची स्त्री करी बहु आकांता । तीस श्रीगुरु नाना कथा । कथूनि शांतवूं पहाती ॥ ४८ ॥ एकतिसाव्यांत तेचि कथा । पतिव्रतेचे धर्म सांगतां । सहगमनप्रकार बोधिला । ते स्त्रियेतें जगद्गुरु ॥ ४९ ॥ सहगमनीं निघतां सती । श्रीगुरूस झाली नमस्कारिती । आशीर्वाद देवोनि तिचा पति । बत्तिसाव्यांत उठविला ॥ ५० ॥ तेत्तिसाव्यांत रुद्राक्षधारण । कथा कुक्कुट-मर्कट दोघेजण । वैश्य-वेश्येचें कथन । करिती रायातें पराशर ॥ ५१ ॥ रुद्राध्यायमहिमा वर्णन । चौतिसाव्यांत निरूपण । राजपुत्र केला संजीवन । नारद भेटले रायातें ॥ ५२ ॥ पंचत्रिंशत्प्रसंगांत । कचदेवयानी कथा यतंत । आणिक सोमवारव्रत । सीमंतिनीच्या प्रसंगें ॥ ५३ ॥ छत्तिसीं ब्रह्मनिष्ठ ब्राह्मणा । स्त्रियेनें नेलें परान्नभोजना । कंटाळूनि धरिती श्रीगुरुचरणा । त्याला कर्ममार्ग सांगती ॥ ५४ ॥ सप्तत्रिंशीं नाना धर्म । विप्रा सांगोनि ब्रह्मकर्म । प्रसन्न होऊनि वर उत्तम । देती श्रीगुरु तयातें ॥ ५५ ॥ अष्टत्रिंशीं भास्कर ब्राह्मण । तिघांपुरतें शिजवी अन्न । जेविले बहु ब्राह्मण । आणिक गांवचे शूद्रादि ॥ ५६ ॥ सोमनाथाची गंगा युवती । साठ वर्षांची वंध्या होती । तीस दिधली पुत्रसंतति । एकुणचाळिसावे अध्यायीं ॥ ५७ ॥ नरहरीकरवीं शुष्ककाष्ठा । अर्चवूनि दवडिलें त्याच्या कुष्ठा । शबरकथा शिष्य-वरिष्ठां । चाळिसाव्यांत सांगती ॥ ५८ ॥ एकेचाळिशीं सायंदेवा- । हस्तें घेती श्रीगुरु सेवा । ईश्वर-पार्वतीसंवाद बरवा । काशीयात्रा निरूपण ॥ ५९ ॥ पुत्रकलत्रेसीं सायंदेव । येऊनि करिती श्रीगुरुस्तव । त्याला कथिती यात्राभाव । वरही देती एकेचाळिशीं

॥ ६० ॥ बेचाळिसीं अनंतव्रत । धर्मराया कृष्ण सांगत । तेचि कथा सायंदेवाप्रत सांगोनि व्रत करविती ॥ ६१ ॥ त्रेचाळिसीं तंतुकार भक्तासी । श्रीपर्वत दावूनि क्षणेंसीं । शिवरात्रि-पुण्यकथा त्यासी । विमर्षण राजाची कथियेली ॥ ६२ ॥ चव्वेचाळिसीं कुष्ठी ब्राह्मण । आला तुळजापुराहून । त्याला करवूनि संगमीं स्नान । कुष्ठ नासूनि ज्ञान देती ॥ ६३ ॥ कल्लेश्वर हिप्परगे ग्रामास । श्रीगुरु भेटती नरहरी कवीस । आपुला शिष्य करिती त्यास । पंचेचाळिसावे अध्यायीं ॥ ६४ ॥ शेचाळिसीं दिवाळी सण । गुरूसी आमंत्रिती सात जण। तितुकीं रूपें धरूनि आपण गेले । मठींही राहिले ॥ ६५ ॥ सत्तेचाळिसीं शूद्रशेतीं । त्याचा जोंधळा कापूनि टाकिती । शतगुणें पिकवूनि पुढती । आनंदविलें तयातें ॥६६॥ अठ्ठेचाळिसीं श्रीगुरुमूर्ति । अमरजासंगममाहात्म्य कथिती । स्नान करवूनि दवडिती । कुष्ठ देवार्जितीं रत्नाबाईचें ॥ ६७ ॥ ईश्वरपार्वती-संवाद शुद्ध । मंत्रराज गुरुगीता प्रसिद्ध । नामधारका सांगे सिद्ध । एकूणपन्नासावे अध्यायीं ॥ ६८ ॥ म्लेंच्छाचा स्फोटक दवडिती । भक्तीस्तव त्याचे नगरा जाती । पुढें श्रीपर्वतीं भेटों म्हणती । पन्नासावे अध्यायीं ॥ ६९ ॥ एकावन्नांत गुरुमूर्ति । देखोनियां क्षितीं पापप्रवृत्ति । उपद्रवितील नानायती। म्हणोनि गुप्तरूपें रहावें ॥ ७० ॥ ऐसा करूनि निर्धार । शिष्यांसी सांगती गुरुवर । आजि आम्ही जाऊं पर्वतावर । मल्लिकार्जुनयात्रेसी ॥ ७१ ॥ ऐसें ऐकूनि भक्तजन । मनीं होती अति उद्विग्न । शोक करिती आक्रंदोन । श्रीगुरुचरणीं लोळती ॥ ७२ ॥ इतुकें पाहूनि गुरुमूर्ति । वरदहस्तें तया कुरवाळिती । मद्भूजनीं धरा आसक्ति । मठ-धामीं राहोनियां ॥ ७३ ॥ ऐसें बोधूनि शिष्यांसी । गुरु गेले कर्दळीवनासी । नाविकमुखें सांगूनि गोष्टीसी । निजानंदीं निमग्न होती ॥ ७४ ॥ ऐसें अपार श्रीगुरुचरित्र । अनंत कथा परम पवित्र । त्यांतील एकावन्न अध्याय मात्र । प्रस्तुत कथिले तुजलागीं ॥ ७५ ॥ सिद्ध म्हणे नामधारका । तुज कथिली अव-तरणिका । श्रीगुरु गेले वाटती लोकां। परी गुरु गुप्त असती गाणगापुरीं ॥७६॥ कलियुगीं अधर्म वृद्धि पावले । म्हणोनि श्रीगुरु गुप्त झाले । भक्तजनांला जैसे पहिलें । तैसेंच भेटती अद्यापि ॥ ७७ ॥ हे अवतरणिका सिद्ध माला । श्रीगुरु भेटती जपे त्याला । जैसा भावार्थ असे आपुला । तैसीं कार्यें संपादिती ॥७८॥ नामधारका तूं शिष्य भला । अवतरणिकेचा प्रश्न केला । म्हणोनि इतिहास-सारांशाला । पुनः वदलो सत्‌शिष्या ॥ ७९ ॥ पूर्वीं ऐकिले असेल कानीं । त्यातें तात्काळ येईल ध्यानीं । इतरां इच्छा होईल मनीं । श्रीगुरुचरित्रश्रवणाची ॥८०॥ ऐसी अवतरणिका जाण । तुज कथिली कथांची खूण । इचें सतत करितां

स्मरण । कथा अनुक्रमें स्मरतसे ॥ ८१ ॥ ऐसें वदे सिद्धमुनि । नामधारक लागे चरणीं । विनवीतसे कर जोडोनि । तुझे वचनें सर्वसिद्धि ॥ ८२ ॥ आतां असे विनवणी । श्रीगुरु-सप्ताहपारायणीं । किती वाचावे प्रतिदिनीं । हें मज सांगा श्रीगुरुराया ॥ ८३ ॥ सिद्ध म्हणती नामधारका । तुवां प्रश्न केला निका । परोपकार होईल लोकां । तुझ्या प्रश्नेंकरोनियां ॥ ८४ ॥ अंतःकरण असतां पवित्र । सदाकाळ वाचावें गुरुचरित्र । सौख्य होय इहपरत्र । दुसरा प्रकार सांगेन ॥ ८५ ॥ सप्ताह वाचावयाची पद्धती । तुज सांगों यथास्थिति । शुचिर्भूत होवोनि शास्त्ररीतीं । सप्ताह करितां बहु पुण्य ॥ ८६ ॥ दिनशुद्धि बरवी पाहून । आवश्यक स्नानसंध्या करून । पुस्तक वाचावयाचें स्थान । रंगवल्ल्यादि शोभा करावी ॥ ८७ ॥ देशकालादि संकल्प करून । पुस्तकरूपी श्रीगुरुचें पूजन । यथोपचारेंकरून । ब्राह्मणासही पूजावें । ८८ ॥ प्रथम दिवसापासोन । वसावया असावें एक स्थान । अतत्वार्थ भाषणीं धरावें मौन । कामादि नियम राखावे ॥ ८९ ॥ दीप असावे शोभायमान । देव-ब्राह्मण-वडिलां वंदून । पूर्वोत्तर मुख करून । वाचनीं आरंभ करावा ॥ ९० ॥ सप्त संख्या अध्याय प्रथम दिनीं । अष्टादश द्वितीय दिनीं । अष्टाविंशति तृतीय दिनीं । चतुर्थ दिवशीं चौतीस पैं ॥ ९१ ॥ सवतीसपर्यंत पांचवे दिनीं । त्रेचाळीसवरी सहावे दिनीं । सप्तमीं एकावन्न वाचोनि । अवतरणिका वाचावी ॥ ९२ ॥ नित्य पाठ होतां पूर्ण । करावें उत्तरांग पूजन । श्रीगुरूतें नमस्कारून । उपाहार कांहीं करावा ॥९३॥ याप्रकारें करावें सप्त दिन । रात्रीं करावें भूमिशयन । सारांश शास्त्राधारेंकरून । शुचिर्भूत असावें ॥ ९४ ॥ एवं होतां सप्त दिन । ब्राह्मणसुवासिनी–भोजन । यथाशक्त्या दक्षिणा देऊन । सर्व संतुष्ट करावे ॥ ९५ ॥ ऐसें सप्ताहअनुष्ठान । करितां होय श्रीगुरुदर्शन । भूतप्रेतादि–बाधा निरसन । होवोनि सौख्य होतसे ॥ ९६ ॥ ऐसें सिद्धाचें वचन ऐकोनि । नामधारक लागे चरणीं । म्हणे बाळाची आळी पुरवोनि । कृतकृत्य केलें गुरुराया ॥ ९७ ॥ श्रोते म्हणती वंदूनि पायीं । श्रीगुरु केली बहु नवलाई । बाळका अमृत पाजी आई । तैसें आम्हां पाजिलें ॥ ९८ ॥ प्रति अध्याय एक ओंवी ॥ ओंविली रत्नमाळा बरवी । मनाचे कंठीं घालितां, पदवी । सर्वार्थाची पाववीत ॥ ९९ ॥ सिद्धाचें वचन रत्नखाणी । त्यांतूनि नामधारक रत्नें आणी । एकावन्न भरोनि रांजणीं । भक्त-याचकां तोपविलें ॥ १०० ॥ किंवा सिद्ध हा कल्पतरु । नामधारकें पसरिला करु । याऽचा करोनि परोपकारु । भक्तांकरितां बहु केला ॥ १०१ ॥ किंवा सिद्ध-मुनि बलाहक । नामधारक शिष्य चातक । मुख पसरोनि बिंदु एक । मागतां

अपार वर्षला ॥ २ ॥ तेणें भक्तां अभक्तां फुकाचा । सकळां लाभ झाला अमृताचा । हृदयकोश खळजनांचा । पाषाणसमही पाझरे ॥ ३ ॥ श्रीगुरुरायाचे. धरूं चरण । सिद्धमुनीतें करूं वंदन । नामधारका करूं नमन । ऐसें करीं नारायणा ॥ ४ ॥ श्रीगुरुरूपी नारायणा । विश्वंभरा दीनोद्धारणा । आपण आपली दावूनि खुणा । गुरुशिष्यरूपें क्रीडसी ॥ १०५ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्ध-नामधारकसंवादे एकपंचाशदध्यायसारे अवतरणिका नाम द्विपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५२ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेवदत्त ॥ (ओवीसंख्या १०५)

---

# अनसूयेचे पातिव्रत्य

## श्रीदत्तमाहात्म्य–अध्याय पहिला

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीसीतारामचंद्राय नमः ॥ श्रीगुरुदत्तात्रेयः प्रसन्नोस्तु ॥ श्रीदत्त ॥ ज्ञानकर्मेन्द्रियप्राणगण । ह्यांचे करी जो संरक्षण ॥ त्या गणपतीचे वंदूं चरण । मंगलाचरण हे आमुचें ॥ १ ॥ ज्याला म्हणती अंबेचा सुत ॥ कलियुगीं जो गंधर्वस्थित । जो वरदाभयदहस्त । स्मरणें समस्त विघ्नहर्ता ॥ २ ॥ कर्ता धर्ता संहर्ता । विश्वाचा जो तारी आर्ता । जो स्मरणें दुःखवार्ता । नुरवी भर्ता तो आमुचा ॥ ३ ॥ तो आमचा गुरुवर । त्याला जोडूनी दोनी कर । त्याचे चरणीं ठेविलें शिर । ज्याला सुरवर वंदिती ॥ ४ ॥ तो हा परमात्मा श्रुतिगेय । नरसिंहसरस्वती दत्तात्रेय । परब्रह्म सच्चिदानंदमय । निरामय अद्वितीय तो ॥ ५ ॥ तोचि रचि हा ग्रंथ । निमित्तमात्र वासुदेव येथ । श्रवण पठण करवील स्वार्थ । हा यथार्थ भाविकांचा ॥ ६ ॥ जगदुद्धारार्थ परमेश्वर । अत्रीच्या घरीं धरी अवतार । त्याच्या चरिताचा विस्तार । वर्णिला सुंदर पुराणीं ॥ ७ ॥ तत्सारभूत दत्तपुराण । आठसहस्र निरूपण । तें अपरिचित गीर्वाणभाषण । प्राकृत जन नेणती ॥ ८ ॥ म्हणोनि हा ग्रंथारंभ । ह्या योगें उमजेल स्वयंप्रभ । भक्तवत्सल पद्मनाभ । चित्तक्षोभहर्ता जो ॥ ९ ॥ श्रीदत्तपुराणाचे तीन भाग । ज्ञानोपासनाकर्मयोग । त्यांतील उपासनाकांडभाग । ईश्वरानुराग दावी जो ॥ १० ॥ जेथें कार्तवीर्याचें आख्यान । अलर्काचें विज्ञान । आयुयदूंचें उद्धरण ।

हेचि वर्णन मुख्यत्वें ॥ ११ ॥ जरी पाहिजे मुक्ति । तरी आदरावी नवविधा-भक्ति । जिणें येथें मिळे भुक्ति । अंतीं मुक्ति अनायासें ॥ १२ ॥ स्मरण आणि वंदन । सख्य सेवन आणि अर्चन । दास्य श्रवण कीर्तन । सर्वनिवेदन नवविधाभक्ती ॥१३॥ कार्तवीर्ये केली स्मरणभक्ती । अलर्कानें वंदनभक्ती । आयुराजानें दास्य-भक्ती । सख्यभक्ती परशुरामें ॥ १४ ॥ विष्णुदत्तें केलें सेवन । यदूनें केलें अर्चन । वेदधर्मे केलें कीर्तन । दीपकें श्रवण श्रीदत्ताचें ॥ १५ ॥ सर्वस्वात्मनिवेदन । कित्येक भक्तांनीं करून । श्रीदत्तीं तल्लीन होऊन । निर्वाणस्थान घेतलें ॥ १६ ॥ भक्ती ज्ञानाची माउली । करी कृपेची साउली । जिणें नामरूपा आणिली । ब्रह्ममूर्ती भली अनायासें ॥ १७ ॥ निर्विशेष परब्रह्म । साक्षात्कार करतां श्रम । घडे मंदां त्याचा भ्रम । वारी हे क्रम दावूनी ॥ १८ ॥ सगुणब्रह्मध्यानें मन । शीघ्र होई सावधान । मग निरस्तोपाधिकल्पन । स्वात्मज्ञान स्फुरतसे ॥ १९ ॥ ती नव-विधाभक्ति येथ । वर्णिजेल यथार्थ । जी करील कृतार्थ । दावोनि पंथ भाविकां ॥ २० ॥ स्मरणभक्ति अतिश्रेष्ठ । ती नवांमाजीं वरिष्ठ । आठालाही व्यापी गरिष्ठ । भगवत्प्रेष्ठ ती जाणा ॥ २१ ॥ ज्याचीं अंगें सहस्र । ज्याचीं स्वरूपें सहस्र । ज्याचीं नामें सहस्र । कर्में सहस्र जयाचीं ॥ २२ ॥ ह्या सर्वांचें स्मरण । भावें करितां प्रतिक्षण । उतरे सर्व कर्मांचा शिण । लाभे निर्वाण सहजचि ॥ २३ ॥ जातां येतां काम करितां । खातां पितां घेतां देतां । हृदयीं भगवत्स्मरण करितां । अकर्मता कर्मांची ॥ २४ ॥ स्मरणाविणें न घडे कांहीं । म्हणोन श्रेष्ठ स्मरणभक्ति ही । आतां कीर्तनभक्ती ऐका ही । तारी हेही भाविकां ॥ २५ ॥ यस्य स्मृत्या च नामोक्त्या । हे तो स्मृती न हो मिथ्या । तपोयज्ञकर्म जें न्यून स्या । पूर्णत्वा नेई कीर्तन ॥ २६ ॥ अजन्म्याचें दिव्य जन्मकीर्तन । अक्रियाचें दिव्य क्रियागान । जन्मबीजाचें करी दहन । नुरवी गहन कर्मवार्ता ॥ २७ ॥ करितां कीर्तन भगवंताचें । उठावे सात्त्विक भाव साचे । तरीच साफल्य जन्माचें । अन्यथा दंभाचें ठाणें तें ॥२८॥ नोहे हृदय सद्गदित । नोहे वाचा गद्गदित । न हो तनुरोमांचित । प्रेमाश्रुपात नोहे जरी ॥ २९ ॥ अंतर्भान नोहे जरी । देहभान न उडे तरी । दंभ मिथ्या प्रलापापरी । जाणिजे चतुरीं कीर्तनप्रौढी ॥ ३० ॥ कीर्तनभक्ती ऐसी हे । श्रवणभक्ती तसीच आहे । त्रिकरण ज्याचें दृढ राहे । जो न पाहे बाहेर ॥ ३१ ॥ सोडोनी असूया स्पर्धा । ठेवोनियां दृढ श्रद्धा । अंतर्निष्ठ जो राहे सुधा । श्रवणी बद्धासन विनिद्र ॥३२॥ स्वयें जरी जाणें भगवद्गुण । तरी ऐकवितां तेचि गुण । श्रद्धाभक्तीनें करी श्रवण । तेंचि श्रवण भक्तियुक्त ॥ ३३ ॥ प्रेम दावूनी जाती कीर्तना । तेथें

वार्ता करिती नाना । कीं बैसोनि सेविती शयना । सोडिती अवधाना श्रवणाच्या ॥ ३४ ॥ व्यर्थ त्याचा तो परिश्रम । अशा श्रवणें न उडे भ्रम । न लागे मोक्षाचा क्रम । स्वरूपीं विश्राम त्या कैंचा ॥ ३५ ॥ म्हणोनियां सावधान । करावें भावें श्रवण । हें तृतीय भक्तीचें लक्षण । आतां सेवन अवधारा ॥ ३६ ॥ मुळीं स्वरूपची एक । तेथें कैंचा सेव्य सेवक । उत्तमाधम भाव विवेक । परी ठेविती लोक द्वैत भावीं ॥ ३७ ॥ अनादिकाल प्रवृत्ती । तीस अनुसरोनी वदे श्रुती । ज्यायोगें मिळे पद्धती । लोक तरिती अनायासें ॥ ३८ ॥ वज्रांकुशध्वजांकित । भगवत्पद पद्मचिन्हित । त्याला सेवी जो संत । तो होय मुक्त निश्चयें ॥ ३९ ॥ आतां परिसावें अर्चन । साकार मूर्ती कल्पून । सर्व भावें कीजे पूजन । सर्वोपचारें करोनी ॥ ४० ॥ यथेष्ट प्रतिमा करून । स्वदेहाप्रमाणें मानून । मिळती ते उपचार समर्पून । करावें अर्चन भावार्थें ॥ ४१ ॥ त्रिकाल करावें अर्चन । किंवा षोडशोपचारीं प्रातःपूजन । मध्यान्हीं पंचोपचार घेऊन । रात्रौ नीरांजन समर्पावें ॥ ४२ ॥ जी जी वस्तु आपणां आवडे । ती ती ठेवावी देवापुढें । ऐसी भगवत्प्रीति जोडे । कडे पडे भवाब्धीच्या ॥ ४३ ॥ मूर्तिपूजा डोळां देखावी । तैसीच चित्तीं रेखावी । तेथेंच वृत्ती राखावी । ब्रह्मपदवी मिळेल ॥ ४४ ॥ एकाग्रतेनें पूजोत्तर । बसोनी देवासमोर । समरस करूनी अंतर । गुरुदत्तमंत्र जपावा ॥ ४५ ॥ याचें नावें अर्चन । आतां सांगतों वंदन । जेणें समान वृत्ती होऊन । अढळ स्थान मिळेल ॥ ४६ ॥ ब्राह्मणापासोनी चांडाळापर्यंत । गाई अश्व श्व खर सहित । स्थावर जंगमात्मक समस्त । यांसी सतत वंदावें ॥ ४७ ॥ वाच्यार्थ तो देह सगुण । अंतर्यामी लक्ष्यार्थ निर्गुण । तो एक भगवान परिपूर्ण । चालक भासक सर्वांचा ॥ ४८ ॥ सच्चिदात्मा स्वयें एक । अस्ति भाति प्रियत्वें देख । भाव ठेवोनि तेथें एक । वंदितां लोक अढळ मिळे ॥ ४९ ॥ सर्वथा न निंदी कोणा कोण । त्याचा मनीं नाणी शीण । सर्वभूतीं देवपण । मानूनि वंदन सर्वा कीजे ॥ ५० ॥ येथें रुद्राध्याय प्रमाण । याचें नांव वंदन । आतां बोलिजेल दास्यलक्षण । वागावें आपण दासापरी ॥ ५१ ॥ धन्यापाशीं सेवक जैसा । तदधीन होऊनि वागे तैसा । मानापमान आणि आळसा । सोडोनि दिनदिशा सेवावें ॥ ५२ ॥ दास न ठेवी पोटाची चिंता । तैसी योगक्षेमाची चिंता । न ठेवावी सर्वथा । ते घे माथां परमेश्वर ॥ ५३ ॥ असें असे हें दास्य जाण । आतां सख्यभक्तीची खूण । करिजेल निरूपण । श्रुतिप्रमाण विख्यात ॥ ५४ ॥ अनेक देह सुटले जरी । कल्पाचे कल्प लोटले तरी । जो जिवलगा अंतरीं । आम्हां क्षणभरी न विसंबे ॥ ५५ ॥ सर्वस्य

चाहं हृदि सन्निविष्ट । असी स्मृती बोले स्पष्ट । तो सर्वां वरिष्ठ । तोचि प्रेष्ठ जिवलगा ॥ ५६ ॥ त्याचें करावें सख्य । निरपेक्ष करणें हें मुख्य । येणें लाभें ब्रह्माख्य । पद जें सांख्ययोगगम्य ॥ ५७ ॥ त्यावांचुनी न गमावें । त्यावांचुनी न विसंबावें । त्यावांचुनी न वागावें । त्याला गावें निरपेक्ष ॥ ५८ ॥ सापेक्ष सख्य जी मैत्री होय । ती संसारा वारील काय । जरी ईश्वरीं सख्य होय । खास न होय पुनरावृत्ती ॥ ५९ ॥ तनु मन धन । परिवार क्षेत्र सदन । करावें ईशा निवेदन । आत्मनिवेदन बोलिजे ॥ ६० ॥ मी केवळ शुद्ध बुद्ध । साक्षित्व हें म्हणणें विरुद्ध । अद्वितीय मी स्वतःसिद्ध । अपापविद्ध सदोदित ॥ ६१ ॥ मला नाहीं कर्तृत्व । मग कैचें भोक्तृत्व । वास्तव नाहीं बद्धत्व । नित्य मुक्तत्व खास असे ॥ ६२ ॥ असें अभ्यासें ठरतां । सहज हो निःसंगता । हेचि सर्वस्वात्म-निवेदनता । भक्ति संतां मानली ॥ ६३ ॥ अत्रिऋषी महामुनी । नवविधा भक्ति करूनी । देवां अत्यंत प्रिय होवोनी । देवपिता होवोनी राहिला ॥६४॥ परात्मा ईक्षणें करून । भूतभौतिक सृष्टी रचून । ब्रह्मदेवा उपजवून । वेद देवून सृष्टी रचवी ॥ ६५ ॥ ब्रह्मदेवें मानससुत । मुख्य उपजविले सात । त्यांतील दुसरा विख्यात । ब्रह्मसंमत अत्रिऋषी ॥ ६६ ॥ सोडी तीनी देहांचा अभिमान । तीनी अवस्था सोडून । तीनी गुणां उलंडून । सार्थक अभिधान मिरवे अत्री ॥ ६७ ॥ निष्कल्मष ब्रह्मयाचें तप । नेत्रद्वारां आपोआप । प्रगटलें होवूनि सुरूप । ऋषि-स्वरूप तो हा अत्री ॥६८॥ पहिलें लागलें सूर्यग्रहण । कोणी नेणती तें कारण। अत्री सर्वज्ञ तें जाणून । करी ग्रहण प्रगट तें ॥ ६९ ॥ ऋग्वेदाचें पाचवें मंडळ। जो प्रगट करी सकळ । ज्यामध्यें अग्न्यादि देवकुळ। शीघ्र फलप्रद असे ॥७०॥ कृतयुगीं रोगग्रस्त । जाहले सर्व जीव त्रस्त । वैद्य होऊनि रोगांचे अस्त । करी समस्त सुखी अत्री ॥ ७१ ॥ मनूनें मंदबोधार्थ । स्मृति केली ती यथार्थ । नेणे लोक म्हणोनी सुखार्थ । करी समर्थ दुसरी स्मृती ॥ ७२ ॥ स्वयें जरी निरिच्छ मनीं । ब्रह्मवित् वरीयान् असूनी । पित्याची आज्ञा मानूनी । वरी मुनी अन-सूयेतें ॥ ७३ ॥ कर्दमाचें तप मूर्तिमंत । प्रगटलें देवहूतीचे उदरांत । ते हे अनसूया विख्यात । अत्री हात धरी जीचा ॥ ७४ ॥ अतिथी जिच्या स्वप्नींही। मागें परतोनि गेला नाहीं । जिणें स्वयें नग्न होवोनिही । दिधली भिक्षा त्रिमूर्तीला ॥ ७५ ॥ सावित्री लक्ष्मी पार्वती । ऐकून अनसूयासतीख्याती । मत्सरें ग्रासूनि पाठवीती । स्वपतीतें जोपाशीं ॥ ७६ ॥ सतीचें सत्व हरावया । तीनी देव अतिथी होवोनियां । आले बाल करूनि तयां । ठेवी अनसूया धर्मबळें ॥ ७७ ॥ गवंताठा तुटतां येती । तीनी देवी पती मागती । अनसूया बाळें ठेवी

पुढती । त्या नेणती पतीच्या खुणा ॥ ७८ ॥ मग हांसूनी अनसूया । त्यांचे पती देई तयां । सती लाभे अशा सामर्थ्यां । पातिव्रत्याश्रयें ती ॥ ७९ ॥ सूर्या शापी कौशिकसती । तेव्हां अंधकारें प्राणी मरती । तीशीं समजावोनी उदयाप्रती । सूर्या आणि अनसूया ॥ ८० ॥ मांडव्यशापें ब्राह्मण । सहसा पावला मरण । न लागतां एकक्षण । अनसूया तया उठवी ॥ ८१ ॥ सुदुष्कर करणी पाहून । देव देती वरदान । तीनी देव पुत्र होऊनी । स्वदधीन राहती असा ॥ ८२ ॥ जीला मृदुला झाली धरा । मंद मंद वाहे वारा । शीतलता ये दिवाकरा । अमरा थरथरा कांपरा ये ॥ ८३ ॥ चंद्रतुल्य तिचें सौंदर्य । म्हणतां वाटे मना भय । कलंकी तो तिचा तनय । कलाचा क्षय जयाच्या ॥ ८४ ॥ पूर्णिमेसी पूर्ण हो जरी । तरी सरतांची रात्री । निस्तेजस्क होय त्याची सरी । कोण करी अनसूयेसी ॥८५॥ तेजस्वी सूर्य म्हणों तरी । उदयास्त असे बरोबरी । अनसूयेच्या तेजापरी । नित्य तेज दावी कोण अंगीं ॥ ८६ ॥ कौशिकस्त्रियेनें देतां शाप । कळलें सूर्याचें तप । जाणोनि सतीचा कोप । घेतली झोप दशदिन ॥ ८७ ॥ त्याला उदया आणिला । असी दाविली सहज लीला । कोण तयें अनसूयेला । जगीं तुला करील ॥ ८८ ॥ दया क्षमा शांती प्रमुख । गुण जयाचे सुरेख । तो विष्णु जगन्नियामक । जगीं एक मान्य असे ॥ ८९ ॥ त्याला जिणें केला अनुज । पुनरपि केला आत्मज । त्याचे उपमेचें काय काज । वाटे लाज मजलागीं ॥ ९० ॥ तेव्हां केवला चित्कला । अनसूया वाटली मनाला । जगीं उपमा नाहीं तिला । अबला कोण म्हणेल ॥ ९१ ॥ अत्रिऋषी परम समर्थ । तपश्चर्या हा त्याचा अर्थ । ज्याला नाहीं किमपी स्वार्थ । परोपकारार्थ जो वागे ॥ ९२ ॥ त्याची ही अनसूया । जाहली असे जाया । पातिव्रत्यभूषणें काया । शोभवी दयाक्षमायुक्त ॥ ९३ ॥ धुंडतां हें त्रिभुवन । न मिळे दुजें साध्वीरत्न । न करितां तपःप्रयत्न । उत्तम साधन संपादिलें ॥ ९४ ॥ ईश्वरें साकार व्हावया । जेवीं पूर्वी रचली माया । पश्चात् सगुण होवोनियां । प्रगट झाला जगामाजीं ॥ ९५ ॥ तेवीं धरावया अवतार । प्राकट्यस्थान सुंदर । अनसूयेचें हें शरीर । पृथ्वीवर प्रगटवीं ॥ ९६ ॥ येथें अनसूयेशीं जरी । करावी मायेची बरोबरी । माया जड हे चेतना निर्धारी । केवीं सरी द्यावी सरा ॥ ९७ ॥ तेव्हां निरुपम अनसूया । पुत्री कर्दमाची द्वितीया । ती दिली ब्रह्मपुत्रा द्वितीया । अद्वितीय आत्मज ज्यांचा ॥९८॥ तो हा भगवान स्वयंदत्त । दत्तात्रेय नामें विख्यात । जे आधुनिक दत्तक सुत । ते विख्यात द्व्यामुष्यायण ॥९९॥ ज्याला नाहीं मातपिता । नसे कुळगोत्राची वार्ता । त्याणें आत्मदान करितां । द्व्यामुष्यायणता केवीं ये ॥१००॥ ऐसा तो

भगवान अप्रमेय । भक्तीस्तव झाला दाता वेय । प्रसिद्ध तो दत्तात्रेय । श्रुतिगेय सद्‌गुण ॥ १०१ ॥ ज्यांचे अनंत गुणगण । गणतां शीणती वेद पुराण । आमुचें चित्त अल्प प्रमाण । गुणसंपूर्ण गणेल कीं ॥ १०२ ॥ अथवा सत्कवित्व रचून । देवाचें तोषवाया कीं मन । बृहस्पतीचे कवित्व सद्‌गुण । विस्मय कारण तेंही नोहे ॥ १०३ ॥ तरी येथें किमपि कारण । नसे, जसें करी प्रेरण । तसें घडे हें लेखन । नाहीं अभिमान कर्तृत्वाचा ॥ १०४ ॥ गोदावासी वेदधर्मा । तो निस्तरावया निजकर्मा । काशीवास करोनि शर्मा । पावला दुष्कर्मा टाळोनियां ॥१०५॥ त्याची सेवा दीपक । शिष्य होवोनी करी चोख । एकवीस वर्षे साहे दुःख । नोहे पराङ्मुख सेवेसी ॥ १०६ ॥ त्यासी हरिहर प्रसन्न होती । बळेंची वरदान देती । तरी न भुले त्याची मती । सत्यधृती केवळ तो ॥ १०७ ॥ मग गुरु म्हणे वर घे आता । शिष्य म्हणे सांगा दत्तचरिता । तेणे तथास्तु म्हणोनी कथा । श्रीदत्ताची कथियेली ॥ १०८ ॥ इति श्रीदत्तमाहात्म्ये प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

# कौशिकपत्निकथा

## श्रीदत्तमाहात्म्य–अध्याय दुसरा

श्रीदत्त समर्थ ॥ करोनी साष्टांग नमन । दीपक करीतसे प्रश्न । म्हणे गुरुजी माझें मन । समाधान करावे ॥ १ ॥ कोणी म्हणती दत्तात्रेय । हा ऋषीचा पुत्र होय । कोणी म्हणती देव होय । कोणी ध्येय म्हणताती ॥ २ ॥ श्रीदत्त हा परब्रह्ममूर्ती । असें कोणीही बोलती । भ्रांत होते माझी मती । सांगा निगुती सत्य काय ॥ ३ ॥ काय कारणें अवतरला । कैशा केल्या एथें लीला । शिष्यसंग्रह कसा केला । हे सर्व मला ऐकवा ॥ ४ ॥ परिसोनी शिष्याचा प्रश्न । सद्‌गदित झाले गुरूचें मन । म्हणे शिष्या हो सावधान । लावोनि कान ऐक तूं ॥५॥ एक भार्गवकुलोत्पन्न । होता उत्तम ब्राह्मण । त्यासीं नवसें करून । वृद्धपणीं पुत्र झाला ॥ ६ ॥ योगभ्रष्ट तो सर्वज्ञ । परि जडसा वागे सुज्ञ । त्याचा पिता विप्र प्राज्ञ । शिकवी प्रयत्नें तयासी ॥ ७ ॥ करूनिया मौंजीबंधन । पिता करवी अध्ययन । हांसोनि पुत्र बोले वचन । किमर्थ यत्न हा तुझा ॥ ८ ॥ पिता म्हणे करी अध्ययन । गृहस्थाश्रम करोन । करी मोक्षार्थ कर्माचरण । तेणें निर्वाण

पाविजे ॥ ९ ॥ पुत्र म्हणे ताता ऐक । शिकलों मी वेदादिक । कर्मे केलीं सकळिक । भोग अनेक भोगिले ॥ १० ॥ झालों मंत्री झालों राजा । झालों भृत्य झालों प्रजा । असती उत्तमाधम योनी ज्या । त्या त्या अनुभविल्या ॥ ११ ॥ तें मी स्मरें स्पष्ट । पूर्वीचा मी योगभ्रष्ट । आतां कर्तव्य नसे अवशिष्ट । कां हे कष्ट करसी तूं ॥ १२ ॥ मी जातबोध केवळ । नको आतां कर्माचा खेळ । मनाचा झाडूनी मळ । वैराग्ये सबळ आहे मीं ॥ १३ ॥ पूर्वी होतों मी ब्राह्मण । सत्संगें विद्याभ्यास करून । वैराग्यें एकाग्रमन । करूनि ध्यान केलें म्यां ॥ १४ ॥ ज्ञानाला प्रतिबंध येऊन । अकस्मात पातलें मरण । पूर्वाभ्यासें विस्मरण । न झालें जाण मज ताता ॥ १५ ॥ जसा निजेंत विद्या विसरे । जागा होतां सर्व स्मरे । त्याप्रमाणें उपजतांचि सारें । अभ्यास स्मरे दृढवृत्त ॥ १६ ॥ तीनी भूमिवरोनि फिरे । तोही अभ्यास न विसरे । मीं पंचम भूमिका आवरें । सेविली तें सारें आठवे ॥ १७ ॥ आतां झाली वृत्तींची उपरती । मिळाली परम शांती । दृढतर झाली विरती । पुनरावृत्ति आतां कैंची ॥ १८ ॥ करावयाचें तें म्यां केलें । मिळवायाचें मिळविलें । आतां कांहीं नाहीं राहिलें । यथार्थ जाणविलें तुजलागीं ॥ १९ ॥ ऐकोन पुत्राचें वचन । पिता वैराग्य पावून । बोले मग होऊन दीन । तूं नंदन धन्य धन्य ॥ २० ॥ कुळ केलें पावन । पूर्वजांचें केलें उद्धरण । आतां परिसें माझें वचन । सांगें ज्ञान मजला हें ॥ २१ ॥ मी संसारा भिऊन । ऐहिक पारलौकिक सुख सोडून । केवळ इच्छितों विज्ञान । ज्ञानवैराग्यसहित जें ॥ २२ ॥ तूं म्हणसी हा तात । तरी मी हा अज्ञानावृत । केवळ होईन तुझा सुत । श्रुतिसंमत असे येथें ॥ २३ ॥ पुत्र म्हणे ऐक वचन । श्रीदत्तें उपदेशिला अर्जुन । तो योगाभ्यासें लाधला ज्ञान । तसा यत्न करी तूं ॥ २४ ॥ पिता म्हणे कोण श्रीदत्त । अर्जुन हा कोणाचा सुत । त्याला कसें झालें ज्ञान प्राप्त । हें समस्त सांगावें ॥ २५ ॥ पुत्र म्हणे दुःखसंयोग । त्याचा करी जो वियोग । परी त्याला म्हणती योग । श्रीदत्तें तो सांग कथियेला ॥ २६ ॥ हें सर्व करीन निरूपण । ऐके होवूनी सावधान । प्रतिष्ठानीं होता ब्राह्मण । कौशिकगोत्रोत्पन्न जो ॥ २७ ॥ दैवें व्यसनातें होवोनी । सदा राहे वेश्यासदनीं । भोग भोगितां प्रतिदिनीं । कुष्ठें व्यापून त्रस्त झाला ॥ २८ ॥ बीभत्सरूप देखोन । वेश्येनें दिधला काढून । तेव्हां विवाहित स्त्रीला आठवून । आला ब्राह्मण निजसदनीं ॥ २९ ॥ असी लोकीं हे राहटी । सुज्ञें ठेवावी पोटीं । पति येता उठाउठीं । पायीं मिठी घाली सती ॥ ३० ॥ म्हणे धन्य आजी सुदिन । सोन्याचा आला कीं पर्जन्य । झालें इष्ट देवाचें दर्शन । आनंदघन दाटला ॥ ३१ ॥ उत्तमासनीं

बसवून । देवापरी करी अर्चन । भावें करून शुश्रूषण । घाली स्नान आवडीनें ॥ ३२ ॥ करी पादोदक प्राशन । स्वशरीरीं करी प्रोक्षण । करूनियां परमान्न । करवी भोजन सादरें ॥ ३३ ॥ पूय रक्तें भरतां वसन । नित्य करी क्षालन । उत्तम वस्त्रें नेसवून । अंगवाहन करी नित्य ॥ ३४ ॥ बोलोनि मंजुळ भाषण । करी औषधादि लेपन । श्लेष्म मूत्र मळ क्षालन । करितां मन न विटे तिचें॥३५॥ एवं अत्यंत विनीत होवून । करी जरी नित्य सेवन । तरी तो कोपाविष्ट होवून । करी निर्भर्त्सन सतीचें ॥ ३६ ॥ जरी झाला पराधीन । तरी न सुटे वेश्येचें चिंतन । पत्नीला शिव्या देऊन । म्हणे सेवन न करसी ॥ ३७ ॥ वेश्येनें करवितां अंगसंवाहन । त्याणें मन न हो खिन्न । पत्नीनें करितां पादसंवाहन । वाटे शीण दुर्जना ॥ ३८ ॥ कसा असो पतीचा भाव । सतीनें ठेवावा अनन्य भाव । हें असो एकदां तो धव । डोळां देखे एक वेश्या ॥ ३९ ॥ वेश्या केवळ व्याध जाण । निर्गुण भ्रूधनुष्य ओढून । कटाक्षबाणें अचुक संधान । करून विप्रमनमृग वेधला ॥ ४० ॥ वेश्या हा कामाचा शर । तेणें वेधिलें द्विजशरीर । विद्ध होतांचि सत्वर । निर्लज्ज होवोनी बोलतसे ॥ ४१ ॥ प्रिये तूं धर्मज्ञा असती । म्हणोनी कठोर वाग्बाण सोससी । तरी आतां या समयासी । माझी मानसी व्यथा वारी ॥ ४२ ॥ जिवलग मित्र आणि गुणी भृत्य । प्रिय भार्येसि नित्य । साधूलाही सांगावें सत्य । दुःख आपुलें सुखार्थ ॥ ४३ ॥ हे वेश्या घटस्तनी । स्वरूप सौंदर्य दावूनी । माझें मन चुरूनी । हरूनी जातसे ॥ ४४ ॥ देह झाला अशक्त । परी मन नोहे विरक्त । तत्स्वरूपीं जाहलें अनुरक्त । ह्याला मुक्त करीं तूं ॥ ४५ ॥ वेश्येगृहीं नेईं मला । नातरी मृत्यु पातला । उपाय दुजा नाठवे मला । येवो तुला काकुळती ॥ ४६ ॥ कामाची विपरीत गती । ब्रह्मादिकांची खुंटे मती । मी तो बापुडा मंदमती । केवीं विरती पावेन ॥ ४७ ॥ ऐकोनी पतीचें वचन । हृष्ट झालें सतीचें मन । सत्वर कमर बांधोन । तथास्तु म्हणून उभी ठेली ॥ ४८ ॥ वेश्या वश व्हावी म्हणून । तिला द्यावया घेई काढून । अलंकार पदरीं बांधून । पतीस खांद्यावरी घेतलें ॥ ४९ ॥ पतीस व्यथा न व्हावी । म्हणून हळु हळु चाले पदवी । मनीं शीण न वागवी । तों अंधार पातला ॥ ५० ॥ विद्युत्तेजें धरी खूण । मंद मंद ठेवी चरण । तों पातलें विघ्न दारुण । दैववशें करूनी ॥ ५१ ॥ सुळीं देतां एक चोर । पळोनि गेला सत्वर । राजदूतीं शोधितां दूर । तत्समान नर देखिला ॥ ५२ ॥ तोचि चोर मानुनि । राजाची आज्ञा घेऊनी । तया सुळावरी चढवूनी । राजधानीप्रती दूत गेले ॥५३॥ चोर नव्हे तो मांडव्य मुनी । सुळीं असे ध्याननिष्ठ होवोनि । ध्याती

तया नेणुनी । चाले तेथूनी सती ते ॥५४॥ तव कौशिकाचा धक्का लागूनी । शूळें त्रस्त झाला मुनी। शाप देतसे कोपोनि । विवेक मनीं न धरितां ॥५५॥ धक्का दिधला मज ज्याणें। सूर्योदय होतांचि क्षणें। तो मरो असें म्हणे। ऐकतां शिणे ती साध्वी ॥ ५६ ॥ मग पतिव्रता म्हणे। पतीवांचोनी कासया जिणें। यास्तव वाक्य ऐक तरणे। उदय न करणें त्वां आपला ॥ ५७ ॥ जरी मी पतिव्रता नारी। तरी माझें वाक्य अवधारी। भस्म होशी नातरी। हें अंतरीं ठेव सूर्या ॥ ५८ ॥ ऐसा शाप देवूनी। पतीचा मनोरथ पुरवूनी। पुनः तयासह सदनीं। विप्रपत्नी पातली ॥ ५९ ॥ कामी पुरुष अविचारी। कार्याकार्य न विचारी। पापाची पर्वा न करी। उपशम अंतरीं नसे ज्याच्या ॥ ६० ॥ वेश्या हे कामाग्नीची ज्वाळा। रूपकाष्ठें पेटली सोज्वळा। कामी जाळीतो पडोनी गळा। यौवनफळा आणि धनें ॥ ६१ ॥ अहो योनी हे दुर्गंधी व्रण। तेथें रमतां नये शीण। तरी किडयाला याहून। काय न्यूनत्व आहे हो ॥ ६२ ॥ थुंकी कफ आणि शेंबूड। यानें भरलें जें तोंड। त्याला चंद्रोपमा देती मूढ। मायेनें दृढ आलिंगिलें ॥ ६३ ॥ स्वस्त्री स्वाधीन असतां। नीच वांछी परवनिता। तळें भरलें असतां। जेवीं काक कुंभोदक ॥ ६४ ॥ विषय भोगितां झाला रुग्ण। तरी विषया न सोडी ब्राह्मण। असो त्याचें हें मूर्खपण। धन्य जाण सती ते ॥ ६५ ॥ सवतीचें मत्सरें प्राण देती। ही तरी स्कंधीं वाहोनि पती। आली वेश्येच्या गृहाप्रती। धन्य पतिव्रता हो ॥ ६६ ॥ तिच्या शापा भिऊन। सूर्य राहिला लपून। पडला अंधार गहन। भ्याले जन सर्वत्र ॥ ६७ ॥ सर्व मनुष्य गडबडले। पशु पक्षी तडफडले। काळाभावें अडले। विप्र पडले संकटीं ॥ ६८ ॥ त्रिकाळ संध्यावंदन। सायंप्रातर्भोजन। कैसे करतील ब्राह्मण। दिनरात्रीमान न होतां ॥ ६९ ॥ यज्ञयाग लोपले। देवा उपवास घडले। सर्व संकटीं बुडाले। सर्वांचें खचलें बुद्धिबळ ॥ ७० ॥ स्वर्गी देव म्हणती। नर आम्हां बळी देती। वृष्टिद्वारा त्यांची तृप्ती। करितों आम्ही निरंतर ॥ ७१ ॥ आम्ही वृष्टिद्वारा अन्न देतां। मनुष्यीं यज्ञ न करितां। उपसर्गें पीडावें तत्त्वतां। तरी आतां तसें नाहीं ॥ ७२ ॥ अतिवृष्टिरनावृष्टिर्मूषकाः शलभाः शुकाः। स्वचक्रं परचक्रं च सप्तैता ईतयः स्मृताः ॥ १॥ धाडाव्या ह्या सात ईति। तरी केवळ अनीती। काळलोपें यज्ञ न करिती। मयांत भीती काय द्यावी ॥ ७३ ॥ आतां जावें ब्रह्मयापाशीं। सर्व सांगावें तयाशीं। तो उपाय आम्हांशीं। निश्चयेंशीं सांगेल ॥ ७४ ॥ असें म्हणोनी देवगण। सत्यलोका जाऊन। ब्रह्मयातें वंदून। सर्व निवेदन करीती ते ॥ ७५ ॥ ब्रह्मा म्हणे सतीच्या शापें। भिवूनी सूर्य लोपे। जरी एकदां सती कोपे। थर-

थरां कांपे ब्रह्मांड ॥ ७६ ॥ आतां उपाय एक असे । तेजें तेज लोपतसे । सूर्यापुढें दिवे जसे । सतीसमूह तसे अनसूयेपुढें ॥ ७७ ॥ पतिव्रताग्रगणनीया । मनस्विनी अनसूया । तिला तुम्ही प्रार्थुनियां । चला घेऊनियां पैठणासी ॥ ७८ ॥ त्या कौशिकपत्नीस । अनसूया उपदेशील खास । निवारील तुमचा त्रास । हें इतरांस न घडेल ॥ ७९ ॥ देव म्हणती आपणही यावें । तथास्तु म्हणून ब्रह्मदेवें । पैठणीं गमन केलें जवें । देवांसवें तत्क्षणीं ॥ ८० ॥ तया पाहूनी अत्री अनसूया । यथायोग्य पूजोनियां । विनयावनत होवोनियां । पुसलें तयां सर्व कुशल ॥८१॥ मग वंदूनी म्हणती देव । अनसूये त्वत्पदीं भाव । ठेवोनि घेतली धांव । तुझें नांव ऐकोनी ॥ ८२ ॥ सतीनें सूर्या शाप दिधला । सूर्य नभीं लोपला । कर्ममार्ग खुंटला । अनर्थ घडला जगांत ॥ ८३ ॥ तरी तूं होई प्रसन्न । सतीचें करी समाधान । उदया पावावो तपन । ऐसें तप न त्वदितराचें ॥ ८४ ॥ सती म्हणे तुम्ही देव । लोकपालक सदैव । तुम्ही म्हणतां घेतली धांव । वाटे अभिनव आश्चर्य हें ॥ ८५ ॥ असो तथापि चला जावूं । त्या सतीला समजावूं । युक्तीनें तिला वळवूं । म्हणोनी निघाली अनसूया ॥ ८६ ॥ पतीसह सती चाले । देवही समागमें आले । कौशिकगृहीं पातले । हर्ष पावले मनांत ॥ ८७ ॥ कौशिकपत्नी येवोन । घेतलें अनसूयेचें आलिंगन । अनसूयेसी सत्कारून । कुशल प्रश्न केला ॥ ८८ ॥ अनसूया म्हणे गे साध्वी । तुझी वाणी लागे माध्वी । लोकीं ज्या ज्या साध्वी । कीर्ति स्वाद्वी तयांची ॥ ८९ ॥ देवाहूनही अधिक । पती वाटे की त्याचें मुख । पाहतां ब्रह्म सुखादिक । वाटे सुख काय बोल ॥ ९० ॥ काया वाचा मनें करून । करितां पतीचें सेवन । सती होवोनी पावन । इतरां पावन करीतसे ॥९१॥ नारी तीर्थ पतिव्रता । असे ही उक्ती विख्याता । पतीची शुश्रूषा करितां । ऋणमुक्तता नारीची ॥ ९२ ॥ धर्म अर्थ काम हे । पतिसेवेनें नारी लाहे । काळाचीही भीती न वाहे । जी न पाहे यातना ॥ ९३ ॥ पतिव्रताधर्मपालन । हे क्लेश वाटती कठिण । जो दुर्भगा मानी क्षीण । ती दारुण यातना भोगी ॥९४॥ मनासारखी न मिळतां साडी । जावोनी माहेरीं करी चाडी । न मिळतां वाळी बुगडी । फुगडी घाली पतीपुढें ॥९५॥ बरे बरें खाणें पिणें । काय करावीं भूषणें । येती इहपर दूषणें । त्याला शिणे तो धन्य ॥९६॥ कसाही असो पती । त्यावरी ठेवी जी प्रीती । पतिसह तिला गती । लाभे पतिलोकीं ॥ ९७ ॥ स्त्रियांला नाहीं वेगळें कर्म । पती देतो अर्धा धर्म । उभयलोकीं मिळे शर्म । हें मुख्य वर्म धरावें ॥ ९८ ॥ म्हणोनी नित्य पतिव्रते । भावें सेवी स्वधर्मातें । ऐहिकामुष्मिक सुखातें । घेशील मातें निश्चयें ॥ ९९ ॥ मीही ह्या धर्मेंकरून ।

आत्मा केला पावन । म्हणोनी सर्वदा माझें मन । समाधान भर्तृचरणीं ॥१००॥ पतीच परब्रह्म माझें । जेणें उतरलें संसाराचें ओझें । त्रिविध तापही विझे । आतां न दुजें आठवे ॥ १०१ ॥ ऐकोनी अनसूयेचें वचन । सती होवोनी सुप्रसन्न । करद्वय जोडून । बोले वचन मधुरपणें ॥१०२॥ धन्य हो अये अनसूये । पतिव्रते महामाये । धन्य हो अत्रिप्रिये । निगमगेये तुज नमो ॥ १०३ ॥ मी नेणें निज धर्म । मी नेणें स्वकर्म । मी नेणें निजवर्म । न ठावें शर्म कारणही ॥ १०४ ॥ मज आवडे पतिसेवन । त्याला त्वां दिलें उत्तेजन । आम्हां दैवत काय याहून । प्राणजीवन पूर्णाधार ॥ १०५ ॥ तप करितां ही नोहे भेटी । ती तूं कंठीं घालूनि मिठी । प्रेमें धरिसी पोटीं । काढूनि हिंपुटी अनसूये ॥१०६॥ त्वां केला उपदेश । तेणें हर्ष झाला चित्तास । पतिसेवेचें हें खास । फळ आम्हांस मिळालें ॥ १०७ ॥ देवांसह तुझें दर्शन । झालें मज न होतां यत्न । पावन केलें हें सदन । आजचा सुदिन अहो भाग्य ॥ १०८ ॥ तूं असती पूर्ण काम । तथापि कां केला आगम । हा मच्चित्ताचा भ्रम । वारी विश्राम घेऊनी ॥ १०९ ॥ इति श्री दत्तमाहात्म्ये द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

# श्रीदत्तजन्म व दत्तलीला

## श्रीदत्तमाहात्म्य-अध्याय ३ रा

श्रीवत्स ॥ गुरु म्हणे शिष्या परिस । सतीप्रश्न ऐकोनी सुरस । अनसूया पाहूनी देवांस । म्हणे सतीस तेधवां ॥ १ ॥ हे देव आले तव सदनीं । सूर्योदय व्हावा म्हणोनी । हेंच मागती विनवूनी । मीही मनीं तेंचि आणीं ॥ २ ॥ सूर्य न दिसतां कालोच्छेद । कालोच्छेदें कर्मोच्छेद । कर्मोच्छेदें लोकोच्छेद । होई स्वच्छंद सत्वर ॥ ३ ॥ तेव्हां साध्वी किमर्थ । करावा असा हा अनर्थ । आग्रह करूं नको व्यर्थ । गेलिया परार्थ देहही ॥ ४ ॥ सती म्हणे अनसूये ऐक । काय सांगसी हा विवेक । जेणें मजला घडेल शोक । महादुःख ओढवेल ॥ ५ ॥ मांडव्यशाप दारुण । पती केवळ माझा प्राण । सूर्योदयें पावेल मरण । हें तों कठिण नेणसी कीं ॥ ६ ॥ अनसूया म्हणे गे सती । जरी मरे तुझा पती । तत्क्षणीं वाचवीन सुमती । नको खंती करूं त्याची ॥ ७ ॥ तुझा पति निःशंक । निरोगी

होऊनी उठेल एक। मनीं आणूं नको दुःख। देतें भाक त्रिवाचे ॥ ८॥ असें अनसूयेचें वचन। तिनें ते अंगिकारून। तथास्तु ऐसें म्हणून। केलें नमन आदित्या ॥ ९ ॥ जय सूर्या तूं तेजोराशी। समर्थ असोनी मर्यादेशीं। न टाळसी तूं पाळसी। महद्वाक्यासी विश्वकर्त्या ॥ १० ॥ माझें वाक्य म्यां घेतलें परत। त्वां शीघ्र व्हावें उदित। असें तिणें वदतां त्वरित। आदित्य उदित जाहला ॥ ११ ॥ जिच्या वचनें झाला लीन। तिच्या वचनें तोचि तपन। तत्काळ उदया पावोन। हें त्रिभुवन सुखी करी ॥ १२॥ चिरकाळ प्रवास करून। निजपती येतां देखोन। करी वदन सुप्रसन्न। कमळिणी प्रसन्न तेवी हो ती ॥ १३ ॥ सूर्य उदित होऊन। तत्काळ करी कृत्यें दोन। निःशेष अंधकारहरण। विप्रप्राणशोषणही ॥ १४ ॥ सतीचें म्लान मुख देखून। अनसूया वदे प्रौढ वचन। नको भिवूं हो सावधान। माझें वचन आठवोनी ॥ १५॥ जरी मी अनन्य भक्तीनें। देह झिजविला पतिसेवेनें। जरी काया वाचा मनें। धर्मानें सेविला निजपती ॥ १६ ॥ पतीहूनी परदैवत। दुसरें स्वप्नींही नेणत। साध्वीधर्म संतत। जरी यथार्थ घडला ॥१७॥ त्या धर्माच्या लेशेंकरून। ब्राह्मणा मिळो पुनः जीवन। निरोगपणें उठोन। वांचो हा शत वर्षे ॥ १८॥ कोठेंही ह्याचें मन। गेलें असेल निघोन। त्याचें होवो आवर्तन। देई जीवन असुनी ते ॥ १९ ॥ ऐसें बोलतां अनसूया। विप्र सजीव होवोनियां। बैसला स्वयें उठोनियां। त्याची भार्या हर्षली ॥ २० ॥ बाह्यांतःभाव पालटला। विप्र तो देवसा भासला। आनंद झाला सर्वांला। पुष्पें वर्षती सुरवर ॥ २१ ॥ सर्व देव वंदन करिती। अप्सरा हर्षे नाचती। गंधर्व तेही प्रेमें गाती। करिती ख्याती अनसूयेची ॥ २२ ॥ जयजय सतीवर्ये वेदगेयेऽत्रिभार्ये। जय निजवृषवीर्ये। भर्तृसेवासुचर्ये। जय जय कृतकार्ये दर्शितत्रस्तसूर्ये। सतत निहतधैर्ये ते नमो मातरार्ये ॥ २३ ॥ देव म्हणती अनसूयेसी। त्वां वाचविलें विश्वासी। केलें अघटित कार्यासी। यश आम्हांसी समर्पिलें ॥ २४ ॥ आम्ही झालों प्रसन्न। तुला देतों वरदान। अनसूया वदे वंदून। काय मागोन घेऊं मी ॥ २५ ॥ स्वधर्मे मी कृतार्थ आतां। जरी तुम्ही वर देतां। तरी हेंचि मागतें आतां। यावत् जीव असो पतियोग ॥ २६ ॥ ब्रह्मा विष्णु त्रिनेत्र। हे व्हावे माझे पुत्र। याहूनि न इच्छीं इह परत्र। न जाई अन्यत्र मन माझें ॥२७॥ देव म्हणती हे दिले वर। पुत्र होतील विधिहरिहर। करितील जगाचा उद्धार। धरी निर्धार अनसूये॥ २८ ॥ ऐसा देव वर देती। आज्ञा घेवोनी स्वर्गा जाती। अत्रीसवें अनसूया सती। आश्रमाप्रती पावली ॥ २९ ॥ त्या रायें मांडव्या जाणोनी। उतरला सुळावरोनी। प्रार्थिला शांतवचनीं। तो यमसदनीं पातला

॥ ३० ॥ यमाप्रती येवोनी तो । म्हणे दिग्पालांशी राजा होतो । राजा जो दंड करितो । करितो दंड दिग्पाल ॥ ३१ ॥ त्वां कां मातें सुळावर । चढविलें बोल सत्वर । यम बोले तूं असतां कुमार । कंटकें पक्षी वेधिला ॥ ३२ ॥ त्या पापाचा परिपाक । शूलारोहण निःशंक । येद बोले हा अविवेक । लागे पातक पितयातें ॥ ३३ ॥ धर्मा तुझा हा अधर्म । दासीपोटीं घेसी जन्म । मग विदुर झाला यम । तेव्हां अर्यम दंड धरी ॥ ३४ ॥ असो आतां ऐक शिष्या । त्रिमूर्ती देववरा मानुनियां । अनसूयेच्या उदरीं येवोनियां । गर्भरूपें वाढती ॥ ३५ ॥ ज्यांच्या स्मरणें तुटे फांस । त्यासी कैचा गर्भवास । अज असोनी दाविती खास । भक्ताधीनत्व या लोकीं ॥ ३६ ॥ अनसूये डोहळे होती । उत्तम ज्ञान बोले ती । ऐसे नवमास लोटती । करी संस्कार अत्रिमुनी ॥३७॥ मार्गशीर्ष पौर्णिमेसी । बुधवारीं प्रदोषसमयासी । मृग नक्षत्रीं शुभ दिवशीं । अनसूयेसी पुत्र झाले ॥३८॥ तव अत्रिऋषी येऊन । पाहीन म्हणे पुत्रवदन । तो अकस्मात् त्रिमूर्ती पाहून । विस्मित मन जाहला ॥ ३९ ॥ माला कमंडलु अधःकरीं । डमरू त्रिशूळ मध्यकरीं । शंखचक्र उर्ध्वकरीं धरी । भक्तकैवारी त्रिमूर्त्यात्मक ॥४०॥ काषायवस्त्र परिधान । विभूतीचें लेपन । मस्तकीं जटामंडन । वात्सल्यरसायन धाम जें ॥ ४१ ॥ तें दिव्यरूप पाहून । करसंपुट जोडून । अनसूया अत्रि वंदून । करिती स्तवन सद्‌गद ॥ ४२ ॥ जयजया परात्परा । अजा अव्यया निर्विकारा । जगत्कारणा जगदाधारा । सत्या असंगा उदासीना ॥४३॥सावकाश ज्याच्या पोटीं । परिभ्रमती ब्रह्मांडकोटी । तो तूं व्यापक आमुचे पोटीं । येसी हे खोटी गोष्ट होय ॥ ४४ ॥ सृष्टीपूर्वी तूं एक सत्य । स्थितिकालींही न होसी असत्य । प्रळयीं निर्बाधत्वें सत्य । त्वद्वचन असत्य होय कीं ॥ ४५ ॥ निज विरुदावळी पाळिसी । वासनावन जाळिसी । भक्तजनां सांभाळिसी । आळसी न होसी भक्तकाजीं ॥ ४६ ॥ स्वयें असोनी स्वतंत्र । भावाच्या भुकेनें होसी परतंत्र । कोण जाणे तुझा मंत्र । भ्रमविसी यंत्रबद्ध विश्व ॥ ४७ ॥ ह्या रूपा आमुचा नंदन । म्हणणें हें जगीं विडंबन । म्हणूनि तूं बाल होऊन । राहतां मन हर्षेल ॥४८॥ पुत्रभावेंकरून । तुझें करितां लालन पालन । जाईल आमुचे मायावरण । म्हणोनी चरण धरियेले ॥ ४९ ॥ मग बोले वनमाळी । तुम्ही तप केलें कुलाचळीं । तीन स्वरूपीं त्या वेळीं । तुम्हां दर्शन दीधलें ॥ ५० ॥ एकाचें करितां ध्यान । तुम्हीं आलेत कोण तीन । ऐसें तुम्हीं पुसतां दिलें वचन । आम्ही तीन एकरूप ॥ ५१ ॥ पुढें अतिथी होऊन । जसें मागितलें भिक्षादान । तसेंच देतां नग्न होवून । अनसूयेपुढें तीन बाळ झालों ॥५२॥ आमुच्या शक्त्या

येऊन । आम्हा मागती प्रार्थना करून । तेव्हां हा पाळणा न व्हावा शून्य । म्हणोनी वरदान मागितलें ॥ ५३ ॥ तसाच वर देऊन । शक्तींसह केलें गमन । निजभक्त देवगण । त्यांही वरदान तुम्हां दिलें ॥ ५४ ॥ तें सर्व सत्य करावया । पूर्व वरा स्मरावया । लोकीं भक्तिख्याती व्हावया । प्रगट केलें ह्या दिव्यरूपा ॥ ५५ ॥ तुमचा भाव पाहोन । तुम्हां दिलें म्यां माझें दान । राहीन तुमच्या स्वाधीन । देतों वचन त्रिवार ॥ ५६ ॥ माझें दर्शन न हो निष्फळ । जें गती दे तात्काळ । असें म्हणोनि तीन बाळ । झाला घननीळ विश्वनाटकी ॥ ५७ ॥ मग अत्रि करी स्नान । करी जातकर्मविधान । मिळोनियां मुनिजन । जयजयकार करिती ॥ ५८ ॥ पुष्पें वर्षती सुरवर । वारा चाले मनोहर । जगीं आनंद होय थोर । परात्पर अवतरतां ॥ ५९ ॥ वांझ वृक्ष झाले सफळ । वंध्येपोटीं आलें बाळ । पळोनि गेला दुष्काळ । अवतरतां मूळपुरुष हा ॥६०॥ अनसूया धन्य पतिव्रता । विधिहरिहरांची झाली माता । जिचें स्तनपान करितां । ये तृप्ता त्रिमूर्तीला ॥ ६१ ॥ बारावे दिनीं अत्रिमुनी । नामकर्म करूनी । अन्वर्थक नामें तिन्ही । तयांचीं ठेविलीं प्रेमानें ॥६२॥ ज्याने केलें स्वात्मदान । त्यांचें दत्त हें अभिधान । सर्वां देई आल्हादन । म्हणोनि चंद्राभिधान ब्रह्मांशा ॥६३॥ दुर्वासा नाम रुद्रांशा दे । मग अनसूया आनंदें । पाळणा बांधूनी स्वछंदें । बाळ निजवूनी गातसे ॥ ६४ ॥ ॥ (पाळणा) ॥ जो जो जो जो रे परात्परा ॥ भजकाच्या माहेरा ॥ ध्रु ॥ सह्याद्रीवरि जो अत्रिसुत । अनसूया जठरांत । प्रगटुनि विख्यात । हो दत्त ॥ तारिल जो निजभक्त । जय जगदुद्धारा उदारा । भजकांच्या माहेरा ॥ जो जो जो जो रे ॥ ६५ ॥ प्रल्हादा देशी विज्ञान । येतां अर्जुन शरण । सिद्धी देऊन उद्धरून । स्वपदीं देशी स्थान ॥ अलर्क यदुतारा योगिवरा । भजकाच्या माहेरा ॥ जो जो जो जो रे ॥ २ ॥ ६६ ॥ ( पाळणा ) ॥ २ ॥ जो जो रे जो जो जय विश्वात्मन् परावर भूमन् । जय जय जय भगवन् ॥ ध्रु० ॥ चारभूत खाणी पाळणा बांधोनी । चोवीस तत्त्वें दृढतर ओवोनी ॥६७॥ गुणसूत्रें माया । स्तंभीं बांधुनिया । कर्मदोरी धरूनी । झोके घेसी वायां ॥ ६८ ॥ चाळाचाळी टाकुनी । श्रुतिगीत ऐकूनी । घे झोप उन्मनीं । स्वानुभवें करूनी ॥ ६९ ॥ (पाळणा संपूर्ण) ॥ जे सृष्टिस्थिति संहार करिती । तयासीं पाळण्यांत निजवी सती । स्वकरें पुनः पुनः झोके देती । काय गती भक्तीची हो ॥ ७० ॥ जे त्रैलोक्याचे पालक । त्यांला लागली भूक । अनसूयेपुढें करतो शोक । भावाची भूक असी असे ॥ ७१ ॥ दोघा लावी दोन स्तनीं । तिसरा रडे आक्रंदोनी । तया कृपादृष्ट्यमृतपानीं । योरवी साजणी अनसूया ॥ ७२ ॥ यज्ञ याग जयाला ।

अद्यापि न देती तृप्तीला । सती स्तनपानें तयाला । ढेकर आला तृप्तीचा ॥७३॥ ऐहिक जे भोग मिळती । तीं भक्तीचीं फळें न होती । जी मिळे सायुज्य गती । अवांतर स्थिति ती केवळ ॥ ७४ ॥ निःसीमप्रेम म्हणों भक्तीचें फळ । तरी लालनादिकांचे काय फळ । म्हणों जरी उद्धरील पितृकुळ । हेंहि निष्फळ बोलणें ॥ ७५ ॥ स्वयें पिता पितामह झाले बाळ । तेथें कैचें पूर्वजकुळ । तरी हा केवळ विशाळ । ज्याचा खेळ तो जाणे ॥ ७६ ॥ चंद्र तो करोनि वदन । चंद्रमंडळीं राहिला जाऊन । ओषधीला देई जीवन । वाढलें संतान येथें ज्याचें ॥ ७७ ॥ दुर्वासाही उद्धत । स्वच्छंदें जगीं घुंडत । जे असती दुर्वृत्त । करी सद्वृत्त तयांतें ॥ ७८ ॥ निघोन जातां दोघे सुत । दुःखी झालें अनसूयेचें चित्त । तेव्हां पुढें येऊनी श्रीदत्त । पूर्व वृत्तांत स्मरे म्हणे ॥७९॥ मग स्मरतां वृत्तांत । तव त्रिमूर्ति दिसे दत्त । सर्वेचि विश्वरूप दिसत । झाली चकित अनसूया ॥८०॥ सर्वेचि बाळ होऊन । योगमाया पसरून । तीतें मोहित करून । अंकीं बैसोनी स्तन्य पिये ॥८१॥ आप्तकामही असून । योगमाया पसरून । बालभाव धरून । करी क्रीडन कौतुकें ॥ ८२ ॥ बोलोनि बोबडे बोल । मुग्ध चेष्टा करी केवळ । मुक्या करी जो वाचाळ । त्याचा खेळ काय हा ॥ ८३ ॥ जो वागवी पांगुळा । तो अडखळे वेळोवेळां । विश्वाधार तो अनसूयेच्या गळां । मिठी घाली लवलाहें ॥ ८४ ॥ ज्या ज्या बाललीला सकळ । दावी मातेसी करून खेळ । जमवूनी मुनींचे बाळ । स्वयें खेळे त्यांसवें ॥ ८५ ॥ अनसूया बोलावी भोजनार्थ । नये गुंतूनी क्रीडार्थ । माता धरावया येत । धुडुधुडु धांवत जातसे ॥८६॥ माता पाठी लागतां । योग्यां अगम्य तो नये हातां । तिची देखोनी श्रांतता । तिच्या हातीं येई स्वयें ॥ ८७ ॥ ब्रह्मांडें ज्याचे उदरीं । त्याला धरी कमरेवरी । न्हाणूनि बैसवितां मंदिरीं । मृत्तिका शरीरीं माखी दत्त ॥८८॥ दाखवूनि नाना लीला । हर्ष देई मातापितरांला । भक्तवशता दावी जगताला । जो एकला असंग ॥८९॥ आठ वर्षे होतां व्रतबंध । अत्रि करी विद्याबोध । शास्त्रयोनि जो निर्बाध । लीला अगाध तयाची ॥ ९० ॥ कौपीनादिक टाकून । स्मशानीं जावूनि बैसे नग्न । नासाग्रदृष्टि ध्याननिमग्न । यत्पदसंलग्न होती योगी ॥९१॥ पिंगल नाग आणि साध्यदेव । रूप पाहतां अपूर्व । प्रश्न करिती सगर्व । पाहूनी खर्वमूर्ती ते ॥ ९२ ॥ त्यांतें सदुपदेश करून । दिधलें योगपूर्वक ज्ञान । त्या दिवसापासून । प्रसिद्धि झाली श्रीदत्ताची ॥९३॥ दुष्ट शिक्षक शिष्टपालक । योगमार्गप्रवर्तक । जाणूनि येती मुनीबाळक । विश्वचालक काय करी ॥ ९४ ॥ तत्परीक्षार्थ त्या वेळीं । श्रीदत्त बुडे अगाध जळीं । भिवूनि पळती त्या काळीं । कित्येक मंडळी

सत्वर ॥ ९५ ॥ तो मानूनि खेळ । तेथें राहिले कित्येक बाळ। त्यांची परीक्षा कराबया केवळ । भलता खेळ आरंभी ॥ ९६ ॥ एक नग्न स्त्री घेऊन । श्रीदत्त तीरीं येवून । स्वयें नग्न होवून । क्रीडा करूनि राहिला ॥ ९७ ॥ स्वाश्रया जी स्वविषया । नारी झाली ती आदिमाया। ती अंकीं बैसोनियां। वाद्यें वाजवोनियां गातसे ॥ ९८ ॥ तीतें करवोनियां पान । शक्तीचें उच्छिष्ट घेई आपण । तिला देई वीर चर्वण । बाळ पाहोनी पळाले ॥ ९९ ॥ तेजीयसां नाहीं दोष । म्हणोनि राहिले जे शेष । त्यावरी करूनि तोष । योग सविशेष सांगितला ॥१००॥ ईश्वर करी साहस। धर्मव्यतिक्रम खास । तेजीयस्त्वामुळें नाहीं दोष । अग्नि निर्दोष ज्यापरी ॥१०१॥ ऐश्वर्य सामर्थ्य नसोन । मूढ एवढा घेई गुण । तो नष्ट होई न लागतां क्षण । कर्म दारुण गती दे ॥ २ ॥ धर्मातीत वागे हर । तो गुण घेती पामर। काळकूट जिरवी शंकर। मरे पामर त्या शिवतां ॥ ३ ॥ ईश आणि गुणातीत। धर्माधर्मविवर्जित। श्रुतीमस्तकीं राहतात। ते वायुवत् निर्दोषी ॥ ४ ॥ त्यांची आचरणे प्रायः न घ्यावीं। वचनें मात्र न टाळावीं। दोन्हीशीं योग्य ती पाळावीं। सांभाळावीं धर्माहि ॥ ५ ॥ त्यांचीं सुचरितें घ्यावीं। असी बोले श्रुति बरवी। त्याचे सरीस ये न रवी। नर वीर्यहीन कायसा ॥ ६ ॥ काय सारिखा दिसला तरी। ज्ञानी अज्ञानी यांची न हो सरी। हें जाणिजे सुज्ञ चतुरीं। कुतर्क करी तो मूर्ख ॥ ७ ॥ असो असें बीभत्सही पाहून। सर्व कष्ट सोसून। टिकला कार्तवीर्य अर्जुन। योग ज्ञान लाभला ॥ १०८ ॥ इति श्रीदत्तमाहात्म्ये श्रीदत्तावतारकथनं नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

# दुर्वासपुत्राचा जन्म

## श्रीदत्तप्रबोध–अध्याय आठवा

|| श्रीसद्गुरुदत्तात्रयाय नमः || ॐ नमो अविनाश निर्गुणा । विमलरूपा सनातना । मायातीता निरंजना । शुद्ध चिद्धना नमो तुज ॥१॥ तूं निखिल ब्रह्म निराकार । अहं ब्रह्मास्मि उद्गार । मायानियंता प्रभाकर । सगुणांकुर तेथें तूं ॥२॥ सगुणस्वरूपत्व जे माया । ते तूं होसी गा निरामया । कल्पनीं आड प्रसवोनिया । गुणत्रया उभारिसी ॥३॥ सशक्तीक निर्मोन । ऐक्यभावा युक्त करून । पृथकें कार्य आज्ञापून । द्विमार्गी आपण मिश्रित ॥४॥ तीन दोन मिश्री ते पांच । हें कौतुक दावावया साच । एक एकाचे पुनरा पांच । एवं संच पंचविसा ॥५॥ पुनरा पांचा करोनि मंथन । विषभाग काढिला निवडोन भाग पांचा नामाभिधान । वेगळें लक्षण ठेविलें ॥६॥ पंचवीस पांच केले तीस । स्वाभागें मिळवी एकास। एकूण केली छत्तीस । खेळ विशेष रचिला हा ॥७॥ एवं उभारिलें ऐसे भूत । दहा संस्थापिले त्यांत । दशद्वारें जे नेमित । रुद्र वस्तींत वेगळे ॥८॥ दश नाद दश भेद । एकादशावें पृथक प्रसिद्ध । हे भेदातीत अभेद । साधु सिद्ध जाणती त्या ॥९॥ ते तूं सकळांचें जीवन । व्यापक साक्षीरूपें पूर्ण । तुज जाणावया आंगवण । न याणे खुण आगमनिगमा ॥१०॥ त्यांचि हें भूत उभारिलें । भूत भूतांतेंचि प्रसवविलें । अनेकत्वें विस्तारिलें । एवं रचिलें ब्रह्मांड ॥ ११ ॥ अनंत ब्रह्मांडांची माळा । सूत्रधारी तूं वेगळा । खेळ खेळवोनि निराळा । न कळे कळा कवणासी ॥१२॥ तूं सकळांसी अगोचर । तुझा न कळे कोणा पार। शिणले श्रुतीचे जिव्हार । थकित फणीवर सहस्रमुखी ॥ १३ ॥ तेथें अल्पमती मी हीन । केंउतें वर्णूं मी तुझे गुण । म्हणोनिया विनय होऊन । करी नमन पायांसी ॥ १४ ॥ वर्णनीय करावी सेवा । हाची वसा लागला जीवा । तरि कृपा करोनि देवाधिदेवा । हेतु पुरावा दीनाचा ॥ १५ ॥ एवढा उपक्रम करितां । आळस न करिसी सद्गुरुनाथा । सुताचा हेतु केउता । पूर्ण करितां तुम्हांसी ॥१६॥ पूर्ण कृपेनें देतां दान । मग तें न पडे कदा न्यून । यासाठीं प्रीति करून । वंदी चरण विनयत्वें ॥ १७ ॥ मागें तुझें त्यांच बोलविलें । निरूपण रसाळ चालविलें । पुढेंहि पाहिजे सांभाळिलें । कृपाबळें आपुल्या ॥ १८ ॥ गतकथाध्यायीं वरदान । देवोनि देव पावले स्वर्गभुवन । कैलासीं करोनिया शिवार्चन । विधि स्थापन सत्यलोकीं ॥१९॥ तेथें विष्णूनें शिवासी । विचारिलें जातों वैकुंठासी । आपण जावें स्वस्थळासी । लोभ मानसीं असं द्या ॥२०॥ शिव म्हणे एकटें जावें । हें काय तुम्हांसी घरवें । हरि म्हणे तुम्हां शीण द्यावे । काय करावें ऐसें पैं ॥ २१ ॥ मागुतीं बोले उमावर । काय असे तो क्षीरसागर । म्हणोनि रहावे उगेचि दूर । हें तो वैकुंठपुर असे कीं ॥२२॥ हें मागिले अध्यायीं संपलें । तें श्रोतेजनीं

अवधारिलें । पुढें सद्गुरुकृपें जें चाले । तें श्रवण केलें पाहिजे ॥ २३ शिवदेवाची आवडी देखोन । विनोदें बोले नारायण । तें चमत्कारिक वचन । करा श्रवण सकळही ॥ २४ ॥ अहो या भूलोकाचे ठायीं । नाना आचरणें करिती पाहीं । जैसी ज्याची कमाई । तैसेंचि ठाईं ते पावती ॥ २५ ॥ अहो जी शिवा चंद्रमौळी । तुम्ही साठविजे हृदयकमळीं । इतर सकळीं ऐकिजे २६ ॥ कोण्ही भाविक भक्त जाण । प्रेमें करिती लिंगार्चन । कोणी राजोपचारें करोन । कोण्ही साधारण पंचोपचारी ॥ २७ ॥ कोणी करिती प्रदोपव्रत । कोणी सोमवारातें आचरत । कोणी शिवरात्री नेमयुक्त । कोणी व्रतस्थ निराहारी ॥ २८ ॥ कोणी उपासनीं अनुष्ठानीं । कोणी बैसले जपध्यानी । कोणी आहारविहारातें करोनी । कोणी भजनीं निघटले ॥२९॥ कोणी शिवा तुजसाठीं । भोगिती नाना दुःख कचाटी । कोणी द्विज भोजनाच्या पाठीं । कोणी हटीं दिगंबर ॥३०॥ ऐसे बहुविधा करिती आचरण । हेंही त्रिगुणात्मकें पृथक पूर्ण ।परि उभय भाग पडती निवडोन । सकाम लक्षणें निष्काम ॥ ३१ ॥ सकामिका प्रसन्न होती । गुणाऐसीं फळें देसी । देतां कांहीं न विचारिसी । भोळा होसी शंकर ॥३२॥ जयें निष्कामें दयाळा । तुज अर्चिलें आश्वनीळा । तयाचा करिसी बहुत सोहोळा । अमृतफळा अर्पिमी ॥३३॥ कोणा करिसी कैलासवास । कोणासु दिसी कंठमाळिकेस । कोणा देसी स्वरूपेतस । इच्छित आस पुरविसी ॥ ३४ ॥ तेवींच ब्रह्मार्चनी जे जन । तयां सत्यलोकींचें सन्मान । जे करिता यज्ञदान । संतर्पण बहुसाल ॥ ३५ ॥ पोडशोपचारें द्विजा अर्चिती । उत्तम उपभोगादि अर्पिती । थाट देवालयें बांधिती । देव पूजिती सोपस्कारें ॥ ३६ ॥ धर्मशाळा अन्नसत्रें । गोभूरत्नें दानें विचित्रें । नानारसादि तिल-पात्रें । वहनें छत्रें शिबिरें ॥ ३७ ॥ नाना अलंकार धातु । अग्र आहार द्विजां देतु । वस्त्रें भूपणें विख्यातू । प्रीतीं अर्पितु ग्रामक्षेत्रें ॥ ३८ ॥ सदावर्तें ऋतुसेवनें । आसनें वसनें शय्यासनें । नाना धान्य आणि धनें । उपायनें सुंदर ॥ ३९ ॥ कूप बारवा विहिरी । छाया शाळा नानापरी । विद्याग्रंथ कळा कुसरी । दानें करी विविध ते ॥४०॥ ऐसिया अनंतदाना । देवोनि तोपवी द्विजगणा । कांहीं लौकिकसंबंधी अर्चना । तीर्थें क्षेत्रें उपासना यात्रा करीं ॥४१॥ ऐसें पुण्य आचरतां । मग येतसे तो स्वर्गपंथा । अमर होय सत्कारिता । सुख संतोषता दे तया ॥ ४२ ॥ भागाऐसे भोग देती । कीर्ति तोवरीच राखिती । तें सरतां लोटोनि देती । जन्म पावती भुलोकीं ॥४३॥ त्रिगुणात्मकें पुण्याशी । फळेंहि भोगविती तयाऐसी । राज्यवैभव संपत्तीसी । दारा कलत्रासी कर्मा-ऐसे ॥ ४४ ॥ तेवींच सूर्यउपासक । तयासी प्राप्त भानुलोक । पुण्य सरतां आवश्यक । जन्मा अचूक घालिती ॥ ४५ ॥ ऐसेची ते शाक्त जाणा । करिती शक्तीची उपासना । भक्ष-अभक्ष नाना । मदिरापाना करिताती ॥ ४६ ॥ पात्रापुढें ठेवोनि पात्र । रजनीं पूजा करिती विचित्र । मांस मदिरा अपवित्र । प्रसाद पवित्र म्हणती त्या ॥ ४७ ॥

लक्ष्मी वचन ऐकूनि संतोष पावले मुनी ॥ २३॥ गेले नंतर कैलासी बोलले पार्वतीस ते । पार्वती वृत्त ऐकूनी परम विस्मित जाहली ॥ २४॥ आतां शिवास घाडून सत्व हरण करीन मी । बोलतां पार्वती ऐसें झाले हर्षीत ते मुनी ॥२५॥ मग नारद तेथूनि सत्यलोकास जाउनी । सावित्री कथिलें सर्व झाली विस्मित अंतरीं ॥ २६ ॥ धाडुनी ब्रह्मदेवास म्हणे सत्व हरीन मी । तिघींना सांगुनी ऐसे गेले नारद तेथुनी ॥ २७॥ पती येतां मंदिरांत तिघींनीं काथिलें तयां । पतिव्रता असे श्रेष्ठ अत्रिपत्नी अनसूया ॥२८॥ कथिलें नारदानें हें तिचें सत्व हरावया । जावें तात्काळ येथूनी तिघे 'अवश्य' बोलले ॥२९॥ निघाले मग त्रैमूर्ति ब्रह्मा-विष्णु-महेश्वर । मृत्युलोकांत येऊनि अत्रिसदनास पातले ॥३०॥ द्विजरूप धरूनी ते अंगणीं राहिले उभे । पाहिलें अनसूयेनें दिलें आसन बैसण्या ॥३१॥ बोले सतीस त्रैमूर्ति क्षुधा अत्यंत लागली । इच्छाभोजन मिळे येथें कीर्ति ऐकूनि पातलों ॥३२॥ पाटावरीं बसा येथें तुम्हां भोजन वाढतें । सतीनें वाढलीं पानें तिला त्रैमूर्ति बोलले ॥ ३३ ॥ अट आमुची अशी आहे घेई ऐकूनि हे सती ! । इच्छा भोजन वाढावें आम्हांसी वस्त्र सोडुनी ॥३४॥ ऐसें वचन ऐकूनी सती विस्मित जाहली । परी 'अवश्य' बोलूनी गेली गृहांत सुंदरी ॥३५॥ नमस्कार करूनीया निवेदिलें पतीस तें । जाणिलेंचि अंतर्ज्ञानी ब्रह्मा-विष्णु महेश्वर ॥३६॥ पातले सत्त्व घेण्यास, कांतेला मग बोलले । हें गंगा तीर्थ घेऊनि शिंपडावें तिघांवरी ॥३७॥ इच्छा भोजन वाढावें. तीर्थ झारी दिली तिला । घेऊनी झारी हातांत आली बाहेर सुंदरी ॥३८॥ तिघांवरी हातानें तें सतीनें तीर्थ शिंपिलें आश्चर्य घडलें तोंच जाहलीं तीन बालकें ॥३९॥ लुगडे चोळी सोडूनि बाळांसंनिध बैसली । तिन्ही बाळांस घेऊनि तिनें स्तनास लाविलीं ॥४०॥ तात्काळ फुटला पान्हा सती हर्षीत जाहली । करूनी शांत तिघांस निजविलीं पाळण्यांत तीं ॥४१॥ हालवी पाळणा प्रेमें गीतें सुंदर गाउनी । अत्री अनसूया ऐसें नित्य बाळांस खेळवी ॥४२॥ लोटले दिवस कित्येक तव नारद पातले । पाहिलें तीन बाळांस खेळतां कौतुकें तिथें ॥४३॥ जाहला हर्ष अत्यंत मानसीं मग बोलले । लक्ष्मी देवीस वैकुंठीं सांगावें वृत्त जाउनी ॥ ४४ ॥ करूनी विचार हा ऐसा गेले वैकुंठीं नारद । कोठें श्रीविष्णु आहेत? लक्ष्मीदेवी विचारिलें ॥४५॥ नाहीं ठाऊक म्हणे मातें मग नारद बोललें । शिव-ब्रह्मा-सह विष्णु अत्रिसदनांत राहिले ॥४६॥ जाऊनी मग कैलासीं पार्वतीला विचारिलें । कोठें शंकर आहेत ? नाहीं ठाऊक ती म्हणे ॥४७॥ शंकर मृत्युलोकांत ब्रह्मा-विष्णुसवें तिथें । राहती अत्रि सदनांत नारदांनीं निवेदिलें ॥ ४८ ॥ मग नारद तेथूनी सत्यलोकास पोंचले । पाहूनि नारदा येतां सावित्रीनें विचारिलें ॥४९॥ कोठें आहेत सांगावें ब्रह्मा-विष्णु-महेश्वर ? । अत्रिसदनांत त्रैमूर्ति म्हणे निश्चित राहती ॥ ५० ॥ तिघी एकत्र होऊनि नारदाला विचारिलें । भूलोकांत असे कोठें अत्रिआश्रम सांग तें ? ॥५१॥ म्हणजे जाउनी तेथें आणूं भ्रतार आमुचे । चलावें माझिया संगे त्यांना नारद बोलले ॥ ५२ ॥ नाहीं येणार आश्रमांत ।

दुरुन दावीन आश्रम । ऐसें नारद बोलुनि निघाले तिघींस घेउनी ॥५३॥ आश्रमासमिप येऊनि उभे नारद राहिले । उमा-सावित्री-लक्ष्मीस पहा आश्रम तो म्हणे ॥५४॥ गेल्या तिघी आश्रमांत काय आश्चर्य पाहिलें ! । मांडीवरी महासाध्वी खेळवी तीन बालकें ॥ ५५ ॥ उमा-सावित्री-लक्ष्मीनें तिला साष्टांग वंदिलें । धन्य धन्य ऋषिआत्रि ! म्हणे धन्य अनसूया ॥ ५६ ॥ सती म्हणे तुम्ही ? मागावें काय पाहिजे ? लक्ष्मी-सावित्रि उमा आम्ही आमुचे हेंच मागणें ॥५७॥ ब्रह्मा-विष्णु-महादेव माते! हे आमुचे पति । तुझ्या घरांत हीं बाळें स्वच्छंदें नित्य खेळती ॥५८॥ पूर्ववत करूनिया आम्हां दे आमुचे पति । सतीनें ऐकुनी ऐसें गेली गृहांत सत्वरीं ॥ ५९ ॥ नमस्कार करूनिया निवेदिलें पतीस तें । गंगा-उदक घेऊनि शिंपडावें तिघांवरीं ॥ ६० ॥ ते पूर्ववत होतील ऋषि कांतेस बोलले । घेऊनी तीर्थ झारीस तिघींना सति बोलली ॥ ६१ ॥ तुमचे पति अंगणांत तिकडे खेळती पहा । त्यांना त्वरीत घेऊनि जावें स्वस्थानिं आपल्या ॥ ६२ ॥ सतीस बोलल्या तीघी ओळखेना आम्हांस ते । तूंच ते जाणते माते ! करी पूर्वरूपांत ते ॥६३॥ निराभिमानि पाहूनि म्हणे देतें पती तुम्हां । शिंपिले तीर्थ, त्रैमूर्ति झाले ब्रह्मा-हरी-शिव ॥ ६४ ॥ आत्रि बोले तया देवां जातां सोडूनि कां अम्हां ? । बोले ऐकूनि त्रैमूर्ति आम्हांलाहि न जाववे ॥ ६५ ॥ त्याचवेळीं अकस्मात तेथें नारद पातले । झाले त्रैमूर्ति एकत्र दावा सत्वरूपा म्हणे ॥ ६६ ॥ पूर्वपुण्य फळा आलें त्रिगुणीं ऐक्य जाहलें । ऐकुनी हें नारदाला तेधवां देव बोलले ॥ ६७ ॥ प्रयत्न योगयागादि पूर्वी केलें अमूप तें । सत्वस्वरूप तें पाही डोळे भरूनि नारदा ! ॥ ६८ ॥ जाहली बाल त्रैमूर्ति ब्रह्मा-विष्णु-महेश्वर । मार्गशीर्ष शुद्ध मास सायंकाळीं चतुर्दशीं ॥ ६९ ॥ कृतिका दीन बुधवार जाहला जन्म त्याक्षणीं । 'दत्त' हें ठेविलें नांव पुष्पें देवांनिं वर्षिलीं ॥ ७० ॥ करूनी जयजयकार विधिपूर्वक पूजिले । देव प्रत्यक्ष येऊनि धरिलें छत्र चामर ॥७१॥ नारद, इंद्र, गंधर्व, करी किन्नर गायन । करी स्तवन प्रीतीनें सर्वही हात जोडुन ॥ ७२ ॥ जय जय श्रीअवधूता ! जयजया आत्रिनंदना ! । दयाघना ! निर्विकारा ! जयजया मधुसूदना ! ॥ ७३ ॥ श्रीदया-सागरा दत्ता ! भवाब्धि भवतारका ! । जयाची ही कृपा होतां मुक्त तो होय बोलका ॥ ७४ ॥ गुरुकृपा जया होतां तयाला काय न्यूनता । ब्रह्मज्ञान तया होई पुराणां-तरिं ही कथा ॥ ७५ ॥ स्तुति ही ऐकुनी ऐशी दत्त प्रसन्न जाहले । वरदान दिलें जाणा ! जो करील आराधना ॥ ७६ ॥ उपासना विधियुक्त तेथें राहीन नारदा ! । 'दत्तात्रेय' वदे नांव करी स्मरण जे सदा ॥ ७७ ॥ उभा तेयेंचि राहीन सांगतों ऐक नारदा ! । तया संकटिं पावेन पूर्ण होतील कामना ॥ ७८ ॥ प्रातःकाळीं नित्य-नेमें उचारी 'दत्त दत्त' जे । भेट देईन निर्धारें कोणत्याही रुपामध्यें ॥ ७९ ॥ पूर्ण होतां एक वर्ष तया भेटीन निश्चित । माझें वचन नेमस्त सांगतों सत्य नारदा !

॥ ८० ॥ ऐकूनि हेंचि वरदान मनीं नारद तोषले । देव आदीक ही सर्व परम संतोष पावले ॥ ८१ ॥ ' दत्तजन्मकथा ' हीच ऐकिती पठती सदा । मी रात्रंदिन रक्षीन वचन विचार नारदा ! ॥८२॥ विद्यार्थ्यांला मिळे विद्या धनार्थ्यांला मिळे धन । पुत्रार्थ्यांला पुत्र प्राप्ति करीन रोग निवारण ॥ ८३ ॥ जो हा ग्रंथ गृहामाजी पूजील नेमपूर्वक । ठेवुनी देवपूजेंत नित्य आदरपूर्वक ॥८४॥ त्याचें ऐश्वर्य वाढेल लाभेल यश कीर्तिही । जगीं कल्याण होईल तया लाभेल सद्‌गति ॥८५॥ ' दत्तजन्म कथा ' ऐशी सर्व संपर्ण जाहली । ' श्रीधरानें ', मनोभावें भक्तांसाठीं निवेदिली ॥ ८६ ॥

—श्री. ग. गडकरी

# पाळणे

१ मार्गशीर्षमासीं दत्ता पोर्णिमेसी । प्रदोषीं झालासी प्रकट तूं ॥१॥ अत्रिमुनिभार्या माय अनसूया । झाली तुझी आर्या चित्र हें कीं ॥२॥ चित्र हेंचि नोहे देव भाव पाहे । भक्ताधीन राहे भक्तप्रिय ॥ ३ ॥ पाहा पाळण्यांत घाली सती ज्याला । शोधुनी तयाला शिणे वेद ॥४॥ निज रे जो जो बाळा दत्ता घननीळा । लागो तुझा डोळा म्हणे ज्याला ॥ ५ ॥ निज रे नीज नीज जो जो म्हणे जया । सती वेद तया गातां ठके ॥ ६ ॥ पाळणा हालवितां सतत गीत गातां । वासुदेवा दत्ता हर्ष वाटे ॥ ७ ॥

२. निज निज रे संसारहरे अत्रिकुमरा । घालुनि हालवूं पाळण्यांत तुज मुनीश्वरा । (ध्रु०) अत्रिसदनिं तूं अवतरूनि भक्त तारिसी । दत्तनामक उन्मत्तभूतसम तूं भाससी । बाळक केव्हां तरुण केव्हां स्थाविर दीससी । भूल घालिसी निर्जरा ॥ निज निज० ॥ १ ॥ योगि कधिं रे भोगी कधीं हरे दिससि वैरागी । वस्त्र नेससी कधीं नग्न जनामधिं फिरसि या जगीं । वेद वदसि विधि वडवडसी कधीं बैससी उगी कधिं भजसि संसारा ॥ निज निज० ॥ २ ॥ वर्णि कधीं दंडि मुंडि करिसि कधिं मठीं । ग्रामि वनीं कधीं मसणीं फिरसि नदितटीं । वासुदेवा तुज ओळखितां आलि हिंपुटी । आतां भेट मुनिवरा ॥ ३ ॥

३. आलयिं रे निज निज रे जो जो जो जो रे ॥ दत्तात्रेया अत्रितनय नीज जो जो रे ॥ ध्रु० ॥ अनसूयातनय दत्त चित्तमलहरा ॥ तूं प्रगटुनि अत्रिसदनिं तारिं पामरा ॥ सकलसमा तव महिमा कोण जाणे पुरा ॥ धाता भर्ता हर्ता होऊनि मुनिपालकिं निजुनि राहसि भवहरे ॥ आलयिं० ॥ १॥ नित्य काशिमध्यें न्हासी माहुरिं निजसी सह्यगिरीवरि कुहरीं नित्य राहसी ॥ भक्तप्रिय कुरवपुरीं भीक मागसी ॥ जीवें भावें गावें ध्यावें म्हणुनि मुनिसदनीं अवतरूनी होसि शिशु अजा रे ॥ आलयिं० ॥ २ ॥ निजवुनि तुज पाळण्यांत दोरि धरुनियां । चित्त लावुनि दृष्टि गोवुनि गीत गाउनियां ॥

त्वन्मय ती होऊनि सती प्रेमें अनसूया ॥ जो जो जो जो जो जो निज निज रे वदे तुज रे नेणें दुसरें याहुनि खरें ॥ आलयिं रे निज निज रे ॥ ३ ॥

४. जो जो जो जो रे अनसूयातनया दत्तात्रेया । उन्मनि निज मज दे हरि माया मजवरि वरि करिं दया ॥ धृ ॥ स्थिरचरव्यापक तूं सनकादिकां दर्शन द्याया एकां । ब्रह्मा विष्णु हर होउनि सुखा अर्पनि मुनिलोकां । स्मरोनि मग तूं या मनुष्या करिसी कृपेची छाया ॥ जो जो० ॥ १ ॥ मंदाज्ञालस हे जड मर्त्य पाहुनि मग वा सत्य । असुनी अज नित्य होसि तथ्य अनसूया अपत्य । जो जो म्हणुनियां ऋषिभार्या निजवी येंदूं तया ॥ जो० ॥ २ ॥ कोण्यावधि खेपा आम्हि झोंपा पाळण्यांत घेतूं बापा हें समजुनि तापा । हरुनि कृपा कीजे यास्तव दर्पा टाकुनि तुज जो जो करूं सदया कोमलहृदया गेया ॥ जो जो जो जो रे अनसूयातनया दत्तात्रेया ॥ ३ ॥

५. तूं निज तूं निज रे निज जो जो । तूं निजपाळक होशिल जो जो ॥ धु० ॥ पालकिं बालक सात्त्विक माया । घालुनि हालविते अनसूया ॥ गात असे जनपावन जो, जो । तारक त्यासि वदे जो जो ॥ १ ॥ सर्वजगज्जननावनहेतू । कारक पालक बालक तो तूं ॥ तारक तूं अकहारक मंतू । वारक वारक पतिक दाहक तूं ॥ २ ॥ योग-सुमार्गसुधारक हो तूं । भाविकसेवकतारक तो तूं ॥ धार्मिकभाविकवांछित दे तूं । बा स्मरतां निज दर्शन दे तूं ॥ ३ ॥ ( वासुदेवानंद )

६. मीडित दोहद पीडित माता । कांहीं न सुचतसे मज आतां ॥ ओकरि येवुनि कांही न सोसे । ओकूं अयिगइ आये मी करूं कैसें ॥ १ ॥ हा परमेश्वर यावरि झाले । हृष्ट असोनिहि कष्टच आले ॥ आभरणें हिं च भारिच झाली । फिक्कट झालि न सोसत बोली ॥ २ ॥ वाटतसे भिक मागुनि खावें । जावुनि गुपचुप रानिं बसावें ॥ दार अगार न पोर वित्त । आवडि घे परिचिंतनि चित्त ॥ ३ ॥ शीर्षि जरा मुकुटासि धरुन । मत्यगभिन्नपरासि भरून ॥ चित्तिं निगर्व सदा अवधूत । दांत सुशांत सदोदित पूत ॥ ४ ॥ ( वासुदेवानंद )

७. जो जो जो जो रे गुणत्रया । बाळा दत्तात्रया ॥धृ०॥ चतुरानन देवा परमेष्टी । घा तुज होईल दृष्टी । झालासी बाळा । बहु कष्टी । करिता प्रतिदिनीं सृष्टी । होउनि चंद्र दिशांवर वेष्टी । करि अमृतरस वृष्टी । सुशांत उज्वल शीतळ काया ॥ बाळा० ॥ १ ॥ निज रे निज बाळा अनंता । देवा, लक्ष्मीकांता । निर्गुण सगुणरूपा, स्वयंभुता । अनसूयेच्या सुता । श्रमलासी पतितां, उद्धरितां । जगप्रतिपालन करितां । तूं प्रभु गुरुदाता, भुवनत्रया ॥ बाळा० ॥ २ ॥ अजन्म पुरुष आला, जन्मास । आनंद जीव शिवास । भक्तास्तव त्यजुनी, कैलास । गिरिनंदिनि कैलास । तूं महातेज ऋषि दुर्वास । दिङ्मंडळीं करि वास । तप करी तपोवनीं, तपालया ॥ बाळा० ॥ ३ ॥ राहे सिंहाद्री पर्वतीं । वैकुंठीची मूर्ती । लक्ष्मी, सावित्री, पार्वती । करिती मंगळ

आरती । सुरवर-गण पुष्पांजुळी वाहती । सन्मुनी ध्यानीं पाहती । नतजन तुज वाहती गुरुराया ॥ बाळा० ॥४॥ जाहला स्वानंद, लाभ वनीं । अत्रिऋषिंच्या भुवनीं । म्हणती देवऋषी, शुभाननी । धन्य अनुसूया जननी । पुरुषोत्तम स्वामी, दिनरजनी । डोले निरंजनीं । अभिवंदन करूनी, गुरुपाया ॥ बाळा दत्तात्रया० ॥ ५ ॥

( विष्णुदास )

८) जो जो जो जो रे मुनिवर्या । स्वामी दत्तात्रया । सांगुनि पूर्वीचा निजपर्या । ॥ ध्रु० ॥ हालविती असता निजसदनीं अत्रिमुनी । मागितले मज पाणी । मुसळ थांबविलें तेचि क्षणीं । ऐकूनि मुनिची वाणी ॥१॥ नारद मुनिनें तें पाहुनि । सांगितलें सुरसदनीं । हरिहर ब्रह्मांच्या त्रैपत्नी । क्षोभविल्या अभिमानी ॥२॥ त्यांनीं आपुलाले दादुले । छळणासी धाडिले । त्यांहीं अडवुनिया मज वहिले । भिक्षेसी मागितले ॥३॥ मग म्यां तीर्थातें शिंपिले । तिन्ही बाळे केले । भोजन घालुनिया निजवीले । संवत्सर बहु गेले ॥ ४ ॥ उमा सावित्री लक्ष्मी । आल्या आमुच्या धामीं । त्यांनीं मागितले निजस्वामी । सांडुनि आपुली मी मी ॥५॥ मग म्यां दाखविले देवत्रय । तो तूं दत्तात्रय । निरंजनासि आश्रय । गलया तुझा होय ॥६॥ जो जो ॥

( निरंजनरघुनाथ )

९)जो जो जो जो रे गुरुवर्या ॥ बाळा दत्तात्रया ॥ध्रु०॥ अनुसूया माता पतिव्रता ॥ अत्रिऋषींची कांता ॥ धन्य त्रीलोकीं गृहीं असतां ॥ श्रीहरि शंकर धाता ॥ येती अतिथी पहाया ॥ बाळा दत्तात्रया ॥ जो जो० ॥१॥ त्रिवर्ग भुकेनें पीडिलों । तुझ्या द्वारीं ठाकलों । मध्यान्ह समया बहु थकलों ॥ म्हणसी माते आलों ॥ देई सिद्धान्न भक्षाया ॥ बाळा दत्तात्रया० ॥२॥ अतिथी त्रैमूर्ति ओळखोनी । बैसविलें आसनीं ॥ अर्घ्य पाद्य पूजा अर्पुनी ॥ विनवी साष्टांग नमुनी ॥ इच्छित पुरविन हो स्वामीया ॥ बाळा दत्तात्रया ॥३॥ भुललों तव रूपा सुंदरी ॥ वाढी दिगंबरी ॥ होतों विन्मुख वद लौकरी ॥ असाध्य वाटे जरी ॥ आलों तव सत्त्व पहाया ॥ बाळा दत्तात्रया ॥४॥ धन्य पतिव्रता निर्मळ । म्हणे अतिथी बाळ ॥ मार्थुनी बैसविलें निश्चळ । फेडुनी वस्त्रें सकळ ॥ आली नग्ररूपें वाढाया बाळा दत्तात्रया ॥५॥ विस्मित् त्रैमूर्ति बाळ होसी ॥ स्तनपान मागसी ॥ वंदी अनसूया पायासी ॥ माता म्हणवीसी ॥ सत्य करावें बोला या ॥ बाळा दत्तात्रया ॥६॥ आधी गुरुदत्त अवतरला ॥ सुरवरा आनंद झाला ॥ जग-भ्रांति तुटली बाळ आला ॥ भक्तिमेळा सजला ॥ दत्त भजन कराया ॥ बाळा दत्तात्रया ॥७॥

( संतमहाराज )

आरती । सुरवर-गण पुष्पांजुळी वाहती । सन्मुनी ध्यानीं पाहती । नतजन तुज ध
गुरुराया ।। बाळा० ।।४।। जाहला स्वानंद, लाभ वनीं । अत्रिऋषिंच्या भुवनीं । म्ह
देवत्रयी, शुभाननी । धन्य अनुसूया जननी । पुरुषोत्तम स्वामी, दिनरजनी ।
निरंजनीं । अभिवंदन करूनी, गुरुपाया ।। बाळा दत्तात्रया० ।। ५ ।।

( विष्णुद

८) जो जो जो जो रे मुनिवर्या । स्वामी दत्तात्रया । सांगुनि पूर्वीचा निजप
।। धृ० ।। हालविती असता निजसदनीं अत्रिमुनी । मागितले मज पाणी । मुसळ थां
तेचि क्षणीं । ऐकूनि मुनिची वाणी ।। १ ।। नारद मुनिनें तें पाहुनि । सांगितलें सुरसद
हरिहर ब्रह्मांच्या त्रैपत्नी । क्षोभविल्या अभिमानी ।।२।। त्यांनीं आपुलाले दादुले । छळण
धाडिले । त्यांहीं अडवुनिया मज वहिले । भिक्षेसी मागितले ।।३।। मग म्यां ती
शिंपिले । तिन्ही बाळे केले । भोजन घालुनिया निजविले । संवत्सर बहु गेले ।।
उमा सावित्री लक्ष्मी । आल्या आमुच्या धामीं । त्यांनीं मागितले निजस्वामी । सां
आपुली मीं मीं ।।५।। मग म्यां दाखविले देवत्रय । तो तूं दत्तात्रय । निरंजन
आश्रय । सदया तुझा होय ।।६।। जो जो ।।

( निरंजनरघुन

९) जो जो जो जो रे गुरुवर्या ।। बाळा दत्तात्रया ।।धृ०।। अनुसूया माता पतिव्रत
अत्रिऋषींची कांता ।। धन्य त्रीलोकीं गृहीं असतां ।। श्रीहरि शंकर धाता ।।
अतिथी पहाया ।। बाळा दत्तात्रया ।। जो जो० ।।१।। त्रिवर्ग सुकेनें पीडिलों । तु
द्वारीं ठाकलों । मध्यान्ह समया बहु थकलों ।। म्हणसी माते आलों ।। देई सिद्ध
भक्षाया ।। बाळा दत्तात्रया० ।।२।। अतिथी त्रैमूर्ति ओळखोनी । बैसविलें आसनी
अर्घ्य पाद्य पूजा अर्पुनी ।। विनवी साष्टांग नमुनी ।। इच्छित पुरविन हो स्वामीया
बाळा दत्तात्रया ।।३।। भुललों तव रूपा सुंदरी ।। वाढी दिगंबरीं ।। होतों विन
वद लौकरी ।। असाध्य वाटे जरी ।। आलों तव सत्त्व पहाया ।। बाळा दत्तात्रया ।।
धन्य पतिव्रता निर्मळ । म्हणे अतिथी बाळ ।। प्रार्थुनी बैसविलें निश्चळ । फेडुनी
सकळ ।। आली नग्नरूपें वाढाया बाळा दत्तात्रया ।।५।। विस्मित त्रैमूर्ति बाळ होसी
स्तनपान मागसी ।। वंदी अनसूया पायासी ।। माता म्हणवीसी ।। सत्य करावें बे
या ।। बाळा दत्तात्रया ।।६।। आधी गुरुदत्त अवतरला ।। सुरवरा आनंद झाला ।। ज
भ्रांति तुटली बाळ आला ।। भक्तिमेळा सजला ।। दत्त भजन कराया ।। बा
दत्तात्रया ।।७।।

( पंतमहाराज

जसा । माझ्या हरणीच्या पाडसा । ऊठ राजसा अवधूता ॥२॥ वा, तुज पहावयासाठीं । आल्या सिद्धऋषींच्या थाटी । झाली अमरगणांची दाटी । करती वृष्टी पुष्पांची ॥ ३ ॥ सगुण बाळ ब्रह्मचारी । तूंचि निर्गुण भवसंसारीं । तव गुण अठरा सा परिचारी । वेद चारी वर्णिती ॥ ४ ॥ उठि उठि गा पुरुषोत्तमा । मजला लागूं दे गृहकामा । बाळा, तुजला देतें आमा । आत्मारामा उठ वेगीं ॥ ५ ॥ वहीण ही शोभे कपिलाचार्या । धन्य अत्रीऋषींची भार्या । सत्वर शरणागत जनकार्या । श्रीगुरुराया उठवीं ॥ ६ ॥ तूं विश्वेश्वर प्रतिपाळक । तूंचि विश्वाचा मालक । माझा म्हणविसी बाळक । तूं चालक प्राणाचा ॥७॥ ऐकुनि निज जननीची वाणी । जागृत झाला सशङ्ख-पाणी । अनुपम कैवल्याची खाणी । गुण वाखाणी अनसूया ॥ ८ ॥ शुभमंगळ प्रभात-काळीं । गातां मद्भावें भूपाळी । त्यांचें भवभयसंकट टाळी । गुरु सांभाळी सर्वदा ॥९॥ महंत गोविंदभारती । वसती सिंहाद्रीपर्वतीं । सहीत महापुरुषांच्या मूर्ती । नामें गर्जति स्वानंदें ॥१०॥ भिक्षा मागुन माधुकरी । प्रसाद देई आपले करीं । शरणागत जन पावन करी । उठी झडकरी अवधूता ॥११॥ ही भूपाळी अक्षरमाळा । सुगंध मकरंद आगळा । श्रीगुरु क्षराक्षरा वेगळा । त्याच्या गळां अर्पिली ॥१२॥ वा, तुझें मंजुळ बोलणें । वा, तुझें चंचल चालणें । वा तुझें स्वानंद डोलणें । जग सम पहाणें अवधूता ॥१३॥ श्रीगुरु दत्तात्रय माउली । विष्णुस्वामी म्हणे पावली । स्मरतां अविलंबें धांवली । साभावली मजमाजीं ॥१४॥

८. श्रीगुरुदत्ता कांकड आरती ओवाळित आतां । तुजला ओवाळित आतां । भावें ओवाळित आतां । निद्रातीत जागृत असतां न येचि उठवितां ॥ ध्रु० ॥ माया वस्त्रांतुनि हे चिंधी सांपडली मजला । परतंतु सांपडली मजला । अवचित सांपडली मजला । वाया न जाऊं द्यावी म्हणुनी कांकडा केला ॥ १ ॥ विद्या अविद्या द्वैत उठतां त्रिपुटी उद्भवली । मायिक त्रिपुटी उद्भवली । सद्वस्तूचें स्मरणहि नसतां पीळ पडुनि गेली ॥ २ ॥ मोहरूपें स्नेहांत बुडवुनि ज्योती लावियली । स्वयंज्योती लावियली । परंज्योती लावियली । पाहुनि सद्गुरु बाबा राम म्हणे निशा सरली ॥ ३ ॥

९. पंचप्राण कांकड आरती तत्त्वात्मक ज्योती । लावुनि तत्त्वात्मक ज्योती । ओवाळिला श्रीत्रयमूर्ति परमात्मा प्रीती ॥ ध्रु० ॥ ओवाळूं आरती माझ्या सद्गुरुनाथा स्वामी श्रीगुरुनाथा । शरण मी आलों तुज । शरण मी आलों तुज । श्रीपदीं ठेवियेला माथा ॥ १ ॥ कृष्णा सुपंचगंगा अनादि संगमीं । राहे यतिवर तरुतळीं । तो हा माझा कुलस्वामी । ओवाळूं० ॥ २ ॥ द्वारीं चौघडा वाजे वाजंत्री वाजती । कर्णे वाजंत्री वाजती । नाना घोषें गर्जत । नाना वाद्यें गर्जत । भक्त स्वानंदें स्तविती ॥ ओवाळूं ॥ ३ ॥ इंद्रादि सुरवर पन्नग दर्शनास येती । श्रीचे दर्शनास येती । नारद मुनिवर किंन्नर तुंबर आळविती ॥ ओवाळूं ॥ ४ ॥ पाहुनि सिंहासनीं आदि मूर्ति सांवळी ।

नंदन चौथा, अलर्क ज्या म्हणती ॥ २ ॥ सुतया नामक भूसर मुनिवर विष्णुदत्त सुमती । अन्यहि येती सुर मौनितती करिती ते प्रणती ॥३॥ अनसूयेच्या बाळा दत्ता करितों तुज विनती । उठीं उठीं विमला अरुण उदेला सरली हे राती ॥४॥ मंगलधामा घनश्यामा उठिं उठिं तूं निगुती । अरुण उदेला प्रकाश पडला पक्षी गलबलती ॥ ५ ॥ कुंकुम माखुनि प्राचीकामिनि हर्षुनी आत्मपती । येतो म्हणुनी ये लगबगुनी लोटी तम पुढती ॥६॥ द्विजाजि उठती, वेदा पढती, वासुदेव प्रार्थी । उठिं उठिं दत्ता श्रीगुरुनाथा दावी मुखदीप्ती ॥ ७ ॥

४. उठा उठा हो भाविक । योला अत्रीचा नंदन । भक्ति–विरक्तिचा दायक । भवहारक सकळांसीं ॥ १ ॥ भस्मलेप सर्वांगाला । जटाभार माथां शोभला । व्याघ्रः चर्म असे नेसला । तेणें शोभे तापस ॥ २ ॥ पायीं खडावा गोजिऱ्या । चालतां वाजती साजिऱ्या । येणें घडतां त्या कैवाऱ्या । आगमना सुचविती ॥ ३ ॥ संगें चाले कामधेनू । वेद चारी घेतले श्वान । विनायक करितो वर्णनू । हृदयीं रूप रेखावें ॥ ४ ॥

५. जन हो उठा अरुणोदयीं । दत्तचरणां स्मरा हृदयीं । पातक दग्ध होय निश्चयीं । अनंतकोटी जन्मींचें ॥१॥ दत्त हा अविद्यानाशक । आत्मतत्त्वाचा प्रकाशक । ज्ञान-विज्ञान-मति-दायक । मोक्षद गुरु सकळांसी ॥ २ ॥ दत्त योगमार्ग-प्रवर्तक । अखिल बुद्धि-भेदां हारक । नानाकुतर्क- उच्छेदक । सत्यबोध-प्रापक तो ॥ ३ ॥ दत्त केवळ ज्ञानमूर्ती । आत्माराम परंज्योती। चैतन्यमात्र अवस्थिती । निखिल ब्रह्मांडी ज्या ॥ ४ ॥ दत्त जाणा परमानंद । त्याचा जडतां हृदयीं छंद । विनायकाला झाला वरद । बोलवी निज गुह्यातें ॥ ५ ॥

६. उठिं उठीं अनसूयात्मजा । सह्यगिरीच्या राजा । भक्त उभे दर्शनकाजा । उघडीं कपाट आपुलें ॥ १ ॥ आला प्रल्हाद दैत्यसुत । अतुल जो श्रद्धावंत । नरहरी प्रगटला त्वरित । ज्याच्यासाठीं स्तंभांत ॥ २ ॥ कार्तवीर्य हात जोडी । प्रेमें स्तवनाला मांडी । उठा म्हणे हो तांतडीं । सूर्योदय झालासे ॥ ३ ॥ आयुराजा सेवेसाठीं । तत्पर झाला जगजेठी । त्याची पुत्राशा मोठी । तुम्ही पुरविली दत्तात्रेया ॥ ४ ॥ अलर्काचा राज्ययोग । तुमच्या कृपेनें अभंग । तुम्ही तयाचे जिवलग । म्हणुनि भेटी मागतसे ॥ ५ ॥ विष्णुदत्त वेदधर्म । प्रियदास तुमचे परम । प्रार्थिताती मंगलधाम । श्रीमुख दावा आम्हांसी ॥ ६ ॥ बोले विनायक वचन । सकल आले संतजन । म्हणति नाथा प्रगटोन । विजय करा भक्तीचा ॥ ७ ॥

७. उठि उठि गा दत्तात्रया । तूं सुखदायक लोकत्रया । सोडूनि निद्रा देहत्रया । म्हणे अनुसूया हो जागा ॥ध्रु०॥ उठि उठि गा दिगंबरा । आला वासरमणि अंबरा शिव, गणपती, । नारदतुंबरा । विश्वंभरा, अवलोकीं ॥१॥ अजुनी तूं कसा । श्रीक्षिरसागरिं श्रीहरि

जसा। माझ्या हरणीच्या पाडसा । ऊठ राजसा अवधूता ॥२॥ बा, तुज पहावयासाठीं । आल्या सिद्धऋषींच्या थाटी । झाली अमरगणांची दाटी । करती वृष्टी पुष्पांची ॥ ३ ॥ सगुण बाळ ब्रह्मचारी । तूंचि निर्गुण भवसंसारी । तव गुण अठरा सा परिचारी । वेद चारी वर्णिती ॥ ४ ॥ उठि उठि गा पुरुषोत्तमा । मजला लागूं दे गृहकामा । बाळा, तुजला देतें आमा । आत्मारामा उठ वेगीं ॥ ५ ॥ वहीण ही शोभे कपिलाचार्या । धन्य अत्रीऋषीची भार्या । सत्वर शरणागत जनकार्या । श्रीगुरुराया उठवीं ॥ ६ ॥ तूं विश्वेश्वर प्रतिपाळक । तूंचि विश्वाचा मालक । माझा म्हणविसी बाळक । तूं चालक प्राणाचा ॥७॥ ऐकुनि निज जननीची वाणी । जागृत झाला सशक्र-पाणी । अनुपम कैवल्याची खाणी । गुण वाखाणी अनसूया ॥ ८ ॥ शुभमंगळ प्रभात-काळीं । गातां मद्भावें भूपाळी । त्यांचें भवभयसंकट टाळी । गुरु सांभाळी सर्वदा ॥९॥ महंत गोविंदभारती । वसती सिंहाद्रीपर्वतीं । सहीत महापुरुषांच्या मूर्ती । नामें गर्जति स्वानंदें ॥१०॥ भिक्षा मागुन माधुकरी । प्रसाद देई आपले करीं । शरणागत जन पावन करी । उठी झडकरी अवधूता ॥११॥ ही भूपाळी अक्षरमाळा । सुगंध मकरंद आगळा । श्रीगुरु क्षराक्षरा वेगळा । त्याच्या गळां अर्पिली ॥१२॥ बा, तुझें मंजुळ बोलणें । बा, तुझें चंचल चालणें । बा तुझें स्वानंद डोलणें । जग सम पहाणें अवधूता ॥१३॥ श्रीगुरु दत्तात्रय माउली । विष्णुस्वामी म्हणे पावली । स्मरतां अविलंबें धांवली । सामावली मजमाजीं ॥१४॥

८. श्रीगुरुदत्ता कांकड आरती ओवाळित आतां । तुजला ओवाळित आतां । भावें ओवाळित आतां । निद्रातीत जागृत असतां न येचि उठवितां ॥ ध्रु० ॥ माया वस्त्रां-तुनि हे चिंधी सांपडली मजला । नरतनु सांपडली मजला । अवचित सांपडली मजला । वाया न जाऊं द्यावी म्हणुनी कांकडा केला ॥ १ ॥ विद्या अविद्या द्वैत उठतां त्रिपुटी उद्भवली । मायिक त्रिपुटी उद्भवली । सद्वस्तूचें स्मरणहि नसतां पीळ पडूनि गेली ॥ २ ॥ मोहरूपें स्नेहांत बुडवूनि ज्योती लावियली । स्वयंज्योती लावियली । परंज्योती लावियली । पाहुनि सद्गुरु बाबा राम म्हणे निशा सरली ॥ ३ ॥

९. पंचप्राण कांकड आरती तत्त्वात्मक ज्योती । लावुनि तत्त्वात्मक ज्योती । ओवाळिला श्रीत्रयमूर्ति परमात्मा प्रीती ॥ ध्रु० ॥ ओवाळूं आरती माझ्या सद्गुरुनाथा स्वामी श्रीगुरुनाथा । शरण मी आलों तुज । शरण मी आलों तुज । श्रीपदीं ठेवियेला माथा ॥ १ ॥ कृष्णा सुपंचगंगा अनादि संगमीं । राहे यतिवर तरुतळीं । तो हा माझा कुलस्वामी । ओवाळूं० ॥ २ ॥ द्वारीं चौघडा वाजे वाजंत्री वाजती । कर्णे वाजंत्री वाजती । नाना घोषें गर्जत । नाना वाद्यें गर्जत । भक्त स्वानंदें स्तविती ॥ ओवाळूं ॥ ३ ॥ इंद्रादि सुरवर पन्नग दर्शनास येती । श्रीचे दर्शनास येती । नारद मुनिवर किंनर तुंबर आळविती ॥ ओवाळूं ॥ ४ ॥ पाहुनि सिंहासनीं आदि मूर्ति सांवळी ।

चिन्मय मूर्ति सांवळी । श्रीगुरुभक्त तन्मय । श्रीगुरुभक्त निर्भय श्रीपदीं ओवाळी ॥ ओवाळूं ॥ ५ ॥

१०. कांकड आरती स्वामी श्रीगुरुदत्ता । सद्भावें ओवाळूं चिन्मयरूप अवधूता ॥ ध्रु० ॥ प्राणापान समान व्यान उदान मिळाले । सुषुम्णेचे मार्गे दर्शनासि पातले ॥ १ ॥ सोऽहं शब्दध्वनि मिळोनि सर्वांनी केला । दशनादाचा घोष अखंडित चालला ॥ २ ॥ कुंडलिनीचा वेढा काढुनि काकडा केला । सत्रावीचें घृत घेउनी पूर्ण भिजवीला ॥ ३ ॥ सद्गुरु वाक्याचा चिन्मय प्रकाश पडला । निश्चय कांकडा नेऊनि तेथें पेटविला ॥ ४ ॥ निरंजन ओवाळूं जातां तद्रूप झाला । सद्गुरुप्रसादें अहंभाव निमाला ॥ ५ ॥

११. कांकडा झाला गुरुचें मुख प्रक्षाळा । गुरुचें मुख प्रक्षाळा गुरुचें मुखप्रक्षाळा ॥ध्रु०॥ उठोनि प्रातःकाळीं दत्ताच्या दर्शना चला । गुरूच्या दर्शना चला । कर्ण चौघडा दत्ताचा ढोल वाजला ॥ १ ॥ पीतांबर शालजोडी दत्ताची आवरोनि धरा । गुरुची आवरोनि धरा । हातीं शंख घेऊनि पायीं भागीरथी घाला ॥ २॥ केशरीं उदक दत्ताच्या स्नानासी आणा । गुरुच्या स्नानासी आणा । दही दूध घालुनी मुखीं लोण्याचा गोळा ॥ ३ ॥ लोणी शर्करा घेऊनी वैदर्भीबाळा । आली वैदर्भीबाळा । मानसतुळशी वाहुनी कांकडा केला ॥ ४ ॥ उठोनि अवधूत बसले नवरंगी चौरंगीं । बसले नवरंगीं चौरंगीं । कस्तुरीचा टिळक केशर सर्वही अंगीं ॥ ५ ॥ धूप दीप करुनी दत्तासी नैवेद्य अर्पिला । गुरुसी नैवेद्य अर्पिला । पंचारती करूनी दत्त भावें ओवाळिला ॥ ६ ॥

१२. दत्तदिगंबरा, उठ करुणाकरा । पहाट झाली पुरे झोंप आतां । भक्तजन हे उभे वाट पाहती समें । दर्शनें त्यां शीघ्र शांवा ॥ ध्रु० ॥ अरुण तम दूर करी कुंकुमें नभ भरी । वापडी ही उषा पदर पसरी । गंग खळखळ करीं त्वयशें जगभरी । मंद वाहे कशी अनिललहरी ॥ दत्त० १ ॥ वनगधर्व हे सुस्वरें गाइती । मोर केकारवें नृत्य करिती । मुनिकुलें गर्जती वेदमंथरगिरा । उठ या श्रीधरा साधु पठती ॥ दत्त० २ ॥ पद्पदें पद्मदलीं गुंजती प्रियकरा । भेटती ही मुदा चक्रपिल्ली । रंग कधी उभा पाहूं दे मुखप्रभा । लोळूं दे सतत या चरणकमळीं ॥ दत्त० ३ ॥

१३. उठीं उठीं श्रीदत्तात्रेया । श्रीपादश्रीवल्लभ सदया । श्रीनृसिंहसरस्वती गुरुवर्या । दर्शन देई भक्तांसी ॥ ध्रु० ॥ पंच पंच उपःकाल जाहला । अरुणोदय सप्तपंच घाटिला । अष्टपंच प्रातःकाला । उदया पावे रवि पूर्ण ॥ १ ॥ आले अमरेंद्रादि अमर । संत साधु मुनिवर । समग्र आले नारीनर । कांकड आरती पहावया ॥ २ ॥ नमितां पूर्ण मनोरथ होती । त्रिविध ताप समूळ हरती । पूर्वज समस्त उद्धरती । कांकड आरती देखिलिया ॥ ३ ॥ वेगें उठती सद्गुरुमूर्ती । सकळिक पदांबुज वंदिती । स्तवनीं ध्यानीं ओवाळिती । विश्वव्यापक परमात्मा ॥ ४ ॥ गुरुत्रैमूर्ति आश्रम

घेऊन । तरुवरीं धीदरक्षणार्थ राहुन । स्मरतां तारिसी जन संपूर्ण । रक्षिसी गुरुभक्त सर्वदा ॥ ५ ॥

१४. उठीं उठीं बा आत्मया । चिन्मया दत्तात्रेया । सोडुनियां गुणमय शय्या । जागृत हो अपसैय्या ॥ धृ० ॥ झाली बा प्रबोध पहांट विवेक हा अरुण । आला उजळित आशा आतां उगवे चित्किरण ॥१॥ फिस्कट पडला व्यवहारेंदु वैरि निशाचर । कामादि हे लपले पाहुनि प्रकाश हा थोर ॥ २ ॥ दुस्तर्कादिक दिवाभीत दडले ते ह्या वेळीं । दुर्वृत्ती ह्या तारा गगनीं मावळल्या सकाळीं ॥ ३ ॥ शमादि विप्र पुढें सादर राहति सांडुनिया दर । उठी उठी बा तूं निजरूपा दावीं ह्या सादर ॥ ४ ॥ रागद्वेष मलोत्सर्गा करूनि आला पुढती । वासुदेवा भेट दे हा करिताहे प्रणती ॥ ५ ॥

१५. उठिं उठिं दत्तात्रया करुणासिंधु कृपालया । उठवी माता अनुसूया प्रेमें टाळ्या पिटूनियां ॥ धृ० ॥ सप्तपंचम अरुणोदय । आला स्नानाचा समय । भानुप्रकाश होऊं पाहे । रविरश्मि दाटल्या ॥ १ ॥ उठले साधकांचे वृंद । करिति तव नामाचा छंद । हृदयीं ध्याती ब्रह्मानंद । प्रेमभावें करूनी ॥ २ ॥ व्यास वाल्मीक नारदमुनि । आदि करोनि सर्व मुनी । उभे राहिले आंगणीं । दर्शनासीं पातले ॥ ३ ॥ गंगा यमुना सरस्वती । तुंगभद्रा भागीरथी । मनिकर्णिका भीमरथी । स्नान घालूं पातल्या ॥ ४ ॥ इंद्रचंद्रादि सुरगण । आले दर्शना लागून । करिती स्तोत्र अनुवादन । कीर्ति तुझिया नामाची ॥५॥ऐकुनि मातेची करुणा । उठला साधकांचा राणा । निरंजनाचीये मना । प्रेमानंद दाटला ॥ ६ ॥

१६. उठिं उठिं दिगंबरा । स्वामि सद्गुरु दातारा । सर्व त्रैलोक्य उद्धारा । करुणाकरा उठिं वेगीं ॥धृ० ॥ पंचपंच उषःकाळ । सप्तपंच अरुणाचळ ॥ करितां पट्कर्म सोज्वळ । होती वेळ सर्वेशा ॥ १ ॥ भागीरथीसी जाऊन । सारूनिया संध्यास्नान ॥ पंढरपुरासी चंदन । लावावया जाणें कीं ॥२॥ कृष्णातीरासी जाऊन । कर्म माध्याह्नीं करून ॥ करवीर क्षेत्रामाजीं जाण । भिक्षाटन मागणें ॥ ३ ॥ पंचालेश्वर सिद्धस्थानें । तेथें सारुनी भोजन ॥ सर्वेषि सांभवी प्राशन । तुळजापुरीं करणें कीं ॥ ४ ॥ सेखाचळा वरि आसन । करोनि माहूरासी जाण ॥ तेथें करोनि शयन । जन्मस्थान आहे पां ॥५॥ पश्चिमे गिरनार जाण । तेथें सारोनि आसन ॥ मुद्रा खेचरि लावून । सोहंध्यान साधी कां ॥ ६ ॥ सर्व त्रैलोक्या माझारी । प्राणी कोणी स्मरण करी ॥ तत्क्षणीं तेथवरी । जाणें लागे सर्वेशा ॥ ७ ॥ ऐकुनि भक्ताची करुणा । उठिला साधकांचा राणा । निरंजनाचिया मना । प्रेमानंद दाटला ॥ ८ ॥

१७. सृष्टि देवता जागृत झाली । सृष्टि देवता जागृत झाली । दत्तात्रयमूर्ती । हरि ॐ श्रीपाद गुरुमूर्ती । नरसिंह सरस्वती । नरसिंह सरस्वती । उठा उठा हो । पहा सरलि राती ॥ १ ॥ मंदसमीरण वाहुं लागला । मंदसमीरण वाहुं लागला । फळें फुलें डुलती ।

प्रभुवरा फळें फुलें डुलती । सुगंध त्यांचा । सुगंध त्यांचा । दरवळला हा । प्रभो आसमंतीं ॥ २ ॥ गोठ्या मधुनी गाई महिषी । गोठ्यामधुनो गाई महिषी । सुटण्या हंबरती । सुरेशा सुटण्या हंबरती । वत्सें त्यांचीं । वत्सें त्यांचीं । स्तन पानास्तव । बहु ओढ घेती ॥ ३ ॥ निशाचरादी वनीं दडाले । निशाचरादी वनीं दडाले । पक्षी किलबिलती । परेशा पक्षी किलबिलती । सेवेकरि हे । सेवेकरि हे । सुस्वर रागें । तुम्हां आळवीती ॥ ४ ॥ मंजुळ वाद्यें वाजुं लागलीं । मंजुळ वाद्यें वाजुं लागलीं । सप्त सुरा मधुनी । श्रीपते सप्त सुरामधुनी । वेद घोषहीं । वेद घोषही । करूं लागलीं । ब्रह्मवृंद वाणी ॥ ५ ॥ केव्हांचा हा भक्तवृंद तव । केव्हांचा हा भक्तवृंद तव । निर्झरिं न्हावोनी । नरहरे निर्झरिं न्हावोनी उभा राहिला । उभा राहिला । तुझ्या दर्शना । द्वारीं येवोनी ॥ ६ ॥ उठा उठा हो दत्त दयाळा । उठा उठा हो दत्त दयाळा । समाधि सारोनी । श्रीमुखा । समाधि सारोनी । कूर्म दृष्टिनें । कूर्म दृष्टिनें । सुखवा भक्ता । दर्शन देवोनी ॥ ७ ॥ राधा केशव विश्वनाथ सुत । राधा केशव विश्वनाथ सुत । चरणिं शरण आला । निर्गुणा चरणिं आला । उद्धारी बा उद्धारी बा । त्याला देउनि । सगुण दर्शनाला ॥८॥

(वि. के. कुलकर्णी)

# पदें व अभंग

१. दत्त दत्त म्हणे वाचें । काळ पाय वंदी त्याचे ॥ १ ॥ दत्तचरणीं ठेवी वृत्ति । होय वृत्तीची निवृत्ति ॥ २ ॥ दत्तरूप पाहे डोळां । वंद्य होय कळिकाळा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं दत्त । हृदयीं वसे सदोदित ॥ ४ ॥

२. धन्य धन्य तेचि नर । दत्तनामीं जे तत्पर ॥ १ ॥ त्यांचें होतां दरुशन । पतित होताती पावन ॥ २ ॥ तयालागीं शरण जावें । काया वाचा आणि जीवें ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं । त्याचें पाय आठवी मनीं ॥ ४ ॥

३. उदार दयाळ गुरुदत्त । पुरवी हेत भक्तांचा ॥१॥ त्याचे चरणीं लीन व्हावें । शुद्धभावें करूनी ॥ २ ॥ मुखीं स्मरा गुरुदत्ता । नाहीं दाता दुसरा ॥ ३ ॥ पायीं करा तीर्थयात्रा । गुरुसमर्था भजावें ॥ ४ ॥ म्हणे एकाजनार्दनीं । जनीं वनीं दत्त हा ॥ ५ ॥

४. कलियुगीं तारक । स्वामी दत्तराज एक ॥ १ ॥ त्याचें नाम नित्य गावें । भवसिंधूसि तरावें ॥ २ ॥ दत्तमूर्ती हृदयीं ध्यातां । पावे मोक्ष सायुज्यता ॥ ३ ॥ दत्त वसे जया मनीं । तया दत्त जनीं वनीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं दत्त । सबाह्य स्वानंदभरित ॥ ५ ॥

५. लागूनियां पायां जना विनवीत । मुखीं बोला दत्त वारंवार ॥ १ ॥ तेणें तुम्हां सुख होईल अपार । दत्त दयासागर आठवावा ॥ २ ॥ स्त्रिया पुत्र संसारा गुंतसि पामरा । तेणें तूं अघोरा पावशील ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं चिंती दत्तपायां । दत्तरूप काया झाली त्याची ॥ ४ ॥

६. माझी दत्त ती माऊली । प्रेमपान्हा पान्हावली ॥ १ ॥ कुर्वाळुनि लावी स्तना । नोहे निष्ठुर क्रोध नाहीं मनीं ॥ २ ॥ भक्तासी न विसंबे । सदा वाट पाहे उभें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं निश्चित । दत्तनामें पावन पतित ॥ ४ ॥

७. दत्तात्रय नाम ज्याचें नित्य मुखीं । तया समसुखी नाहीं दुजा ॥१॥ भावें दत्त दत्त म्हणतसे वाचें । कळिकाळ त्याचें पाय वंदी ॥ २ ॥ दत्ताचें पैं रूप ज्याचें वसे नेत्रीं । आहिक्य परत्रीं तोचि सुखी ॥ ३ ॥

८. केलें आवाहन । जेथें नाहीं विसर्जन ॥ १ ॥ भरला ओतप्रोत । स्वामी माझा देव दत्त ॥ २ ॥ गातां येत नाहीं । पूर्ण सुलीनता पाही ॥३॥ एकाजनार्दनीं खूण । विश्वीं भरला परिपूर्ण ॥ ४ ॥

९. सहज सुखासनीं अनुसूयानंदन । पाहतां हें ध्यान वृत्ति निवे ॥१॥ बालोन्मत्त पिशाच्च त्रिविध अवस्था धरी । आपण निराकारी सोहंभावें ॥ २ ॥ कारण प्रकृति न घेचि माया । चिदानंद सत्ता विलसतसे ॥३॥ एकाजनार्दनीं हृदयीं आसन । अखंडीत ध्यान निजतत्त्वीं ॥ ४ ॥

१०. गुरु दत्तराया देई आलिंगन । तयासी वंदन करितों सर्व ॥१॥ दत्तरायाची जे करितात यात्रा । त्यांचेनी पवित्र होती तीर्थें । ज्याचे चित्तीं वसे गुरुदत्त ध्यान । त्याचेनी पावन तिन्ही लोक ॥ ३ ॥ दत्तालागीं अर्पी तन मन धन । परब्रह्म पूर्ण तोचि झाला ॥४॥ दत्तचरणतीर्थ जो का नित्य सेवी । उगवितो गोवो प्रपंचाची ॥५॥ दत्तावरूनियां कुरवंडी काया । तयाचिया पायां मोक्ष लागे ॥६॥ एकाजनार्दनीं मुखीं दत्त नाम । हरे भवश्रम क्षणामाजीं ॥ ७ ॥

११. दत्त सबाह्य अंतरीं । दत्तात्रय चराचरीं ॥ १ ॥ दत्तात्रय माझें मन । हरोनि नेलें मीतूंपण ॥ २ ॥ मुळीं सिंहाद्रीपर्वतीं । दत्तात्रयें केली वस्ती ॥ ३ ॥ भक्तांमनीं केला वास । एकाजनार्दनीं विश्वास ॥ ४ ॥

१२. नाम निजभावें समर्थ । जेथें नाम तेथें दत्त ॥१॥ वाचें म्हणतां देवदत्त । दत्त करी गुणातीत ॥ २ ॥ दत्तनामाचा सोहळा । धाक पडे कळिकाळा ॥ ३ ॥ दत्तनामाचा निजछंद । नामीं प्रगटे परमानंद ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं दत्त । सबाह्य स्वानंदें भरीत ॥ ५ ॥

१३. नाम मंगळा मंगळ । झालें जन्माचें सफळ ॥ १ ॥ दत्त जीवींचें जीवन ।

दत्त करणां कारण ॥ २ ॥ अनुसूयात्मजा पाहीं । देहभाव उरला नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं दर्शन । चित्त झालें समाधान ॥ ४ ॥

१४. नंदन जो अनुसूयेचा । तो तूं कैवारी आमुचा ॥ १ ॥ आमुचा तूं म्हणो जरी । भेट कां न देसी हरी ॥२॥ हरी माझी अंतर्व्यथा । पद दावीं तुझे नाथा ॥३॥ नाथा आलों काकुळती । कळकळसी न कां चित्तीं ॥ ४ ॥ का चित्तीं न ये दया । वासुदेवाची गुरुराया ॥ ५ ॥

१५. दत्ता कार्तवीर्य अर्जुन ये वेळां । आला कीं पदाला पाहिला कीं ॥१॥ कीं अलर्कभक्त कीं ये नित्यमुक्त । मल्हाद जो मुक्त सक्त पदीं ॥ २ ॥ पदीं आयुराजा पडे की घा तुझा । विष्णुदत्त द्विजा भेटनी कीं ॥ ३ ॥ किंवा भार्गवराम पातला सुधाम । सोमकांत नाम राजा ये कीं ॥४॥ कीं अवघा पुसे कोठें जातां असें । दुःशकुन ऐसें मानसी कीं ॥५॥ की दुर्दैव माझें आड पुढें आलें । म्हणोनी न केलें आगमन ॥६॥ पुरे हा संशय न होय निश्चय । वासुदेव पाय चिंती तुझे ॥७॥

१६. दत्ता धोपेश्वरीं करिसी कीं अंगीं । भस्मलेप वेगीं कां न येसी ॥ १ ॥ न येसी भिक्षेसी गुंतूनियां दत्ता । कोल्हापुरीं आतां दाता कीं तूं ॥ २ ॥ कीं तूं पंढरीसी सुगंधी हुंगसी । पांचाळीं शुक्तीसी वमसी कीं ॥ ३ ॥ वससी पश्चिमसागरीं निष्काम । वासुदेवें नाम घेतां दत्ता ॥ ४ ॥

१७. धरीं अवतार विश्व ताराया । अत्रीची अनुसूया गरोदरा । ऋतु काळ हेमंत नक्षत्र रोहिणी । शुक्ल पक्ष दिनीं पूर्ण तिथी ॥१॥ तिथि पूर्णिमा मास मार्गशीर्ष । गुरु तो वासर उत्सव काळ ॥३॥ एकाजनार्दनीं पूर्ण अवतार । निर्गुण निराकार आकारलें ॥४॥

१८. दत्त वसे औदुंबरीं । त्रिशूल डमरू जटाधारी ॥१॥ कामधेनु आणि श्वान । उभे शोभती समान ॥२॥ गोदातीरीं नित्य वस्ती । अंगीं चर्चिली विभूति ॥ ३ ॥ काखेमाजीं शोभे झोळी । अर्ध चंद्र वसे भाळीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं दत्त । रात्रंदिन आठवित ॥५॥

१९. दत्त माझा दिनानाथ । भक्तालागीं उभा सतत ॥ १ ॥ त्रिशूल घेऊनियां करीं । उभा असे भक्तद्वारीं ॥२॥ भाळीं चर्चिली विभूति । रुद्राक्षाची माळ कंठीं ॥३॥ जवळी असे कामधेनु । तिचा महिमा काय वानूं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं दत्त । रूप राहिलें हृदयांत ॥५॥

२०. हातीं कमंडलु दंड । दत्तमूर्ति ती अखंड ॥१॥ ध्यान लागो माझें मना । विनवितों गुरुराणा । अंगीं चर्चिली विभूति । हृदयीं वसे क्षमा शांति ॥ ३ ॥ तोचि चित्तांत आठव । गुरुराज दत्त देव ॥४॥ एकाजनार्दनीं दत्त । तद्रूप हें झालें चित्त ॥५॥

२१. दत्त माझा पिता दत्त माझी माता । बहिणी बंधु चुलता दत्त माझा ॥१॥ दत्त माझा गुरु दत्त माझा तारूं । मजशीं आधारू दत्तराज ॥ २ ॥ दत्त माझें मन दत्त

माझे जन। सोइरा सज्जन दत्त माझा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं दत्त हा विसावा । न विचारीत गांवा जावें त्याच्या ॥ ४ ॥

२२. ऐसी जगाची माउली । दत्तनामें व्यापुनी ठेली ॥ १ ॥ जावें जिकडे तिकडे दत्त । ऐसी जया मति होत ॥ २ ॥ तया सांकडेंचि नाहीं । दत्त उभा सर्वां-ठायीं ॥ ३ ॥ घात आघात निवारी । भक्ता वाहे धरीं करीं ॥ ४ ॥ ऐशी कृपाळू माउली । एकाजनार्दनीं देखियली ॥ ५ ॥

२३. आमुचें कुळीचें दैवत । श्रीगुरुदत्तराज समर्थ ॥ १ ॥ तोचि आमुचा माय-बाप । नाशी सकळ संताप ॥ २ ॥ हेंचि आमुचें व्रततप । मुखीं दत्तनाम जप ॥ ३ ॥ तयावीण हे सुटिका । नाहीं नाहीं आम्हां देखा ॥ ४ ॥ एका शरण जनार्दनीं । दत्त वसे तनमनीं ॥ ५ ॥

२४. काय तरि बाई । अनसूये । तुझी चतुराई ॥ धृ० ॥ ब्रह्मा, विष्णु, शिव–शंकर । ज्यांचे सर्व देव सर्व किंकर । जाहलीं आई, तुझीं लेंकरं । उपकारा हीं ॥ अनसुये ॥ १ ॥ त्रिभुवनीं पतिव्रता मिरविती । लक्ष्मी, सावित्री, पार्वती । करिती येउनिया पर्वतीं । पदर–पसराई ॥ अनसुये ॥ २ ॥ तुझ्यापुढें तिन्ही देव रावती । तिघेहि आज्ञेमधें वागती । तिघीजणी पति-दान मागती । देवदाराही अनसुये ॥ ३ ॥ दिधले जिचे तिचे तिला भर्तार । झाला दत्तात्रय अवतार । कृपाघन, जगद्गुरू, दातार तुझ्या या पायीं ॥ अनसुये ॥ ४ ॥ तीर्थें, देव, ऋषी, मालिका । ऋद्धी, सिद्धि, महाकालिका । राहिली तुझ्या निकट रेणुका । एकवीरा ही ॥ अनसुये ॥५॥ विष्णुदास म्हणे संकट । निवारीं धरिले पाय बळकट । दिनरजनीं माझी कटकट । नको दारा ही । अनसुये ॥ ६ ॥

२५. दयाळा, आलक, दत्ता, अवधूता । डमरू–कमंडलु–दंडपाणी, दिगंबरा, अमरा, श्रीधरा । शंकरा, जगत्प्राणनिर्माणकर्ता ॥ आलक दत्ता० ॥ धृ० ॥ ब्रह्मा, विष्णु, शंकर, गुरुवर्या, आर्या, पवित्रा, विचित्रचरित्रा । पंकजनेत्रा, कोमलगात्रा अत्रिमुनी-अनसुयासुपुत्रा । मुगुट, कुंडल, मार्कंद्रा, त्रिपुंड्रगंधा, भालचंद्रा । रुंडब्रह्मांडखंडमाळा-अलंकृता, योगमुक्ता । आलक दत्ता ॥१॥ दाता त्राता, तूं जनिता, निर्दोषा, त्रिशीर्षा । पुरुषवेषा, सुरेशा, अमलाभंगा, कलिमलभंगा । ब्रह्मप्रकाशितलिंगा, निःसंगा, नमो सद्गुरु नारायणा । नमो भक्तपरायणा ! नमो विष्णुदासनाथा, ! सुशोभित निगमपंथा ! आलक दत्ता, अवधूता ॥ दयाळा ॥ २ ॥

२६. तूं तो समर्थ दत्त दाता । नाम सोडिलें कां आतां ॥ १ ॥ जगन्माते, लेंकुरवाळे । काय निघालें दिवाळें ॥ २ ॥ कृपासिंधु झाला रिता । कोण्या अगस्ती-करितां ॥ ३ ॥ सुकीर्तीची सांठवण । काय नाहीं आठवण ॥ ४ ॥ भागीरथी कां

वाटली । कामधेनु कां आटली ॥५॥ चंद्र थंडीनें पोळला । कल्पवृक्ष कां वाळला ॥६॥ विष्णुदास म्हणे कनका । ढंग लाऊं नका नका ॥ ७॥

२७. गुरु, दत्तात्रय, अवधुता । ऐक अनुसूयेच्या सुता ॥ १ ॥ वाचें म्हणतों दत्तात्रय । भोगितों मी तापत्रय ॥२॥ प्रसादाची करितों आशा । विषयीं होइना निराशा ॥३॥ तुझा म्हणवितों शिष्य । नरकीं खर्चितों आयुष्य ॥ ४ ॥ तुझा म्हणवितों दास । सदा राहतों उदास ॥ ५ ॥ तुझा म्हणवितों किंकर । तुला लावितों करकर ॥६॥ तुझा म्हणवितों अंकित । चसतों अफु, गांजा, फुंकित ॥७॥ तुझा म्हणवितों आश्रित । नाहीं आत्मज्ञान श्रुत ॥८॥ तुझा जन्माचा सांगाती । जातों काय अधोगती ॥ ९ ॥ विष्णु-दासाच्या हृदयस्था । याची वसवावी व्यवस्था ॥१०॥

२८. ध्याईं मनीं तूं दत्तगुरू ॥धृ०॥ काषायांवर चरणीं पादुका, जटाजूट शिरीं ऋषिकुमरू ॥ ध्याईं० ॥१॥ माला कमंडलू शूल डमरू करीं, शंख चक्र शोभे अमरू ॥ ध्याईं० ॥ ॥२॥ पतितपावन तो नारायण, श्वान सुरभिसम कल्पतरू ॥ ध्याईं० ॥३॥ स्मर्तृगामी कलितार दयाघन, भस्म विभूषण ' रङ्ग ' वरू ॥ ध्याईं० ॥ ४ ॥

२९. नमूं नमूं या यतिवर्या । दत्तात्रेया दिगंबरा । सोडुनी भवसुखाची आशा । शरण तुजला आलों मी ॥धृ०॥ न करि स्नान संध्या ध्यान । नाहीं केलें तव पूजन ॥ स्तोत्र पाठ पारायण । नाहीं केलें कदाचन ॥१॥ न कळे काव्य आणि गान । नाहीं नाहीं व्युत्पत्तीचें ज्ञान ॥ भाव एक शुद्ध पूर्ण । रितें आन सर्वही ॥ २ ॥ तूंचि माय बाप सखा । बंधू भगिनी आणि भ्राता ॥ इष्ट मित्र तूंचि त्राता । भक्तांचा पालक ॥ ३ ॥ वेडें वांकुडें शेंबडें । बाळ ओंगळ धाकुटें ॥ नाहीं ऐकिलें देखिलें । मायबापें अव्हेरिलें ॥४॥ देव भावाचा भुकेला । ऐकुनी पांडुरंग–धांवा ॥ सच्चिद् आनंदाचा गाभा । उभा ठेला अंतरीं ॥ ५ ॥

३०. दत्ता येई रे । जिवलगा । प्राणविसाव्या माझ्या ॥ धृ० ॥ तुज विण चैन नसे, चैन नसे काम न कांहीं सुचे ॥ तारक कोण असे, नव दीसे, आन न कोणी भासे ॥ अनाथनाथ असा, अवधूता, तूंचि एक भगवंता ॥ येई येई या गुरुराया संतांच्या माहेरा ॥ दत्ता० ॥१॥ बुडतों भवडोहीं पैलथडी सत्वर नेई कुडी ॥ लाटा उसळती विषयांच्या, कामक्रोधमोहाच्या ॥ ममतामगरीनें, मज धरिलें, कांहीं न माझें चाले ॥ पहासी कां न अमा, वा सदया, संहर दुस्तर माया ॥ दत्ता० ॥ जन्मुनी नरदेहीं, म्यां कांहीं, सुकृत केलें नाहीं ॥ प्रचंड उभारिले, पापाचे, डोंगर दुष्कृत्याचे ॥ धांवे झडकरी, असुरारि, कृपावज्र करीं घेई ॥ कर्माकर्मातें, ने विलया, देई अभय दासा या ॥ दत्ता० ३ ॥ गुरुजना साधूंची, देवाची, निंदा केली साची ॥ ऋषिमुनि निंदियले, ग्रंदिपले, म्लेंच्छग्रंथ ते सारे । अमृत सोडुनियां, स्वगृहीचें, परगृहमदिरा झोंकें ॥ झालों क्षीण अतां ही काया, धांव धांव यतिराया ॥ दत्ता० ४ ॥ माता झुगारितां,

लवलाही, तान्हें कोठें जाई ॥ तूंचि सांग घरें, कोणी कडे, तुजविण जाण घडे ॥ कोठें ठाव नसे, त्रिभुवनीं, तुज विण रानींवनीं ॥ लागें दीन असा तव पायां, दे 'रंगा' पदछाया ॥ दत्ता० ५॥

३१. धांव धांव दत्ता किती वाहूं आतां । चैन नसे चित्ता येईं वेगीं ॥ १ ॥ येईं वेगीं दत्ता तूंचि माता पिता । आन नसे त्राता कोणी जगीं ॥ २ ॥ जगीं माय बाप तूंचि सखा कृप । स्वस्वरूपीं थाप बाळ तुझें ॥ ३ ॥ बाळ तुझें माई अंकावरीं घेईं । बोधस्तन देईं मुखीं माझ्या ॥ ४ ॥ मुखीं माझ्या शोष पडतो विशेष । प्रेमरस धीश पाजीं 'रङ्ग' ॥५॥

३२. धेनु जेवीं वत्सा धांव दत्ता तैसा । तुजविण कैसा राहूं जगीं ॥ १ ॥ कोठें जाऊं आतां कोण करी शांता । तुजविण त्राता आन नसे ॥ २ ॥ येईं येईं दत्ता पतितोद्धर्ता । भवभयहर्ता तूंचि माझा ॥ ३ ॥ नको पाहूं अंत सदया अनंत । उद्धरीं हा जंत 'रङ्ग' तोका ॥ ४ ॥

३३. चला चला हो माहुरीं । भक्तजनांचे माहेरीं ॥ १ ॥ माता रेणुकेचें स्थान । तेथें वसे दत्त जाण ॥ २ ॥ करी भक्तांचा सांभाळ । द्वैत येऊं नेदी काळ ॥ ३ ॥ 'रंग' म्हणे काळ गेला । हाता फिरोनी न आला ॥ ४ ॥

३४. चला चला रेवातटीं । अनसूया ती गोमटी ॥ १ ॥ असे आश्रम पावन । होत नेत्र-संतर्पण ॥ २ ॥ जरा मृत्यु दूर जाती । मोक्ष लागे चळें पाठीं ॥ ३ ॥ 'रंग' माया भ्रम नासे । पूर्ण ब्रह्म दत्त दिसे ॥ ४ ॥

३५. ऐसें कैसें केलें देवा । घडली नाहीं कांहीं सेवा ॥ १ ॥ नाहीं देहाची ह्या चाड । जावो अथवा राहो द्वाड ॥ २ ॥ परी पडो न विसर । हेंचि मागों दिगंबर ॥३॥ चरण विसंबो ना क्षण । 'रंग' राहो निर्मळ मन ॥ ४ ॥

३६. देखियला हो, आम्हीं पाहियला हो। पूर्णानंदकंद विबुधवंद्य गुरु हो ॥ आम्हीं ॥ ध्रु० ॥ सदयहृदय अत्रितनय । कलिकृत बहु पाहुनि अनय ॥ सुजनअवनिं अवनिं सदय । यतिरूपें प्रगटला हो ॥ आम्हीं० ॥ १ ॥ कोटिमदनविहित वदन । मंदहसित कुंदरदन ॥ अमल-कमलदल-सुनयन । लसित सतत माळ गळां हो ॥ आम्हीं० ॥२॥ भस्मभूषित सकळ अंग । दुकुल अरुणसम सुरंग ॥ पदनत-अघ करुनि भंग । अर्पि सुखद आत्मकला हो ॥ आम्हीं० ॥ ३ ॥ श्रीनृसिंह सरस्वती । स्तवनिं चकित वेदमति ॥ गंगाधरतनय प्रीतिं । हृत्कमलीं पूजियला हो ॥ आम्ही० ॥ ४ ॥

३७. श्रीगुरु औदुंबरीं । पाहिले, नरहरि औदुंबरीं ॥ ध्रु० ॥ दंड-कमंडलु करीं विराजित । मुख इंदूचें परी ॥ पाहिले नरहरि० ॥ १ ॥ धर्मरक्षण करावयास्तव । मानववपु आदरी ॥ पाहिले नरहरि० ॥ २ ॥ गंगाधरात्मज तत्पदकमलीं । लागला भ्रमरापरी ॥ पाहिले नरहरि० ॥ ३ ॥

३८. शोभे मुकुट शिरिं या रे। सुरनरवर दिप्पले या। दलितनेत्रमुखाब्जिं साजती अधर सुरंगित निरूपमवरि। दंतकिरण राजतिया। अखिल दीप्ति भवतम पळिनेलें। मुनि वेधले; इतरें न रमती, येकेक देव त्रिदिव सोडूनि; । येकेके देव स्वसुख;सांडुनि येकेके देव जीवदान देउनि; । सकळ देव सेविति या; आनंदरूप श्रीदत्तु या रे॥ (दासोपंत)

३९. बहुतां दिवसां ह्या दिठु ऐसा देखिला नयनीं रे। दत्ता! तुझें स्वरूप अगम्य मकट जालें त्रैभूवनीं ॥१॥ धृ ॥ नवल! नवल! रे! तापस हो! अत्रीचें तप कैसें? येसणें निधान साधिलें परब्रह्म अनायासें ॥छ॥ देवांचा देउॅं देहीं सर्वां योगिया आधारु रे। अवधूतु आत्माराम मकटु जाला दिगंबरु ॥ २ ॥ (दासोपंत)

४०. किरणीं जळकल्लोळ गमतां मृगें लांचावलीं रे। सेखीं वा ॲ; ते कैसी? दुराशा कवल्ली रे? ॥१॥ ॥धृ॥ नवल! नवल! रे! सुजाण हो; संसारिक हें तैसें. जन हे जनासी नोळखे; वृथा ममतेचें पीसें ॥ धृ॥ गुरुवचनावरि सावधु हो! पां! साच तेचीं विचारीं रे! जन साच तें। दिगंबरें तुटें भ्रमु; न धरीं शरीरीं ॥२॥ (दासोपंत)

४१. क्षितितळगत जल चंचळ ढव्वा सागरीं वीसांवे रे। नाहीं तया पुनरावृत्ति; कार्यकारणीं सामावे. ॥१॥ धृ॥ नवल! नवल! रे सुजाण हो! जिवासि जालें तैसें अवधूतें येकेंवीण लेया कोठेंचि न दीसे ॥छ॥ नाना योनीं भ्रमतां श्रमले साधनें आयासें रे! दिगंबरीं जाले लीन, ते निवाले ब्रह्मरसें ॥२॥ (दासोपंत)

४२. सावळा सुंदरू वो! देखिला आदिगुरू। मन माझें उतावीळ, कैसें मी करूं। तें मीं केवि सावरूं? ॥१॥ ॥धृ०॥ जाईन सवें वो! चित्त गुंतलें, माये! ॥छ॥ मन निमालें वो! बोध नवा तुळलें। दिगंबरें येणें माझें मी पण गोविलें॥२॥ (दासोपंत)

४३. वाट पाहीन वो। ध्यान धरीन माये! अवधूतेंवीण मन निश्चळ न राहे ॥ १ ॥ धृ ०॥ वेळ जालो वो! दत्तु न ये गे! वाइये! ॥ छ ॥ आस लागली वो! बुद्धि गुंपोनि ठेली। दिगंबरेंवीण सैये। निराशा जाली ॥२॥ (दासोपंत)

४४. षड्भुजमूर्ति सावळी सुंदर। रूपमनोहर देखियली ॥१॥ शंख चक्र हातीं त्रिशूळ डमरू। कासें पीतांबर कासीयेला ॥ २ ॥ माळा कमंडलू शोभति दों हातीं। गळां वैजयंती रुळतसे ॥ ३ ॥ निरंजन म्हणे सद्गुरु निधान। हेंचि माझें धन। सर्वांपरीं ॥४॥

४५. दत्तात्रया स्वामि सर्वांचा हो दाता। नाहीं ठाव रीता तयां वीण ॥ १ ॥ भागीरथी माजी सारूनिया स्नान। करि भिक्षाटन कोल्हापुरीं ॥ २ ॥ पांचाळेश्वरासी भोजनासि जावें। आसन करावें शेषाचळीं ॥ ३ ॥ माहूरपर्वतीं करूनिया निद्रा। गिरनारीं मुद्रा सारीतसे ॥ ४ ॥ निरंजनि वनिं अक्षई रहातो। धावूनिया येतो आठवितां ॥ ५ ॥

४६. येईं वो श्रीगुरू स्वामि दत्तात्रया । दयाळा सखया दीनबंधू ॥ १ अनाथाचा-नाथ कृपेचा सागर । बहू तूं उदार सर्वांगुणें ॥ २ ॥ भक्तकाजासाठीं धाऊनियां येसी। हेंचि वागवीसी ब्रीद सदा ॥ ३ ॥ निरंजन म्हणे धाउनिया यावें । ग्रंथ उठवावे जळाले ते ॥ ४ ॥

४७. त्वकर देईं भेटी । दिगंबर स्वामी या ॥ ध्रु ॥ सावळी सुंदर तनु । उगवले कोटी भानु । लावण्यता किती वानु । शक्ती नाहीं गावया ॥ १ दिगं. ॥ कासियला पितांबर । माथां मुगुट सुंदर । गळां मुक्त चामीकर । गुंफियेल्या जाळिया ॥ २ दिगं. ॥ षड्भुजा सकुमार । षडायुधें सुंदर । आंगीं कस्तुरी केशर । लावुनिया उटीया ॥ ३ ॥ दिगं. ॥ स्वामि त्रैलोक्यविहारी । देखियेला गिरनारीं । निरंजनें डोळेभरी । जीवन्मुक्त व्हावया ॥ ४ दिगं. ॥

४८. दत्तात्रेया जय गुरुराया तुझिया पायां नमुं यतिवर्या ॥ धृ० ॥ दृढ धरिलें म्यां तुझिया पायां तूंची सखया वारिं अपाया । ना तरि वायां हे नरकाया जाईल सदया सद्गुरुराया ॥ १ ॥ देव दुरत्यया हे तव माया द जनि विलया सतत महामया । आग-मगेया जय अनसूया तनया तारीं वारिं अपाया ॥ २ ॥ नेणें मायातरणोपाया वास्तव धरिलें म्यां तव पाया । जय वासुदेवा तारिं वेदगेया तूंच कृपाळू सद्गुरुराया ॥ ३ ॥ दत्तात्रेया जय गुरुराया तुझिया पायां नमु यतिवर्या ॥

४९. जय करुणाकर जगदुद्धारा । अजि कां रुससी परमोद्धारा ॥ ध्रु० ॥ तूं मायबाप धरितां कोपा । कोपा माझ्या तापा शमवी नापा । जय करुणा ॥ १ ॥ बाल-वाक्यापरी स्तव अवधारो । वारी मम चिंता तूंचि भवारी । जय करुणाकर ॥ २ ॥ तुज शरणागत तेचि कृतार्थ । व्यर्थ कीं हें मत वेदसंमत । जय करुणा ॥ ३ ॥ जो मम भक्त मत्पदीं सक्त । दोषविमुक्त तो सुखयुक्त ॥ जय करुणाकर ॥ ४ ॥ नाश न होई मम भक्ताचा । न करी मिथ्या हे तव वाचा ॥ ५ ॥

५०. मंगलधामा अचिंत्यमहिमा भक्तां भजनीं दे प्रेमा । नामा वदउनी कामा पुरवुनी नेतो अक्षयसुखधामा ॥ ध्रु० ॥ भजनीं जाउनी संतां वंदुनी दत्तस्वरूपा आठवुनी। चित्तीं चिंतुनी दृष्टी पाहुनी वदावें दत्तनाम वदनीं ॥ १ ॥ तामस भोजन करिती जे जन आळस निद्रा ये नामा । उच्च स्वरांनीं टाळ्या पिटुनी घेतां न मिळे वाव तमा । मंगलधामा ॥२॥ भजन समाप्ति होतां प्रणती करूनि स्मरावें आत्मारामा । मधुनि उठतां गोष्टी करितां जाति अधोगती दुर्जन्मा ॥ मंगल ॥३॥ चिन्मय जाणुनि तन्मय होवुनि भजतां दत्तचि दे शर्मा । नर्मा सोडा कर्मां उलंडा तोडा भजनें भवमर्मा ॥ मंगल ॥४॥

५१. गळा टाळा फूटतां वाहतां रे । कां न ऐकसी सांग नरहरे । कुठें तुझा सर्वज्ञपणा गेला । मला नेणसि काय म्हणूं तूला ॥ १ ॥ न पाहसी मजला जरी दत्ता । सर्वसाक्षित्व राहील कसें आतां । मद्विलापा नायकसी जरी । कसी राहे व्यापकता

त्वदंतरीं ॥ २ ॥ न येसी ऐकुनी मद्विलापा । कृपालुत्व जाईल तुझें बापा । संकटीं मी धायाळ असें देवा । धांवें पावें वा कृपालो सदैवा ॥ ३ ॥

५२. कलियुगीं साधन हेंचि एक । मनुजा तूं वा ऐक ॥ ध्रु० ॥ सुखकर श्रीदत्ताचें नाम । हेचि कल्याणाचें धाम । कलिमलहर हें निकाम । जेणें निष्काम हो लोक ॥ १ ॥ मग्यमुख्य आवश्यक जें कर्म । नाम घेतां तें दे शर्म । हाचि मुनिसंमत सद्धर्म । मनुजा धर्म हें चोख ॥ २ ॥ धाक घे यच्छ्रवणें काळ । ग्राहसुर होती न प्रति-कूळ । वासु म्हणे मोक्षहि अनुकूळ । उद्धरे कूळ घ्या भाक ॥ ३ ॥

५३. या युगीं उगीच लोक कष्टती पहा । दत्तभजन चित्तशोधन नेणती अहा ॥ ध्रु० ॥ व्रोत सांग यागयोग परि न भेट दे । तोचि दत्त दत्त वदतां दावितो पदें । म्हणुनि इतर त्यजुनि सुकर भजनीं स्थिर रहा ॥ या युगीं ॥ १ ॥ येत जेथ दत्त तेथ देव धावती । सर्व तीर्थ गंगा तेथ अचल राहती । म्हणुनि चांग भजन याग पापताप हा या युगीं ॥ २ ॥ दत्त स्मरूनि चित्त लाउनि भजन हो करा । वित्तविषयमत्तसंग नित्य परिहरा । मग भजनीं जग विसरूनि दत्तमय पहा ॥ या युगीं ॥ ३ ॥

५४. कां भटकत फिरतां तुम्हि सदैव । प्रिय मानुनि विषयवैभव धुंडितां किं तें सदैव ॥ १ ॥ स्वर्गि नरकिं तें वैभव दैव दे सदैव । मायामय तें वैभव दे कधाचि सर्व दैव ॥ २ ॥ होतां प्रतिकूल दैव । नष्ट होय सर्व । यम मारी नेउनी पुरीं । शिक्षा करी नानापरी । कोण तयातें निवारी । तारी कोण तदैव ॥ ३ ॥ दैवत जें दैवतांचें । तारक जें तारकांचें ॥ दत्त दत्त मम वाचें । वद मया मदैव ॥ ४ ॥ हो कृतार्थ वासुदेव । चिंतुनियां तेंचि दैव ॥ तुच्छ करुनि तें वैभव भाव धरि सदैव ॥ ५ ॥

५५. एकचि नाम मंगलधाम । घेतां होतिल पूर्ण काम । परि ये आळस यास्तव नाम । घेला लीलायुक्त ॥ १ ॥ भाकर भान भूक हरीन । परि खोलंवतो हात । बहु-विध मिळतां शांत । होतो जैसा मुक्त ॥ २ ॥ दत्तलीलानामान्वित । करितां भजन प्रेमभरित । युक्त होतो दत्तभक्त । विस्मृतविग्रह शांत ॥ ३ ॥

५६ मी धरिं घरिं पादा सुखवरदा हृतखेदा अक्षयवरदा ॥ध्रु०॥ श्रीसद्गुरुवर नरतनुधर जय जय यतिवर अत्रिकुमर सुमनोहर गाणगापुरकृतविहार भो वरदा ॥ १ ॥ भो उद्धृतजन करुणासदन दमितदमन सुमुखनलिन हीररदन कमल नयन प्रियभजन वरदा ॥ २ ॥ संसिद्धिकरा अमरवरा घोरतरा भवसागरापासुनि नरा उद्धरि हरा जोडोनि करा नमूं सुरवरदा ॥ ३ ॥ मां पाहिं ईश्वर करुणाकर जोडुनि कर विनवीं सादर शिरीं वरकर धरिं सादर दर परिहरिं तूं गविदा ॥ ४ ॥ मी पापी जरी धर्म न करिं वासु-देवावरि न दर करीं तूं सदा ॥५॥

५७. भगवान् अनसूयेचा पुत्र त्रिभुवनीं गातचरित्र । भगवान् अनसूयेचा पुत्र ॥ध्रु० ॥ दत्तात्रेय श्रुतिगणगेय त्रिदशवरीय स्तुतगुणनिचय ॥ योगिध्येय स्वच्छतराशय

स्वयें निगश्रय स्वीयजनाश्रय समर्पिताभय दर्शितविनय नयविदात्त विश्वसूत्र जो वसे सर्वदा स्वतंत्र ।। १ ।। रमणी चिमणी जयाचि तरुणी मूर्ति सद्गुणी भरलि सुवर्णी वाटे तरणी जेथ लपे झणि ज्याचे चरणीं श्री घे धरणी तो हा नरमणि अवतरे धरणी गृहिणि अत्रिची पवित्र तीचा होय जो सुपुत्र ।। २ ।। भाविकवरदा परमानंदा पाहिं मुकुंदा परमानंदा जय गोविंदा वारुनि खेदा पुरवुनि छंदा हरिं या विपदा परमानंदा दावि निजपदा वरदा वासुदेवमित्र असती तूं अत्रिपुत्र ।। भगवान अन. ।। ३ ।।

५८. दत्ता चरण सेवा तुझी । देईं आस नाहीं दुजी ।।धृ० ।। तव कृपें मी धन्य झालों ।। भव भ्रांति तुटली ।। परम पदीं परब्रह्ममूर्ती ।। आंगें भेटली ।। १ ।। अन-उदयास्त बोधरवी हा ।। हृदयीं प्रगटला ।। स्थिरचर व्यापुनी अनंतरूपें ।। अखंड भेटला ।।२।। भावाचा भुकेला सुलभ । दीन दासाला ।। गुप्त रूपें जनीं नांदुनी भेटे ।। अनन्य भक्ताला ।। ३ ।।

५९. दत्ता विसरू कसा तुला ।। तव पदीं अर्पिन प्राणाला ।। धु० ।। उपकृति अपार फेडूं न शके ।। भावें पद नमितों ।। चहुं देहांची आस सांडुनी निरंजनीं रमतों ।।१।। " नेति नेति " म्हणुनि लाजला ।। वेद झाला मुका ।। तव वर्णनीं गर्व धरूनी ।। प्रणव पडला फिका ।। २ ।। भक्तवत्सल बालमुकुंदपदीं । दीन दत्त तरला ।। सत्य सांगतों तत्पदीं मुक्ति ।। अनुभव हा ठरला ।। ३ ।। (पंतमहाराज)

६०. सगुण मूर्ति मनोहर ।। स्वामी माझा दिगंबर ।। मुखें नारायण उच्चार ।। दत्तात्रय माझा ।। १ ।। कंठीं रुद्राक्षांची माळा ।। हातीं शोभतो त्रिशूळ ।। ज्याला कांपे महाकाळ ।। दत्तात्रय मा० ।। २ ।। भगवी छटी अंगावरीं ।। सदा यती दंड धारी ।। दीन भक्तांचा कैवारी ।। दत्ता० ।। ३ ।। पायीं पादुका सुंदर ।। शंख चक्र गदाधर ।। भस्मोध्दूलीत शरीर ।। दत्ता० ।। ४ ।। निरंजन अवधूत ।। संगें श्वान भुंकत ।। कामधेनु सवें येत ।। दत्ता० ।। ५ ।। नित्य करी गंगास्नान ।। करविर क्षेत्रीं भिक्षा जाण ।। कृष्णातिरीं अनुष्ठान ।। दत्ता० ।। ६ ।। ऐसा संन्यासी निर्गुण ।। बोधें हरी जन्ममरण ।। दासा दावी निजखुण ।। दत्ता० ।। ७ ।। त्रैमूर्तीचा अवतार ।। दयाळू हा गुरुवर ।। करी दीनांचा उद्धार ।। दत्ता० ।।८ ।। सत्यज्ञान अनंत ।। शिवयोगी बालावधूत ।। दत्त भजनीं नाचत ।। दत्ता० ।। ९ ।। (पंतमहाराज)

६१. सर्वकाळ डोळां दिसो तुझी मूर्ति ।। योगीयाच्या पती दत्तराया ।। धृं० ।। सांवळें गोंडस रूप सुकुमार ।। दाऊनी समोर प्रेम देईं ।।१।। निर्गुण वैभव ब्रह्मादिकां नकळे ।। मी तरी दुबळें बाळ तुझें ।। २ ।। आवडीनें पायां घालीन मीठी ।। तेथूनीयां उठी कांहीं केल्या ।। ३ ।। न मागे आणीक नाहीं दुजी आस । दत्तापायीं वास देईं सदा ।। ४ ।। (पंतमहाराज)

६२. दिगंबर मूर्ति उभी कृष्णातीरीं ॥ यतिरूपधारी होऊनियां ॥ धृ० ॥ दंडकमंडलू शोभताती करीं ॥ साजे अंगावरी भस्मउटी ॥ १ ॥ दिव्य चरणकमळीं पादुका शोभती ॥ वेदसवें असती श्वानरूपें ॥ २ ॥ गळां अक्षमाळ भगवें अंबर ॥ वृक्ष औदुंबर कामधेनू ॥३॥ आवडिचें ध्यान हाचि ब्रह्मानंद । दत्त बाळा भेद नाहीं कांहीं ॥४॥ (पंतमहाराज)

६३. दत्त दिगंबर अत्रिनंदना ॥ त्रिभुवन संचारी ॥ भक्तवत्सला भक्ति देउनी ॥ भजनीं प्रेम भरी ॥धृ०॥ मंदमति मी परि भजनाची ॥ हृदयीं आस भारी ॥ बुद्धिचालका अंतर्यामीं ॥ वदवी तुझी थोरी ॥ १ ॥ चरणपल्लवीं ठेवि दयाळा वास करी अंतरीं ॥ निजानंदवैभव दाउनी ॥ चुकवी भवफेरी ॥ २ ॥ दीन हीन पामर श्वान मी ॥ लोळतों तव द्वारीं ॥ निशिदिनीं दत्तनाम मुंकतों । प्रेम देई नरहरी ॥३॥ (पंतमहाराज)

६४. भजनप्रेम देई बालावधूता ॥ धृ० ॥ ज्ञान समाधि कल्पित सर्व ॥ न लगे योगचिंता ॥ १ ॥ जीवनन्मुक्ति विदेह स्थिति ॥ जीवस्वप्नवार्ता ॥ २ ॥ चरण-सुखामृत पाजुनी नित्य ॥ येई पदरीं दत्ता ॥ ३ ॥ (पंतमहाराज)

६५. दत्तावधूता किती तूं श्रमसी । भक्तांसाठीं निशिदिनीं झुरसी ॥धृ०॥ धांवा न करितां धांवुनि येसी । वर न मागतां अभय देसी ॥ १ ॥ आपुला म्हणवून पदीं ठेविसी । योगक्षेमाची चिंता वाहसी ॥ २ ॥ भक्त म्हणतां मुक्त करिसी । दत्ता बुडविलें निज प्रेमरसीं ॥३॥ (पंतमहाराज)

६६. क्षणोक्षणीं विसरतों तुला । परी राखिसी निशिदिनीं मजला ॥ धृ ॥ सेवा स्मरण कांहीं न करितां । योगक्षेम वाहतोसी भला ॥ १ ॥ अभय देउनी सुखवीसी सतत । मूढ दास निश्चित केला ॥ २ ॥ बालावधूत दत्त प्रभू तूं । प्रेमानंद विश्वीं दाविला ॥ ३ ॥ (पंतमहाराज)

६७. धरियेले गे माय श्रीगुरूचे पाय । मीपण जेथें समूळ गेलें तूं पण कैचें काय ॥ धृ ॥ कार्यकारण भाव हेही झाला वाव । त्रिपद महावाक्य याचा करितां अनुभव ॥ १ ॥ शबलद्वय गेलें शुद्धपण आलें । असिपद तेंही येथें समूळ मिथ्या झालें ॥२॥ सर्वात्मक एक सद्गुरुमाय देख । माणिक म्हणे गुरुशिष्य याचा नसे थाक ॥३॥

६८ धांव सखे गुरु दत्त माउली ॥ धृ० ॥ हंबरोनि तुज पाडस चोहे । येउनि पाजवी पान्हा गाउली ॥ १ ॥ विविध तापें तापतसे उन्हाळा । येऊनी धरि तूं कृपेची साउली ॥२॥ माणिक म्हणे प्रभु येई तूं लवकरी । लागलेंसे मन तुझिया पाउलीं ॥ ३ ॥

६९ दत्तासी गाईन दत्तासी पाहिन । वाहिलें हें मन रे दत्तापायीं ॥धृ०॥ दत्त स्वयंरूप दत्त माय बाप । माझे त्रिविध ताप रे दत्त वारी ॥१ ॥ दत्त ज्ञानज्योती दत्त गुरुमूर्ति । दत्त हरी भ्रांती रे माणिकाची ॥ २ ॥

७०. दत्ता ब्रह्मचारी रे ब्रह्मचारी ॥ त्रिभुवनांत तुझी फेरी ॥ दत्ता० ॥ शेंपाचलीं आसन । माहुरगडांत निद्रास्थान ॥ १ ॥ काशींत स्नान करी । चंदन लावी पंढरपुरीं ॥२॥ कोल्हापुरीं फिरे झोळी । भोजन करीत पुरि पांचाळीं ॥ ३ ॥ तुळजापुरीं धुई हस्त । मेरुशिखरीं समाधिस्त ॥ ४ ॥ माणिक सद्गुरुनाथा । जगद्व्यापक अत्रीसुता ॥५॥ (माणिकप्रभू)

७१. करुणाकर दिनवत्सला दत्ता । सत्वर धांवुनि येई रे ॥धृ०॥ तुझें निजरूप पहावें म्हणून मन । अवलोकित दिशा दाही रे ॥१॥ भवसिंधूसी पार कराया । तुजविण आणिक नाहीं रे ॥२॥ दास माणिकाची हेचि विनंती । ठेवीं मज निज पायीं रे ॥३॥ (माणिकप्रभू)

७२. येई येई दत्तगुरु ॥ नको करूं रे अव्हेरु ॥ तुम्ही शुद्धसत्वरूप ॥ मज भेटावें उमप ॥ काय करूं देवराया ॥ तुझ्याविण जन्म वायां ॥ मिठालोनी चरणजोडा ॥ वरी लोळेन गडबडां ॥ आता करा अंगीकार ॥ नका शिणवूं किंकर ॥ तुझ्या दारींचा भिकारी ॥ नको लावूं दारोदारीं ॥ (उदासी)

७३. परब्रह्म दोन्ही पाय ॥ गावे आयासाशिवाय ॥ दोन्ही पाय देई मज ॥ माझी मागली गरज ॥ तुझ्या पायांची शपथ ॥ जरि मी मागेन बहुत ॥ नाहीं मागणें हें भारी ॥ कल्पतरूचे भांडारीं ॥ १० ॥ कल्पतरु कामधेनु ॥ पायीं घाला माझी तनु ॥ नाहीं मागत मी मोक्ष ॥ याती पाय तुझे साक्ष ॥ नको पाठवूं रे मोक्षा ॥ पुरवी पायांची अपेक्षा । (उदासी)

७४. अत्रियाळा ब्रह्मचारी माथा तुझ्या पायांवरी ॥ जिवलगा दत्तात्रेया पातळ कां केली माया ॥ गुरुराया या सत्वर ॥ ध्याया रंकाचा केवार ॥ दत्त जिव्हाळ्या राजसा ॥ धांवें पावें या वायसा ॥ (उदासी)

७५. कां रे दत्ता मित्रा, ऐसी सांड केली । वासया धरिली, आढी देवा ॥ पायांसी भेटतां काय तुमचें वेंचे । करा त्या पायांचे, दास आम्हां ॥ आपुल्या दासाची, पाहुनि तळमळ । मागें नाना वेळ धांवलास ॥ मी हा हतभागी, काय दैवीं लिहिलें । पाहिजे पोळीलें, चिताग्नींत ॥ आजवरी नाहीं, केली त्वां उपेक्षा । अनेकां सापेक्षां, भेटलास ॥ पहासी पतीता, दुःखे तळमळतां । कैंवि तुझे चित्ता, चैन पडे ॥ २० ॥ ऐसी तेव्हां देशी, हेंच कां औदार्य । पदरांचें काय, वेंचे तुझे ॥ सांग तरी मागें, कोणी काय दीलें । जयानें तोषीलें, चित्त तुझें ॥ (उदासी)

७६. उठ अनसूये जिवलगे । धांव निळकंठाचे मागें ॥ ये धावुनि सद्गुरुराया । माझी डोई घे तव पायां ॥ आजवरी झाले हाल । आतां पुढे तरी सांभाळ ॥ आई प्रेमपान्हा सोडा । अंकीं घ्या हो हा बापुडा ॥ मायबापा दत्तात्रेया । अझुनी कां ना ये दया ॥ काय उपाय तरी करूं । सांगा दत्तात्रेया सद्गुरु ॥ अत्रि-अनसूयेच्या

